मनोहर ग्रंथमाला, प्रकाशन ७ वें

# समग्र केळकर वाङ्मय

## ४ राजकारण

७११५३




सन १९३८

# प्रकाशकाचें निवेदन

संकल्पाप्रमाणें 'समग्र केळकर वाङ्मया'चे हे बारा खंड छापून आज वाचकांच्या हातीं देतां येत आहेत याविषयीं फार आनंद होतो. हें छपाईचें काम अपेक्षेपेक्षां पुष्कळच लवकर पूर्ण करितां आलें याचें श्रेय पुणें शहरांतील अनेक छापखान्यांनीं केलेल्या सहकारितेलाच दिलें पाहिजे.

हें समग्र केळकर वाङ्मय प्रसिद्ध करण्याची मूळ कल्पना स्वतः केळकरांची नाहीं त्याप्रमाणें ती प्रस्तुत प्रकाशकाचीहि नाहीं. केळकर वाङ्मयाचा अभ्यास आज सुमारें वीस वर्षें सतत करणाऱ्या एका गुणग्राही वाचकाच्या सहृदय अंतःकरणांत त्या कल्पनेचा उगम झाला. आणि त्याच्याच सक्रिय प्रोत्साहनामुळें त्या कल्पनेला हें दृश्य स्वरूप प्राप्त झालें हें सांगणें आम्ही आमचें कर्तव्य समजतों.

वास्तविक केळकरांचें '**समग्र**' वाङ्मय प्रसिद्ध करण्याची वेळ अजून आलेलीच नाहीं ! कारण त्यांची लेखणी अजून थांबलेली नाहीं. आणि त्यांची प्रकृति चांगली राहिली तर यापुढें त्यांनीं निर्माण केलेलें आणखीही वाङ्मय वाचकांना वाचावयास मिळेल अशी आशा करण्यास जागा आहे. तथापि बारा हजार पृष्ठें भरतील इतकें वाङ्मय आजच सिद्ध असल्यामुळें, हा पहिला मोठा हप्ता छापून मोकळें व्हावें ही गोष्ट सर्वच दृष्टींनीं इष्ट होती. पण यांत आणखी एक सोय विशेष होती ती अशी कीं, केळकरांच्या छापील ग्रंथांशिवाय त्यांनीं वर्तमानपत्रें, मासिक पुस्तकें यांत लिहिलेले लेख, इतर ग्रंथकारांच्या ग्रंथांना लिहिलेल्या प्रस्तावना, प्रसंगविशेषीं त्यांनीं दिलेल्या व्याख्यानांचे लेखी सारांश इत्यादि जें अवांतर वाङ्मयहि बरेंच आहे, तें आठवून मिळवून जुळवून युक्तायुक्त पाहून तपासून देणें हें काम इतरांच्या हातून कसें होणार ? तें त्यांचें त्यांनींच करणें शक्य. म्हणून त्यांना श्रम देऊनहि पण तें

त्यांच्या हातून होण्यासारखें आहे तोंपर्यंत करवून घेण्याशिवाय गत्यंतर नव्हतें.

या ग्रंथांतल्या 'वाङ्मय' शब्दाचा अर्थ नेहमीं आपण समजतों त्याहून किंचित् अधिक व्यापक केला पाहिजे. कारण केळकरांच्या लेखांप्रमाणें त्यांनीं दिलेल्या तोंडी व्याख्यानां—भाषणांचाहि समावेश त्यांत केला आहे. पण त्यांपैकीं बरींच, तोंडीं बोलून झाल्यावर, स्वतः त्यांचीं त्यांनीं लिहून दिलेलीं आहेत. इतर वार्ताहरांनीं लिहून घेतलेलीं अशीं थोडीं आहेत.

दुसरीहि एक गोष्ट सांगणें अवश्य आहे ती ही कीं, या बारांपैकीं कांहीं थोड्या खंडांत, केळकरांनीं स्वतः लिहिलें नाहीं किंवा ते बोलले नाहींत असेंहि कांहीं 'वाङ्मय' पुरवणी कागदपत्रांच्या रूपानें समाविष्ट केलें आहे. उदाहरणार्थ, टिळकांचीं मृत्युपत्रें, केसरीवरील खटल्यांतील न्यायमूर्तींचे निर्णय, एखाद्या सभेच्या हकीकतींतील प्रास्ताविक किंवा समारोपाचा असा कांहीं त्रोटक मजकूर इत्यादि. पण त्या ठिकाणीं केवळ तो प्रसंग किंवा तो विषय यांची नीट समजूत पटण्याला तो मजकूर साधनभूत असल्यामुळेंच घालावा लागला आहे. उलट कांहीं वाङ्मय केळकरांनीं लिहिलेलें असेंहि खंड—पृष्ठांच्या मर्यादेमुळें वगळावें लागलें.

हें प्रचंड वाङ्मय जवळ जवळ सारख्या पृष्ठसंख्येच्या बारा खंडांत बसवून देणें हें काम सहजच जरासें अडचणीचें झालें. तथापि शक्य तोंवर विषयानुसंधान साधण्याचा प्रयत्न करण्यांत आला आहे.

प्रकाशक.

# अनुक्रमणिका



| विषय | | पृष्ठ |
|---|---|---|



श्री. न. चिं. केळकर, विठ्ठलभाई पटेल इ.

दादाभाई नौरोजी यांजकडे अभिनंदनाकरितां गेलेलें शिष्टमंडळ (१९१७)



श्री. न. चिं. केळकर

अध्यक्ष लोकशाही स्वराज्य पक्ष (१९३३)

# राजकारण

## खंड ४ था

## १ लोकराज्यांचीं चरित्रें

### (१) हिंदुस्थानांतील जुनीं लोकराज्यें

या चरित्रांत प्रथम प्राचीन हिंदुस्थानांतील लोकराज्यें, त्यानंतर प्राचीन युरोपांतील लोकराज्यें, व त्यानंतर अर्वाचीन जगांतील लोकराज्यें, याप्रमाणें क्रम ठेवण्याचा विचार आहे. हा विषय घेण्याचें कारण थोडक्यांत एकदम सांगून टाकावयाचें तर तें असें कीं, पुढील सालापासून एक अत्यंत मर्यादित स्वरूपाचें लंगडें लुलें नामधारी लोकराज्य या देशांत प्रांतानिहाय सुरू होणार आहे. त्याच्या योगानें लोकांचें समाधान होणार नाहीं. यापेक्षां अधिक श्रेष्ठ प्रतीचें लोकराज्य आपण पुढेंमागें केव्हां तरी मिळवूं, आपणाला तें मिळणार, आणि आपण तें गाजविणार व उपभोगणार, असा हिंदी राष्ट्राला आत्मविश्वास वाटूं लागला आहे. राजा, राजसत्ता हे शब्द कांहीं दिवसांनीं या देशांत नामशेष होतील अशी जनतेची अपेक्षा आहे आणि ती नुसत्या खालसा मुलखांतच नव्हे तर संस्थानी मुलखांतहि. अर्थात् अशी उमेद बाळगणाऱ्या लोकांना जुन्या नव्या इतिहासांतील लोकराज्यांच्या चरित्रांची थोडीबहुत माहिती दिल्यास ती त्यांना आवडेल किंवा बोधप्रद तरी होईल. हीं चरित्रें देतांना एखाद्या चरित्रकाराप्रमाणें लोकराज्याची चांगली किंवा वाईट बाजू सजवून मांडण्याचा माझा हेतु नाहीं, तर

---

[ प्रो. आळतेकर यांनीं पश्चिम हिंदुस्थानांतील ग्रामसंस्थांचा इतिहास या पुस्तकांत जुन्या ग्रामसंस्थांची उत्पत्ति, स्थिति व लय म्हणजे लोकशाहीची अवस्था-त्रयी इचें वर्णन ताम्रपट, शिलालेख वगैरेंच्या साहाय्यानें चांगलें केलें आहे, तें वाचकांनीं मूळ इंग्रजींत अवश्य पहावें. त्यांच्या मतें ' जातक ' ग्रंथांत ग्राम-चरित्राचें वर्णन बरेंच यथार्थ आढळतें. तें ख्रि. पू. सहा-सात शतकांचें आहे. या लेखांतील विवेचनांत प्रो. आळतेकरांच्या पुस्तकाचा कांहीं कांहीं उपयोग करून घेतला आहे. ]

केवळ ऐतिहासिक माहिती देण्याचा असून, तिजवरून वाचकांनीं आपापलीं अनुमानें स्वतंत्र बुद्धीनें काढावीं हेंच अधिक बरें.

'लोकराज्य' या शब्दाचे दोन अर्थ आहेत. एक, लोकराज्य म्हणजे तात्त्विक राज्यघटनेचा एक विशिष्ट प्रकार. आणि दुसरा लोकसत्तेचा प्रत्यक्ष अनुभव. या दोनहि अर्थांच्या अनुरोधानें नव्या जुन्या इतिहासांत लोकराज्यांचीं चरित्रें कशीं झालीं याचीच हकीकत मी देणार आहें. दोनहि अर्थांनीं लोक-राज्याचे नमुने विविध दृष्टीस पडतात. घटनेच्या दृष्टीनें पाहतां समाजाच्या अगदीं प्राथमिक स्थितींत 'लोक' या शब्दाचा अर्थ कुटुंब, घराणें, वंश, आणि केवळ रक्तसंबंधानें एकजीव वागणारा समाज इतका संकोचित असूं शकतो. यावरून तें लोकराज्य किती चिमुकलें असूं शकेल हें लक्षांत येईल. उलट एखाद्या प्रचंड साम्राज्यांत 'लोकराज्य' या शब्दाला पात्र होणारी राज्यव्यवस्था अंतर्भूत होऊं शकेल किंवा अमेरिकेसारख्या प्रचंड राज्यांत, म्हणजे संघटित राज्यसमूहांत तीं आढळून येईल. याच्या दरम्यान पडणाऱ्या अनेक मुक्कामांत लोकराज्याचें स्वरूप कमी अधिक प्रमाणांत आढळेल यांत काय आश्चर्य ! उदा० पाहावें तर बोलूनचालून राजा राज्य करतो. पण तोच जर राजा रामचंद्रासारखा म्हणजे लोकाराधनाविषयीं तत्पर असला, तर तो सत्ता-प्रकार राजशाहीचा म्हणावा कीं लोकशाहीचा म्हणावा ! अशाच रितीनें नांव एक व अनुभव दुसरा असे इतर सत्ताप्रकार सांगतां येतील.राज्य नांवानें लोकांचेंच म्हणजे लोकशाहीचेंच. पण खरी सत्ता केव्हां मूठभर शहाण्यांच्या हातीं ! किंवा मूठभर तज्ज्ञांच्या हातीं ! किंवा मूठभर बलिष्ठांच्या हातीं ! किंवा एखाद्या शिरजोर व्यक्तीच्या हातीं ! किंवा फक्त जन्मानें स्वतंत्र अशा सरसकटक लोकांचे हातीं ! किंवा सरमिसळ श्रीमंत-गरीब, शिष्टअशिष्ट, अभिजात किंवा उपरि, निरनिराळ्या वंशांच्या धर्मांच्या किंब-हुना स्थानिक व परकीय अशाहि लोकांच्या हातीं ! मिळून अशा रितीनें एकीकृत किंवा विभागलेली अशी लोकसत्ता इतिहासांत आढळते.

त्याचप्रमाणें लोकराज्याच्या सुखदुःखांचा अनुभवहि असाच विविध प्रकारचा आढळतो. कारण सत्ता असून सुख नाहीं, याच्या उलट सुख असून सत्ता नाहीं, असे मेळ दिसून येतात. पाहावें तो राज्यघटना-प्रकाराचें स्वरूप शुद्ध व शास्त्रीय, परंतु लोक नादान, कमकुवत किंवा अपेशी. एवंच घटनाप्रकार आणि सुखदुःखांचा अनुभव यांच्या ठराविक प्रमाणाचें कोष्टक बिनचूक बनविण्यासारखा

लोकराज्याचा अनुभव जगाला अद्यापि आलेला नाहीं, असेंच बहुधा इतिहास सांगतो. परिचित अशा शब्दांनीं बोलावयाचें तर 'स्वराज्य' व 'सुराज्य यांचा मेळ यथाप्रमाण बसतोच असें नाहीं. आणि खरोखर यांत आश्चर्य तरी कसलें! मनुष्यव्यक्ति घेतली, आणि ती आपल्या सुखदुःखांपुरती सामान्यपणें स्वतंत्र आहे असें मानलें, तरी ती व्यक्ति आपल्या हातीं आहे तितक्यापुरतेंहि स्वतःला सुखच निर्माण करील असें घडतें काय? चुकून किंवा मूर्ख-पणानें, आततायिपणानें किंवा हट्टानें, स्वतःला दुःख निर्माण करणार नाहीं असें हटकून घडतें काय?

जी गोष्ट व्यक्तीची तीच समाजाची. किंबहुना व्यक्ति सोडून लोकसमाज घेतला तर त्याचें भोक्तृत्व, कर्तृत्व व भवितव्य हीं चलित करणारीं कारणें अनेक पटीनें अधिक असत नाहींत काय? शिवाय प्रयत्न करूनहि भोग टळत नाहीं याचें कारण "दैवमेवात्र पञ्चमम्" असें नमूद केल्यास आपण केवळ दैववादीच ठरणार नाहीं. इतर कोणत्याहि गोष्टींप्रमाणें लोकराज्यालाहि अवस्था-त्रयी सुटलेली नाहीं. जन्मानंतर जीवन व जीवनानंतर मृत्यु असा क्रम त्यालाहि लागलेला आहे. जन्म यदृच्छेनें किंवा फार तर कांहीं एका नियमानुसार. जीवन सुखदुःखमिश्रित. मग त्यांतील एकाचें प्रमाण दुसऱ्याहून कमी किंवा अधिक असो. आणि जीवन कितीहि चांगलें व आरोग्यसंपन्न असलें तरी मृत्यु हाहि जन्माप्रमाणेंच, अभावित यदृच्छेनें किंवा कांहीं एका नियमाला अनुसरून. असेंच लोकराज्याचें चरित्र घडलेलें आहे. म्हणून हें चरित्र सांगावयाचें तर या तीनहि अवस्थांचें वर्णन इतिहासाला धरून करतां येण्यासारखें आहे.

'लोकराज्य' या शब्दांत बऱ्याचशा मोठ्या समुदायाचें राज्य असा अर्थ उघड होतो. एखादें कुटुंब अगदीं जुन्या काळच्या समाईक पद्धतीनें राह-णारें, म्हणून कुटुंबाच्या दृष्टीनें फार मोठें असलें, तरी त्या कुटुंबाच्या राज्याला खऱ्या लोकराज्याचा अगदीं लहानांत लहान असा नमुना असें फारशा यथार्थ-तेनें म्हणतां येणार नाहीं. आधीं जुन्या पद्धतीच्या कुटुंबांत त्यांतला कोणी वयो-वृद्ध पुढारी 'दादा', 'बाबा' हा जवळ जवळ राज्यसत्ता गाजविणारा असतो. कुटुंबांतील इतर लोकांना मतस्वातंत्र्य नसतें. या दादाबाबांवर इतर कुटुंबियांचें प्रेमाचें ममतेचें दडपण किंवा बंधन हें कांहीं स्वातंत्र्य होऊं शकत नाहीं. हें

कुटुंब लोकशाहीपेक्षां राजशाहीचें उदाहरणच ठरेल. अर्थात् याहून वरच्या प्रतिच्या सामाजिक घटनेला पोंचल्याशिवाय लोकशाहीचा नमुना अगदीं प्राथमिक असाहि मिळणार नाहीं.

यालगतचा वरचा नमुना म्हणजे रक्तसंबंधानें एक, पण सर्वाधिकारी 'दादा' किंवा 'बाबा' वेगवेगळा असल्याकारणानें अनेक, अशा कुटुंबांचा समुदाय. आणि तोहि एकाच ठिकाणीं राहणारा घेतल्याशिवाय लोकराज्याचें अंधुकहि स्वरूप दिसणार नाहीं.

यानंतरची प्रत म्हटली म्हणजे, केवळ रक्तसंबंध अगदीं एक असें न दाखवितां आलें तरी, कुलाचार व धार्मिक आचार व देवता हीं एकच असणारीं अनेक स्वतंत्र कुटुंबें एकाच गांवांत राहाणारीं. हीं विचारांत घेतलीं तर लोकराज्याच्या कल्पनेची अंधुकता किंचित् कमी होईल, व लोकराज्याचें आद्य-स्वरूप तेथें किंचित् स्पष्टपणें दिसूं लागेल. घटक वेगवेगळे, पण मुख्यतः धार्मिक हितसंबंधापुरते एकाच घटनेंत बसणारे असे लोक घेतले असतां, त्यांना परस्परांच्या अनुमतीनें सहकार्य करून, आपणाहून वेगळे किंवा परस्थ असतील त्यांच्याशीं भेदभाव किंवा विरोध हा व्यवहार्य करतां येतो. आणि अशा अन्वयव्यतिरेकानें ज्या समाजाचें अस्तित्व वेगळें निर्दिष्ट करतां येतें, अशांतच लोकराज्याचें आद्य स्वरूप पहावयास सांपडतें. या घटनेला 'ग्रामसंस्था' असें नांव आहे. परंतु सर्वगुणसंपन्न अशी खरी लोकशाही पहावयाची तर ती खेड्याहून मोठ्या अशा नागरिक घटनेंतच पहावयास मिळते.

खेडेगांव, शहर किंवा नगर यांच्या व्याख्या ठरविणें कठीण आहे. परंतु अश व्याख्या न ठरवितांहि, खेडें कोणाला म्हणावें, शहर कोणाला म्हणावें व नगर कोणाला म्हणावें हें तारतम्यानें कळतें. खेड्यापेक्षां जुन्या पद्धतीचें शहर किंवा नगर याला सामाजिक किंवा राजकीय व्यवहाराचीं अंगें अधिक उमटलेलीं असतात. शहर किंवा नगर हें खेड्यापेक्षां अधिक स्वयंपूर्ण असतें. म्हणून खेड्यापेक्षां शहरांतून लोकशाहीचें स्वरूप अधिक स्पष्ट दिसते. पण याच्या उलट, जुन्या काळच्या नगरसंस्थांतून किंवा नगरराज्यांतून लोकशाहीचें जें शुद्ध स्वरूप आढळतें तें सबंध देश किंवा राष्ट्र किंवा साम्राज्य किंवा राष्ट्रसंघ यांच्या कारभारांत आढळत नाहीं. सामाजिक व राजकीय परिणतींत 'नगरसंस्था' व 'नगरराज्य' हा मधला मुक्काम मोठाच महत्त्वाचा असतो. सरसता,

शुद्धता, गुणपूर्णता, एकजिनसीपणा, हा नगरसंस्थेंत किंवा नगरराज्यांतच राहूं शकतो. याला उदाहरण द्यावयाचें तर उंसाचें देतां येईल. मुळापासून वाडापर्यंत सगळा ऊंसच; परंतु उंसाचे सर्व गुण अगदीं मुळाच्या पेरांत किंवा अगदीं शेवटच्या वाडांत नसतात. तर मधलीं जीं पांचचार पेरीं किंवा कांडीं असतात त्यांतच ते गुण असतात.

लोकशाहीच्या दृष्टीनें पूर्वेकडील नगरसंस्थांचीं नमुनेदार उदाहरणें म्हणून जितकीं देतां येतील, त्यापेक्षां पश्चिमेकडील नगरराज्यांचीं अधिक देतां येतील. किंवा पूर्व व पश्चिम हा कृत्रिम भेद सोडून दिला, व ग्रीसपासून महाराष्ट्रापर्यंतचा मुलूख जवळ जवळ समकालीन संस्कृतीचा म्हणून एक मानला, तर ग्रीस व इटली यांत लोकशाही भोगलेल्या नगरांचीं उदाहरणें आशिया खंड व हिंदुस्थान यांपेक्षां अधिक सांपडतील. इकडे कदाचित् नगरांपेक्षां खेडीं किंवा ग्रामसंस्थाच अधिक स्वतंत्र असतील. परंतु इकडील नगर किंवा शहर म्हटलें म्हणजे ती प्रायः राजधानी—म्हणजे एकतंत्री राजानें, पूर्णाधिकाऱ्यानें, आपलें राज्य चालविण्याची जागा—असा ध्वनि निघतो. उलट एके काळींचीं 'अथेन्स' किंवा 'रोम' हीं शहरें घेतलीं असतां, त्यांजमध्यें स्वतंत्र राज्यें व लोकशाही नांदल्याचें इतिहास स्पष्ट सांगतो. ग्रीसमधील अशा 'सिटी स्टेट्स्' म्हटल्या जाणाऱ्या शहरांचीं उदाहरणें इतर आणखीहि देतां येतील. तथापि तेथेंहि नगरापेक्षां खेड्यांतच लोकशाहीचा प्रकार प्रथम अनुभवास आला. ग्रीसपेक्षांहि हिंदुस्थानांतच अशा प्रकारच्या संस्कृतीचा जन्म आधींचा असें इतिहासावरून दिसतें. आणि इटलीपेक्षां तर पुष्कळच आधींचा हें तर अगदीं उघड आहे. म्हणून प्रथम हिंदुस्थानांतील 'ग्रामसंस्थां'तून चमकणाऱ्या लोकशाहीची माहिती देऊं.

## हिंदुस्थानांतील जुनीं लोकराज्यें

हिंदुस्थानांत दोन प्रकारच्या ग्रामसंस्था अगदीं प्राचीन काळापासून होत्या. कांहीं आर्यांच्या व कांहीं अनार्यांच्या. 'अनार्य' म्हणजे द्राविडादि लोक. हे हिंदुस्थानच्या द. भागांतील फार प्राचीन लोक. त्यांची संस्कृति इकडे आर्य लोक येण्यापूर्वींची. त्या संस्कृतींत ग्रामसंस्था व लोकराज्यें यांचे कांहीं प्रकार आढळतात. हे द्रवीड लोक फार प्राचीन काळापासून परदेशांशीं समुद्रमार्गें व्यापार करीत असत. त्यांचा व्यापार आफ्रिका, भूमध्य समुद्र व ग्रीस येथपर्यंत चाले. एके ठिकाणीं असें आश्चर्यकारक विधान आढळतें कीं, "ईजिप्तच्या रंगभूमीवर

तामील भाषेंतील नाटकें केलीं जात व तीं प्रेक्षकांना समजत." सांगण्याचें तात्पर्य इतकेंच कीं, उत्तरेकडून आर्यांनीं आपणाबरोबर उच्च वैदिक संस्कृति हिंदुस्थानांत आणली असली, व पुढें कालांतरानें द्राविड लोकांनीं ती स्वीकारली असली, तरी त्यापूर्वी एकाच वेळीं उत्तरेकडील आर्यांच्या 'ग्रामसंस्था' व दक्षिणेकडील 'द्राविड ग्रामसंस्था' या स्वतंत्रपणें नांदत होत्या. द्राविड लोकांनीं नगरें शहरें हीं मोठमोठीं वसवलेलीं होतीं. द्राविडांचा आर्यांशीं परिचय होऊन त्यांची संस्कृति कांहींशी समान झाल्यावर, आर्य ग्रामसंस्था व अनार्य ग्रामसंस्था यांच्यांतील कांहीं लक्षणें सारखीं दिसूं लागलीं असतील. परंतु त्यापूर्वी त्यांचा इतिहास अगदीं स्वतंत्र असा होता. व्हेल, बेडन-पॉवेल वगैरे इंग्रज ग्रंथकारांनीं अनार्य ग्रामसंस्थांची कांहीं माहिती दिली आहे; परंतु उत्तरेकडील आर्यन ग्रामसंस्थांच्या माहितीइतकी ती विपुल किंवा साधार नाहीं. महाराष्ट्रांतील ग्रामसंस्था, उत्तरेकडील ग्रामसंस्थांनंतरच्या होत. महाराष्ट्राचा इतिहास ख्रिस्त पूर्व सातव्या शतकाच्या आधींचा मिळत नाहीं. पण उत्तरेकडील आर्यांचा इतिहास दोन अडीच हजार वर्षापूर्वीचाहि मिळतो. महाराष्ट्रांत संस्कृतीचा प्रवेश उत्तरेकडून आर्यांनीं केला. यामुळें महाराष्ट्रांतील ग्रामसंस्थांचें रूप द्राविड ग्रामसंस्थांपेक्षां आर्यन वैदिक ग्रामसंस्थांशीं अधिक जुळतें आहे.

समाजस्वातंत्र्याचा अतिशयोक्त प्रकार बेबंदशाहीचा होय. त्याला 'मात्स्यन्याय' समाजस्थिति असें म्हणतां येईल. इंग्रजींत त्याला 'ॲनार्की' असें नांव आहे. अशा समाजांत मोठा मासा आपल्या बळानें लहान माशाला खाऊन जगतो अशी लोकस्थिति असते. परंतु 'ॲनार्की' (अराजक) याचा दुसराहि एक अर्थ असा होतो कीं, राजा नसलेली शासनपद्धति (विराजक). अराजक राज्यपद्धति एकंदरीनें फार थोड्या मुलुखांत व फार थोडा काळ टिकली असें वाटतें. परंतु लोकस्वातंत्र्याची कल्पना हिंदुस्थानांत ध्येय-रूपानें किती उच्च कोटीला गेली होती हें या प्रकाराच्या उल्लेखावरून दिसतें. या पद्धतीला 'अराजक' यापेक्षां 'अरायक' किंवा 'अराय' हा शब्द अधिक योग्य होईल. या राज्यप्रकारांत राजाची जागा धर्मानें घेतलेली असते. हा धर्म अमूर्त पण त्याचें अधिष्ठान मूर्त अशा मनुष्यसमाजाच्या मनांत व विवेकबुद्धींत असतें. अशा राज्यांचें वर्णन भारतांत तर आहेच, पण तें पौराणिक म्हणून कदाचित् काल्पनिक याकरितां सोडून दिलें तरी जैन वाङ्मयांत त्याचें

वर्णन आहे, व तो ऐतिहासिक कालासंबंधाचा एक आधार होय. एकंदर लोकसमाज हा तत्त्वतः राज्याधिकारी असला तरी त्या राज्याधिकाराचें अधिष्ठान प्रातिनिधिक संघ व गण हेच असत. हे संघ व गण निरनिराळ्या तत्त्वांवर रचले गेलेले असत. रक्तसंबंध, सामुदायिक उद्दीम व व्यवहार, यांच्या कारणानें संघ व गण बनत. बावीसशें तेवीसशें वर्षांपूर्वीं या देशांत लोक–राज्यें होतीं व दिग्विजय करूं पाहणारा ॲलेक्झांडर याला उत्तर हिंदुस्थानांत जो विरोध झाला तो मोठमोठ्या राजेरजवाड्यांकडून नसून लहान-सहान लोकराज्यांकडूनच झाला. हीं लोकराज्यें लहानशीं राष्ट्रेंच होतीं. ग्रीक इतिहासकारांनीं आपल्या विकृत शब्दांनीं क्षत्रिय, कठ, अरिष्ठ, सौभूति, क्षुद्रक, मालव, शिबी, ब्राह्मण, पटल इत्यादि राष्ट्रांचा उल्लेख केला आहे. यापैकीं कांहीं राष्ट्रांनीं तात्पुरते संघ बनवून ॲलेक्झांडरशीं सामना केला होता. हीं लोकराज्यें त्या मुलखांत पूर्वीं राजांचीं राज्यें होतीं, तीं मोडून त्यांच्या जागीं लोकांनीं स्वतंत्रता मिळवून स्थापिलीं, असें मेगॅस्थिनीस यानें लिहून ठेविलें आहे.

रा. श्रीपाद दामोदर सातवळेकर यांनीं 'प्राचीन आर्यांचे राजकीय विचार' या विषयावरील आपल्या पुस्तकांत वैदिक वाङ्मयाचें समालोचन करून वैदिककालीन राज्यपद्धतीविषयीं खालील सिद्धान्त काढले आहेत.

प्रथम समाज राजविहीन होता. ज्ञानी ऋषींच्या तपानें राष्ट्र निर्माण झालें. जानपद शक्ति सभेच्या रूपानें अवतरली. सभा, समिति, निमंत्रित मंडळ इत्यादि सभांचे प्रकार होत. राजाची निवडणूक किंवा पदच्युति सभा करीत. प्रजा हाच राजाचा आश्रय.

याशिवाय ( १ ) पूर्वीं लोकसभा असत. ( २ ) त्यांतील सभासद व तिचे अध्यक्ष लोकांना पूज्य असत. ( ३ ) राजा त्यांना पितृस्थानीं मानीत असे. ( ४ ) राष्ट्रव्यवहाराचें खरें ज्ञान अशा सभांच्या द्वारें राजाला होत असतें, अशी त्या काळीं सार्वत्रिक समजूत होती. ( ५ ) ऐहिक उन्नति, राजकीय व सामाजिक भरभराट साध्य करून देणाऱ्या धर्मांचे प्रवर्तक असे हे सभासद असत. ( ६ ) सभेचे विशेष नियम असत व ते मोडणाराला दंड भोगावा लागत असे. ( ७ ) सर्व काळीं वैदिक काळच्या लोकांना मातृभूमीबद्दल प्रेम असे. ( ८ ) सभेमध्यें सर्वांचा प्रवेश होत असे. ( ९ ) वैदिक काळीं पंचायतपद्धति

पूर्णत्वाला पावली होती. ( १० ) मातापित्यांना आपला पुत्र सभाधीट व्हावा असें वाटत असे.( ११ ) राजाला पदच्युत होण्याची भीति असे. ( १२ ) त्याच्या स्थैर्याला राष्ट्रसभेच्या द्वारानें सर्व राष्ट्राची संमति लागत असे. ( १३ ) राज्यव्यवस्थेसाठीं दोन किंवा तीन सभा असत. ( १४ ) राजाला ह्या सभांमध्यें जावें लागत असे. ( १५ ) सभांच्या मतानेंच सर्व राष्ट्राचा कारभार चालत असे. सैन्य व खजिना यांवरहि सभांचा दाब असे. ( १६ ) प्रजातंत्री राज्यव्यवस्था राष्ट्रामधील शांति राखण्यास अधिक उपयोगी आहे असें ह्या काळीं मानीत असत. ( १७ ) अनियंत्रित राजा प्रजेला घातक आहे असें मत त्या काळीं प्रचलित होतें. ( १८ ) राजाच्या नैतिक आचरणावर सभांची नजर असे; इत्यादि गोष्टी प्राचीन आर्यांच्या राज्यपद्धतीमध्यें होत्या असें दिसून येतें.

वेदांमध्यें सभा, समिती, सदस् हे शब्द अनेक ठिकाणीं आढळतात. या संस्था व राजे लोक यांचा निरनिराळ्या प्रकारचा संबंध वेदांमध्यें वर्णिलेला आहे. या संस्थांना राजमान्यता व लोकमान्यता हीं दोनहि सारखींच लाभलेलीं दिसतात. दिग्विजय करून आलेल्या राजालाहि राज्यांतील सभांकडून होणारा सन्मान विशेष वाटे, आणि ईश्वरापाशीं सुपुत्राची मागणी करतांना, " सभांचें काम नीट करणारा, त्यांकडून मानसन्मान मिळविणारा " पुत्र ईश्वरानें देणें ही त्याची विशेष कृपा समजली जात असे. दुर्गुणी राजाला सभा मान देत नाहींत, सभा राजाच्या अमलापासून दूर किंवा मुक्त असतात, राजा प्रजेला अनुसरेल तरच सभा राजाला अनुसरते, इत्यादि उल्लेखहि वेदांमध्यें आढळतात.

लोकसत्ताक राज्याच्या लगत्याचा प्रकार म्हटला म्हणजे लोकनियुक्त राजा ज्या राज्यांत आहे अशा राज्यपद्धतीचा. राष्ट्रांत राजा म्हणून कोणी असावा, पण त्याच्या निवडणुकीपासून त्याला पदच्युत करण्यापर्यंतचा अधिकार प्रजेकडे असावा, असे उल्लेख विपुल आढळतात. राजाचें लोकनियुक्त स्वरूप जाऊन त्याला बेजबाबदार राजाचें व वंशपरंपरागत राजाचें स्वरूप पूर्वकालीं नव्हतें तें पुढें आलें. प्रथम राजा निवडलेला असे. राज्यांतील इतर नोकरांप्रमाणें त्याला ठराविक पगार दिला जात असे. मात्र तो इतर कोणाहिपेक्षां अधिक असे. नेमणुकीच्या वेळीं राष्ट्र हें राजाच्या स्वाधीन एखाद्या विश्वस्त निधिनिक्षेपाप्रमाणें केलें जात असे. त्याची अभिवृद्धि करण्याची जबाबदारी त्याच्यावर सोंपविण्यांत येत असे. राजाचें स्वामित्व हें लाक्षणिक असून वाच्यार्थानें नसे. राजाच्या

पश्चात् त्याच्या मुलांमुलींना राज्याचा वारसा हक्कानें जात नसे. पण राजघराण्यांतील कोणी सत्पात्र मनुष्य असेल तर त्याला लोकसंमतीनें राजपद मिळे किंवा न मिळे. अशाविषयीं इतिहास-पुराणांतून भरपूर दाखले मिळतात, व तोच लोकसत्ताक राज्यसंस्थेचा अप्रत्यक्ष पुरावा होय. युरोपांतील राजांप्रमाणें हिंदुस्थानांतील राजांनीं स्वतःच्या तोंडानें आपला अधिकार आपणास ईश्वराकडून मिळाल्याचें कधीं सांगितलें नाहीं. "नाविष्णुः पृथ्वीपतिः' हें वचन लोकांनीं आदरबुद्धीनें केलेल्या राजाच्या वर्णनाचें आहे. मात्र या सर्व गोष्टी प्राचीन इतिहासांतील होत. आधुनिक इतिहासांत राजे सर्वस्वीं स्वतंत्र, स्वतःच्या बळानें राज्य मिळविणारे, राज्यावर अधिकार सांगणारे व चालविणारे, प्रजेवर अनियंत्रित राज्य करणारे व राज्य म्हणजे खासगी कुटुंबांतील मिळकत म्हणून ती आपल्यानंतर आपल्या वारसांकडे जावी अशी व्यवस्था करणारे, असेच झाले व आजहि आहेत. चाणक्याच्या वेळीं राजसंस्था असली तरी लोकराज्याची संस्थाहि त्याबरोबरच उत्तर हिंदुस्थानांत नांदत होती. आणि लोकसंघ हाच राजसत्तेपेक्षां अधिक दुर्जय व चिरस्थायी असतो असा अभिप्राय त्यानें लिहून ठेविला आहे. जेथें लोकराज्यें नव्हतीं व राजा राज्य करी त्या राष्ट्रांतहि राजाची सत्ता ही तत्त्वतः अनियंत्रित असली तरी प्रत्यक्षांत ती अनेक बाजूंनीं मर्यादित असे.

वैदिक कालच्या ग्रामसंस्था हीं स्वतंत्र लोकशाहीचीं राज्यें होतीं. आधुनिक ग्रामसंस्था या तितक्या स्वतंत्र नाहींत. ग्राम व राज्य हीं वैदिक कालीं समव्याप्त असत. त्याकाळीं राजांचीं राज्येंहि आढळतात; पण ग्रामांचे 'ग्रामणी' हे राजाचे अंकित नसणारे असेहि आढळतात. हा 'ग्रामणी' ग्रामसभांचा पुढारी असला तरी त्या सभांचा अंकितहि असे. ग्रामसभेनें वाटल्यास कांहीं अधिकार ग्रामणीकडे तोडून द्यावे; परंतु अधिकाराचें मूळ अधिष्ठान ग्रामणी नसून लोकसभा हेंच असे.

'ग्रामणी' हा ग्रामसंस्थेच्या धर्मकृत्यांत मुख्य पुरोहित व युद्धकालीन लढाऊ शिपायांचा सेनापति असे. प्रत्येक गांवची एक एक सभा असून, तिजमध्यें गांवांतील बहुतेक वजनदार लोकांचा समावेश होत असे. सभेंतील प्रौढ सभासद हे कज्जे व दावे यांचा निकाल करीत. 'सभाचर' व 'सभासद' असे दोन प्रकारचे गण सभेंत असत. प्रत्येकांचीं कामें वेगवेगळीं असत. सभागृह हें गांवच्या इतर कामांनाहि उपयोगीं पडे. उदाहरणार्थ—चुरशीचे वाद,

सामने, करमणुकी इत्यादि. जेव्हां ग्रामसंस्थेंत बखेडे उत्पन्न होत, तेव्हांच सभेचें सामुदायिक महत्त्व कमी होऊन, 'ग्रामणी' हा अधिक प्रबळ किंवा जुलमी होई. अथवा राजासारखा कोणीतरी परस्थ, या ग्रामावर आक्रमण करून, त्याला आपला अंकित करी. फिरून, सर्व गांवचे लोक सारख्याच स्वभावाचे नसत. त्यामुळें शाक्य, लिच्छवी, वज्जी वगैरे जातींच्या वीरवृत्तीच्या पहाडी लोकांच्या ग्रामसंस्था किंवा समुद्रगुप्ताच्या वेळच्या कांहीं ग्रामसंस्था अगदीं स्वतंत्र बाण्याच्या असत, तर इतर कांहीं तशा नसत. नरमगरम भेदानें ग्रामसंस्थांचें स्वातंत्र्य म्हणजे त्यांतील लोकशाहीचें सत्त्व कोठें कमी कोठें अधिक असणें स्वाभाविक आहे.

बुद्धाच्या काळीं ग्रामसंस्था होत्या; पण त्याच काळीं राजेलोक विशेष प्रबळ-असलेले आढळतात. या काळच्या सुमारास राज्यांचे विस्तारहि वाढूं लागले होते. ग्रामसंस्थांना वरिष्ठ अधिकारी निर्माण झाले होते. कारण ग्राम हा राज्याचा एक-विभाग झाला होता. स्वतंत्र ग्राम-राज्य असें बहुधा उरलें नव्हतें. ग्राम-णीला अधिकार असत त्याप्रमाणें त्याजवर जबाबदारीहि असे. गांवांतील प्रौढ व शिष्ट यांना मधून मधून सल्ला मसलतीकरितां ग्रामणी हा पाचारण करी. परंतु त्याविषयीं कांहीं ठराविक नियम नसत. अनौपचारिक रितीनेंच सगळ्या गोष्टी होत. सार्वजनिक उपयोगाचीं कामें, लोक आपखुषीनें एकत्र येऊन, कशीं करा-वयाचीं हें ठरवीत. अशा कामाकरितां लागणाऱ्या खर्चाची वर्गणी ते एकमेकांच्या संमतीनें हिस्से ठरवून गोळा करीत. इतर करपट्ट्याहि ते आपल्या आपण बस-वीत. बलुतेदारीची पद्धति असल्यामुळें, आणि शेतीचें उत्पन्न हीच गांवच्या जमेची मुख्य बाब असल्यामुळें, बलुतेदारांना त्यांच्या चाकरीबद्दल मोबदला मिळावयाचा तो शेतीच्या उत्पन्नांतील कांहीं हिशाच्या स्वरूपांत ऐनजिनसी देण्यांत येई.

ग्रामणीचें पद हें बहुधा वंशपरंपरागत असे. राजे लोक शिरजोर झाले म्हणजे ग्रामणी किंवा गांवचे पाटील नेमण्याचा अधिकार आपल्या हातीं ठेवीत. परंतु तेहि होतां होईतों ग्रामणीच्या किंवा पाटलाच्या वंशांतलाच कोणी तरी नेमून परंपरेचा मान राखीत. घराण्यांतील मुख्य हक्कदारावर इतराजी झालीच तर दुसरा कोणी त्याच वंशांतील नेमिला जाई. गांवचा वसूल करणें, गांवचें रक्षण व बंदोबस्त करणें, ही जबाबदारी पाटलाची असे. त्याकरितां त्याला

वतन असे. वतन म्हणजे मुख्यतः उत्पन्नाची जमीन. गुन्हेगारीबद्दल वसूल केलेला दंड पाटलाला मिळण्याचीहि रीत कोठें कोठें आढळते. पण या रितींत पुढें सरसकट बदल झाला. म्हणजे दंडाची रक्कम पाटलानें न घेतां गांवखातीं सरकारांत जमा करावी असा नियम होऊं लागला. पाटलाची वतनदारी ही पाटलाइतकीच प्राचीन आहे. आणि आज जरी मध्यवर्ती सरकार अतिशय प्रबल झालें असलें, व ग्रामसंस्था बहुधा नष्ट झाली असली, तरी मानाचें पहिलें पान बहुधा पाटलालाच मिळतें.

ग्रामसंस्था नामशेष झाली तरी पाटील हा नामशेष झाला नाहीं. तालुक्याच्या अधिकाऱ्याचा तो आज गुलाम बनलेला असो. तथापि, जुन्या ग्रामसंस्थेची जर कोणी आजहि आठवण करून देत असेल, तर तो पाटीलच होय. लोकशाहींतील 'डिक्टेटरचें' तें अगदीं सौम्यांतलें सौम्य कां होईना पण प्रतीक आहे. किंबहुना पाटील ( ग्रामणी ) ही ग्रामसंस्थे-प्रमाणेंच एक संस्था पुरातन कालापासून चालत आलेली असून हेंच सिद्ध करणारी आहे कीं, शुद्ध लोकशाहीच्या काळांत देखील व्यक्तिमाहात्म्य सर्वस्वीं नष्ट होत नसतें. आणि जें काय करणें तें 'लोक' कारितात किंवा करीत असें म्हटलें तरी, त्या लोकांतूनच सर्वांचे पुढें डोकें काढणारा, परंपरेच्या बळावर सर्वांहून विशेष मान भोगणारा, असा कोणी तरी एक असतोच. लोकशाहींत देखील परं-परेला बळी पडून किंवा भलेपणाच्या नांवाखातर पुष्कळ वेळां लोकांना आपले अधि-कार आपण गाजविण्यापेक्षां, दुसऱ्या कोणीहि ते गाजवावे पण फक्त आपलें नांव द्यावें हें आवडतें. एवढ्यावर सामान्य लोक तरी संतुष्ट असतात. पाटील म्हटला तर गांवचा नोकर. म्हटला तर गांवचा राजा. पण हें द्विविध लक्षण फक्त पाट-लालाच लागू पडतें. त्याच्याहून खालच्या दर्जाचे गांवनोकर हे खरोखरच नोकर लोकशाहीच्या दृष्टीनें त्यांचा विचार करण्याचें कारण नाहीं. पाटील आज उरला तरी आहे, पण ग्रामसभा किंवा 'ग्रामसमिती' या संस्थेचा अवशेषहि आज उरलेला नाहीं.

वैदिक कालीं 'ग्रामसभा' या पंचायतप्रमाणें न्यायदानाचें काम करीत, पण 'ग्रामसमित्या' ह्या न्यायदानापेक्षांहि वरिष्ठ प्रतीचीं राज्यकारभाराचीं कामें सर्वाधिकारी म्हणून करीत. अर्थशास्त्राचा कर्ता चाणक्य याच्या वेळीं प्रबळ अशा मौर्य राजांचें राज्य होतें. यामुळें त्या ग्रंथांत प्रत्यक्ष राजाच्या दृष्टीनें राजकार-

णाची माहिती दिली आहे. पण गांवसभा किंवा गांवसमित्या या काय करीत किंवा त्यांनीं काय करावें याचा तपशीलवार उल्लेख नाहीं. त्याचें कारण पुढें एकतंत्री राज्यपद्धतीचा जोर होऊन लोकशाहीचा जोर कमी झाला होता. गांव आपलें मामुली काम एखाद्या ' स्थानिक स्वराज्य ' संस्थेप्रमाणें करी. पण तें करतांनाहि वरून कोणी त्या कामांत हात घालणारच नाहीं अशी खात्री नसे. प्रो. आळतेकर यांच्या मतें अर्थशास्त्र या ग्रंथांत ' ग्रामसभा ' किंवा ' ग्रामपूग ' यांचा कोठेंहि उल्लेख नसून 'ग्रामवृद्धां'चा मात्र उल्लेख आहे. पण अडीअडचणीच्या वेळीं, किंवा औपचारिक मानदानाच्या प्रसंगीं, गांवाला किंवा सरकारला गांवांतील वृद्धांची आठवण झाली तर ती गोष्ट केवळ औपचारिक अशी मानिली पाहिजे. त्यांत अधिकाराचा संबंध येत नाहीं. वैदिक कालीं उ. हिंदुस्थानांतील कांहीं भागांत, किंवा अगदीं खालीं द. हिंदुस्थानांतहि, ग्रामवृद्ध ग्रामसभा यांना जें नियमबद्ध कायदेशीर स्वरूप होतें, तें महाराष्ट्रांतील ग्रामसंस्थांतून नव्हतें. पण या सर्वच भागांतून हल्लीं ग्रामसभांचें औपचारिक स्वरूपहि राहिलेलें नाहीं. शिवाजीनें अष्टप्रधान नामक राज्यसंस्थेचें पुनरुज्जीवन केलें. परंतु त्याच्या काळीं गांवपंचायतीला न्यायदानाचे कांहीं अधिकार असले तरी, तो खऱ्या लोकशाहीचा नमुना नव्हता. कारण राजा ज्यांत अधिकारानें हात घालणार नाहीं, असें कोणचेंच काम गांव करीत नसे. गांवपंचायत लहान सहान खटल्यांचा निवाडा करी किंवा गुन्ह्यांचा इनसाफ करी; पण विशेष गंभीर स्वरूपाच्या गुन्ह्यांचा इनसाफ गांवपंचायतीकडे नसे. किंवा गांवपंचायतीवर विश्वास नसलेल्या एखाद्या पक्षकाराचा वशिला वर पोंचला तर तो खटला त्या माणसाच्या गांवच्या पंचायतीकडून काढून घेऊन, दुसऱ्या एखाद्या पंचायतीकडे देण्याचा अधिकार राजाला असे. त्याहून महत्त्वाची गोष्ट ही कीं, पंचायत एखाद्या खटल्यांत निकाल देवो पण तो अमलांत आणण्याचें बळ हें स्वत: त्या गांवपंचायतीचें बळ नसून तें राजाचें बळ असे. सर हेन्री मेन यांच्या मतें पंचायतीच्या निकालाची अंमलबजावणी ग्रामसंस्थेच्या स्वयंभू शक्तीनें व वजनदारीनें होई, आणि हें कांहीं अंशीं खरें आहे. कारण गांवाला नाराज करून गांवांत कोण जगणार ! परंतु तसाच प्रसंग आला तर ग्रामसंस्थेला सरकारी पोलीस किंवा लष्कर यांची मदत घ्यावी लागे. आणि ती मदत एखाद्या वेळीं मागण्यानेंहि न्यायदानाचा व अंमलबजावणीचा अधिकार अंतिम स्वरूपांत ग्रामसंस्थेचा नसून

विद्यमान राजसत्तेचा आहे, हीच गोष्ट ध्वनित होते. देशांत विराजक होते. म्हणून गुन्हेगार ग्रामसंस्थेला जुमानीत हें खरें नसून, ग्रामसंस्थेच्या पाठीशीं विद्यमान राजसत्ता होती, हें माहीत असल्यामुळेंच ते ग्रामसंस्था जुमानीत, असें प्रो.आळतेकर यांचें म्हणणें आहे. निदान महाराष्ट्रापुरतें तरी तें खरें दिसतें. पंचायतीच्या निकालावर रीतसर अपील होऊं शके यावरूनहि तीच गोष्ट सिद्ध होते. गांवांतील फंदफितुरी किंवा दरोड्यासारखीं संकटें यांचा परिहार प्रायः गांवाकडूनच होई. परंतु गांवची जबाबदारी एवढ्यानेंच संपत नसे. वरील बाबीपलीकडे जाऊन देशावर परचक्र येणें, शत्रूची स्वारी होणें, या गोष्टींत गांवाचा संबंध सहजच येई. म्हणजे त्याचें निवारण करण्याकरितां राजानें गांवानिहाय मदत मागितली असतां गांवांना ती पुरवावी लागे. गांवानें ती न पुरविली तर गांवची ती गुन्हेगारी ठरे. न्यायदानाला पुष्कळसें वैयक्तिक किंवा स्थानिक महत्त्व असतें, म्हणून त्यापुरता गांवचा कारभार महत्त्वाचा असा ठरतो. परंतु गांव हा खरोखर किती स्वतंत्र आहे, म्हणजे तो खरोखरी सर्वांगीण अशा लोकशाहीचा उपभोग कितपत घेतो, याचा निर्णय तेवढ्यावरून होत नाहीं. कर बसविणें व वसूल करणें यांच्या कारभारावरूनहि तेंच ठरतें. कारण गांवांत कर कोणते बसवावे याचा सर्व अधिकार गांवाला नसे. आणि गांवांत करपट्टीनें वसूल झालेला पैसा सर्वच्या सर्व गांवांत खर्च व्हावा ही गोष्ट मुळींच संभवत नव्हती. तसेंच गांवची जमीन ही ( गायरानें वगैरे कांहीं भाग सोडले असतां ) सामुदायिक मालकीची नसे. वास्तविक लोकशाही म्हटली म्हणजे तींत मालकीहि सामुदायिकच असावी, वैयक्तिक असूं नये, असें म्हणण्याचें कारण नाहीं. एखाद्या राज्यांतील लोक सर्वस्वीं स्वतंत्र असूनहि त्यांतील मिळकतीची मालकी व्यक्तिगत असावी असें त्या लोकशाही राज्याचें सरकार ठरवूं शकेल. उत्तरेकडील स्वतंत्र ग्रामसंस्थांतूनहि गांवच्या जमिनीची मालकी वैयक्तिक दिसून येते. सोयीकरितां सहकारी तत्त्वाप्रमाणें एकवटपणें व्यवस्था करणें किंवा उपभोग घेणें ही गोष्ट वेगळी. पण कायदेशीर हक्कानें तत्त्वतः ग्रामसंस्थांच्या चांगल्या चांगल्या नमुन्यांतहि व्यक्तिगत वेगवेगळी मालकी आढळते. रयतवारीपद्धति ही तर व्यक्तिशः वैयक्तिक मालकीहक्कावरच अधिष्ठित आहे. प्रो. आळतेकर यांच्या मतें बौद्ध जातक ग्रंथांत वर्णन केलेल्या ग्रामसंस्थांत रयतवारी पद्धतिच आढळते. महाराष्ट्रांत भागदारी पद्धति कधींच नव्हती. गुजराथेंत व काठेवाडांत होती. पण तिचीं

कारणें विशेष प्रकारचीं दिसतात. तात्पर्य, वरिष्ठ राजकारणाचा ज्यांत फारसा संबंध नाहीं, मध्यवर्ति सरकारच्या हिताला फारशी इजा होत नाहीं, असे पुष्कळसे अधिकार ग्रामसंस्थांना पूर्वी होते. तथापि हे सर्व अधिकार एकत्र केले तरी त्यामुळें ग्रामसंस्थांचें शुद्ध राजकीय स्वातंत्र्य प्रस्थापित होत नाहीं.

आपल्यापुरत्या कारभाराच्या दृष्टीनें ग्रामसंस्था ही स्वतंत्र शासनसंस्था होती. सार्वजनिक मालमत्तेची व्यवस्था ही संस्थाच करी. गांवांतील लोकांकडून दंड वसूल करणें व त्या दंडाचा सार्वजनिक उपयोग करणें, या गोष्टी संस्थाच करी. गांवांतील धर्माचारालाहि सार्वजनिक स्वरूप असे. ग्रामसंस्थेंतील राजाचा अधिकार ग्रामसंस्थेच्या सर्व घटकांत मिळून वांटून गेलेला असे. प्रजेचें सुख तेंच आपलें सुख व प्रजेचें हित तेंच आपलें हित असें राजानें मानावें असा आर्य राजनीतीचा दंडक आहे; व ग्रामसंस्थेंत राजेपण गांवच्या सगळ्या समाजाकडे असल्यामुळें वरील दंडक राज्यापेक्षां ग्रामसंस्थेंतच अधिक अनुभवास येत असला पाहिजे. राजा व प्रजा यांच्यामध्यें करार होऊन राज्यसंस्थेची उत्पत्ति झालेली असो किंवा नसो, ग्रामसंस्थेमध्यें कराराशिवायच अधिकार चालविणें व अधिकार चालवून घेणें या गोष्टी अगदीं नैसर्गिक संबंधामुळें आपोआप घडत असत.

## ( २ ) प्राचीन ग्रीक व रोमन लोकराज्यें

हिंदुस्थानांत वैदिक काळीं लहान लहान स्वतंत्र लोकराज्यें होतीं, तशींच प्राचीन काळीं ग्रीक व इटली या देशांतहि होतीं. इटलीपेक्षां ग्रीसची संस्कृति जुनी व ग्रीसपेक्षां वैदिक हिंदुस्थानची संस्कृति जुनी.

### गढींतलें राज्य

प्राचीन ग्रीक लोक-राज्याला ‘ गढी ’ अशा अर्थाचा शब्द होता. त्या अर्थाचा लॅटिन शब्द अर्ब्स किंवा सिव्हिटास हा होय. गढी म्हणजे तटबंदी केलेली टेंकडी किंवा उंचवटा. त्याखालीं आसपास वस्ती असे. जशी आपल्याकडे किल्ल्याखालीं माचीला असते तशी. पण किल्ले, गड, गढ्या यांचा मुख्य उपयोग हाच असतो कीं, कोणीं शत्रु चालून आला असतां खालच्या लोकांना

चटकन पळून वर जाऊन तटबंदीच्या आंत आपलें रक्षण करितां येतें. गढ्या सोडून मैदानावर दस्ती वाढूं लागली त्याबरोबर वरील ग्रीक शब्दाचा अर्थहि विस्तार पावला; व शेवटीं तर अशा गढीच्या ऐवजीं "मनुष्याचें सर्वांगीण सुसंस्कृत जीवन" किंवा तें ज्या क्षेत्रांत चालतें तो प्रदेश असा तो अर्थ झाला. गढीचें वरील-प्रमाणें 'सर्वांगीण जीवन' अशा अर्थांत रूपांतर होण्याला सामाजिक व राजकीय संघटना तशीच परिणत व्हावी लागते. तशी ती झाल्यावरच नगरें व शहरें अस्तित्वांत आलीं. 'राज्य' हा शब्द एकच, 'लोकशाही' हा शब्द एकच, 'स्वतंत्रता' हा शब्द एकच; पण या तिन्ही शब्दांच्या अर्थाची व्याप्ति प्राचीन काळाहून आधुनिक काळीं फार भिन्न झालेली आहे. ह्या भिन्नतेंतील मुख्य मुद्दा हा कीं, जुन्या काळचें राज्य फार संकुचित क्षेत्रांत बनलेलें स्वतंत्र व स्वयंपूर्ण. आधुनिक राज्य कोणत्याहि एका शहरांत मावूं शकत नाहीं.

राजधानी या नात्यानें त्या शहराला त्या राज्यांत पहिल्या प्रतीचा सर्वांत मोठा मान मिळे; परंतु राजधानीच्या शहराबाहेर त्या राज्यांतील केवढा तरी मोठा समाज राहत असतो. म्हणजे वर सांगितलेली संस्कृति व जीवन हें राजधानी-बाहेर किती तरी असतें. तसेंच अलीकडे 'राष्ट्रा'चें नांव उच्चारलें असतां "त्याच्या मुलखांत राहणाऱ्या सर्व अनेक-जिनसी विजातीय विधर्मी अशा लोकांचा समुदाय" असें घेऊन चालावें लागतें. कारण धर्म किंवा संस्कृति यांच्या दृष्टीनें एकजिनसीपणा हा कोणत्याहि अशा मोठ्या स्थलमर्यादेंत राहूंच शकत नाहीं. जगांतील वाहतु-कीचीं साधनें वाढलीं. शरणागताला अभय देणें ही जशी एक प्रकारची नैतिक भावना, तशीच " आपल्या राज्यांत येऊन राहिलेल्या व प्रजेचें नातें स्वीकारूं इच्छिणाऱ्या कसल्याहि जातीच्या, धर्माच्या लोकांचें संरक्षण आणि संगोपन, थेट स्वकीय प्रजेच्याप्रमाणेंच करणें आपलें कर्तव्य आहे. " अशी नवी राजकीय भावना निर्माण झाली आहे.

पण प्राचीन ग्रीक व रोमन राज्यांत स्वकीय व परकीय, श्रेष्ठ व कनिष्ठ हा भेद अगदीं उघड रितीनें पाळण्यांत येत असे. जे स्वकीय नाहींत, ते प्रायः गुलाम. आणि अगदींच गुलाम नसले तरी त्यांना खास स्वकीय प्रजेचे राजकीय अधिकार नाहींत अशी स्थिति होती, ' अथेन्स ' ' स्पार्टा , ' रोम ' ' सायरा क्यूज़ ' ' मायलेटस ' हीं जुनीं नगर-राज्यें म्हणून प्रसिद्ध आहेत. या नगरांतील लोकांना उपजीविकेकरतां इतर शहरांशीं व देशांशीं व्यापारउदीम अर्थात्च

करावा लागे. परंतु खरें लोकशाहीचें स्वतंत्र राज्य हें फक्त या नगरांपुरतेंच असें. बाहेरचा प्रदेश नगरांना जोडलेला असला तरी तो गौण. त्यांतील लोकांना राज्याधिकार नसे. या संकुचित नगर-क्षेत्रांतच काय तें खरें व मुख्य राज्य समाविष्ट असल्यामुळें त्याचें जीवन, त्याचे गुणावगुण, व त्याचा इतिहास समजण्याला सोपा झाला असल्यास नवल नाहीं. राज्यांतील लोकांत जे कांहीं स्वाभाविक किंवा कृत्रिम संबंध असणें शक्य त्या सर्वांचें छोटेखानी प्रदर्शन नगर-क्षेत्रांत होई. यामुळेंच या नगरराज्यांचा इतिहास इतिहासकारांना तपशीलवार लिहितां आला आहे.

## लोकराज्याचें बीज-स्वरूप

कोठेंहि जा, वृक्षाचें मूळ स्वरूप बीजांतच सांपडावयाचें. त्याप्रमाणें कोणत्याहि ग्रीक किंवा रोमन राजकीय संघटनेचें मूळ स्वरूप रक्तसंबंधांत आढळतें. आणि बीजाला जसे पहिले पहिले अंकुर फुटून अनेकविधता येते, त्याप्रमाणें ग्रामसंस्था निर्माण होऊन केवळ रक्तसंबंधानें निगडित अशा बीजरूप समाजाला अंकुर फुटतात. ग्रीक व रोमन ग्रामसंस्थांचेंहि मूळ घटक कुटुंबें किंवा घराणीं हींच होत. उदाहरणार्थ, आपल्याकडे 'भोसलेवाडी' असें खेडेगांवचें नांव असलें तर, त्यांत सगळीं नसलीं तरी पुष्कळशीं घरें भोसले कुळांतील लोकांचींच असावयाचीं. "उंसाचा खाळ रस किंवा समुद्राचें पाणी वाळलें म्हणजे साखर व मीठ यांच्या कणांचे लहान मोठे गोळे आपोआप बनतात. आणि त्यांतच एखादा इतका मोठा बनतो कीं, त्यावरून इतर सर्व कणांच्या गुणाची परीक्षा करतां येते. त्याप्रमाणें एक मूळचें कुटुंब विस्तार पावून एका कुटुंबाचीं अनेक झालीं. पण त्यांचा जमाव एका क्षेत्रांत होऊन कायमची वस्ती करून राहिला म्हणजे तेंच खेडें होतें." आणि सर्वांचें जें कुलदैवत तें त्यांतल्याच एखाद्याच्या घरीं असलें म्हणजे त्या सर्व वसाहतींचा तो मध्यबिंदु किंवा मेरू होतो. या कुटुंबांच्या धर्माचाराचें तेंच केंद्र बनतें. आणि मग नित्य जीवनाची गरज, नैमित्तिक हर्षामर्षाचे प्रसंग किंवा शत्रूशीं झगडण्याचे प्रसंग, इतक्या निरनिराळ्या संबंधांनीं त्या वस्तींतले लोक जखडले जाऊन 'खेडें' हें प्रादेशिक नांव आणि 'राज्य' हें राजकीय नांव त्या संघाला प्राप्त होतें. वर भोसलेवाडीचें इकडील उदाहरण दिलें, तसेंच 'वेलिंग्टन' हें इंग्रजी खेड्याचें उदाहरण समजावें. कारण वेलिंग्टन हें गांवाचें विशेषनाम असलें तरी तीं

' वेलिंग्ज ' लोकांची वसाहत असा त्याला अर्थ आहे. भोसलेवाडींतिलें किंवा वेलिंगटन खेड्यांतलें राज्य स्वतंत्र असेल किंवा इतरांचें अंकित असेल हें वेगळें. पण अशा गांवांत लोकांचें स्वयंपूर्ण राज्य असणें हीच ऐतिहासिक महत्त्वाची गोष्ट. त्या लोकराज्यांत खरी सत्ता सर्व लोकांत सारखी वांटलेली असो, किंवा त्यांतलाच एखादा ग्रामणी सरसावून पुंड बनलेला असो. पहिल्या प्रतीच्या लोकराज्यांत लोकसभा हीच खरी लोकसत्ताधारी असेल, तर दुसऱ्या प्रतीच्या लोकराज्यांत ' ग्रामणी ' हा सत्ताधारी असेल.

जुन्या ग्रिक व रोमन ग्रामराज्यांत ग्रामणी व लोकसभा असून, शिवाय गांवांतील जमिनीवर सामुदायिक सत्ता व ग्रामदेवतेची सामुदायिक पूजा हीं लक्षणें आढळतात. याच गांवांचीं पुढें नगरें झालीं. ज्यांना ती परिणतावस्था प्राप्त झाली नाहीं, अशांचीं राज्यें ग्रामसंस्थेच्या बीजभूत स्वरूपाचींच राहिलीं. पण ज्या खेड्यांचीं नगरें झालीं त्यांत स्वराज्य, लोकशाही, व स्वातंत्र्य या गोष्टी उच्च संस्कृतीबरोबर कांहीं काळपर्यंत उत्कृष्ट नांदल्या. ॲरिस्टॉटलनें कुटुंब, ग्राम, व नगर असा परिणतीचा म्हणून स्पष्ट क्रम आपल्या राजनीतिवरील पुस्तकांत जमेस धरलेला आहे. इटलीमध्येंहि तसाच क्रम दिसून आला. ग्रामसंस्थेला लॅटिन शब्द पेगस असा आहे. मग तो संस्कृत पूग ( ग्राम ) याचा नातेवाईक आहे कीं काय न कळे ! पण ' पेगस ' या शब्दानें दर्शविलेला पदार्थ कुटुंबापेक्षां मोठा व नगरापेक्षां लहान असे यांत मात्र शंका नाहीं.

## ग्राम-राज्यांचीं लक्षणें

ग्रीक ग्रामसंस्थांचीं मुख्य लक्षणें अशीं होतीं–१ गांवांतील सर्व लोक बहुधा एकाच वंशाचे किंवा रक्तसंबंधाचे असत. २ गांवचें राज्य, हें ग्रामसभा व ग्रामणी मिळून चालवीत. ३ गांवची सर्व जमीन समाईक मालकीची असे. आणि ४ ग्रामदेवता ही सर्वांची एकच असून, तिची पूजाअर्चा सामुदायिक पद्धतीनें होई.

ग्रीक इतिहासकार थ्यूसिडीडीस यानें ग्रामसंस्थांचें वर्णन दिलें आहे. त्यावरून ग्रीक लोकांची वस्ती अगदीं तुटक तुटक अशी असे. ते व्यापार किंवा वरिष्ठ प्रकारची शेती करीत नसत. कोणीकडून तरी उपजीविकेचें साधन मिळण्यावर संतुष्ट असत. पण पुढें ॲरिस्टॉटलनें खेडेगांवांचें जें वर्णन दिलेलें आहे त्यांत पूर्वीचा हा वस्तीचा तुटकपणा जाऊन वस्ती जुटून राहूं लागली, आणि गांवागांवांचे संघहि होऊं लागले, व नंतर नगरें बनलीं. इंग्लंडमधील बर्मिंगहॅम,

एडमंटन वगैरे नांवांत शेवटला भाग हा ग्रामसंघाचा निदर्शक आहे. आणि तेच पुढें नगराचे विभाग झाले किंवा पेठा झाल्या. कुलसंघ, ग्रामसंघ, व नगर यांतील मुख्य फरक, त्यांतील लोक आपणांवर कोणाचें बंधन मानतात यावर अवलंबून असतो. कुलसंघांत कुलपति म्हणेल तो कायदा, ग्रामसंस्थेंत गांवसभा व ग्रामणी म्हणेल तो कायदा व बंधन. आणि नगरसंस्थेंत ग्रामसंघ किंवा पेठापेठांतून राहणारे लोक यांच्या संघानें मिळून केलेला तो कायदा.

मात्र या बंधनाची जाणीव क्रमानें शिथिल होत जाते. समुदाय जेवढा मोठा तितकें बंधन कमी सक्त किंवा ढिलें. एकदां रक्तसंबंधाचें बंधन सुटून तें प्रादेशिक झालें म्हणजे मग तें अधिकाधिक ढिलें होत जातें. शिवाय प्रदेश म्हटला म्हणजे त्याची मर्यादा निश्चित नसते. नदी, समुद्र, पर्वत यांनींच प्रदेशाची स्वाभाविक हद्द ठरली तर ती वाजवीहून अधिक संकुचित होण्याचा संभव असतो. उलट मैदानी मुलखांत प्रादेशिक सीमा हवी तितकी वाढूं शकते. आणि आतां तर नगरें जाऊन त्यांचे ठिकाणीं देश किंवा राष्ट्र हें राजकीय समुदायाचें माप झालें असल्यानें, देशाभिमानाची भावना प्रसंगविशेषीं काय बंधन घालील तेवढेंच. प्राचीन काळीं प्रादेशिक अभिमान असा नव्हता. आत्मरक्षण आणि धार्मिक भावनेचें एकीकरण यांनींच काय तीं बंधनें घातलीं जात. यामुळें एकेका राज्याची सीमा एकेका नगराच्या सीमेवर संपे.

## नगरराज्यांतील राज्यपद्धति

आतां या नगरराज्यांत राज्यपद्धति कशी होती ती पाहूं. राज्यपद्धतीचा हेतु उच्चतम सुख व संस्कृति लाभणें आणि या दृष्टीनें जिवन यशस्वी होणें हा आहे, व असावा असेंच कोणीहि म्हणणार. ग्रीक तत्त्ववेत्ते प्लेटो व ॲरिस्टॉटल या दोघांनींहि राज्यशास्त्रावर लिहिलें आहे. पैकीं प्लेटो ध्येयवादी असल्यामुळें, राजकीय समाज त्याच्या वेळीं किंवा पूर्वीं कसा होता याचा परामर्श न घेतां, तो ‘ कसा असावा ’ याचें चित्र त्यानें ‘ रिपब्लिक ’ नामक आपल्या राजकारणावरील ग्रंथांत कल्पनेनें रंगविलें आहे. हें चित्र त्याच्या नंतरच्या दोन हजार वर्षांच्या इतिहासांत कोठेंहि अनुभवाला आलेलें नाहीं. पण जगांत सर्वत्र जर अपूर्णताच पदरीं पडावयाची, तर आहे त्यांतीलच आवडनिवड व्यक्त करण्यापेक्षां

कांहीं एक ध्येय डोळ्यापुढें ठेवून, त्याचें चित्र रंगविलें तरी काय वाईट ? ॲरिस्टॉटल हा अधिक चिकित्सक. त्यानें आपले सिद्धांत प्रायः अनुभवावर रचले आहेत. आणि त्याच्या काळीं नगरराज्यांहून अधिक चांगला असा लोकराज्यांचा नमुना त्याला दिसला नाहीं, म्हणून त्याहून अधिक कांहीं चांगलें असूं शकणार नाहीं, अशा भावनेनेंच जवळ जवळ त्यानें तत्कालीन नगर-राज्यांची स्तुति केली आहे. प्लेटो व ॲरिस्टॉटल या दोघांनाहि उच्च प्रतीचें यशस्वी सामाजिक जीवन हा राज्यसंस्थेचा हेतु असें वाटत होतें. परंतु वर दर्शविल्याप्रमाणें दोघांच्या लिहिण्यांत, त्यांच्या स्वभावामुळें फरक पडला. किंबहुना ॲरिस्टॉटलला असेंच वाटे कीं, राज्याची मर्यादा नगरापलीकडे गेली म्हणजे सुख व यश या दोहोंचेंहि पाऊल पुढें जाण्याऐवजीं परत फिरेल. आणि ग्रीसचा पुढील इतिहास लक्षांत घेतला असतां ॲरिस्टॉटलचेंच म्हणणें बहुतेकांशीं खरें ठरलें आहे.

ॲरिस्टॉटलच्या नगरराज्यांत लोकशाही होती; पण राजाहि होता. ग्रीक वाङ्मयांत राजा हा होमरच्या वेळेपासून आढळतो. पण तो राज्याचा निश्चित घटक म्हणून नव्हे, तर वंशपरंपरेनें लोकांनीं औपचारिक मान दिलेला असा कोणी एक विशेष प्रकारचा प्रतिष्ठित मनुष्य ! तो सत्तेनें व हक्कानें मानाचा कारभार घेत नसे, तर तो मान मिळण्याची त्याची अपेक्षा लोकांच्या संभावितीवर व भलेपणावर अवलंबून असे. आज ‘ राजा ’ ‘ प्रजाजन ’ हे शब्द उच्चारले असतां त्या दोघांतील अधिकाराचें जें अंतर आपल्या लक्षांत येतें, तसें होमरकालीं नव्हतें ! कारण राजा हा राजा होता, पण त्याला प्रजा नव्हती ! म्हणजे अनेक भावांमध्यें जसा सर्वांत वडील भाऊ मान्यता अधिक पावतो, तसाच होमरकालीन ग्रीक राजा हा राज-बंधुवर्गापैकीं सर्वांत वडील बंधु इतकाच त्याचा अर्थ होता. एकाच वेळीं ‘ अनेक राजे ’ कसें म्हणावें ! पण पाटलाच्या घरांतील प्रत्येक भावाला पाटील हें नांव लावतातच. त्याप्रमाणें ग्रीक राजा हा अनेक ‘ चीफ्टन ’ लोकांपैकीं एक ‘ चीफ्टन ’ असे; व त्यालाच ‘ राजा ’ म्हणत. गांवाकरितां वेदीवर होमहवन करणें, किंवा ग्रामदेवतेची नैमित्तिक पूजाअर्चा करणें, व युद्धकालीं सेनापति म्हणून अघाडीला राहणें, हे जसे त्याचे बहुमान तशींच तीं त्याचीं कर्तव्येंहि होतीं.

रोमच्या नगर-राज्यांत राजा याचा अर्थ याहून वेगळा होता. त्याला अधिक

कायदेशीर स्वरूप होतें. त्याला Rex ( रेक्स ) म्हणजे राजा असें म्हणत; पण तो मुख्य मॅजिस्ट्रेट असे. ग्रीक राजा हा अनेक चीफ्टनपैकीं एक चफ्टिन तसा हा मात्र अनेक मॅजिस्ट्रेटांपैकीं एक मॅजिस्ट्रेट नव्हता. तो असेल तेव्हां एकटा एकच मॅजिस्ट्रेट असून त्याच्या अधिकाराला राजकीय स्वरूप असे. या अधिकाराला 'इंपीरियम्' असा लॅटिन शब्द लावीत. स्पार्टा येथें ख्रि. पू. आठ शतकें नगरराज्य होतें व तेथें राजपदहि होतें. पण तो होमरच्या राजाप्रमाणें अनेक चीफ्टनपैकीं एक चीफ्टन किंवा रोम येथील एकट्या एक मॅजिस्ट्रेटसारखा नव्हता. शिवाय तेथें एकाच वेळीं दोन राजे राजपदावर असत ! एका म्यानांत दोन तलवारी अशासारखें हें विचित्र दिसतें. परंतु तें तसें होतें खरें. त्यांच्याकडे कांहीं कांहीं मुख्य अधिकार असत. पण ते अधिकार, विशेषतः न्याय मुनसफी खात्यांतले, मुद्दाम वेगळे तोडून दिलेले असत. पण स्पार्टामधील राजपद हें बेजबाबदार नसून, राजाच्या हातून अपराध घडले तर लोक त्याचा इनसाफ करीत. ख्रि. पू. पांचव्या शतकाचे सुमारास तेथें दोन राजांऐवजीं पांच एफॉर्स ( Ephors ) नामक अधिकाऱ्यांचें मंडळ लोक नेमीत असत असेंहि दिसतें. ग्रीस व इटली यांमध्यें 'ऑलिगार्की' नांवाची विशिष्ट राज्याधिकारपद्धति कांहीं दिवस लोकांना आवडली व नांदली. तिला या पंचराजमंडळापासून प्रारंभ होतो.

## लोकराज्याची मधली पायरी

अगदीं एकतंत्री जुलमी राजा व पूर्ण लोकशाही यांच्यामधील मार्गावरचा हा मधलाच एक मुक्काम आहे. या ठिकाणीं राजसत्ता विभागली जाण्याचा प्रारंभ दिसतो. त्याचें कारण असें. नगराएवढेंच राज्य असलें म्हणजे राजा नेहमीं दृष्टीसमोर राहतो व त्याचे दोष लोकांच्या दृष्टीस पडतात. राजा जोंपर्यंत प्रजेच्या डोळ्याला प्रत्यक्ष दिसत नाहीं, तोंपर्यंत त्याची सत्ता सुरक्षित राहण्याचा संभव अधिक हें उघड आहे. या मधल्या मुक्कामावरील, अधिकार विभागलेल्या, राज्यघटनांना 'ॲरिस्टॉक्रसी' 'ऑलिगार्की' इ. शब्द इंग्रजींत आहेत. नेमके तद्वाचक रूढ प्रतिशब्द संस्कृतांत नाहींत. नवीन बनवावयाचे तर 'अभिजातांचें राज्य' 'श्रेष्ठांचें राज्य' 'विभूतींचें राज्य,' 'गुणवानांचें राज्य,' 'नरोत्तमांचें राज्य' असे शब्द बनवावे लागतील. चांगलेपणावर, मोठेपणावर, अधिकारपात्रता अवलंबून असावी ही भावना सयुक्तिक होय. राजा

ही केव्हांहि एकच एक व्यक्ति व तिजमध्यें कदाचित् एखाद्याच गुणाचा विकास व त्या मानानें दोषहि. तेव्हां अशा व्यक्तींच्या हातीं सत्ता असण्यापेक्षां चांगलेपणाचे निरनिराळे गुण ज्यांच्यामध्यें दिसून येतात, अशा कांहीं थोड्या व्यक्तींत तो मोठेपणा व अधिकार वांटून दिला असतां, राज्यांतील लोकांचें सर्वांगीण कल्याण त्यांच्या हातून संपादिलें जाण्याचा संभव अधिक—अशी या विशिष्ट राज्यपद्धतीची मीमांसा सरळ होऊं शकते.

ग्रीक राजेचसे काय पण त्याहून कमी प्रतीचे चीफ्टन म्हणजे सरदार हे स्वतःला शुद्ध रक्ताचे अभिजात, किंबहुना देवदेवतांचे दूरचे कां होईना पण औरस वंशज, असें मानीत. लग्नसंबंधानें जातिभेद पाळीत. हलक्या कुळांतील मुली करीत नसत. आपापसांत संघ बनवून बलिष्ठ राजांनाहि विरोध करीत. ज्या सरदारांना असला देववंशाचा हक्क सांगतां येत नसे तेहि मोठे जमीनदार असल्यामुळें, आर्थिकदृष्ट्या आपलें महत्त्व गाजवीत. सैन्यांतल्या सरदारक्या त्यांजकडे असत, व विशेषतः त्यांच्या जागा घोडदळांत असत. घरीं जमीन पुष्कळ म्हणून त्यावर घोडे व इतर खिल्लारें त्यांना पुष्कळ पोसतां येत. आणि या दोनतीन गोष्टींतच त्या वेळची संपत्ति मुख्यतः असे.

या सरदारांनीं रोममधील राजशाही लवकरच पादाक्रांत केली. ग्रीसमध्यें ती गोष्ट हळू हळू व क्रमानें झाली. राजे दुर्बळ व परावलंबी. आणि खालची जनता अद्यापि आपल्या हक्कांविषयीं जागी झाली नव्हती. त्यामुळें नगर-राज्यांत सरदार व अमीर उमराव यांनीं बराच काळपर्यंत वर्चस्व गाजविलें. त्यांनीं राजपद शिल्लक ठेविलें, तरी त्याची निवडणूक करण्याचा अधिकार आपल्याकडे घेतला. पूर्वीं राजा हा एकच 'मॅजिस्ट्रेट' असे त्या ऐवजीं सरदार वर्गांतले नऊ मॅजिस्ट्रेट म्हणजे 'नवग्रही' बनविली. रोमन लोकांमध्यें सरदारांच्या वाढत्या बळाबरोबर राजांचा जुलूमहि त्यांच्या नाशाला कारणीभूत झाला. 'ल्यूक्रेशिआ' नामक कुमारिकेवर 'टार्क्विनस' राजानें बलात्कार केल्यामुळें राज्यक्रांति झालेली प्रसिद्धच आहे.

खि. पू. सहाव्या शतकांत रोममधील राजपद नष्ट झालें. राजपदाचा अधिकार ( इंपीरियम ) हा दरवर्षी निवडणूक करण्याच्या अशा दोन मॅजिस्ट्रेटांच्या हातीं गेला. मात्र तो त्यांच्या हातीं असतां राजाइतकाच अनियंत्रितपणें गाजवितां येई. फरक झाला तो हा कीं, राजा तहाहयात शिरजोरी करूं शके. या

मॅजिस्ट्रेटांना ती फार तर एक वर्ष करतां येई. शिवाय त्यांची वागणूक चांगली असली तर फिरून त्यांची निवडणूक होण्याचें आमिष त्यांना असे.

पण 'शिरजोरी' ही जशी राजांच्या नाशाला, तशीच फाजील 'स्वार्थबुद्धि' ही सरदारसंघांच्या व श्रीमंत लोकांच्या नाशाला कारण झाली. लोकशाहीच्या प्रगतीचा प्रवाह आतां अधिक झरझर वाहूं लागला होता. आणि पूर्वी सरदारांनीं जसें राजांना म्हणावें कीं, "तुम्हीच एकटे टेकोजी सर्वाधिकारी कोण?" ह्याचप्रमाणें आतां तिसऱ्या वर्गांतील लोक सरदारसंघाला प्रश्न टाकूं लागले कीं, तुम्ही थोडे असून सर्व अधिकार भोगूं म्हणतां, मग आम्ही पुष्कळ ते फुकटच कीं काय? प्रथम हे पुष्कळ फुकट या सदरांत हिशेबी लिहिण्यांत येत याचें कारण त्या पुष्कळांत गुलामच होते. गुलामगिरी कायदेशीर होती पण हळूहळू गुलामगिरीची पद्धत कमी होत चालली. कांहीं कायद्यानें, कांहीं मालकांच्या सारासार विवेकानें, तर कांहीं स्वतः गुलामांच्या पराक्रमानें. व्यापार उदीम वाढला तसा नगर-राज्यांतील व बाहेर वसाहतींतील खालच्या वर्गांतील लोकांच्या बुद्धीला वाव मिळाला. ही कनिष्ठवर्गांची राजकीय चळवळ ख्रि. पू. सातव्या शतकांत अथेन्सच्या नगरराज्यांत सुरू झाली.

## वर्ग-कलहाचें दृश्य

समाजांतील एखादा वर्ग नुसता मानानें कनिष्ठ असला, पण इतर रीतीनें सुखांत असला, तर हा कनिष्ठपणाचा अपमान त्याला फारसा जाणवत नाहीं. हल्लीं हिंदुस्थानांत अस्पृश्यता काढून टाकण्याची चळवळ पुढारी करीत असतां, स्वतः अस्पृश्यांचे कांहीं पुढारी ह्या चळवळीला मनांतून हंसतात आणि म्हणतात कीं, "आमची सांपत्तिक स्थिति खालावली आहे ती सुधारली, शिक्षण मिळालें आणि शिक्षणांतून पगारी व अधिकाराच्या नोकऱ्यांत प्रवेश सुलभ होतो तसा आमचा झाला म्हणजे राही ना कां ती अस्पृश्यता! आम्हीच उलट स्पृश्यांना अस्पृश्य ठरवूं म्हणजे झालें!" पण सामाजिक मान्यतेच्या कनिष्ठपणाबरोबर आर्थिक दुःस्थितिहि असली म्हणजे कनिष्ठ वर्गांच्या चळवळीला सहजच तेज येतें.

ॲटिका (ग्रीस) मधील कनिष्ठ वर्गांच्या या दुःस्थितीचें वर्णन केलेलें आढळतें तें असें: "या लोकांना स्वतःच्या जमिनी नव्हत्या. म्हणून ते अभिजात व श्रीमंत लोकांच्या जमिनी करीत. परंतु यांनीं कष्टांनीं जमीन पिकविली असतां

मालकांनीं खंडादाखल पांच हिस्से उत्पन्न द्यावें, आणि अवघा कुळांना एक हिस्सा ! या कुळांना मालकांनीं गुलामासारखें राबवून घ्यावें. आणि जमिनीचा खंड देतां न आला तर मुलांबाळांसकट मालकाची त्यांनीं गुलामगिरी पत्करावी. " संख्येचें बल कनिष्ठ वर्गाकडे असतां, असली अन्यायाची स्थिति फार काळ कशी टिकणार ? ॲरिस्टॉटल हा नगर-राज्यांचा स्तुतिपाठक खरा. पण त्यालाहि कनिष्ठ वर्गाच्या या दुःस्थितीची जाणीव होती.

या वर्गाची चळवळ जोरांत आली तेव्हां ' सोलन ' नांवाचा एक शहाणा अधिकारी अथेन्सला लाभला. त्यानें निस्वार्थी व निर्विकार बुद्धीनें सर्वांना शक्य तितकें यथान्याय वागविण्यांत येईल असे कायदे केले. या कायद्यांचा कर्ता म्हणून सोलनचें नांव जगविख्यात आहे. नगर-राज्याचें क्षेत्र थोडें असल्यामुळें ' सोलन'ला राजकीय, सामाजिक, व आर्थिक सुधारणांचा मेळ एकाच कायद्यांनीं घालतां आला. त्यानें मुख्य गोष्ट साधली ती अशी कीं, कनिष्ठ वर्गाला नुसतें राजकीय अधिकारांतच हिस्सेदार केलें नाहीं तर आर्थिक सुस्थितींतही हिस्सेदार केलें. पैशाशिवाय नुसत्या मतदारीचा काय उपयोग बरें पैसा आहे पण मतदारी नाहीं तरी काय उपयोग ? म्हणून दोन्ही सुधारणांचें प्रतिबिंब परस्परांतून दिसावें अशी योजना सोलन यांनीं केली. त्यानें कुळांना कर्जमुक्त केलें. कर्जबाजारीपणामुळें ज्यांना देशत्याग करावा लागला होता त्यांना स्वदेशीं परत येणें शक्य केलें. पूर्वीं जमीन म्हटली कीं, जी कर्जाच्या वरवंट्याखालीं सांपडलेली अशी आढळावयाची ती त्यानें सोडविली. आणि ज्या लोकांना जमिनी नव्हत्या किंवा मिळणें शक्य नव्हतें त्यांचें तोंड नव्या उद्योगधंद्यांकडे वळण्याला मदत केली. त्यानें स्वदेशी धंद्यांना उत्तेजन दिलें. आणि देशांतील जो माल बाहेर जाण्यापासून स्वदेशीची हानि होत असे तो माल बाहेर जाणें बंद केलें. आतां ' सोलन ' झाला तरी समाजांतील सगळ्या वर्गाची आर्थिक स्थिति एकदम एका मापानें मोजण्यासारखी कशी करूं शकता ? परंतु समानतेला जो एक तारतम्याचा व्यावहारिक अर्थ आहे त्या अर्थानें त्यानें श्रेष्ठ व कनिष्ठ वर्गांत समानता प्रस्थापित करण्याचा प्रयत्न केला. सोलनाला हें माहीत होतें कीं, कनिष्ठ वर्गांतील लोकांना राज्यकारभाराचा अनुभव नाहीं; यामुळें केवळ समानतेच्या नांवाखातर त्यानें त्यांना हुद्याच्या व जबाबदारीच्या जागा एकदम दिल्या नाहींत. पण कोणाच्याहि हातीं राजसत्ता असल्यास

आपणाला अन्याय होणार नाहीं हें त्या लोकांना कळण्याची पात्रता होती व तिचा उपयोग करून तशा प्रकारचे अधिकारी नेमण्याच्या प्रातिनिधिक सत्तेंत त्यांना यथान्याय भाग देण्यांत आला. त्यांना स्वतः मॅजिस्ट्रेटचे अधिकार गाजवितां आले नाहींत तरी, लोकनियुक्त कौन्सिलांत बसून मॅजिस्ट्रेटना बरें तर बरें, वाईट तर वाईट म्हणण्याचा अधिकार सोलननें दिला. तसेंच शिक्षण व संस्कृति हीं लाभून कालांतरानें ते स्वतः मॅजिस्ट्रेट, कॉन्सल, अरकॉन वगैरे होण्याला लायक ठरतील अशीहि योजना त्यानें केली. या सर्व सुधारणांमुळें नगरराज्यांतील एकांगी-पणा घालवून, संख्येनें मोठ्या अशा कनिष्ठ वर्गाला हात देऊन, त्यांना वर घेऊन त्यानें त्यांचा उद्धार केला !

## ग्रीक लोक-राज्याचें स्वरूप व यशापयश

ग्रीसमध्यें पुष्कळ नगर-राज्यें होतीं. पण त्या सर्वांत लोकशाहीला सारखेंच यश आलें नाहीं. इतिहासकारांच्या मतें एकटें ' अथेन्स ' हेंच या कामीं अति-शय दैववान् ठरलें. त्याचें एक कारण वरिष्ठ लोकांच्या हातांतील राजसत्ता कनिष्ठ वर्गाच्या हातीं यथाक्रम गेली. परंतु इतर नगरराज्यांत तशी गोष्ट घडली नाहीं. अथेन्समध्यें लोकशाही विजयी झाली याचा अर्थ, तिनें इतर कोणाच्या हातची सत्ता पाडाव करून घेण्यांत यश मिळविलें असा नाहीं; तर अथेनियन लोकसमाजानें हळू हळू आपल्या हातीं संक्रमित झालेली राजसत्ता चांगल्या प्रकारें भोगिली. अथेन्सच्या नगर-राज्यांतील बहुतेक प्रत्येकाला कांहीं एका पद्धतीनें राज्यकारभार करण्याची संधि मिळत असे, व तो ती संधि साधी-तहि असे. अथेन्सचे सर्व नागरिक लोकसभेचे सभासद असत. त्या सभेच्या कमींत कमी चाळीस बैठकी एका वर्षांत होत. आणि नगर-राज्याच्या हित-संबंधाच्या प्रश्नांच्या चर्चा अशा बैठकींत उघड रितीनें होई. पांचपांचशें लोकांचे ज्यूरीसारखे गट करून त्यांच्याकडे महत्त्वाच्या खटल्यांचे व दाव्यांचे निकाल करण्याचें काम सोंपविलें जाई. यामुळें प्रत्येक अथेनियन नागरि-काला या ज्यूरीचा सभासद म्हणून न्यायदान करण्याची पाळी येई व तें काम तो हौसेनें करी. कांहीं मॅजिस्ट्रेटहि नेमलेले असत. पण त्यांच्याकडे न्याय-खात्यांतील मामुली किंवा कमी प्रतीचें काम असे. सोलननें कनिष्ठ वर्गाला विश्वासांत घेतलें तथापि, यशस्वी राज्यकारभाराला कांहीं विशेष प्रकारचेंच शहाणपण लागतें म्हणून ' एरिऑपेगस ' नांवाची एक ' खाशांची सभा ' निर्माण

करून ठेवली होती. तिला एखाद्या ट्रस्ट मंडळाचें स्वरूप होतें. म्हणजे त्या मंडळाला कांहीं विशेष सत्ता होतीच पण सत्तेच्या मानानें त्याजवर जबाबदारीहि मोठी ठेविली होती. कालांतरानें अथेनियन नागरिकांनीं उमेदीनें व आत्म-विश्वासानें हें ट्रस्टमंडळ नामशेष केलें. व सर्वच्या सर्व अधिकार आपल्या हातीं घेतला!

'लोकशाही' हा शब्द प्राचीन काळच्या व अर्वाचीन काळच्या लोकसत्तेला लागणारा असा एकच आहे. पण आधुनिक काळीं राज्यें एवढीं प्रचंड व विस्तृत झालेलीं आहेत कीं, त्यांतील लोक आपल्या हातानें राज्यकारभाराचें काम कर-तात असें म्हणतांच येत नाहीं. स्वराज्य यांतील 'स्व' या शब्दाचा अर्थ पूर्वींचा व आतांचा अगदीं वेगळा आहे. हल्लीं एखाद्या लोकशाही राज्यांत प्रत्यक्ष राजा नसो, व प्रधानमंडळालाहि त्याच्या अपराधाकरितां पदच्युत करतां येवो. पण या गोष्टी राज्यांतील प्रत्येक व्यक्तीला फक्त प्रतिनिधिद्वारांच करतां येतात. आणि या लोकशाही स्वराज्यांतील 'स्व' चें काम, कधीं काळीं निवडणुकी-च्या वेळीं आपला प्रतिनिधि निवडून देणें, व फार तर स्वतःच लोकसभेंत निवडून येणें, एवढेंच राहतें. परंतु "मीं हें काम स्वतः हातानें केलें' असें सामान्य नागरिकाला कधींच खरें प्रतीत होत नाहीं. उलट अथेन्सचा नागरिक हा नगर–राज्यांतील मोठ्या लोकसभेंत स्वतःच जन्मसिद्ध हक्कानें बसे. शिवाय तो त्या सभेंत प्रतिनिधि निवडून पाठवीत नसे. तीस वर्षांहून अधिक वयाचा तो झाला म्हणजे हक्कानें न्यायमुनसफीचा अधिकार गाजवी. उघड्या जागेंत नागरिक गोळा व्हावे, तेथें दोषारोपांतील हल्ल्याचे व बचावाचे प्रकार समक्ष घडावे, वक्तृत्वपूर्ण भाषणें त्यानें ऐकावीं, व मग स्वतःचें मत देऊन त्यानें कोणाला तारावें किंवा मारावें, असा क्रमच कायद्यानें ठरविला होता. मोठ्या लोकसभेंतील एक छोटी लोकसभा पांचशें लोकांची असे, तिची निवडणूक प्रतिवर्षी होई. या छोट्या सभेचें काम अखिल नागरिक सभेच्या बैठकीकरितां कार्यक्रमपत्रिका तयार करण्याचें, व पुढें तिच्या ठरावांची अंमलबजावणी करण्याचें असे. या पांचशें लोकांपैकीं पन्नास पन्ना-सचे एक, असे दहा गट केले जात. त्या वेळीं वर्षांचे महिने दहाच असल्या-मुळें या पांचशेंचा अधिकार या पन्नासांच्या हातीं एक महिना राही; व या छत्तीस दिवसांच्या महिन्यांत या पन्नासांतील प्रत्येकाला व्यक्तिशः राज्यकारभाराचें

कांहींना कांहीं तरी प्रत्येक काम करावें लागलें नाहीं असें घडत नसे. शिवाय तपशीलवार कामाकरितां पोटमंडळें निवडण्यांत येत. पोटमंडळांतील अधिकाऱ्यांची संख्या सुमारें पंधराशें असे. अशा रितीनें अथेन्सच्या तीस हजार लोकवस्तीपैकीं निदान दोन हजारांना कोणत्याना कोणत्या तरी राज्यकारभाराच्या कामाचा अनुभव येई. हल्लींप्रमाणें अथेन्समध्यें पूर्वी कायम नेमणुकीचे अधिकारी नसत; तर सेनापतीखेरीज इतर सर्व अधिकारी लोकनियुक्तच असत. हल्लींप्रमाणें तज्ज्ञ लोकांचें बंड अथेन्सच्या नगरराज्यांत नव्हतें. पण तेव्हांचीं कामेंहि हल्लींसारखीं किचकट भानगडीचीं म्हणून केवळ तज्ज्ञांनीं ( एक्सपर्टनीं ) करण्याचीं नसत. ज्याच्याकडे जें काम आलें तें त्यानें आपली सामान्य बुद्धि चालवून केलें म्हणजे चांगलें होण्यासारखें असे. आणि त्याला मदत हीच कीं, मनुष्य स्वतः जबाबदारीनें जें काम करितो त्याबद्दल, व तें करण्याचे कायदे व नियम यांजबद्दल, त्याला आदर वाटूं शकतो. नाहीं तर निवडणुकीच्या वेळीं एकदां प्रतिनिधि निवडून द्यावयाचे, आणि दुसऱ्या निवडणुकीपर्यंत त्या प्रतिनिधींना व त्या कामाला नुसतीं नांवें ठेवीत बसावयाचें, असा प्रकार अथेन्स मध्यें नव्हता !

याशिवाय दुसरी मोठी गोष्ट म्हणजे कोणीं आपल्या कामांत अक्षम्य चूक किंवा गुन्हेगारी केली तर त्या नागरिकाचा इनसाफ होऊन त्याला कडक शिक्षा देण्यांत येई. नव्या व जुन्या लोकशाहींतील हा मुद्दा फार लक्षांत ठेवण्यासारखा आहे. कारण नव्या लोकशाहींत जबाबदारी या शब्दाला कांहींच गंभीर अर्थ उरलेला नाहीं ! जुन्या नगरराज्यांत तो अर्थ असे. अथेन्स हें स्पार्टाप्रमाणें दरिद्री नव्हतें. किंवा रोमप्रमाणें श्रीमंत असून त्याची श्रीमंती पुढाऱ्यांनीं आपल्या स्वार्थाकरितां लुटली असेंहि अथेन्समध्यें झालें नाहीं. तर जी काय संपत्ति मध्यम प्रतीची अथेन्सजवळ होती, ती त्या नगरचें सर्वांगीण वैभव वाढविण्याकडेच खर्च करण्यांत आली. म्हणून ग्रीसमधील इतर कोणत्याहि शहरापेक्षां, कांहीं बाबतींत रोमपेक्षांहि, अथेन्स संस्कृतिसंपन्न ठरलें.

कित्येकांच्या मतें ॲरिस्टॉटल यानें 'सुवर्ण मध्यबिंदू'ला चिकटून राहणें म्हणजे कोणत्याहि एका टोंकाला न जाणें व कोणत्याहि गोष्टीची अतिशयोक्ति न करणें–हा जो मुख्य नैतिक गुण सांगितला, तो अथेन्सच्या अंगीं पूर्णपणें वसत असला पाहिजे; व म्हणूनच अथेन्समधील लोकशाहीचें चरित्र इतरांच्यापेक्षां अधिक उज्ज्वल झालें.

कोणत्याहि गोष्टीचा चांगलेवाईटपणा हा तुलनात्मकच पाहावयाचा असतो. अथेन्सचें नगर–राज्य म्हणजे 'ॲटिका' संस्थान यानें, लोकशाहीचा म्हणजे स्वराज्याचा व सुराज्याचा, एक उत्कृष्ट नांवाजण्यासारखा, इतिहासकारांनीं नमूद करून ठेविण्यासारखा, नमुना निर्माण केला यांत शंकाच नाहीं. पण लोकशाहीचें ध्येयवादी तात्त्विक स्वरूप असेंच कांहीं आहे कीं, त्यांतील सर्व गुण या नगर-राज्याला आपलेसे करितां आले नाहींत. म्हणून आजच्या दृष्टीनें अथेन्सच्या लोकशाहींतहि उणेपणा दाखवितां येतो. अथेन्सची लोकशाही उत्कृष्ट ठरली याचा अर्थ प्राचीन काळच्या, रोम स्पार्टा वगैरे इतर नगर–संस्थांतील लोकशाहीपेक्षां अधिक चांगली ठरली इतकाच घ्यावयाचा. किंवा कोणी असें म्हणणारेहि भेटतील कीं, लोकशाहीच्या नांवावर विकणाऱ्या आजच्या कित्येक राज्यां-तल्या राज्यपद्धतीपेक्षां अथेन्सची लोकशाही अधिक सत्य स्वरूपाची होती. आज अमेरिका, इंग्लंड, फ्रान्स, इटली, जर्मनी हीं लोकशाही राज्येंच आहेत कीं नाहीं ? पण तत्त्व किंवा अनुभव दोन्ही दृष्टींनीं अथेन्सचेंच राज्य कदाचित् त्यांच्यापेक्षां अधिक बरें म्हणावें लागेल.

इतिहासकारांच्या मतें अथेन्सच्या नगर-राज्याला दोष देतां येण्यासारख्या दोन गोष्टी होत्या. एक गुलामांची पद्धति किंवा संस्था, आणि दुसरी साम्रा-ज्याची हांव. पैकीं हा दुसरा दोष आज वर दर्शविलेल्या स्वातंत्र्यप्रेमी म्हण-विणाऱ्या लोकशाही राज्यांत काय थोडा आहे ! नाहीं म्हणावयाला गुलामगिरीची संस्था हल्लीं नष्ट झाली आहे हें खरें; पण कांहींच्या मतें तिचेंहि फक्त रूपांतर झालें आहे. तथापि याहिपेक्षां अधिक समर्पक असें समर्थन म्हटलें तर तें हेंच कीं, तो काळच असा होता कीं, तेव्हां पदरीं गुलाम बाळगणें याला जग नांवच ठेवीत नव्हतें. कोणीं सांगावें कीं, स्वतः साक्रेटिस, प्लेटो, ॲरिस्टॉटल, पेरिक्लिस यांच्या घरीं राबते गुलाम नव्हते म्हणून ! पण त्यांतल्यात्यांत फरक असा असेल कीं, अथेन्समध्यें गुलामांना वागविण्याची पद्धत कदाचित् अधिक चांगली म्हणजे सदयतेची असेल. इतिहासकारानें ॲटिकामधील गुलामांची संख्याच नमूद केली आहे. ती अशीः १३५००० स्वतंत्र नागरिक तर १००००० गुलाम. पण लोकशाहीचा, म्हणजे स्वरा-ज्याचा व स्वातंत्र्याचा, तात्त्विक अभिमान बाळगणाऱ्या या राज्याचा एक उजवा हात जर स्वतंत्र नागरिक हा म्हटला तर त्याचाच दुसरा म्हणजे डावा

हात त्यांतील गुलाम हा होता ! असे दोन विजोड हात शरिराला संभाळून ॲटिकाचें लोकशाही राज्य चालूच होतें. अर्थात् या स्वराज्यांतील ‘ स्व ’ म्हणजे स्वतः स्वतंत्र व मालक असलेले लोक. त्यांना एकंदरीनें मानुष जनतेचा अभिमान होता असें म्हणतां येत नाहीं. तसें असतें तर त्यांनीं गुलामगिरीची संस्था नष्ट केली नसती काय ? पण खरोखर याहि म्हणण्यांत अर्थ नाहीं. कारण जगांतील पुरुषसमाजानें आजवर स्त्री-समाजाला कोणतेहि स्वतंत्र हक्क न देतांच वागविलें आहे कीं नाहीं ? आतां कोठें मनुष्य-समाजाच्या या निम्या भागाला स्वतंत्र असा जीव व चलनवलन लाभूं लागलें आहे. तात्पर्य, असे दोष कोणी काढीत बसलाच तर त्याला अथेन्सच्या नगर-राज्यांतहि दोष दिसतील. पण निर्दोष असें लोकशाही–स्वराज्य यापुढें तरी केव्हां पहावयास मिळेल कीं नाहीं कोणीं सांगावें! किंबहुना ध्येय म्हणून जें आपण म्हणतों त्याची जातच अशी आहे कीं, त्यांच्या अर्थाप्रमाणें तें नेहमीं ध्यानांत आणण्याच्या स्थितींत असावयाचें, अनुभवाला यावयाचें नाहीं !

ॲटिकामधील गुलाम व परकीय लोक यांच्या संबंधानें नगर-राज्याचें धोरण काय होतें हें आपण पाहिलें. पुढें हळूहळू गुलामगिरी नष्ट झाली असली तरी, परकीय असे फार थोडे लोक होते म्हणून नगरराज्यांतील समाज हा सामाजिक व राजकीयदृष्ट्या एकजिनसी झाला असता; परंतु अथेन्सला साम्राज्य वाढविण्याची लालसा उत्पन्न झाली. ग्रीसमध्यें जीं इतर नगरराज्यें होतीं त्यांच्याशीं अथेन्सचा संबंध अधिकाधिक येऊं लागला. अथेन्स श्रेष्ठ व इतर नगरराज्यें कनिष्ठ अशा स्वरूपाचा तो होता. आणि हा श्रेष्ठकनिष्ठ–भावच कोणाच्याहि नाशाला कारण होतो. पण हा नुसता विषमभाव गाजवूनच अथेन्स संतुष्ट राहिलें नाहीं, तर या इतर नगर-राज्यांकडून कारणाकारणानें खंडण्या म्हणा किंवा वर्गण्या म्हणा वसूल करण्याचा क्रम त्यानें सुरू केला. अथेन्सच्या लोकांची संस्कृति अधिक व श्रेष्ठ प्रतीची. तेव्हां त्याकडे एक प्रकारें गुरूचें नातें आलें. गुरूचें काम शिक्षण देण्याचें. शिक्षण द्यावयाचें तर तद्विषयकसंस्था हव्या, त्या संस्था निर्माण करून चालवावयाच्या तर तें शिक्षण घेणाऱ्या शिष्यरूपी इतर नगर-राज्यांनीं गुरु-दक्षिणा दिली पाहिजे. धर्माच्या बाबतींत मोठमोठीं देवळें, व नित्य नैमित्तिक उपासनाविधि, कलेच्या बाबतींत पुतळे, उद्यानें, सभागृहें व आत्मसंरक्षणाच्या बाबतींत आरमारी–जहाजें या

सर्वांना स्थान कोणतें ? अर्थात् मध्यवर्ति अथेन्स ! अशा रीतीनें क्रमाक्रमानें अथेन्स हें साम्राज्यसत्तेचें केंद्र बनूं लागलें. इतर नगर-राज्यांना सहजच अथेन्सचा हेवा वाटूं लागला. आतां साम्राज्याभिलाष हा लोकशाही राज्यांनाच असतो असें नाहीं. राजे लोकांच्या आकांक्षांची परिपूर्ति दिग्विजय केल्याशिवाय होत नाहीं हें ठरलेलेंच. पण अपेक्षा अशी असते कीं, लोकशाहींतील लोकांना तरी स्वातंत्र्याचें महत्त्व कळावें ! आपण स्वतंत्र राहून आपलें राज्य आपणच करावें, अशी आकांक्षा आपणाला असते, तर इतर नगरांतील लोकांना ती कां असूं नये ? ही गोष्ट लोकशाही भोगणाऱ्या अथेन्सच्या लक्षांत यावी. पण ती आली नाहीं खरी ! अर्थात् लोकशाहींतील राजकीय गुणाचा उत्कर्ष जरी अथेन्समध्यें दिसून आला तरी नैतिक गुणाचा दिसून आला नाहीं.

'पेरिक्लिस'सारख्या शहाण्या मुत्सद्यानेंहि साम्राज्यसत्तेचें समर्थन केलेलें आढळतें. तो म्हणतो, "दुसऱ्यावर आक्रमण करण्याची बुद्धि ही स्वाभाविक असते. लोकांनीं स्वतंत्र राहून आपला आपण कारभार करून सुराज्य भोगावें. पण आपलें राज्य वाढवूं नये असें कोणीं सांगितलें ?" पण अथेन्स साम्राज्याच्या धोरणांत गुरफटल्यावर, डाक सोनें खातें तसें, साम्राज्यानें अथेन्सला खाल्लें. म्हणजे साम्राज्यांतून मिळणाऱ्या लाभामुळें अथेन्सची सुखोपभोगांची इच्छा वाढली. स्वतः श्रम करण्याची बुद्धि कमी झाली. आणि बाहेरून चरितार्थाचींहि साधनें आणल्याशिवाय अथेन्सची उपजीविका होईनाशी झाली. लोकशाहीला स्वातंत्र्य लाभलें तरी सु-राज्य करितां येईनासें झालें. अथेन्सच्या उत्तर इतिहासांत 'पेलॉपोनेशियन' नांवाचें युद्ध झालें. त्याचें कारण असें कीं, नगर-राज्य संस्थेचा अभिमान अथेन्सला उरला नाहीं. "आम्ही अद्यापि तो अभिमान धरून आहों म्हणून तत्त्वाकरितां आम्हांला अथेन्सशीं लढावें लागत आहे" असा पक्ष इतर नगरराज्यांनीं उचलला. ध्येयच्युतांशीं ध्येयनिष्ठांनीं युद्ध मांडलें, असा देखावा या राजकारणाला आला. यामुळें अथेन्सविषयीं जगाची सहानुभूति कमी झाली. मात्र उलट बाजूला ही गोष्ट राहाते कीं, ध्येयनिष्ठांनीं हें युद्ध आपल्या बळावर केलें नाहीं. परकीयांची मदत घेतली. आणि कालांतरानें आपलें स्वातंत्र्य घालविलें !

## रोमन लोकराज्यांतील वर्गकलह

रोमच्या नगर-राज्यांतहि असाच अनुभव आला. एकाच राज्यक्षेत्रांत श्रेष्ठ

व कनिष्ठ लोकांचा वास; कनिष्ठ हे प्रत्यक्ष गुलाम किंवा श्रेष्ठांची पिढीजात कुळें. या कनिष्ठ लोकांना स्वतःची अशी जमीन नव्हती. त्यांनीं श्रेष्ठ लोकांच्या ताब्यांतील जमीन कसावी व ते देतील तें पोटाला खावें. ग्रीसप्रमाणें रोममध्येंहि ही गुलामगिरी पुढें हळू हळू नाहींशी झाली. परंतु गुलामगिरीच्या स्थितींत धनीपणाची लाज वाटून श्रेष्ठ ( पॅट्रिशियन ) लोक कनिष्ठांना ( प्लीबियन ) मदत करीत ती ते पुढें देत नाहींसे झाले. " तुम्हाला स्वातंत्र्य पाहिजे नाहीं का ? घ्या देतों. पण मग इतर कांहींही मिळणार नाहीं." असें म्हणून श्रेष्ठांनीं कनिष्ठांना तोडून टाकल्यासारखें केलें. यामुळें स्वातंत्र्यलाभाच्या पहिल्या काळांत 'प्लीबिअन' लोकांचे फार हाल झाले. ' पॅट्रिशियन ' याचा अर्थ ' पितृवंशज ' म्हणजे अथेन्समधील ' अभिजात ' वर्गासारखाच हा वर्ग होता. प्लीबिअन्स झाले तरी ' पितृवंशज ' च. पण त्यांना खानदानीचा आधार नाहीं. कनिष्ठ मानलेल्या पितरांपासून त्यांचा जन्म. असा हा भेद होता. राजे लोक व त्यानंतर श्रेष्ठ वर्ग यांच्या हातीं रोममधील सत्ता राहिली तोंपर्यंत हा भेद नष्ट झाला नाहीं. पण पुढें रोमला शत्रूपासून आत्मरक्षणाचे प्रसंग अधिकाधिक येऊं लागले. आत्मरक्षणाचें मुख्य साधन सैन्य, आणि नुसत्या 'पॅट्रिशियन्स'कडून पुरी सैन्यभरती होईना. तेव्हां ' प्लीबियन ' लोकांना थोड्या बहुत सवलती देऊन, शिपाई बनवावें लागलें. पण सैन्यभरतींत त्यांना घेतलें तरी वरिष्ठ प्रतीच्या लष्करी जागा त्यांना देण्यांत येत नव्हत्या. म्हणजे नोकरी मिळाली पण हुद्दा मिळाला नाहीं, व राजकीय महत्त्व अजून नाहींच नाहीं. न्यायदानाचे अधिकारीहि सर्व पॅट्रिशियनच असत. त्यामुळें श्रेष्ठकनिष्ठांत वाद उत्पन्न झाला, किंवा ' प्लीबियन माणसाला ' पॅट्रिशियन ' सावकाराचें देणें झालें, किंवा त्याचा खंड थकला, तर ' पॅट्रिशियन ' न्यायाधीश प्रायः पॅट्रिशियन बाजूचाच निकाल देई.

शेवटीं ' प्लीबियन ' लोक हे गुलामगिरींतून मुक्त झाले तरी इतर सर्व रितींनीं असहाय असल्यामुळें त्यांनीं बंड केलें, व ते रोमशहर सोडून बाहेरच्या एका टेंकडीवर वसाहत करण्याला गेले. पण ' प्लीबिअन ' लोक वैतागून निघून गेले तरी त्यांना स्वतंत्र नगर किंवा नगर–राज्य स्थापितां आलें नाहीं. इकडे 'पॅट्रिशियन' लोकांचें, सैन्यभरती होईना यामुळें, अडलें. अशा दुहेरी अडचणमुळें समेट झाला. ' पोट आणि अवयव ' या

सुप्रसिद्ध नीतिकथेचा उपयोग मध्यस्थानें करून समेट असा घडविला कीं ' प्लीबिअन ' लोकांनीं परत यावें; सवत्या सुभ्याचा हट्ट सोडावा; पण त्यांचें रक्षण करण्याकरितां ट्रायब्यून नांवाचे दोन स्पेशल मॅजिस्ट्रेट सरकारनें नेमावे. हे मॅजिस्ट्रेट इतर मॅजिस्ट्रेटसारखे अधिकारी नव्हते. त्यांचें काम ' प्लीबिअन ' लोकांच्या तक्रारींची दाद लावून देणें एवढेंच होतें. हा रक्षणाचा अधिकार रोम शहरांत व त्याच्या बाहेर एक मैलपर्यंत अंमलांत असे. त्यापलीकडे ' पॅट्रिशियन ' तो पॅट्रिशियन व ' प्लीबिअन ' तो प्लीबिअनच ! यापुढची पायरी म्हणजे ट्रायब्यून अधिकाऱ्यांनीं ' प्लीबिअन ' लोकांच्या सभा बोलाविल्या तर त्या सरकारानें बंद करणें मना झालें. ' प्लीबिअनच्या ' तक्रारीवरून ' पॅट्रिशियन ' ला कांहीं शिक्षा झाली, तर ती अमलांत आणण्याचा अधिकार ट्रायब्यूनना देण्यांत आला.

यापुढील इतिहास सर्व सांगण्याचें कारण नाहीं. ख्रि. पू. पांचव्या शतकांत ' प्लीबिअन ' लोकांचीं बहुतेक दुःखें निवारण झालीं, आणि अथेन्समध्यें ज्याप्रमाणें ' सोलननें ' आपल्या सर्वाधिकारांत न्यायाला अनुसरून नवे कायदे केले, त्याचप्रमाणें रोममध्येंहि याकरितां दहा अधिकाऱ्यांचें एक मंडळ नेमून त्याजकडून विषमता नष्ट करण्यासारखे नवे कायदे करण्यांत आले.

## मिश्र लोकशाहीचें स्वरूप

जातां जातां एक गोष्ट लक्षांत ठेवावी कीं, लोकशाहीचें राज्य असलें तरी प्रसंगविशेषीं लोकांचें सामुदायिक शहाणपण कामास येत नाहींसें ठरून, कोणा एकाला किंवा अनेकांना राष्ट्रीय कलहाचा निकाल करण्याकरितां पूर्णाधिकारी म्हणजे ' डिक्टेटर ' नेमून द्यावें लागतें. म्हणून वरील दहा कलमी समेटाला पुढें आणखी दोन जोडण्यांत आलीं. हा बारा कलमांचा ठराव म्हणजे रोममधील श्रेष्ठ व कनिष्ठ यांच्यामधील कायदेशीर कायम राजकीय संबंधाचा तहच होय. त्याच्या योगानें कनिष्ठ लोकांचा प्रत्यक्ष व्यावहारिक राज्यकारभारांत प्रवेश झाला. ' कॉसल ' म्हणजे श्रेष्ठांचा मॅजिस्ट्रेट आणि ' ट्रायब्यून ' म्हणजे कनिष्ठांचा मॅजिस्ट्रेट हा अपमानकारक भेद नाहींसा होऊन, एकाच कायद्यानें श्रेष्ठ व कनिष्ठ यांचें जीवन बांधलें गेलें. राजकारणाचीं महत्त्वाचीं धोरणें ठरविण्यांत दोघांचीं मतें सारखींच घेण्यांत येऊं लागलीं. आणि लोकशाही स्वराज्याच्या कांहीं नमुन्यांत राजकीय पक्षांच्या घालमेलीवर सुराज्याची

प्रगति अवलंबून असते, तसें रोममध्यें येथपासून सुरू झालें. म्हणून इतिहासक या तहाला फार मान देतात.

याहिपुढें वरिष्ठांचे मॅजिस्ट्रेट वरिष्ठांच्या सभा बोलावून कायदे करीत, आणि कनिष्ठांचे मॅजिस्ट्रेट वेगळ्या जागीं वेगळ्या वेळीं अशाच सभा भरवून आपले कायदे करीत. परंतु हे कायदे एकाचे व हे दुसऱ्याचे हा भेद नाहींसा झाला. ( हल्लींहि कायदेमंडळाच्या दोन सभा असून, दोन निरनिराळ्या ठिकाणीं सभा होतात. पण मध्यवर्ति सरकाराच्या दृष्टीनें त्या ठरावांना कमी अधिक कायदे-शीरपणा नाहीं. ) यानंतर लष्करी खात्यांतील ' प्लीबिअन ' अधिकाऱ्यांना मुख्य सेनापतीच्याहि जागीं नेमतां यावें, हरकत राहूं नये, असा कायदाच झाला. पण ही सुधारणा एवढ्यानें पुरी झाली नाहीं. श्रेष्ठ व कनिष्ठ यांचे लग्नसंबंधहि सर्रास घडूं लागले. सार्वजनिक धर्मकृत्यांत दोघांनाहि सारखेंच स्थान प्राप्त झालें. 'प्लीबिअन' लोकाची संख्या हळू हळूं वाढूं लागली. 'पॅट्रीशियन' लोकवंशाच्या शाखा तुटत तुटत जाऊन, खानदानी रोडावली. या क्रमानें सुमारें चार शतकांचे अवधींत रोमच्या नगरराज्याला परिणत स्वरूप आलें. तें असें कीं, राजकीय व सामाजिक समाज यांची समव्याप्ति होऊन, तो एकजिनशी बनला. पूर्वी सर्व जमिनी पॅट्रि-शियन लोकांच्या मालकीच्या असून गुलामांना मजुरांसारखें राबवून ते एकटेच मोठमोठीं उत्पन्नें खात. परंतु आतां त्या, प्लीबिअन लोकांनाहि पूर्ण मालकी हक्कानें ताब्यांत ठेवून, वहिवाटतां येऊं लागल्या, यामुळें संपत्तीची वांटणी पुष्कळशी समानतेच्या पायावर येऊन बसली, व विषमतेचें हेंहि अंग नष्ट झालें.

## रोममधील वरिष्ठ सभा सीनेट

कित्येक इतिहासकारांच्या मतें लोकशाही ही अथेन्समध्यें जितकी खरोखर यशस्वी झाली तितकी रोममध्यें झाली नाहीं. मात्र एक गोष्ट दिसून आली कीं, लोकशाही राज्यघटनेंतून व व्यवहारांतून त्या त्या समाजांच्या स्वभावाप्रमाणें वेगवेगळ्या प्रकारची संस्कृति उदयास आली. लोकशाहीचें यश म्हणजे एकच एक प्रकारची कोणतीहि संस्कृति नव्हे. रोमन लोकांचा स्वभावच करडा, हिशेबी, कायदेशीर, शिस्तखोर यामुळें त्यांनीं 'सिव्हिल लॉ ' म्हणजे राजकीय समाजाची धारणा करणारा कायदा, उत्कर्षाला नेला; व तोच कायदा पुढें बहुतेक युरोपियन राष्ट्रांनीं गिरविलेला आढळतो. उलट ग्रीक लोकांचा स्वभाव ध्येयवादी, तत्त्वज्ञानप्रिय, कलेचा भोक्ता, पण या

सर्व गुणांमुळेंच व्यवहारांत किंचित् ढिला, यामुळें त्यांनीं युरोपला उच्च प्रकारचा बुद्धियोग शिकविला व भावनांची देणगी दिली. अथेन्स व रोम यांच्या लोकशाहींत गरम नरम असा फरक होता. अथेन्सची लोकशाही अधिक अस्सली, रोमची किंचित् नकली. अंतिम सत्ता दोनहि नगर–राज्यांत स्वतंत्र अशा लोकसमाजाकडेच होती, परंतु ग्रीक लोक अथेन्समध्यें व्यक्तिशः राज्य-कारभारांत प्रत्यक्ष असा भाग जितका घेत असत, तितका रोमन लोक घेत नसत. दुसरें असें कीं, रोमन लोकशाहींत राजसत्ता, वरिष्ठ सत्ता व कनिष्ठ सत्ता यांचें एक प्रकारें मिश्रण दिसतें. अथेन्समधील लोकशाही ही अन्तर्बाह्य 'डेमॉक्रसीच' होती. पण रोमनमधील लोकशाही बाह्यतः 'डेमॉक्रसी' पण अन्तरंगांत 'ऑलिगार्की' होती असा शेरा कित्येक ग्रंथकारांनीं मारलेला आढळतो. रोमन 'सीनेट' तीनशें सभासदांची असे. पण त्यांतील सभासद प्रत्यक्ष निवडणुकीनें होत नसत. तींतले सभासद पूर्वीं लोकांनीं निवडलेले मॅजिस्ट्रेट, कॉन्सल वगैरे असत. परंतु याद पक्की करावयाची ती अखेर कॉन्सलच्या पसंतीनें होई.त्याला जुन्या यादींत कमीजास्त करण्याचा अधिकार असे. सीनेटचा अध्यक्ष या नात्यानें 'कॉन्सल' किंवा 'प्रीटॉर' याला फार भारी अधिकार असत, व सीनेटर लोकांचे अभिप्राय घेण्याच्या कामीं व सभेपुढें काम ठेवण्याचे कामीं तो शिरजोरी करी. मात्र रोममधील ऑलिगार्की हीच संस्था लक्षांत घेतली तर ती केव्हांहि ग्रीसमधील ऑलिगार्कीपेक्षां अधिक नमुनेदार होती यांत शंका नाहीं. विलायतेमधील पार्लमेंट हें १७-१८ व्या शतकांत जितकें वरिष्ठ–वर्ग पक्षपाती तितकीच रोमन सीनेटहि असे. अशा प्रकारच्या सीनेट सभेचा सल्ला केव्हां घ्यावा केव्हां घेऊं नये ही गोष्ट रोमच्या मॅजिस्ट्रेटच्या हातीं असे. म्हणजे त्यानें सल्लाच न विचारला, सभाच न बोलाविली, तर ही वरिष्ठवर्ग–प्रतिबिंबक सभा काय करणार ! मॅजिस्ट्रेट लोकनियुक्त व लोकांच्या मनांत काय आहे हें ओळखून सीनेट न बोलावितां आपल्याच मनासारखा तो वागला तर या गोष्टीला रोमच्या राज्यघटनेंत वाव होता. पण सीनेट सभेंतील सभासद इतके वजनदार, इतके अभिजात, व इतके अनुभवी असत कीं त्यांचा सल्ला घेतल्याशिवाय कोणतेंहि काम करणें मॅजिस्ट्रेटला जडच जाणारें होतें.

रोमच्या लोकशाहींत सीनेटच्या हातीं सर्व सत्ता होती. कॉन्सल, ट्रायब्यून वगैरे मॅजिस्ट्रेट हे त्या सभेचे केवळ सेवक किंवा कार्यकारी हस्तक; आणि

सामान्य लोक किंवा जनता पाहावी तर ती अथेन्समधील जनतेप्रमाणें राज्यकारभारांत प्रत्यक्ष भाग न घेणारी. तात्पर्य, पुष्कळांच्या नांवानें गाजविली जाणारी सत्ता थोड्यांच्या हातीं असा रोमन लोकशाहीचा थाट होता. मग तिला 'लोकशाही' हें नांव कसें द्यावें! असा प्रश्न सहजच उपस्थित होतो. त्याचें उत्तर इतकेंच कीं, सत्ता आपण प्रत्यक्ष गाजवावी किंवा तेंच काम विश्वासानें दुसऱ्या कोणा चांगल्या हस्तकाकडून करवून घ्यावें, हें लोकशाहींतील लोकांनींच ठरवावयाचें असल्यामुळें, अथेन्सपेक्षां रोममध्यें लोकशाहीचा वेगळा नमुना दिसला तरी ती लोकशाही नव्हे असें म्हणतां येणार नाहीं. लोकांच्या इच्छेप्रमाणें राज्य चालणें याचेंच नांव 'लोकशाही'. रोमन लोकांची इच्छा राज्यकारभाराचें काम 'सीनेट' सभेकडून म्हणजे 'ऑलिगार्की'कडून (विशिष्ट-गुणमंडित शिष्टांकडून) करवून घ्यावें अशी होती' असें म्हटलें म्हणजे वाद संपला. एखाद्या दुकानाचा मालक उद्योगप्रिय असला तर तो पैन् पै हिशेब स्वतः पाहतो. एखादा किंचित् आळशी असला तर तो बरेंचसें काम विश्वासानें मुनिमावर सोंपवितो. पण दोघेहि आपल्या स्वतंत्र इच्छेप्रमाणें दुकान किंवा पेढी चालवीत असल्यामुळें ते मालकच होत. सीनेट सभेंत कर्तृत्ववान्, अनुभवी व शहाणे लोक होते. आणि परक्यांशीं सतत युद्धें करावीं, मुलूख मिळवावे, व नव्या मुलुखांतील वसाहत आबादानी करावी, हें जें जरूरीचें महत्त्वाचें काम त्यांत सामान्य जनतेपेक्षां सीनेटचेंच मत रोमनें अधिक ग्राह्य मानलें तर त्यांत रोमन लोकांच्या 'शाहीला' कमीपणा आला असें होत नाहीं. रोमन जनतेनें सीनेटवर विश्वास टाकावा अशीच सेनेटची योग्यता होती, असेंच तिच्या गुणांचें वर्णन इतिहासकारांनीं केलें आहे.

## सुवर्णमध्य व समतोलपणा

रोममधील सीनेट सभेचें वर्चस्व म्हणजे थोड्यांचें पुष्कळांवर वर्चस्व, शिष्टशाहीचें लोकशाहीवर वर्चस्व. पण त्या वर्चस्वाला नांवें ठेवण्याला फारशी जागा नव्हती. याच्या अगदीं उलट प्रकार ग्रीसमध्यें झाला. म्हणजे या 'ऑलिगार्की' नें 'डेमॉक्रसीचा' छळ व शेवटीं नाश केला. एक ऑलिगार्की अशी कां व दुसरी तशी कां याचें कारण कोण सांगणार? पण अशी गोष्ट होती खरी. ख्रि. पू. पांचव्या शतकांत अथेन्समध्यें ऑलिगार्कीनें (शिष्टशाहीनें) डोकें वर काढलें, आपसांतील चुरस वाढविली, इतकेंच नव्हे तर त्यानंतर अथेन्सला ज्या मोठमोठ्या युद्धांत

पडावें लागलें त्याचें कारण शिष्टांचा जनतेला विरोध. 'पेलोपोनेशियन' नामक एक मोठें युद्ध झालें त्यांत अथेन्सशिवायचीं इतर अनेक नगर-राज्यें दोन्ही बाजूंस होतीं. पण एकंदरीनें पाहतां या नगरराज्यांतील जनतेची सहानुभूति अथेन्सकडे व शिष्टांची सहानुभूति अथेन्सच्या शत्रूकडे होती ! या शिष्टांची दृष्टि नेहमीं संकुचित व स्वार्थी असे. लोकशाहीला ते पाण्यांत पाहत. आणि परकीय शत्रु बोलावून आणून त्याजकडून आपल्या राज्यांतील जनतेचा पराभव करून ती आपल्या अंकित करण्याचेच डाव या शिष्टांचे चालत. उलट रोमच्या सीनेटमधील शिष्टांनीं रोमच्या परकीय शत्रूंचें निवारण करण्याची मोठी कामगिरी केली. ग्रीक इतिहासकार थ्यूसिडीडिस यानें ग्रीक नगरराज्यांच्या नाशाच्या कारणाची पुष्कळ ममांसा केली आहे; त्यानंतर ॲरिस्टॉटल यानेंहि तीच गोष्ट मात्र इतिहासकाराच्या पद्धतीनें न करितां तत्त्ववेत्त्याच्या पद्धतीनें केली आहे. व्यावहारिक तत्त्वज्ञानांतील त्याचा मुख्य सिद्धांत हा कीं सत्य व सुयश हीं कोणत्याहि एका टोंकास गेलेल्या पक्षांत किंवा मतांत केव्हांहि आढळत नाहींत. तर तीं या दोहोंच्या मध्यें परस्परांचें योग्य प्रमाण साधणारा व संभाळणारा जो मध्यबिंदु त्या ठिकाणीं असतात. दिसण्यांत हा सिद्धांत निरर्थक किंवा वावदूकपणाचा दिसतो. पण त्यांत पुष्कळच सत्य आहे. कोणतीहि कला घेतली तरी तींत कोणत्याहि बाजूची फाजील अतिशयोक्ति वैगुण्य आणते. त्यापेक्षां नेमस्तपणा बरा, व यांतूनहि मध्यबिन्दु साधतां आला तर तो उत्तम. या बिंदूला ॲरिस्टॉटलनें ' सुवर्णमध्य ' असें नांव दिलें आहे. त्यावर पाय ठेवून स्थिर राहणें हें सोपें नसेल. पण सत्य हेंहि सोपें नाहींच. ॲरिस्टॉटलच्या मतें ग्रीक नगरराज्यांतील विरोधी पक्षांनीं आपल्या तत्त्वाची अतिशयोक्ति केली तेव्हांच त्यांचा नाश झाला. ऑलिगार्क पक्ष श्रीमान् व संपन्न म्हणून त्याला वाटे कीं, खरें शहाणपण काय तें आपल्याच अंगीं आहे. उलट कनिष्ठ वर्ग म्हणे कीं, " सर्वे गुणाः कांचनमाश्रयन्ते " ही गोष्ट खोटी. ऑलिगार्क लोक पुढारून प्रथम जागा व्यापून व आवळून बसले म्हणून तेच शहाणे ठरतात कीं काय ? ईश्वरानें आम्हालाहि शहाणपण दिलें आहे. आम्ही गरीब असलों म्हणून काय झालें ! " पण ॲरिस्टॉटल म्हणतो कनिष्ठ वर्गांची मजल एवढ्यावर थांबली नाहीं ! ते म्हणूं लागले, " श्रीमंत हे श्रीमंत म्हणूनच नादान." या उभयविध अपसिद्धांतांमुळें सर्व बिघडलें. आणि ' सोलन ' यानें जर हें बिघ-

डणारें कांहीं संभाळलें असलें तर, दोन्ही म्हणजे श्रेष्ठ कनिष्ठ वर्गाच्या हिताचें प्रमाण राखून मेळ बसविला म्हणून. आजहि जगांत तोच वाद सुरू आहे. 'सोशालिझम' म्हणजे 'समाजसत्तावाद' वरिष्ठ वर्गातील व्यक्तींच्या फाजील श्रीमंतीमुळें व दुर्गुणशीलतेमुळें निघाला. श्रीमंत हे सज्जन असते तरी त्यांजवळच्या श्रीमंतीबद्दल हेवा वाटून भांडण झालेंच असतें. पण एकांगी श्रीमंतींत श्रीमंतांची दुःशीलता भरीस मिळाल्यानें हल्लीं भांडवलशाहीविरुद्ध जोराचा हल्ला सुरू आहे. पण साम्यवादाचें नांव घेऊन सोशालिस्टांतलेच कांहीं लोक व पक्ष फाजील अतिशयोक्ति करणारे निघाले असून, व्यक्तीला मालकी हक्कानें स्वतंत्र उपभोगाची म्हणून संपत्तिच काय पण जीवनाच्या सामान्य गोष्टीहि मिळूं नयेत असेंहि ते प्रतिपादितात. ॲरिस्टॉटल याचें तत्त्वज्ञान हल्लींच्या लोकस्थितीला लावलें तर खरें राजकीय शहाणपण व अर्थशास्त्रीय यश हेंच ठरेल कीं, श्रीमंतांची श्रीमंती कांहीं प्रमाणानें कमी करून, गरीबांची संपन्नता कांहीं प्रमाणानें वाढवून, म्हणजे एकावर अवकृपा व दुसऱ्यावर कृपा यांचें योग्य प्रमाण संभाळून, विरोधी हितांचा मेळ घालणें हेंच कलहशांतीचें साधन ठरेल. तात्पर्य, नगरराज्यें झालीं काय व साम्राज्यें झालीं काय दोन्हींच्या यशापयशाला एकाच प्रकारचा मनुष्यस्वभाव जगभर कारण होतो. वर्गकलह म्हणजे एका वर्गानें आपलें वर्चस्व प्रस्थापिण्याकरितां व प्रतिपक्षी वर्गांवर सूड घेण्याकरितां तिसऱ्या कोणाची मदत घेऊन शेवटीं दोघांचेंहि अनहित करावें, ही गोष्ट जगाच्या राजकीय इतिहासांत सनातनच आहे म्हटली तरी चालेल. पण फरक म्हणून असा दाखवितां येईल कीं, आधुनिक काळीं वर्गकलह असला तरी पूर्वीसारखा व्यक्ति-कलह आहे असें म्हणतां येत नाहीं. नगर-राज्याचें क्षेत्र संकुचित यामुळें शत्रु म्हणून मानलेल्या पक्षांतील व्यक्तींची रोज गांठ पडावयाची, हमरीतुमरी व्हावयाची, आणि वर्गशत्रुत्व क्षणभर विसरलें जाऊन व्यक्तिशत्रुत्व हेंच प्रधान ठरावयाचें.

ॲरिस्टॉटलनें सुवर्णमध्य-छेदाशिवाय आणखी एक उपाय सांगितला तो 'शिक्षण' हा होय. शिक्षणामुळें व्यक्ति व वर्ग हे पुष्कळसे समानतेवर आपोआप येऊन बसण्यास मदत होते. शिक्षणाच्या उठावदारपणांत आर्थिक स्थिति व जातगोत हीं अगदींच लोपत नसलीं तरी हलकीं पडतात. पण ॲरिस्टॉटलला अभिप्रेत असलेलें शिक्षण हें एका विशेष हेतूनें द्यावयाचें होतें. तो हेतु म्हणजे

शिक्षणानें विकास पावणाऱ्या गुणांचा उपयोग स्वतःच्या व्यक्तीपेक्षां त्याच्या राष्ट्राला म्हणजे राज्याला अधिक कसा होईल हें पहाण्याचा होता. त्याचा गुरु प्लेटो यानें शिक्षणाची अशी व्याख्या केली नसती. ॲरिस्टॉटलनें अमुक एकच राज्यपद्धति चांगली म्हणून डोळ्यापुढें ठेविली होती व तीहि अनुभविलेली म्हणजे ग्रीक नगर–राज्यांतली. ॲरिस्टॉटलनंतर राष्ट्रीय राज्यांचे नमुने किती तरी नवे नवे झाले. अर्थात् शिक्षणही वेगवेगळ्या प्रकारचें अवश्य झालें पण शिक्षणाचा हेतु त्यानें पूर्वी जो सांगितला तो आजहि सर्वसंमत आहे. ॲरिस्टॉटलच्या मतें योग्य राष्ट्रीय शिक्षण दिलें असतां राष्ट्रांतील मध्यमवर्ग हा प्रबळ राहतो व तो तसा राहिला म्हणजे कनिष्ठ व वरिष्ठ वर्गांच्या फाजील महत्त्वाकांक्षेनें राज्यावर होणाऱ्या आघातांविरुद्ध योग्य ती प्रतिक्रिया हा मध्यमवर्ग निर्माण करतो. या दृष्टीनें पाहतां त्याची शिक्षणाची व्याख्या बरोबर असून त्याच्या 'सुवर्णमध्य' बिंदूच्या सिद्धांताप्रमाणें राष्ट्रीय शिक्षकानें मध्यमवर्ग सबळ ठेवून त्याजकडून राष्ट्राचें रक्षण करविणें हा राज्यविनाशाविरुद्ध उपाय होऊं शकतो हें आज देखील कोणीहि कबूल करील.

---

# २ राजकीय झोटिंगशाहीचा अवतार!

## लेखांक १ ला

[ १. झोटिंगशाही ही सनातन आहे. हल्लीं राजकारणांत तिचा फक्त एक नवा अवतार दृष्टीस पडत आहे. २. मानवी स्वातंत्र्याविषयीं गेल्या शतकांत उत्पन्न झालेली आशा फोल ठरणार कीं काय अशी शंका महायुद्धानंतरच्या अमेरिका, जर्मनी, रशिया, इटाली इत्यादि देशांतील परिस्थितीनें सहजच उत्पन्न झाली. परंतु झोटिंगशाही हें फक्त लोकशाहीला झालेल्या तात्पुरत्या विकृतीचें एक लक्षण आहे. ३. या विकृतीचीं कारणें सांगतां येण्यासारखीं आहेत. ४. ही विकृति कालांतरानें मधून मधून उमटणारी पण शमणारीहि असून एकंदरीनें मानवी स्वातंत्र्यबुद्धीचाच जय होणार यांत शंका नाहीं. ]

"Do you accept me free!"

"Free! Everybody has been free in France since 1789."

" The old platitude ! "

( ' Annette and Sylvie ' by Romain Rolland )

'**झोटिंग**' हा शब्द नवा नाहीं. फक्त राजकारणाच्या वाङ्मयांत 'झोटिंग-शाही' या शब्दाचा उपयोग नवा आहे. पण आधीं वस्तु सिद्ध होते; तद्दर्शक शब्द मागाहून घडविले जातात; आणि बराच काळ उपयोगांत आल्यावर ते रूढ होतात.

'झोटिंग' हा एक अमानुष प्राणी, भूत, पिशाच्च, समंध, वेताळ, या गणांतला आहे. 'झोंड' हा कदाचित् त्याचाच भाऊबंद असेल. या सर्वांचें स्थूल लक्षण असें कीं, ते मनुष्यप्राण्यांच्या मानगुटीला बसतात. त्यांना त्रास देतात. सहसा सोडीत नाहींत. सोडलेंच तर कांहीं बलिदान घेतल्यावर सोडतात. पण कांहीं तत्त्ववेत्ते त्यांचेंहि समर्थन करणारे आढळतात. ते म्हणतात– "मनुष्यांप्रमाणें त्यांनाहि ईश्वरच निर्माण करतो, आणि ईश्वर करतो तें सर्व चांगल्याकरितांच करतो." यामुळें झोटिंग हाहि अशाच कांहीं तरी चांगल्या हेतूनें उत्पन्न केला असावा !— अपराधी मनुष्यांना शिक्षा करण्याचीं ईश्वराचीं जीं अनेक साधनें आहेत त्यांपैकीं झोटिंग हें एक आहे."

## झोटिंग म्हणजे डिक्टेटर

इंग्रजी 'राज्यव्यवहार' कोशांत 'झोटिंग' याला 'डिक्टेटर व 'झोटिंगशाही' याला 'डिक्टेटरशिप' असे प्रतिशब्द आहेत. झोटिंगशहा हा पुराणपुरुष आहे. पण पुनर्जन्मानें आत्म्याला ज्याप्रमाणें निरनिराळीं नामरूपें लाभतात, त्याप्रमाणें राज-कारणाच्या इतिहासांत झोटिंगशहा हा देखील युगयुगांतरीं बहुरूपी अवतरला आहे. वर सांगितल्याप्रमाणें आधीं जन्म व मग नामकरण. त्याला अनुसरून गेल्या शतकांत आधुनिक 'डिक्टेटर' चा नवा जन्म झाला, पण त्याचा नामकरणविधि होण्यापूर्वीं बरींच वर्षें गेलीं. कारण नांव ठेवावयाचें तें एक मनाची हौस म्हणून किंवा गुण पाहून. डिक्टेटर हा वास्तविक कोणाला कधींच प्रिय म्हणजे हौस उत्पन्न करणारा नव्हता व असणारहि नाहीं. तो नामकरणापूर्वीं मरता तर राज-कारणी जगाला बरेंच वाटलें असतें. त्याच्या बारशाआधीं बारावें झालें असतें तर बरेंच होतें. पण तसें न घडतां तो चांगला खणखणीत आक्रोश करूं लागला, लाथा झाडूं लागला, आणि जगूनवांचून पुढें नांवारूपाला येणार, कारकिर्द गाजव-

णार असें दिसून आल्यावर जाणत्यांनीं त्याचें नांव गुणावरून (डिक्टेटर) झोटिंगशहा असें ठेविलें !

प्राचीन झोटिंगशाही 'रक्ताच्या बळावर' आधारलेली होती, म्हणजे 'रक्तानें जडणारा कुटुंबांतील नात्याचा संबंध', हेंच प्रथम अधिकाराचें अधिष्ठान होतें. अर्वाचीन झोटिंगशाहीदेखील रक्ताच्या बळावरच आधारलेली दिसते. पण तें रक्त एकाच कुटुंबांत जन्माला आलेल्या नात्याचें नव्हे, तर खून कत्तल केलेल्या लोकांच्या अंगांतून वाहाणारें ! जुन्या युगांत नातें हा सर्व-सत्ताधारित्वाचा आधार, तर नव्या युगांत लष्करी पाशवी शक्ति हा आधार. "प्रेमी बाप किंवा नवरा हा मुलाला व बायकोला मारीत असेलच. तसाच झोटिंगहि लोकांना झोडतो यांत काय विशेष ! त्यालाहि त्या व्यक्तींचें नसलें तरी राष्ट्राचें प्रेम आहेच कीं नाहीं !" असें या खुना-कत्तलींचें समर्थन करण्यांत येतें. हेतु शुद्ध असला म्हणजे मग साधनें कशींहि सदोष असलीं तरी हरकत नाहीं, असाहि झोटिंगशाहीच्या समर्थनाचा दुसरा एक प्रकार असतो.

डिक्टेटर (झोटिंगशहा) हा दिसण्यांत केवळ आपल्या इच्छेनुसार इतरांना हुकूम सोडतो; व ते त्यांना जुलमी वाटले तरी पाशवी शक्तीच्या बळावर किंवा दहशतीवर अमलांत आणण्यास लावतो. मग असला हा अतिमानुष प्राणी गेल्या शतकांतच प्रथम जन्माला आला कीं काय ? नाहीं. हा त्याच्या आत्म्याचा पुनर्जन्म आहे, फक्त त्याचा वेष व रूप हीं वेगळीं आहेत. तो एक नमुनाच आहे. पण 'न्यारा नमुना' आहे ! मानवी समाजाच्या इतिहासाच्या साहाय्यानें त्याच्या जन्मांतराची ओळख पटते.

या झोटिंगशाहीचे प्रकार कालक्रमानें सांगावयाचे तर ते असे—१ बाबाशाही, २ पाटीलशाही, ३ गुरुशाही, ४ उमरावशाही, ५ राजशाही, ६ लोकशाही, ७ झोटिंगशाही. बाबाशाहीमध्यें बाप किंवा कुटुंबाचा पुढारी हा सत्ताधारी असतो. अनेक कुळें व गोतें मिळून जो समाज बनतो त्यांतला सत्ताधारी पाटील. त्याचा अधिकार ती पाटीलशाही. यानंतर समाज हा कुळगोतांच्या पलीकडे गेला तेव्हां प्रथम धर्मगुरु हा सत्ताधारी झाला. समाजामध्यें श्रेष्ठ व कनिष्ठ हे भेद स्पष्ट झाले तेव्हां प्रथम श्रेष्ठ लोक म्हणजे उमराव हे कनिष्ठांवर सत्ताधीश झाले. मग त्यांतूनच राजपद निर्माण झालें; तेव्हां सर्व सत्ता राजाकडे गेली. त्या प्रकाराचें नांव राजशाही. यानंतर गेलीं शेंदीडशें वर्षें लोकशाही प्रभावी झाली. पण तिचें राज्य

अजून संपलें नाहीं तों इतक्यांत एका नव्याच 'शाही' प्रकाराचा जन्म झाला. तिचें नांव झोटिंगशाही! युरोपखंडाच्या एका निम्या म्हणजे पश्चिम भागांत लोकशाही वरचढ आहे; पण दुसऱ्या निम्या म्हणजे पूर्व भागांत झोटिंगशाही (डिक्टेटरशिप) आज वरचढ आहे. अमेरिकेंत दोनहि प्रकार एकत्र नांदत आहेत. हिंदुस्थानांत लोकशाही नुकती कोठें उदयाला येऊं पाहात आहे, पण तोंच झोटिंगशाहीचे गुणानुवाद ऐकूं येऊं लागले आहेत! हेन्री ब्रेल्सफर्ड यानें खालीलप्रमाणें उद्गार काढले आहेत.

"हिंदुस्थान लोकशाहीविषयीं कितीहि प्रेम दाखवो, पण त्याला आपल्या इच्छेनुरूप आपली राजकीय प्रगति करतां आली तर, हिंदी लोकदेखील 'डिक्टेटरशिप' अमलांत आणतील असा संभव आहे. म्हणजे देशांत काँग्रेससारखा एक मुख्य राजकीय पक्ष, त्याचा एकच मुख्य पुढारी, त्याला सर्व अधिकार, त्याच्या हुकुमाला माथा लववून सर्वस्वीं मान्यता, आणि त्या पुढाऱ्याला स्फूर्ति मिळावयाची ती लोकसमाजाकडून नाहीं, तर प्रत्यक्ष ईश्वराकडून! अशा थाटाची 'डिक्टेटरशिप' (झोटिंगशाही) हिंदुस्थान पसंत करील असा संभव आहे. कारण आज राष्ट्रीय सभा आत्मिक बलाचे गोडवे कितीहि गावो, पण राष्ट्रीय ऐक्य एकाच पक्षाच्या द्वारें घडवून आणावयाचें, आणि त्या कामीं लोकशाहींतील मतामतांच्या गलबल्याची भानगड ठेवावयाची नाहीं, असा प्रयत्न करणारे लोक जसे इतर देशांतून आज आढळतात, तसेच ते हिंदुस्थानांतहि आहेतच."

मि. ब्रेल्सफर्ड यांना हें कदाचित् माहित नसेल कीं, राष्ट्रीयसभेनें कायदेभंग चळवळीच्या कामींच नव्हे, तर कायदेभंगाची चळवळ चालू नसतांहि, वर्किंग कमिटीच्या ठरावानें एकदां डिक्टेटर नेमला होता. स्वतः महात्मा गांधी उघड म्हणतातच कीं, "सत्याग्रहाच्या चळवळीचें तंत्र मला एकट्यालाच कळतें. मीं एकट्यानें तें चालविलें तरी स्वराज्य मिळूं शकेल. काँग्रेसशीं माझा मतभेद झाला तर मी माझ्या एकट्या व्यक्तीचा एक स्वतंत्र पक्ष ठेवून काम करीन." या सर्व गोष्टी एकत्र केल्या असतां ब्रेल्सफर्ड यांचें वरील म्हणणें खरें ठरतें.

मग जगांतील मानवी स्वतंत्रता नष्टच झाली म्हणावयाचें कीं काय? तिचें भवितव्य काय? याचें खरें उत्तर असें आहे.

"त्या बिचारीचें कसलें भवितव्य! स्वतंत्रता ही परब्रह्माची मुलगी आणि ईश्वराची सख्खी बहीण आहे. ती अनादि आहे. अनंत आहे. तिला अवस्था-

त्रयीची बाधा नाहीं. ग्रहांची पीडा नाहीं. तिची सगुण उपासना करूं पाहणारांनींच आपापल्या पत्रिका मधूनमधून तपासून पहाव्या ! "

मानवी समाज हा ब्रह्माप्रमाणें सच्चिदानंदस्वरूप आहे. त्याला सत्ता म्हणजे अस्तित्व आहे. चैतन्य म्हणजे जीवन आहे. आनंदहि आहे, पण या आनंदाचें स्वरूप मात्र नेहमीं चंचल व संशयग्रस्त राहतें. कारण तो आनंद त्याच्या इच्छास्वातंत्र्याच्या सफलतेवर अवलंबून आहे. ही सफलता पूर्ण झाली असें त्याला केव्हांहि वाटत नाहीं ! आणि तें खरेंच आहे. पण या अपूर्णतेमुळें त्याचें वर्णन 'मिजास बादशाहाची आणि नांदणूक कैकाड्याची' या ग्राम्य म्हणीप्रमाणेंच केव्हांहि करावें लागतें.

बुद्धिस्वातंत्र्य, आणि इच्छास्वातंत्र्य, यांची चिकित्सा आर्यतत्त्वज्ञानी लोकांनीं पुष्कळ केलेली आहे. पण ती व्यष्टिरूप आत्म्यासंबंधानें. आत्म्याचें सामुदायिक किंवा सामाजिक स्वरूप त्यांनीं मानिलें नाहीं. परम व्यष्टि व परम समष्टि हींच तत्त्वें त्याच्या मतें अखंड अबाधित. पण अलीकडे यांच्या मध्यंतरीं व्यक्तींचे लहानमोठे समुदाय यदृच्छेनें स्थलपरत्वें, कालपरत्वें बनूं शकतात. या समुदायांना समाज किंवा राष्ट्रें म्हणतात. मानवी स्वातंत्र्याच्या प्रगतीचा ठाव मोजण्याचें किंवा हिशोब करण्याचें काम हल्लीं पाश्चात्य राष्ट्रांतील विचारवंतांकडून नेटानें सुरू झालें आहे. त्यांत कांहींना ताळेबंदांत तूट दिसून आली आहे. कांहींना धोका दिसून आला आहे.

## दोन दृश्यें

आगगाडी जोरानें चालूं असली म्हणजे आंतील उतारू झोंपी जातात; पण ती मध्येंच एकदम कोठें थांबली म्हणजे, शरीराला फारसा धक्का न बसतांहि, ते जागे होतात. आणि खिडकीबाहेर तोंड काढून, आसपासच्या खुणा न्याहाळून, आपण कोठेंसें आहों याचा ते अदमास घेतात. तशी स्थिति आज युरोप-अमेरिका खंडांची झाली आहे. कांहीं काळापूर्वीं त्यांची अशी पूर्ण खात्री होती कीं आपण स्वतंत्रतेच्या सरळ राजमार्गावर वेगानें आक्रमण करीत आहों. या भावनेंत तीं झोपीं गेलीं. पण महायुद्धापासून तीं खडबडून जागीं झालीं असून " आपापलें सामान ' संभाळलें गेलें आहे कीं नाहीं, हें बाकाखालीं चाचपून पाहूं लागलीं आहेत. कोठें कांहींतरी अपघात व दगा असावा असा संशय येऊन तीं

चिंताग्रस्त झालीं आहेत. हिरव्या तांबड्या कंदिलांचा गोंधळ उडालेला दिसतो. जोराजोरानें शिट्या वाजलेल्या ऐकूं येतात. पण त्यांचा अर्थ कळत नाहीं. आणि खिडकीबाहेर तोंड काढलें तरी खऱ्या प्रकाराचा उलगडा करून सांगेल असा कोणी अधिकारी त्यांच्या नजरेस पडत नाहीं !

आणि अपघात तर झाला आहे खराच ! स्वातंत्र्याच्या आगगाडीच्या मार्गावरील रूळ मध्येंच कोणीं उखडून टाकले आहेत, गाडी थांबविण्यांत आली आहे, आणि चोर दरवडेखोर वावरावे तशी गडबड धांवपळ ऐकूं येत आहे. चोरण्यासारखा सर्वांत भारी माल स्वातंत्र्याचा ! त्याच्या चोरीचा बोभाटा सुरू आहे. मानवी समाजाला स्वातंत्र्य आहे कीं नाहीं या चिकित्सेपुढें जाऊन, तें त्याला असावेंच कीं नाहीं याचाहि वाद ऐकूं येऊं लागला आहे !

पण दुसऱ्या कांहीं लोकांना हें अपघाताचें दृश्य पटत नाहीं. त्यांच्या मनाची भूमिका निराशेची नसल्यामुळें त्यांना असें वाटतें कीं, गडबड धांदल गर्दी अव्यवस्था दिसते खरी; पण ती होऊं घातलेल्या कांहीं विधायक कार्याकरितां चाललेली आहे. त्यांना दृश्य दिसतें तें असें कीं– "एखादी नवी प्रचंड इमारत बांधण्याचें काम सुरू आहे. यामुळें सहजच तेथें वरील प्रकार सुरू आहेत. जुन्या इमारती धडाधड कोसळून पडल्या जात आहेत. धूळ चोहोंकडे पसरली आहे. दगड पडत आहेत. त्याखालीं मधून मधून कामकरी सांपडत आहेत. त्यांना इजा होत आहे. जवळच परांच्यांचे मजल्यावर मजले चढत आहेत. मळलेल्या चुन्याचे डोंगर उभारले जात आहेत. दगड कापण्याचीं यंत्रें सुरू असून त्यांच्या कर्कश आवाजांनीं कानठाळ्या बसत आहेत आणि त्यांतच अधिकारी मेस्त्री वगैरे लोक हाताखालच्या कामगारांच्या कानाशीं तोंड नेऊन किंवा दुरून आपले दोनहि हात तोंडाशीं धरून त्यांमधून हुकूम सोडत आहेत, सूचना करीत आहेत, मोठमोठ्या क्रेन्स चक्राकार फिरत असून अवजड सामान किंवा तुळवटें इकडून तिकडे किंवा खालून वर चढवीत आहेत. ऐरणीवर प्रचंड घणांचे घाव पडत आहेत आणि लांब अंतरावर टेबल मांडून, त्यांवर नकाशे पसरून, मुख्य इंजिनिअर मोजमापें घेत आहेत किंवा रेघोट्या ओढीत आहेत ही सर्व घालमेल खरीच. या दंग्याधोप्यानें मन सहजच गोंधळून जातें. पण अजून अदृश्य असलेली नवीन इमारत प्रतिभासंपन्न मनुष्याच्या कल्पनेला आजहि स्पष्ट दिसूं शकते. हा गोंधळ कांहीं वेळ सोसला म्हणजे आपण पूर्वीपेक्षां मोठ्या अधिक चांगल्या इमारतींचे

मालक होऊन त्यांत नांदणार आहों, हा दृढ विश्वास त्याला आनंद देण्याला समर्थ होतो. "

मग या दोन परस्पर विरोधी दृश्यांपैकीं खरें कोणचें मानावयाचें ? याचें उत्तर दोन्हीं दृश्यें खरींच आहेत; पण जसें ज्याचें मन तसें त्याला दिसेल. स्वातंत्र्याच्या प्रगतीच्या सरळ वाटेंत अडथळा व गोंधळ उत्पन्न होणार आहे हें खरें; पण त्यामुळें पुढची वाट कायमची बंद होणार असें होत नाहीं. एखाद्या नदीवरचा पूल ढासळल्यावर तो फिरून नवा बांधण्याचें काम होत असतांना नदीच्या पात्रांतून, म्हणजे चिखल, वाळू, दगड, पाणी यांतूनच वळण घेऊन तात्पुरता रस्ता काढून द्यावा लागतो. त्याचप्रमाणें स्वातंत्र्याच्या प्रवासाला नवा पूल बांधून द्यावयाचा आहे, म्हणून परतंत्रतेंतून तात्पुरती वळणाची वाट काढून दिली जात आहे. म्हणूनच लोकशाहीचें स्वरूप तात्पुरतें लोपून तेथें झोटिंगशाहीचें स्वरूप प्रगट झालें आहे.

## आजची स्थिति

गेल्या पांचचार शतकांत सुधारणेची जी प्रगति झाली तिला केवळ भौतिक बाजू होती असें नाहीं तर मानसिक, आध्यात्मिक अशीहि बाजू होती. त्या बाजूचीं दोन प्रमुख अंगें म्हणजे ( १ ) तार्किक चिकित्सक बुद्धीची वाढ, आणि ( २ ) माणसामाणसांतील समानतेच्या दर्जाची वाढ. या वाढींच्या प्रत्यक्ष दृश्याला स्वातंत्र्य हें नांव मिळून तें रूढ झालें आहे. व्यक्तिस्वातंत्र्यांत, शरीरस्वातंत्र्य व बुद्धिस्वातंत्र्य हीं येतात. व्यक्तिस्वातंत्र्य प्रस्थापित झाल्याचा एक पुरावा हा कीं, गुलामगिरी कायद्यानें नष्ट करण्यांत आली. बुद्धिस्वातंत्र्याचा पुरावा हा कीं, धर्म-मताकरितां होणारा छळ थांबला. कोणाहि व्यक्तीला आपलें मत मोकळ्या मनानें लिहितां बोलतां येऊं लागलें. तसेंच कोणीं आपली बुद्धिकल्पकता चालवून कांहीं क्लृप्ति काढली, साहसाचा उद्योग केला, तर त्यापासून मिळालेला पैसा त्याला स्वतःचा म्हणून ठेवतां व उपभोगितां येऊं लागला. जें स्वातंत्र्य व्यक्तीला तें व्यक्तिसमुदायालाहि असावें, हें ओघानेंच प्राप्त होतें. त्याप्रमाणें वर्ग, संघ, समुदाय इत्यादि बनवून त्यांच्या जोरावर मतप्रतिपादन व मतप्रस्थापन होऊं लागलें आणि व्यक्ति-स्वातंत्र्य व समुदायस्वातंत्र्य, यांच्या जोरावर राजकारण सिद्ध होऊन राज्यघटना बनूं लागल्या.

पण आतां पाहावें तों उलट्या बाजूनें या स्वातंत्र्याला प्रत्येक अंगानें आळा पडूं लागला आहे. कसें तें पहा. जुनी गुलामगिरी कायद्यानें नष्ट केली, पण तिच्या

जागीं कायद्यानेंच एका नव्या प्रकारची गुलामगिरी अमलांत आणली आहे. ज्या उद्योगाकरितां सरकारी परवानाच काढावा लागतो, असे उद्योग शेंकड्यांनीं दाखवितां येतील. आणि परवाना म्हणजे त्यांत उद्योग करणारानें पाळावयाच्या अशा शेकडों अटी असतात; व त्या न पाळल्या तर मनुष्य शिक्षेला, दंडाला पात्र होतो. राजकारणाच्या व्यवहारांत तर कायद्याचें निमित्त सांगून मनुष्याला पकडावें व बंदींत ठेवावें, याला सीमाच उरलेली नाहीं. हा व्यक्तिस्वातंत्र्यनाश मनुष्यानें एखादा परवाना काढून त्यांतील अटी मोडल्या म्हणून होतो असेंहि नाहीं; तर अराजनिष्ठा, राजद्रोह या तात्त्विक कल्पनांच्या मर्यादा बेसुमार वाढविल्या जाऊन, बाह्य आचरणाचा पुरावा नसतांहि केवळ संशयानें मनुष्याला पकडून कैदेत ठेवण्याची सरकारी रीत जणूं कांहीं रूढ झाली आहे. याचें प्रत्यंतर हेंच कीं, आज अनेक राष्ट्रांतील तुरुंग राजकीय कैद्यांनीं भरून गेलेले आढळतात. कांहीं ठिकाणीं तर राजकीय कैद्यांच्या गर्दीचा समावेश व्हावा म्हणून, सामाजिक नैतिक गुन्हे केलेल्या कैद्यांना शिक्षेची मुदत भरण्यापूर्वींच सोडून देण्यांत येतें ! अलीकडे एका काळीं हिंदुस्थानांत सुमारें अर्धा पाऊण लाख राजकीय कैदी प्रत्यक्ष तुरुंगांत किंवा नजरकैदेंत होते. १९३३ च्या डिसेंबरांत जपानमधील १५० प्रमुख तुरुंगांतून ६५००० राजकीय कैदी होते अशी माहिती मिळते. आणि याचें कारण "जपान क्रॉनिकल" पत्रानें 'राजकीय मतांचा छळ' असें लिहिलें आहे. कम्यूनिस्ट असल्याच्या संशयावरून १९२८ सालीं जपानी सरकारनें सुमारें साडेअठराशें लोक कैदेंत ठेविले होते; त्यांची संख्या १९३२ सालीं सव्वानऊ हजारांपर्यंत गेली. त्यांत सुमारें दरसाल ४००० कैद्यांची भर पडत आहे. यांच्यावर प्रत्यक्ष घातपाताचा असा म्हणावा तर कांहींच आरोप नसतो. फक्त सरकारला न आवडणारीं राजकीय व अर्थशास्त्रीय मतें मनांत बाळगण्याचा किंवा प्रतिपादण्याचा असतो ! टोकिओ म्युनिसिपालटींत मनाची तपासणी करणारा निरीक्षक ( थॉट इन्स्पेक्टर ) अशी एक अधिकाराची जागा अलीकडे निर्माण करण्यांत आली आहे असें म्हणतात ! युगोस्लाव्हिया, पोलंड, ऑस्ट्रिया या देशांत सरकारविरुद्ध कोणतेंहि मत शिक्षेला पात्र होतें. जर्मनीनें तर सर्वांवर ताण केली आहे. १९३४ च्या जानेवारी महिन्यांत सुमारें पाऊण लाख लोक, सरकारविरोधी मतांकरितांहि नव्हे तर केवळ अमुक एका जातींत किंवा मानववंशांत जन्मल्याबद्दल तुरुंगांत डांबलेले होते ! या लोकांना अत्यंत निष्ठुरतेनें

वागविण्यांत येतें. इतकें कीं ते त्या मानानें अमेरिकेंतील गुलामांचे जुने धनी बरे म्हणावे लागतात. गुप्त पोलिसांचें जाळें व कारभार तर इतके पसरलेले आहेत कीं प्रत्येक नागरिकाला आपणांवर सरकारी गुपित फोडल्याचा आरोप येऊन केव्हां तुरुंगांत जावें लागेल याचा नेम नाहीं असें समजून वागावें लागतें!

## यदृच्छा-पारतंत्र्य

आतां मनुष्यसमुदायांच्या स्वातंत्र्यहानीचा आणखी एक प्रकार पहा! महा-युद्धानंतर जगांतील सर्व राष्ट्रें जितकीं एकजीव झालीं तितकीं तीं पूर्वी केव्हांहि नव्हतीं, हें मत सर्वमान्य आहे. पण एकजीव म्हणजे परस्परावलंबी हें विसरून चालणार नाहीं! सियाममधील जुळ्या भावंडांची जोडी प्रसिद्ध आहे. या जोडींत दोन शरीरें वेगवेगळीं पण कुशीच्या बाजूनें एकमेकाला चिकटलेलीं होतीं. यामुळें त्यांचें पोषण एकाच द्वारें होई. पण त्याबरोबर दोघांना हालणें, चालणें, विश्रांति घेणें हीं सर्व एकाच तंत्रानें करावीं लागत. फक्त दोन शरीरें एकजीव होऊन सांधल्याची ही अडचण, मग अनेक शरीरें एकत्र जोडलीं तर त्याची अडचण किती होईल, याची कल्पना सहज करतां येते! रावणाला दहा तोंडें होतीं. पण त्याचा व्यवहार बहुधा एकाच तोंडानें होत असावा असें पुराणावरून दिसतें. कारण पुराणवर्णनांत असें आढळत नाहीं कीं तबलातरंगामध्यें तबलेवाला निरनिराळे सूर काढण्याकरतां मधून मधून निरानिराळ्या तबल्यांवर थाप देतो त्याप्रमाणें रावण हा शिवाला स्तुतिवचनांचें गान पहिल्या तोंडानें ऐकवी, आपल्या सेवक राक्षसांना शिव्यांची लाखोली दुसऱ्या तोंडानें वाही, किंवा सीतेची प्रणययाचना तिसऱ्या तोंडानें करी! तात्पर्य, नऊ तोंडांचा उपयोग होण्यापेक्षां त्याला तीं अड-चण होत असावीं; शरीराचें नियमित प्रमाण सुटलें म्हणजे कोणालाहि अशी अड-चण व्हावयाची हें उघड आहे. तीच गोष्ट राष्ट्रांची!

होतांहोईतों सजातीय व सहानुभवी अशा लोकांचें सुटें वेगवेगळें राष्ट्र असलें म्हणजे तें कारभाराला साईचें असतें. पण अलीकडे राष्ट्रांची रचना अशी झाली आहे कीं, तींत हें सजातीयत्व व सहानुभावित्व आढळत नाहीं. आगगा-डीच्या वॅगनच्या लहानशा जागेंत बेसुमार गर्दी करून मेंढरें व कुत्रीं डांबून भरावीं! आणि तसें झालें म्हणजे एकाच्या पायाला दुसऱ्याचें तोंड लागतें. दुसरा तिस-ऱ्याच्या अंगावर भार टाकून रेलतो, चवथा पांचव्याला शिंगांनीं ढुशा मारतो किंवा दातांनीं कुरतडतो अशी स्थिति होते. नवीन राष्ट्रघटना अशाच प्रकारची झाली

आहे. आणि वरील उदाहरणांतील मालगाडी एकदम चालू झाली, किंवा एकदम थांबली, किंवा वळणावर धक्के खात खात चालली, तर वॅगनमधील प्राण्यांची जी अवस्था होईल तीच नवीन संघटनेंतील राष्ट्रव्यक्तींची होत आहे. याचें उत्तम उदाहरण आज बाजारांतील निष्कारण होणाऱ्या बेसुमार तेजीमंदीचें होय. कोण कुठला अमेरिकेंतला सट्टेबाज, आणि कोण कुठला हिंदुस्थानांतील घोंगड्या शेतकरी! कुठें पॅसिफिक महासागराच्या एका कोपऱ्यांत उठलेलें युद्धाच्या वार्तेचें वादळ आणि कुठें मुंबईचा सराफ कट्टा ! कुठें रशियांतल्या किंवा ऑस्ट्रेलियांतल्या गव्हाचें पिक, आणि कुठें पंजाबी खेड्यांतल्या बाजारांतील भाजी ? पण हजारों मैलांवरचे भूकंपाचे धाक्के हवामानाच्या कचेरींतील नाजूक यंत्रांतील सुईला भलें मोठें चक्कर घ्यावयाला लावतात, त्याप्रमाणें जगाच्या एका टोंकांतील संघटित वासनेची उठावणी दुसऱ्या टोंकाच्या संघटित व्यवहाराला गद्‌गदा हालवूं लागली आहे. कोण हें यदृच्छापारतंत्र्य ?

अशा रीतीनें समाजांतील व्यक्तींचें, राष्ट्रांतील समाजांचें, व जगांतील राष्ट्रांचें व्यष्टित्व किंवा पिंडत्व बिघडूं लागलें आहे. सर्व प्रकारचा एकजिनसीपणा नाहींसा होऊं लागला आहे. मग हें स्थित्यंतर कशानें घडून आलें ? तर भौतिक सुधारणांच्या वाढीनें, असेंच उत्तर द्यावें लागतें. पण एका बाजूनें होणाऱ्या सुधारणेच्या ह्या वाढीला दुसऱ्या बाजूनें किती किंमत, केवढा मोबदला द्यावा लागला आहे हें विसरून चालावयाचें नाहीं.

पण स्वेच्छापारतंत्र्याचाहि एक प्रकार घडत आहे व तो डिक्टेटर आणि झोटिंगशहा यांच्यामुळें. कसा तें पहा !

## इटालीचें उदाहरण

तारीख १८ मार्च १९३४ रोजीं इटालियन सर्वाधिकारी मुसोलिनी यानें रोम येथील ऑपेरा हाऊसमध्यें खालील भाषण केलें:——

“ सन १९२९ पासून फॅसिझम ( एकतंत्रीय राज्यपद्धति ) जगभर पसरली आहे. चोहोंकडे पाहिल्यास हेंच दिसेल कीं, गतशतकांतील उदारमतवाद नष्ट झाला आहे, त्याचे वैभवाचे दिवस एकवेळ होते, आतां त्याचें काय ? इतिहास प्रगतिशील असतो. त्याच्या मार्गांत जे येतील त्यांना उलथून पाडून तो पुढें चालतो. लोकशाही, समाजसत्ता, उदारमतवादित्व, फ्रीमेसनरी म्हणजे मनोमनसाक्षित्व, यांचें युग संपलें असें समजा! राजकारण, अर्थशास्त्र यांत एक नवा सिद्धांत

उदयाला येत आहे. तीच नवयुगांतील सुधारणा व संस्कृति. तो सिद्धांत म्हटला म्हणजे, समाजाच्या गरजा कोणत्या व त्या कशा पुरवाव्या हें ओळखण्याचा व तें पूर्ण अमलांत आणण्याचा पूर्ण हक्क राष्ट्रीय सरकारला पूर्वी होता. व मध्यंतरीं तो लोपला. पण इटालीचें सरकार ( म्हणजे मी ! ) तो पुन्हां प्रस्थापित करणार. "

फॅसिझमच्या या सिद्धांताची मूळ कल्पना जर्मन तत्त्ववेत्ता हेगेल याच्या शिकवणीनें प्रथम प्रतिष्ठा पावली. त्यानें सरकाराला देव बनविलें. तो म्हणे कीं, "शरीरांतून एखादा रक्तबिंदु किंवा बीजकण वेगळा काढून ठेवतां येत नाहीं त्याप्रमाणें व्यक्ति ही राष्ट्रांतून बाहेर पडून टिकूं शकणार नाहीं. राष्ट्रांतील राजसत्ता प्रबळ ठेवणें हेंच साध्य व हेंच साधन. सरकार हें कोणत्याहि प्रजाजनापेक्षां मोठें आहेच; पण सर्व लोकसमुदायापेक्षांहि मोठें आहे. " जुने राजे लोक " संस्थान किंवा राज्य तें आम्हीच " असें म्हणत, तेव्हां ते फक्त राजकयि अधिकारापुरता हक्क सांगत. पण नव्या युगांतला ' डिक्टेटर, ' एकतंत्री सर्वाधिकारी, हा नसत्या राजकीय सत्तेवर हक्क सांगून थांबत नाहीं. तर राष्ट्राचा धर्म, राष्ट्राचें आर्थिक जीवन, किंबहुना कला व कौटुंबिक जीवन, यांचेंहि नियंत्रण करण्याचा हक्क सांगतो. एकाद्या राष्ट्रांत परंपरागत जुनें राजपद ठेवल्यानें कारभार अधिक सुरळीत होण्याचा संभव असेल तर डिक्टेटर इटालींतील राजपदाप्रमाणें तें राहूं देईल. पण आपल्या हातचें बाहुलें म्हणून.

## अमेरिकेचें उदाहरण

आतां अमेरिकेकडे वळूं. डी टॉकेव्हिली नामक एक फ्रेंच इतिहासकार होऊन गेला. अमेरिकेंतील लोकशाहीवरील त्याचें पुस्तक जगप्रसिद्ध आहे. तें शंभर वर्षांपूर्वी लिहिलें गेलें. त्यापूर्वी सुमारें पन्नास वर्षें अमेरिकेंतील लोकसत्ताक राज्याची स्थापना झाली होती. या अवधींत अमेरिकन लोकशाहीनें प्रगट केलेल्या गुणांचें कौतुक त्यानें केलें आहे. पण त्याबरोबर त्यानें पुढील काळाविषयीं जी एक भीति प्रगट करून ठेवली ती आज अमेरिकेंत अनुभवाला येत आहे ! या पुस्तकांत तो म्हणतो--" अमेरिकेंत असतांनाच मीं हें पाहिलें कीं, तेथें लोकसत्ता चालू झाली खरी; पण तिची रचना अशी कांहीं दिसते कीं, तिजमधून अगदीं दुसऱ्या टोंकाला जाणारी जुलमी एकतंत्री राज्यपद्धतिहि कायदेशीरपणें निघूं शकेल. लोकसत्ताक म्हणविणाऱ्या राष्ट्रांपुढें उद्यां असा कांहीं जुलूम वाढून ठेविलेला दिसतो कीं, तसा पूर्वी केव्हां कोणत्या राजशाहींतहि झाला नसेल. जुन्या राजांनीं

सत्ता गाजविली असेल, पण लोकांच्या कुटुंबव्यवस्थेंत तरी हात घातला नव्हता. पण आधुनिक लोकशाहीचें म्हणविणारें सरकार लोकांकरितां जुलमानें काय करूं पाहातें हें सांगण्यापेक्षां काय करूं पाहात नाहीं हें विचारणें अधिक बरें! लोकांचें संरक्षण, त्यांचीं सुखदुःखें, त्यांच्या गरजा, त्यांचे उद्योगधंदे, त्यांचे वारशाचे हक्क, या सर्वांची व्यवस्था लावण्याचा मक्ता आम्हांकडे आहे असें सरकार म्हणूं लागलें आहे. म्हणजे प्रत्यक्ष आपला जीव जगविणें व बुद्धि बसल्या जागीं चालविणें एवढाच काय तो अधिकार व्यक्तिमात्राकडे उरणार, असें भावी चिन्ह दिसतें.

" नव्या जुलमाची रीती जुन्या जुलुमापेक्षां थोडी वेगळी आहे इतकेंच काय तें. नव्या व्यवस्थेंत व्यक्तिमात्राची इच्छाशक्ति नष्ट केलेली नाहीं. पण, भोंकांतून तार ओढून मऊ लवचीक व हवी तिकडे वळवितां येण्यासारखी बनवावी त्याप्रमाणें लोकांची इच्छाशक्ति बनविण्यांत येत आहे. व्यक्तिमात्रानें अमुक करावें अशी जुलुमाची विधायक वेठ त्यांजवर लादली जात नाहीं--म्हणजे त्यानें अमुकच करावें अशी आज्ञा त्याला केली जात नाहीं-पण हें करूं नको, तें करूं नको असें निषेधपर आज्ञांचें जाळें इतकें बारीक व दाट विणून त्याच्याभोंवतीं रचण्यांत येतें कीं, त्यांत त्याचा पाय पडलाच पाहिजे; व पडला कीं, तो गुंतलाच पाहिजे. यामुळें मनुष्यमात्राचें व्यक्तित्व हळू हळू नाहींसें होतें. त्याच्या अंगांतील रग निघून जाते. तो संशयग्रस्त किंबहुना भ्रमिष्टहि होतो. आणि मग लोकसत्ताक राज्यांतील लोक म्हणजे केवळ मेंढ्यांचा कळप ! आणि सर्वाधिकारी डिक्टेटर हा हातांत काठी व बरोबर खवीस कुत्रा घेऊन त्याच्यामागें चालणारा मेंढपाळ असा प्रकार होतो ! "

आज ब्रिटिश सत्तेमुळें हिंदुस्थानांत देशी राजे म्हणविणाऱ्यांची जी स्थिति तीच जर्मनी किंवा इटाली किंवा अमेरिका या लोकशाहीच्या देशांत हिटलर, मुसोलिनी व रूझवेल्ट यांच्या अमलाखालील लोकांची झाली आहे. पण या कळपांतील मेंढ्यांचा, डी टॉकेव्हिली यानें म्हटल्याप्रमाणें, एक गुण खरा. तो हा कीं, आमचा मेंढपाळ आज आम्हीच नेमतों ! हेंच आमच्या इच्छास्वातंत्र्याचें साफल्य ! जुन्या काळीं आमचे राजे आम्ही कोठें नेमीत अगर निवडीत होतों ? नव्या डिक्टेटरानें आमच्या गळ्याभोंवतीं गुलामगिरीचा पट्टा व सांखळी बांधली आहे हें खरें. पण डिक्टेटर पहा किती सज्जन तो ! त्यानें त्या सांखळीचें शेपूट आमच्या हातीं दिलें आहे. हें सांखळीचें टोंक हातांत देणें म्हणजे मधून मधून होणारी लोकप्रति-

निधींची निवडणूक. पण निवडणूक एक दिवसाची, जुलूम तीन वर्षें किंवा पांच वर्षें ठेवलेला.

लोकसत्तेचा कळस अमेरिकेंत झाला असें मानण्यांत येतें. पण १९३४ च्या मे मध्यें अमेरिकन सेनेटर बोऱ्हा यानें तेथील सेनेटमध्यें भाषण केलें त्यांत, आज अध्यक्ष रूझवेल्ट यांचे हातून लोकशाहीची कशी थट्टा सुरू आहे याचें समर्पक वर्णन केलेलें आढळतें.

तो म्हणतोः—"अमेरिकेची राज्यघटना जी एकदां झाली ती राज्यकर्ते व प्रजाजन दोघांना सारखीच बंधनकारक असली पाहिजे. अडचणीच्या प्रसंगाची सबब सांगून ती बाजूला ठेवून अध्यक्षानेंहि वागतां कामा नये. पण त्याविरुद्ध आज रोजचा क्रम सुरू आहे. अडचणी काय रोजच्याच आहेत. त्या नव्हत्या केव्हां? पहिली घटना तयार झाली त्या वेळीं अडचण होती तशी अडचण दुसरी कधीं तरी असेल काय! अडचणीचा परिहार करण्याचे मार्ग राज्यघटनेंतच दाखवून दिलेले आहेत. ते न अनुसरितां सबंध घटनाच बाजूला ठेवणें ही नुसती अरेरावी होय! राज्यघटनेंतील सगळे अधिकार अध्यक्षाला काय एका शब्दानें देतां येतात. आणि 'अहो, हें अधिकारदान केवळ तात्पुरतें आहे,' असेंहि भाष्य त्यावर करतां येतें. पण हा तात्पुरतेपणा खरा ठरत नाहीं. शिवाय अनिष्ट दाखला दुसरीं पडतो तो वेगळाच. पूर्वीं प्रेसिडेंट हूव्हर यांनीं हे अधिकार कसे गाजविले, माहितच आहे. आणि आतां अध्यक्ष रूझवेल्ट यांनीं त्याच्यावर ताण केली आहे! सर्वाधिकारित्वाचा दाखला प्रथम पडतो तेव्हां तो कोणी खिजगणतींत घेत नाहीं; पण दाखल्यास दाखले जोडून त्यांचें रान इतकें माजतें कीं, तें मग तोडायला कठीण जातें. उगमाजवळ नदी इतकी लहान असते कीं, लहान मूलहि ती ओलांडून जाऊं शकतें. पण पुढें ती मोठी होऊन फोफावूं लागली म्हणजे आपल्या पुरानें शेतें, घरेदारें बुडवून टाकते, प्राणहानि करिते. आणि अशा नद्यांमुळें मोठमोठीं खंडेंहि दुभागलीं जातात.

"फॅसिस्ट, कम्यूनिस्ट, नाझी इत्यादि जुलुमाचे भोक्ते यांनीं आज सर्वत्र आपल्या हातीं एकतंत्री सत्ता घेऊन जुलूम व गुलामगिरी यांच्या नद्यांचे असेच पूर वाहविले आहेत. लोकतंत्र राज्यघटनेंत जें स्वातंत्र्य संभाळलें जातें त्याचेच हे वैरी असल्यामुळें; त्यांनीं या राज्यपद्धतीलाच दूषणें ठेवण्याचें काम सुरू ठेविलें आहे. विचारवंत व बुद्धियोगी लोक अशा जुलुमाला मनांतून कधींहि संमति देत नाहींत.

पण सत्तेच्या सांखळ्यांनीं लोकमत जेथें तेथें आवळून जखडून राहिलें आहे. त्याची गळचेपी इतकी झाली आहे कीं, त्याच्या तोंडून शब्दहि निघत नाहीं.

" डिक्टेटर लोक हे जुन्या जुलमी राजांचे सख्खे भाऊ होत. आज फॅसिस्ट लोक उघड सांगतात कीं, स्वातंत्र्य म्हणजे तें एक निव्वळ कुजलेलें प्रेत आहे. वॉशिंग्टन व लिंकन यांना डिक्टेटर होतां आलें असतें, पण ती गोष्ट त्यांनीं केली नाहीं. आणि आजहि जो अमेरिकन प्रजाजन लोकशाहीकरितां झगडेल त्याकरितां ह्या दोन अमेरिकन देशभक्तांजवळ जागा राखून ठेविलेली आहे. "

## इंग्लंडांतील स्थिति

इंग्लंडमध्यें देखील डिक्टेटरशिपची कल्पना अजून सिद्ध झाली नाहीं, पण वावरत आहेच. सुप्रसिद्ध इटालियन देशभक्त गॅरिबॉल्डी यानें ८० वर्षांपूर्वी रोमवर स्वारी केली. त्यावेळीं राजसत्तेच्या तत्त्वाला चांगलेंच तेज चढलें. पण गॅरिबॉल्डी हा स्वतःला देशभक्त पण राजसेवक मानीत होता. खुद्द इंग्लंडांत तर राजसत्ता लोकप्रिय होती. यामुळें गॅरिबॉल्डीचा पंथ विलायतेंत स्थापन झाला व त्यांनीं काळे डगले वापरले, तरी त्यांतून डिक्टेटरशिपचा ध्वनि निघाला नाहीं. त्यानंतर इंग्लंडांत काळे डगले हा गणवेश करणाऱ्या आणखी तीन संस्था निघाल्या. त्यांतीलच अगदीं अलीकडची म्हणजे सन १९३२ सालीं लॉर्ड कर्झन यांचे जांवई सर ऑसवॉल्ड मॉस्ले यांनीं स्थापलेली. या चारहि संस्थांचें उद्दिष्ट पार्लमेंटबाहेर राहून व स्वतंत्र पक्ष म्हणून, चळवळ करणें हें आहे. त्यांचा सिद्धांत असाः-- " विलायतेंतील पार्लमेंटरी पद्धत आतां निरुपयोगी, निकामी झालेली असून, देशोद्धार करूं पाहाणारांनीं त्या किचकट यंत्रांतून आपलें अंग काढून घेतलें पाहिजे. आणि राजकारण अधिक प्रगमनशील व यशस्वी होईल असें वळण बाहेरून लाविलें पाहिजे. मग हें वळण कसें लावावयाचें ? पार्लमेंट व प्रधानमंडळ यांच्या हातीं सर्व सत्ता. पोलीस, लष्कर, आरमार हीं त्याच्याच हुकमतीखालीं ! तथापि या स्वतंत्र पक्षानें तीव्र चळवळ करून लोकमत आपलें केल्यास त्याचा आसर प्रधानमंडळावर पडेल; व शिस्त राखणारें आरमार व सैन्य हीं देखील प्रधानमंडळाला आंतून कानगोष्टी सांगूं लागतील. मग प्रधानमंडळानें स्वतंत्र पक्षाचें धोरण मान्य केलें तर ठीक, नाहीं तर मुळींच रक्तपात न होतां, किंवा तो थोडाबहुत होऊन, राज्यक्रांति होईल. "

मग या स्वतंत्र पक्षावर आक्षेप असा कीं, तुमच्यांतच दहांचीं दहा मतें झालीं

तर ! त्यावर उत्तर असें कीं, दहांचीं दहा मतें होण्याचें टळावें म्हणूनच तर पक्षाचा अध्यक्ष नेमावयाचा व त्याला सर्व सत्ता एकतंत्री द्यावयाची. बरें, हा असा नवा पक्ष व एकतंत्री अध्यक्ष नेमण्यापेक्षां गादीवर आहे त्या राजालाच ती सत्ता द्यावी ! कारण राजेलोक देखील पार्लमेंटच्या नियंत्रणाला मनांतून नाराजच असतात. पण त्यावर त्यांचें उत्तर असें कीं, राजे एका अर्थानें लोकमान्य खरे; पण ते देशभक्त नसतात, त्याला काय करावें ? एका मराठी कवीनें म्हटल्याप्रमाणें, " देशोदेशीं दळें बुद्बळें राजे कसे जाहले. " राजे लोकांत नवीन गोष्ट स्वीकारण्याची पात्रता नाहीं. लोकांत मिसळून न वागल्यानें त्यांना लोकांच्या खऱ्या आकांक्षा कळत नाहींत. शिवाय आहे तें वैभव सांभाळून मग देशभक्तीचा काय तो पराक्रम करावा असें सावधपणाचें त्यांचें धोरण असतें ! उलट डिक्टेटर म्हणजे कसा तो पहा. समुद्रांतून उसळी मारून देवमासा वर डोकें काढतो, व तें पहातांच इतर सर्व मासे त्याला वाट देण्याकरितां दूर पळून जातात, त्याप्रमाणें डिक्टेटर हा उदयोन्मुख झाला म्हणजे त्याच्या देशभक्तीच्या तेजानें दिपून जाऊन सगळे रूढ व सांप्रदायिक राजकीय पक्ष बाजूला सरतात. त्याला आगा नसतो, पीछा नसतो. तो दरिद्री असाच जन्माला येतो व दरिद्री राहण्यांतच तो भूषण मानतो. लोकांचे खांदे हेंच त्याचें सिंहासन. आणि अंगावरचा काळा डगला हेंच त्याचें वैभव. तो प्रायः सरकारी छळ सोसून, तुरुंगवास सोसून, तावून सुलाखून बाहेर पडलेला असतो. हे गुण राजांत कसे येणार ? अर्थात् जुन्या राजांतील हे इतर सर्व वैगुण्य काढून टाकावे, आणि एकतंत्री अंमल चालविण्याची शक्ति व पात्रता एवढाच गुण शिल्लक ठेवून पर्यायानें नवें राज्यपद सिद्ध करावें. मात्र जुन्या राजांप्रमाणें डिक्टेटरची गादी पिढीजात राहाणार नाहीं. कदाचित् तो आपल्या आयुष्यांतच अप्रिय ठरून राजीनामा देईल, किंवा मारला जाईल, पण त्याच्या स्वाभाविक मृत्यूनें तरी त्याची जागा मोकळी होईल, आणि स्वतंत्र पक्षाला हवा तो अध्यक्ष नवा नेमतां येईल.

मॉस्ले यानें स्थापिलेल्या नव्या पक्षाला इंग्लंडांत अजून फारसें पाठबळ मिळालेलें नाहीं. शिवाय त्याचें ज्ञान, शहाणपणा, हेतु किंवा कर्तृत्व याविषयीं देखील जाणत्या माणसांना आदर वाटत नाहीं. विलायतेंत आज एका टोंकाला लॉर्ड रॉदरमियर सारखे कट्टे कॉन्झर्व्हेटिव व साम्राज्यवादी, व दुसऱ्या टोंकाला मॅक्स्टन सारखे कट्टे समाजसत्तावादी कम्यूनिस्ट आहेत. मॉस्ले याचा फॅसिझम्

स्वीकारला जाईल तर तो कॉन्झर्व्हेटिव्ह पक्षांतील कट्टरांकडूनच. पण याविषयींहि निराशा झालेली आहे. गेल्या जुलै महिन्यांत मॉस्ले व रॉद्रमियर यांचा पत्रव्यवहार होऊन ही गोष्ट निकालांत निघाल्यासारखी झाली आहे. रॉद्रमियर यांनीं मॉस्ले याला खालीलप्रमाणें लिहिलें आहेः—

“ फॅसिस्ट हें नांव धारण करणारी कोणतीहि संघटना इंग्लंडांत यशस्वी होणार नाहीं असें मला वाटतें. अशा संघटनेला मीं पाठिंबा देऊं शकत नाहीं हें तुम्हांला समक्ष सांगितलेंच आहे. ज्यू लोकांविषयींचें तुमचें शत्रुत्व आम्हांला मान्य नाहीं. डिक्टेटर उत्पन्न करणें हा हेतु आम्हांला पसंत नाहीं. किंवा पार्लमेंटांतील पक्षोपपक्ष मोडून पार्लमेंट ही ‘ कॉर्पोरेटेड ’ म्हणजे एकमुखी लोकसभा करणें हें आम्हांला पसंत नाहीं. जर्मनी व इटाली या देशांची स्थिति वेगळी, आपल्या इंग्लंडची वेगळी आहे. ”

मॅक्स्टन व मॉस्ले या दोघांनाहि पार्लमेंटरी पद्धतीचा वीट आला आहे. दोघांनाहि नांवाचें पार्लमेंट असून खरी सत्ता एकमुखी एकतंत्री हवी. पण मॅक्स्टनला जीं कम्यूनिझमचीं तत्त्वें प्रिय वाटतात, त्याच्या अगदीं विरुद्ध मॉस्ले यांना भांडवलशाहीचीं तत्त्वें प्रिय वाटतात. मॉस्ले हा पूर्वीं मजूरपक्षांत होता, व मजूरवर्गाची स्थिति सुधारावी ही गोष्ट त्याला इष्ट वाटते. पण मॅक्स्टनप्रमाणें सर्व राजकीय व आर्थिक सत्ता केवळ मजूरवर्गाच्या हातीं देण्याला तो तयार नाहीं. मॉस्लेला पार्लमेंटचें सगळें सोंग हवें. त्याला लोकांनीं निवडून दिलेलें चालेल. त्याच्या कारभारी मंडळांतील प्रधान हेहि पार्लमेंटचे सभासद असावेत. पण या पार्लमेंटनें त्या पक्षाला, म्हणजे त्याच्या अध्यक्षाला, कारभार हवा तसा करण्याची कायमची सुपारी देऊन ठेवावी ! मॉस्ले यानें प्रत्येक राजकीय पक्षांतील थोडथोडें उचललेलें आहे. त्यामुळें प्रत्येक पक्षांतलीं चारदोन माणसें त्याच्या पाठीमागें असलेलीं दिसतात.

“जर्मनी इटली यांचें अनुकरण आम्ही करणार नाहीं. आमचा डिक्टेटरशिपचा नमुना खास विलायती राहील,” असें मॉस्ले वरचेवर म्हणतो. पण त्याची प्रत्यक्ष कृती थोडीशी हिटलरशाहीसारखी दिसते. म्हणजे हाताखालीं गुंडांचें सैन्य जमवून धाडस, धडाडी व धैर्य या तीन प्रकारांच्या धक्क्यानें प्रतिपक्षाच्या सभा उधळून लावणें, गर्दी मारामारी करणें, ही रीत त्यानें अनुसरलेली दिसते. गुंड व मवाली यांच्या टोळक्याला हळूच डिक्टेटरच्या बॉडीगार्डचें म्हणजे व्यक्तिसंरक्षक

सैन्याचें स्वरूप येतें आणि मग तेंच टोळकें हळू हळू राष्ट्रीय सैन्य असें स्वतःला म्हणवूं लागतें. गॅरिबॉल्डीनें प्रथम निवडक शंभर काळे डगलेवाले स्वयंसेवक जमविले; व त्यांचेंच पुढें विस्तृत रूपांतर होऊन, स्वतः इटलीच्या राजानें रोम काबीज करण्याला त्यांचा उपयोग करून घेतला. पण ही क्लृप्ति फार जुनी आहे. प्लेटो यानें २००० वर्षांपूर्वी सॉक्रेटिसचे संवाद लिहिले. त्यांतील एक इंग्रजी उतारा इंग्रजी जाणणाऱ्यांकरितां खालीं दिला दिला आहे.

"Then comes the famous request for a body-guard which is the device of all those who have got thus far in their career as dictator—"Let not the people's friend," as they say, "be lost to them" ... But once he has overthrown his many rivals, this same friend is to be seen standing up in the chariot of the State with the reins in his hand, no longer leader but dictator asbolute."

वरील स्थूल वर्णनावरून, मानवी स्वातंत्र्याच्या प्रगतीला धक्के कसे बसत आहेत, धोके कसे उत्पन्न होत आहेत, हें दिसून येईल. दोरी वळीत वळीत वाढविली जात असतां तिला मध्येंच गांठी पडाव्या त्याप्रमाणें झोटिंगशाहीनें लोकसत्तेची स्थिति होते. पण असें होण्याला कारणें काय घडतात, त्याची चर्चा करून पढील लेखांत हा विषय संपविण्यांत येईल.

## लेखांक २ रा

With rare exceptions, culture, truth, and thought as such no longer exist on the Continent of Europe. There is only Communist culture, Nazi truth, Fascist thought. In a word, and the most appropriate word has been said by Dean Inge, "these new dictatorships have arrogated to themselves a power over men's minds unprecedented in history." They are "far more tyrannical, more searching in their inquisitorial methods, than the rule of any Czar, Sultan, or Emperor."

C. E. M. JOAD

"When therefore you hear men ask if that which is called the Future belongs to liberty, you must answer that liberty has still better, the Eternal."

BENEDETTO CROCE

या विषयावरील मागील लेखांत अमेरिका व इटली इत्यादि देशांमध्यें राजकीय झोटिंगशाहीचा ( डिक्टेटरशिपचा ) अवतार कसा झाला आहे हें सांगितलें. जर्मनी व रशिया यांतील झोटिंगशाही प्रसिद्धच असल्यामुळें तिजविषयीं लिहून जागा अडविली नाहीं. इंग्लंडचें उदाहरण अशाकरितां दिलें कीं, जेथें या नव्या कल्पनेचें बीज कांहीं लोकांच्या मनांत पेरलें गेलेलें आहे, तरी पण जेथें त्यानें अजून मूळ धरिलें नाहीं, असा तो एक लोकसत्ताक देश उदाहरण म्हणून देण्यासारखा आहे. फ्रान्सची स्थिति झोटिंगशाहीचा अवतार होण्याला इंग्लंडपेक्षां अधिक अनुकूल आहे; परंतु तेथेंहि या कल्पनेनें अद्यापि मूळ धरिलेलें दिसत नाहीं. अशा रितीनें बारीक नजरेनें छाननी करीत गेल्यास असें आढळेल कीं, राजकीय झोटिंगशाहीचा अवतार सिद्ध झाला आहे अशा देशांची संख्या जगांत आज पुष्कळच असून, जेथें शुद्ध स्वरूपांत लोकशाही नांदत आहे असे देश आज थोडे आहेत. परंतु उलटसुलट उदाहरणें देत न बसतां झोटिंगशाहीच्या कल्पनेचा उदय होण्याचीं कारणें काय आहेत हें थोडक्यांत पाहूं.

या चिकित्सेंत प्रथम नित्यनैमित्तिक हा भेद लक्षांत ठेविला पाहिजे. जगांत अनेक राष्ट्रांमध्यें झोटिंगशाहीचें तत्त्व आज एकाच वेळीं उदय पावलेलें दिसतें, ही गोष्ट अर्थातच "नैमित्तिक" या सदरांत घातली पाहिजे. म्हणजे कांहीं 'विशेष कारणां'चाच तो 'विशेष परिणाम' आहे. पैकीं एक विशेष कारण महायुद्ध व त्यानंतरची विपरीत व पूर्वी अननुभूत अशी परिस्थिति हें होय. महायुद्धानें पुष्कळच गोष्टींची उलथापालथ झाली, व फिरून जुनी घडी पूर्ववत् बसलेली नाहीं. राष्ट्राराष्ट्रांतील द्वेष, एकमेकांना एकमेकांविषयीं वाटणारी भीति व संशय, यांची परमावधि झाली. महायुद्धांत अनेक राष्ट्रांची एक पिढीच्या पिढी गारद झाली. हत्यार चालविण्यांत, व हत्त्या करण्यांत, सुधारलेला मनुष्य रानटी मनुष्याइतका क्रूर बनूं शकतो, हें उघड दिसून आलें. अनेक पिढ्यांच्या डोक्यानें न उचलला जाईल असा कर्जाचा बोजा युद्धांतील उधळपट्टीमुळें जनतेच्या मानगुटीस बसला. उपसलेली तरवार पुन्हा म्यानांत परत गेलीच नाहीं. आणि ती चालविण्याला योग्य असें लष्करी शिक्षण

आबालवृद्धांना देण्यांत येत आहे. घातक साधनांची निर्मिती गुप्तपणें किंवा भलते बहाणे दाखवून सुरू ठेवण्यांत आली आहे. नवीन रणक्षेत्रांची योजना मनांत होऊन त्यांच्या आसपास हल्ल्यांच्या साधनांची जुळवाजुळव होत आहे. व्यापाराची वाहतुक व प्रवास यांच्याकरितां उपयोगांत येणारी विमानविद्या, युद्धाला उपयोगी पडावी म्हणून त्याला जुळती करून घेण्यांत येत आहे. रसायन शाळा आणि यंत्रशाळा यांचा उपयोग दारूगोळा व हत्यारें निर्माण करण्याकडे चुटकीसरसा करतां यावा अशा योजना कल्पक डोकीं करीत आहेत. जगभर कृत्रिम पैशाचा पूर आला तो ओसरल्यावर आतां मालाच्या किंमती बेसुमार घटून अर्धें म्हणजे धनोत्पादक व्यापारी जग दिवाळखोरीच्या कांठाला येऊन पोंचलें आहे, तर दुसरें अर्धें म्हणजे गिऱ्हाइकी जग इतर कारणांनीं बेकार बनून उपासमारी सोशीत आहे.

इतकी विपरीत स्थिति, आणि जगांतील अनेक राष्ट्रांना एकाच वेळीं भोंवणारी, अशी गोष्ट जगाच्या इतिहासांत पूर्वीं केव्हांहि घडून आली नव्हती असें तज्ज्ञांचें मत आहे; अर्थात् रोग जसा विलक्षण तसा त्यावरील उपायहि विलक्षणच असणार. अशा प्रकारचा विलक्षण उपाय म्हणून 'डिक्टेटर'ला लोकांकडून मान्यता देण्यांत आली आहे. त्यांना असें वाटतें कीं, कोणी तरी 'त्राता' म्हणून भेटल्याशिवाय या विपरीत स्थितींतून सुटका होणार नाहीं. ईश्वरी अवताराच्या अंगीं जसे गुण असतात तसेच या ऐहिक त्रात्याच्या अंगीं असणार. हा त्राता नेहमींच्या डोळ्यांनीं निवडून पारखून काढतां येत नाहीं. त्याला दिव्य दृष्टीची गरज असते. ही दिव्य दृष्टि ईश्वरी प्रेरणेनें होते. आणि त्याचें प्रत्यंतर असें कीं, या त्रात्याचा अवतार होण्याच्या वेळेपर्यंत पूर्वीं जे पुढारी, नेते लोकांच्या डोळ्यांपुढें वावरत होते, त्यांतून एखाद्यावर ही दृष्टि न पडतां अज्ञात अशा एखाद्या देशभक्तावर ती अचानक पडावी, आणि तोच आपला त्राता होईल अशी भावना जनतेच्या मनांत अकल्पित रितीनें उत्पन्न व्हावी!

अलीकडील इतिहासांत नेपोलियन, लेनिन, मुसोलिनी व हिटलर हे अशाच रीतीनें अवतारासारखे प्रगट झाले नाहींत काय! फ्रेंच राज्यक्रांति होऊन अराजक जन्मले. त्यांतून साधा लष्करी कॉरपोरल असलेला नेपोलियन उदयाला आला. आणि प्रथम सेनापति, मग कॉन्सल व लगेच बादशहा झालाच

कीं नाहीं ? युरोपांतील इतर राष्ट्रांच्या शत्रुत्वामुळें पुढें नेपोलियनचा पाडाव झाला हें निराळें; पण अखेरपर्यंत तो स्वतः फ्रेंच लोकांना मान्य व प्रिय राहिला ही गोष्ट कांहीं खोटी नाहीं. आणि त्यानेंहि पण पहिल्या अमदानींत फ्रेंच सैन्य दिग्विजयी करून, राज्यव्यवस्था ठाकठीक करून, फ्रान्सला कीर्ति मिळवून दिली व जगाचे डोळे दिपविलेच कीं नाहीं! हें अवतार कृत्यच होय. लेनिननेंहि अराजकतेंतून उदयाला येऊन एक खरोखर नवा राष्ट्रधर्म निर्माण करून रशियाचें रक्षण केलें; इतकेंच नव्हे तर जगाला त्याची भीति वाटावी इतकें रशियाला प्रबळ केलें. मुसोलिनीचा अवतार केवळ अराजकांतून झाला नाहीं. परंतु लेनिनप्रमाणेंच तो पूर्वी अज्ञात होता, व तुरुंगवासांत त्यानें कांहीं दिवस घालविले होते. हिटलरचीहि तीच गोष्ट-दहा वर्षांपूर्वी ज्याचें नांवहि ऐकूं येत नव्हतें, व इतर अनेक लोकांप्रमाणें ज्यानें तुरुंगांतील कैदी म्हणून संकटाचे दिवस काढले, तो आज जर्मनीचा अनभिषिक्त राजा व्हावा ही गोष्ट सामान्य नियमांनीं घडून कशी येणार? अवतारांचा जन्म तुरुंगवासांत व्हावा हा ईश्वरी संकेत असल्याप्रमाणेंच इतिहासांत मधून मधून आढळून येतो. आपल्या पुराणांत तरी श्रीकृष्णाचा जन्महि तुरुंगवासांतच झाला कीं नाहीं ?

पण डिक्टेटररूपीं या अवतारासंबंधानें एक गोष्ट सांगितली पाहिजे. ती ही कीं, त्यांना जनतेचें भरभक्कम पाठबळ असतें. एरवीं त्यांच्या हातून विद्यमान राजे बादशाह इत्यादि सत्ताधाऱ्यांचा पाडाव होऊं शकत नाहीं. तसेंच ज्याला त्यांचें अवतारकृत्य म्हणतां येईल, अशी एखादी नवी आर्थिक किंवा राजकीय योजना जी ते प्रवर्तित करितात, ती जनतेंत एरवीं प्रस्थापित होत नाहीं. जुन्या राजवटींच्या इतिहासांत, स्वतः कांहीं राजांनीं किंवा त्यांच्या कृपेमुळें त्यांचे कोणी प्रधान किंवा सचिव किंवा मंत्री यांनींहि अशीच अनिरुद्ध सत्ता गाजविली म्हणजे तेहि वस्तुतः डिक्टेटरच होऊन गेले. परंतु त्यांना जनतेचें पाठबळ होतें असें म्हणतां येत नाहीं. ते जनतेला अप्रिय असतां, त्यांना उलथून पाडावें अशी जनतेची मनीषा असतां, तो पराक्रम करण्याला जनता असमर्थ ठरली असेंच म्हणावें लागतें. पण वर ज्या आधुनिक चार डिक्टेटरांचीं नांवें दिलीं आहेत त्या प्रत्येकाला असा दावा सांगतां आला आहे कीं, " मी डिक्टेटर झालों तो जनतेच्या बळावर ! " सन १८१४ सालीं नूतन वर्ष दिनाच्या समारंभानिमित्त नेपोलियननें दरबार भरविला,

तेव्हां लोकप्रतिनिधींच्या शिष्टमंडळानें लोकांतर्फे म्हणून त्याचें अभिनंदन केलें. तेव्हां त्यानें शिष्टमंडळाला उद्देशून भाषण केलें. त्यांत खालील वाक्यें होतीं म्हणतात—

" काय ? तुम्ही स्वतःला लोकप्रतिनिधी म्हणवतां ! कोण म्हणतो तुम्हांला लोकप्रतिनिधि ? खरा लोकप्रतिनिधी मी आहें ! अखिल राष्ट्रानें मला एक सोडून चार वेळां पुढारी म्हणून निमंत्रण केलें. चार वेळां पन्नास लक्ष लोकांचीं मतें माझ्या बाजूला पडलीं. तेव्हां लोकांच्या वतीनें बोलण्याचा खरा हक्क मला आहे, तुम्हाला नाहीं, असें मी कां म्हणूं नय ? "

हिटलरचीहि गोष्ट अशीच आहे. ता. ३० जानेवारी १९३३ रोजीं हिटलरला जर्मन चान्सेलर नेमण्यांत आलें. त्यानंतर जर्मन पार्लमेंटच्या नव्या निवडणुकी झाल्या. त्यांत हिटलरच्या बाजूला शेंकडा सुमारें ९० मतें पडलीं. मुसोलिनीला निवडणुकींत किती मतें पडलीं हें माहित नाहीं. परंतु त्याच्याहि सत्ता धारित्वाचा आधार जनता हीच आहे. फॅसिझमच्या तत्त्वांचें प्रतिपादन करणारा एक तात्त्विक ग्रंथ मुसोलिनी यानें लिहिला आहे, त्यांत तो म्हणतो " ( Fascismo ) फॅसिस्मो हाच लोकसत्तेचा, लोकशाहीचा शुद्ध अस्सल प्रकार आहे. मात्र लोकांनीं हा शब्द संख्यावाचक न मानतां गुणवाचक मानिला पाहिजे." याचा अर्थ असा कीं जनतेची इच्छा म्हणतात ती किती लोकांच्या तोंडून प्रगट झाली हें शिरगणतीनें मोजावयाचें नसतें. कारण कित्येक वेळां ती इच्छा कांहीं थोड्या व्यक्तींच्या रूपानें किंवा प्रसंगविशेषीं एखाद्या व्यक्तीच्याच रूपानें अवतरूं शकते. मुसोलिनीच्या सत्ताप्रकाराला ' फॅसिझम ' हें नांव आहे तर हिटलरच्या सत्ताप्रकाराला ( नॅशनल सोशियालिझम ) ' राष्ट्रीय समाजसत्तावाद ' हें नांव आहे. त्याचा अर्थ म्हणून एका जर्मन प्रोफेसरानें खालील व्याख्या केली आहे.

" True representation is the personification of the will of the people in a representative Who feels himself to be one with the people."

म्हणजे " जनतेची इच्छा म्हणून जी म्हणतात, ती मनुष्यव्यक्तिरूपानेंच प्रगट होते. ती व्यक्ति स्वतःला जनतेशीं समव्याप्त मानिते. आणि असें असलें म्हणजे ती व्यक्ति हेंच जनतेच्या इच्छेचें देहधारी प्रतीक ठरतें. जो मनुष्य स्वतःला

जनता समजतो, तोच जनतेचा खरा प्रतिनिधि होय." म्हणण्याचा अर्थ असा कीं, लोकशाही ही शिरगणतीनें अंमलांत येत नाहीं. तर अमूर्त किंवा अदृश्य-रूपानें, विद्युत्-शक्तीप्रमाणें ती सत्ता सामुदायिक इच्छाशक्तींतून निघून हजर व लायक असा जो डिक्टेटर निर्माण होईल त्याच्या देहांत शिरते; व त्याच्या मेंदूंतून त्याच्या शब्दांनीं प्रगट होते. अशा निरनिराळ्या शब्दप्रयोगांनीं डिक्टेटरशिपचें समर्थन करण्यांत आलेलें आढळतें. पण हा सर्व द्राविडी प्राणायाम करण्याचें कारण हेंच कीं, आज तात्त्विकदृष्ट्या किंवा प्रचलित राजकीय सिद्धांत म्हणून, लोकशाही ही देव्हाऱ्यांत देवाची जागा घेऊन बसलेली आहे खरी, पण पूजा तिची करावयाची तरी प्रसाद डिक्टेटरनें खावयाचा !

व्यक्तिशः स्वतः अज्ञातवासांतून उदयाला येणें, अराजकतेंतून आपल्या राष्ट्राचा उद्धार करून त्यांत सुव्यवस्था निर्माण करणें व अपशयाकडून यशाच्या मार्गाकडे राष्ट्राच्या गाड्याचें तोंड फिरवून तो चालू करणें या गोष्टी लहान-सहान नव्हत आणि तशा गोष्टी घडवून आणण्याइतकी दैवी संपत् एखाद्या एकट्या व्यक्तीच्या अंगीं आहे असा विश्वास जनतेच्या अंतरंगांत उत्पन्न झाला तर सहजच तो डिक्टेटरशिपचा, झोटिंगशाहीचा, आधार होऊं शकतो. संकटांत सांपडून निराश–हतबल झालेल्या मनाला शेवटीं विघ्नहर्ता सर्वेश्वर कोणाच्या ना कोणाच्या तरी रूपानें अवतीर्ण होऊन, आपलें संरक्षण व उद्धार करील अशा आशेनें त्याची करुणा भाकणें याशिवाय दुसरा उपाय शिल्लक राहात नाहीं. तीच गोष्ट रशिया, इटली, जर्मनी या देशांत अलीकडे घडली. अमेरिकेलाहि आर्थिक संकटांत त्राता हवा होता तो रूझवेल्ट भेटला. या झोटिंग-शाहीच्या कार्याचें यश पुढें टिकेल कीं नाहीं हें आज कोणीं सांगावें ? निदान यश कायम राहिलें तरी तें मिळवून देणारा पुढारी शिळा ठरतो व नकोसा होतो. रोमन राष्ट्रांतला एखादा सिनासिनेटस स्वयंस्फूर्त वैराग्यानें, राष्ट्रावरील संकट निवारण होतांच, आपण होऊन बाजूला सरतो व जुन्या अज्ञातवासांत प्रवेश करतो. एखादा जॉर्ज वॉशिंग्टन देशाला स्वातंत्र्य मिळतांच सत्ताधिकार सोडून बाजूला होतो. यांच्या उलट उदाहरणें म्हणून प्रिन्स बिस्मार्क व लॉईड जॉर्ज यांचीं दाखवितां येतील. आधुनिक जर्मनीला प्रिन्स बिस्मार्क यानें उर्जितावस्थेला आणलें, पण पुढें त्याचें वर्चस्व डोईजड झाल्यामुळें माजी कायसर विलि-

यम यानें बिस्मार्कला अधिकारच्युत करून घरीं बसविलें. महायुद्धाच्या काळांत लाईड जॉर्ज हा सर्वाधिकारी होता. तो म्हणेल त्याप्रमाणें इंग्लंडांत राज्यकारभार चालत होता, इतकेंच नव्हे तर खुद्द रणांगणावर सैन्यांच्या हालचाली होत होत्या. पण 'गरज सरो वैद्य मरो" या म्हणीप्रमाणें शांततेचे तह होतांच, मागें दडून बसलेला कॉन्झर्व्हेटिव्ह पक्ष पुढें आला; व आपल्या संख्याबळावर त्यानें लॉईड जॉर्जला पदच्युत केलें.आणि हा दिग्विजयी मुख्य प्रधान आज आपल्या पाठीशीं अवघे पांच चार अनुयायी घेऊन पार्लमेंटमधील विरोधकांच्या आसनावर अरण्यरुदन करीत बसलेला आहे. रूझवेल्ट, मुसोलिनी, हिटलर, स्टॅलिन, यांचीहि पुढेंमागें हीच गत होणार नाहीं कशावरून! पण तूर्त त्यांची झोटिंगशाही विजयी आहे एवढें खरें.

यानंतर आतां डिक्टेटरशिपसारखी विकृति लोकशाहींत उत्पन्न होण्याचीं कांहीं नित्य स्वरूपाचीं कारणें पाहूं. हीं कारणें नवीं आहेत. पण त्यामुळें तीं नैमित्तिक ठरत नाहींत. नवें हेंहि नित्य स्वरूपाचें होऊं शकतें. कारण ज्या परिस्थितीनें त्या नव्याला जन्म दिला ती परिस्थितिहि सतत टिकणारीच असूं शकते. उदाहरणार्थ, सामान्यतः लोकशाही ही नवी आहे, पण ती यापुढें टिकणारी आहे. आणि लोकशाहीचे अवगुण हेच जर तिजबरोबर उत्पन्न होणाऱ्या झोटिंगशाहीचें एक कारण असलें, तर ते अवगुण व तें कारणहि नित्य स्वरूपाचें ठरेल. त्या कारणाचा प्रादुर्भाव कदाचित् मधून मधूनच विशेषसा दृष्टीस पडेल. पण ही सहचारी जोडी ' नित्य ' या सदरांत घालावी लागेल.

हीं कारणें लोकशाहीमध्येंच प्रथम कांहीं काळ सुप्त असतात. पण अनुकूल स्थिति प्राप्त होतांच जोर करतात. लोकशाही व लोकस्वातंत्र्य या तत्त्वांशीं झोटिंगशाहीचें तत्त्व सहचारी असतें. यामुळें आधुनिक झोटिंगशाहीला लोकशाहीचें रोगट "पॅथॉलॉजिकल' स्वरूप असें नांव दिलें आहे. याचा अर्थ रोगाला ज्याप्रमाणें जीवप्रकृतीचा आधार लागतो, त्याप्रमाणें झोटिंगशाहीलाहि लोकसत्ताक राज्यपद्धतीचा आधार लागतो. जीव हा आपल्या जन्माबरोबरच आपणाला मारक अशीं रोगबीजें घेऊन येतो. आणि जन्मभर त्यांचें युद्ध सुरूच असतें. जीवप्रकृति सुदृढ असते तोंपर्यंत रोगाचें कांहीं चालत नाहीं. पण इतर कारणांनीं प्रकृति क्षीण झाली म्हणजे रोग बळावतो. त्याप्रमाणें लोकसत्ताक राज्यपद्धति झाली तरी तिच्यांतच झोटिंगशाहीचीं बीजें असतात. आणि

लोकसत्ता, सामुदायिक सत्ता, कोणत्याहि कारणानें कमकुवत झाली म्हणजे झोटिंगशाही बळावते. मुद्दा इतकाच कीं आधुनिक झोटिंगशाही ही लोकसत्तेवर अधिष्ठित असून, ती राजशाही किंवा बादशाही यापेक्षां जुलमी दिसली तरी तिला जुन्या राजशाही सदरांत कोणी घालीत नाहीं.

लोकशाही कमकुवत होऊन झोटिंगशाही प्रबळ होण्याला मनुष्यस्वभावाचे सर्व प्रकार व सर्व गुण कारणीभूत होतात. या गुणांपैकीं पहिला गुण म्हणजे विभूतिपूजेचा छंद. हा छंद मनुष्याला अनादिकालापासून जडून राहिला आहे व तो त्याला अजून म्हणजे या सुधारलेल्या कालांतहि सोडीत नाहीं. विभूतिपूजा ही सगुण पूजेची जोडीदार आहे. सगुणपूजा ईश्वराची तर विभूतिपूजा ही मनुष्याची. इटली व जर्मनी या राष्ट्रांतील तरुण पिढी आज धार्मिक भावनेच्या उत्साहानेंच झोटिंगशाहीची उपासना करीत आहे. तो भावनेचा अतिरेक म्हणा, पण तसा प्रकार आहे खरा. वास्तविक तरुणपणीं आत्मविश्वासानें मनुष्यानें आत्मानुभवाला सरसावावें. बुद्धिस्वातंत्र्याचा तर तो वसंतऋतु. तथापि याच वयांत आज इटली व जर्मनी यांतील तरुण पिढीनें झोटिंगशाही यशस्वी करणें हेंच आपलें ध्येय म्हणून ठरविलेलें दिसतें! आणि त्याकरितां हे तरुणलोक अर्ध्या पगारावर राहण्यास तयार होण्याइतके स्वार्थत्यागी बनले आहेत. मग ही त्यांची भावना खोटी कशी म्हणावी ? मुसोलिनी किंवा हिटलर हा नवा एखादा हुकूम कधीं सोडतो, व तो पाळून अमलांत आल्याचें आपण त्याच्या प्रत्ययाला आणून आपली निष्ठा कधीं प्रगट करतों असें त्यांना होऊन गेलें आहे असें म्हणतात. मानसशास्त्रवेत्त्यांना याचें परम आश्चर्य वाटून राहिलें आहे. "हा मानवी स्वातंत्र्यबुद्धीचा अधःपात म्हणावा तर तसें म्हणवत नाहीं. उलट, हे लोक खरोखर बुद्धिप्रधान, विवेकनिष्ठ म्हणावें तर तसेंहि सर्टिफिकेट त्यांना खुल्या दिलानें देववत नाहीं." या नव्या 'गुलामां' ना जुन्या काळच्या गुलामांच्या पंक्तीला बसवितां येत नाहीं. कारण जुने गुलाम बाह्यस्थितीनें परतंत्र होते, यामुळें मनांत स्वतंत्र होण्याची इच्छा झाली तरी ती त्यांना सफळ करणें अशक्य होतें. गुलामांचें बंड असें इतिहासांत एकदांच घडलें. पण तेंहि शेवटीं फसलें. पण इटली जर्मनी यांतले तरुण स्वतंत्र असून, मनानें जाणूनबुजून आवडीनें त्यांनीं डिक्टेटरांची गुलामगिरी पत्करली आहे. या तरुणांचें वर्णन एका ग्रंथकारानें खालील शब्दांनीं केलें आहे. "A community of regimented

devotees sustained by the motive power of hysterical ardour," आपण जनतेची स्वतंत्रता कमी केली हें मुसोलिनी स्वतांच कबूल करतो. पण तो असें म्हणतो कीं, "ज्या स्वतंत्रतेचा जनतेला कांहीं उपयोग नव्हता अशी स्वतंत्रताच काय ती मीं नष्ट केली. उपयुक्त व हितकारक अशी होती ती नष्ट केली नाहीं. आणि याचा मोबदला म्हणून राष्ट्रसेवा करण्याची आणि लोकमत प्रगट करण्याची जी 'स्वतंत्रता' किंबहुना जिच्यापासून राष्ट्राचें अनहितच होण्याचा संभव ती जनतेला दिली यांत काय वावगें झालें ?" ( The political and social doctrine of Facism ).

तरुण पिढी ही भावनाप्रधान असते. यामुळें लोकशाहीच्या मामुली कारभारांत सहजच तिचें चित्त रमत नाहीं. जो पक्ष आपल्याला कांहीं पुरुषार्थाचें किंवा पराक्रमाचें काम सांगत नाहीं, त्याचा अनुयायी होण्यांत भावनाप्रधान व्यक्तीला मोठेसें भूषण वाटत नाहीं. कारण योग्य असो वा नसो, कांहीं तरी धाडसाचें व उज्ज्वल दिसणारें असें काम केलें, किंबहुना जीव धोक्यांत पडण्यासारखें काम केलें, तर तें खरें काम असें त्याला वाटतें.

लोकशाहीचें मामुली काम म्हटलें म्हणजे दर तीन किंवा पांच वर्षांनीं मतदानाच्या जागीं जाऊन, कोणाला न कळतां, आपल्या मताचें गुप्तदान कोणा एखाद्या उमेदवाराला करून यावयाचें. यानें भावनेला प्रिय असा अद्भुत रस कसा रंगणार ! आपण स्वतः तर उडी घालतोंच आहों, पण आपणाबरोबर इतरहि अनेक उडी घालणारे आहेत, असें वाटल्यानें त्याला जो उत्साह येतो, तो लोकशाहीचा रेंगाळत चालणारा गाडा पाहून येत नाहीं.

जेथें तेथें निवडणुकी व मतदानपद्धति यांचा कांहीं लोकांना अगदीं वीट आल्यासारखा दिसतो. बर्नार्ड शॉ यानें आपल्या 'ॲपल कार्ट' नामक नाटकाचे प्रस्तावनेंत खालील उद्गार काढले आहेत. "लोकशाहीचे पुरस्कर्ते करायला गेले एक व झालें भलतेंच. मतदारी पद्धतीचा अतिरेक होऊन, मताशिवाय माणूस नाहीं आणि बहुमतानें निवडल्याखेरजि अधिकारी नाहीं, अशी स्थिति होऊन बसली आहे. मूळ राजे लोकांच्या जुलमाला आळा घालण्याकरितां म्हणून त्यांच्या पायांत मतदारांचा म्हणजे सनदशीर राज्यकारभाराचा खोडा घातला, तो जुलमी राजा नाहींसा झाल्यावर स्वतः लोकशाहीच्याच पायांत बसला. आणि तिला झटपट व तडफदार रीतीनें कांहींच काम करूं देईनासा

झाला आहे. जुन्या जुलमी राजांच्या वेळीं जगाची परिस्थितिहि जुनीच होती. आतां नव्या परिस्थितींत अशी नवी वेळ आली आहे कीं, कोणच्याही महत्कार्याला सार्वजनिक स्वरूप येऊं लागलें आहे. आणि अशीं कामें लोकांचीं म्हणून व लोकांच्याच हातून थोडक्या काळांत सफाईनें उरकलीं गेलीं तरच सुधारणेची प्रगति होईल एरवीं होणार नाहीं. पण अशा महत्कृत्यांचे मनोरथ सार्वत्रिक मतदारीनें चक्रव्यूहांत सांपडल्यासारखे होऊन बाहेरच पडत नाहींत.

सुप्रसिद्ध समाजतत्त्ववेत्ता एच. जी. वेल्स यानें बर्नार्ड शॉप्रमाणेंच मतदारी व प्रातिनिधिक संस्थांचा कारभार यांच्यावर खरमरीत टीका केली आहे. त्याच्या मतें मामुली सामान्य मतदाराला राजकारणाची आस्थाच नसते. शिवाय त्याचें अज्ञानहि अगाध असतें. पूर्वी थोडे मतदार होते व साक्षर लोकहि थोडे होते. तेव्हां पार्लमेंटचा जो दबदबा व जें वैभव होतें तें, तो म्हणतो, आज उरलें नाहीं आणि प्रत्यहीं पार्लमेंटांत काय घडतें तें शेंकडों दैनिक पत्रांच्या द्वारें लाखों लोकांना कळत असूनहि !

लॉर्ड ब्राईस यानेंहि असें म्हटलें आहे कीं, १८७० सालीं इंग्लंडचे लोक आपले राजकीय पुढारी पसंत करण्यांत जें शहाणपण दाखवूं शकत, तें आज वाढत्या मतदारीच्या काळांत ते दाखवितात असें दिसून येत नाहीं. लोकशाहीचें प्रमुख अंग म्हटलें म्हणजे पक्षोपपक्षांची घटना. या घटनेचा उपयोग असा समजला जातो कीं, ज्या एका पक्षाकडे पुढारीपणानें राज्यकारभार सोंपविला जातो, तो पक्ष नालायक किंवा नादान ठरल्यास पदच्युत होऊन त्याचे जागीं दुसरा येतो. पण एक जाऊन दुसरा त्याच्या जागीं येणें यांत, खरोखर लोकहितदक्षतेमुळें, जी राजस चुरस असावी ती अलिकडे पार नाहींशी झाली आहे. आणि प्रतिपक्षांत खेळीमेळीची भावना उत्पन्न होऊन, संगनमतानें पुढारीपणाची वांटणी किंवा पाळी ठरविल्यासारखी होऊं लागली आहे. आक्षेपकाचें म्हणणें असें कीं, या संगनमतामुळें लोकहित डोळ्यांआड होतें.

' इकॉनॉमिस्ट ' नामक इंग्लंडांतील प्रमुख अर्थशास्त्रविवेचक साप्ताहिक आहे. त्याच्या गेल्या ऑक्टोबर २७ च्या अंकांत दोन गोष्टी कबूल केल्या आहेत. एक, इंग्लंडांतील आजचें संयुक्त प्रधानमंडळ ही ' डेमोक्रॅटिक डिक्टेटरशिपच ' आहे. आभास लोकशाही सत्तेचा, पण खरोखर सामुदायिक झोटिंगशाहीच. दुसरी गोष्ट ही कीं, पार्लमेंट ( लोकप्रतिनिधि सभा ) ही कामाच्या उरकाला

व यशस्वी कर्तृत्वालाहि कमी पडते. तिच्या कामांत निष्ठावंतपणा, सातत्य, दृढनिश्चय, धोरणाची सुसंगति, बिनबोलकेपणा, आटपशीरपणा, तडफ, मितव्ययीपणा, खानेवार सहकारिता, योजकता, कल्पकता, संघटन–चातुर्य, केंद्रीकृत राष्ट्रीयत्वाची भावना–इत्यादि गुण दिसून येत नाहींत. लोकमतानुसार काम पुरें पाडणें हें प्रकाशकिरणाला पकडण्याकरितां त्या मागें धावण्यासारखें कठिण होऊन बसलें आहे. तेथें, हा पत्रकार म्हणतो, सहा सव्वासहाशें सभासदांचें मंडळ कितपत उपयोगी पडणार ?

मतदारांची अनास्था स्वाभाविक आहे, पण राजकीय प्रतिस्पर्धीहि गुप्तपणें संगनमत करून पुढारीपणाचे मान व अधिकार आपापसांत वांटून घेऊं लागले म्हणजे प्रगतीची, सुधारणेची आंच लागणार कशी व प्रगति होणार कशी ! खेळामध्यें एका डावांत बाद झालेले, म्हणजे गाभुळलेले किंवा मारलेले गडी फिरून दुसऱ्या डावांत जिवंत होऊन खेळांत भाग घेऊं लागले म्हणजे खेळांतील कडवेपणा सर्व नाहींसा होतो. विलायतेंत हें संगनमत इतक्या थराला पोंचलें आहे कीं, राष्ट्रीय धोरणाच्या नांवाखालीं कॉन्झर्व्हेटिव्ह व लेबर अशा तीव्र प्रतिस्पर्धि पक्षांनीं हल्लीं संयुक्त प्रधानमंडळाचा खेळ चालविला आहे. सर्व कट्टे कॉन्झर्व्हेटिव्ह बाल्डविनवर नाराज; व मजूर पक्षानें तर रॅम्से मॅक्डोनाल्ड यांचें सभासदत्वहि काढून टाकलें ! असें असतां बाल्डविन व मॅक्डोनाल्ड हे सख्या जुळ्या भावाप्रमाणें आलटून पालटून मुख्य प्रधानासारखे अधिकार गाजवून पार्लमेंट आपल्या मुठींत ठेवीत आहेत.

म्हणून आक्षेपक म्हणतो कीं, पार्लमेंट सभेंत दिसण्यांत दोन पक्ष पण त्यांतील विरोधी पक्ष केवळ नांवाचा. असें असण्यापेक्षां सर्व पार्लमेंट मिळून एकच राष्ट्रीयपक्ष, त्या पक्षाचा एकच पुढारी, व तो 'डिक्टेटर' असें असलें तरी काय बिघडलें ? याशिवाय राजकीय पक्षांवर व त्यांच्या पुढाऱ्यांवर प्रत्यक्ष स्वार्थीपणाचा, लोभीपणाचा आरोप येतो तो वेगळाच. परवां फ्रान्समध्यें एका प्रधानाला लांचलुचपतीबद्दल शिक्षा झाली. पण लांचलुचपत नित्य चालत असतां, शिक्षा होण्याचें हें उदाहरण क्वचितच घडणारें होय. प्रातिनिधिक संस्थेंत आणखी एक दोष दिसून येऊं लागला आहे कीं, जें सर्वांचेंच काम तें कोणा एकट्याचें कधींच नव्हे. आणि खऱ्या जबाबदारीची आंच जशी एखाद्या व्यक्तीला लागूं शकते, तशी ती पक्षाला म्हणजे समुदायाला लागूं शकत नाहीं. जुन्या काळीं प्रधानाला

बेजबाबदारीचें प्रायश्चित्त शिरच्छेदानेंहि मिळत असे. पण लोकशाहींतील जबाबदारी ही समुदायांत वांटली गेल्यामुळें कोण कोणाचें डोकें मारणार ? यामुळें जबाबदारी ही थट्टेची किंवा हंसून घालविण्याची गोष्ट होऊन बसली आहे.

विसाव्या शतकांतील तत्त्वज्ञांचे हे विचार. परंतु दोन हजार वर्षांपूर्वी प्लेटो यानें आपल्या राजकीय तत्त्वज्ञानाच्या ग्रंथांत लोकसत्ता–प्रकारक राज्याची अशीच थट्टा केली आहे. तो म्हणतो, " अशा राज्यपद्धतींत प्रत्येकाने उठावें आणि दुसऱ्या कोणाचें तरी काम करण्याची ऐट आणावी ! स्वतःच्या कर्तव्याच्या जाणिवेच्या नांवानें शून्य ! सगळा परोपकाराचा बहाणा ! दुसरा काय तो अज्ञानी व त्याचा प्रतिनिधि होण्याची इच्छा करणारा मी काय तो सज्ञानी. लोकसत्ता म्हणजे लोकसमाजांतील 'प्रत्येक' व्यक्तीला सत्ता! प्रत्येकानें हवें तें करावें असें स्वातंत्र्य. मग ज्यानें उठावें त्यानें राजकारणांत ढवळाढवळ करावी आणि मुत्सद्दी म्हणून मिरवावें यांत काय आश्चर्य ? आखींव रेखींव कार्यमर्यादा नाहीं व शिस्त नाहीं." हेंच प्लेटोचें वर्णन आजच्या म्हणजे झोटिंगशाह अवतरण्यापूर्वीच्या स्थितीला लावून, या नव्या 'शाहीचें' समर्थन करणारा आक्षेपक म्हणतो कीं, " लोकशाहींत बेशिस्त कामकरी मजुरीच्या दराकरितां आणि कामाच्या तासाकरित भांडत बसतात. बेशिस्त धनी व भांडवलवाले त्यांना विरोध करीत भांडत बसतात चळवळ्यांना अमूक एक निश्चित असें कांहींच नको असतें. त्यांनीं सभा भरवाव्या, वक्तृत्वपूर्ण भाषणें करावीं, आणि लोकांच्या भावना चेतवून गुंडगिरीचा पाठपुरावा करावा. 'खाण्यापेक्षां मचमच फार' म्हणतात त्याप्रमाणें लोकसत्ताक राज्यपद्धतींत कामापेक्षां बडबडच फार. ही स्थिति बदलावयाची असेल तर स्वतंत्रतेला आळा घातला पाहिजे, कामकरी व त्यांचे धनी दोघांनाहि 'शिस्त' लाविली पाहिजे, राजकीय चळवळ्यांच्या तोंडांना कुलुपें घालून, त्यांना कामाच्या गाड्याला जुंपून, त्यांजकडून योग्य तें ओझें वाहविलें पाहिजे. लोकांना थोडी अधिक शिस्त लाविली तर, जनतेचें अहित होण्यापेक्षां हितच अधिक होईल."

दोन हजार किंवा याहून अधिक वर्षांच्या काळांत लोकसत्तेची स्तुति व निंदा अशा रीतीनें आलटूनपालटून दिसून येते, हा कोणी चमत्कार म्हणेल. पण खरोखर तो चमत्कार नाहीं. जी गोष्ट सर्वस्वीं अनपेक्षित,

कधींच कोणाच्या डोक्यांत येणारी नाहीं, व जिच्याविषयीं कार्य-कारणभाव पटेलसा सांगतां येत नाहीं, तिलाच 'चमत्कार' म्हणतात. पण लोकशाहीविषयींच्या मतांतील हे जे फेरबदल यांना चमत्कार म्हणतां येत नाहीं; कारण त्या त्या कालच्या जाणत्या मार्मिक दूरदर्शी लोकांनीं ते ते फेरबदल होणार अशीं भाकितेंच केल्याचा पुरावा सांपडतो. प्रत्यक्ष परिवर्तन घडण्याला परिस्थितीप्रमाणें थोडा कमी अधिक काळ लागला असेल. परंतु एकंदरीनें पुढील विवक्षित काळांत काय स्थिति होणार याविषयीं भाकीत करतां आलेलें आहे. कलियुगाचें भविष्य द्वापार युगांत झालें होतें म्हणतात! प्रत्येक अवतारापूर्वी, तो व्हावा ही जनतेची आकांक्षा, तो होणार या भविष्यवाणीच्या रूपानें, प्रगट होत असते, ही गोष्ट सर्व देशांतील पुराणांत आढळून येते.

हीं स्थित्यंतरें एखाद्या नियमानें बांधल्यासारखीं दिसतात तर तो नियम तरी कोणता ? याचें उत्तर असें. जगांतील एकंदर सुधारणेला जो नियम लागतो तो प्रस्तुत प्रकरणींहि लागतोच. 'सुधारणा' या शब्दाला निश्चित बरा किंवा वाईट असा अर्थ कांहीं नाहीं. अमुक एक गोष्ट किंवा प्रकार हीच सुधारणा असें ठरलेलें नाहीं. उलट असेंहि दाखवितां येईल कीं, जी गोष्ट एकेकाळीं किंवा एक परिस्थितींत इष्ट म्हटली गेली, तीच दुसऱ्या काळीं दुसऱ्या एका परिस्थितींत 'अनिष्ट' अशी समजली गेली, यावरून असें अनुमान निघतें कीं, 'सुधारणा म्हणजे केवळ प्रतिक्रिया'. क्रियेप्रतिक्रियेचें हें द्वंद्व जगांत नित्य व सनातन आहे. या द्वंद्वाचा सामान्य नियम असा कीं, कोणतीहि क्रिया एकदां सुरू झाली म्हणजे तिची अतिशयोक्ति होईपर्यंत ती थांबत नाहीं. आणि ही अतिशयोक्ति होऊन ती क्रिया हास्यास्पद किंवा विद्विष्ट ठरली म्हणजे मग प्रतिक्रिया सुरू होते. फिरून ती प्रतिक्रिया ही देखील स्वतः क्रिया असल्यामुळें तिचीहि अतिशयोक्ति होऊं शकते. आणि मग तिच्याहि विरुद्ध दुसरी प्रतिक्रिया सुरू होते.

क्रियेप्रतिक्रियेचें हें द्वंद्व समजण्याला घड्याळांतील लंबकाचें उदाहरण दिलें असतां चांगलें पटेल. घड्याळांत जशी 'कमान' (स्प्रिंग) तशी मनुष्यमात्राच्या मनांतील 'वासना.' किल्ली देऊन कमान आवळावी त्याप्रमाणें बुद्धि चालवून मनुष्यानें वासना खंबीर केली म्हणजे तिच्यामध्यें प्रेरकशक्ति उत्पन्न होते. घड्याळांतली प्रेरकशक्ति मित करण्याचें साधन लंबक हें होय. तो डाव्या टोंकाकडून सुटला म्हणजे उजव्या टोंकाला पोहोंचेपर्यंत थांबत नाहीं. लंबकाच्या

प्रवासाचें डावें टोंक व उजवें टोंक हीं दोन्हीं प्रतिक्रियेच्या कमालीचीं स्थानें होत. त्या स्थानांना लंबक पोंचला म्हणजे उलटी प्रतिक्रिया होऊन गतीची दिशा बद्लते. मध्यबिंदूला येईपर्यंत होणारा लंबकाचा प्रवास हा विकृतीच्या क्षेत्रांतलाच असतो असें म्हणावें लागतें. मग कोणत्याहि गोष्टीची खरी प्रकृति म्हणजे तरी कोणती ? याचें उत्तर मध्यबिंदु हें होय. हा मध्यबिंदु म्हणजेच ॲरिस्टॉटलच्या नांवानें प्रसिद्ध असलेला 'सुवर्णबिंदु.' पण मौज अशी कीं, या मध्य बिंदूवर लंबक नेहमीं स्थिर उभा रहावा अशी इच्छा करणें म्हणजे घड्याळ थांबण्याची इच्छा करण्यासारखेंच होणार. डावीकडून उजवीकडे व उजवीकडून डावीकडे हेलकावे खातांना लंबक या मध्यबिंदूतूनच जातो; पण त्याचा मध्यबिंदूशीं फक्त क्षणभरच संयोग टिकतो. या मध्यबिंदूवर लंबक तर कायम रहावा आणि घड्याळ तर चालावें अशी योजना कोणी कल्पक यंत्रकलाभिज्ञ शोधून काढील तर हवें आहे. पण तो भेटत नाहीं. म्हणून लंबकाचें आंदोलन आणि घड्याळाचें जीवन या दोन्ही गोष्टी समानार्थक ठरून गेल्या आहेत.

मानवी जीवनांतील क्रिया व प्रतिक्रिया–प्रकृति व विकृति–यांना हाच दाखल लागू पडतो. म्हणजे हें जीवन कधींच मध्यबिंदूला चिकटून स्थिर रहात नाहीं तर सगळें जीवन विकृतिमयच राहतें; आणि विकृति नाहीं असा जो एखादा क्षण लाभतो तीच प्रकृति खरी असते. कालिदासानें अजाच्या तोंडून रघुवंशांत वद्विलें आहे तें एक वाक्य असें—' मरणं प्रकृतिः शरीरिणां विकृतिर्जीवनमुच्यते बुधैः ।' मरणाला प्रकृति म्हणणें हें चमत्कारिक; पण तें वर्णन मरणाच्या स्थिरपणाला अनुलक्षून केलेलें आहे. जीवन ही विकृति. हें मात्र वर्णन पटण्यासारखें आहे. कारण मनुष्याला कोणत्याहि क्षणीं आपली प्रकृति अगदीं साफ निर्विकार आहे असें शपथेवर सांगतां येत नाहीं. वात, पित्त, कफ यांपैकीं कोणा एकानें तरी किंचित् जोर केलेला असतो. जी गोष्ट शरीरप्रकृतीची तीच मनःप्रकृतीची समजावी. कारण मनुष्याचें मन एकदां निर्विकार स्वरूपांत म्हणजे शुद्धानंदाच्या अनुभवांत, केव्हां असलें तरी तें तसें क्षणभरच टिकतें. म्हणूनच स्थितप्रज्ञता अवघड म्हणजे केवळ ध्येयरूप व कल्पनेनें ग्राह्य होणारी. सिद्धावस्था जन्मभर टिकविणारे- जीवन्मुक्त योगी या जगांत असतील तर ते असोत. परंतु सामान्य मनुष्या, संबंधानें बोलावयाचें तर जीवन म्हणजे विकृति आणि, वर सांगितल्याप्रमाणें क्रियाप्रतिक्रियांचें द्वंद्वच होय असें कबूल करणें प्राप्त होतें.

आतां हा दाखला स्वातंत्र्य, लोकशाही, व झोटिंगशाही यांना कसा लागू पडतो हें थोडक्यांत पाहूं. हा दाखला असा लागू पडतो कीं, इतिहास हा समाजाच्या जीवनांतील एक भाग आहे. या इतिहासांतील राजकीय विभाग प्रस्तुत डोळ्यापुढें आणला असतां काय दिसतें? तर स्वातंत्र्यबुद्धि व जुलूम करण्याची बुद्धि यांचें द्वंद्व नेहमीं सुरू असतें. केव्हां जुलूम करणाराचा जोर होतो तर केव्हां स्वातंत्र्य मिळविणाराचा जोर होतो. जुलमाचा अतिरेक झाला म्हणजे बंड होतें; आणि बंडाचा अतिरेक होऊन अराजक झालें म्हणजे सर्वांवर जुलूम करून शिस्त लावणारी कोणी व्यक्ति किंवा शक्ति निर्माण होते. याविषयीं एक मनांत ठसण्यासारखें उदाहरण त्यांतल्या त्यांत फ्रान्सचें देतां येईल. राजा १४ वा लुई याच्यापूर्वी जनतेंतील निरनिराळ्या वर्गांनीं सत्तेची क्रिया प्रतिक्रिया कशी केली हें राहो; पण १४ व्या लुईच्या रूपानें एकतंत्री राज्यपद्धतीचा कळस झाला. १६ व्या लुईच्या वेळीं राजसत्तेविरुद्ध बंड होऊन सुप्रसिद्ध राज्यक्रांति झाली व शेवटीं अराजक अवतरलें. ते थांबविण्यांत नेपोलियन ही व्यक्ति पुढें आली. तिनें फिरून एकतंत्री अंमल प्रस्थापित करून १४ व्या लुईची आठवण करून दिली. त्यानंतर फिरून राज्यक्रांति होऊन बुर्बोनची, लुई फिलिपची राजशाही सुरू झाली. त्यानंतर १८४८ ची राज्यक्रांति होऊन लोकशाही स्थापण्यांत आली. फिरून दुसरा एक नेपोलियन (तिसरा) गादीवर आला; व त्याच्या मूर्खपणामुळें फ्रान्सवर परचक्र येऊन लोकसत्ताक राज्य स्थापलें गेलें. या गोष्टीला सुमारें साठपांसष्ठ वर्षें झालीं. पण पुढें काय होईल हें कोणीं सांगावें? इतर अनेक देशांचा इतिहास पाहिला तरी असेंच आढळेल. लोकस्वातंत्र्याच्या बाबतींत भरती ओहोटीचा नियम तेथें अनुभवास आलेला दिसून येईल.

याचें तात्पर्य असें कीं, आज जरी लोकसत्ताक राज्यपद्धति मागें पडलेली दिसत असून डिक्टेटरशिपची म्हणजे झोटिंगशाहीची चढाई दिसते, तरी कांहीं कालानंतर तिजविरुद्ध प्रतिक्रिया झाल्याशिवाय राहणार नाहीं. हिटलर, मुसोलिनी हे कांहीं अमर नाहींत. पण हल्लींच्या त्यांच्या झोटिंगशाहीविरुद्ध प्रतिक्रिया होण्याला कदाचित् त्यांच्या मरणाचीहि वाट पहावी लागणार नाहीं. त्यांच्या हयातींतहि ती गोष्ट घडलेली दिसून येण्याचा संभव आहे. अर्थात् अशाविषयीं भविष्यें नक्की अशीं कोणासच करतां येणें शक्य नाहीं. परंतु वरील क्रिया प्रतिक्रिया--द्वंद्वाचा निर्देश करणें हें मुळींच धाडसाचें ठरणार नाहीं. जुने लोकसत्ताक राज्यपद्धतीचे

प्रकार निरुपयोगी ठरले तर त्यांच्या जागीं दुसरे कोणते तरी येतील. पण प्रक्रिया बदलल्यानें शास्त्र बदलतें असें होत नाहीं. त्याचप्रमाणें साधन बदललें तरी साध्य निश्चल राहूं शकतें. गेल्या शतकांत इंग्लिश तत्त्ववेत्ता जॉन स्टुअर्ट मिल यानें ‘ स्वातंत्र्य ’ या विषयावर एक मोठा निबंध लिहिलेला आहे. तें उदारमतवादित्वाचें इंग्लिश बायबल असें समजण्यांत येतें. तें आज कोणी वाचील तर त्याला असें आढळून येईल कीं, मिलचे तात्त्विक सिद्धांत बरोबर आहेत; परंतु मनुष्यस्वभावाच्या खेळामुळें किंवा जोरामुळें ते सिद्धांत तंतोतंत अनुभवाला येत नाहींत. त्याला पुष्कळ मुरड घालावी लागते. मिलचे सिद्धांत त्यानें लिहिल्याप्रमाणें अनुभवाला येण्याला त्यानें गृहित घेतलेला मनुष्य हवा. तो कोठून मिळणार ! त्याचा मनुष्य हा सर्वस्वीं निर्विकार, त्रिगुणांच्या साम्यावस्थेला पोंचलेला नसला तरी पूर्ण तर्कशुद्ध रीतीनें वागणारा, असा गृहित घेतलेला आहे. पण जग हें तसें अनुभवास येत नाहीं. म्हणून सिद्धांताच्या राजमार्गाला येऊन मिळणाऱ्या किंवा त्यांतून निघणाऱ्या वेड्यावांकड्या अशा बऱ्याच पायवाटा उमटलेल्या आढळतात. पण एक गोष्ट खरी कीं, एकंदरीनें मनुष्याची स्वातंत्र्यबुद्धि ही अप्रतिहत आहे, प्रगतिशील आहे. मनुष्य आपल्या नांदणुकीकरितां जशी निरनिराळ्या प्रकारचीं निरनिराळ्या सोईचीं घरें बांधतो, तशी त्याची स्वातंत्र्यबुद्धि ही इच्छेनुरूप समाजरचना निर्माण करीत असते. तिला कोणत्या वेळीं कोणता प्रकार आवडेल हें सांगतां येणार नाहीं.

---

## २ लोकराज्याचा पहिला धडा शिका

### लेखांक १ ला

अखेर हिंदुस्थानांतील राज्यकारभारासंबंधीं नवा कायदा झालाच ! ढोंगी मायावी कॉन्झर्व्हेटिव मुत्सद्यांचें घोडें पार्लमेंटरी गंगेंत एकदाचें न्हालें. त्याचें स्वरूप किती घातक व अनिष्ट आहे हें आतां कोणी कोणास सांगण्याचें उरलेलें नाहीं. त्याला वाहिलेल्या शिव्याशापांचें एक ‘ सहस्रनाम ’ हि होऊं शकेल. हा कायदा झाला नसता तरी बरें होतें. वाटल्यास सरकारनें तो परत घेण्याचा धाक घालावा, आणि आम्ही लोक “ तो परत घेऊं नका ” असें म्हणतों, कीं काय हें तरी पाहावें ! असो. या कायद्याविषयीं माझें जें मत आहे तें अशा रीतीनें एकदांच सांगून टाकून, त्याचा उल्लेख यापुढें या लेखांत जेथें जेथें यावयाचा तेथें

नेथें मी त्याला ‘ सुधारणांचा कायदा ’ न म्हणतां नुसतें ‘ नवा कायदा ’ एवढेंच म्हणत जाईन. आणखी निंदा ती कोणती !

पण अशा रीतीनें तुम्ही आम्ही त्यावर तोंडच्या शब्दाचा बहिष्कार घातल्यानें दुर्दैवानें तो कायदा रद्द होत नाहींना ! या देशाचा यापुढचा कारभार तूर्त तरी त्या कायद्याला धरूनच होणार हें खरें नव्हे काय ! आतां “ तो कारभार होत असतां नव्या कायदेमंडळाच्या यंत्रांतून जे कायदे बाहेर पडतील ते आम्ही पाळूंच नये, म्हणजे सामुदायिक सार्वत्रिक सत्याग्रह सतत करावा, आणि या देशांत इंग्रज सरकार म्हणून कोणी आहे असें मानूंच नये असा ठराव ( मात्र नुसत्या काँग्रेसनेंच नव्हे तर अवघ्या राष्ट्रानें ) केला तर गोष्ट वेगळी. म्हणजे त्यायोगानें कायदा शब्दशः नष्ट न झाला तर व्यवहारतः तरी झाला आणि आमच्या सत्याग्रही आचरणानें आमच्या तोंडच्या बहिष्काराला किंमत तरी आली. पण अखिल राष्ट्राच्याच काय, काँग्रेसच्याहि हातून ही गोष्ट तूर्त होणें शक्य नाहीं. यामुळें हा कायदा वाईट, अतिवाईट, अति-अति वाईट, अति-अति-अति वाईट असें आम्हीं म्हटलें तरी तो बोकांडीस बसला खरा. म्हणून ‘ निर्वाहः प्रतिपन्नवस्तुषु सतां एतद्धि गोत्रव्रतं ’ या भर्तृहरीच्या वचनाप्रमाणें, नशिबीं आलें त्याचा परिहार कसा करावयाचा याच विचारावर यापुढें आपणां सर्वांनीं विवेकशक्ति खर्च केली पाहिजे.

या नव्या कायद्याचे दोष आपणाला माहीतच आहेत. म्हणजे त्यानें राजकीय हक्काच्या रूपानें जें कांहीं थोडें दिलें, त्यापेक्षां विशेष अधिकारांच्या रूपानें सरकारकडे फारच अधिक राखून ठेविलें आहे. शिवाय जें दिलें तेंहि, कम्यूनल अवॉर्डमुळें, अशा अनुपानानें दिलें कीं, तें राष्ट्राच्या अंगीं लागूंच नये; व त्याच्या मोहामुळें अनेक विकार उत्पन्न व्हावे. तथापि “ प्रत्युत्पन्नाचा निर्वाह ” करावयाचा तर नवी राज्यघटना होणार तरी कशा स्वरूपाची हें प्रथम पाहिलें पाहिजे. ही घटना साधारणपणें ज्याला ‘ डेमॉक्रसी ’ किंवा ‘ लोकराज्य ’ असें राज्यशास्त्रकार म्हणतात ह्या प्रकारची आहे. व्यवहारांत लोकशाही हा शब्द अधिक रूढ आहे खरा, पण त्या रूढीचें कारण असें कीं, जगांतील कांहीं ठिकाणच्या लोकराज्यांत निर्णायक सत्ता शेंपन्नास वर्षें लोकांच्या हातीं राहिली. आणि राज्यांत ज्याच्या हातीं अशी सत्ता असते तोच ‘ शहा ’ म्हणजे खरा सत्ताधारी. शहाची राज्यसत्ता ती ‘ शाही. ’ ज्या राज्यप्रकारांत लोकांच्या हातीं सर्व वरिष्ठ सत्ता असते तीच खरी लोकशाही होय. पण या नव्या कायद्यानें निर्माण केलेल्या

राज्यघटनेंत निर्णायक सत्ता हिंदी लोकांच्या हातीं नाहीं, म्हणून त्या कायद्यानें लोकशाही स्थापित केली असें म्हणणें चूक होईल ! तथापि त्यानें प्रातिनिधिक स्वरूपाची घटना प्रविष्ट केली आहे यांत शंका नाहीं. म्हणून तिला 'लोकराज्य' एवढें फार तर म्हणतां येईल. या लोकराज्याच्या प्रातिनिधिक स्वरूपाची पुढें आणखी प्रगति व्हावी, आणि अखेर निर्णायक सत्ता सर्वस्वीं हिंदी जनतेच्या हातीं जावी हें आमचें मागणें आहे. ती मिळेपर्यंत ती मागणी पुढेंहि सतत राहील. ती सत्ता मिळेल तेव्हांच आम्हाला 'स्वराज्य' मिळेल; व 'लोकराज्या'ला 'लोकशाही' हा शब्द यथार्थतेनें लावतां येईल.

तथापि, हल्लीं येऊं घातलेल्या 'लोकराज्या'चा कारभार निदान प्रातिनिधिक स्वरूपाचा तरी असल्यामुळें, तिजमध्येंहि निवडणुकीच्या पद्धतीला पुष्कळच महत्त्व आहे. देखावा (मात्र देखावाच हा) असा आहे कीं, "सर्व कारभार कायदे-मंडळाच्या हातीं आणि सर्व कायदेमंडळांतून लोकांनीं निवडलेले सभासदांचेंच बहुमत ! अर्थात् लोकांनीं आपल्याला हवे तसे प्रातिनिधि सभासद निवडून द्यावे, आणि आपणाला हवा तसा कारभार करवून घ्यावा ! मग (सरकार म्हणणार) आमच्याकडे दोष काय राहिला" ? हें बोलणें सोज्वळ दिसलें तरी त्यावर आक्षेप असा घेतां येतो कीं, नव्या कायद्यानें गव्हर्नर, गव्हर्नर-जनरल, स्टेट सेक्रेटरी व पार्लमेंट यांना जे वरिष्ठ व निर्णायक स्वरूपाचे अधिकार दिले आहेत ते देऊन ठेवले नसते तर हें म्हणणें बरोबर होतें. परंतु त्या अधिकारांची तर-वार कायदेमंडळांतील लोकप्रातिनिधि, (प्रांतिक कायदेमंडळापुरतें बोलावयाचें तर त्यांनीं नेमलेले कारभारी किंवा प्रधानमंडळें) यांच्या डोक्यावर लोंबत राहील तोंपर्यंत तुमचा कारभार तुम्ही हवा तसा करवून घ्या हें म्हणणें खोटें, मायावी व अप्रामा-णिकपणाचें ठरतें. खऱ्या लोकशाहींत असले अधिकार अशा रीतीनें इतर कोणाच्या हातीं राखून ठेविले जात नाहींत. म्हणून नव्या कायद्यानें कोणीहि संतुष्ट न राहतां, आपण सर्व लोकराज्याचें रूपांतर खऱ्या लोकशाहींत म्हणजे पूर्ण स्वराज्यांत होण्याची खटपट, चळवळ, धडपड करीतच राहणार व अखेर ते मिळविणार असा आमचा निश्चय आहे, हें सरकारनें लक्षांत ठेवावें.

शिवाय प्रातिनिधिक स्वरूपाच्या या लोकराज्याचा प्रकारहि असा आहे कीं, कम्यूनल ॲवॉर्ड ऊर्फ जातिनिर्णय या नांवाची भली मोठी पाचर राज्यघटनेंत मारून ठेवलेली असल्यामुळें ती तेथें असेपर्यंत कायदेमंडळांत लोकमतांचीं

शकलें होत राहणार. सरकारला जो संघटित विरोध व्हावयास पाहिजे तो होणार नाहीं. या दुसऱ्या आक्षेपासंबंधानें बोलतांना एक गोष्ट लक्षांत ठेविली पाहिजे ती ही कीं, सरकारानें नव्या घटनेंत जातवार मतदारसंघ बनविले असले तरी, प्रत्येक संघांतील लोकांना आपणाला हवे तसे प्रतिनिधि निवडून देतां येण्यासारखें आहे. ते तसे निवडून न देण्याला योग्य अशी सबब कांहीं नाहीं. प्रत्येक गटांतील मतदारांनीं लोकांच्या विश्वासाला पात्र, सरकारी मोहाला बळी न पडणारे, आणि कर्तव्यदक्ष राष्ट्रीय वृत्तीचे असे प्रतिनिधि निवडून कां देऊं नयेत? जेथें जातिविषयक किंवा धर्मविषयक हिताहिताचा किंवा नफातोट्याचा प्रश्न निघेल तेथें त्या सर्वांकडून मिळून सरकारला संघटित असा विरोध होणार नाहीं हें कबूल. परंतु ह्या व्यतिरिक्त, म्हणजे संकीर्ण लोकहिताचा प्रश्न असेल व सरकार त्याला विरोध करीत असेल, तर त्या ठिकाणीं संघटित विरोध होण्याला काय हरकत?

पण हरकत आहे ती हीच कीं, अस्सल राष्ट्रीय वृत्तीचे प्रतिनिधि मतदारसंघाकडून निवडून दिले जात नाहींत. अर्थात्, 'लोकशाही' राहो, पण 'लोकराज्याचा'हि जो फायदा लोकांना एरवीं पदरांत पाडून घेतां आला असता तोहि ते घेऊं शकत नाहींत. आणि लोकशाहीचा पहिला धडा म्हणून जो आम्हीं शिरोभागीं म्हटला तो हाच कीं, नवी राज्यघटना अधिकाराच्या बाजूनें सदोष असली, व तो दोष सरकारकडे असला तरी केवळ लोकहित पाहणारे व राष्ट्रीय वृत्तीचे असे प्रतिनिधि निवडून न दिल्यानें जो दोष उत्पन्न होईल त्याला लोकांनीं स्वतःलाच जबाबदार धरलें पाहिजे. तो आपला दोष त्यांना सरकारच्या माथीं केव्हांहि मारतां येणार नाहीं. कायदेमंडळांत लोकांनीं निवडलेल्या प्रतिनिधींचें बहुमत हिशेबी व सदा सिद्ध असतां, तें पदरांत न पडण्याचें कारण मतदारसंघाला आपल्या विश्वासाला पात्र असा प्रतिनिधि निवडून देतां येत नाहीं असेंच म्हणावें लागतें. ही शोचनीय स्थिति आजहि अनुभवाला येतच आहे.

कायदेमंडळांतून आज खालील तीनहि प्रकार दृष्टीस पडतात. उदाहरणार्थ, कायदेमंडळांत एखादे वेळीं लोकप्रतिनिधींचें बहुमत होऊन सरकारावर मात होते. परंतु सरकार आपल्या विशेष अधिकारांचा उपयोग करून, ती मात परतवितें व आपणाला हवें तें करून घेतें. किंवा दुसरा प्रकार म्हणजे लोकपक्षीय सभासदांतच मतभेद होऊन कांहीं निवडलेले सभासद सरकारच्या बाजूला मत देतात.

यामुळें केवळ धर्म जाति इत्यादि भावना आड आल्यामुळें वरिष्ठ अधिकारांचा उपयोग केल्याशिवायहि सरकारचें साधतें. किंवा तिसरा प्रकार म्हणजे जाति, धर्म वगैरे भावना विवेकाच्या आड येण्याचें कारण नसतांहि, केवळ आपलें कर्तव्य न कळल्यामुळें, किंवा सरकारच्या भिडेला मोहाला बळी पडून, लोकांनीं आपले म्हणून निवडून दिलेले प्रतिनिधि आपल्या हातानें लोकहिताचा गळा कापतात !

आतां दुसऱ्या एका दृष्टीनें विचार करूं. या कायद्याविषयीं कांहीं थोडया राष्ट्रीय वृत्तीच्या लोकांची भावना प्रसिद्ध आहे. पण देशांतील एकंदर लोकसंख्या जमेला धरली, आणि त्यांतील कोणाची वृत्ति नव्या कायद्यासंबंधानें काय आहे याचा हिशेब मनाशीं केला, तर बहुधा खालीलप्रमाणें आढळेल. गोरे, निमगोरे सगळे लोक या कायद्याचा पाठपुरावा करणार व पूर्ण फायदा घेणार. हिंदी लोकांपैकीं सर्व मुसलमान समाज, अगदीं खरोखरच मूठभर व्यक्तींखेरीज, या कायद्यावर मनांतून खूष आहे. तो वरकांती नापसंती व असंतोष दाखवो. पण तो नुसता बहाणा आहे. बळकट करण्याकरितां खुंटा व पुरें भरताड होण्याकरितां पोतें हलवितात त्याप्रमाणें, कायदा पक्का स्थिर व्हावा याकरितांच ते त्याला धक्के देतात. तें ढोंग आहे. मुलें खेळांत डोळ्याला हात लावून रडण्याचा स्वर काढतात, पण इकडे तोंडानें हंसत असतात. त्याच प्रकारचा खेळ या कायद्यासंबंधानें मुसलमान करीत आहेत. कारण त्यांना हवें तें, निदान रुपयांतलें पंधरा आणे, त्यांच्या पदरांत पडलें आहे. आणि इंग्रज त्यांना म्हणतात कीं, " तुमच्याबरोबर एक आण्याचें नुकसान आम्हींहि सोसलें आहेच कीं नाहीं ? चला तर तुम्हीं आम्हीं मिळून हिंदूंच्या डोक्यावर खुशाल मिऱ्यें वाटूं. बसूं देत ते ह्रांका मारीत व कायद्याला नांवें ठेवीत !"

मुसलमानांनंतर एतद्देशीय ख्रिस्ती व पार्शी हे बोलूनचालून इतके अल्पसंख्य आहेत कीं त्यांच्या मनांत या कायद्यावर बहिष्कार घालावयाचा आला तरी, दर्यामें खसखस या न्यायानें, त्यांच्या बहिष्काराचा परिणाम कांहींच व्हावयाचा नाहीं. पण बहिष्काराची कल्पनाहि त्यांच्या मनांत येत नाहीं. कारण त्यांना कांहीं देण्यासारखें असलें तर इंग्रजच तें देतील, आम्हां हिंदूंकडून त्यांना त्याहून अधिक मिळण्याची आशा नाहीं. ख्रिस्ती लोक वंशानें नसले तरी धर्मानें इंग्रज राज्यकर्त्यांना जवळ आहेत. ते प्रायः सुशिक्षित आहेत. आधींच संख्येच्या मानानें

त्यांना नोकऱ्या कांहीं कमी नाहींत. आणि ते अल्पसंख्य म्हणून त्यांना योग्य ठिकाणीं योग्य प्रमाणांत नेमून सरकार त्यांची काळजी घेतें.

पार्शी संख्येनें फारच थोडे. पण शिक्षण व्यापार उद्योगधंदे या सर्व दृष्टींनीं इतर कोणत्याही जमातीपेक्षां ते पुढारलेले आहेत. यामुळें कोणत्याहि खात्यांत किंवा प्रातिनिधिक संस्थेंत त्यांना संख्येच्या प्रमाणाबाहेर मानाच्या, अधिकाराच्या जागा मिळतातच. उलट संख्येचें प्रमाण त्यांच्यामागें लावलें तरच त्यांचें नुकसान होईल. आपल्या कर्तबगारीनें, अभिरुचीनें व व्यवहारचातुर्यानें त्यांनीं इंग्रजांना स्वतःला इतकें आवडतें करून घेतलें आहे कीं, उद्यां आणीबाणीचा प्रसंग आल्यास ते, समाज या नात्यानें, आपलें नुसतें वजनच नव्हे तर सर्वस्वहि सरकारी पारड्यांत टाकतील अशी सरकारची खात्री आहे. पार्शी समाजांतच दादाभाई, फेरोजशहा, बहादुरजी, नरीमन इत्यादि पुढारी झाले. पण ते केवळ अपवाद होत. याच्या उलट सरकारी बाजू उचलून धरणारे त्यांच्या दर्जाचे व वजनदारीचे लोक त्यांच्या पन्नास–शंभर पट सांपडतील.

नव्या कायद्याविषयीं मनांतून खरी अप्रीति वाटणारे विशेषतः जातिनिर्णयानें दुखावलेले असे, हिंदु लोकांसारखे राष्ट्रीय वृत्तीचे लोक म्हटलें म्हणजे शीखच होत. पण एकट्या पंजाब प्रांतांत ते फार तर तिसरा हिस्सा. यामुळें त्यांचें कितीसें चालणार ! हिंदु वैतागून उठतील तर त्यांच्या बरोबरीनें उठण्यासारखा साऱ्या हिंदुस्थानांत तेवढाच समाज दिसतो, पण हिंदु समाजाइतकाहि परिणामकारक आपला वैताग आपणाला करतां येणार नाहीं हेंहि ते जाणून आहेत.

राहतां राहिला हिंदु समाज. नव्या कायद्याचा बरावाईट काय परामर्ष घ्यावयाचा ठरेल त्यांतला मुख्य भाग या समाजाच्या वांट्याला नुसत्या संख्येनेंच नव्हे तर वृत्तीनेंहि येणारा आहे. आज देशांत ज्या राष्ट्रीय वृत्तीच्या चळवळी चालू आहेत त्यांत भाग घेणारे बहुधा हिंदुच प्रमुख व पुष्कळ आहेत, मग ती चळवळ कायदेशीर असो, किंवा कॉंग्रेसची म्हणजे निमसनदशीर असो, किंवा सोशियालिझमची, कम्यूनिझमची, किंवा क्रांतिकारक अत्याचारी असो. कॉंग्रेसच्या संघटित चळवळीला, मुसलमान व इंग्रज दोघेहि, ती हिंदुचळवळ आहे असें मानतात व तसें म्हणतातहि. आणि हिंदूहि या गोष्टीचा इनकार खऱ्या मनानें करीत नाहींत. खरें बोलावयाचें तर राष्ट्रीय चळवळीच्या पुढारीपणाचें श्रेय आपलें आहे याबद्दल ते भूषणच मानतात.

असें असतां हिंदु समाजांपैकीं तरी नव्या कायद्यावर बहिष्कर घालणारे कोण किती निघतील याचा विचार केला पाहिजे. १९२० सालापासून काँग्रेसनें कायदेकौन्सिलांवर बहिष्कार पुकारला तो पर्यायानें हिंदूंनींच पुकारला हें खरें. तथापि या बहिष्काराचा अर्थ इतकाच कीं फार थोडे हिंदु मतदार १९२१ च्या निवडणुकींत मतें द्यावयाला गेले. पण १९२३ पासून, म्हणजे काँग्रेस स्वराज्यपक्षाच्या स्थापनेपासून, १९३४ पर्यंत बहिष्काराचा अर्थ इतका संकुचित उरला कीं, काँग्रेसचे म्हणून उमेद्वार निवडणुकीस उभे राहिले नाहींत. स्वराज्यपक्षाचे उमेद्वार काँग्रेसमन म्हणवीतच होते व होतेहि. १९२३ पासून हिंदु मतदार-संघ मतें नोंदण्याकरितां सरांस पोलिंग स्टेशनावर जाऊं लागले. मग कांहींनीं काँग्रेस पुढाऱ्यांच्या गुप्त सल्ल्याप्रमाणें मतें दिलीं, जात्यभिमानाच्या धोरणानें दिलीं, पण दिलीं खरीं. पुष्कळांना १९२३ पासून पोलिंग स्टेशनच्या आसपास बहिष्कार हा शब्द् ऐकूं येत नाहींसा झाला. आणि काँग्रेसनें जरी शिक्कामोर्तबपूर्वक बहिष्कार उठविला नव्हता तरी, तिच्या पुढाऱ्यांनींहि हस्तेंपरहस्तें कायदे–कौन्सिलांचा फायदा आपल्या खासगी किंवा सार्वजनिक कार्याला भरपूर करून घेण्याला कमी केलें नाहीं ! १९३४ सालीं काँग्रेसनेंच कौन्सिलप्रवेश मान्य केल्यापासून आतां तर त्यांचा माथा उजळच झाला. आणि बहिष्काराच्या घोषणेमुळें व बढाण्यामुळें ज्या काँग्रेसवाल्यांना आपल्या कौन्सिलविषयक गुप्त भावना दडपून ठेवाव्या लागल्या होत्या, त्या आतां फोंफावून बाहेर उसळून येत आहेत व धिंगाणाहि घालीत आहेत हें आपण पाहतोंच ! आतां कौन्सिलबहिष्कार हा शब्द् जाऊन त्याच्या जागीं त्याच्याऐवजीं ‘ प्रधानपदावर बहिष्कार ’ हा शब्द् कट्टर काँग्रेसवाल्यांच्या तोंडीं कांहीं दिवस राहणार असें दिसतें. कारण “ तुझ्यापेक्षां माझी राष्ट्रीय वृत्ति अधिक कट्टर ” असें कांहीं लोकांना इतरांना भासवावयास हवें असतें. आणि एकांतिक मत ( आचरण नव्हे ) हेंच त्यांचें मुख्य भांडवल असतें. तात्पर्य, आज कौन्सिलबहिष्कार जरी नामशेष झाला, आणि कौन्सिलबहिष्कार नाहीं म्हणजे सर्वच्या सर्व नव्या कायद्यावर बहिष्कार नाहीं हेंहि ओघानें ठरलेंच.

## लेखांक २ रा

राज्ययंत्र हें जोंवर इंग्रज सरकारच्या हातीं आहे तोंपर्यंत, त्यावर आपण बहिष्कार घातला तरी तें आहे तसें चालूंच राहणार. जो बहिष्कार तें राज्ययंत्र

बंद पाडीत नाहीं तो नुसता निष्फळच नव्हे तर आत्मघातकीहि ठरतो. म्हणून सरकारानें नव्या कायद्यानें निर्माण केलेल्या लोकराज्यांत आपण शिरून, तें जितकें अधिकांत अधिक आपल्या तंत्रानें चालवितां येईल तितकें चालविण्याचा पराकाष्ठेचा प्रयत्न केला पाहिजे. मागील लेखांत लोकराज्याचा पहिला धडा म्हणून सांगितला तो हाच होय. परवां तिनेवल्ली येथील परिषदेचे अध्यक्ष सी. रंगा रेड्डी, एक प्रसिद्ध ब्राह्मणेतर पुढारी, यांनीं हाच उपदेश करतांना म्हटलें तें मार्मिकपणाचें होतें. ते म्हणाले "नव्या कायदेमंडळाचा व राज्ययंत्राचा उपयोग अवश्य करा; पण तें यंत्र मौल्यवान् आहे म्हणून नव्हे, किंवा त्याचें असेल तें मूल्य सिद्ध करण्याकरितांहि नव्हे; तर तें राबविणाऱ्या आपल्या शक्तीचें व शहाणपणाचें मूल्य सिद्ध करण्याकरितां" "यूज धी रिफॉर्म्स, नॉट फॉर व्हॉट दे आर वर्थ बट फॉर व्हॉट वुइ आर वर्थ."

कौन्सिल-प्रवेश करून प्रधानमंडळें बनवा म्हणणारा लोकशाहीइच्छु पक्ष देखील असेंच म्हणतो. राज्ययंत्रच बंद पाडावें हें प्रथम बुद्धिलक्षण कबूल. पण तें बंद न पडेल तर निदान आपल्या हातीं होईल तितकें ठेवणें हें द्वितीय बुद्धिलक्षण नव्हे काय ? या दोनहि बुद्धीच्या लक्षणभूत कार्यांत स्वदेशभक्ति हाच जिव्हाळा, स्वराज्य मिळवावें हेंच साध्य, आणि सत्याग्रहमिश्र विधायक कार्यक्रम हेंच साधन.

## हिंसक व अहिंसक साधनें

हल्लींचें राज्ययंत्र एकदम बंद पाडावयाचें तर तें क्रांतीशिवाय होत नाहीं. ही क्रांति सुखासुखी होणारी नाहीं. त्याला प्रत्यक्ष युद्ध, रणसंग्राम करावयाला पाहिजे. पण ती तयारी आज देशांत कोठें आहे ? कदाचित् कांहीं लोकांची असली तरी बहुसंख्य जनतेची नाहीं आणि बहुसंख्य जनतेची असली तरी तिला लष्करी शिक्षण व युद्धोपयोगी साधनसामुग्री कोठें आहे ? क्रांतिकारक हुतात्मे करतात तें इतकेंच कीं, जिवाची तळमळ थांबत नाहीं म्हणून, आपल्यापुरता शक्य तो उद्योग व पराक्रम करून, धाडस करून एखाद्दुसऱ्या प्रतिपक्षीय जीवाचा बळी घेतात; व त्याचा मोबदला म्हणून आपला बळी देतात. या आत्मसमर्पणाचें श्रेय मिळावयाचें तें त्यांना मिळतें; व सरकारच्या निगरगट्ट अशाहि मनावर त्याचा जो परिणाम व्हावयाचा तो होतो. पण ज्या आपल्या देशाकरितां ते हा आत्मयज्ञ करतात त्याला स्वातंत्र्य मिळवून देण्याला अशा शेंकडोंचा किंवा सहस्रांचाहि आत्मयज्ञ पुरा पडणार नाहीं.

महात्मा गांधी यांनीं हिंसा ही राजकारणांत निषिद्ध ठरविली असून, त्यांच्या कॉंग्रेसवाल्या भक्तांनीं अहिंसेची तुळशीची माळ गळ्यांत घालून घेतली आहे, व तिचे मणी ओढीत ओढीत ते जनतेला अहिंसेचा उपदेश करीत असतातच. हिंसात्मक चळवळ वैयक्तिकच होते. सामुदायिक होत नाहीं. पण आत्म-सामर्थ्याची गांधीप्रणीत सत्याग्रहाची असहकारितेची चळवळ ही सामुदायिक होऊं शकते, व तिला नीतिशास्त्राचा विरोध नाहीं. हें लक्षांत घेऊन गांधीजींनीं त्या चळवळीच्या दोन मोठ्या मोहिमा लढवून एक प्रकारचा मोठा संग्रामच केला. त्याचें श्रेय जनतेच्या जागृतीनें व संग्रामांत पडणाऱ्या लोकांच्या आत्मविश्वासाच्या प्रचीतीनें मिळण्यासारखें होतें तेवढें त्यांना मिळालेंहि. पण सरकारशीं प्रत्यक्ष सशस्त्र युद्ध हें जसें हल्लींच्या काळांत या देशांत अशक्य, तसेंच सत्याग्रहासारख्या सात्विक बलसंग्रामाचें फलहि मर्यादितच पदरांत पडणार.

## आतां वंचना कां !

किंबहुना ही गोष्ट जाणूनच म. गांधींनीं सामुदायिक सत्याग्रहाची चळवळ थांबविली, आपल्या एकट्याशिवाय दुसऱ्या कोणाला व्यक्तिशःहि सत्याग्रह करण्याला मना केलें, आणि कौन्सिलप्रवेश हा विद्यमान परिस्थितींत धर्म आहे अशा अर्थवादात्मक स्तुतीनें विधायक कार्यक्रमाचा मार्ग उपदेशिला. तो त्यांच्या अनुयायांनीं पूर्वींच्याच गुरुनिष्ठेनें व सरळ बुद्धीनें कां स्वीकारूं नये ! त्यांत खळबळ कां करावी ! खोटे बहाणे कां दाखवावे ! आत्मवंचना व परवंचना कां करावी !

'गांधी हे सेनापति, आम्ही त्यांचे सैनिक' असें म्हणविणारांना कौन्सिलांतील विधायक कार्यक्रम करणें हें आतां देशाच्या हिताप्रमाणेंच नैतिक कर्तव्याच्या स्वरूपाचेंहि ठरतें. बरें, एखादा साधनमार्ग वहिवाटून वापरून, कालांतरानें त्याविषयीं विद्वेष उत्पन्न होऊन, त्याचा तात्पुरता त्याग करावा असा कौल जनतेनें दिला तर, उद्यां पूर्वींसारखीच आणखी एखादी हुल्लड, एखादी मोहिम होईलहि तेव्हां ती करावी. पण नेहमीं पायांनीं उभें राहावें एका स्थानावर व सर्व लक्ष देऊन पहात राहावें दुसऱ्या स्थानाकडे, यानें निष्ठाहि साधत नाहीं व कर्मफलहि मिळत नाहीं.

पूर्वींच्या लेखांत हें दर्शविलें आहे कीं, एक कॉंग्रेसवाले सोडून, म्हणजे त्यांतल्या त्यांत बहिष्कारवादी कॉंग्रेसवाले सोडून, बाकी अनेक राजकीय पक्ष

असे आहेत कीं ते निवडणुकी लढविणार. आपल्यांतील बरेवाईट लोक, कमी-अधिक विश्वासाचे लोक कौन्सिलांत पाठविणार. आणि नव्या घटनेचें अस्तित्व सार्थ करणार. अशा वेळीं एका लहानशा पण प्रमुख वर्गानें विधायक कार्याला बगल देऊन इतरांना रान मोकळें सोडल्यास, स्वराज्याचें पाऊल पुढें पडण्याऐवजीं मागें पडण्याचाच संभव आहे. उलटपक्षीं या प्रमुख वर्गाचे प्रतिनिधि कायदेमंडळांत जाऊन प्रधानमंडळें बनविण्याच्या, अधिकारांच्या जागा घेण्याच्या, कामांत त्यांच्याशीं सहकार्य करतील तर फार फायदा होईल.

## धर्मस्वार्थ व देशभक्ति

कोणताहि काँग्रेसेतर पक्ष एकटा घेतला तर तो संख्येनें इतर सर्वांहून मिळून अधिक भरणार नाहीं हें खरें. तथापि इतर कोणताहि पक्ष एकेकटा घेतला तर तो संख्येनें काँग्रेस पक्षाहून कमी भरणार हेंहि तितकेंच खरें आहे. हे इतर पक्ष बहिष्कारवादी नाहींत म्हणून त्यांना देशभक्ति नाहीं असें भलतेंच कोणीहि बोलणार नाहीं. परंतु व्यावहारिक देशभक्तींत फरक असतोच. उदाहरणार्थ, मुसलमानांना हिंदुस्थानाविषयीं आपलेपणा वाटत असला तरी त्यांना आपल्या धर्माविषयीं आपलेपणा अधिक वाटतो. यामुळें धर्मस्वार्थ व देशहित यांमध्यें नक्की विरोध उत्पन्न झाल्यास, ते देशहितापेक्षां धर्मस्वार्थाला अधिक किंमत देतील हें उघड आहे. म्हणून कायदेमंडळांतील कार्य सफल करण्याचें काम सर्वस्वीं त्यांच्यावर विसंबून चालणार नाहीं.

उद्यां सरकारशीं अटीतटीचा सामना करण्याची वेळ आली तर ते त्या कामाला एकटे असले तर कमी पडतील. बहुसंख्य हिंदूंचें तसें नाहीं. स्वधर्माला राजकीय देशहिताहून अधिक महत्त्व देण्याची त्यांची प्रवृत्ति नाहीं. असली तर उलटच आहे. यामुळेंच काँग्रेसची चळवळ किंवा कोणतीहि राष्ट्रिय चळवळ ही हिंदूंनींच केलेली चळवळ असें सरकार व जग बोलतें. म्हणून बहुसंख्य हिंदु जनतेनें जर विधायक कार्यक्रमांतून अंग काढून घेतलें तर किती नुकसान होईल याची कल्पना करावी! उलट ते जर कायदेमंडळांतील आपलें स्थान धरून, सर्व प्रकारचे अधिकार आपल्या हातीं खेंचून घेण्याची व सरकारला पायबंद घालण्याची पराकाष्ठा करतील, तर त्यांच्या निःस्वार्था देशभक्तीचें अनुकरण इतर पक्ष करतील. त्यांचा धर्मस्वार्थ, जातिस्वार्थ हळूहळू कमी होऊन सरकारावर पदोपदीं मात होण्याचा संभव आहे.

## हंसें कोणाचें होईल !

हे इतर पक्ष काँग्रेस पक्षाला पुढारी मानण्याला तयार होऊं शकतील संख्येनें तर हा पक्ष सर्वांत मोठा म्हणून त्यांना त्याचें साहाय्य घ्यावेंच लागेल; पण इतर दृष्टींनींहि ते त्याच्या सल्लामसलतीला महत्त्व देतील असा आजपर्यंतचा अनुभव आहे. म्हणून केवळ धर्मविषयक, जातिविषयक अशा बाबी सोडल्या असतां इतर पक्ष काँग्रेस पक्षाच्या तंत्रानें, किंवा निदान सहकारितेनें तरी चालतील. आजपर्यंतचा अनुभवहि बराचसा असाच आहे. गेल्या आठवड्यांत वरिष्ठ कायदेमंडळांत क्रिमिनल लॉ अमेंडमेंट बिल दोनदां फेटाळलें गेलें तें काँग्रेस पक्ष तेथें नसता तर फेटाळलें गेलें असतें काय ! आज मुंबई कायदे-कौन्सिलांत काँग्रेसपक्षाकडे पुढारीपण नाहीं यामुळें सरकारचा हात कायदेमंडळाच्या कामांत वाटेल तसा चालतो. आणि त्यांना आपलें हित लोकनियुक्त प्रतिनिधींच्या हातून करवून साधवून घेतां येतें ! आणि उद्यां तर खुद्द प्रधानमंडळ बनविण्याचाच प्रसंग ! अशा वेळीं जर देशांतील राजकीय पुढारीपण हातीं असलेल्या पक्षानें दगा दिला किंवा कच खाल्ली, तर नांवानें लोकराज्य असून प्रत्यक्ष व्यवहारांत इंग्रजांचें राज्य आहे असें होईल.

देशांतील निरनिराळ्या वर्गांनीं आपापले प्रतिनिधि यथासंख्य निवडून पाठवून, आंखून दिलेल्या मर्यादेंत कां होईना पण, मन मानेल तसा राज्यकारभार करावा अशी एक नवी प्रयोगाची संधि, सरकारानें आणून दिली असतां, राजकारणांतील पुढारी पक्ष बगल देऊन, बहाणे करून, बाजूला राहील तर नव्या कायद्याचें किंवा घटनेचें हंसें न होतां तें जनतेचें हंसें होईल, हें काँग्रेस पक्षानें लक्षांत ठेवावें.

## लेखांक २ रा

महाभारतांत मयसभेचीं वर्णनें आहेत. त्यांतलें एक असें कीं, तेथें पाण्याच्या जागीं जमीन व जमिनीच्या जागीं पाणी दिसे. हिंदुस्थानविषयक नव्या पार्लमेंटरी कायद्यानें असाच कांहींसा देखावा हल्लीं निर्माण केला आहे. सरकारच्या बाबतींत सहकारिता हा धर्म लिबरल पक्षाशीं नियमतः चिकटलेला; आणि त्यांजवर बहिष्कार हा धर्म काँग्रेसला चिकटलेला. पण आज पहावें तों काँग्रेसवाले सहकारितेला उत्सुक व लिबरल पक्षांतीलच कांहीं वर्ग बहिष्काराला सज्ज दिसत आहेत ! हा चमत्कार नव्हे काय ? मयसभेंतून हिंडतांना, दुर्योधन जेथें

दार आहे असें समजून प्रवेश करूं लागला तेथें त्याचें भिंतीवर डोकें आपटलें, आणि जेथें संगमरवरी फरशी आहे अशा समजुतीनें तो सरळ चालत गेला तेथें तो हौदांत पडला ! नव्या राज्यघटनेविषयीं लिबरल पक्ष व काँग्रेस पक्ष हे कोणतें धोरण स्वीकारतील याविषयीं एखादा भोळा माणूस जुन्या परंपरेवरून अनुमान करावयास जाईल, तर त्याची अशीच फसगत झाल्याशिवाय राहाणार नाहीं. कारण बहिष्कारवादी सनातनी काँग्रेस पक्ष कायदेमंडळांतील अधिकाराच्या जागा स्वीकारणार व सहकारितावादी लिबरलपक्ष त्यावर बहिष्कार घालणार ! !

## दोन विरुद्ध टोकें

या चमत्कारानें आणखी एक नियम सिद्ध होऊं पाहत आहे. "विरुद्ध दिशेचीं अंतिम टोकेंच शेवटीं एकत्र भेटतात" हाच तो नियम होय. कसें तें पहा. सोशालिस्ट लोक क्रांतिवादी म्हणून त्यांना अधिकाराच्या जागांवर बहिष्कार इष्ट वाटतो; आणि लिबरल पक्ष उत्क्रांतिवादी, असें असतां त्यांनाहि म्हणे हा बहिष्कार इष्ट वाटतो ! पडली कीं नाहीं ही दोन परस्पर विरुद्ध टोकांची गांठ ? पण अविवेकानें कोणतीहि एक कड घेऊन भांडणारांचे शेवटीं असेंच होतें. ज्या काँग्रेसनें गेलीं चौदा पंधरा वर्षें बहिष्कारवादानें जगाच्या कानठाळ्या बसविल्या. तिनें जर उपरति होऊन कौन्सिल-प्रवेश हा केव्हां तरी धर्म न मानला, तर क्रियेइतकी प्रतिक्रिया होऊन जगांतला समतोलपणा कसा राखला जाईल ? तीच गोष्ट आज पन्नास वर्षें वेळीं–अवेळीं सहकारिता पुकारीत जाणाऱ्या लिबरल पक्षाचीहि होय. त्यानें सहकारितेच्या अजीर्णावर हें बहिष्काराच्या लंघनाचें औषध घेतलें असें वाटतें !

मुंबईचें 'इंडियन सोशल रिफॉर्मर' हें वर्तमानपत्र लिबरल पक्षाच्या मताचा एक रास्त नमुना असेंच समजलें जातें. या पत्राच्या ता. ३१ सप्टेंबरच्या अंकांतील अग्रलेखांत, त्यानें लिबरल व काँग्रेस या दोन्ही पक्षांना कौन्सिल-प्रवेश केल्यानंतर (!) अधिकाराच्या जागांवर बहिष्कार घालण्याचा म्हणजे प्रधानमंडळें न बनविण्याचा-उपदेश केला आहे. त्याची विचारसरणी खालीलप्रमाणें आहे–

" नव्या राज्यघटनेची घडण जेव्हां विलायतेंत सुरू होती तेव्हां पूर्वी राऊंड-टेबल कॉन्फरन्सला गेलेल्या कांहीं लिबरल लोकांनीं व न गेलेल्या काँग्रेसवाल्यांनीं ह्या घटनेचा जोरानें निषेध चालविला होता. हें दिसत असतां इंग्रज मुत्सद्दी

म्हणजे नव्या घटनेची तरफदारी करणारे म्हणत कीं, 'या लिबरलांचा व काँग्रेस-वाल्यांचा निषेध काय लक्षांत घ्यावयाचा आहे ! आजच्या बिलाला उद्यां काय-द्याचें स्वरूप येऊन तो सुप्रतिष्ठित तर होऊं द्या ! म्हणजे मग तुम्हीच पहाल कीं हे निषेधवालेच उद्यां कौन्सिलांत जातील आणि अधिकाराच्या जागा स्विकार-तील' आणि ही गोष्ट जर खरोखरीच घडून आली तर उद्यां ते म्हणणार "क-तेव्हांच नव्हतें तुम्हांला सांगितलें ? या निषेधवाल्यांच्या पोकळ निषेधाचें भविष्य!" आणि असें म्हणून खूप हंसतील !"

## "अधिकाराच्या जागा कशा स्वीकारणार !"

या आपत्तीकडे वाचकांचें लक्ष वेधून इंडियन सोशल रिफॉर्मर पुढें म्हणतो— "असें झालें तर हिंदी मुत्सद्देगिरीची बेअब्रू नाहीं का होणार ? ढोंगी हें नांव त्यांना नाहीं का चिकटून राहाणार ? आणि पुढें एखादा असाच प्रसंग आला तर तुमच्या आमच्या निषेधाला विलायतेंत कोण किंमत देईल ! पूर्वी बोलले एक व आतां करतात एक असें झाल्यानें बोलणाराची बेजबाबदारी म्हणजे बाष्कळपणाच सिद्ध होतो कीं नाहीं ? आपला शब्द आप-णच खोटा करणाऱ्या पुढाऱ्यांवर यापुढें हिन्दी जनतेनें तरी कसा विश्वास ठेवावा? प्रसंगविशेषीं खऱ्या मनानें मनुष्य आज एक बोलला तरी उद्यां त्याला त्यावि-रुद्ध कदाचित् वर्तन करावेंहि लागेल. बाह्य परिस्थिति अगदीं अकल्पित रीतीनें रोकडी बदलली तरच तें क्षम्य होऊं शकतें. पण वरील वाक्यांतील 'खऱ्या मनानें' हे शब्द महत्त्वाचे असून ते लक्षांत ठेविले पाहिजेत. कारण मुळीं बोललें तेंच जर खऱ्या मनाचें नसेल, तर विसंगत वर्तनाचा दोष न टळून शिवाय अप्रा-माणिकपणा पदरीं येतो ! आपण तोंडानें एक बोलत असतां मनांत दुसरें वाग-विणें हा अप्रामाणिकपणा नव्हे तर काय ? विसंगतता ही परिस्थितीमुळें, प्रासंगिक धोरण म्हणून, क्षम्य ठरेल. पण कोणी असें म्हणूं लागला कीं, "अहो विसंग-ततेला भिण्याचें काय कारण ? कां कीं आंत एक व बाहेर एक हें तत्त्वच सम-जून जर आम्ही राजकारणांत नेहमीं वागतों तर, आम्ही एक प्रकारें निष्ठावंत च ठरतों. अप्रामाणिक ठरत नाहीं." पण खऱ्या पुढारीपणाला हें शोभत नाहीं. विसं-गतता पत्करण्याची पाळी आलीच तर ती स्वीकारल्यानें आपली खरी भूमिका न सुटतां एकंदरीनें ती अधिक बळकट व्हावी व व्यक्तित्व अधिक प्रकट व्हावें. येथें तर सर्व उलटा प्रकार आहे. एका बाजूनें सर्वाधिकारसंपन्न व दक्ष व्हाइसरॉय व दुसऱ्या

बाजूनें सर्वाधिकारसंपन्न व लाडावलेले संस्थानिक, अशा जात्याच्या दोन दगडांत राष्ट्र भरडून निघावयाचा संभव असतां कशाच्या अधिकाराच्या जागा नी कशाचें काय!"

## आक्षेपांना उत्तर

इंडियन सोशल रिफॉर्मरचें सर्व म्हणणें आम्हीं अगदीं यथार्थ असेंच वर दिलें आहे. तेव्हां आतां त्यांतील एकेक मुद्दा घेऊन उत्तर देण्यास हरकत नाहीं. पहिलाच मुद्दा हा कीं, अधिकाराच्या जागा घेण्याचा किंवा प्रधान-मंडळें बनविण्याचा जो प्रश्न आहे तो, जेथें वर व्हायसरॉय व खालीं संस्थानिक अशा दोन दगडी पाळ्यांचें जातें ज्या कायदेमंडळांत मांडलें जाणार आहे, त्या मंडळासंबंधानें नाहीं, तर तो प्रांतिक कायदेमंडळापुरता आहे. वरिष्ठ कायदेमंडळांत अशा अधिकाराच्या जागा आधीं आहेत कोठें म्हणून त्या कोणी देईल किंवा कोणी घेईल?

यानंतरचा मुद्दा असा कीं, या जागा न घ्याव्या याचें कारण पूर्वीं ह्याविरुद्ध आपण आपल्याच तोंडानें केलेली घोषणा! या बाबतींत आमच्या मुंबईकर बंधूंचें म्हणणें कांहींसें खरें आहे. नवी राज्यघटना घडविली जात असतां तिचे दोष दाखवून तिजवर टीकेचा मारा सतत चालू ठेवणें योग्यच होतें. तेव्हां तो मारा लिबरल पक्ष व काँग्रेसवाले यांनीं चालू ठेविला हें योग्यच केलें. पण तो मारा करीत असतां, उद्यां कायदा झाल्यावर 'आम्ही या घटनेच्या मुख्य भागावर बहिष्कार घालूं व अशा रीतीनें ती मोडूं, तोडूं किंवा बंद पाडूं' असली भलती दशहत द्यावयाला त्यांना कोणीं भाग पाडलें होतें!

आधीं असली दहशत घालण्याचें कारण नव्हतें व ती दहशतहि निरर्थक होती! कारण आपण कोणी, म्हणजे घटना नापसंत असणाऱ्या चार लोकांनीं, तिजवर बहिष्कार घातला तरी ती मोडली—तोडली जात नाहीं, बंद पडत नाहीं, किंवा निरर्थकहि ठरत नाहीं हें त्या जाणत्या लोकांना समजावयास पाहिजे होते. बरें, नसती दहशत घातल्यानें सरकार खरोखरीच भिण्यासारखें असतें तर एक गोष्ट वेगळी. धनुष्याची दोरी नुसती ओढल्यानें शत्रु भिऊन पळून जाणारा असता तर मग बाण लावण्याची जरूरी नव्हती. आणि येथें तर धनुष्याची दोरी वाजली पण बाण भात्यांत नव्हता, किंवा असला तरी तो

बोथट होता, हें माहीत असतांहि लिबरल व काँग्रेसवाले यांनीं धनुर्धारीपणाची उठाठेव कशाला केली ?

## मंत्रिमंडळें ओस पडतील काय ?

बरें, समजा आतां ते आपल्या शब्दाला जागले तर ह्यामुळें अधिकाराच्या जागा रिकाम्या थोड्याच पडणार आहेत ? मंत्रिपद घेण्याला कोणीच तयार नाहीं असें बिनतोड ठरलें तर, नव्या कायद्याच्या कलमान्वयें, गव्हर्नरसाहेब सगळी घटनाच्या घटना तहकूब करून स्वतःच्या सुलतानी अधिकारानें राज्य चालवितील ! पण मुसलमान, अस्पृश्य वर्ग, ख्रिश्चन, पारशी, युरोपियन इत्यादि इतर सर्व पक्ष अधिकाराच्या जागांवर बहिष्कार तर घालणार नाहींतच. पण उलट त्या जागा कोणीं कशा मिळवाव्या, संपादाव्या, जिंकाव्या, गाजवाव्या याविषयीं ते आतांच आपले मनोरथ, चार-चार सहा सहा घोडे लावून, सजवूं लागले आहेत. ते का प्रधानमंडळ रिकामें ठेवणार ? यांतील कोणी जात्यभिमानी, कोणी धर्माभिमानी, तर कोणीं स्वहितसाधक, व्यवहारचतुर असतील, तर इतर कोणीं कदाचित् प्रामाणिकपणानें असें म्हणणारे असतील कीं, "ठीक आहे. आजच्या स्थितीच्या मानानें कायदा बरा आहे. त्यांतील अधिकार आपण न बजावावे, न भोगावे म्हणजे काय ?"

तात्पर्य, कोणच्याना कोणत्या तरी कारणानें घटनेचें काम अडून पडत नाहीं, उलट स्वार्थी, अशिक्षित किंवा निदान अगदीं अल्पसंख्याकांचे प्रतिनिधि अशा लोकांच्या हातीं हें राज्ययंत्र जाणार असें दिसत असतां, इं. सो. रिफॉर्मर हा लिबरल व काँग्रेसवाले यांना असा उपदेश करतो कीं, "बाबांनो, कौन्सिलप्रवेश अवश्य करा. शक्य तितक्या संख्याबलानें आंत शिरा. पण संभाळा कीं, त्या राज्ययंत्राचा प्रत्यक्ष स्पर्श किंवा विटाळ तुम्हाला होऊं देऊं नका. वर सांगितलेले इतर लोक त्या अधिकाराच्या सत्यनारायणाची-किंवा असत्यनारायणाची-पूजा करतील तेव्हां जवळ बसून त्यांच्या हाताला हात लावा, त्यांना शक्य तें पूजासाहित्य पुरवा. पण त्याचा प्रसाद घेण्याचा मात्र हक्क तुम्हाला नाहीं ! कां तर पूर्वीं तुम्हीं ह्या देवाला-किंवा दगडाला-नांवें ठेवण्याचा अपराध केलेला आहे म्हणून ! नवी राज्यघटना अशा रीतीनें नीट चालली व तिनें लोकांचें कांहीं बरें केलें तर तें सर्व श्रेय आपलें त्यांचें त्यांनाच मिळूं द्या कसें ! बरें. त्यांना अपयश आलें तर निदान मध्यें लुडबूड केल्याचा दोष तरी तुम्हांला लागणार नाहीं."

## हा नीतिबोध कोणाला ?

आमच्या मुंबईकर बंधूनें हा उपदेश लिबरल पक्षाला करण्यांत कांहींच स्वारस्य नाहीं. कारण त्यांच्यांतले लोक निवडून येणार किती ? व प्रधान होणार किती ? पण कॉंग्रेस पक्ष जर बऱ्याच मोठ्या संख्याबलानें कौन्सिलांत जाण्या-जोगा आहे असें रिफॉर्मरला वाटत असेल, व तें वाटत असावें असेंच दिसतें, तर त्यांना हा बहिष्काराचा उपदेश करणें म्हणजे व्यावहारिक राजकारणाचें शुद्ध अज्ञान प्रकट करणें होय. रिफॉर्मरचा लिहिण्याचा सर्व झोंक नीतितत्त्व-परामर्षांचा आहे. त्याला प्रामाणिकपणाचें महत्त्व वाटतें. पण त्याहि दृष्टीनें पाहतां कॉंग्रेसवाल्यांना हा उपदेश अनाठायींच ठरतो. कारण कॉंग्रेसवाल्यांच्याजवळ हा प्रामाणिकपणा तरी आहे कोठें ? आंत एक बाहेर एक याचा त्यांना विधिनिषेधच नसतो.

परवां नुकतेंच असें प्रसिद्ध झालें आहे कीं, विलायतेंत आगाखानाजवळ म्हणे बॅ. भुलाभाई देसाई व डॉ. अन्सारी हे बोलले कीं, "आम्ही नव्या कायद्यांतील सुधारणांचा ( सुधारणा हा त्यांचा शब्द आहे, आमचा नव्हे ! ) उपयोग पुढेंमागें करणारच आहोंत. आज जरा बेताबेतानेंच या जागांच्या स्वीकरणाच्या धोर-णाचें समर्थन करीत आहों तें करूं द्याना ! " कॉं. च्या वर्किंग कमिटींत आज दिसण्यांत दोन पक्ष व भांडणें आहेत. पण गिऱ्हाइकाच्या दुधांत पाणी घाल-ण्याकरितां गवळ्याच्या घरीं नवराबायकोचें भांडण चालतें त्यातलेंच तें होय. कुंभाराची सून शेवटीं उकरड्यावर यावयाचीच; मग प्रथम तिनें परीटघडीचें सणंग नेसलेलें कां असेना ? फक्त सोशालिस्ट लोकांनींच जरा सबूर करावी, म्हणजे कॉंग्रेसवाल्यांच्या मनांत प्रांतिक कायदेमंडळांत अधिकाराच्या जागा घ्यावयाच्या खरोखर आहेत कीं नाहीं हें तेव्हांच आपोआप दिसून येईल !

## लेखांक ४ था

लोकराज्याचा पहिला धडा हाच कीं नव्या कायद्यानें येणारी राज्यघटना कितीहि अपुरी, वाईट असली तरी तींतून मिळणारें थोडेंबहुत राज्य, म्हणजे राजकीय हक्क, हे लोकांकरितां आहेत व त्याहून महत्त्वाची गोष्ट म्हणजे ते हक्क लोकांनीं जाणतेपणानें बजावले तरच त्यांत श्रेय व भूषण आहे. समजा कीं, एखादा राज्यशास्त्राचा प्रोफेसर, एखादा महत्त्वाकांक्षी मुत्सद्दी व एखादा निरक्षर शेतकरी हे तिघेहि एकाच मतदारांच्या यादींत असूं शकतील. एखाद्या निवडणुकींत

त्या तिघांना एकेक मत असेल व ते तिघेहि मतनोंदणीच्या जागीं जाऊन तें मत टाकून येतील. पण राजकारणाच्या जाणीवेच्या दृष्टीनें त्या तिघांच्या मतदानाला तीन प्रकारची किंमत असूं शकेल. प्रोफेसरसाहेब म्हणतील कीं, "लोकराज्यघटक या नात्यानें मीं आपलें कर्तव्य केलें, मला थोडेंच निवडून यायचें आहे ! त्यांतून काय निष्पन्न होईल तें होवों !" शेतकरी म्हणेल, "निवडणूक म्हणजे ती बरी एक नवी दंगल निघाली आहे अलीकडे. या निमित्तानें तरी इकडचीं तिकडचीं दोन मातबर माणसें माझ्या घरीं येतात, कधीं नव्हे ती खुशामत करतात आणि व्याह्यासारखा मोटारींत घालून नेऊन घरीं आणून पोंचवितात. आपल्याला काय ! येऊन जाऊन हातीं देतील तें एक चिटोर पेटींत टाकावयाचें. मग कोणी कां निवडून येईना ! आपणाला कुणाचा सुहेर नाहीं कीं कुणाचें सुतक नाहीं. निवडून येईल तो काय माझ्या शेतांत पाऊस पाडील ? कां माझी करपट्टी भरून जप्ती वांचवील ? का वैरण महाग झाली तर माझ्या गोठ्यांतल्या गुरांपुढें आडवा पडेल ?"

## लोकराज्याचे घटक

पण तिसरा उरला महत्त्वाकांक्षी लटपट्या, किंवा मुत्सद्दी. तो मत देतांना मतपत्रिकेच्या कागदावर आपली सगळी राजकीय भावना ओतील. त्या कागदांत त्याला स्वार्थ परार्थ दोन्ही दिसतील. या कागदानें ( तो स्वतः उमेदवार असल्यास ) मी निवडून येईन किंवा ( तो स्वतः उमेदवार नसला तरी ) माझ्या पक्षाचा उमेदवार निवडून येईल, तो निवडून आला तर माझ्या पक्षाची सरशी होईल,सरशी झाल्यास त्यांतून प्रधानमंडळ बनविण्याला मदत होईल. त्या मंडळाकडून लोकपक्षाच्या कल्याणाचें अमुक एक बिल पुढें येईल, इत्यादि त्याचे मनोरथ त्याच्या मतपत्रिकेबरोबर मतदानाच्या पेटींत शिरतील असें म्हणण्यास कांहीं हरकत नाहीं.

पण या तिघांच्या व्यतिरिक्त चवथाहि मनुष्य लोकराज्यांत असूं शकेल. मतदारांच्या यादींत त्याचें नांव नोंदलेलें असेल पण त्याची त्याला माहिती नसेल. तो निवडणुकीला कधीं जाणार नाहीं. वर्तमानपत्र वाचणार नाहीं. राज्य म्हणजे काय व कसें याची त्याला माहितीहि असणार नाहीं. फक्त जेथें सरकारी अधिकाऱ्यांचा संबंध येईल तेथें त्यांचें निमूटपणें ऐकेल व सरकार देणें काय असेल व वाटेल त्या रीतीनें भरील.

हे चारहि लोक एकाच लोकराज्याचे घटक ना! पण लोकराज्य हें लोकांचें आहे, लोकांकरितां आहे व तें लोकांकडून व्हावयाचें आहे, या तात्त्विक कल्पनेचा परामर्ष चौघे चार निरनिराळ्या रीतींनीं कसा घेऊं शकतात हें वरील उदाहरणांवरून दिसून येईल. या चारांपैकीं एकच असा निघाला कीं, त्यानें लोकराज्याचा घटक ही पदवी सार्थ केली. आणि ही पदवी सार्थ करणारे उद्योगी देशभक्त ज्या देशांत अधिक निघाले त्यांनींच स्वराज्य व स्वातंत्र्य मिळविण्याची आघाडी मारली.

याचा अर्थ मात्र असा नव्हे कीं, मतदारी गाजविणें किंवा चालू राजकारणांत प्रत्यक्ष भाग घेणें हा एकच देशभक्तीचा मार्ग आहे. पण स्वराज्याला, स्वातंत्र्याला योग्य तें महत्त्व दिलें तरी प्रत्यक्ष राजकारणाचा व्यवहार, राजकारणाची जाणीव ठेवून त्याची उठाठेव केल्याशिवाय होत नसतो. समाजांतला एक विशिष्ट वर्गच ही उठाठेव विशेष करतो हें खरें. पण अशा उठाठेवीशिवाय आधुनिक पद्धतीचीं लोकराज्यें लाभत नाहींत, चालत नाहींत व यशाला पावत नाहींत.

## लोकसमाजाचें वाढतें महत्त्व

लोकसमाजांना दिवसेंदिवस सर्वच बाबतींत महत्त्व येत चाललें आहे. आणि नव्या कायद्यानें येणाऱ्या राज्यघटनेंत सत्ता कमी असली तरी, प्रातिनिधिक स्वरूप विनटलें आहे यांत शंका नाहीं. लोकराज्याची प्राथमिक मामुली खटपट व उत्क्रांतिमार्ग हीं तुच्छ मानून, एकदम क्रांतिच घडवून आणावी हें मत अधिक ग्राह्य असें कोणास वाटलें तरी हरकत नाहीं. कोणाच्या प्रयत्नानें कां होईना, हिंदुस्थानांतील जनतेला स्वराज्य व स्वातंत्र्य मिळो म्हणजे झालें. पण येथें सांगण्याचा मुख्य मुद्दा हा आहे कीं, तें स्वराज्य व स्वातंत्र्य मिळालें तरी पुढें तें टिकवून चालविण्याच्या वेळीं देखील लोकराज्याचा परामर्ष वर सांगितल्याप्रमाणें घ्यावाच लागणार आहे. कम्यूनिस्ट रशियांत झालें तरी मुळांत लोकराज्याचीच कल्पना असून आचारहि तसाच आहे. शिक्षणांत पहिला धडा सर्वांकरितां एकच असतो. गरीब स्थितींत मनुष्य आपल्या नांवाची सही करतो त्याहून कांहीं वेगळी सही तो कोट्याधीश झाला तरी करीत नाहीं. सहीचें प्राथमिक कार्य तेंच, मग त्याची फलश्रुति कितीहि वेगवेगळी असो. नव्या घटनेंत सरकारानें हिंदुस्थानांतल्या लोकसमाजाला मतदारीच्या द्वारानें तरी पुष्कळच महत्त्व दिलें आहे हें नाकारण्यांत अर्थ नाहीं.

## परराष्ट्रांतील स्वातंत्र्याचे प्रयत्न

स्वराज्य-स्वातंत्र्य मिळविण्याची इच्छा व प्रयत्न करणारा असा देश हिंदुस्थान हाच कांहीं जगाच्या इतिहासांत पहिला झाला नाहीं. युरोपांत नेदरलंड, आयर्लंड, इटाली इत्यादि देशांना हिंदुस्थानासारख्या परिस्थितींतूनच डोकें वर काढून स्वराज्य व स्वातंत्र्य मिळवावें लागलें. नेदरलंडवर स्पेनचें राज्य होतें. इटालीवर ऑस्ट्रियाचें राज्य होतें. आयर्लंडवर परवांपर्यंत इंग्लंडचें राज्य होतें. हीं सर्व उदाहरणें एका देशांतील लोकांवर दुसऱ्या देशांतील म्हणजे परक्या लोकांनीं चालविलेल्या राज्यांचीं आहेत. खुद्द इंग्लंडवर प्रथम रोमन लोकांचें राज्य होतें. पण पुढें रोमन लोक इंग्लंड सोडून निघून गेले. नंतर कांहीं शतकांनीं इंग्लंडवर नॉर्मन लोकांचें राज्य झालें, पण नॉर्मन लोक आले ते इंग्लंडांतच कायमचे राहिले; व कालांतरानें ते मूळच्या सॅक्सन लोकांशीं एकजीव झाले. यामुळें कालांतरानें त्यांचा परकेपणा निघून गेला.

हिंदुस्थानांत आलेले मुसलमान परकेच. त्यांनीं नॉर्मन लोकांप्रमाणें जिंकलेल्या देशांतच कायमची वस्ती केली, पण ते मूळच्या म्हणजे हिंदु लोकांशीं एकजीव झाले नाहींत. महाराष्ट्रांत स्वराज्याकरितां मोंगलांशीं युद्ध झालें तें परकी राज्यकर्त्यांशीं या नात्यानेंच झालें व त्यांत महाराष्ट्राला यश आलें. हिंदुस्थानांतील इतर भागांत परक्या इंग्रजांचें राज्य होईपर्यंत परक्या मुसलमानांचेंच राज्य राहिलें. तात्पर्य, स्वराज्याची–स्वातंत्र्याची चळवळ सुरू असते तींत राजे परकी असणें हा एक पहिला प्रकार असतो.

या चळवळीचा दुसरा प्रकार हा कीं, देशांत राज्यसत्ता स्वदेशी लोकांच्याच हातीं असते, पण ती कोणा तरी राजे म्हणविणाऱ्या बेजबाबदार लोकांच्या हातीं असते. आणि चळवळ होते ती त्यांच्या हातून ती सत्ता काढून घेऊन राष्ट्रांतील जनतेच्या हातीं यावी याकरितां होते. उदाहरणार्थ, या प्रकारची चळवळ, आज संस्थानी प्रजा करीत आहे. एकोणिसाव्या व विसाव्या शतकांत युरोपांतील पुष्कळ राष्ट्रांतून अशाच प्रकारची चळवळ झाली.

## जनतेच्या हातींच राज्यसत्ता

वरील खुलासा करण्याचें कारण असें कीं, हिंदुस्थानांतील राज्यसत्ता अखेर जनतेच्या हातींच जावी असें सर्वांनाच वाटत. असलें तरी, सद्यःकाळीं सुरू

असलेल्या चळवळींत मुख्य भर इंग्रज राज्यकर्त्यांच्या परकेपणावर द्यावा कीं राज्यसत्ता स्वकीयांच्या हातीं आणूं पाहाणाऱ्या जनतेच्या विशिष्ट आकांक्षेवर द्यावा, या विषयीं अगदीं दुमत नसलें तरी कांहीं तारतम्यभाव आहेच. इटालींत ऑस्ट्रियाविरुद्ध युद्धें झालीं तेव्हां कॅव्हूरसारखे मुत्सद्दीच काय, पण ग्यारिबाल्डीसारखे लोकमित्र, पहिल्या प्रकारची चळवळ प्रथम करावी या मताचे होते. इटालींत हिंदुस्थानाप्रमाणें देशी संस्थानिकांचीं जुलमी राज्यें होतीं. परंतु कॅव्हूर याच्या मतें "आधीं परक्या ऑस्ट्रियन लोकांना हाकून देऊं आणि मग देशी संस्थानिकांमागें लागून त्यांना सुधारूं. मात्र (रिपब्लिक) विराजक राज्यघटनाच स्थापण्याचें कारण आहे असें नाहीं." ग्यारिबाल्डी हा, अखेरच्या स्थितींत, मॅझिनीप्रमाणेंच संस्थानिकांना पदच्युत करण्यास तयार झाला असता. पण प्रथम परक्या ऑस्ट्रियन लोकांना हाकून द्यावें यावर त्याचा भर असून या कामीं, कॅव्हूरप्रमाणेंच, खुद्द संस्थानिकांकडून हें महत्‌कार्य करविण्याकरितां, त्यानें संस्थानिकांना महत्त्व दिलें. इटालियन संस्थानांत त्या वेळीं पिडमॉंट हें संस्थान त्यांतल्या त्यांत महत्त्वाचें व वजनदार असें होतें. कॅव्हूर हा या संस्थानचा दिवाण असून, त्यानें संस्थानचा राजा व्हिक्टर इमॅन्युअल ( हल्लींच्या इटलीच्या राजाचा पूर्वज ) याजकडून स्वातंत्र्याच्या युद्धांत पुढाकार घेवविला. ग्यारिबाल्डीनेंहि स्वयंसेवक जमवून बंड करून प्रथम नेपल्सचें संस्थान जिंकल्यावर, व्हिक्टर इमॅन्युअल यास पाचारण करून त्यानें सिसिलीचा राजमुकुट राजाच्या चरणीं वाहिला. सांगण्याचें तात्पर्य हेंच कीं, कॅव्हूर मुत्सद्दी व ग्यारिबाल्डी शिपाईगडी, दोघांहि देशभक्तांचें साध्य प्रथम परकी ऑस्ट्रियन घालवून देण्याचें होतें. विराजक बनवून राज्यसत्ता एकदम जनतेच्या हातीं देण्याचें नव्हतें.

पण या दोघांच्या समकालीनच तिसरा एक देशभक्त इटालीमध्यें होऊन गेला; त्याचें नांव मॅझिनी. याला परकी ऑस्ट्रियन राज्यकर्त्यांची चीड होतीच, परंतु एकाच क्रांतिकार्यांत दोन कामें एकदम साधून घ्यावीं या मताचा तो होता. तीं दोन कामें म्हणजे ऑस्ट्रियन राज्य घालवून देण्याबरोबरच सर्व इटालियन संस्थानांतील राजे पदच्युत करून, तेथें व सर्व इटालींत मिळून, लोकसत्ताक राज्य ( रिपब्लिक ) स्थापन करणें हीं होत. जगांत आज जें लोकसत्तेचें तत्त्व पुढारीपणानें वावरत आहे, त्याचें श्रेय क्रांतिकारक अमेरिकन तत्त्ववेत्ता टॉमस पेन, क्रांतिकारक फ्रेंच तत्त्ववेत्ता रूसो, किंवा क्रांतिकारक प्रशियन ज्यू

तत्त्ववेत्ता कार्ल मार्क्स याच्याप्रमाणें क्रांतिकारक इटालियन तत्त्ववेत्ता मॅझिनी याला आहे. हे सर्व देशभक्तच, पण त्याबरोबरच जनताभक्त होते. यामुळें जनता व राज्यसत्ता यांच्या दरम्यान येणारे राजे स्वदेशी असले तरी त्यांना ते नको होते.

## हिंदुस्थानांतील दोन पक्ष

आज हिंदुस्थानाकडे पाहिलें तरी तेथेंहि अशाच प्रकारचे दोन पक्ष असलेले आढळतील. हिंदुस्थानांत परकीय इंग्रजी राजसत्ता नसावी असें मनानें म्हणणारे सर्वच आहेत. ती असावी असें खऱ्या मनानें म्हणणारा कोणी असलाच तर क्वचित् एखादा. पण तोहि कदाचित् याचकरितां असेल कीं, "आज शेंदोनशें वर्षांच्या व्यवहारानें इंग्रजांचे व हिंदुस्थानचे लागेबांधे व ऋणानुबंध जमले आहेत, यामुळें निदान परस्परांच्या गरजेमुळें तरी त्यांचें राज्य राहिल्यास त्यांतल्यात्यांत हिंदी जनतेला कांहीं थोडी सत्ता मिळेल. पण इंग्रज गेले आणि आत्मरक्षण करण्याला आम्ही हिंदी लोक असमर्थ ठरलों, तर दुसरा एखादा परकीयच आमचें राज्य बळकावणार ! उदाहरणार्थ, जपानच घ्या ना ! कारण इंग्रजांच्या खालोखाल हिंदुस्थानांत व्यापाराचें बस्तान त्यानेंच बसविलें आहे. आणि जपान आला तर तो ताज्या दमाचा व नव्या भुकेचा. तो जनतेला आजच्याइतकेंहि स्वातंत्र्य देणार नाहीं. मग आहे तो इंग्रजच बरा नव्हे ?" पण असा व्यावहारिक युक्तिवाद करणारा कोणी झाला तरी, परक्यांचें राज्य हें एक अनिष्ट अरिष्ट असें मनांतून मानणाराच असणार. आणि तो अपवाद सोडून दिल्यास परकी राजसत्ता नसावी असें म्हणणारेच सर्व.

तथापि इटालींतील मतभेदाप्रमाणें येथेंहि आज मतभेद आहेत. म्हणजे "प्रथम हिंदुस्थानांतील राज्यसत्ता स्वकीयांच्या हातीं येवो, मग तो स्वकीयहि प्रत्यक्ष जनता नसून संस्थानिक कां असेना ? इंग्रज गेल्यावर ते व आम्ही पाहून घेऊं. किंवा कदाचित् त्यांना ठेवून त्यांच्याच हातून हवा तो कार्यभाग आम्ही करवून घेऊं." असा एक पक्ष आहे. स्वतः हिन्दी संस्थानिकहि या पक्षांत अंतर्भूत होतात ! कारण इंग्रज गेल्यावर पुढें राज्यसत्ता आपल्या प्रजेच्या हातीं देणार नाहीं असें म्हणणारे, देऊं न देऊं याविषयीं मुग्ध राहणारे, व देऊं असें आज तरी तोंडानें म्हणणारे संस्थानिक, हे आपल्या देशांत परकीयांची सत्ता नसावी हें इष्टसाध्य मानणारेच आहेत. आतां इंग्रजांची सत्ता जावी असें

ते उघड म्हणत नाहींत. याला कायद्याची व इंग्रजांची भीति हें तर खरेंच; पण त्यांना तें उघड बोलावयाचें असल्यास एक पर्याय मार्गहि अनुकूल आहे. तो असा कीं, इंग्रजांची सत्ता किंवा अधिराज्य आपल्या संस्थानांत नसावें म्हणजे आपलें संस्थान "स्वतंत्र" असावें असें ते म्हणतात. इतकेंच नव्हे तर तसा हक्क सांगतात व त्याकरितां वकील लावून भांडतातहि.

पण संस्थानिक काय म्हणतात हें आपल्याला पाहण्याचें कारण नाहीं. आपल्या प्रजेला ते परकीय नसले तरी स्वराज्याच्या हक्काच्या दृष्टीनें ते आजच्या इंग्रजापेक्षांहि बरेच मागें आहेत. म्हणून त्यांना वगळून उरलेल्या राजकीय पुढाऱ्यांचे कसे भाग पडतात हें पाहिलें तर, एका बाजूला कांहीं संस्थानांतील प्रगतिप्रिय दिवाण, म. गांधी व त्यांचे कांहीं अनुयायी कॉंग्रेसवाले, व दुसऱ्या बाजूस कम्यूनिस्ट व सोशॅलिस्ट. पहिल्या पक्षांतले लोक संस्थानापुरतें बोलतांना संस्थानिक उडवून टाकण्याची भाषा बोलत नाहींत व संस्थानिकांच्या हातूनच हळूहळू जनतेला स्वातंत्र्य देतां येईल असें ते म्हणतात.

पण खालसा मुलखासंबंधानें पाहतां प्रजा व इंग्रज राज्यकर्ते यांच्यामध्यें दुसरा तिसरा कोणीच नाहीं. म्हणून खालसांतील राजकीय चळवळीचें ध्येय म्हणून परकीयांची राज्यसत्ता काढून टाकून ती एकदम जनतेच्या हातीं यावी असें ओघानेंच म्हणणें प्राप्त होतें व ते तसें म्हणतातहि, परंतु याच विभागांत पडणारे सोशॅलिस्ट वगैरे लोक आणखी एक श्लेष त्यांतल्या त्यांत काढतात. संस्थानांत जसा संस्थानिक व इंग्रजांपासून त्याला स्वातंत्र्य मिळालें तरी तें संस्थानी प्रजेला मिळालें नाहीं हें जसें म्हणतां येतें, तसेंच खालसांतील भांडवलवाल्यांचा वर्ग हे एक प्रकारचे संस्थानिकच होत असें सोशॅलिस्टांचें म्हणणें आहे. आणि याच मुद्यावर आज कॉंग्रेस व सोशॅलिस्ट लोक यांचा मतभेद सुरू आहे.

## लोकराज्यांतून लोकशाही

सोशॅलिस्ट लोकांना संस्थानिक नकोत तसेच भांडवलवालेहि नकोत. त्यांचें म्हणणें असें कीं, संस्थानें हीं फार तर राज्ययंत्रें होत, कारखाने नाहींत. एखादा संस्थानिक जुलमी असेल तर तो एखाद्या प्रजाजनाचें व्यक्तिशः हवें तेवढें नुकसान करील. पण तो प्रजेला कारखान्यांतील गुलामासारखें तरी राबवीत नाहीं. उलट एखादा बडा कारखानदार भेटला तर त्याच्या निरनिराळ्या कारखान्यांतून एखाद्या संस्थानी प्रजेच्या लोकसंख्येइतके कामकरी असूं शकतात व त्यांना तो

सक्तीनें सतत राबवून घेऊन त्यांच्या प्रकृतीचा नाश करतो. या दृष्टीनें पाहतां कदाचित् बेजबाबदार संस्थानिकांच्या राज्यांतील प्रजा हीच अधिक सुखी व स्वतंत्र असते. वर्षांतून एकदां सरकार देणें देऊन टाकलें म्हणजे राज्ययंत्राचा प्रजेशीं प्रत्यक्ष असा संबंध कांहींच येत नाहीं. तात्पर्य, सोशॅलिस्टांच्या मतें ( १ ) संस्थानांतील संस्थानिक व भांडवलवाले आणि ( २ ) खालसांतील परकीय इंग्रज राज्यकर्ते व त्याचबरोबर भांडवलवाले जमीनदार वगैरे वर्ग नष्ट व्हावेत; आणि एकदम क्रांति व्हावी ती जनतेला राज्यसत्ता मिळण्याचीच व्हावी.पण कोणत्याहि प्रकारचें साध्य पदरांत पडलें तरी तें पुढें वहिवाटण्याचा मार्ग एकच असणार. तो म्हणजे लोकराज्यांतूनच लोकशाही निर्माण करणें हा होय. हा पहिला धडा राजकीय पुढाऱ्यांनीं स्वतः शिकला पाहिजे व लोकांना शिकविला पाहिजे. नुसतें स्वातंत्र्याचे पवाडे गाऊन काय होणार ! म्हणून सोशॅलिस्ट पक्षानें देखील जनतेला असें शिकवावें कीं, “बाबांनों क्रांतीकरितां तुम्हाला इतर काय करतां येईल तें कराच. पण ती जोखीम तुम्हाला घेतां येत नसली, तर कौन्सिलप्रवेश करा व करवा, अधिकारांच्या जागा घ्या व घेववा, व त्या अधिकाराच्या बळावर जें काय लोकहित साधवेल तेवढें अवश्य साधा व साधवा. बरें, क्रांतीच्या तयारीचें जोखमि तुम्हांला झेंपत असलें तरी देखील वरील सर्व गोष्टी करा. कारण त्या प्रथम क्रांतीच्या तयारीला अप्रत्यक्षरीत्या उपयोगी पडतील; व क्रांति घडली तरी पुढें लोकराज्यांतून लोकशाही निर्माण करण्याला वरील गोष्टींचें शिक्षण अवश्य आहे व उपयोगी पडणारें आहे. कम्यूनिस्टांचेंहि म्हणणें असेंच आहेना कीं राशियांत झोटिंगशाही नाहीं, तर डेमॉक्रसीच आहे ! मग जें डेमॉक्रसीचें शिक्षण आज मिळत आहे तें जनतेनें घेण्याच्या आड त्यांनीं कां यावें !

## लेखांक ५ वा

लोकराज्याचा पहिला धडा हा कीं राष्ट्रांत लोक म्हणून जे कोणी आहेत त्यांना राजकीय शिक्षण द्यावयाचें. हें शिक्षण देणें म्हणजे—( १ ) त्यांचें खरें राष्ट्रहित कशांत आहे; ( २ ) राष्ट्राच्या संघटनेंत स्वतः त्यांचें स्थान व महत्त्व काय आहे; आणि ( ३ ) हें स्थान व महत्त्व ओळखून त्यांनीं आपली बुद्धि व शक्ति खर्च केली असतां, ( आपल्या राष्ट्रापुरतें तरी ) ज्या प्रकारचें स्वराज्य शक्य असेल तें त्यांना कसें मिळवितां होईल–या तीन मूलभूत गोष्टी शिकविणें, समजावून देणें, व पटविणें.

पण कांहीं राजकीय पुढाऱ्यांची, निदान पुढारी होऊं पाहणारांची, रीत अशी असते कीं, जें डोळ्यापुढें आलें त्याला डोळ्याआड करावयाचें, आणि जें डोळ्याआड असेल तेंच डोळ्यापुढें आहे असें समजून त्याचें चिंतन, भजन, पूजन, करावयाचें व करावयाचा आग्रह धरून लोकांच्या मागें लागावयाचें. हे अप्रयोजक पुढारी रांगत्या मुलाला थंडीवाऱ्यांत उघडें टाकतील, आणि गर्भातल्या मुलाच्या अंगचीं माप मनानें घेऊन त्याला अंगडेंटोपडें शिवूं लागतील ! यामुळें रांगतें मूल अनास्थेनें मरावयाचें आणि आज गर्भात असलेलें मूल उद्यां रांगतें झालें म्हणजे तेंहि असेंच मरावयाचें ! कारण तें रांगतें होईपर्यंत फिरून गर्भातील मूल त्यांना दिसूं लागावयाचें ! ध्येयापाठीं ध्येयें उभीं असणारच !

इंग्रजींत एक मार्मिक म्हण आहे. "बेटर इझ धी एनीमी ऑफ धी गुड" तिचें भाषांतर "इष्टतर हा इष्टाचा शत्रु; व इष्टतम हा इष्टतराचा शत्रु" असें करतां येईल.

हिंदुस्थानांत आतां कोठें लोक जागे होऊं लागले आहेत. अशांना हाताशीं असलेल्या पाण्यानें तोंड धुवून पुसून, वाट पाहात बसलेल्या सकाळच्या कामाला लागावयास सांगण्याचें सोडून, कामधाम संपल्यावर संध्याकाळच्या रिकाम्या वेळीं कोणती करमणूक करावी याविषयींच बोलूं लागावें, तशांतला प्रकार होत आहे. लोकराज्याची पहिली पायरी म्हणजे मतदारी व ती हितकारक रीतीनें बजावण्याची तयारी. मतदारी म्हणजे मोक्ष नव्हे. पण मोक्षप्राप्तीला देखील साधनचतुष्टयाच्या शिडीनें चढावें लागतें. त्याप्रमाणें स्वराज्यप्राप्तीचेंहि साधनचतुष्टय असतेंच. स्वराज्याची अंतिम सत्ता हातीं आल्यावर मग तिचा उपयोग कसा करावा ही लोकांच्या मर्जीची गोष्ट आहे व ती त्यांनीं हवी तशी करावी. तोंपर्यंत स्वराज्य मिळवावयाला त्यांना शिकविलें पाहिजे. या शिक्षणाच्या शेवटीं क्रांति येते, पण त्याचा प्रारंभ आत्मज्ञानानें होतो.

राष्ट्रीयसभेच्या पन्नास वर्षांच्या प्रयत्नानें आज कोठें हिंदुस्थानांत लोकराज्याचें पहिलें स्वरूप दिसूं लागलें आहे. तोंच संपूर्ण राजकीय सत्ता लोकांच्या हातीं आल्यावर त्यांनीं ती कशी वापरावी याविषयीं त्यांचा बुद्धिभेद आजच कसून करण्यांत येत आहे. कोणी म्हणतो, " हिंदुस्थानांत हिटलरशाही व नाझिझम हीच पाहिजे. येथल्या लोकांना असा झोटिंगच मानगुटीला हवा. त्यांना

दंडुक्याशिवाय दुसरें कांहींच समजत नाहीं. शंभर मेंढरें एकटा धनगर एका काठीच्या व एका कुत्र्याच्या साहाय्यानें पाहिजे तशीं वळवितो, व हिंडवतो, व संभाळतो. जुन्या काळीं हिंदुस्थानांत राजे लोकांचें प्रस्थ माजलें तें उगीच नव्हे. एक धनी तो बहुगुणी. आज्ञापालन हाच पुरुषार्थ! अशा लोकांना कसलें स्वराज्य आणि कसली मतदारी!

## " डिक्टेटरशिप हवी पण— "

दुसरे कोणी म्हणतात कीं " हिटलरची नाझीशाही नको. त्याऐवजीं मुसोलिनीची फॅसिझम हीच बरी फॅसिझममध्यें नाझिझमचे अवगुण नाहींत. ज्यूसारख्या लोकांचा छळ नाहीं. कारखानदारी आहे, पण ती संघटित सहकारी स्वरूपाची आहे. म्हटलें तर राज्यांत दाखवावयाला राजा आहे, म्हटलें तर नाहीं. आज इटली म्हटला कीं मुसोलिनी हें नांव तोंडीं येतें. पण मुसोलिनी हा सर्वाधिकारी असला तरी इटालीच्या राज्याला राजा म्हणून कोणी आहे व त्याचें नांव व्हिक्टर एमॅन्युअल म्हणून आहे; हें कोणाला तरी माहीत आहे काय? पण मुसोलिनी शहाणा. त्यानें इटालियन लोकांची उज्ज्वल पूर्वपरंपरा लक्षांत ठेवून राजपद समूळ नष्ट केलें नाहीं. फार काय पूर्वींचीं स्वतःचीं सोशॅलिस्ट मतें टाकून देऊन त्यानें लोकसत्तेचा सिद्धान्त मागें घेऊन, स्वदेशभक्तीनें कां होईना पण व्यक्तिप्रतिष्ठेचा सिद्धान्त प्रस्थापित केला. तात्पर्य, हिंदुस्थानला डिक्टेटरच पाहिजे, पण तो हिटलरसारखा नको. मुसोलिनीसारखा हवा. "

तिसरे कोणी म्हणतात, " हिटलर व मुसोलिनी हे दोनहि उपयोगाचे नाहींत. ते कम्यूनिझमचे शत्रु आहेत. जर्मनी व इटाली यांत आज लोकराज्य नसून डिक्टेटरशिप असली तरी येथें भांडवलशाहीच नांदत आहे. पण लोकशाही ही भांडवलशाहीशीं विसंगत आहे हें ओळखून, लेनिननें आपल्या पूर्वींच्या लोकराज्यप्रेमी व सौम्य क्रांतिकारकांचा पाडाव करून संपूर्ण लोकराज्य स्थापलें; मात्र केवळ जनतेच्या हिताकरितां कम्युनिझम् स्थापिली तरी ती अमलांत आणण्याची सर्व राजकीय सत्ता सर्व लोकांच्या हातीं दिली नाहीं, तर कांहीं मुठभर व्यक्तींचें मंडळ बनवून त्यांचे हातीं ठेवून घेतली. शेवटीं लोकांचें हित करावयाचें हें खरेंच, पण राजकीय सत्ता एकंदर लोकांच्याच हातीं द्यावयाची म्हणजे ती विभागून टाकून अनेकमुखी करून कमकुवत करावयाची! लोक दयेला व प्रेमाला पात्र हें कबूल. पण ते अंतिम सत्ताधारी राहावेत हें नाकबूल. लेनि-

नहि डिक्टेटर होता, पण तो हिटलर किंवा मुसोलिनी यांच्यासारखा नव्हता; त्यांच्याहून तो शहाणा आणि खरा लोकप्रेमी होता. म्हणून हिंदुस्थानाला कम्यूनिझम व लेनिनशाहीच हवी."

आज हिंदुस्थानांतील लोकांपुढें हे वाद चालू आहेत. पण त्यांच्यापुढें या पर्यायांचीं भांडणें भांडण्यापासून स्वतःच्या कर्तव्याविषयीं सामान्य जनतेला कांहीं बोध होईल ? कीं ती जनता नुसती भांबावून जाईल ? याचा कोणी विचार करीत नाहीं. मागच्या पिढीच्या सुशिक्षित लोकांनीं हिंदुस्थानला स्वराज्य पाहिजे म्हटलें तेव्हां इंग्रजांनीं "तें स्वराज्य फक्त सुशिक्षितांना आपल्याकरितां पाहिजे, अखिल जनतेकरितां नको" असा बुद्धिभेद केला. आणि तो बुद्धिभेद यशस्वी होण्याचें एक साधन म्हणून अल्पसंख्याकांना, मागासलेल्यांना, चिथावणी देऊन त्यांना काँग्रेसचे दावेदार म्हणून उभे केलें. बरें, त्या सर्वांचे हक्क थोडे प्रमाणाबाहेरहि मान्य करून, राष्ट्रीयसभेनें पूर्ण स्वराज्याची कल्पना उभी केली, म्हणजे सर्व सत्ता परकीयांच्या हातून स्वकीयांच्या हातीं घेण्याची कल्पना पुढें मांडली, तों, इंग्रजांप्रमाणेंच, पण दुसऱ्या एका दृष्टीनें, ही स्वराज्याची मागणी खऱ्या जनतेकरतां नाहीं असा बहाणा करून, काँग्रेसमधलेच सोशॅलिस्ट व कम्यूनिस्ट फिरून बुद्धिभेदाला सज्ज झाले आहेत !

सुदैवानें आज काँग्रेस ही नमुनेदार मनःस्थितीला येऊन पोहोंचलेली दिसते. म्हणजे तिला जनतेच्या प्रेमामुळेंच मतदारीचें प्रेम वाटूं लागलें आहे. तिच्या हातून कायदेभंग किंवा सत्याग्रह अशा तीव्र स्वरूपाच्या मोठ्या चळवळी एकदम किंवा सतत होणार नाहींत, एकदम किंवा सतत झेंपणार नाहींत, म्हणून काँग्रेसनें त्या बंद केल्या. आज पंधरा वर्षांनीं काँग्रेसनें कौन्सिलप्रवेश मान्य केला. नवी राज्यघटना अर्थातच अपुरी, सदोष व निराशाजनक असें असतांहि, शक्य तितके राष्ट्रीय बाण्याचे प्रतिनिधि निवडून कौन्सिलांत पाठवावे असें ठरविलें. आणि त्यांना कौन्सिलांत प्रबळ करून त्यांच्याकडून अधिकारस्थानें काबीज करवावीं, प्रधानमंडळें बनवावीं, या गोष्टीकडे काँग्रेसची प्रवृत्ति होत आहे. तों इतक्यांत, हे सोशॅलिस्ट व कम्यूनिस्ट उद्यांचें गाऱ्हाणें आजच पुढें उभें करून, लोकराज्यप्राप्त कर्तव्य करण्यापेक्षां काँग्रेसनें केवळ क्रांतीचीच आराधना करावी असा बुद्धिभेद करूं लागले आहेत हें दुर्दैव नव्हे काय ?

वर दर्शविल्याप्रमाणें कोणाला डिक्टेटर झोटिंग पाहिजे असेल, आणि तो याव-

याचा असेल, तर यावयाचा त्या वेळीं येईलच किंवा सर्व भांडवलशाही नष्ट होऊन द्रव्योत्पत्तीचीं सर्व साधनें व त्या द्रव्याची वांटणी करण्याचा सर्व अधिकार सरकारच्या हातीं द्यावयाचा, म्हणजे कम्यूनिझम स्थापली जावयाची, ती पुढें होणार तर योग्य वेळीं स्थापली जावो. त्याला नको कोण म्हणणार ? किंवा हरकत कोण करणार ! कारण राष्ट्रांतील सर्व पाशवी शक्ति कोणाच्या हातीं आल्यावर मग त्याच्या आड कोण येणार ! त्यानें वाटेल तो राज्यपद्धतीचा प्रकार किंवा आर्थिक सिद्धान्त हे अमलांत आणावे, म्हणजे त्यांचे प्रयोग करून पाहावे. पण ज्या परदेशांचीं उदाहरणें डोळ्यांपुढें ठेवून हे लोक बुद्धिभेद करतात, त्यांचाच क्रम कसा झाला हें पाहिलें पाहिजे. रशिया, जर्मनी, इटाली, इंग्लंड या देशांत लोकराज्याचे पहिले धडे लोकांनीं गिरविले होते. राजकीय सत्ता तेथें स्वकीयांच्याच हातीं होती हें ध्यानांत ठेवलें पाहिजे. आज हिंदुस्थानांत राजकीय सत्ता स्वकीयांच्या हातीं नाहीं. ती अद्यापि परकीयांच्या हातून हस्तगत करून घ्यावयाची आहे. अशा वेळीं पुढें ती सत्ता प्रत्यक्ष हातीं आल्यावर लोकराज्याला कोणतें रूप द्यावें याचीं भांडणें लढवून, जनतेला घोंटाळ्यांत गोंधळांत कां पाडावें हें कळत नाहीं. आजचें प्रत्यक्ष कर्तव्य म्हणजे जनतेला, व त्यांतल्या त्यांत सुदैवानें जो मतदार ठरला त्याला, शिकवून शहाणें करावें, व त्याच्या हाताशीं असलेल्या प्रत्यक्ष कार्याला त्याला लावावें हेंच होय. हें कर्तव्य म्हणजे केवळ तीन वर्षांनीं एक वेळ मतदानाची चिट्ठी पेटींत टाकणें एवढेंच समजेल तो अज्ञानी होय. पण उलट त्या मतदारीला किंमत नाहीं असें म्हणणें हेंहि तितकेंच अज्ञानीपणाचें होय. पण असें होण्याचें कारण जनतेचें नांव घेऊन बोलणारांना जनतेविषयीं खरी कल्पनाच नसते हें होय.

झोटिंगशाहीची आराधना करावयाची झाली तरी लोकशिक्षणाचें कर्तव्य टळत नाहीं. झोटिंगशाहींत पार्लमेंटरी पद्धतीला थोडा संक्षेप दिलेला असतो हें खरें. तथापि झोटिंग हा प्रथम तरी लोकांतूनच व त्यांच्याच बहुमताच्या जोरावर पुढें येतो. तो स्थानारूढ झाल्यावर पुढील कामांत फारसें लोकांना विचारीत नसेल, पण स्थानारूढ होण्यापूर्वी त्यानें जनतेचें जीवन अनुभविलेलें असतें. हें जीवन अनुभविणें म्हणजे त्यांचीं सुखदुःखें त्यांच्यांत राहून त्यांच्याप्रमाणें भोगणें, त्यांच्या आकांक्षा समजावून घेऊन आपल्या स्वतःच्या आकांक्षा त्यांना सांगणें, त्यांना त्यांच्या मतदारीच्या सामर्थ्याची कल्पना आणून देणें, व आपल्या विश्वासाचा

मनुष्य प्रतिनिधि ओळखून काढून त्याला कार्यप्रवृत्त करावयास लावणें. लेनिन, मुसोलिनी, हिटलर हे मतदारांनीं निवडलेल्या प्रतिनिधींच्या जोरावरच अधिकारपद पावले. पार्लमेंटच्या दाराला कुलपें लागलीं किंवा तीं उघडीं राहून तींत कामकाज चाललें तरी यांपैकीं कोणतीहि गोष्ट मतदारांच्या जोरावरच होते. राष्ट्रांचा स्वयं-निर्णयाचा स्वयंवर महायुद्धानंतर करण्यांत आला तो मतमोजणीनेंच झाला. तात्पर्य, डिक्टेटरशिपच्या चरित्रांतहि लष्करी सामर्थ्याचा उपयोग असला तरी मतदार म्हणून कोणी राष्ट्रघटक नाहींत, किंवा त्यांच्या संमतीशिवाय मग ती संमति गर्भित कां असेना मुख्याधिकारी अधिकारारूढ होतात व लोकमतनिरपेक्ष अधिकार गाजवितात अशी भावना नाहीं. दुसऱ्या पक्षीं पार्लमेंटरी पद्धतीनें राज्यकारभार चालावा असें ज्यांना वाटत असेल, त्यांना तर मतदारांकडून निवडणुकी लढविणें व प्रधानमंडळें बनविणें याशिवाय गत्यंतरच नाहीं.

---

## ४ एकोणिसावें शतक

( केसरी ८ जानेवारी १९०१ )

गेल्या मंगळवारीं एकोणिसावें शतक संपून विसावे शतकास प्रारंभ झाला. शतक बदलावयाचें म्हणजे त्या दिवशीं उल्कापात, रुधिरवृष्टि इत्यादि अनिष्ट-सूचक चिन्हें होतात, अगर दिव्य घंटानाद, अमृतवृष्टि वगैरे शुभशकुन प्रत्ययास येतात असें थोडेंच आहे. त्याहि दिवशीं सूर्य उगवावयाचा तिकडेच उगवतो व मावळावयाचा तेव्हांच मावळतो. फार काय, पण साधारण कामधंदा करणाऱ्या माणसाला तारीख बदलली म्हणजे आपल्या कॅलेंडरचें पान बदलावें लागतें- तितकासुद्धां उपद्व्याप शतक बदललें असतां परमेश्वराच्या घरच्या कारखान्यांत लागत नाहीं. आणि तेंहि बरोबरच आहे. या अगाध काळसमुद्रांत एक शतक निघून जाणें म्हणजे पृथ्वीवरील खऱ्या समुद्रांतलें एक शिंपलीभर, अगर टिटवीच्या चोंचींत मावण्याइतकें पाणी कमी होणें यापेक्षां अधिक कांहीं नाहीं. एकोणिसावें शतक विसावें शतक असें म्हणणें म्हणजे ख्रिस्त मेला त्यापासून मोजलेल्या कालावधीचें एक माप होय. परंतु "राजा कालस्य कारणम्" ही म्हण येथें अक्षरशः वाच्यार्थानें लागू पडते. ज्याचा राजकीय अंमल त्याचाच शक चालावयाचा हें उघड आहे. छत्रादिकांप्रमाणें शक हेंहि एक मला राज-चिन्हच आहे. आजपर्यंत हिंदुधर्माभिमानी विक्रम शालिवाहन हे

शककर्ते होऊन गेले. हल्लींच्या मनूंत ख्रिस्त हा शककर्ता होऊन बसला आहे, व इंग्रजी शतकांत आम्हीं आपला काल ख्रिस्ती शतकांनीं व तारखांनीं मोजूं लागावें हें साहजिकच आहे. परंतु मापें नवीन केलीं म्हणून मापानें मोजण्याचा पदार्थ हा कांहीं नवीन नाहीं. ख्रिस्ताभिमान्यांचे दृष्टीनें पाहतां ख्रिस्त झाल्यापासूनच काय तें खरें जग, निदान जगांतील सुधारणा सुरू झाली असें दिसतें. ज्याप्रमाणें मुलाच्या गर्भावस्थेंतील दिवस त्याच्या वयाच्या हिशेबांत धरावयाचे नाहींत, त्याचप्रमाणें ख्रिस्ती शतकापूर्वींचें जगाचें वैभव व त्याची प्रौढी खऱ्या ख्रिस्ताभिमान्यांचे दृष्टीनें व्यर्थ होय. तथापि पौराणिक योद्धे बाजूस ठेवले तरी अलेक्झांडर, ज्युलियस सीझर, हॅनिबॉल सिपिओ, आफ्रिकन्स यांसारखे इतिहास प्रसिद्ध योद्धे; सिसरो व डेमोस्थिनीस यांसारखे वक्ते; प्लेटो, ॲरिस्टॉटल, पाणिनी, पतंजली व कणाद यांसारखे तत्त्ववेत्ते; सेमिरामिस, क्लिओपाट्रा यांजसारख्या ऐश्वर्यसंपन्न राण्या; वेद व झेंडावेस्टा यांजसारखे धर्मग्रंथ; बुद्धासारखे जगद्गुरु; व अशोकासारखे धर्मसंरक्षक चक्रवर्ती राजे ख्रिस्ती शतकापूर्वींच होऊन गेले ही गोष्ट लक्षांत आणली असतां ख्रिस्ताभिमान्यांची दृष्टि किती कोती आहे हें तेव्हांच दिसून येईल. ख्रिस्ती शकास वाजवीहून जास्त महत्त्व देणें म्हणजे माझ्या दारचा कोंबडा आरवेल तेव्हांच खरा अरुणोदय होईल असें म्हणण्याइतकेंच शहाणपणाचें आहे. असो; तथापि आजमितीस ख्रिस्ती शकाचे मापानें वेळ मोजण्याचा प्रसंग आला आहे खरा व ज्या विचारी मनास वेळोवेळची जगाची स्थिति ताडून पहावयाची असेल त्यास मार्गावरचे जसे मैल त्याचप्रमाणें प्रस्तुत राष्ट्राच्या आयुष्यक्रमांत शतकें हीं स्थूल मानानें उपयोगीं पडतील.

एकोणिसाव्या शतकांत जगाची एकंदरीनें किती सुधारणा झाली आहे याचें समर्पक विवेचन करणें झाल्यास त्यास केसरीचे दहावीस अंकहि पुरणार नाहींत. परंतु आज तोच विषय अवघ्या दोन कॉलमाच्या जागेंत आम्हांस सांगावयाचा आहे. विवेचन करतांना हिंदुस्थानासंबंधीं विशेष विचार तूर्त एका बाजूस ठेवूं. बाकीच्या देशांविषयीं विचार करतांना असें दिसतें कीं, गेल्या शतकांत जगाची सांपत्तिक सुधारणा पुष्कळच झाली. आजपर्यंत कोणाचे हातीं लागला नव्हता असा, एक परिस एकोणीसावे शतकांतील लोकांस लाधला असून तो लावावा त्यास बहुधा सोनेंच करित चालला आहे. हा परिस म्हणजे भौतिक शास्त्राचें

ज्ञान हें होय. या ज्ञानाचे योगानें प्रत्यक्ष यक्षिणीची कांडी फिरल्याप्रमाणें सर्व जगाचें स्वरूप एकदम पालटून गेलेलें आहे. वाफेची शक्ति व विद्युत्प्रवाहाचे अंगीं असणारे विलक्षण गुण यांचा हजारों तऱ्हेनें मनुष्याला उपयोग करितां येऊं लागला हें या शास्त्रीय ज्ञानाच्या फळांपैकीं सर्वांत प्रमुख फळ होय. ज्यापासून चार पैसे लोक मिळवित आहेत असा आजकालचा कोणताहि धंदा घेतला तरी त्यांत वाफ व विद्युत् यांनीं बराच कार्यभाग प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्ष रीतीनें उचललेला नाहीं असें बहुधा आढळणें कठीण आहे. शास्त्रांचे इतर शाखांतूनहि अपूर्व शोध लागलेले आहेत. परंतु त्यांचें महत्त्व व्यावहारिक उपयुक्ततेच्या दृष्टीनें विशेष नाहीं. तथापि, एकाद्या मेजवानींत पक्वान्नास जरी प्राधान्य असल तरी रुचि येण्यास इतर पदार्थ अवश्य असतात त्याचप्रमाणें एकोणिसाव्या शतकांतील सुधारणेंत शास्त्रीय ज्ञानानें झालेलें अपार द्रव्योत्पादन हा जरी मुख्य घटक मानला तरी इतर हजारों रीतींनीं सुखोपभोगाची लालसा मनुष्यमात्राचे ठिकाणीं उत्पन्न करून ती पुरविण्याचे कामीं शास्त्रीय ज्ञानाचा जो उपयोग झालेला आहे तोहि कांहीं कमी महत्त्वाचा नाहीं. दुसरे पक्षीं पाहतां वैद्यक वगैरे शास्त्रांत जे शोध लागलेले आहेत त्यांचे योगानें रोगांचीं नवीं निदानें व नवीन औषधें कळून मनुष्यमात्राचें दुःख कमी करण्याचीं साधनेंहि उपलब्ध झालेलीं आहेत. परंतु वेदान्ताचे दृष्टीनें द्रव्याची सुज्ञ लोकांनीं जी निंदा केलेली आहे तिचाहि पण प्रत्यय एकोणिसाव्या शतकांत जगांत येऊन चुकला आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. जगांतील सुखांचा सांठा परिमित आहे असें कित्येकांचें म्हणणें आहे. म्हणजे एका बाजूनें जर मनुष्यजातीस सुख अधिक झालें तर दुसऱ्या कोणत्या तरी बाजूनें त्यांचें दुःखहि अधिक वाढतें. एकोणिसाव्या शतकांत केवळ द्रव्यानें मिळणारीं सुखें अधिक वाढलीं असतील यांत शंका नाहीं; परंतु द्रव्याचे मागून लोभ, पाप, अनीति वगैरे सर्व लटांबरच्या लटांबर आलेंच पाहिजे, व एकोणिसाव्या शतकांतील लोकांचें सुखसमाधान व त्या पूर्वींच्या काळांतील सुखसमाधान यांची तुलना केली असतां एकोणिसाव्या शतकाचें पारडें वर जाईल यांत बिलकूल शंका नाहीं. द्रव्याइतकेंच मनुष्यास प्रिय असलेलें जें राजकीय ऐश्वर्य त्याचे दृष्टीनें पाहतां गेल्या शतकांत जगामध्यें फारच मोठ्या उलाढाली झाल्या आहेत. युरोप खंडांत या शतकाचे प्रारंभीं दहा बारा राष्ट्रें महत्त्वाचीं होतीं. परंतु आज तारखेस फक्त तीनचारच पुढें सरसावलीं

असून, बाकीच्यांना कीड लागून कांहीं तर नामशेषच झालीं आहेत व कांहीं नामशेष होण्याच्या पंथास लागलीं आहेत. वरील तीन चार राष्ट्रें म्हणजे इंग्लंड, फ्रान्स, रशिया व जर्मनी हीं होत. इंग्लंडचा मुलूख व त्याच्या ताब्यांतील प्रजा गेल्या शंभर वर्षांत किती तरी पटींनीं वाढली आहे. ⅞ हिंदुस्थान, सुमारें ⅞ ऑस्ट्रेलिया, निम्मी शिम्मी दक्षिण आफ्रिका व अमेरिकेचे उत्तरेस असणारीं कित्येक मोठमोठीं बेटें इतकी सर्व शंभर वर्षांतील एका इंग्लंडची कमाई होय. रशियाची कमाई मुलुखगिरीनें विशेष झालेली नाहीं, परंतु एकंदरीनें संपत्ति, राजसत्ता व लष्करी सुधारणा इत्यादिकांनीं रशियाचें प्रस्थ इतकें वाढलें आहे कीं, आज जगामध्यें इंग्लंडास शक्तीनें व महत्त्वाकांक्षेनें बरोबरीचा शत्रु असा रशिया हाच एक होय. जर्मनी म्हणजे प्रशिया हें राष्ट्र फ्रेडरिक धी ग्रेट राजाचे पराक्रमामुळें जरी आगाऊच प्रसिद्धीस आलेलें होतें, तरी १८७० सालीं फ्रान्सला जिंकल्यामुळें जर्मनींतील संस्थानें व प्रशिया यांचे मनांत संयुक्त होण्याची प्रेरणा होईपर्यंत या राष्ट्रास फारसें महत्त्व नव्हतें. परंतु बादशहा थोरला विल्यम, प्रिन्स बिस्मार्क व काऊंट व्हान मोल्टके, या त्रिवर्गांनीं एकदम जर्मनीस महाराष्ट्राचें वैभव प्राप्त करून दिलें. हल्लीं फ्रान्सचे दिवस फारसे चांगले नाहींत; तथापि नेपोलियन बोनापार्टनें चालू शतकाचे प्रारंभीं या राष्ट्रास जी कीर्ति एकदम दहा वर्षांत मिळवून ठेविली ती नाहींशी होण्यास आजच्या स्थितींत १९ वें शतक जाऊन २० वेंहि शतक पुरेल कीं नाहीं याची वानवाच आहे. याच शतकांत ग्रीस, इटाली व हंगेरी या लहानशा राष्ट्रांसहि स्वातंत्र्य मिळालें व मॅझिनी, गॅरिबाल्डी, व्हिक्टर एमॅन्युएल, काऊंड कॅव्होर व लुई कोसूथ यांनीं स्वदेशभक्त म्हणून अद्वितीय कीर्ति संपादली. दुसरे पक्षीं पहातां पोलंडचें राष्ट्र साफ जमीनदोस्त झालें. एक वेळ सर्व युरोपास भारी असा आस्ट्रेलिया आज गोगलगाय झाला आहे. पोर्तुगालचें नांवहि फारसें कोणास ऐकूं येत नाहीं. स्पेन हें राष्ट्र एके काळीं फार चांगलें होतें असें म्हणून त्याची कींव करण्याची आज वेळ आली आहे. व टर्कीस फाडून खाण्यास इतर युरोपियन राष्ट्रें फक्त संधि मिळण्याची वाट पहात आहेत. अमेरिकेंत मात्र प्रजासत्ताक राजसंस्था भरपूर खत घातलेल्या एकाद्या बागेप्रमाणें फोंफावून वाढत चालली आहे; व या शतकाचे मध्यभागीं उत्तरेचीं संस्थानें व दक्षिणेचीं संस्थानें यांजमध्यें प्रचंड यादवी माजली होती तरी लोखंडाचे दोन

तुकडे तापवून लाल केले असतां त्यांचा संयोग जसा दृढ होतो त्याचप्रमाणें लढाईनें या दोन राष्ट्रांचा संयोग होऊन आज युनायटेड-स्टेटस् हें जगांत पहिल्या प्रतीचें राष्ट्र होऊन बसलें आहे आफ्रिकेंत मूळचें स्वतंत्र होते. ते बहुतेक युरोपियन लोकांच्या अमलाखालीं येऊन मद्य, ख्रिस्ती धर्म व पारतंत्र्य या तीन गोष्टींचे ते कायमचे गुलाम होऊन गेले आहेत. आशिया खंडांत पहातांहि बरेंच स्थित्यंतर झालें आहे. हिंदुस्थान पूर्णपणें इंग्रजांच्या अमलाखालीं आला असून, चिनास मरणापूर्वीं क्षणैक जागृति आल्याचा भास होत आहे. जपानमात्र प्रथमपासूनच स्वतंत्र होतें. त्याची सुधारणा होऊन तें संपन्न व बलिष्ठ झालें आहे, व जेथें हिंदु लोकांच्या धर्माजवळ जवळ असलेला धर्म व स्वातंत्र्य हीं एके ठिकाणीं नांदत आहेत असें पृथ्वीच्या पाठीवरील दाखविण्याजोगें एवढेंच उदाहरण आहे. बाकीचे महमदी धर्मानुयायी-पर्शियाचा शहा, अरबस्थानांतील शेख, व अफगाणांतील मलीक यांजवर युरोपियन राष्ट्रांचे पाश हळूहळू पडत चालले आहेत. तात्पर्य, अशा रीतीनें ख्रिस्ती धर्मवाल्यांच्या राजसत्तेचा उत्कर्ष व विधर्मीयांच्या राजसत्तेचा ऱ्हास असा हा चमत्कार १९ वे शतकाचे इतिहासांत ठळक रीतीनें ध्यानांत येण्यासारखा आहे. तथापि, खुद्द धर्माचे दृष्टीनें पाहूं गेलों तर १९ व्या शतकांत धर्मबुद्धीचा ऱ्हासच झाला आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. पूर्वीं धर्माकरितां टर्की व युरोपियन राष्ट्रें यांजमध्यें जशा लढाया झाल्या किंवा १७ व्या शतकांत प्रॉटेस्टंट व रोमन कॅथोलिक यांजमध्यें जशीं रणें माजलीं, किंवा हिंदुस्थानांत मुसलमान व हिंदु यांजमध्यें लढाया झाल्या, तशा प्रकारची केवळ धर्मबुद्धिप्रेरित अशी एकहि लढाई चालू शतकांत झालेली नाहीं. आतां ग्रीस राष्ट्रास स्वातंत्र्य मिळविण्याच्या कामीं रशियानें टर्कीशीं युद्ध केलें त्याचप्रमाणें १८७७-७८ सालीं बल्गेरियांतील ख्रिस्ती लोकांची कत्तल झाल्यामुळें युरोपियन राष्ट्रांस टर्कीबरोबर लढण्यास आयती संधि मिळाली तरी त्या लढायांचे हेतु खरोखर धर्मसंबंधीं नसून बहुधा राजकीयच होते. राष्ट्रांचे अंतर्व्यवस्थेंतहि या शतकांत धर्मास फारशी जागा मिळत नाहींशी झाली आहे. प्रजेनें वाटेल त्या धर्माचा अंगिकार करावा, कोणतेहि राजकीय हक्क प्राप्त होण्यास विशिष्ट धर्मानुगामित्वाची मुळींच गरज उरलेली नाहीं. तात्पर्य, १९ व्या शतकांत व्यक्तीस प्राधान्य येऊन तिला राजकीय बंधनाखेरीज बहुधा बंधन उरलेलें नाहीं. अशा तऱ्हेचें स्थूल मानानें एकोणि-

साव्या शतकाचें स्वरूप आहे. हें वर्णन वाचून कलिमाहात्म्य वर्णनापैकीं खालील श्लोकाची पुष्कळांस आठवण झाल्याशिवाय राहणार नाहीं.

**न देवे देवत्वं कपटपटवस्तापसजनाः।**
**जने मिथ्यावादी विरलतरवृष्टिर्जलधरः॥**
**प्रसंगो नीचानां अवनिपतयो दुष्टमनसः।**
**जना भ्रष्टा नष्टा अहह कलिकालः प्रभवति॥**

असो. विसाव्या शतकाचा प्रारंभ हा असा आहे. शेवट कसा होतो हें पाहण्यास मात्र हल्लीं जगांत जिवंत असलेला एकहि मनुष्य उरणार नाहीं !!!

---

## ५ खोती व शेती

### लेखांक १ ला

( केसरी, तारीख २५ मे सन १९०९ )

संगमेश्वरच्या तालुकासभेच्या निमित्तानें गेल्या पांचचार आठवड्यांत रत्नागिरी जिल्ह्यामध्यें हिंडण्याची मला संधि मिळाली; व फार वर्षें कोंकण पाहण्याचें मनांत असल्यामुळें मी चारपांच तालुके हिंडलों. सदरहू प्रांतांत या रम्य परंतु खेदजनक प्रांतासंबंधीं बऱ्याच गोष्टींचा दृग्प्रत्यय मला घडला. कोंकणांतील हवापाणी व देखावा हा जितका रम्य आहे, तितकेंच कोंकणांतील दारिद्र्य हें खेदजनक आहे. परंतु या दोन्हीं बाबींसंबंधानें प्रस्तुत मला लिहावयाचें नाहीं. तर १९०४ च्या खोती कायद्याच्या अंमलास प्रत्यक्ष सुरवात झाल्यापासून, गेल्या एक दोन वर्षांत, रत्नागिरी जिल्ह्यामध्यें जी एक प्रकारची नवीन चळवळ सुरू होऊन सामाजिक स्थित्यंतर घडून आलेलें आहे, तें आजच्या तारखेस विशेष महत्त्वाचें वाटल्यावरून त्याबद्दलची थोडीबहुत माहिती आपल्या वाचकांस देण्याचें मीं योजिलें आहे. सदरहू प्रश्नासंबंधीं खोत व रयत या दोन्ही पक्षांचें म्हणणें मला ऐकावयास सांपडल्यावर वरील कायद्याची अंमलबजावणी करण्यास चालू सालीं नेमलेले स्पेशल रेकॉर्डिंग ऑफिसर मि. ग्यारेट, आय. सी. एस., यांची स्वारी दापोलीस म्हणजे माझ्या वाटेवरच असल्यामुळें सरकार पक्षाचें म्हणणें त्यांजकडून कळेल या हेतूनें, मी केसरीचा प्रतिनिधि या नात्यानें त्यांची मुद्दाम मुलाखत घेतली, व त्यांनींहि आपले विचार मला शांत व प्रांजलपणानें सांगितले. तात्पर्य, त्रयस्थ मनुष्यास थोड्याशा अवधींत अशा प्रश्नासंबंधानें जी माहिती

मिळणें शक्य आहे ती सहजासहजीं मिळाल्यामुळें तिचा फायदा केसरीच्या वाचकांस व्हावा याकरितां केसरीची जागा खर्ची घालीत आहें.

प्रायः निश्चळ, निवांत व मागासलेल्या कोंकणांत एकादी चळवळ कशी होऊं शकेल, असें देशावरील लोकांस सकृद्दर्शनीं वाटेल. परंतु १९०४ च्या खोती कायद्यानें कोंकणांतील खोती कुळांवर कांहीं विलक्षण परिणाम झालेला आढळून येतो. या नवीन कायद्यामुळें, एका अतर्कित रीतीनें, शेंकडों वर्षें सुताप्रमाणें सरळ वागणाऱ्या कुळांच्या मनांत वक्रतेचा एकदम संचार झालेला असून, या अवधींत राजाप्रमाणें अधिकाराचा उपभोग घेतलेले खोत खडबडून जागे होऊन आपण आहोंत कोठें व आपण पुढें कोठें जाणार, याविषयीं भांबावल्यासारखे होऊन चिंतामग्न झालेले दिसतात. वास्तविक या कायद्यानें दिसायला जें काय केलें तें इतकेंच कीं, कुळ व खोत यांमध्यें पूर्वापार चालत आलेली अभावणीची पद्धति मोडली. जर कुळास यापुढें ही पद्धत नाकबूल असेल तर त्यानें सरकाराकडे तशा अर्थाचा अर्ज करावा, व तसा अर्ज केला असतां खोतास पिकाचा ठराविक अंश म्हणून घालण्याचे गल्ल्याऐवजीं इतउत्तर त्याच्या किंमतीइतकी नक्त रक्कम देवविण्याचा ठराव सरकार करील, व मग फक्त तेवढ्या रकमेपुरती मदत मुलकी अधिकारी खोतांस देणार. मोबदल्याची नक्त रक्कम ठरविण्याचे कामीं आपल्या अभावण्या खतावण्या वगैरे कागदी व वहिवाटीचा इतर तोंडी पुरावा खोतानें वाटेल तर द्यावा; हा पुरावा विश्वसनीय वाटल्यास रेकॉर्डिंग ऑफिसर त्या पुराव्यावरून बसेल ती योग्य रक्कम ठरवील; परंतु पुरावा विश्वसनीय नसेल तर अर्धेलीच्या ऐवजीं सरकार दस्ताच्या तिप्पट; व तिर्धेलीच्या ऐवजीं सरकार दस्ताच्या दुप्पट इतकी नक्त रक्कम ठरवावी असें या नवीन कायद्याचें मुख्य कलम आहे.

देशावरील वाचकांकरितां याचा थोडासा अधिक खुलासा करणें जरूर आहे. देशावर रयतवारी पद्धत असल्यामुळें प्रत्यक्ष सरकार हें जमीनदार असून धारेकरी हीं कुळें होत. सर्वे होऊन सरकारनें ज्या खात्यावर जो दस्त अगर धारा जेवढ्या मुदतीपर्यंत ठरविलेला असेल तेवढ्या मुदतींत ती ठराविक रकम सालोसाल देत गेलें असतां खातेदार कुळास जमिनीवर एका प्रकारचा मालकी हक्क भोगावयास सांपडतो. खोतीच्या पद्धतींत सरकार हा मुख्य जमीनदार आणि खोत हा पोट जमीनदार असून कुळांनीं त्याजकडून मिळेल ती जमीन घेऊन

कसावी, व उभ्या पिकाचा अंदाज करून भातपिकाचा निम्मा (अर्धेल) व वरकस पिकाचा तिसरा हिस्सा ( तिर्धेल ) खोतास स्वामित्वादाखल द्यावा, अशी पूर्वापार चालत आलेली वहिवाट आहे. अर्थात् या पद्धतींत व धारेकरी पद्धतींत फरक असा आहे कीं, धारेकऱ्यानें आपल्या खात्यांतली कितीहि जमीन पड टाकली अगर लागवडीस आणली तरी त्याच्या सरकार देण्याची रक्कम नगद व मुक्रर असून कमीजास्त होऊं शकत नाहीं. खोती पद्धतींत स्वामित्वादाखल देण्याचा पिकाचा हिस्सा ठरलेला असला तरी प्रत्यक्ष खोताच्या खळ्यांत किती गल्ला थलीदाखल येऊन पडावयाचा हें अभावणीवर म्हणजे पिकाच्या अंदाजावर अवलंबून रहातें. जमीन जास्त लागवडीस आली अगर तेवढ्याच जमिनींत पीक जास्त आलें तर हिश्शाचें ' प्रमाण ' तेंच राहूनहि खोतास एकंदरीनें अधिक गल्ला म्हणजे अधिक किंमतीचा ऐवज मिळतो. असो, अभावणीच्या जागीं १९०४ च्या कायद्यानें जी नवीन पद्धति अमलांत आणली, तिनें खोताच्या स्वामित्वास नक्त रकमेचें रूप दिलें खरें, परंतु अधिक फायदा खोतास मिळण्याचा जो संभव असतो म्हणून वर सांगितलें तो संभव मात्र तात्त्विक दृष्ट्या समूळ नष्ट केला नाहीं. तथापि एक तर प्रत्यक्ष व्यवहारांत हा संभव बराच कमी झाला आहे, हें हल्लीं कुळांच्या अर्जावरून पट करण्याचीं जीं प्रकरणें चालू आहेत त्यांतील रेकॉर्डिंग ऑफिसरांच्या ठरावांच्या धोरणावरून दिसून येतें. पण मुख्य तो तोटा निराळाच आहे. तो तोटा असा कीं, अभावणी जाऊन तिचे जागीं नक्त रकमेचे ठराव करण्याचा ( यासच कोंकणांतील कुळें 'पट करून घेणें,' असें म्हणतात ) कायदा होतांच, खोती कुळांस त्यांच्या बदसल्लागारांनीं असें भासवून दिलें व कुळांसहि असें भासूं लागलें कीं, या कायद्यानें खोत व कुळें यांजमधील आजपर्यंतचा सर्व संबंध नष्ट होऊन यापुढें ठरलेली नक्त रक्कम खोताचे तोंडावर फेंकून दिली कीं मग त्याचा व आपला अर्थाअर्थी कांहीं एक संबंध उरला नाहीं. या भावनेनें एकंदर खोती पद्धतीस मोठाच धक्का बसलेला आहे. आपण आजपर्यंत एक प्रकारें दास्यत्वांत होतों, पण सरकारच्या कृपेनें या दास्यत्वाच्या बेड्या आपल्या पायांतून निघाल्या, असें वाटून अविचारी खोतीमुळें कानांत वारें शिरल्याप्रमाणें ' कोंकर' उड्या मारूं लागलीं आहेत. पट करून मागणें ही एक नवी नवाळ होऊन, उठलें सुटलें जें तें कुळ पटाबद्दल अर्ज करूं लागलें असून असें करण्यानें आपला खरोखर फायदा अगर तोटा आहे याचा विचार

करण्यासहि त्यांना अवसर मिळत नाहीं अगर बुद्धि होत नाहीं. ‘ आम्हीं तुमच्या दास्यांतून आतां मोकळें झालों ’ असा प्रत्यय खोतास आणून देण्याचीहि कुळांनीं खबरदारी घेतली आहे.

गेल्या दोन सालांपासून कुळांनीं खोतास वसूल घालण्याचे कामीं हात आंखडून धरलेला आहे. इकडे खोत आपली गंगाजळी मोकळी करून, कर्ज काढून अथवा दागिने विकून जामीनदार या नात्यानें सरकारी देणें देऊन टाकीत आहेत तर कुळें आपला सर्व गल्ला खुशाल घरीं घेऊन जात आहेत; व ‘ खोतास कांहीं एक द्यायचें नाहीं ’ असा मंत्र जपण्याचा कट झाल्यानें सधन व निर्धन, लायक व नालायक, सर्व प्रकारचीं कुळें खोतास बिनदिक्कत धाब्यावर बसवूं लागलीं आहेत. इतर बाबतींतहि हेंच धोरण त्यांनीं राखलें आहे. शेतीच्या पिकाशिवाय इतर हरतऱ्हेच्या उत्पन्नाची ‘वानगी’ ही खोती कुळांनीं खोतास देण्याची वहिवाट आजपर्यंत चालू होती. कुळानें ठिकाणांत भाजी लावली तर त्याच्या पहिल्या बहाराची वानगी म्हणून पहिलीं चार दोन फळें तरी खोतास नेऊन अर्पण केल्याशिवाय कुळें भाजी आपल्या घरीं आणित नसत. परंतु गेल्या दोन सालांत वर्दळीस आलेलीं कुळें खोतास भाजीचा देंठहि दाखवीनातशीं झालीं. खोती गांवांतून पेशवाईपासून एक प्रकारची वेठीची अगर बिगारीची पद्धत अमलांत असे. खोतास कोणत्याहि कामाधामास मनुष्य लागला तर त्यानें नुसता निरोप पाठविण्याचा अवकाश कीं कुळाच्या घरचा कोणीना कोणी तरी पुरुष येऊन बिनतक्रार काम करावयाचा. खोताला एकाद्या लांबच्या पल्ल्यावर गडी पाठवावयाचें झालें तर त्यानें गांवकरांकडून त्यांच्या घरीं शेर शेर तांदूळ नेऊन घातले कीं बोलावणें सरकारी समन्स इतकें सक्तीचें झालें, त्याचा अव्हेर कोणींहि कूळ करावयाचें नाहीं. परंतु गेल्या दोन सालांत वेठीला किंवा बिगारीला तर राहोच, पण खोताचें कामकाज करावयास पैसे देऊनहि मनुष्य मिळेनासा होऊन, ज्यांच्या खळ्यांत दहापांच गडी पडलेले असावयाचे अशा मातबर खोतांस कित्येक गांवांतून घरच्या गोठ्यांतलें शेण आपल्या हातानें काढण्याचा प्रसंग आलेला आहे; व कित्येक गांवांतून खोताच्या जमिनींतील पीक कापून आणण्यास मनुष्य न मिळाल्यानें पिकें तशींच राहिल्याचीं उदाहरणें सांगतात.

हा झालेला बिघाड व्यक्तिशः कुळांपुरता असता तर इतका बाधता ना; परंतु रत्नागिरी जिल्ह्यांत गेल्या एकदोन सालांत खोतीकुळांच्या संपाचें बंड बरेंच

माजलें आहे. कोंकणचे कुणबी साधेभोळे व श्रद्धाळू असल्यामुळें एकानें केलेलें पाहून दुसरा तें स्वाभाविकपणेंच करितो; व शिवाय कोंकणांत देवदेवस्कीचें बंड मोठें असल्यामुळें जाणत्या पुढाऱ्यांस त्यांना देवचाराची भीति घालून तेव्हांच आपणांकडे वळवितां येतें. तात्पर्य, दोन्हीं कारणांमुळें ही 'संप' करण्याची सांथ वणव्याप्रमाणें या गांवांतून त्या गांवास अशी पसरून, आज मितीस रत्नागिरी जिल्ह्यामध्यें शेंकडों खोती गांवांमध्यें खोतावर कुळांनीं सर्वस्वीं 'बहिष्कार' घातलेला दिसून येतो; व कित्येक गांवांतून तर बिथरलेलीं कुळें भोंवतीं ठेवून आपण राहणें सुरक्षित नाहीं असें वाटून खोतांनीं तेथून आपला पाय काढला आहे. आयर्लंडमध्यें डेव्हिट व पार्नेल यांसारख्या पुढाऱ्यांनीं व लँडलीगसारख्या संस्थांच्या मुखत्यारांनीं कुळांकडून जमीनदारांवर जसा कडकडीत बहिष्कार घातला तसाच प्रकार, वास्तविक कोणाहि सुशिक्षित मनुष्याच्या पुढाकाराशिवाय, रत्नागिरी जिल्ह्यामध्यें घडून आलेला आहे. हें काम केवळ निरुद्योगी 'ग्रामकंटक' व स्वतःचा धंदा बसलेले आणि उपद्व्यापाशिवाय पोटास न मिळणारे कित्येक नामधारी खोत यांनीं केलें आहे असें दिसतें; व या सर्वांस कनिष्ठ प्रतीच्या सरकारी अधिकाऱ्यांचीहि मधून मधून भर पडलेली आहे.

परंतु उत्पादक कोणीहि असला तरी या नवीन चळवळीचें कार्य मात्र फार झपाट्यानें चालू आहे. या चळवळीच्या दुसऱ्या एका अंगाचा देखावा रेकॉर्डिंग ऑफिसरचा तळ जेथें जेथें पडतो तेथें तेथें दिसून येतो. रत्नागिरी जिल्ह्यांत सुमारें हजारबाराशें खोती गांव असतील; व यांपैकीं सुमारें चार पांचशें गांवच्या खोती कुळांनीं 'पट करून' मागण्याचे अर्ज केले असून, त्यांचा निकाल करण्याकरितां रेकॉर्डिंग ऑफिसर यांनीं जिल्ह्यांतून दौरा सुरू केला आहे. हें काम गेले सहा महिने चालूं असून या मुदतींत सर्व जिल्हाभर खोतीकुळें व खोत यांची यात्रा एकसारखी सुरू होती. सदर ऑफिसरच्या कचेरीभोंवतीं नित्य कुळांचे थवेच्या थवे पडत असून सडकेनें, तरविर व इतर कोठेंहि जमाव जमलेला पाहिला तर त्यांत पट मागण्याकरितां निघालेलीं अगर मिळवून परत आलेलीं कुळें व पट व्हावयाचे तर त्याचें प्रमाण तरी होतां होईतों अधिक बसावें, याकरितां पुरावा देण्यास लागणाऱ्या अभावण्या व खतावण्या यांचीं बाडें खाकेंत मारलेले खोत यांचीच गर्दी बरीच असते. इकडे खोतहि कांहीं स्तब्ध बसलेले नाहींत व या चळवळीच्या

तिसऱ्या अंगाचें स्वरूप निरनिराळ्या ठिकाणीं होणाऱ्या खोती सभांमध्यें दिसून येतें. सुमारें पंधरा वीस वर्षांचे अवधीनंतर खोत लोकांमध्येंहि फिरून एकवार हालचाल उत्पन्न झाली आहे.

गेल्या सालीं नोव्हेंबरचे २२ वे तारखेस चिपळूण तालुक्यांतील खोतांची सभा होऊन, रा. ब. दिवाटीयांसारख्या अन्यायी रेकॉर्डिंग ऑफिसरांनीं नवीन खोती कायद्याच्या अंमलबजावणीचे कामीं जो धिंगाणा चालू केला होता त्यासंबंधानें सरकारास अर्ज करण्यांत आला. पुढें गेल्या मार्च महिन्यांत रत्नागिरी येथें सर्व जिल्ह्यांतील खोतांची 'खोतीसभा' स्थापन होऊन नुकताच तिजमार्फत दुसरा एक अर्ज रवाना झाला आहे. ता. २५ रोजीं देवळें येथें संगमेश्वर तालुक्यांतील खोतांची सभा भरली होती, व ता. १२, १४ व १६ मे रोजीं दापोली, खेड व चिपळूण या गांवीं जिल्हा खोतीसभेच्या बैठकी व्हावयाच्या होत्या. तात्पर्य, १९०४च्या कायद्याच्या अंमलबजावणमुळें रत्नागिरी जिल्ह्यांत मोठी चळवळ उडून गेलेली असून आजपर्यंत कधींहि पाहावयास न सांपडलेले देखावे आज त्या जिल्ह्यांत दृष्टोत्पत्तीस येत आहेत. या चळवळींत अर्थात् दोन पक्ष आहेत; त्यांपैकीं खोतीकुळांच्या पक्षाचें काय म्हणणें आहे याचा विचार मी पुढील लेखांत करीन.

## लेखांक २ रा

## खोतीकुळांची बाजू

हल्लींच्या या वादांत खोतीकुळांचें खरोखर काय म्हणणें आहे, हें त्यांचें त्यांना स्वतःला चांगलेंसें कळत नाहीं. त्यांचें म्हणणें काय असेल याची कल्पना करणें कठीण. खोत हे सनदशीर आहेत याबद्दल वाद नाहीं. परंतु कुळांचें म्हणणें असें कीं, आम्ही खोतांच्या पूर्वींचे आहोंत. एक वेळ खोत बाहेरून आले असतील. परंतु कुळें कांहीं बाहेरून आलेलीं नाहींत खास. हल्लींच्या कुळांच्या पूर्वजांच्या पिढ्यान्‌पिढ्या कोंकणच्या जमिनींत खपलेल्या असून, खोतांपेक्षां कुळांच्या हाडांचें खतच कोंकणच्या जमिनींत आधक पडलें असलें पाहिजे. खोतांनीं सनदा घेऊन कंबरा बांधल्या त्या तरी कुळांच्याच जीवावर कीं नाहीं! जमीन लागवडीस आणण्याचें काम कुळांशिवाय होणें शक्य नाहींच. कुळांचें एक वेळ खोतांशिवाय चाललें असतें. धारेकरी नाहीं का आपल्या जबाबदारीवर शेती

करीत ! त्यांना कोठें लागतो खोत ! पण खोतांचें मात्र जमीन कसणाऱ्या कुळांशिवाय चालतें ना ! अर्थशास्त्राचे दृष्टीनें अंगमेहनतीचें महत्त्व फार आहे. द्रव्योत्पादनाचें आदिबीज अंगमेहनत हें होय. कूळ स्वतः खपतें एवढेंच नव्हे तर त्याचें सगळें घरदार रात्रंदिवस काबाडकष्ट करीत असतें. खोतांनीं प्रथम प्रथम काय मेहनत घेतली असेल ती खरी. पण पुढच्या पिढ्या, पूर्वजांच्या भांडवलाच्या किंवा कमाईच्या भिस्तीवरच मांडीवर मांडी घालून बसलेल्या आहेत कीं नाहींत ! शिवाय इतके काबाडकष्ट करून तरी आपणाला व आपल्या कुटुंबांतल्या माणसांना पोटभर अन्न मिळण्यापलिकडे कुळाच्या आशेची मजल जाते काय ? नाहीं.

खोत कोणत्याहि ठिकाणांतील फार तर अर्धेल म्हणजे कुळाच्या इतकेंच, किंवा तिर्धेल म्हणजे कुळाच्याहिपेक्षां कमी घेतो हें खरें आहे. परंतु अशीं ठिकाणें त्यांचीं पुष्कळ असून दहा कुळांचीं भर एकट्या खोताचे पदरांत पडल्यानें तो श्रीमंत होण्याचा संभव असतो. कुळांच्या महत्त्वाकांक्षेला मर्यादा आहे. कारण बहुधां आपल्या कुटुंबाचीं माणसें व फार तर एकादा गडी व एकादें आऊत येवढ्याशा सामुग्रीनें जेवढ्या ठिकाणची लागवड करितां येईल तेवढें ठिकाण काय तें त्याला उपयोगी. यामुळें शेतीवर श्रीमंत झालेलीं अशीं कुळें थोडीं. याच कारणाकरितां, एकादे वर्षी पीकपाणी चांगलें नसलें तर खोतास तग धरतां येते. कुळास मात्र उपासमारीचा प्रसंग येतो. शेतीच्या कामीं कूळ जी मेहनत करितें; त्याचा फायदा केवळ जमिनीच्या स्वामित्वामुळें खोतास मिळतो. तीच गोष्ट शेतीच्या कामीं केलेल्या सुधारणेसंबंधीं समजावयाची आहे. कुळानें केलेल्या सुधारणेमुळें उत्पन्नांत जी वाढ येईल तिजमध्यें खोतास हिस्सा काय म्हणून मिळावा. पण सर्वांत मुख्य तक्रार ही कीं, कुळाची शेंडी सर्व खोताचे हातीं, अभावणी, लिहिणें पुसणें, पुरावा सर्व खोताच्या मुठींत. उभयतांमध्यें केव्हांहि वाद उत्पन्न झाला तरी त्यापासून फायदा खोतास व तोटा कुळास व्हावयाचा.

खोत व कूळ यांजमधला हा वाद पितळेचें भांडें व मातीचें भांडें यांच्यांतल्या वादाप्रमाणें आहे. तीं एकमेकांवर आदळलीं असतां मातीचेंच भांडें फुटावयाचें. कुळानें खोतास पिकांतला किती अंश द्यावा हें जरी पूर्वापार पद्धतीनें ठरलेलें असलें तरी, ठिकाणांत एकादे सालीं किती पीक मिळणार याचा अंदाज करण्याचें काम प्रायः खोताचे हातींच राहतें. अभावणी कशी करावी याजबद्दल

सरकारनें नियम केले आहेत खरे, तथापि या नियमांची अंमलबजावणी सर्व खोतांचे स्वाधीन राहते. आधीं सर्व लिहिण्यापुसण्याचा धनी खोत, अभावणीचे कागदपत्र त्याचे स्वाधीन, पिकाचे अंदाजाचे कामीं स्वतः कुळाचें व खोताचें एकमत न होईल तर तिऱ्हाईत गांवकर पंचाचें मत घ्यावें व सर्वानुमतें होईल ती तडजोड अभावणीच्या वह्यांत नमूद करावी असा नियम आहे. पण हें शास्त्र झालें; रूढि वेगळीच आहे. अभावणीचे कागदपत्र जसे खोताच्या स्वाधीन तसेच गांवकरीहि त्याच्या स्वाधीनच म्हणण्यास हरकत नाहीं. खोत हा गांवचा राजा; त्याच्य विरुद्ध गांवकर जाईल कसा. तसेंच अमुक एक तोड मीं कबूल केली नाहीं असें कुळानें म्हटलें तर त्याला पुरावा कसा करतां येणार व त्याचें ऐकतो कोण? अभावणी ठिकाणावरच झाली पाहिजे, लिहिणें वेळच्या वेळेला अमुक एका मुदतींत व्हावें, लिहिण्यामध्यें फेरबदल खाडाखोड असूं नये, मुलकी अधिकारी मागतील तेव्हां कागदपत्र दाखविण्यास हजर करावे, वगैरे नियम सरकारनें केलेले आहेत व नियमांचें उल्लंघन होईल तर खोत दंडास पात्रहि होऊं शकतात. पण एक तर दर गांवांत दर कुळागणिक रुजवात घेण्यास मुलकी अधिकाऱ्यांस फुरसत कोठें असते? व जो काय रुजवातीचा प्रसंग येईल तो कसा मारून न्यावा' रुजवातीचीं कुळें गैरहजर कशीं ठेवावीं, अगर अधिकाऱ्यांस खूष कसें करावें या सर्वांचें ज्ञान, व त्या ज्ञानाचा अंमल करण्यास लागणारीं साधनें हीं खोताचे स्वाधीन असतात. अभावणीचे नियम मोडल्याबद्दल आजपर्यंत खोतास दंड झाल्याचीं कितीशीं उदाहरणें सांपडतील? अशा रीतीनें खोतांचे हातून तयार झालेल्या व त्यांच्याच ताब्यांत सर्वस्वीं असणाऱ्या कागदपत्रांवरून कुळांच्या देण्याची आकारणी व्हावयाची व ही आकारणी वसूल होण्यास मदत मिळावयाची. अर्थात् अभावणी अगर तोड खरोखर कुळास मान्य नसल्यास त्यास आपली अमान्यता अमलांत आणण्यास दंडेलीशिवाय दुसरा मार्ग उरत नाहीं. पण दंडेलीनें त्यास खरोखर सुख होत नाहीं. खोताशीं बिघाड झाल्यानें पैशा-अडक्याची मदत थांबते, लागवडीस जमीन मिळण्याची पंचाईत पडते व मिळाली तरी दुखावलेल्या खोताचे हातींच फिरून त्यास जावें लागतें. कूळ नाठाळ ठरलें म्हणजे मग खोतानें त्याजविरुद्ध आपल्या अभावणीच्या प्रखर शस्त्राचा उपयोग सर्रास करूं लागावें, हें स्वाभाविकच आहे!

अभावणीशिवाय कुळाच्या इतरहि कांहीं तकारी आहेत. कुळानें केलेल्या प्रत्येक उत्पन्नाच्या बाबतींत खोत हा अंशभागी आहे, या उपपत्तीमुळें कुळास किरकोळ बाबतींत फार त्रास होतो. नुसती अर्धेल किंवा निर्धेल घालून कूळ मोकळें होतें तर गोष्ट निराळी. परंतु एकादें फळझाड लागलें, किंवा भाजीचा वाफा केला, अगर वेल चढविला, तर त्याचा फायदा कुळास सुखानें घेतां येत नाहीं. बिगारीची चाल पूर्वीपासूनची खरी, परंतु कुळांस कितपत राबवून घ्यावें याचा सुमार खोतास राहतो कोठें ! जें पडेल तें काम त्यांस तो सांगणार, कुळाची स्वतःची सोय गैरसोय तो पहात नाहीं. स्वतः कुळाच्या शेतांत शेतीचें काम चाललें असलें तरी खोत त्याची फारशी पर्वा करित नाहीं; खोतीचें काम उठलें पाहिजे, पडून राहतां कामा नये.

दिवसेंदिवस हा सर्व प्रकारचा त्रास वाढत जाणार. कमी होण्याचा संभव नाहीं. जमीन व पीक या दोन गोष्टीखेरीज करून सर्व गोष्टींची वाढ आहे. कुळांची लोकसंख्या वाढली यामुळें लागवडीस उपयोगी अशी थोडी जमीन वांटणीस येऊं लागली. पण इकडे खोतांची प्रजाहि वाढूं लागून त्यांच्यांत वांटण्या झाल्यामुळें खोती अंमल गाजविणारे लोकहि वाढले. गांवांत एकाद-दुसरा खोत व तो श्रीमान् असला तर कुळास त्याचा जाच होत नाहीं. अशा खोतांची दृष्टि क्षुद्र होत नाहीं, व मन थोडें सढळ राहतें. परंतु हल्लीं खोती घराण्यांचा खुर्दा होऊन पैसापैपर्यंत खोती वतनाचे हिस्से पडलेले आहेत. यामुळें कुळांकडून होईल तितका अधिक वसुल करण्याची प्रवृत्ति खोतांमध्यें उत्पन्न झालेली आहे. वतन संपुष्टांत आलें तरी खोताची अधिकाराची हांव मात्र गेली नाहीं. पै हिस्सा असणाऱ्या खोतास सुद्धां फळझाड भाजीपाला याची वानगी हवी व बिगारहि हवी. अशा स्थितींत खोतांचे व कुळांचे पूर्वापार संबंध अबाधितपणें सलोख्यानें कसे रहाणार ? यास्तव खोतास कुळानें द्यावें तरी काय हें मुकर ठरणें इष्ट होतें, व ' पट ' केल्यानें हें देणें नक्त व मुकर ठरून इतर संबंध पाळणें अगर न पाळणें हें खोत व कूळ यांच्या परस्पर सलोख्यावर अवलंबून राहिल.

कुळांची बाजू ही अशी आहे. आतां खोतांचें म्हणणें यावर काय पडतें, याचा पुढील खेपेस विचार करूं.

## लेखांक ३ रा.

### खोतांची बाजू

हल्लींचा काळ खोतांस प्रतिकूल असल्यामुळें खोतांची तक्रार कितीहि खरी असली तरी ती ऐकणार कोण ? तथापि सदरहू वादग्रस्त प्रश्नाचें सारासार दृष्ट्या कोणास विवेचन करावयाचें झाल्यास, खोतांच्या बाजूसहि बरेंच सत्य आहे अशी खात्री करून देणें फारसें कठीण नाहीं. प्रथमतः हें ध्यानांत घेतलें पाहिजे कीं, कोंकणप्रांतांत ज्या वेळीं बेबंदशाही माजली होती व मनुष्याची वसाहत होणें कठीण होतें, अशा वेळीं खोतांनीं पुढाकार घेऊन या नवीन उद्योगाचे मार्गांत येणारीं हरतऱ्हेचीं संकटें सोसलीं, व त्यांत त्यांची बुद्धि व द्रव्य येवढेंच नव्हे तर त्यांचें रक्तहि खर्चीं पडलेलें आहे. या त्यांच्या साहसाचा मोबदला म्हणून जर त्यांस कोंकणप्रांतीं जमीनबाबीपुरतें राजाच्या प्रतिनिधित्वाचे अधिकार मिळाले तर त्यांत वावगें असें कांहींच नाहीं. त्या वेळची परिस्थिति लक्षांत घेतली असतां रयत व सरकार दोघांचेंहि खोताविणें अडलें असतें. विशेषतः सरकारनें तरी खोतांचें ऋणी असलें पाहिजे; कारण रयतवारीमध्य सारावसुलीची जी हमी सरकारास केंव्हांहि मिळणें शक्य नाहीं ती खोती पद्धतीमध्यें खोताकडून मिळालेली असते. कोंकण प्रांतांत पिकाच्या उत्पन्नाचे 'सोळाबारा' देशाप्रमाणेंच होत असतां आज शेंकडों वर्षांत सरकारास साऱ्याची एक पैची तरी सूट कधीं घालावी लागली आहे काय ? अगर तहकुबी द्यावी लागली काय ? मुळींच नाहीं. व याचें कारण हेंच कीं, कुळांचें दारिद्र्य व दुर्दैव यांच्या व आपल्या सारावसुलीच्या दरम्यान सरकारनें खोतरूपी एक अभेद्य भिंत घातलेली आहे, व यामुळें त्या दारिद्र्याच्या अगर दुर्दैवाच्या बाधेचा वारा सरकारच्या तिजोरीस कधींहि लागूं शकत नाहीं. खोतांनीं जर अशी विशेष प्रकारची जबाबदारी अंगावर घेतली आहे तर त्यांस विशेष प्रकारचे हक्क व विशेष प्रकारच्या सवलती मिळणें अगदीं न्याय्य आहे ! रयतेच्या अंगमेहनतीची किंमत कितीहि असली तरी भांडवलावांचून अंगमेहनत पंगु आहे; व जमिनीची नवी लागवड होण्याचे वेळींचसें काय, पण एरवींहि जमिनींत बीं पेरून पीक निघण्याच्या दरम्यान अंगमेहनत करणाऱ्या कुळांस पोटाला देणारा कोणी तरी लागतोच. शेतीच्या धंद्याच्या कोणत्याहि काळीं थोडें-बहुत भांडवल कोंकणांत खोतच पुरवितात. बीं-बियाणा विकत घ्यायला, एक

बैल मेला तर दुसरा बैल आणावयाला, कूळ आजारी पडलें तर त्याच्या पोटाला घालावयाला—तात्पर्य, पावलोपावलीं भांडवल लागतें तें खोताशिवाय कोण देणार ? कोंकणांत कांहीं तगाई मिळत नाहीं. इतकें असूनहि खोतास स्वतः अंगमेहनत करावी लागत नाहीं हें म्हणणें चुकीचें होईल. अभावणीच्या वेळीं त्याला स्वतः हिंडावें लागतें; कारण अभावणी करणें ती ठिकाणांतच केली पाहिजे असा नियम व प्रघात आहे. अर्थात् श्रमाशिवाय खोतास नफा मिळतो हें जें म्हणणें आहे तें व्यर्थ आहे. शिवाय असें कीं, लागवडीचें क्षेत्र वाढल्यानें खोताचा वसूल वाढतो यांतहि वावगें असें कांहीं नाहीं. देशावर अर्धेलीनें वांटेकऱ्यास जमीन खंडानें लावतात, त्या ठिकाणीं जमीनदार कर्त्याकडून निम्में पीक घेतोच कीं नाहीं. शेतीशिवाय इतर उत्पन्नाची वानगी खोत मागतो खरा; पण ही पद्धत कांहीं नवीन नाहीं. अलिकडे रयतवारी पद्धतीमध्यें कायमचा नक्त खंड अगर सारा ठरला म्हणजे मग दुसऱ्या उत्पन्नाच्या बाबी शिल्लक रहात नाहींत, असें ठरलें आहे खरें, तथापि ही नवी दृष्टि खोती गांवास लागतां कामा नये. इंग्रजी राज्यामध्यें पैमाष होऊन तरम ठरेपर्यंत साऱ्याशिवाय सरकारी उत्पन्नाच्या इतर अनेक बाबी होत्या. या बाबी पेशवाईच्या पूर्वीपासून अंमलांत असून याच मामूल वहिवाटीप्रमाणें खंडाशिवाय इतर किरकोळ बाबी खोत वसूल करित आले आहेत. खोतीच जेव्हां मोडेल तेव्हां या बाबी अर्थातच मोडतील; परंतु खोती कायम असून सरकार जोंपर्यंत जमीनदार या नात्यानें खोतापासून आपला सारा चोपून वसूल करितें, तोंपर्यंत खोताचे हक्क, मग ते कितीहि किरकोळ असोत, बुडविण्याचा अधिकार सरकारास नाहीं. बरें, हे हक्क तरी विशेष त्रासदायक आहेत असें नाहीं. कोठें गवतांतलें गवत किंवा भाजींतली भाजी कुळानें खोतास दिली तर, ती स्वामित्व व्यक्त करण्याची एक चाल आहे इतकेंच काय तें. शिवाय अशा वानगीचाहि मोबदला कुळांस अन्य रीतीनें मिळतोच. खोताच्या घरीं नित्यनैमित्तिक झालें तर, कुळास वाढून मिळतें. कुळास आजार वगैरे झाला तर खोत औषधपाणी व पोटासहि देतो. बिगारीच्या तक्रारींतहि कांहीं अर्थ नाहीं. सरकारचे अधिकारी पोटाला न देतां कुळास जितकें ताबडतात तितकें खोत ताबडीत नाहींत. खोताकरितां काम करण्याचा दिवस म्हणजे कुळाचा पोटभर जेवणाचा दिवस असें म्हणण्यास हरकत नाहीं. खोती नाहीं अशा गांवांतून सरकारी अधिकारी कुणब्यास राबवून घेतात, पण त्यास भरपूर पोटास घालीत

नाहींत. शिवाय अधिकारी गांवांत राहणारे नसल्यामुळें त्यांना कुणब्यांच्या रागालोभाचीहि क्षिति नसते. खोतास गांवांतच रहावयाचें असल्यामुळें लहान गांवांतलेंच कां होईना लोकमत त्याला मानावें लागतें. पण सर्वांत महत्त्वाची अशी गोष्ट ही कीं, खोतांचें सुख तेवढें लोकांस दिसून येतें, दुःख दिसत नाहीं. खोताला राजा म्हणतात, पण राजाला त्याच्यापरी दुःखें असतातच. खोती गांवांत सूट अगर तहकुबी कधीं मिळत नाहीं हें वर सांगितलेंच आहे. याचा अर्थ असा कीं, पाऊस पडो न पडो, शेत पिको वा न पिको, खोतास ठराविक तारखांस गांवचा अथवा आपल्या हिश्शाचा सारा बिनसूट बिनतकार नेऊन तालुक्यास भरला पाहिजे; नाहीं तर खोती तेव्हांच जप्त व्हावयाची. अशा वेळीं खोतास कर्जबाजारी करावें लागतें व घरचे जिन्नसपान्नसहि विकावे लागतात. एवढेंच नव्हे तर इतकें करूनहि भरण्यापुरते पैसे न मिळाल्यानें वतन जाऊन खोत कंगाल झाल्याचीं उदाहरणें कांहीं थोडीं नाहींत. तसेंच दुसरे पक्षीं हेंहि लक्षांत ठेविलें पाहिजे कीं, कुळानेंहि खोतास बुडवावयाचें मनांत आणलें तर त्याला तें सुसाध्य असतें. अभावणीचे कागदपत्र सर्व खोतांच्या हातीं असतात खरे. पण त्याच्याहिपेक्षां जबर असें जें शस्त्र म्हणजे वसूल हें कुळाच्या हातीं राहतें. व या बाबतींत कुळांचा कफल्लकपणाच त्यांस उपयोगी पडतो. खोत फार झालें तर मदतीची फिर्याद करणार व हुकूमनामा मिळविणार, पण कुळानें मनावर घेतलें तर या हुकूनाम्याचा उपयोग खोतास खरड्याहून जास्त नाहीं; अशी स्थिति करण्याचें त्यास सुलभ आहे. कोंकणच्या खोतांस देशावरच्या इनामदारांप्रमाणें वसुलाबाबत जप्तीचे अधिकार नाहींत. यामुळें खोतास धाब्यावर बसवून कुळानें वाटेल तर त्याच्या धडधडीत देखत सर्व धान्य खळ्यांतून घेऊन जावें. खोत येऊन जाऊन फिर्याद मांडणार, पण फिर्यादीचा निकाल होईपर्यंत बहुधा वर्ष जातें. शिवाय हुकूमनामा झालाच तर तो बजावून खोतास काय मिळणार ? खोताच्या बाकीइतका ऐवज वाटेल तेव्हां कुळाच्या घरीं शिलकींत सांपडेल अशी स्थिति जर असती तर मग कोंकणाला भिकारी कोणीं म्हटलें असतें ? अर्थात् इतका ऐवज मिळणें शक्यच नसतें. येऊन जाऊन एकादे वेळ जप्ती यायची, कारण मुलकी अधिकारी मदतीचे कामीं प्रायः एकापेक्षां अधिक वेळ जप्ती देत नाहींत व तेवढी एक वेळ मारून न्यावयाचें कठीण नसतें. तात्पर्य, सर्व गोष्टी सुयंत्रित असेपर्यंत जो खोत सुखी व सबळ वाटतो तो गांव बिघडला म्हणजे करुणास्पद होतो.

## लेखांक ४ था

### सारासार विचार

खोत व कुळें यांच्या बाजू अशा रीतीनें पुढें आल्यावर या वादग्रस्त प्रश्नासंबंधानें सारासार विचार करून काय निष्कर्ष काढतां येईल हें आपण पाहूं. वास्तविक खोत व कुळें या दोघांचेहि तक्रारींत थोडथोडा सत्यांश आहे; व तो असा कीं अभावणीसंबंधानें व स्वामित्वाच्या इतर बाबींसंबंधानें खोतांचे हक्क खरे व आज शेंकडों वर्षें उपभोगलेले आहेत; तथापि या हक्कांचा अंमल ज्या ठिकाणीं निरंतर व पिढीजात कुळांस उपद्रवकारक होईल त्या ठिकाणीं; हक्काचें तत्त्व अबाधित राखून, प्रत्यक्ष व्यवहाराचे बाबतींत त्यास आळा घालणें हें सरकारचें कर्तव्य आहे; व सरकार जर निःपक्षपाती असतें तर खोतांच्या हक्कास बाध न आणतां कुळांचें रक्षण त्यास करितां आलें असतें, पण या वादांत दोन पक्षकार व एक निस्पृह पंच अशी स्थिति नसून खोतास कुळें हा जो पूर्वीं दावेदार होता त्यास सरकार मिळाल्यामुळें एकाचे जागीं दोन दावेदार झाले. हा दुसरा दावेदार अर्थातच अधिक प्रबळ, कर्तुमकर्तुं अन्यथा कर्तुम् अशा शक्तीचा निर्माण झालेला असल्यामुळें खोतास आतां आपली धडगत नाहीं असें वाटूं लागणें स्वाभाविक आहे. कुळाच्या हातीं वसूल व सरकारच्या हातीं कायदा, अशी स्थिति झाल्यामुळें एकानें अन्यायप्रवृत्त व्हावें व दुसऱ्याचें कर्तव्य त्याची दाद घेण्याचें असतां त्यानें ती घेऊं नये, असा दुहेरी कट होऊन खोत जेरीस आले. सर्वेखात्याचा उदय झाल्या तारखेपासून खोतांवर सरकारची करडी नजर झाली व खोताचे हक्काबद्दल वाद उपस्थित करण्याची कोणतीहि संधि त्यांनीं तेव्हांपासून वाया जाऊं दिली नाहीं. जितक्या म्हणून मार्गांनी खोत हतवीर्य होतील व संकटांत पडतील तितक्या सर्व मार्गांचें अवलंबन करून या खोतरूपी वजनदार व जबरदस्त मध्यस्थाचा कांटा मार्गांतून काढण्याचा प्रयत्न त्यांनीं करून पाहिला. खोतांच्या हक्कास आळा घालण्याचा पहिला प्रयत्न १८८० च्या खोती ॲक्टानें केला. आतां कायद्यानें निरंतरच्या खोती कुळांच्या हक्कांचा बचाव झाला व अभावणी वगैरे संबंधाचे नियम ठरले, ही गोष्ट अर्थातच एका अंशीं बरी झाली. परंतु येवढीच गोष्ट सरकारास कर्तव्य नव्हती व १८८० च्या कायद्यानें तत्पूर्वीं उपस्थित झालेला वाद संपला असतांहि, सरकार नवीन नवीन कुसपटें काढूं लागलें. १९०४ चा कायदा ही खोतांवरील जुलमाची दुसरी आवृत्ति होय.

कारण या कायद्यानें अभावणीच्या हक्कावर घाला आला, व केवळ सरकारच्या हातीं कायदा असल्यामुळेंच त्यास हा घाला घालतां आला. याहि कायद्यांत थोडासा ग्राह्यांश आहे, कारण खोतांच्या केवळ हक्काचा तात्त्विक प्रश्न क्षणभर बाजूस ठेवला असतां, कुळानें खोतांस काय द्यावें हें निश्चित ठरणें हें एका दृष्टीनें कायदेशीरच आहे. तथापि हा कायदा करणारांचा हेतु खोताचें नुकसान करण्याचा असतां अगर नसतां प्रत्यक्ष नुकसान कसें करतां येतें हें गेल्या दोन तीन सालांतील या कायद्याच्या अंमलबजावणीवरून दिसून आलेलें आहे. तात्पर्य, या प्रश्नाच्या वादग्रस्ततेचें बीज कूळ व खोत यांच्या हितविरोधापेक्षां सरकारच्या असूयाबुद्धींतच अधिक आहे. सारासार विचाराचे दृष्टीनें पहावयाचें तर एक गोष्ट कबूल करणें भाग येतें कीं, सरकारच्या कोणत्याहि बळजबरीस नेहमीं समर्थनकारक अशी एक बाजू असते; व या वादांत ही बाजू खोतींवर्गापैकीं वाईट खोतांच्या वागणुकीमुळें उत्पन्न झालेली आहे. वाईट खोतांप्रमाणें वाईट कुळेंहि असतात. परंतु बोलूनचालून तीं गरीब व अशिक्षित माणसें, तेव्हां त्यांनीं कांहींहि केलें तरी लोकांची व सरकारची सहानुभूति त्यांजकडे रहाणारच. सरकारी अधिकारी व इतर बदसल्लागार यांचें ऐकून क्षणभर तीं बिथरतील, परंतु खोती पद्धति कायम आहे तोंपर्यंत आज नाहीं तर उद्यां तीं फिरून खोताच्या दाराशीं जाऊन गयावया करूं लागणारच. समाजस्थितीच्या मानानें त्यांची जबाबदारी कमी व कोणत्याहि स्थितींत कोणासहि त्यांची कींवच वाटणार. पण कांहीं वाईट खोतांनीं अन्यायानें वागून सरकारची व लोकांची सहानुभूति गमावली आणि खोत व कुळें यांच्यासंबंधांत हात घालण्यास सरकारास सवड दिली, याची सर्व जबाबदारी त्यांजवरच आहे. पण कारण कोणचेंहि असो, 'पट' करून देण्याच्या पद्धतीनें खोती पद्धतीस धक्का बसणार, आणि यामुळें चांगल्या खोतास व चांगल्या कुळास दिवसेंदिवस वाईट दिवस येणार, याबद्दल कोणासहि वाईट वाटल्यावांचून रहाणार नाहीं. कारण खोती पद्धतींत एक प्रकारचें स्थानिक स्वराज्य होतें. या स्वराज्यांत जरी सकृद्दर्शनीं एक राजा व इतर त्याची प्रजा अशी रचना होती तरी प्रत्यक्ष व्यवहारांत परस्परावलंबनामुळें कुळें व खोत या दोघांसहि त्यापासून सुखच होत असे. चांगला खोती गांव व चांगला रयतवारी गांव यांत अत्यंत तफावत असते. एकाचें वैभव व टुमदारपणा याची सर दुसऱ्यास कधींहि येत नाहीं. कोणच्याहि

समाजांत एकी रहाण्यास त्यांतील व्यक्तींच्या हिताहितासंबंधाची गुंतागुंत झालेली असली पाहिजे. तशी ती खोती गांवांत असते. खोताला जितकी कुळांची तितकीच कुळास खोताची गरज असते. रयतवारी गांवांत सर्वत्र विस्खळीत-पणा असतो, आणि पाटील व तलाठी यांच्यायोगानें गांवांत एकी राहण्याऐवजीं निरनिराळे पक्ष उत्पन्न होतात. गांवांत एकादा चांगला पैसेवाला सावकार असला तरी त्याच्यानेंहि खोताच्या हातून कुळाचा जसा उपयोग होतो तसा होणें शक्य नाहीं. सावकाराचें लक्ष व्याजावर पण खोताचें लक्ष कुळावर व जमिनीवर असतें. नामदार कँडीसाहेबांनीं खोतसिंबंधाच्या कागदपत्रांचे जे उतारे केले आहेत त्यांतील सरकारी अधिकाऱ्यांच्या रिपोर्टांवरूनच असें सिद्ध होतें कीं, कुळाच्या हजार गरजा वेळोवेळीं भागविण्यास खोत हाच तो समर्थ असल्यामुळें, आह्मांस खोत हवे असेच अर्ज आजपर्यंत कुळांकडून सरकारकडे होत असत. पण आतां सरकारनें सर्वच मनु पालटून टाकला आहे त्याला इलाज नाहीं. कायदा हा सर्वस्वीं सरकारचे हातांत असल्यानें खोतांनीं आहे ती स्थिति उत्तम म्हणून पुढें काय करावयाचें इकडे लक्ष दिलें पाहिजे. अभावणी कायम राहण्याबद्दल हवा तितका वाद झाला, पण कायदा पास झाल्यावर आतां तो पत्करणें भाग आहे. वाईटांतून चांगलें काढावयाचें तर असें म्हणतां येईल कीं, ‘ पट ’ होऊन गेल्यामुळें कुळास ‘ आपण खोतास काय द्यावयाचें ’ हें कायमचें कळून तरी चुकेल; व कोणास कां होईना आपण दुसऱ्याचें देणें लागतों हें पक्कें आगाऊ कळणें बरें असतें. खोताचा झाला तरी पटामुळें सर्वच ठिकाणीं तोटा होईल असें नाहीं. जेथें प्रत्यक्ष सुमारें शंभर रुपयाचा गल्ला मिळावयाचा हक्क तेथें ‘ पट ’ केल्यानें क्वचित् ८० रुपये बसतील. परंतु पूर्वी तरी हे शंभर नेहमींच मिळत असत असें नाहीं. वसुलाचा चढ उतार होत असे; व शंभरच्या शंभर रुपये पडतच अशीं उदाहरणें थोडीं. पट केल्यानें ऐशी तरी कायम ठरतील, अभावणीचे श्रम पडणार नाहींत, मदत मागतांना कागदपत्र शाबीत करण्याचें वांचेल व विशेषतः दिवाणी कोर्टांत जाऊन अभा-वण्या खतावण्याचे कागद बेभरंवशीक म्हणून दावा बुडण्याचा धोकाहि राहणार नाहीं. हल्लींचे स्पेशल रेकॉर्डिंग ऑफिसर मि. ग्यारेट हे पट ठरवित आहेत ते या सर्व गोष्टी लक्षांत घेऊनच ठरवित आहेत, व त्यांचे निवाडे वरील दृष्टीनेंच खोत व कुळें कबूल करित आहेत. ग्यारेटसाहेबांची नेमणूक होण्याच्या पूर्वींच्या अधिका-

त्यांनीं मात्र अन्यायीपणाची शिकस्त केली होती; त्यांनीं अभावण्याचे कागद बेभरंवशीक ठरवून कायद्यानें देतां येईल ती कमींत कमी पट म्हणजे 'दुप्पट व तिप्पट' देण्याचा धडाका चालविला होता. परंतु या बाबतींत खोतांनीं वेळींच सावधागिरी व चळवळ करून सरकारास अर्ज पाठविला, व त्याचा परिणाम असा झाला कीं, सहानुभूतिपूर्ण व माहितगार असे नवीन स्पेशल रे. ऑफिसर नेमण्यांत येऊन त्यांना या प्रश्नाकडे न्यायानें पाहण्याची सत्ता मिळाली. आजपर्यंत ग्यारेटसाहेबांनीं जितके निवाडे दिले तितके बहुधा उभय पक्षकारांस कबूल झालेले असून त्यांची समजूत घालून त्यांच्या सह्याहि निवाड्यांवर घेण्यांत आल्या आहेत; याचें तरी कारण हेंच दिसतें कीं, कुळांस तर 'पट' आज हवेच आहेत, पण खोतांसहि एकंदरीनें विचार करितां व्यावहारिक दृष्ट्या पटीचें प्रमाण आणा दोन आण्यांच्या फरकानें कमजास्त असेल तर, पट करून मिळालेलेंच बरें, असें वाटत असे. 'सर्वनाशे समुत्पन्ने अर्धं त्यजति पंडितः' या न्यायानें खोत लोक समजुतदारपणा दाखविण्यास तयार झाल्यानें ग्यारेटसाहेबांस कुळांची समजूत घालून 'त्वया अर्धं मया अर्धं' या तत्त्वावर दोघांतील फरक काढून टाकतां येणें शक्य झालें. ही गोष्ट पट मागण्यास हुरळलेल्या अज्ञानी किंवा नाठाळ कुळांची झाली. पण ज्यांना थोडीशी दूरदृष्टि आहे व ज्यांच्यांत अजून माणुसकी उरलेली आहे, अशीं कुळें अद्यापि बरींच मागें राहिलीं आहेत, व उठाठेवी ग्रामकंटक व बद्सल्लागार अधिकारी चिथावणी देत असतांहि ते पटाचे अर्ज करण्याचें नाकारित आहेत. कित्येक गांवांतून तर संभावित खोत, 'तुम्हांस वाटेल तर खुशाल पटाचे अर्ज करा, आम्ही तुमचे पट करून देववितों चला' असें स्वतःच्या कुळांस सांगत असतांहि, कुळें पूर्वापार संबंध तोडण्यास तयार नाहींत अशीं उदाहरणें आहेत. यावरून चांगल्या खोतांचें अद्यापिहि कुळांवर प्रेम आहे व कुळांसहि अद्यापि खोत हवे आहेत असें उघड ठरतें.

पण नुसत्या खोतांच्या समजूतदारपणानें या वादग्रस्त प्रश्नाचा समाधानकारक निकाल लागणार नाहीं. सरकारनें १९०४ चा कायदा केला, अदूरदृष्टीच्या कुळांनीं अर्ज केले, खोतांनीं पट करण्यास संमति दिली व अशा रीतीनें समजा, शेंकडा पन्नास अगर पाऊणशें खोती गांवांत अभावणीची जुनी पद्धत नामशेष झाली; तरी तेवढ्यानें सर्व कार्य होत नाहीं. कारण ठरलेल्या या पट्टीच्या पैशाचा वसूल तरी बिनतक्रार, बिनबोभाट व वक्तशीर होईल याचा काय नियम! व असें

न झालें म्हणजे मग खोतांचें ऐनजिनसी नुकसान व्हावयाचें तें होऊन वरतीं वसुलाचा अनिश्चितपणा, दगदग हीं मात्र त्यांच्या पदरांत पडलीं म्हणावयाचीं. असें झालें तर मात्र नवा कायदा या वादग्रस्त प्रश्नाचा न्यायबुद्धीनें अखेरचा व समाधानकारक निकाल लावण्याच्या उद्देशानें, सरकारनें केला किंवा तो करण्यांत नुकतेंच खोतांच्या हक्कावर स्वारी करून त्यांची कंबर मोडण्याचा त्यांचा हेतु होता, हें त्यांच्या या पुढील वर्तनावरून दिसून येणार आहे. खोताच्या देण्याचा अनिश्चितपणा हें जसें कुळास दुःखाचें मूळ होतें, तसेंच वसुलाची अडचण ही खोतास अत्यंत त्रासाची बाब होते हें विसरतां कामा नये. व नवीन कायद्यानें कुळाच्या दुःखाचें जसें निवारण झालें तसेंच खोतांच्या या दुःखाचेंहि निवारण होणें जरूर आहे मग तें कनिष्ठ मुलकी अधिकाऱ्यांची वरून कानउघाडणी होऊन होवो अगर त्याकरितां एकादा नवीन कायदा करावयास लागो. देशावरील इनामदारांच्या वसुलाची जी रड तीच कोंकणांत खोतांच्या वसुलाची रड आज कैक वर्षें आहे.

लँड रेव्हिन्यु कोड, विशेषतः भाग १८ मधील सारावसुलीचे उपाय, यांचा उपयोग सरकारला तेवढा व्हावयाचा, इनामदाराला किंवा खोताला व्हावयाचा नाहीं हें ठरलेलें! क्वचित्च ठिकाणीं इनामदारास कलम ८८ प्रमाणें वसुलाबाबत अधिकार तरी मिळतात; खोतास तेहि नाहींत, व यामुळें कुळानें खाका वर केल्या कीं 'मदत' मागून बेलीफद्वारें सव्यापसव्य केल्याशिवाय त्यांस गत्यंतर नाहींसें होतें. पट नव्हतें तोंपर्यंत खोत खळ्यावर गेला असतां धान्यांतलें धान्य त्यास द्यायला कुळास नाहीं म्हणतां येत नसें व देणें कठीणहि जात नसे. पण पट होऊन खोताचा कुळाचा नित्य संबंध तुटल्यानें हातीं नगद नाहीं म्हणून कुळानें धान्य खाऊन जावें, व खोतानें हरि हरि म्हणत बसावें; असें होणार नाहीं याला जामीन कोण? कुळांच्या कैवारानें पट करून खोतांचें स्वामित्व जर सरकारनें नामशेष करून टाकलें, तर खोतांच्या इतर तक्रारी तरी त्यांनीं आपले हातून होतील तितक्या नाहींशा करून टाकिल्या पाहिजेत.

या तक्रारी खोतांच्या अर्जांच्याद्वारें सरकारपुढें मांडल्या गेल्याच पाहिजेत, फक्त त्यांचें निवारण होणें उरलें आहे. पहिली तक्रार अशी कीं, रेकॉर्डिंग ऑफिसरांचे ठराव ठरावाचे तारखेपूर्वींच्या देण्यास लागू करूं नयेत, व पट करण्याचे अर्ज केल्यापासून ते लवकर निकालांत न निघाल्यानें ज्या बाक्या तुंबल्या असतील त्यांचा फडशा लवकर करून देण्यास खोतास मदत मिळणें जरूर आहे.

दुसरें असें कीं, या पुढील देण्यासंबंधानें मुलकी कोर्टांनीं त्वरित दाद घेतली पाहिजे, पूर्ण चौकशी केली पाहिजे व ठरावाची अंमलबजावणी अधिक सक्तीनें करून जप्तींत कांहीं न मिळेल तर कुळाची जमीन खालसा करून खोतास देण्याचा सरकारनें ठराव केला पाहिजे. कांहीं तरी निमित्त करून मदत नाकारून खोतास दिवाणी कोर्टाकडे जावयास सांगणें हें सर्वथा अन्याय्य आहे. दिवाणी कोर्टात लागणारा काळ व खर्च आणि दाव्यांतील क्षुद्र विषय यांचें प्रमाण लक्षांत घेतलें म्हणजे 'अडक्याची भवानी तिला बारा रुपयांचा गोंधळ' या म्हणीची आठवण झाल्यावांचून राहात नाहीं. मदतीच्या हुकूनाम्याच्या अंमलबजावणीचे कामीं हल्लीं फक्त एक वेळ वॉरंट देण्याची वहिवाट आहे, पण हें असें कां असावें ! जरूर ती 'प्रोसेस' घेऊन धनको मागेल तितका वेळ बेलीफ कामगिरीवर कां पाठवूं नये हें कळत नाहीं. प्रथम मुलकी कोर्टांत व नंतर दिवाणी कोर्टांत असें दुबार काम चालल्यानें खर्च फार येतो व शेवटीं हा खर्च कुळाच्याच बोडक्यावर बसतो, हें रयतेचें हित पाहण्याचा आव घालणारांनीं लक्षांत ठेवावें, व मुलकी कोर्टांना दिवाणी कोर्टांचे सर्व हक्क मिळण्याबद्दल जरूर तर कायदा करवून घ्यावा. असें केल्यानें सर्वांसच सुख होईल. तसेंच सरकार देण्याकरितां जर जमीन खालसा होते, तर खोताचे देण्याकरितां ती कां होऊं नये ? खोती सेटलमेंट ॲक्टाच्या ९ व्या कलमान्वयें खोती कुळांची जमीन वंशपरंपरा उपभोगतां येते, पण कुळास ती दुसऱ्यास देतां येत नाहीं. हें कलम घालतांना, खोतानें सरकारास दिलेली जामीनगत लक्षांत घेण्यांत आली होती; व सारावसुलीचे सोईकरितां अमुक एक म्हणजे खोतास पसंत असेल तेंच कूळ जमिनींत रहावें, भलत्यासलत्याचा तींत प्रवेश होऊं नये असा या कलमाचा हेतु होता. परंतु विपरित शब्दछळ व न्यायाची विचित्र लीला यांच्या योगानें अलीकडे असें होऊं लागलें आहे कीं, कुळानें खोती जमिनीवर बोजा उत्पन्न केल्यानें तिन्हाईत मात्र जमिनींत बेधडक घुसूं शकतो, पण स्वतः खोतास मात्र घुसतां येत नाहीं. कुळाकडून 'सबंध' दोन वर्षांची बाकी थकेल तेव्हांच, व तेंहि कलेक्टराकडे अर्ज केल्यावर त्याचे मर्जीस येईल तरच, कुळाकडून जमीन निघून खोतास मिळणार ! अर्थात् ज्याच्यायोगानें कुळाला तिन्हाइताचा पाय तर खोती जमिनींत घुसवितां येणार नाहीं, परंतु कांहीं विविक्षित मर्यादेबाहेर कुळाच्या नाठाळपणाची मजल जाईल तर खोतास

जमीन विकून अगर खालसा करून हक्कानें मागतां येईल, अशा प्रकारची कायद्याची दुरुस्ती होणें जरूर आहे. तात्पर्य, खोती सेटलमेंट ॲक्टाच्या हेतूविरुद्ध होत असलेल्या सर्व गोष्टींचा प्रतिकार झाला पाहिजे; व जो न्याय सरकार खोतांस व सरकार धारेकऱ्यांस लागू करतें तोच न्याय खोतांना आपल्या कुळांस लागू करितां येईल अशी ही व्यवस्था करून देणें सरकारास भाग आहे.

शेवटीं पटाच्या या नवीन पद्धतीपासून कुळास कितपत खरा फायदा होईल याविषयीं दोन शब्द सांगून हा विषय पुरा करितों. कुळाच्या देण्यास निश्चित स्वरूप येणें हें सर्वस्वीं इष्ट आहे खरें, तथापि हें देणें नगद किंवा धान्याच्या रूपानें असावें यांत पुष्कळच फरक आहे. एके वेळीं या देशांत सरकारदस्तसुद्धां कुळास धान्याच्या रूपानेंच देतां येत असे. पण ही पद्धति फार मोठ्या प्रमाणावर ठेवणें जरी शक्य नसलें तरी व्यक्तिशः देण्याघेण्यास ही पद्धति फारच सोईची असते. 'पट' झाल्यानें कुळाला नक्त पैसे हातीं हवेत व ते त्याच्या गांठीं हवे तेव्हां कसे पडावे हा विचारच आहे. धान्याचे पैसे करण्यास कुळास तें स्वस्त दरानें विकावें लागणार! निदान बंदर किनारा सोडून आंतल्या कोंकणपट्टींतील कुळांस तरी ही अडचण विशेष भासेल असें वाटतें. याचा परिणाम एक तर असा होईल कीं, कुळांस खोतालाच स्वस्त दरानें साऱ्याऐवजीं धान्य द्यावें लागेल किंवा गांवच्या एकाद्या उपरि सावकाराकडून हप्त्याचे वेळीं कर्ज काढावें लागेल. कोणतीहि गोष्ट घडून आली तरी कुळाचें त्यांत अहितच आहे व त्यांतल्या त्यांत दुसऱ्या गोष्टीचे योगानें कुळाचें अहित होऊन वरती गांवची जी एकी निदान एकसूत्रबद्धता असते तीहि जाऊन दुहीची भर पडेल.

---

## ६ संगमेश्वर तालुका-सभा

(मे १९०९)

संगमेश्वर तालुका सभेच्या या पांचव्या बैठकीचें अध्यक्षस्थान आपण मला दिलें याबद्दल मी आपला फार ऋणी आहें. वास्तविक तालुका सभा ही एक प्रकारें स्थानिक संस्था होय, व तिचें अध्यक्षस्थान स्वीकारण्याचा अधिकार फक्त स्थानिक मनुष्यासच असावा; परंतु माझ्यासारख्या परस्थ मनुष्यास बोलावून आपण आपला म्हटलें व अशा रीतीनें आपण मला ग्रामस्थाचे हक्क दिले, यावरून माझ्या योग्यतेपेक्षां आपल्या मनाचा उदारपणाच अधिक व्यक्त होत

आहे. पाश्चिमात्य देशांत परक्या मनुष्याचा बहुमान करावयाचा झाला असतां त्यास नागरिकत्वाचे हक्क देतात. या हक्कास (Freedom of the City) असें म्हणतात. फार जुन्या काळीं नगर व राष्ट्र यांची समव्याप्ति असे, तेव्हां-पासूनचा हा प्रचार आहे. तथापि आजच्या काळांतहि एका गांवच्या मनुष्यास दुसऱ्या गांवांतील लोकांचें 'ममत्व' संपादन करितां आलें तर तो लाभ कांहीं लहान नाहीं.

असें जरी आहे तरी एका अर्थानें मी यापूर्वींहि आपणांतच होतों. माझा जन्म जरी देशावर झाला आहे तरी पण आपणासारखाच मी 'कोंकण-स्थ' आहें. जवळच देवगड तालुक्यांत माझ्या पूर्वजांचें नांदतें घर अद्यापि आहे; व श्रीपरशुरामांनीं ब्राह्मणांस अग्रहार दिलेली 'भक्तप्रिय' भूमि आपल्या कष्टाळू उपासकांस जो प्रसाद देते त्यामध्यें आपणांबरोबर मीहि एक अंशभागी आहें. वास्तविक जाति वगैरेंचा वृथा अभिमान मला मुळींच वाटत नाहीं; तथापि कोंकणस्थ अगर चित्पावन लोकांचा इतर कित्येक लोक व विशेषतः सरकारी अधिकारी द्वेष करितात, एवढ्याकरितांच चित्पावन लोकांसंबंधानें प्रसंगोपात्त दोन शब्द सांगणें जरूर आहे. चित्पावनांस कोणी विनाकारण नांवें ठेवूं लागला म्हणजे मात्र स्वतः चित्पावन असल्याबद्दलचा माझा अभिमान दुणा-वितो. सुमारें दहा वर्षांपूर्वीं गणेशखिंड येथें खाजगी व सरकारी मंडळी एके प्रसंगीं जुळली असतां मरहूम नामदार न्युजंट यांची व माझी गांठ पडली. तेव्हां पहिल्या दोन तीन प्रश्नांतच त्यांनीं 'तुम्ही कोंकणस्थ आहां काय?" असा व्यंग्यार्थसूचक प्रश्न मला केला. तेव्हां मी त्यांस असें म्हणालों कीं, मी कोंकणस्थ आहें एवढेंच नव्हे तर अस्सल चित्पावनहि आहें. कोंकणस्थ हे चितेपासून पावन झालेले असोत, अगर ज्यांचें चित्त पावन ते चित्पावन अशी या शब्दाची व्युत्पत्ति असो; ते 'पावन' आहेत ही गोष्ट त्यांना नांवें ठेवणा-रांना नाकबूल करितां यावयाची नाहीं. केवळ नांवावरच कोटी करून कोंकण-स्थांस नांवें ठेवूं पाहाणारांना त्या नांवांतच उत्तर मिळण्याची योजना झालेली आहे. फिनिक्स 'नांवाचा' पक्षी चितेपासून पावन होतो अशी एक पौराणिक दंतकथा अगर कविसंकेत ग्रीक वाङ्मयांत आहे, व लक्षणांसंबंधानें पाहातां या ग्रीक पक्षामधील व चित्पावन लोकांमधील साम्य जसें अद्भुत व रम्य तसेंच यथार्थहि आहे. फिनिक्स पक्षी हा प्रायः एकलकोंडा रहातो; त्यास फारशी

जूट आवडत नाहीं; तो जबरदस्त असून त्याची भरारी फार मोठी असते; तो इच्छामरणी म्हणून अमर या नांवास योग्य आहे; आपल्या एका स्थितीचा त्यास कंटाळा आला म्हणजे तो स्वेच्छेनें आपला देह जाळून घेतो आणि आपल्या चितेपासून फिरून सतेज व देदीप्यमान असा बाहेर पडतो. वरील गोष्टींपैकीं लक्षणेनें कोंकणस्थांस किती लागू पडतात, याचा सूज्ञ सभासदांनीं आपल्या मनाशीं विचार करावा. कोंकणस्थ लोकांनीं आजपर्यंत राष्ट्रीय इतिहासांत बरीच कामगिरी केलेली आहे. देशस्थांत जसे साधुसंत निर्माण झाले आहेत, तसेच कोंकणस्थांत वीर व मुत्सद्दी उत्पन्न होऊन त्यांनीं राष्ट्राचें नांव उज्ज्वल केलेलें आहे. छळ हा उत्कर्षाचा सहायकर्ता होय, अशी एक इंग्रजी म्हण आहे ( persecution of martyrs is the seed of the church. ) परशुरामानें हातांत शस्त्र धरून, ‘ शापादपि ’ ‘ शरादपि ’ ही ब्राह्मणाची जोडगोळी खरी करून दाखविली, आणि जयदेव कवीनें गीतगोविंदांत म्हटल्याप्रमाणें:—

**क्षत्रिय—रुधिर—मये जगदपगतपापं**
**स्नपयसि पयसि शमितभवतापं ।**

अशी कृति केली, त्यास तरी छळ हेंच कारण असलें पाहिजे. कारण ऐतिहासिक दृष्टीनें पाहतां पुरातन कालीं ब्राह्मण व क्षत्रिय यांच्यामधील युद्धाचे प्रसंगीं परशुरामाचा अवतार झाला; व परशुरामानें २१ वेळां पृथ्वी निःक्षत्रिय केली ती केवळ रक्तपात करण्याच्या इच्छेनें नव्हे तर तत्पूर्वीं झालेल्या ब्राह्मणांच्या छळांमुळेंच होय, अशी साधारण समजूत आहे. आधुनिक काळांतहि चित्पावन ब्राह्मणांचा उत्कर्ष छळामुळेंच झाला. श्रीवर्धनास बसून बाळाजी विश्वनाथ जमाबंदीचे आंकडे मोडीत असतां, आपण पुढेंमागें सातारच्या छत्रपतीचे मुख्य प्रधान होऊं, अगर पुढें आपला मुलगा दिग्विजय करील ही कल्पनाहि कधीं त्यास आली नसेल. या दिग्विजयी मुलाचा ( बाजीरावाचा ) जन्म येथें जवळच चिपळुणास झालेला आहे. मराठी साम्राज्य स्थापण्याची कल्पना जी प्रथमतः शिवाजीमहाराजांच्या मनांत आली तिच्या परिणतीचा उपक्रम याच चित्पावनांचे हातून झाला; आणि त्याच्याच मुलानें पुढें भिमथडीच्या घोड्यांना अटक नदींत स्नान घातलें. जंजिरेकर हबशांनीं श्रीवर्धनच्या चित्पावन ब्राह्मणांना त्रास दिला नसता तर बाळाजी विश्वनाथ

ह्मा बहुधा जमाबंदीचे आंकडे मोडीत अगर मीठबंदरच्या हवाल्याचे हिशेब चुकवीत घाटाखालींच बसला असता, असें मानणें सयुक्तिक आहे. अर्थात् भटपेशव्यांच्या उत्कर्षास त्यांचा छळ हाच अप्रत्यक्ष रीतीनें कारणीभूत झाला; व म्हणून इंग्रजी अधिकाऱ्यांनीं आज बरींच वर्षेपर्यंत एकंदर ब्राह्मणांवर व विशेषतः कोंकणस्थ ब्राह्मणांवर जी शिस्त धरली आहे, तिच्यामुळेंच चित्पावनांचा नाश न होतां देशकालानुरोधानें एखाद्या अकल्पित रीतीनें त्यांचा उत्कर्ष होण्याचा संभव आहे, असा कोणाहि विचारी मनुष्यास भरंवसा वाटेल. पेशवाई बुडल्यानंतरहि राष्ट्रीय कार्य करण्याची आपली परंपरा चित्पावनांनीं कायम राखली आहे. इंग्रजी राज्यांत देशस्थ व कऱ्हाडे ब्राह्मणांमध्यें, तसेंच ब्राह्मणेतर अनेक वर्गांमध्यें पुष्कळ मोठमोठे लोक व देशभक्त झाले ही गोष्ट मला सर्वस्वीं कबूल आहे. परंतु चित्पावनांनींहि आपलें नांव राखलें आहे, ही गोष्ट ' प्रस्तुत ' म्हणून विशेष जोर देऊन मला सांगावयाची आहे इतक्याकरितांच सांगतों. रानडे, टिळक व गोखले हे तिघेही चित्पावन आहेत हें सांगितलें असतां महाराष्ट्रांतील बुद्धिमत्ता, स्वार्थत्याग, धैर्य, देशभक्ति, मुत्सद्दीगिरी, इत्यादि बाबींमध्यें चित्पावन कोणासहि हार जाण्यासारखे नाहींत, ही गोष्ट सर्वांस कबूल करावी लागेल.

परंतु मीं वर सांगितल्याप्रमाणें दुसरे लोक विनाकारण नांवें ठेवूं लागले असतां अभिमानाची ज्योत जरी प्रज्वलित होते व झाली पाहिजे, तरी जातीचा दुरभिमान कोणाहि सुज्ञ मनुष्यास असणार नाहीं, व कोंकणस्थांचा हेवा करणारे अगर त्यांस नांवें ठेवणारे लोकांस केवळ उत्तर म्हणून वरील हकीकत मीं सांगितली आहे. हे क्षुद्र भेदभाव विसरण्याची वेळ यापूर्वींच येऊन गेली असून अजूनहि आपण जाति, पोटजाति यांतील भेद व गुणदोष उराशीं घेऊन बसलों अगर उगाळूं लागलों तर राष्ट्राची हानि खचित् होते, अशी माझी दृढ समजूत आहे. जाति काय किंवा स्थल काय, या दोहोंचाहि अभिमान बाळगण्यास कांहीं मर्यादा आहे; व केवळ ' आत्मप्रीती ' पलीकडे या अभिमानाची मजल गेली—म्हणजे दुसऱ्या जातीच्या अगर स्थळाच्या द्वेषाचा अंकुर यत्किंचितहि फुटला—तर या मर्यादेचें उल्लंघन झालें असें समजावें. वास्तविक कोंकणस्थ, कऱ्हाडे व देशस्थ हा भेद निव्वळ कृत्रिम आहे; व या तीन वर्गांनीं एकमेकांस परके लेखून, गोत्रादिकांमुळें शरीरसंबंधास आधींच असलेलीं बंधनें

वाढवावीं ही गोष्ट अत्यंत अनिष्ट असून धर्म, शास्त्र अगर युक्ति यांपैकीं कोणाचेंहि अशा गोष्टीस पाठबळ मिळणार नाहीं. कांहीं थोड्या वर्षांपूर्वी रा० बळवंतरावजी टिळक यांनीं केसरीमध्यें देशस्थ, कोंकणस्थ व कऱ्हाडे या विषयावर लिहिलेला अग्रलेख आपल्यापैकीं कित्येकांच्या स्मरणांत असेलच.

स्थलासंबंधानेंहि बारीक पाहूं गेलें असतां अशीच गोष्ट आढळून येते. कारण भूमीचा अभिमान धरणें ही गोष्ट जरी चांगली आहे तरी आपल्या पूर्वजांचा, किंबहुना मानववंशाचा इतिहास लक्षांत घेतला असतां भूमिविषयक अभिमानास मूळाधारच नाहींसा होईल. याचीं एकदोनच उदाहरणें पुरीं होतील. आम्हां 'केळकरांचें' मूळचें गांव ढोकंबळें आहे असें सांगतात. माझ्या वाडवडिलांच्या निदान पांच पिढ्या देवगड तालुक्यांत वानिवडें गांवीं झाल्या. माझ्या वरची एक पिढी मिरज संस्थानांत झाली. माझा स्वतःचा जन्म पंढरपुरानजीक, मिरज इलाख्यांतील एका तालुक्याचे गांवीं, झालेला असून माझ्या बहुतेक शिक्षणक्रमाशीं मिरज संस्थानचाच संबंध आहे. अलीकडे मी स्वतः उद्योगधंदा करूं लागल्यापासून माझीं तेरा वर्षें पुण्यांत गेलीं; व हल्लीं खुद्द पुण्यास मीं घर घेतल्यानें स्थाईक पुणेकर बनलों आहें. अशा स्थितींत एखादे वेळीं सूक्ष्म विचारांची लहर मनांत आली असतां ढोकंबळें, वानिवडें, मिरज, मोडलिंब व पुणें या इतक्या स्थलांपैकीं विशेष अभिमान असा मीं कोणाचा बाळगावा, असा बिनतोड प्रश्न सहजच मनांत उद्भवतो व या कामीं माझा जो अनुभव आहे तो येथें जमलेल्या प्रत्येक व्यक्तीचा बहुधा असेल. तसेंच कोंकणस्थांनीं कोंकणाचा अभिमान धरणें हें सकृद्दर्शनीं सयुक्तिक दिसतें. परंतु कै० विश्वनाथ नारायण मंडलीक यांनीं सुमारें चाळीस वर्षांपूर्वी रॉयल एशियाटिक सोसायटीपुढें वाचलेल्या एका निबंधांत, हल्लींचे कोंकणांतले लोक मूळचे तेथले रहिवाशी नव्हत—तर हिंदुस्थानांतील दुसऱ्या एखाद्या भागांतून आलेले असावे, अथवा हबशांप्रमाणें आफ्रिकेच्या पूर्व किनाऱ्याहून जहाजांतून येऊन इकडे त्यांनीं वसाहत केली असावी, असा तर्क व्यक्त केलेला आहे, ही गोष्ट आपण बहुधा ऐकलेली असेलच. याच्याहि पलीकडे एक पायरी जावयाचें म्हणजे हिंदुस्थानांतील आर्यलोक तरी मूळचे हिंदुस्थानांत राहणारे थोडेच आहेत ! तर ते प्रथमतः उत्तरध्रुवाजवळ रहात असून नंतर हळूहळू दक्षिणेकडे आले, ही गोष्ट रा. टिळक यांनीं खुद्द वेदांतील प्रमाणें देऊन निर्विवाद रीतीनें

सिद्ध करून दाखविली आहे. अर्थातच अशी स्थिति असल्यावर कोंकणांतील लोकांनीं सह्याद्रिलगतच्या भूमीचा अभिमान धरावा, अथवा आपली जन्मभूमि हुडकण्यास आफ्रिकाखंडाकडे धांव घ्यावी, अगर ती शोधण्यास जहाजांत बसून उत्तरध्रुवाच्या रोखानें सफर करावी, याचा जबाब कोण व कसा देऊं शकेल? तात्पर्य, मनुष्यमात्राचें मन संकुचित असतें व त्याच्या ममत्वबुद्धीला कांहीं तरी समर्याद असें अधिष्ठान लागतें, एवढ्याकरितांच जाति व स्थल यांचा अभिमान त्यानें बाळगणें कदाचित् सयुक्तिक होईल; परंतु सगुण उपासना अंगिकारिली असतांहि निर्गुण परब्रह्मसंबंधीं ममत्व जसें खऱ्या उपासकाचे मनांतून जाऊं शकत नाहीं व जाणें योग्य होणार नाहीं, त्याचप्रमाणें विवक्षित जाति व विवक्षित स्थल यांचा सदभिमान बाळगणारानेंहि आपलें विश्वकुटुंबाशीं असलेलें नातें केव्हांहि विसरतां कामा नये. आतां राजकीय गोष्टींत केवळ विश्वकुटुंबाचें नातें ध्यानांत नेहमीं बाळगून चालत नाहीं. कारण कोणचीहि शक्ति फलद्रूप होण्यास तिला ( Fulcrum ) उपस्तंभाचें अधिष्ठान जरूर असतें; व मनुष्याच्या हातून होणारा उद्योग समर्याद व अल्पप्रमाण असल्यामुळें त्यास आपल्या उद्योगास कृत्रिम मर्यादा उत्पन्न करणें जरूर आहे; एरवीं त्याच्या शक्तीचा दृश्य उपयोग होणार नाहीं व आपल्या उद्योगाचें फल प्रत्यक्ष पहावयास सांपडल्यामुळें जें उत्तेजक व अनिर्वाच्य सुख होतें तें त्यास मिळणार नाहीं. तथापि केवळ स्थानिक अगर जातिविषयक मर्यादा मनांत बाळगल्यानें मनुष्याचे हातून अलौकिक या नांवास साजेल असें कृत्यहि कधीं होणार नाहीं, हें ध्यानांत ठेवलें पाहिजे. राष्ट्र, राष्ट्रीयत्व हे शब्द आपणांस माहीत आहेतच; तथापि राष्ट्रीयत्वाची कल्पना झाली तरी शुद्ध अगर नैसर्गिक नाहीं. एका बाजूस एकतंत्री व जुलमी राज्यपद्धति; व दुसरे बाजूस अराजक समाजरचना या दोहोंमधील सुरक्षित मार्ग काढून देण्याचें श्रेय राष्ट्रीयत्वाच्या कल्पनेकडे आहे, असें लॉर्ड ॲक्टन या इंग्रजी इतिहासज्ञाचें मत आहे व तें मलाही मान्य वाटतें. प्रत्यक्ष कार्याच्या उपक्रमाचे प्रसंगीं कदाचित् स्थल व जाति यांची मर्यादा केव्हां केव्हां अपरिहार्य असेल; परंतु निदान मनानें तरी मनुष्य नेहमीं विश्वकुटुंबी असावा, व त्याच्या मनःप्रवृत्तीची अथवा सदिच्छेची लाट या विश्वकुटुंबाच्या अंतिम सीमेपर्यंत पोंचण्याइतकी प्रबळ असावी म्हणजे त्याचे हातून क्षुद्र असें कृत्य होणार नाहीं ही गोष्ट कोणासहि कबूल होईल.

परंतु हीं सर्वसाधारण तत्त्वें सोडून आपण कोंकणच्या स्थितीकडे वळूं; व तसें केलें असतां आपणांस असें आढळून येईल कीं, हल्लींच्या स्थितींत जाति व स्थल यासंबंधीं भेदभाव जर आपण उराशीं बाळगूं लागलों तर कोंकणची ही स्थिति सुधारणें शक्य नाहीं. इंग्रजी राज्यापूर्वीं कोंकण हें हल्लींहून सधन होतें किंवा काय, हें ठरविण्यास तर्काशिवाय कांहीं साधन आहे असें वाटत नाहीं. परंतु एक गोष्ट निश्चयात्मक दिसते, ती ही कीं, या प्रांताची स्थिति अलीकडे विशेष निर्धन होण्यास बरींच कारणें झालेलीं आहेत व त्यांचा परिणाम नाकबूक करितां येणार नाहीं. एक तर या प्रांताची लोकसंख्या गेल्या १०० वर्षांत पुष्कळच वाढलेली आहे. दुसरें असें कीं, या प्रांतांतील मर्यादित भूमि आज शेंकडों वर्षें पीक देत असून तिला विश्रांति म्हणून कशी ती मुळींच नाहीं; व तिसरें असें कीं, उपजीविकेचे जे कित्येक इतर मार्ग पूर्वीं कोंकणच्या लोकांस खुले होते ते हल्लीं बंद झाले असून, शिवाय धारणेचें मानहि अत्यंत वाढलें आहे. कोंकणइतके मनुष्यवस्तीनें गजबजलेले प्रांत मुंबई इलाख्यामध्यें दुसरे असतलि असें वाटत नाहीं; व मुंबईस इतक्या गिरण्या नसत्या तर कोंकणांतील लोकांनीं एकमेकांना फाडून खाण्याची वेळ आली असती ! जमिनीसंबंधानें पहावें तों पिकाच्या उपयोगी अशी जमीन मनुष्यवस्तीच्या मानानें फार कमी आहे. कोंकण हें ज्या वेळीं श्रीपरशुरामानें ब्राह्मणांस अग्रहार म्हणून दिलें त्यावेळीं तें त्यांस पुरून उरण्यासारखेंहि कदाचित् असेल; व कवींनीं—

> " कुलाचला यस्य महीं द्विजेभ्यः
> प्रयच्छतः सीमदृषत्वमापुः
> बभूवुरुत्सर्गजलं समुद्राः "

... ... ... ...

असें जें वर्णन केलें तें ठीकच आहे. ज्या वेळीं ब्राह्मणांना ही भूमि दान दिली त्या वेळीं क्षेत्राची मर्यादा आंखण्याला बाहेरून दगड आणून रोंवावे लागले नाहींत, तर कुलपर्वतांनींच तें काम केलें; व दानोदक घातलें, त्याचे समुद्र भरले असें हें वर्णन आहे. आज–मित्तीस पहावें तों हे कुलाचल व हे समुद्र असे दोन्हीहि शिल्लक आहेत, परंतु दरम्यानची स्थिति मात्र जराशी निराळी झाली आहे. पिकाची जमीन व लोकसंख्या यांचें प्रमाण पाहिलें तर सर्व रत्नागिरी जिल्हाभर दर डोईस अर्धा एकर जमीनहि पुरी पडत नाहीं. खुद्द संगमेश्वर तालुक्याची स्थिति आपणास

माहीत आहेच. कोंकणाइतकीं लहान शेतें या इलाख्यांतचशीं काय परंतु सर्व जगांत तरी कोठें असतील कीं नाहीं याची शंकाच वाटते. या तालुक्यांतील एकंदर सर्वे नंबर व पिकाच्या जमिनींचें क्षेत्र पाहिलें तर सरासरीच्या मानानें एक सर्वे नंबर एक एकराचाहि पडत नाहीं. हा सर्व, लोकवस्तीची वाढ व बहुधा दरपिढीस होणाऱ्या वांटण्या यांचाच परिणाम आहे. घांटावर जसजसें पूर्वेकडे जावें तसतशी ही स्थिति पालटते, व कित्येक ठिकाणीं आगगाडींतून जात असतां, मध्यें एकही बांध, उरोळी नसलेलीं व सुपीक शेतें दोन्ही आंगांस लांबच लांब क्षितिजापर्यंत पसरलेलीं मीं पाहिलेलीं आहेत. खुद्द संगमेश्वर तालुक्यांत पाहिलें तर सुमारें पावणे दोन लक्ष एकरांमध्यें कमींतकमी एक लक्ष साठ हजार इतकीं दळीं किंवा शेतें आहेत. त्यांतहि बागाईत एकंदर शंभर एकरांवर नाहीं व सुमारें तेरा हजार एकरांतच काय तें भात पिकतें; बाकी सगळी वरकस जमीन. देशापेक्षां कोंकणच्या शेतीला श्रमसायास जास्त लागतात. कोंकणचें भूदैवत मोठें खडतर आहे. जमीन दर वर्षी जाळाभाजावी लागते, व ही जाळभाज करण्यास भरपूर राब व कवळ लागतो. तो मिळणें दिवसेंदिवस मुष्किलीचें झालें आहे. देशावर जाळभाज तर लागत नाहींच, परंतु नांगरणीहि नित्य करावी लागत नाहीं. महाराष्ट्रांत पूर्वेकडील कित्येक भागांत अशा जमिनी आहेत कीं, सबंध एका पिढींत पांच चार वेळां त्यांची नांगरणी झाली तर पुष्कळ झाली. लहान क्षेत्रांत पीक चांगलें येण्यास खतमूत घालावें लागतें, व हें द्रव्य जर भरपूर असेल तर क्षेत्रांतली शेतीसुद्धां फायदेशीर करितां येते, हें हॉलंड व बेलजिअम वगैरे पाश्चात्य देशांत आढळून येतें. परंतु कोंकणांत हें फार कमी आहे. शेतकीच्या शिक्षणाविषयीं जसा देशावर तसाच कोंकणांतहि अर्थातच अभाव आहे. ही शेतकीची स्थिति झाली. उद्योगधंद्याच्या नांवानेंहि आवळ्यायेवढें पूज्य आहे. कोंकणांतून बाहेर माल जितका जातो त्यापेक्षां आंतच अधिक येतो. परंतु बाहेरून येणाऱ्या मालाचा मोबदला देण्यास लागणारा पैसा जिल्ह्यांत सर्व उत्पन्न होत नसून तोहि बऱ्याच अंशानें बाहेरून आणावा लागतो. नारळ, ताग, व सुपारी यांखेरीज कोंकणचें स्थानिक असें द्रव्योत्पादक दुसरें एकहि साधन नाहीं. नारळ सुपारी तरी पुरून उरणारी विकली जाते असें नाहीं; तर कोंकणांतील लोकांस ज्यांचीं घरचीं आगरें नाहींत त्यांना हे पदार्थ घांटावरील लोकांइतकेच महाग व अतएव दुर्मिळ आहेत. रत्ना-

गिरी जिल्ह्यांत सरकार देणें वजा जातां दरमाणशीं सालीना निवळ उत्पन्न सुमारें तीन रुपये तरी राहतें कीं नाहीं याची शंकाच आहे; सरकारानें सर्व सारा माफ करून अवघी शेतजमीन इनामवजा रयतेस आज बहाल केली तरी जमिनीवर रयतेचें पोट भागणार नाहीं, असें Captain Wingate यांनीं १८५१ च्या आपल्या सर्व्हे रिपोर्टांत म्हटलें आहे; व या सालानंतरच मिठाचा, दारूचा, जंगलाचा वगैरे अनेक कायदे सरकारनें केलेले आहेत, ही गोष्ट लक्षांत घेतली पाहिजे. अर्थात् "आमच्या त्या भिकार कोंकणांत काय माती आहे!" असें मराठी क्रमिक पुस्तकांत जें वाक्य आपण लहानपणीं वाचतों त्याची प्रतीति थोरपणीं चांगली पटते. हल्लींच्या क्रमिक पुस्तकांतून हा धडा काढून टाकला आहे; परंतु त्यामुळें कोंकणचें भिकारपण मात्र गेलें नाहीं.

कोंकण प्रांतांत स्थानिक द्रव्योत्पादन वाढण्यास मार्ग नाहीं, व बाहेरून पैसा येतो तो केवळ पोटापाण्यास खर्च होतो; व जमिनीची स्थिति वर सांगितल्याप्रमाणें असल्यामुळें या प्रांताची सुधारणा कशी होणार, हा प्रश्न राहतोच. एक मात्र आशा वाटते ती ही कीं, जर कोंकण प्रांतांतून आगगाडी झाली तर उद्योगधंदे वाढून कदाचित् भलें मोठें स्थित्यंतर होण्याचा संभव आहे. उद्योगधंद्यास योग्य अशी हवा व पाणी कोंकणांत मुबलक आहे, व मजुरांचीहि वाण पडणार नाहीं; आणि नवीन उद्योग निघाल्यास शेतींतून कांहीं लोक निघून दुसऱ्या कामाकडे पडण्याचा संभव आहे. कोंकणांत डोंगर व खाड्या पुष्कळ असल्यामुळें आगगाड्यांचा मार्ग होणें दुष्कर आहे; तथापि अशा मार्गाची कल्पना सरकारच्या डोक्यांत बरेच दिवस असावीशी वाटते. गुदस्तसालीं याच दिवसांत मी माथेरानास गेलों होतों; व त्यावेळीं मी रत्नागिरी जिल्ह्यांत सुप्रसिद्ध असलेले क्राफर्डसाहेब यांनीं, कोंकणांतून रेलवे नेण्याची योजना कशी होऊं शकते हें नकाशावर मला समजावून सांगितल्याचें माझ्या लक्षांत आहे. हल्लीं या रेलवेचा प्रश्न प्रचलित असून ठाणें व कल्याण यांच्या दरम्यान रेलवेचा फांटा काढून तो कोंकणांत नेणार असें मी ऐकतों. रेलवे जेथें जेथें जाते तेथें तेथें कल्याणच होतें असें नाहीं, हें मी जाणतों. परंतु कोंकणची प्रस्तुतची स्थिति इतकी वाईट आहे कीं त्यापेक्षां ती अधिक वाईट होणें शक्यच नाहीं; व निकृष्ट स्थिति सुधारण्यास पुष्कळ वेळां एखादें प्रचंड स्थित्यंतरच व्हावें लागतें. आगगाडी झाल्यानें कोंकणचें कोंकणत्व निघून जाण्याचा

संभव आहे; तें अधिक बकाली होईल. तथापि कोंकणांतील लोकांची दृष्टि व मन हीं जरा विकास पावतील; व बाहेरचें त्यांना अधिक दिसूं लागेल. कोंकणांतील लोकांच्या मनाच्या संकोचाचें मुख्य कारण स्थलसंकोच व साधनसामुग्रीचा संकोच हेंच होय; व हल्लीं पर्वत व समुद्र यांनीं कोंकणास जें कोंडून टाकलें आहे तें तसें आगगाडी झाल्यानें न राहतां त्याचें बारमासचें बाहेरच्या प्रांतांशीं दळणवळण वाढेल व लोकवस्तीची गर्दी मोडेल, हे फायदे कांहीं लहान नाहींत.

कोंकणांतील दुसरा वर्ग म्हटला म्हणजे खोतांचा. कोंकणचे इनामदार, जहागिरदार, मानकरी, सरदार वगैरे हेच होत. मोंगली अमलांत खोतीच्या सनदा घेऊन धाडसी व उद्योगी अशा लोकांनीं कोंकण वसविण्याचें जें काम केलें त्याचें फळ त्यांच्या वंशजांनीं सुमारें पन्नास वर्षांपूर्वींपर्यंत भोगलें. परंतु सरकारच्या सर्व्हे खात्याचा उदय व खोतांचा अस्त हीं दोन्ही एकाच काळीं घडून आलीं. खोतांची सद्दी संपली; त्यांच्या वाढलेल्या महत्त्वाचा व त्यांस होणाऱ्या फायद्याचा सरकारास हेवा वाटूं लागला; व रयतेच्या हितचिंतकत्वाचें मिष करून खोतांविरुद्ध १८७०–८० यांचे दरम्यान जें वादळ त्यांनीं उठविलें त्याचा प्रतिकार केवळ रावसाहेब मंडलिकांसारखा पुढारी मिळाल्यानेंच झाला, व १८८० चा खोती ॲक्ट होऊन वाद मिटला. पण सरकारच्या मनांतली आढी न गेल्यामुळें १८९० सालीं खोतांस गांवकामगार या नात्यानें राबवून घेण्याचा प्रश्न उपस्थित करून त्यांच्या हक्कांवर निराळ्या दिशेनें हल्ला करण्याचा घाट त्यांनीं घातला; नंतर धान्याच्या रूपानें धारा देण्याची जी रीत होती ती पालटून नक्त पैसा देण्याचा वाद उपस्थित करण्यांत आला; खोताच्या जमिनीवरच्या हक्काचाहि प्रश्न निघाला; खोतांस कुळानें काय द्यावें, याविषयींच्या मक्त्यामध्यें हात घालण्याचा अधिकार आपणांस आहे असें सरकार म्हणूं लागलें, अभावणी व मदत यांजबद्दल मुलकी अधिकारी कटकट करूं लागले, व शेवटीं खोत-फायद्यापेक्षां सरकार–दस्त अधिक केल्यानें खोतांस आपोआप खोतकी सोडावी लागेल असा अनुभव जेव्हां देवगड तालुक्यांत आला तेव्हां, हातीं घेतलेलें काम सफळ होणार असें अधिकाऱ्यांस वाटून त्यांना आनंद झाला. या कामीं नामदार खरे यांचें बिल नामंजूर होऊन अखेर १९०४ सालीं नवीन कायदा झाला; व सरकार–दस्तापेक्षां खोत–फायदा कमी असेल

तर, तो फार तर सवापट वाढवावा व तो वसूल करण्यास मदत द्यावी असें ठरलें. तात्पर्य, सरकारास खोत नको होते, ते कांहीं अंशीं कालमहात्म्यानें, व कांहीं अंशीं सरकारच्या कृत्यानें बहुतेक नामशेष झाले आहेत, व त्यांचें अजूनहि जें थोडें महत्त्व उरलें आहे, तें यापुढें टिकेल असें वाटत नाहीं. या एकंदर धोरणानें कुळांची स्थिति न सुधारतां, त्यांचा व खोतांचा जो बरेपणा होता तो मात्र जाऊन त्यांच्यामध्यें वैमनस्य उत्पन्न झालें, व सामाजिक दृष्ट्या ही फार मोठी हानि झाली. खोतांच्या जाचांतून काढलेल्या कुळांस जर सरकारनें कायमधाऱ्याचा फायदा करून दिला असता तर 'अनाथ–नाथ' या नांवाचें श्रेय त्यांच्या पदरीं पडलें असतें. परंतु रयतेकडून पैसा घ्यावयाचा तो खोतानें कीं सरकारानें इतकाच काय तो फरक, असें या प्रश्नाचें स्वरूप असल्यानें रयतेचा संतोष व आशीर्वाद न मिळतां कोंकणांतील समाजव्यवस्थेचें एक अंग विकल केल्याचें अपयश मात्र सरकारच्या पदरीं पडलें आहे. १८८५ सालीं टी. एच. स्टुअर्ट, (Stewart) सर्व्हे व सेटलमेंट कमिशनर यांनीं संगमेश्वर तालुक्याचे तरमबंदीचे रिपोर्टाचे शेवटीं यासंबंधानें खालील उद्गार काढलेले आहेत:—"It has become a kind of fashion to speak of the Khots as a class hopelessly opposed to the interests of their ryots, or the improvement of the land, and no doubt the frequent discussion of the subject during the past 40 years, the uncertainty which conflicting opinion has produced and the *futile though well-meant efforts made to benefit the ryots at the expense* of the status of the Khots, has done much to alienate the two classes and to bring them into conflict." स्टुअर्टसाहेबांनीं असें म्हटलें आहे कीं, रयत व खोत यांजमध्यें बेबनाव उत्पन्न होण्यास सरकारच मुख्यतः कारणीभूत झालेलें आहे. शिवाय त्यांनीं सहानुभूतिपूर्वक आणखी असेंहि लिहून ठेवलें आहे कीं, खोतांची स्वतःची स्थितिहि सुधारणें जरूर असल्यानें खोतांच्या जमिनीचे धारे बेताचे ठेवावे. (The desired result can only be rendered certain by endeavouring to improve the condition of the Khots themselves, and that can be best done

in the Sangmeshwar Taluka by extending to them a fair and equitabe assessment of the lands for which they are directly responsible to Government. " ) स्टुअर्ट-साहेबांच्या या शिफारशीचा परिणाम पुढें काय झाला हें मला माहीत नाहीं.

कोंकणचें इतर रीतीनें पूर्वी जें महत्त्व होतें तेंहि अलीकडे लयास गेलें आहे. कांहीं अंशानें दक्षिण महाराष्ट्रापेक्षां कोंकणचा इतिहास जुनापुराणा आहे व शिवाजीच्या वेळीं कोंकणचें जें महत्व होतें तें पेशवाई अगर इंग्रजी अंमलाखालीं राहिलें नाहीं. शिवाजीच्या पूर्वी पोर्तुगीज, दच वगैरे परकीय राष्ट्रांच्या व्यापाऱ्यांचीं मोठमोठीं जहाजें कोंकणांतील बंदरांना लागत असत. शिवाजीचे वेळीं डोंगरी किल्ल्यांचें महत्त्व पुष्कळ असल्यामुळें सह्याद्रिमाथ्याला लष्करी महत्त्व फार असे. सोळाव्या शतकांत कोंकण ही नाक्याची जागा मानली जात असून आसद्खान नामक सुभेदारानें आपलें मुख्य ठिकाण संगमेश्वर हें केलेलें होतें; व पोर्तुगीज लोकांच्या सहाय्यानें स्वतंत्र होऊन निराळें राज्य स्थापण्याचा त्याचा विचार होता. शिवाजी व पेशवे यांच्या दरम्यानचे काळांत कोंकणपट्टी व विशेषतः बंदरकिनारा हा निरनिराळ्या दर्यावर्दी लोकांमध्यें युद्धभूमि होऊन राहिला होता. मराठे लोकांना दर्यावर्दीपणाचें जें शिक्षण मिळालें तें कोंकणांतच. अशा अनेक रीतींनीं पूर्वी कोंकणचें जें ऐतिहासिक महत्त्व होतें तें हल्लीं राहिलें नाहीं. व्यापाराचा बहुतेक भाग मुंबई बंदरानें उचलला. साध्या जहाजाशिवाय दुसऱ्या कोणच्याहि आरमाराशीं कोंकणबंदराची ओळख राहिली नाहीं व पलटणींतून जे थोडेबहुत कोंकणे नोकरीस राहिलेले असतील त्यांखेरीज बाकी सर्व प्रांतांतील लोकांची लष्करी पेशाची आठवण बुजून गेलेली आहे.

अशा रीतीनें सर्वस्वीं ऱ्हास पावलेल्या कोंकणास येथून पुढें आपला उन्नतीचा मार्ग आक्रमावयाचा आहे. हल्लींची स्थिति दोन डोंगरांच्या पायथ्यांशीं जोडून असणाऱ्या भूमीसारखी बिकट आहे. कोंकणच्या लोकांचा एका डोंगरावरून ऱ्हास झाला असून दुसरा डोंगर त्यांस चढणें आहे. परंतु डोंगर चढणें उतरणें हें सह्याद्रीच्या छायेंतील लोकांच्या आंगवळणीं असल्यामुळें त्यांना उत्तरकालाबद्दल निराश होण्याचें कारण नाहीं. नवीन तऱ्हेचा जो राजकीय आयुष्यक्रम आपल्या लोकांच्या वांट्यास आला आहे त्याचे

दृष्टीनें पाहता कोंकण हें मागसलेलें असणार हें उघड आहे. सबंध कोंकण-पट्टींत एकहि मोठें शहर नाहीं, व राष्ट्रीयसभा पूर्वी कधीं घाटाखालीं उतरलेली नसून पुढेंहि बहुधा उतरणार नाहीं. तथापि आजच्यासारखा तालुकासभेवरून असें उघड दिसतें कीं, राष्ट्रीयसभा अगर राजकीय चळवळ जरी घाटाखालीं प्रत्यक्ष उतरलेली नसली, तरी कोंकणचे सुशिक्षित लोक इतरत्र होणाऱ्या चळवळींत मनानें तरी अंशभागी खास आहेत. सह्याद्रि हा मोठमोठ्या चळवळींच्या दृष्टीच्या आड येत असला तरी अशा चळवळींचे खोल प्रतिध्वनि या पर्वताखालीं ऐकूं येत आहेत. व एकंदरीनें पाहतां कोंकणच्या स्थितीच्या मानानें जें काय करतां येईल तें येथील लोक करीत आहेत; एकाद्या तालुक्याचें महत्त्व सर्व राष्ट्राची सभा त्या ठिकाणीं जुळावी असें नसलें तर तो त्या तालुक्याचा दोष नव्हे. परंतु अशा तालुक्यानें आपली तालुका–सभा भरविली म्हणजे शक्य तें जबाबदारीचें काम त्यानें केलें असें म्हणण्यास हरकत नाहीं. 'पिंड–ब्रह्मांड' न्यायानें जें राष्ट्रीयसभेसारख्या सभेंत असणार तेंच अल्प प्रमाणानें तालुकासभेमध्येंहि असणार. केवळ आपण व आपलें कुटुंब यापलीकडे दूर नजर पोंचवून समाजाचीं सुखदुःखें एकत्र जमून समजून घेण्याची बुद्धि तालुकासभेहून राष्ट्रीय-सभेंत कांहीं खास वेगळी नाहीं. दुसरे दृष्टीनें पाहतां तालुक्यांचीं गांवें अगर खेडीं यांचेंहि राष्ट्रकार्यांत एक विवक्षित स्थान असतें, व तें त्यांनीं संभाळलें म्हणजे त्यांत सर्व आलें. राष्ट्राचे अंतिम परमाणू खेडीं हींच होत. घर ही वस्तु व एकेक वेगळी वीट अगर दगड यांचा जो संबंध तोच राष्ट्र व ग्राम यांचा आहे. शरीराच्या प्रत्येक निरनिराळ्या अवयवाला जरी शरीर असें म्हणतां आलें नाहीं, तरी आत्मा किंवा जीव व हे अवयव यांचा नित्य संबंध आहे. या अवयवां-विरहित जीवास व आत्म्यास अधिष्ठान मिळणार नाहीं. व जीव अगर आत्मा आहे म्हणून या प्रत्येक अवयवास किंमत आहे, एरवीं यांस कोणी विचारणार नाहीं. हेंच रूपक राजकीय व्यवहारास लावलें असतां असें दिसून येईल कीं, स्वराज्यासारख्या मोठ्या उद्दिष्टाचा उच्चार तालुकासभेमध्यें करण्यास जशी हरकत नाहीं तसेंच हें उद्दिष्ट साध्य होण्यास जो उद्योग समाजानें करावयास पाहिजे, त्याचें बीज आमच्या खेड्यापाड्यांतच असून तेथें तें रुजलें तरच इष्ट कार्य साधेल. पूर्वींच्या स्वराज्याची आपली इमारत नष्ट झालेली आहे. या इमारतींतील दिवाणखाने, दालनें, मनोरे, गच्च्या, महाल या सर्वांच्या अमूर्त

स्मृतीखेरीज आज दुसरें कांहीं उरलेलें नाहीं व स्वराज्याच्या नवीन इमारतींतील हे भाग कसे असावे, याविषयींची कल्पना राजशास्त्र-विशारद शिल्पज्ञ लोक अद्यापि साधकबाधक प्रमाणें पाहून ठरवीत आहेत. परंतु ज्या जागेवरील ही पूर्वींची इमारत जाऊन नवीन इमारत व्हावयाची आहे, तेथील पाया मात्र अद्यापि कायम आहे; व हा पाया म्हणजे अर्थात् लोकसमाज. हा लोकसमाज शेंकडा ९० इतका खेड्यापाड्यांतूनच राहतो, व त्याची सुधारणा झाल्याशिवाय कोणचेंहि राष्ट्रकार्य तडीस जाणार नाहीं ही गोष्ट निर्विवाद आहे. तालुका-सभेसारख्या ठिकाणीं स्वराज्याच्या गोष्टी बोलणें म्हणजे लहान तोंडीं मोठा घास घेतल्यासारखें दिसतें; व औचित्याचे दृष्टीनें पाहतां स्वराज्याचे चळवळींत प्रत्यक्ष व व्यावहारिकरीत्या त्या जिल्ह्यांना व तालुक्यांना काय करतां येईल हें पाहिलें म्हणजे पुरें झालें. माझ्या समजुतीप्रमाणें इंडिया कौन्सिल बिल हें जरी अत्यंत महत्त्वाचें असलें तरी तालुक्यास अबकारी खातें, शेतकीची सुधारणा, लवाद कोर्टें, किरकोळ उद्योगधंदे, प्राथमिक शिक्षण व स्वदेशीची चळवळ या गोष्टी खऱ्या महत्त्वाच्या आहेत. गव्हर्नरसाहेबांच्या कौन्सिलांत अर्ल रिचर्डस यांचे जागीं ना. सिंह आले अगर न आले याजपेक्षां जर, तालुक्यांतील दारूचा खप कमी झाला, गायरानें सुटलीं, अगर जंगलाचा कायदा ढिला होऊन लोकांना जळणकाडी, राब, कवळ वगैरे गोष्टी मुबलक मिळूं लागल्या, अगर दहा-पांच मुलें जास्ती शिकूं लागलीं किंवा किरकोळ एकदोन धंदे निघून सालीना पांच हजार रुपये नवीन पैदा होऊं लागले अथवा स्वदेशीची चळवळ फैलावून परदेशीं जाणारे पांच चार हजार रुपये सालीना वांचले अगर जेथें पूर्वी गवताची एक काडी उगवत असे तेथें मनुष्य-प्रयत्नानें दोन उगवतां येऊं लागल्या, अगर शेतकऱ्यांचा पाय ऋणपंकांतून थोडासा वर निघून त्याला संध्याकाळीं पोट बांधून अगर पाणी पिऊन निजावें न लागेल अशी स्थिति आली, तर तालुक्याला अगर खेड्याला पटण्यासारखा स्वराज्याचा साक्षात्कार हाच होय! वरील सर्व गोष्टी सर्वस्वीं आपल्या हातच्या नसल्या तरी त्यांपैकी बऱ्याच लोकप्रयत्नानें साध्य होण्यासारख्या आहेत, व त्या सिद्ध होण्यास खेडीं, तालुका व जिल्हा यांतील सूत अगर तारायंत्र बरोबर चालूं लागलें म्हणजे झालें. हें तारायंत्र नीट ठेवणें एवढी गोष्ट तरी निःसंशय आपल्या हातची आहे. या बाबतींत आपण हें लक्षांत ठेवलें पाहिजे कीं, सरकारी

अधिकाऱ्यांची रचना ज्याप्रमाणें गव्हर्नरापासून तों तलाठ्यापर्यंत दरोबस्त बांधलेली आहे, त्याचप्रमाणें कांहीं अंशीं तरी स्टेट-सेक्रेटरीचे कौन्सिलांतील हिंदी मेंबरापासून खेडेगांवांतील स्वतंत्र सुखवस्तु मनुष्यापर्यंत असली पाहिजे. सरकारी पोलिसचा एक इसम, सरासरी पांच-पन्नास चौरस मैलांस एक याप्रमाणें असतां, सरासरीनें दर चौरस मैलांत राहणाऱ्या शेंदोनशें मनुष्यांवर तो अंमल चालवूं शकतो याचें कारण हा पोलिसचा शिपाई म्हणजे साडेतीन हातांचा मनुष्य नसून त्याच्या पाठीमागें लॉर्ड किचनेर यांच्या शेवटल्या पलटणीपर्यंतचें जें लष्करी सामर्थ्य तें एकवटलेलें असतें! व म्हणून त्यास हा अंमल गाजवितां येतो. लोकपक्षाचीहि इतकी तयारी व्हावयास पाहिजे कीं, राजकीय सुधारणांचें भांडण, अगर देशांतील लोकांची स्थिति सुधारण्यासंबंधानें पुढाऱ्यांनीं हातीं घेतलेलें कोणतेंहि कार्य अगर उद्योगधंदा यासंबंधानें पुढारी जें म्हणेल त्याचें समर्थन करण्यास व तें खरें करून दाखविण्यास तालुक्याचें, जिल्ह्याचें व प्रांतांचें लोकमत एकवटून त्यानें पुढाऱ्यांस पाठिंबा दिला पाहिजे.

आपल्या तालुका-सभेचे पूर्वीचे अहवाल पाहतां तालुक्यास हातीं घेण्यास योग्य असेच विषय आपण हातीं घेतलेले आहेत, व अशा विषयांच्या चर्चेस आज हजर राहण्याची संधि आपण मला आणून दिल्याबद्दल आपले मी फिरून एकवेळ आभार मानतों. या वरील विषयांपैकीं कित्येकांबद्दल मला काय वाटतें हें त्यांवरील ठरावांच्या वादविवादाच्या वेळीं कदाचित् वेळोवेळीं मी सांगेन. परंतु प्रस्तावनेदाखल येवढें भाषण करून मी पुरें करितों.

---

## ७ सातवी सातारा जिल्हा-सभा

### अध्यक्षांचें भाषण.

(ता. ११ मे १९१२).

सातारा जिल्हा-सभेच्या सातव्या बैठकीस आज प्रारंभ होत आहे. सदर सभेचें अध्यक्षस्थान मला दिल्याबद्दल आपल्या सर्वांचे मी मनःपूर्वक आभार मानतों. अनेक कारणांनीं सातारा जिल्हा हा मला आपल्या घरासारखा वाटतो. पूर्वी जातीनें हजर नसतां सातारा जिल्हा सभेची हकीकत मी आस्थेनें वाचीत असें,

व आज या सभेस मला जातीनें हजर राहतां येण्याची संधि आपण आणून दिली याबद्दल मी आपला फार ऋणी आहें. पण आपण मला अध्यक्ष म्हणून बसविलें तरी आपल्या मदतीशिवाय अगर प्रेरणेशिवाय मला आपलें कर्तव्य नीट बजावतां येणें फारसें शक्य नाहीं. सबब ही मदत व ही प्रेरणा मला भरपूर मिळेल अशी मी आशा बाळगतों.

आपल्या जिल्हा-सभेच्या अध्यक्षासही प्रेरणा देऊं शकणारे एक गृहस्थ गुदस्त सालापर्यंत आपणांमध्यें होते; परंतु यंदा ते आपणांस सोडून गेले आहेत. हे गृहस्थ म्हणजे ना. रा. ब. गणपतराव जोशी हे होत. गेल्या सालच्या जिल्हा-सभेस ते साताऱ्यास हजर होते व सभा झाल्यावर अवघ्या तीन आठवड्यांतच ना. जोशी यांस शरीरविकार होऊन ते परलोकवासी झाले. त्यांच्या विचारपरिप्लुत व कळकळीच्या भाषणांचा परिचय पूर्वीं दोन वर्षें एकसारखा होत असल्यामुळें आज सभेस जमलेल्या अनेक गृहस्थांस चुकल्या-चुकल्यासारखें वाटत असेल यांत संशय नाहीं. रा. ब. जोशी यांच्या मृत्यूनें झालेली महाराष्ट्राची हानि भरून येणें अशक्य आहे. आपल्या विद्याव्यासंगानें पुढील पिढीस त्यांनीं जें उदाहरण घालून दिलें आहे तें त्यांच्याबरहुकूम चालविणारा गृहस्थ महाराष्ट्रांत आज तरी आपल्यापुढें दिसत नाहीं; मग कालांतरानें निर्माण झाल्यास कोणास ठाऊक! कोणत्याही विषयाची माहिती भरपूर मिळवून मग त्याची चर्चा करण्याच्या त्यांच्या पद्धतीनें जोशीबुवांनीं प्रजाजनांप्रमाणेंच राज्यकर्त्यांचीही आदरबुद्धि संपादिली होती; व एकंदरीनें पाहतां ससत्व व गोड रसानें ओथंबलेलें फळ अकालीं झाडावरून गळून पडून नष्ट व्हावें त्याप्रमाणें जोशीबुवांच्या मृत्यूनें महाराष्ट्राचें नुकसान झालें आहे. त्याचप्रमाणें इसलामपूरचे वकील रा. देसाई यांच्या मृत्यूनें सातारा जिल्ह्याचें जें नुकसान झालें त्याचाही उल्लेख येथें करणें जरूर आहे. रा. देसाई हे लोकप्रिय व कर्तव्यदक्ष असून सातारा जिल्हा-सभेचे दोन वेळ अध्यक्ष होते. सातारा शहराबाहेर सातारा जिल्ह्याच्या कामकाजांत लक्ष घालणाऱ्या पुढाऱ्यांपैकीं ते एक प्रमुख असल्यानें त्यांचें स्मरण आज जिल्हासभेस होणें अगदीं स्वाभाविक आहे. अगदीं एका मनुष्यासारखा दुसरा मनुष्य निर्माण होत नाहीं हें जरी खरें तरी सुदैवानें रा. ब. जोशी यांची कौन्सिलांतील जागा भरून काढण्यास ना. करंदीकरांसारखा गृहस्थ मिळाला हें महाराष्ट्राच्या दृष्टीनें अभिनंदनीय व सातारा जिल्ह्यास भूषणास्पद आहे. सातारा जिल्ह्याची कीर्ति वकील या नात्यानें दादासाहेबांनीं आज दहा वीस

वर्षे सर्व महाराष्ट्रभर पसरलीच होती; व महाराष्ट्रानें त्यांना आपल्यातर्फे कायदे-कौन्सिलांतील एक सभासद म्हणून निवडून दिल्यानें साताऱ्याच्या या कीर्तींत भरच पडली आहे. पुढारी या नात्यानें दादासाहेबांनीं आज वीस वर्षे जी सेवा केली तिजबद्दल सातारा जिल्हा त्यांचा खचित ऋणी आहे असें मला वाटतें.

लोकपक्षाची म्हणून राष्ट्रांत जी आज कांहीं थोडीबहुत घटना आहे तिचें एक अंग जिल्हा-सभा हें होय. गेल्या सात वर्षांत या घटनेचीं शकलें व रूपांतरेंहि झालीं आहेत. तथापि, सातारा जिल्हासभेनें आपलें स्वरूप व आपलें उद्दिष्ट कायम ठेवून सुसंगतपणानें काम चालविलें आहे ही गोष्ट अभिनंदनीय होय. मुंबई इलाख्यांत इतर कोणत्याहि जिल्ह्यानें जिल्हासभेची रचना पूर्वी केली असली तरी आज ती हयात नाहीं हें उघड आहे, व यावरून सातारा जिल्ह्यांत इतर जिल्ह्यां-पेक्षां अशा प्रकारचें सार्वजनिक काम करण्याची हौस अधिक आहे, व फाटाफूट कमी आहे, असें अनुमान काढल्यास तें फारसें वावगें होणार नाहीं. जिल्हासभेहून वरिष्ठ प्रतीची घटना म्हटली म्हणजे प्रांतिक सभेची होय. मुंबई प्रांतिक सभेची बैठक सन १९०८ सालीं धुळ्यास झाली होती. तेव्हांपासून दुर्दैवानें ती पुनः भर-ण्याचा योग आजवर आला नाहीं. याचीं कारणें सर्वांस महशूर आहेतच. परंतु यंदा प्रांतिक परिषदेची बैठक मुंबईस होण्याचें घाटत आहे असें समजतें. सुदै-वानें बंगाल्यांतील प्रांतिक सभांप्रमाणें मुंबईची प्रांतिक सभाहि सर्वमान्य व सर्वा-श्रित अशी होण्यास जशी परिस्थिति पाहिजे तशी अनुकूल करून देण्याची हौस प्रांतिक सभेचे स्थानिक चालक दाखवितील तर पूर्वीच्या अनेक प्रांतिक सभां-प्रमाणें ती सर्वमान्य व सर्वाश्रित होण्यास लागणारी खटपट इतर मंडळीहि करतील अशी मला खात्री वाटते. राष्ट्रीय सभेची विसकटलेली घडी पुनः बसवावी अशा-विषयीं सातारा जिल्हासभेचा मोठा कटाक्ष आहे, व सभेच्या गेल्या दोनचार बैठ-कींत तशा अर्थाचा ठरावहि प्रतिवर्षी सर्वानुमतें मंजूर झाला आहे. या बाबतींत इतर लोकांनीं केलेल्या प्रयत्नाच्या पुण्याईस सातारा जिल्हासभेच्या ठरावांच्या पुण्याईची भर पडून राष्ट्रीय पुनर्संयोजनाचें कार्य पुढें मार्गे यशस्वी होवो अशी आपल्याप्रमाणें माझीहि सर्व राष्ट्राला प्रार्थना आहे. पण तें यशस्वी होवो अगर न होवो, प्रांतिकसभा व जिल्हासभा यांच्यापुरती प्रांताची व जिल्ह्याची एकी राहिली तरी बराच कार्यभाग होणारा आहे. आपल्याच हातानें केलेले नियम व बंधनें आपल्याच हातानें मोडण्याचें कोणासहि स्वाभाविकच वाईट वाटणार हें उघड आहे.

तथापि देवघेवींचें बोलणें उभय पक्षांनीं आरंभिल्यास मग ही अडचण कमी भासूं लागते. वादास पेटलेल्या पण वाद मिटता घेण्याची इच्छा असणाऱ्या उभयपक्षांत अधिक उदार कोण हें आपल्या वर्तनानें ठरविण्याचें समाधान, उभयतांमध्यें अधिक धूर्त कोण हें ठरविण्याच्या समाधानापेक्षां अधिक ग्राह्य व उपयुक्त आहे. सर विल्यम वेडरबर्न यांच्या अध्यक्षतेखालीं ' राष्ट्रीय सभे ' ची बैठक भरण्याच्या प्रसंगीं रा. ब. जोशी यांनीं पुढाकार घेऊन तोडजोडीचे मार्ग कशा प्रकारचे सुच-विले होते हें आपणांपैकीं बऱ्याच लोकांस माहीत असेल. आज रा. ब. जोशी गेले, तथापि त्यांच्या शहाणपणाबद्दल व देशाभिमानाबद्दल आदर बाळगणारा कोणीहि जुन्या राष्ट्रीय सभेचा सभासद अगर हितचिंतक जोशीबुवांनीं सुचविलेल्या मार्गाचें अवलंबन आजहि करील असें मानण्यास फारशी हरकत नाहीं.

पण राष्ट्रीय सभेची बिघडलेली घडी फिरून बसूं नये असेंच भवितव्य असेल तरीहि त्या विचारानें प्राप्त किंवा अंगिकृत कार्यांत शिथिलता उत्पन्न होऊं देण्याचें कोणासहि कारण नाहीं. नदीचें पाणी जसें अनेक वळणें सोसूनहि कां होईना, पण आपल्या प्रवाहाला पात्र हुडकून काढतेंच, मानवी विचार ज्याप्रमाणें प्रबळ झाले म्हणजे ते आपल्या प्रगटीकरणार्थ वेडीवांकडी कशी कां होईना, योग्य भाषा हुड-कून काढल्याशिवाय राहत नाहींत, त्याप्रमाणें सार्वजनिक काम उभारण्याची व लोकसंग्रह करण्याची बुद्धि आंतून उत्कट झाली असल्यास ती हल्लीं राष्ट्रीय सभेच्या मार्गांत उत्पन्न झालेल्या अडचणीसारख्या बंधनांची पर्वा करीत नाहीं. ज्यांच्या मनांत परस्पर आदर आहे, व आपण परस्परसाहाय करूं तरच कांहीं कार्य होईल असें ज्यांना वाटतें, अशीं मनुष्यें आपणांमध्यें उत्पन्न झालेल्या आगंतुक व कृत्रिम भेदकारणांना कोणत्या ना कोणत्या तरी मार्गानें लुप्तप्रभाव केल्याशिवाय राहात नाहींत. परस्परांविषयीं आदरबुद्धिच नसेल व अविश्वासच असेल तर मात्र गोष्ट वेगळी. पण समाजांतील मुख्य घटकांची मनोवृत्ति जोंपर्यंत इतकी सदोष राहील तोंपर्यंत एकीकरणाचेंचसें काय पण इतर कोणतेंही राष्ट्रीय कार्य आपल्या हातून तडीस जाण्याचा संभव नाहीं हेंही विसरतां कामा नये ! प्रतिपक्षांनीं, परस्पर सर्वस्वीं आदर बुद्धि नसली तरी, आपल्या प्रतिपक्षीयांमध्येंही आपण घेण्यासारखे गुण कोणते आहेत हें पाहून तेवढ्यापुरती तरी आदरबुद्धि उत्पन्न करण्याचें शिक्षण स्वतःस लावून घेतलें पाहिजे. प्रतिपक्षीयांना एकमेकांबद्दल सर्वस्वीं विश्वास वाटत नसला तरी, विश्वास देऊन विश्वास घेण्याचा मार्ग प्रायः यशस्वी होत असल्यामुळें

त्याचा अनुभव घेण्याची इच्छा त्यांनीं निरंतर धरावी. सावधपणा आणि विश्वासूपणा या दोन गोष्टी दिसतात तितक्या विरोधी नाहींत. सावधपणा हा आत्महितबुद्धीमुळें स्वाभाविकच असतो. पण सावधपणा ठेवावयाचा तेवढा आगाऊच ठेवल्यावर परस्पर मिळूनमिसळून करण्याच्या सार्वजनिक कामांत विश्वास देणें व विश्वास बाळगणें हें सर्वांशीं इष्ट व जरूर आहे.

जिल्हासभेस जाणाऱ्या लोकांना राष्ट्रीय सभेशीं काय करावयाचें आहे, अशी भ्रामक कल्पना कोणीही करूं नये. राष्ट्रीयसभा व जिल्हासभा या उभयतांना परस्परांची गरज सारखीच आहे. नुसते पाय किंवा नुसतें डोकें हें शरीर नव्हे हें खरें, तरी पण पाय किंवा डोकें यांपैकीं एखादें नसेल तरीही शरीराची कल्पना साध्य होत नाहीं. अंग आणि अंगी हे परस्परांस सारखेच अनिर्वाह्य आहेत. राष्ट्रीय सभेकडून प्रेरणा मिळेल तरच जिल्हासभा सतेज राहील. उलट जिल्हासभा आपापलीं कामें बरोबर करतील तरच राष्ट्रीय सभेचा निरोप देशाच्या कान्याकोंपऱ्यांतून पसरून तिला पाठिंबा मिळेल. जी गोष्ट राष्ट्रीय सभा व जिल्हासभा तीच मोठीं साध्यें व लहान साध्यें यांचीही आहे. लहान—मोठा हा संबंध पिंडब्रह्मांडाच्या संबंधासारखा परस्परावलंबी आहे. आतां जगांत एकेरी विचाराचीच प्रवृत्ति प्रायः अधिक; यामुळें लहान तर लहानच, व मोठें तर मोठेंच साध्य घेऊन त्यानें सर्व कार्यभाग होईल असें मानण्याची पुष्कळांना संवय असते. यामुळें दुसऱ्या प्रकारच्या साध्याकडे त्यांचें दुर्लक्ष होतें. स्वराज्याच्या कल्पनेचें बोलणें निघालें कीं उगाच मोठ्या गोष्टी कशास बोलाव्या असें म्हणणारे जसे आक्षेपक आहेत, तसेंच स्थानिक स्वराज्याच्या गोष्टींचें बोलणें निघालें कीं, तें खराट्याचें स्वराज्य म्हणून त्याचा उपहास करणारे लोकही कांहीं थोडे नाहींत. पण या दोघांच्याही असें लक्षांत येत नाहीं कीं, या दोन्ही कल्पनांच्या समकालीन अस्तित्वाशिवाय योग्य दिशेनें व व्हावी तितकी प्रगति होणार नाहीं. देवळाच्या कल्पनेंत पाया व शिखर या दोन्ही कल्पना अंतर्भूत आहेत व असल्याच पाहिजेत. पाया भरीत असतांना शिखर प्रत्यक्ष दिसत नाहीं, तरी तें पुढें मागें होणार हें माहीत असतें; व शिखर रचणारालाही त्याच्या खालील इमारतीचा पाया विसरून चालावयाचें नाहीं. स्वराज्याच्या गोष्टी बोलणारांची सरकाराकडून थट्टा होत असते. पण कोणताही राजकीय समाज कांहीं तरी अंतिम साध्य डोळ्यांपुढें ठेवल्यावांचून राहूं शकत नाहीं हें ते विसरतात. किरकोळ कारभार व अंगभूत चळवळी चालू असतां, हें सर्व 'स्वराज्या' करितां चालू आहे-हा सर्व

उपासनाविधि स्वराज्याप्रीत्यर्थ आहे-असें पुनः पुनः बजावणारा, पुनः पुनः आठवण करून देणारा कोणीना कोणी तरी लागतोच. राजकीय चळवळीच्या सशास्त्र गायनांत 'स्वराज्य' हा शब्द 'वादी स्वरा' सारखा महत्त्वाचा आहे. इतर खटाटोपाच्या सर्व मेंढी, ताना, खटके, अलंकार व कलाकुसर ही शोभादायक आहे खरी; पण स्वराज्याच्या वादी स्वराशीं जर ती बेसूर असेल, फार काय, स्वराज्याचा वादी स्वर जर मधून मधून कानावर न पडेल तर तें सर्व गाणें गोड लागणार नाहीं. बँड किंवा कॉनसर्ट चालू असतां शेंकडों बारीक तुताऱ्या व सनाया आपआपले आलाप काढीत असतात; पण त्यांना गंभीरपणा देणारा असा मुख्य कर्ण्यांचा व ढोलाचा आवाज चालू नसेल तर सर्व विपरीतच भासेल. ब्रिटिश राज्यपद्धतीचे व राज्यकर्त्यांचे गुण घ्यावयास स्वराज्यवादी लोक तयार आहेत हें म्हणणें आश्चर्यतेचें वाटेल तर ते असेंही म्हणण्यास प्रांजलपणें तयार आहेत कीं ब्रिटिश सरकारनें आमच्यावर अनेक उपकार केले आहेत; व पुष्कळ वर्षें अशा गुणांचें व अशा पद्धतीचें राज्य आम्हांस मार्गदर्शक म्हणून हवें ही गोष्ट निर्विवाद आहे. परंतु पुष्कळ दिवसांनंतर तरी पुढें काय ? असा प्रश्न उत्पन्न झाल्याशिवाय राहत नाहीं, व याचें उत्तर देणारानें प्रांजळपणानें तें देणें व सरकारानें तें न रागवातां ऐकून घेणें हेंच योग्य आहे. आज ज्या आयरिश लोकांना इंग्रज लोक आपल्या हातानें स्वराज्य देत आहेत त्यांचा शंभर वर्षांपूर्वींचा पुढारी जो हेनरी गॅटन त्याचे खालील शब्द कोणाही राज्यकर्त्यांनीं लक्षांत ठेवण्यासारखे आहेत. तो म्हणतो:- "A Nation's liberty could not be meted and parcelled out in gratitude. No man can be grateful at the expense; of his conscience; no woman at the expense of her honour and no nation at the expense of its liberty." उपकार केल्याची सबब सांगून राष्ट्रीय स्वातंत्र्याचें ध्येय सोडून देण्याची सक्ती कोणाही राज्यकर्त्यांनीं आपल्या प्रजेवर केली तर ती कांहीं थोडे दिवस टिकेल, पण क्षणभरही शोभणार नाहीं. पुरुषाला आपली सदसद्विवेकबुद्धि, स्त्रीला आपलें पातिव्रत्य, आणि राष्ट्राला आपलें स्वातंत्र्य, याच्यापलीकडे कांहींही अधिक प्रिय असत नाहीं; निदान असतां कामा नये. असा दुसरा कोणताही ऐहिक किंवा पारमार्थिक लाभ नाहीं कीं ज्याच्याकरितां पुरुषानें आपलें मतस्वातंत्र्य, स्त्रीनें आपलें पातिव्रत्य व राष्ट्रानें आपलें स्वराज्याचें ध्येय सोडण्यास तयार व्हावें ! निदान उपकाराची सबब सांगून किंवा

कृतज्ञेच्या वराची फेड म्हणून एखाद्या राष्ट्रास स्वराज्याचा ध्यास सोडण्यास सांगणें कोणत्याही राज्यकर्त्यांस भूषणास्पद होणार नाहीं. उपकार हे नेहमीं अहेतुक असतात व असावे. निदान त्यांची फेड तरी दुसऱ्यास कमीपणा आणणारा मोबदला मागून कोणीं करवूं नये.

'पण नुसता स्वराज्याचा ध्यास घेऊन बसूनहि चालावयाचें नाहीं; कांहीं तरी प्रत्यक्ष काम हातून घडत असलें पाहिजे. कामाचीहि लहान थोर अशी परंपरा आहे; त्या परंपरेनें कामाचा अनुभव आला पाहिजे; व अशा रीतीनें स्वराज्याच्या हक्कबजावणीला तुम्हीं स्वतःस पात्र करून घेतलें पाहिजे' असें जेव्हां अधिकाऱ्यांचें म्हणणें असतें तेव्हां त्यांत मात्र बरेंच सत्य असतें. हिंदुस्थानच्या लोकांचें कांहींही ध्येय असो, तें कांहीं विशिष्ट नियमित पद्धतीनेंच साध्य होणारें आहे. भूकंप होऊन ज्याप्रमाणें निसर्गसृष्टींत पर्वताच्या ठिकाणीं समुद्र व समुद्राच्या ठिकाणीं पर्वत अशीं प्रचंड स्थित्यंतरें एका क्षणांत होऊं शकतात, तशी गोष्ट राजकीय सृष्टींत सहसा घडत नाहीं. स्थित्यंतर व्हावयाचें असलें तरी जशा वळणानें पाणी आलें तशा वळणानेंच तें जावें लागतें. भांडें तापावयाला जितका वेळ घेतें तितकाच वेळ जवळ जवळ तें निवायलाहि घेणार. ज्या कारणांनीं राष्ट्रीय स्वातंत्र्य नष्ट झालेलें असतें त्याविरुद्ध समाजाच्या शरीरांत तितक्याच जोरानें प्रतिक्रिया होऊन तद्विरुद्ध गुण राष्ट्राच्या अंगीं यावे लागतात. परिस्थिति ही सर्वांनाच सारखी लागूं आहे. हिंदुस्थानचें राष्ट्रीय स्वातंत्र्य जाण्यास जर यदृच्छेची एका दिशेची गति कारणीभूत झाली असेल, तर गमावलेलें राष्ट्रीय स्वातंत्र्य दुसऱ्या एका दिशेच्या गतीनें फिरून परत मिळण्यास यदृच्छाचक्राकडे आपण दृष्टि लावून बसलें पाहिजे; केवळ उतावीळ होऊन चालणार नाहीं; व तोंपर्यंत राष्ट्रीय हिताच्या अनेक बाबींत आस्थापूर्वक मन घालून यदृच्छाचक्राला कलाटणी देण्यास आपण कारणभूत होऊं अशी महत्त्वाकांक्षा मनांत बाळगली पाहिजे. समाजहिताच्या पुष्कळ गोष्टी स्वराज्य हांकण्याच्या मानानें कमी किंबहुना क्षुल्लक महत्त्वाच्या भासण्यासारख्या असतात. परंतु त्यांचा अव्हेर करून चालणार नाहीं. याला एक दृष्टांत असा देण्यासारखा आहे. समजा कीं, आपण एखाद्या जहाजांत बसून होकायंत्राच्या सहायाशिवाय समुद्रावर सफरीस जाण्यास निघालों आहों. अशा वेळीं आपल्याला दोनतीन प्रकारच्या ज्योतींचा संबंध येतो. एक ज्योति म्हणजे आकाशस्थ तारकांची. होकायंत्राच्या अभावीं ही ज्योति आपणांस एकंदर सफ-

रीच्या अखेरचा मुक्काम कोणत्या बाजूस आहे हें दाखविण्यास उपयोगीं पडते. पण केवळ आकाशस्थ ज्योतींवर डोळा देऊनच खलाशाचें काम भागत नाहीं. त्याला प्रत्यक्ष प्रवास करावयाचा तो केव्हां समुद्रावरून तर केव्हां बंदर किनाऱ्यानेंच करावयाचा असतो. अर्थात् मधून मधून बंदर गांठावयाला व खडकखडपे किंवा वाळूचे दांडे चुकवावयाला त्याला बंदरांतील दिवे किंवा दीपगृहांतील दिवे यांच्या ज्योतींकडे नजर ठेवणें भाग आहे. पण बंदराच्या दिव्यानें विश्रांतिस्थान कोणतें व भयसंकट कसें टाळावें हें कळलें तरी थंडीच्या दिवसांत थंडीचें निवारण करावयाला किंवा अन्न शिजवून खाण्याला त्याला बंदरच किंवा दीपगृहाचा दिवा किंवा कांहीं उपयोगीं पडणार नाहीं; तर जहाजांतल्या जहाजांतच पेटविलेला दिवा उपयोगीं पडेल. अखेरच्या मुक्कामाची दिशा दाखविणाऱ्या ताऱ्याची ज्योति, बंदरांतल्या दीपगृहांतील दिव्याची ज्योति आणि जहाजांतील कांदिलांत पेटविलेली दिव्याची ज्योति या सर्व दर्यावर्दी नावाड्याला आपापल्या परीनें उपयोगीं असतात. त्यांपैकीं कोणत्याही ज्योतीची उपेक्षा करून त्याचें चालावयाचें नाहीं. अखेरच्या मुक्कामाला त्याला जावयाचें आहेच; पण तोंपर्यंत वाटेवर निरनिराळ्या बंदरांत शिरून कांहीं वेळ थांबलें पाहिजे; बंदरांत शिरण्यापुरती व खडक-खडपे चुकविण्यापुरती जहाजांची दिशा बदलावी लागली तरी त्याचा विषाद मानतां कामा नये; आणि आकाशांतील ताऱ्याइतका किंवा दीपगृहांतील दिव्याइतका तेजस्वी व डोळे दिपविणारा असा आपल्या जहाजाच्या खोलींतला दिवा नसला तरी, त्याच्या ज्योतीच्या प्रकाशानें नित्याचा व्यवहार केला पाहिजे व त्याच्या उष्णतेनें विस्तव पेटवून त्यावर रोजची भाकरी नीट भाजून घेतली पाहिजे. अंतिम ध्येयें व समीपवर्ती ध्येयें यांचा हा असा संबंध असल्यामुळें कोणीं कोणाचा उपहास करण्याचें कारण नाहीं.

वरिष्ठ प्रतीच्या राजकारणाविषयीं आज याहून जास्त बोलण्याचें कारण दिसत नाहीं. आजच्या प्रसंगीं आपणांस जिल्ह्याच्या पुरतेंच पाहावयाचें आहे; व या बाबतींत जी गोष्ट प्रथम नजरेस येते ती ही कीं, गेल्या तीन चार वर्षांत या देशांत मोठ्या राजकीय सुधारणा घडून आल्या; पण त्यांच्या योगानें जिल्ह्याच्या कारभारांत खरोखर फारशी सुधारणा घडून आली नाहीं. वरिष्ठ व प्रांतिक कायदेकौन्सिलें मोठीं होऊन प्रातिनिधिक तत्त्वाचा अंमल पूर्वींहून थोडा अधिक झाला हें खरें. तथापि जिल्ह्याच्या राज्यकारभाराची मांडणी पूर्वीं होती तशीच आज आहे. प्रांतिक कौन्सिलांत दरएक भागातर्फे एकएक सभासद लोकांना आज अधिक निवडून देतां

येत आहे; त्यामुळें जिल्ह्यांच्या पुढाऱ्यांना कायदेकौन्सिलांत जातां येऊं लागलें आहे; आणि त्यामुळें जिल्हाकारभाराच्या बाबी पूर्वी कायदेकौन्सिलांत निघत त्याहून त्या दिवसानुदिवस जास्त निघण्याचा संभव आहे हें खरें. तथापि, जिल्ह्याच्या कारभारांत खरी सुधारणा व्हावयाची असेल तर ती खुद्द जिल्ह्यांतल्या जिल्ह्यांत व्हावी; जिल्ह्याचे अधिकारी व जिल्ह्याचे बिनसरकारी पुढारी यांच्या परस्पर सहकारितेनेंच व्हावी, एरवीं होणें शक्य नाहीं. जिल्हा-अधिकाऱ्यांना ज्यांच्याबद्दल जाब विचारतां येईल व जिल्हा-अधिकाऱ्यांनीं मनांत आणलें असतां ज्या दुरुस्त होतील अशा शेंकडों बाबी असतात. पण प्रांतिक कायदेकौन्सिलाहून लहान अशा लोकमत व्यक्त करण्याच्या जागा आज नसल्यामुळें त्या सर्व बाबींच्या उच्चाराचा व वादविदाचा भर कायदेकौन्सिलावरच पडतो. पुष्कळ वेळां जिल्ह्यांतील अगदीं किरकोळ कामकाजाबाबदचे प्रश्न कायदेकौंसिलांत विचारणें हें हास्यास्पद असें दिसत असेल; पण त्याशिवाय आज गत्यंतर आहे कोठें ? शामभटाची पांच रुपये भराची गांवठी तटाणी चोरीला गेली तर तिचा शोध, जेथें सूर्यचंद्र व 'लालदेव' 'काळदेव' बसले आहेत अशा इंद्राच्या दरबारांत किंवा ज्या ठिकाणीं मदमत्त असे दिग्गज झुलत आहेत अशा हत्तीमहालांत होऊं नये हें आम्हांलाही मान्य आहे. पण या चोरीचा तपास होण्याला इंद्राच्या दरबाराखेरीज दुसरी राजमान्य कोतवाली कोठें आहे ! तशी कोतवाली निर्माण झाल्यास लोकांना पदरच्या दशम्या खाऊन स्वर्गाची वाट चालण्याची गरज काय ? लहान तोंडी मोठा घांस घेण्यांत जशी असंबद्धता आहे, तसाच मोठ्या तोंडांत चिमणचाऱ्याचा एखादा दाणा घालून रवंथ करण्यांतही असंबद्धता आहे हें लोकनियुक्त प्रतिनिधींस कळत नसेल असें कां समजावें ? प्रांतिक कायदेकौन्सिलांत क्षुल्लक व चिल्लर प्रश्नांचीं उत्तरें देतांना अधिकाऱ्यांच्या कपाळास जशा आंठ्या पडतात तशाच ते प्रश्न विचारण्याचें कर्तव्य करणाऱ्या सभासदांच्याहि कपाळास पडतात. औचित्यविचार किंवा Sense of proportion हा गुण ईश्वरानें लोकनियुक्त नामदारांस तेवढा देण्याचा वगळला आहे असें कोणी झालें तरी कां समजावें ? पण हा सर्व परिणाम जिल्ह्यांतल्या जिल्ह्यांत प्रश्नोत्तरांची व वादग्रस्त गोष्टींची रीतसर चर्चा होण्यास कांहीं एक चांगलें साधन हल्लीं नसल्याचा आहे असें मला वाटतें. आज नुसती टांचणी काढून घ्यावयाची झाली तरी त्याला चिरेबंदी संगीन तळघरांतल्या डबल लिव्हरच्या सात कुलपी तिजोरीचीं कुलपें काढावीं लागतात. हा दोष लोक-

प्रतिनिधींचा नव्हे तर हल्लींच्या राज्यपद्धतीचा आहे. सदरहू टीका करितांना जिल्ह्यांतून अलीकडे दरबार भरत असतात, ही गोष्ट मी विसरलों नाहीं. पण त्याचबरोबर हेंही माझ्या ध्यानांत येतें कीं, जिल्हादरबार भरण्याला आज कांहीं एक नियम म्हणून नाहींत. दरबारांना कोणाला बोलवावें व कोणाला वगळावें येथपासून दरबारांत काय काम व्हावें येथपर्यंत सर्व मुखत्यारी अनियंत्रितपणें जिल्हाधिकाऱ्यांची असते. जिल्ह्यांतून दरबार भरविण्याची कल्पना मला स्वतःला सर्वस्वीं पसंत आहे व अनेक वेळां जिल्हादरबारांत बरींच उपयुक्त प्रश्नोत्तरें झालेलींही मीं वाचलीं आहेत. पण जिल्हादरबारांची कांहीं तरी नियमित घटना होऊन जिल्हाकौन्सिलाचें स्वरूप आल्याशिवाय त्यांचा जास्तींतजास्त होण्यासारखा उपयोग लोकांच्या पदरांत पडेल असें वाटत नाहीं. आज प्रांतिक कायदेकौन्सिलांत झालें तरी जिल्हाविषयक प्रश्नांस जीं उत्तरें देण्यांत येतात, त्यांपैकीं बऱ्याच उत्तरांची माहिती जिल्हा-कचेऱ्यांतूनच हुजूर रवाना होते व कायदेकौन्सिलांत फक्त हुजूरच्या गोमुखांतून बाहेर पडल्यानें ती अधिकारपुनीत होते हें आपण पाहतोंच कीं नाहीं? मग जिल्ह्यांतल्या जिल्ह्यांतच ही व्यवस्था झाल्यास कायदेकौन्सिलाचा द्राविडी प्राणायाम तरी वांचेल. शिवाय जिल्हा-कौन्सिलें होण्यापासून Constitutional असा एक फायदा आहे तो हा कीं, जिल्हाकौन्सिलांत प्रश्नोत्तरें होऊनहि वादग्रस्ततेचें जें सल राहील त्याचें बाळंतपण प्रांतिक कायदेकौन्सिलांत अपिलाच्या प्रश्नोत्तरानें होईल. आज प्रांतिक सरकार जिल्हा-अधिकाऱ्यांच्या माहितीच्या आधारावर जीं उत्तरें देतात त्यांना सहजच वज्रलेपाचें स्वरूप येत आहे. पण निवळ प्रश्नोत्तरांपेक्षांही जिल्हा-कौन्सिलांचा उपयोग पुष्कळच अधिक आहे. कारण जिल्ह्याच्या कारभारांत अशा पुष्कळ गोष्टी असतात कीं, त्या जिल्हा-अधिकाऱ्यांनीं आपखुषीनें, अगर जिल्हा-कौन्सिलांतील लोकमताच्या सक्तीनें करावयाच्या मनांत आणल्यास त्या त्यांना करितां येतील. गेल्या ता. २७ फेब्रुवारी रोजीं वरिष्ठ कायदेकौन्सिलांत ना. गोपाळ कृष्ण गोखले यांनीं जिल्हाकौन्सिलांबाबत जो ठराव पुढें आणला होता व त्याच्या समर्थनार्थ जें उत्कृष्ट भाषण केलें होतें, तें ज्यांनीं वाचलें असेल त्यांना जिल्हा-कौन्सिलांचें महत्त्व काय आहे व अशा कौन्सिलांत काय काय कामें करितां येतील याची कल्पना आलीच असेल. इंग्रजी अंमलाचे पहिले नवाबी दिवस आतां राहिले नाहींत; राजा ग्रॅपर्टसारखे जिल्हाअधिकारी आज नाहींत; आणि जिल्हा-

अधिकाऱ्यांच्या हातीं पूर्वी असलेले राजाधिकारही आज शिल्लक उरले नाहींत. शिवाय दुसऱ्या बाजूनें राज्यकारभाराच्या–म्हणजे रयतेच्या सुखदुःखाच्या–बाबी अनेक वाढल्या असून, राजदरबारांत लोकांची मुखत्यारी करणारा सुशिक्षित वर्गही निर्माण झाला आहे. अर्थात् ज्या सुधारलेल्या राज्यपद्धतीचे हे सर्व परिणाम आहेत त्या पद्धतीची आणखी परिणति होणें म्हणजेच अधिकारी व लोकप्रतिनिधि यांचा दिवसेंदिवस अधिकाधिक निकट संबंध येऊन उभयतांच्या एकविचारें अधिकाराचा गाडा हांकला जाणें हें होय. राज्यकारभाराचीं धोरणें हुजूरहून ठरून येण्याचा प्रघात जरी अधिक पडत असला तरी; हुजूरच्या हुकुमांची अपेक्षा न धरतां अगर त्यांशीं विरोध न करितां, जिल्हाधिकाऱ्यांना स्वतः करतां येण्यासारखेंहि पुष्कळ आहे. जें काय नाहीं तें हेंच कीं, जिल्हाधिकाऱ्यांच्या नजरेस जिल्ह्याचीं सुखदुःखें घालण्यास रीतसर व नियमबद्ध अशी घटना नाहीं. जंगल, दारूचीं दुकानें, सारावसुली, शाळा, स्थानिक स्वराज्याच्या कारभाराच्या किरकोळ बाबी, आरोग्य, गांवसुधराई, लोकलबोर्डी कामें वगैरे बाबतींत जिल्हाधिकाऱ्यांच्या कानावर घालण्यासारखें पुष्कळ असतें. पण तें त्यांच्या कानावर घालण्यास नियमबद्ध घटना नसल्यामुळें त्यांच्या तें कानावर जात नाहीं, किंवा कित्येक वेळां वरिष्ठ अधिकाऱ्यांकडे विनाकारण गेल्यामुळें अप्रिय अशा रीतीनें तें त्यांच्या कानावर येतें. लोकांच्या किंवा खुद्द अधिकाऱ्यांच्याही दृष्टीनें ही वस्तुस्थिति अनिष्ट आहे. पुष्कळ पुढारी लोकांच्या मनांत अधिकाऱ्यांस भेटून त्यांना तक्रारी सांगाव्या असें येत असेल; आणि पुष्कळ अधिकाऱ्यांच्या मनांत लोकांच्या पुढाऱ्यांनीं भेटून आपल्याला सुखदुःखाच्या गोष्टी कळवाव्या असें येत असेल. पण या दोन इच्छांच्या एकीकरणास जिल्हा–कौन्सिलासारखी संस्था नसल्यानें अडचण येते. अधिकारी लोकांस भेटतच नाहीं, किंवा लोक अधिकाऱ्यांकडे जातच नाहींत असें सर्वस्वीं नाहीं; पण आहे त्या प्रकारांत अनियमापेक्षां इतरही दोष अनेक आहेत.

नियमांनीं जखडून टाकलेल्या कौन्सिलांत फक्त औपचारिक वाद होतो, प्रांजलपणाची सल्लामसलत होत नाहीं, असा एक आक्षेप यावर आणिला जातो. पण जिल्हाकौन्सिलांचें काम झाल्यावरही इतर वेळांत खाजगी सल्लामसलत होण्यास काय हरकत ? सल्लामसलत आज जी एकपट होते ती जि.कौन्सिलें अस्तित्वांत आल्यानें दुप्पट होईल; कमी होण्याचें कारण नाहीं. हें आजच्या कायदेकौन्सि-

लांच्या उदाहरणावरूनहि सिद्ध होतें. कायदेकौन्सिलें झाल्यापासून हुजूरचे अधिकारी व लोकप्रतिनिधि यांच्या गांठी अधिकाधिकच पडूं लागल्या, कमी झाल्या नाहींत. जिल्हाकौन्सिलें इतक्याकरितांच हवीं कीं, त्यामुळें अधिकारी व लोकप्रतिनिधि यांची मुलाखत होणें हें पहिल्यांच्या तब्बेतखोरपणावर व दुसऱ्यांच्या हांजीहांजीखोरपणावर अवलंबून राहणार नाहीं. कौन्सिलांपुढें मांडलेल्या बाबतींत अधिकाऱ्यांवर आपल्या मताचा अंमल हटकून चालविण्याचें साधन जिल्हाकौन्सिलाच्या योगानें लोकपक्षास मिळेल असें नव्हे. परंतु आपलें म्हणणें त्यांच्यापुढें उघडपणें आणि अधिकाऱ्यांच्या इच्छेची किंवा तब्बेतीची पर्वा न करितां मांडण्याचें साधन त्यांस मिळेल व त्यामुळेंच आज आडलें आहे. दरबारांच्या योगानें जिल्हाकौन्सिलांचा डबरी पाया घालून झालाच आहे. पण तो पाया पावसांत भिजत न पडतां, त्यावर व्हावयाची ती चिरेबंदी इमारत सरकारनें करण्याच्या मार्गास लवकर लागावें अशी आपली विनंति असली पाहिजे. लोकमतास प्रगट होण्यास अवसर दिल्यानें राज्यकारभाराच्या उत्तम गुणांची पिच्छेहाट होईल असें म्हणण्याचे दिवस आतां राहिले नाहींत. जें प्रांतासंबंधानें व सर्व देशासंबंधानें घडून आलें आहे तेंच जिल्ह्यासंबंधानें घडून आल्याशिवाय कधींहि राहणार नाहीं. मात्र पूर्वानुभवानें सिद्ध झालेल्या गोष्टी सरळपणानें सरकार न कबूल करील तर असंतोष माजून व चळवळ होऊन त्या त्यांना अखेर कबूल कराव्या लागतील असें म्हणावें लागतें; व ही धमकी नसून केवळ अनुभवसिद्ध अशा एका सत्यसिद्धांताचा फक्त अर्थवाद आहे.

आजच्या जिल्हासभेपुढें कोणकोणते विषय यावेत त्यांच्या यादी यापूर्वींच प्रसिद्ध झाल्या आहेत. या सर्व विषयांची प्रस्तावना मीं आपल्या भाषणांत करण्याचें कारण नाहीं, व तें शक्यही नाहीं. तथापि, त्यांपैकीं दोन चार महत्त्वाच्या विषयांचा मी थोडासा उल्लेख करणार आहें. सातारा जिल्ह्याच्या सर्वसाधारण स्थितीसंबंधानें या ठिकाणीं जमलेल्या आपणां सर्वांना माझ्यापेक्षांहि अधिक माहिती असेल. सातारा हा हवापाण्याच्या दृष्टीनें बऱ्यांपैकीं जिल्हा असला तरी एकंदरीनें तो सांपत्तिकदृष्ट्या गरीब जिल्ह्यांतच मोडतो. सातारा जिल्ह्यांतील मुख्य धंदा शेतकीचा आहे; पण सातारा जिल्ह्यांतील कुणबी महाराष्ट्रांतील इतर ठिकाणच्या कुणब्याहून मागासलेला आहे. परंपरा सोडून जाण्याचें धाडस त्याच्या हातून होत नाहीं. यामुळें त्याची शेती सुधारत नाहीं. वर्षभर शेतावर राहून

काम करणारे कुणबी कमी. मुंबईस किंवा इतर ठिकाणीं जाऊन मोलमजुरी करून पोट भरणारे कुणबी पुष्कळ आहेत. माण, खटाव, जावली, कऱ्हाड, सातारा वगैरे तालुक्यांतून लष्कर-भरतीलाही थोडींबहुत माणसें जातात. एकंदर दहालक्ष लोकसंख्येपैकीं शेतकीच्या कामाकडे शेंकडा सुमारें पंचाहत्तर, किरकोळ उद्योगधंद्याकडे शेंकडा बारा व व्यापारांत शेंकडा एक अशी लोकांची वांटणी झालेली आहे. प्लेग व उपासमार यांनीं गेल्या चाळीस वर्षांत सातारा जिल्ह्याची लोकसंख्या वाढावी ती न वाढतां उलट शेंकडा वीस-बावीस इतक्यांनीं कमीच झालेली आहे. तथापि जिल्ह्यांत उरलेल्या लोकसंख्येला चरितार्थाचें साधन भरपूर मिळत नाहीं. गेल्या पंचवीस वर्षांत जमीन-बाबीच्या उत्पन्नाची वाढ मात्र शेंकडा पंचवीसपासून तीस टक्केपर्यंत झाली आहे. जिल्ह्यांत एकंदर लागवडीस असलेली जमीन शेंकडा एक टक्क्याहून वाढलेली नसून प्रत्यक्ष पिकाखालची जमीन सुमारें तीन लक्षांनीं कमी झाली आहे. या सर्व गोष्टींचा मेळ घालतां असें म्हणावें लागतें कीं, जिल्ह्यांतील शेतकऱ्यांना जिल्ह्याबाहेर थोडेबहुत पैसे मिळवून जिल्ह्यांतील जमिनीच्या वाढत्या शेतसाऱ्याची भरपाई करावी लागते. जिल्ह्यांतील लोकांची स्थिति पोषाख, टापटीप यांच्या दृष्टीनें पाहतां पूर्वींहून अधिक सुधारली असावी. कारण साताराचे पूर्वींचे कलेक्टर मि. बोनस यांनीं तीन वर्षांपूर्वीं एका ॲडमिनिस्ट्रेशन रिपोर्टांत असें लिहिलेलें मला आठवतें कीं, वीस वर्षांपूर्वीं वांईसारख्या शहरीं कपडे वगैरेंचा जो झुळझुळीतपणा दिसत नव्हता तो हल्लीं कोयना खोऱ्याच्या डोंगरी लोकांत दिसून येतो. पोषाखाचा झुळझुळीतपणा हें संपत्तिमत्तेचें जितक्यापुरतें खरें लक्षण असेल तितक्यापुरती जिल्ह्याची सांपत्तिक स्थिति सुधारली असें म्हणण्यास वरील पुरावा ठीक आहे. पण उद्योगधंदे वाढल्यानें किंवा शेतकींत विशेष प्रकारची सुधारणा झाल्यानें जी संपत्तिमत्ता लोकांत येते तशी सातारा जिल्ह्यांतील लोकांत येण्यास अद्यापि अवकाश आहे.

जमीनबाबीसंबंधानें इनामदारांचा प्रश्न सातारा जिल्ह्यांत अत्यंत महत्त्वाचा आहे हें आपणां सर्वांस माहीतच आहे. पूर्वींच्या राज्यकर्त्यांचा संबंध या जिल्ह्याशीं पुष्कळ असल्यामुळें या जिल्ह्यांत वतनदार व इनामदार लोकांची संख्या पुष्कळ आहे. सातारा जिल्ह्यांत एकंदर जमिनीपैकीं एक चतुर्थांश जमीन इनामी आहे. इनामें देण्याची मूळ कल्पना चुकीची असो अगर बरोबर असो; पण ती मूळ

देणाऱ्या मराठे राज्यकर्त्यांनीं इनामदारांस पूर्ण स्वामित्वाचे हक्क दिले व ते हक्क बजावण्यास जरूर ते अधिकारही दिले. नव्या अमदानींत स्वामित्व उरलें; तथापि अधिकारास कमीपणा आल्यामुळें स्वामित्वाचा उपयोग बिनहरकत घेतां येईनासा झाला आहे. लॅन्ड रेव्हिन्यू कोडाचें कलम ८८ यांत सांगितलेले अधिकार बजावण्यास सर्वच इनामदार लायख असतात असें नाहीं; व लायख असणाऱ्या इनामदारांपैकीं पाहून पाहून हे अधिकार देण्याची प्रवृत्ति रेव्हिन्यु अधिकाऱ्यांत दिवसेंदिवस अधिकाधिक होत आहे ही गोष्ट मला कबूल आहे. तथापि, हे अधिकार नसलेल्या इनामदारांचा वसूल मुलकी अधिकाऱ्यांकडून व्हावयाचा तो अधिक दक्षतेनें झाल्याशिवाय इनामदारांचें गाऱ्हाणें संपणार नाहीं. सातारा जिल्ह्यांतील इनामदारांचें गाऱ्हाणें पंधरा सोळा वर्षांचें जुनें आहे, व सुमारें तीन सालांपूर्वी हें गाऱ्हाणें कळसास जाऊन पोहोंचलें होतें. १९०९ सालीं सर्व मध्यभागांत मिळून ६२६८ मदतीच्या फिर्यादी चालल्या; त्यापैकीं बऱ्याचशा फिर्यादी एकट्या सातारा जिल्ह्याच्या वाट्यांस आल्या होत्या. या सालापर्यंत सुमारें साडेनऊ हजारांवर मदतीचे हुकूमनामे अंमलबजावणी झाल्याशिवाय राहिले होते. यांपैकीं बराच भाग कऱ्हाड व सातारा या तालुक्यांपैकीं होता. सुदैवानें याच सालापासून मदतीच्या हुकूमनाम्यांचा फडशा होण्यास सुरुवात झाली; व अलीकडे इनामदारांच्या वसुलाचा फडशा होईल तितका करण्याचें धोरण मुलकी अधिकाऱ्यांनीं पत्करल्याबद्दल इनामदारवर्ग सरकारचा आभारी होईल यांत शंका नाहीं. तथापि गेल्या सालीं ना. इचलकरंजीकर यांनीं म्हटल्याप्रमाणें इनामदारांसंबंधीं सरकारचें एकंदर धोरण 'दिलाएंगे' 'दिलवाएंगे' अशा नबाबी थाटाचें असतें. व हें धोरण कनिष्ठ मुलकी अधिकाऱ्यांस कळून चुकल्यामुळें वरून आलेले तगाद्याचे हुकूमही अवमानण्यास ते फारसे भीत नाहींत. ज्या जिल्ह्यांत सरकारचा वसूल शेंकडा ९७ इतका होतो त्या जिल्ह्यांत इनामदारांचा मात्र वसूल एकवेळीं शेंकडा ६० हूनही कमी व्हावा याला कांहीं योग्य सबब सांगतां येईल असें मला वाटत नाहीं. सरकारी कुळाच्या शेतांत पाऊस पडतो व इनामदारांच्या कुळाच्या शेतांत मात्र तो पडत नाहीं असें थोडेंच आहे! अर्थात् जर दोष असेल तर तो मुलकी अधिकाऱ्यांच्या वसुलीच्या पद्धतींतच असला पाहिजे हें उघड आहे. जमीन एकाची, तो कसणारा दुसरा, वसूल करण्याचा प्रत्यक्ष मामला तिसऱ्याकडे, आणि त्याजवर निग्रहानुग्रहाचा अधिकार चवथ्याच्या हातीं

अशी ही चमत्कारिक स्थिति आहे. मुलकी अधिकाऱ्यांकडून असें सांगण्यांत येतें कीं, इनामदारांना आपली जमीन कोणती, आपलीं कुळें कोण, आपल्याला वसूल यावयाचा किती, ज्यावर आपण मदत मागतों तें कूळ जिवंत आहे का मेलें आहे या साध्या गोष्टीहि माहीत नसतात. आतां व्यक्तिशः कित्येक इनामदारांच्या ठिकाणीं असलें अज्ञान संभवतें. कारण कित्येक इनामदारहि नबाबी पद्धतीनें वागणारे असतात. व ते केवळ आपल्या मुखत्यारांच्या ओंजळीनें पाणी पितात. पण ही सब्ब सर्वच इनामदारांना लागत नाहीं. इनामदारांचा वसूल करून देणें ही विनाकारण 'बियाद' आहे असें मुलकी अधिकाऱ्यांस वाटतें. आणि इनामदारांच्या हातीं कनिष्ठ मुलकी अधिकाऱ्यांचें यत्किंचित्‌ही वांकडें करण्याचा अधिकार नसल्यामुळें कामदारांना आपली जबाबदारी खुशाल टाळतां येते. सरकारास इनामदारवर्ग बुडूं नये अशी इच्छा असेल तर इनामदारांच्या वसुलाच्या पद्धतींत त्यांना समूळ फेरफार करणें जरूर आहे.

जमीनबाबींसंबंधानें प्रस्तुतचा दुसरा एक प्रश्न म्हटला म्हणजे शेतकरी कायद्यासंबंधींचा होय. हा कायदा ज्या चार जिल्ह्यांना मूळारंभीं लावण्यांत आला,-किंबहुना ज्यांच्याकरितां म्हणून मुद्दाम हा कायदा करण्यांत आला-त्या चार जिल्ह्यांपैकीं सातारा हा एक आहे. पण इतर तीन जिल्ह्यांप्रमाणें सातारा जिल्ह्यांत गेल्या तीस वर्षांत ह्या कायद्याचा जो अम्मल झाला त्यावरून तो अत्यंत सदोष आहे ही गोष्ट निर्विवाद रीतीनें सिद्ध झालेली आहे. सुदैवानें या बाबतींत चौकशी व दुरुस्ती करण्याची बुद्धि मुंबईसरकारास झाली असून या कामीं नेमलेले दोघेहि अधिकारी म्हणजे मि. आर्थर व रा. सा. बोडस यांचा सातारा जिल्ह्याशीं विशेष निकट संबंध आहे ही अभिनंदनीय गोष्ट होय. व हे दोघेही अधिकारी सर्व बाजूचा पुरावा घेऊन शेतकी कायद्याचा दुरुपयोग थांबण्यास योग्य उपाय सुचवितील असा आपणां सर्वांप्रमाणें मलाही भरंवसा आहे. पुरावा देणाऱ्या सरकारी साक्षीदारासंबंधानें म्हणजे विशेषतः मुनसफासंबंधानें मात्र-मला एक गोष्ट स्पष्ट सांगावीशी वाटते. ती ही कीं, शेतकी कायद्याच्या अंमलाविरुद्ध त्यांचें जें मत असेल तेंही त्यांनीं प्रांजल व प्रामाणिकपणानें सांगितल्यास या स्पष्टवक्तेपणापासून त्यांना कोणत्याही प्रकारची इजा पोहोंचणार नाहीं असें स्वच्छ आश्वासन त्यांस कमिशनकडून देण्यांत यावें. आमच्या मुनसफ मंडळींत मतस्वातंत्र्याचा अंकूर होरपळून नच गेला तरी, निदान दबून तरी जावा अशी पूर्वांपार व विशेषतः

हल्लींची तरी परिस्थिति आहे. शेतकी कायदा करण्यामध्यें सरकारचा हेतु अमुक एक आहे व यामुळें त्या कायद्याचा अंमल आपल्या हातून अमुक एका प्रकारचा झालाच पाहिजे. नाहीं तर हायकोर्टाची अगर सरकारची आपणावर गैरमर्जी होईल, या भावनेस अगर भ्रमास पुष्कळ मुनसफ लोक बळी पडतात व त्यांची सदसद्विवेकबुद्धि कमकुवत होते ही गोष्ट लपविण्यांत फारसा अर्थ नाहीं. अशा भावनेनें व भ्रमानें, आजपर्यंत नाइलाजानें कां होईना, सावकार व कुळें यांजसंबंधानें ज्या पक्षपाताची परंपरा आपल्या हातून घडली तिजविरुद्ध पुरावा देऊन कायदा करणाऱ्या सरकारास व त्याचा अंमल करणाऱ्या स्वतःस सदोष ठरविण्याची प्रवृत्ति मुनसफ साक्षीदारांस न होणें हा स्वाभाविक मनुष्यधर्म आहे असें मी समजतों. पण जे मुनसफ साक्षीदार अशा परंपरेचा जोर झुगारून देऊन आपलें मत प्रांजलपणें सांगण्यास तयार होतील, तसेंच ज्यांचें मत सदर कायद्याविरुद्ध पूर्वीपासून असून तें उघडपणें सांगण्याची प्रस्तुत कमिशनमुळें सुसंधि आल्याचा ज्यांस आनंद वाटत असेल, अशा मुनसफ साक्षीदारांना स्पष्ट आश्वासन देऊन त्यांचा पुरावा घेतल्यास तो फारच मौल्यवान् ठरेल असें म्हणण्याचें मी धाडस करितों. प्रत्यहीं कोर्टांत काम करणाऱ्या वकील मुनसफांच्या बहुमतानें शेतकी कायद्यावरील तोहमतींचा निर्णय करण्यास सरकार तयार होईल तरी काम भागण्यासारखें आहे. जुलमी सावकारापासून शेतकऱ्यांचें संरक्षण करणें न्यायाचें आहे खरें. परंतु कायद्याचा हा हेतु खरोखर कितपत सिद्धीस जात आहे, व त्याच्या दुरुपयोगानें समाजाचें काय नुकसान होत आहे याचाही विचार झाला पाहिजे. सर्वच कायदा समूळ रद्द व्हावा असें म्हणणाऱ्यांपैकीं मात्र मी नाहीं. परंतु कायद्याच्या शब्दांस जो एकतर्फीपणा आलेला आहे व त्याच्या अंमलबजावणींत या एकतर्फीपणाचा जो अतिरेक होतो तो टळण्यास जरूर ती दुरुस्ती कायद्यांत केली म्हणजे पुरे असें मला वाटतें. शेतकरी कायद्यासंबंधानें सरकारवर दुसराही एक आक्षेप घेतां येण्यासारखा आहे; व सदर कायद्याचा मसुदा हिंदुस्थानसरकारपुढें वादविवादास निघाला त्या वेळीं बंगालप्रांताचे ले० गव्हर्नर यांनींच स्वतः तो घेतलाहि होता. सदर प्रसंगीं ते म्हणाले कीं, "सावकाराचें नुकसान करून शेतकऱ्याचा बचाव करण्यास कडक कायदा करण्याला सरकार आज प्रवृत्त झालें आहे. पण सरकाराला स्वतः शेतकऱ्यापासून सारावसुली ज्या कायद्यानें सक्तीनें चोपून करितां येते त्या कायद्यांत दुरुस्ती करण्याला मात्र सरकार

तयार नाहीं, हें अन्यायाचें नव्हे काय ?" 'सावकार व कुळें यांच्या दरम्यान मात्र ताजवा घेऊन सरकार बसणार. पण सरकार व शेतकरी कुळें यांच्या दरम्यान ताजवा घेऊन कोण बसणार ?' अशा तऱ्हेचा आक्षेप हल्लीं नेमलेल्या कमिशनकडून होणाऱ्या चौकशीला लागू नसल्यामुळें त्याचा उल्लेख मी येथें करीत नाहीं. तथापि खुद्द शेतकरी कायद्यापुरतेंच बोलावयाचें झालें तरी असें म्हणतां येईल कीं, सावकार न बुडतां शेतकरी बचावला जाईल अशा प्रकारची दुरुस्ती कायद्यांत झाली पाहिजे. शेतकरी या शब्दाचा फायदा खरोखर शेतकरी नाहींत असेही लोक घेतात तो त्यांस मिळूं नये. कुळास हप्ते देतांना फाजील दयेचा अतिरेक होतो तो होऊं नये. स्थावर मिळकतीसंबंधीं हुकुमनाम्यांचा निकाल हल्लींहून त्वरित झाला पाहिजे. कायद्यांत एकंदरीनें सक्तीचे शब्द घातले गेल्यामुळें न्यायाधिशांना आपले हातून धडधडीत अन्याय होत आहे असें दिसत असतांही डोळे मिटून नाइलाजानें अन्याय करावा लागतो. ही स्थिति बदलून सावकार व कूळ यांच्या व्यवहारांतील उभयपक्षीं गुणदोष पाहून उभयतांस न्यायानें वागविण्याची जी सवलत व जें मतस्वातंत्र्य न्यायाधीशांना पाहिजे तें कायद्यांतल्या कायद्यांतच त्यांस अधिक मिळालें पाहिजे. हल्लीं शेतकरी कायद्याचा अंमल महाराष्ट्राबाहेरही पसरण्यास सुरुवात झाली आहे. अशा वेळीं प्रस्तुत कमिशनच्या निकालाला विशेष महत्त्व आहे हें उघड दिसून येईल.

सातारा जिल्ह्याची औद्योगिक पाहणी केव्हां होईल तेव्हां होवो. पण सर्व जिल्ह्याची वाट न पाहतां ज्या त्या तालुक्यांतील लोकांनीं स्वदेशीचा प्रसार कोणत्या उपायानें होईल याचें चिंतन करून आपल्या हातून होईल तेवढा उद्योग केला तरी, निराशा वाटण्याचें कारण नाहीं. औद्योगिक शिक्षणाची संस्था अशी सातारा जिल्ह्यांत एकच आहे, व ती खुद्द साताऱ्यांतील 'टेक्निकल स्कूल' ही होय. कारखाना या दृष्टीनें पाहतां सर्व सातारा जिल्ह्यांत कऱ्हाड येथील आगकाड्यांचा कारखाना हा एकटा एकच आहे. हा कारखाना स्वदेशी चळवळीच्या पहिल्या लाटेंत निघाला असून अद्याप तो टिकला आहे ही गोष्ट कऱ्हाडकरांस अत्यंत भूषणभूत होय. सदर कारखान्याची अंतःस्थिति ज्यांना माहीत असेल त्यांना चालकांच्या स्वार्थत्यागाचें, उद्योगशीलतेचें व चिकाटीचें कौतुक वाटल्याशिवाय राहणार नाहीं. सदर कारखाना अद्यापि अस्तित्वांत असला तरी त्याची भरभराट आहे असें मात्र म्हणतां येणार नाहीं. दोन वर्षांपूर्वीं सातारा जिल्ह्याच्या

कलेक्टरसाहेबांनीं आपल्या ॲडमिनिस्ट्रेशन रिपोर्टांत सदर कारखान्यास सद्बुद्धीनें भरभराटीचें सर्टिफिकेट दिलें होतें. पण गेल्या दोन वर्षांत भरभराटीचीं प्रत्यक्ष फळें पदरांत न पडतां उलट कारखाना नुसता तगवून धरण्यास गेल्या दोन सालांत चालकांस किती सायास पडले असतील याची कल्पना बाहेरच्या मनुष्यांस होणें कठीण आहे. पण कारखान्याची आहे ही स्थिति सुद्धां, साताऱ्याच्या जिल्हाधिकाऱ्यांनीं उत्कृष्ट तऱ्हेची सहानुभूति दाखवून उत्तेजन दिलें नसतें तर राहिली नसती असें मला वाटतें. कारखान्याची भरभराट होण्यास अद्याप दोन गोष्टींची अनुकूलता पाहिजे आहे. एक रेलवेच्या दरांत सवलत मिळणें व दुसरी कारखान्यांतील मालास लोकांकडून अधिक आश्रय मिळणें. रेलवेकडून अवश्य ती भरपूर सवलत मिळणें ही गोष्ट जिल्हाधिकाऱ्यांच्याच काय पण प्रांतिक सरकारच्याहि हातची नाहीं. तथापि, अधिकारी वर्ग या बाबतींत लक्ष घालून रेलवे अधिकाऱ्यांस लिहून सवलत मिळविण्याचा शक्य तो प्रयत्न करितात याबद्दल त्यांचे आभार मानणें जरूर आहे. सदर्न मराठा कंट्रीच्या पोलिटिकल एजंटसाहेबांच्या कृपेमुळें कोल्हापूर वगैरे संस्थानांतून कऱ्हाडच्या आगपेट्यांस उत्तेजनपर हुकूम सुटले आहेत हीहि मोठ्या आनंदाची गोष्ट होय. कारखान्यांत जो थोडा माल निघूं शकतो तितकाही माल ताबडतोब खपत नाहीं. या गोष्टीचा दोष व जबाबदारी अर्थातच लोकांकडे येते. व या स्वदेशी कारखान्यास केवळ लोकाश्रय असावा तितका नसल्यामुळें कारखान्याची व्हावी तशी चलती होत नाहीं ही गोष्ट दुःखानें कबूल करावी लागते. नुसत्या सातारा जिल्ह्यानें मनावर घेतलें तरी, कऱ्हाडची आगपेटी वांटणीस येत नाहीं अशी स्थिति होईल. पण सर्वसाधारण जनसमूहाच्या दुर्लक्षामुळें आणि मालाचे उत्पादक कारखानदार व तो विकत घेणारें गिऱ्हाईक यांना सांधणारा उभयान्वयी असा जो व्यापारी वर्ग त्याच्या अनास्थेमुळें कऱ्हाडच्या आगपेट्यांस रेल्वेच्या अडचणी सोसून दूरदूरचें गिऱ्हाईक गांठावें लागतें. कऱ्हाडचा हा कारखाना आजच्या घटकेस यश व अपयश यांच्या सरहद्दीवर प्रतिकूल परिस्थितीशीं झगडत राहिला आहे. त्याला अशा बिकट प्रसंगीं सरकार व लोक यांजकडून थोडासा अधिक उदार आश्रय मिळेल तर तो एकदम निर्भय होऊन सातारा जिल्ह्यास तो एक कायमचें भूषण होऊन राहील. याकरितां आज जिल्हासभेच्या निमित्तानें जमलेले जिल्ह्यांतील सर्व लोक या गोष्टीचा योग्य विचार करतील अशी मला आशा वाटते. माझ्या माहितीप्रमाणें सर्व हिंदुस्थानांत फक्त

दहा बारा आगकाड्याचे कारखाने आहेत. पैकीं मुंबई इलाख्यांत तीन; पंजाबांत दोन; वऱ्हाड–मध्यप्रांतामध्यें एक व बाकी बंगालमध्यें आहेत. पण यांपैकीं निम्मे अधिक कारखाने अगदीं अल्पप्रमाण असून किफायतशीर रीतीनें धंदे करणारे व मोठे असे एकदोनच आहेत. बाकीचे वऱ्हाडच्या कारखान्याच्याच स्थितींत म्हणजे महापुरांत पोहत आहेत ! ते जगतील किंवा नाहीं याचा भरंवसा वाटत नाहीं. तरी पण स्वदेशीसंबंधानें लोकांच्या मनांत जें प्रेम उत्पन्न झालें आहे तेंच या प्रयत्नास कारणीभूत आहे. अर्थात् हे प्रयत्न सर्व यशस्वी झाले तर उत्तमच; पण दुर्दैवानें ते यशस्वी न झाले तरी, स्वदेशीच्या तपश्चर्येचा तो प्रारंभ आहे व पुढील पिढीच्या उपयोगाकरितां बांधल्या जाणाऱ्या स्वदेशीच्या इमारतीच्या पायांत गाडलेले हे अनुभवाचे दगड म्हणून उपयोगीं पडतील, या विचारानें समाधान वाटण्यासारखें आहे. मागें एकदां सर फेरोजशहा मेथा यांनीं आपण साबणाच्या एका कारखान्याचे डायरेक्टर असतां तो कारखाना बुडाल्याची हकीकत सांगितल्याचें पुष्कळांस आठवत असेल. सदर उदाहरणांत सर फेरोजशहा यांस किफायतशीर उद्योगधंदा करण्याचें ज्ञान नव्हतें या गोष्टीवर कोणीहि जोर न देतां, त्यांना एका स्वदेशी धंद्यांत चार पैसे घालण्याची इच्छा झाली व ते बुडाले तरी वाईट न वाटण्याइतका धीर त्यांस होता याच गोष्टीवर कोणीहि अधिक जोर देईल हें उघड आहे. महाराष्ट्रांतील लोकांस उद्योगधंद्याचें वळण लागण्यास आज नुसता प्रारंभ झाला आहे; आणि एका ऋतूंत वाळून पडलेलीं झाडांचीं पानें दुसऱ्या ऋतूंत फुटणाऱ्या नवीन पानास खत व पोषक द्रव्य म्हणून जशीं उपयोगीं पडतात, त्याचप्रमाणें महाराष्ट्रांतील आजच्या पिढीनें उद्योगधंद्याच्या कामीं खर्चलेला पैसा व दवडलेले श्रम हे पुढील पिढीस फायदा दिल्याशिवाय राहणार नाहींत ही खूणगांठ आम्हीं खुशाल बांधून ठेवावी.

मद्यपानाचा प्रश्न इतर जिल्ह्यांप्रमाणें सातारा जिल्ह्यांतही विचारांत घेणें जरूर आहे. ब्रिटिश अमदानीपूर्वी महाराष्ट्रांत मद्यपानाचा प्रघात मुळींच नव्हता असें म्हणणें बरोबर होणार नाहीं. तथापि आज मद्यपानावर जितके सरकारी प्रतिबंध आहेत त्यांहून पूर्वीच्या अमदानींत ते पुष्कळच अधिक होते; व उलट आज मद्यपानास ज्या राजमान्य सवलती आहेत त्यांहून पूर्वी त्या पुष्कळच कमी होत्या ही ढोबळ गोष्ट खुद्द सरकारासही नाकबूल करतां येईल असें मला वाटत नाहीं. दुसरें असें कीं, इंग्रजी अमलाखालीं व्यक्तिमात्रास मद्यपानाचें स्वातंत्र्य ठेवलें असलें

तरी, तें नियामत करण्याचा अधिकारहि सरकारनें निदान तात्त्विक दृष्ट्या आपल्या हातीं ठेविला आहे. अर्थात् जो वादाचा मुद्दा शिल्लक उरतो तो इतकाच कीं, महाराष्ट्रांतील एकंदर जनसमूहाला मिळून मद्यपान अप्रिय आहे कीं, नाहीं ? व तें खरोखर अप्रिय असेल तर त्यांच्याकरितां म्हणून तरी सरकारनें मद्यपानावर अधिक बंधनें घालण्यास तयार कां होऊं नये ! लोक मद्यपि बनल्यानें सरकारचा फायदा आहे असें आम्ही म्हणूं इच्छित नाहीं व सरकारही म्हणणार नाहीं. मद्यपानाच्या नियमनाच्या कारभारांत सरकारास लाखों रुपये मिळत असले तरी, ती किफायत गुन्हेगारांपासून दंडादाखल वसूल केलेल्या रकमेप्रमाणें, त्यांना मनापासून प्रिय असेल असें म्हणवत नाहीं. व असें आहे तर परदेशी चिनी लोकांच्या फायद्याकरितां अफूचें उत्पन्न सोडण्यास हिंदुस्थानसरकार तयार झालें त्याप्रमाणें स्वदेशी लोकांच्या फायद्याकरितां दारूचें उत्पन्न सोडण्यास प्रांतिक सरकारनें तयार व्हावें हें त्यास भूषणास्पद नाहीं काय ! असें असतां थोड्या मद्यपि लोकांच्या स्वातंत्र्यसंरक्षणाकरितां समाजाच्या मुळांत आळें खणून मद्यपानाचें बीज त्यांत सरकारनें कायमचें रुजूं द्यावें; एवढेंच नव्हे तर अधिक अधिक कडक प्रतीची दारू लोकांस मिळवून देणें, पुष्कळशीं दारूचीं दुकानें शिल्लक राहूं देणें, तीं दिवदिवसांतून बराच वेळ उघडीं ठेवणें, त्यांचा भरवस्तींत प्रवेश होऊं देणें, मद्यपानाचा प्रसार करण्याची बुद्धि मनांत धरल्याशिवाय दारूच्या दुकानदारीचा धंदा फायदेशीर होणार नाहीं,—किंबहुना जवळ जवळ तोट्याचा होईल—अशी परिस्थिति राखणें, व मद्यपानास आळा पडण्याचें खरें व प्रभावी असें जें एकच एक साधन म्हणजे लोकमत, त्याला सर्वस्वीं बाजूस ठेवणें—इत्यादि गोष्टींचें गरम खत त्या आळ्यांत घातलें जात आहे, यामुळें महाराष्ट्रांतील मद्यपानाचा विषारी वृक्ष दिवसेंदिवस अधिक पालवून फैलावेल व त्याच्या रागट छायेनें समाजास कायमची इजा होऊन राहील हें सरकारास उघड दिसूं नये व कोणीं सांगितल्यास त्याच्या मुळाशीं राजकीय द्वेष भासावा हें अत्यंत आश्चर्यकारक नव्हे काय ! मद्यपाननिषेधाची चळवळ करणाऱ्या लोकांवर राजकीय हेतूंचा आरोप करितांना आपल्याच टीकाकारांना सरकार जो सदुपदेश करितें त्याची त्यांना स्वतःलाच विस्मृति पडलेली असते ! सातारा जिल्ह्यांत मद्यपाननिषेधाची चळवळ आज जरी मुळींच नाहीं तरी, मद्यपानाच्या प्रसारापासून होणाऱ्या दुष्परिणामांचें स्वप्न सातारा जिल्ह्यांतील लोकांना आज काल नव्हे तर साठवर्षांपूर्वींच पडलें होतें ! आपणा

सर्वांस हें माहीतच आहे कीं पुण्याची पेशवाई जरी १८१८ सालीं बुडाली तरी खुद्द सातान्याचें स्वराज्य १८४८ पर्यंत होतें. तें बुडाल्यावर एकच वर्षानें म्हणजे १८४९ सालीं कै. रा. ब. गोपाळराव हरी देशमुख यांनीं एक लेख लिहिला आहे. त्यांत ते म्हणतातः— “ अलीकडे इंग्रजी राज्य झाल्यापासून महान् भयंकर त्वरित वृद्धि पावणारा असा एक दुर्गुण लोकांमध्यें प्रगट झाला आहे. तो कोणता म्हणाल तर दारू पिणें. पहा कीं, पूर्वीचे राज्यांत दारू कोणी पीत नव्हते व उत्पन्नही करीत नव्हते. ब्राह्मण व मराठे राज्य करणारे, तेव्हां ते दारू उत्पन्न करणारास नीच मानीत, आणि कोणी आपलीं झाडें त्यांजला दारू करण्यास दिलीं तर त्यांस बहिष्कृत करीत. आणि कोंकणांत अशी चाल होती, कीं दारू काढणारा हातांत दारू घेऊन जर रस्त्यावरून गेला तर दर्शनदोषास्तव स्नान करीत; आणि दारू प्यालेला ब्राह्मण कधीं आढळत नव्हता. जर कदाचित् कधीं कोणी पाहिला तर त्यास सर्व लोक निंद्य मानून कधींही जातींत घेत नव्हते, व ज्या गांवांत तो रहात असे तेथें त्याचे हाल फार होत असत. त्याचें लग्नकार्य व्हावयाचें नाहीं, व कोणी त्याजकडे जेवावयास जात नव्हते असा त्याचा धिःकार करीत असत. व जर कोणी अतिशूद्राकरितां दुकान घातलें तर एकीकडे छपवून चोरून घालीत. परंतु तेथें कोणी बहुतकरून जात नव्हता व भाविक लोक त्या रस्त्यानें जात येत नव्हते. सरकार अशा व्यापाऱ्यापासून उत्पन्नाची आशा कधीं करीत नव्हतें, म्हणून लोकांस मना करतां येत होतें. परंतु हल्लींच्या सरकारची फार विपरीत वर्तणूक आहे. जर त्यांनीं उत्पन्न सोडिलें तर त्यांस मनाई करण्यास तोंड होईल; व जर उत्पन्न करतील तर त्यांस दुर्गुण बंद करण्यास तोंड नाहीं. कारण एका हातानें दारूची विक्रीचिठ्ठी देतील आणि दुसऱ्या हातानें लोकांस पिऊं नका म्हणून सांगितील हें नांदणार नाहीं. यास्तव त्यांनीं उत्पन्न सोडून दिलें पाहिजे म्हणजे त्यांचा दाब बसेल आणि मनाईकरितां कायदे करतां येतील. याप्रमाणें विलायतेंतही कायदे झाले आहेत; मग या देशांत सरकारानें असें करण्याचा हेतु कोणता ? अद्याप हा दुर्गण लोकांमध्यें विस्तीर्ण व दृढ झाला नाहीं, तोंपर्यंत सहज मोडतां येईल. नाहीं तर जर सरकारानें अशीच वर्तणूक आणखी कित्येक वर्षेंपर्यंत चालविली तर अवघड पडेल. दारूसारखा दुष्ट पदार्थ दुसरा नाहीं, व या पदार्थाचें व्यसन मोठें बलाढ्य आहे. एकदां लागलें तर सुटत नाहीं व सर्वस्वीं गेलें आणि सर्वांचा नाश झाला तरी कांहीं सुचत नाहीं.

हें व्यसन मोठें घातकी आहे. यास्तव शासन नेमून याजपासून लोक परावृत्त केले पाहिजेत. परंतु हें दारू पिणारांचेच राज्यांत होईल काय ? अस्तु. व्हावें हें चांगलें. ते आपण स्वतः दारू पितात, पण टाकतील तर त्यांसही चांगलें आहे. आमचे लोकांस हें व्यसन न लागावें इतकें तरी त्यांनीं केलें पाहिजे. जरी आज ते उत्पन्नावर व लोभावर दृष्टि देत असतील तरी हें करणें सरकारास योग्य नाहीं. कारण आज थोडें उत्पन्न होईल. परंतु लोक जर भिकारी झाले आणि दरिद्री होऊन कांहीं उपयोगीं नाहींत असे झाले, तर मग सरकार त्यांजपासून काय घेईल ! सरकारची मातुःश्री लोक आहेत. त्यांस त्यांजला रोगी, आळशी, अशक्त करून मग त्यांचे पोराचें पोषण कसें होईल ! याजकरितां याबाबतचें उत्पन्न सरकारानें अगदीं सोडून मनाई करावी; म्हणजे लोक जगतील. नाहीं तर या सरकाराखालीं जी रयत आहे तीस हें व्यसन कधीं सुटावयाचें नाहीं व इंग्रज लोक या देशांतून गेले तरी इकडे या लोकांत हें व्यसन राहून त्यांचे पाय इकडे लागले होते हें स्मरण इतिहासांतच राहील असें नाहीं, परंतु प्रत्यक्ष लोकांचे स्थितींत राहील. ” वरील शब्द लिहिणारा गृहस्थ जहाल राजकीय चळवळ्या नव्हता. तर रावबहादूर, राजनिष्ठ व डिस्ट्रिक्ट व सेशन जज्जाचें जागेपर्यंत सरकारी नोकरींत वाढला होता. यानंतर चारच वर्षांनीं म्हणजे सन १८५२ सालीं सातारच्या लोकांनीं मद्यपानाविरुद्ध सरकारास अर्ज केलेला नमूद आहे. या वेळीं मद्यपानाचें स्वातंत्र्य हक्कानें मागणारा वर्ग जन्मास आलेला नव्हता. मद्यपानावर लोकमताचा ताबा बराच होता; व राजकीय चळवळीला सुरवात झालेली नव्हती. मद्यपाननिषेध हें राजकीय चळवळ्यांचें एक गुप्त शस्त्र आहे असें, अवघीं चारच वर्षें ब्रिटिश अमलाखालीं आलेल्या प्रजेसंबंधानें म्हणतां यावयाचें नाहीं. शिक्षणानें अंगीं येणारी वावदूकता अगर राजद्रोहाचा दुर्गुण १८५२ सालच्या अशिक्षित लोकांच्या अंगीं नव्हता हें तरी सरकार प्रांजलपणानें कबूल करील असें आम्हांस वाटतें. असें असतां १८५२ च्या अर्जांत साताऱ्याचे लोक मद्यपानासंबंधानें काय म्हणतात तें पहाः—“ आम्ही हल्लीं ब्रिटिश अमलाखालीं आलों या गोष्टीचें आम्हांस दुःख वाटत आहे असें नाहीं, पण आम्हांला जी भीति व काळजी वाटते ती या गोष्टीची कीं ब्रिटिश राज्याच्या पाठोपाठ गरम व कडक दारूचा प्रसार हटकून होतो ! एकदां या अवदसेचें पाऊल आंत पडलें कीं तें बाहेर निघत नाहीं. सर्व उपाय थकतात. “ जर कां सरकार दारूपासून वसूल उत्पन्न करण्याची एकदां सुरवात करील तर तो पुढें केव्हांही ते सोडून

देतील अशी आशाच नाहीं. दारूची पैदास व विक्री यांवर कर बसविण्यांत मद्यपानापासून लोकांचें परावर्तन व्हावें एवढाच जर सरकारचा हेतु असेल तर दारू पिकवून तिजवर कर वसूल करण्यापेक्षां, ती मुळींच न पिकवितां मद्यपानाचा बींमोड केला तर तें अधिक बरें नव्हे काय! कर बसवून दारूला प्रतिबंध करण्याचा प्रयत्न व्यर्थ आहे. कारण कर तर वसूल होतोच, पण मद्यपान व त्याचे दुष्परिणाम थांबत नाहींत.

" खाण्यापिण्याच्या बाबतींत सरकारानें हात घालूं नये हें साधारणतः ठीक आहे. पण अज्ञानपणानें अगर मूर्खपणानें नाशकारक अशा खाद्य-पेयांची चटक लोकांस लागेल तर सरकारनें त्यांत हात कां घालूं नये!

" सर्व धर्महि व विशेषतः हिंदुधर्म मद्यपान निंद्य व वर्ज्यच मानतात.

" मद्यपानाविणें आम्ही सुखी होतों; आणि मद्यपान फैलावल्यापासून आमच्या सुखाचा जो नाश होणार त्यास वेळींच प्रतिबंध करावा, असें आम्ही सरकारास विनवितों. चोर व दरोडेखोर यांजपासून जसें आमच्या सातारा शहराचें रक्षण सरकार करितें, तसेंच मद्यपानापासूनही करण्याची दया सरकारनें दाखवावी. "

सन १८४८ पासून सन १८७८ सालापर्यंतच्या दारूच्या खपाचे निश्चयात्मक व भरंवशीक आंकडे सरकारजवळ नाहींत ही गोष्ट जरी मान्य केली तरी १८७८ सालीं सातारा सिल्ह्यांत जवळ जवळ १२ हजार ग्यालन दारू खपत होती. ती १९१० सालीं ५० हजारांवर ग्यालन दारू खपली ही गोष्ट तरी सरकारास नाकबूल करतां येणार नाहीं. अर्थात् वरील अर्जापासून गेल्या सालापर्यंतच्या साठ वर्षांत सातारा जिल्ह्यांत ब्रिटिश अमलाखालीं चौपटीहून अधिक दारूबाजी वाढली हें उघड आहे; व ही गोष्ट सरकारास माहीत नाहीं असें नाहीं.

वरील अर्जांत राजकीय चळवळीचा मागमूसही नाहीं, व त्याजवर लोकमताचाही उत्कृष्ट छाप आहे. अशा अर्जांतील विनवणी सरकारनें कां ऐकिली नाहीं! ती न ऐकल्यानें अर्जांतील भविष्य व लांछनास्पद दुरुत्तर खरें होण्याची पाळी सातारा जिल्ह्यावर आली कीं नाहीं. कारण दारूच्या या प्रसाराबरोबर सरकारचें उत्पन्नही वाढलें आहे. १८७८ सालीं दारूचें उत्पन्न ३५ हजार रुपये होतें तें १९१० सालीं ३ लक्ष २७ हजार रु. झालें.

पण या उत्पन्नापैकीं मद्यपाननिषेधाला उत्तेजन देण्याचे कामीं एक पै तरी सरकार खर्च करितें काय! त्यांना जरी या पैशाची चाड नसली व मद्यपानस्वातं-

त्यांत ते हात घालण्यास तयार नसले तरी, मद्यपान चांगलें नाहीं असें जर सरकारास खरोखर वाटत असेल तर या लाखों रुपये उत्पन्नापैकीं कांहीं हजार तरी मद्यपाननिवारणाच्या कामीं खर्ची कां पडूं नयेत? आरोग्य व नीतिशिक्षण हीं जर सरकारास आवडतात तर अबकारी इन्स्पेक्टराच्या मदतीला सरकारी पगारदार मद्यपाननिषेधक प्रचारक व उपदेशक नेमल्यास ब्रिटिश राज्यकारभारच्या मूलतत्त्वांचा खून झाला असें कोणीही खचित म्हणणार नाहीं. सरकारानें स्थानिक अबकारी कमिट्या नेमल्या आहेत पण अजून तें निवळ एक सोंग आहे. एकंदर दारूच्या दुकानांची संख्या व मांडणी यांच्या विचाराकरितां पुण्याच्या या कमिटीची सभा तीन तीन वर्षांत एकही होत नाहीं! साताराची स्थिति या बाबतींत अधिक चांगली असल्यास मला त्यांत आनंदच आहे. नसल्यास स्थानिक कमिटीचे अधिकार वाढावे व कमिटी मृतप्राय न पडतां जागृत रहावी अशी व्यवस्था करण्याची विनंति सातारा जिल्हासभेनें करण्यासारखी आहे.

असो; बाकीच्या विषयांसंबंधानें न बोलतां मी आपलें भाषण आवरतें घेतों; व शेवटीं एवढेंच म्हणतों कीं, साहाव्या व सातव्या जिल्हासभेच्या बैठकीच्या दरम्यान आपल्या इलाख्यांतील वातावरण बरेंच निवळलें आहे. त्याचा फायदा घेऊन अधिकारी व लोक यांनीं उभयपक्षीं प्रयत्न केला तर जिल्हासभेच्या पुढील बैठकीचे वेळेपर्यंत हें वातावरण आणखी अधिक निवळलेलें आढळेल. हिंदुस्थानांत राजेसाहेबांचें आगमन झाल्यामुळें सर्व देशाप्रमाणें जिल्ह्यासही त्या आगमनानें जो अप्रत्यक्ष फायदा झाला तो नमूद करणें जरूर आहे.

राजेसाहेब येण्याच्या प्रसंगानें ज्या ज्या घडणार म्हणून वाटत होत्या त्या त्या सर्वच गोष्टी घडल्या असें नाहीं. अनेकांची अनेक बाबतींत निराशा झाली आहे. तथापि, कित्येक बाबतींत पूर्वी असंतोषाचा ज्वर प्रजेच्या अंगांत भरण्यास अधिकारी वर्ग कारणीभूत झाला होता तो शमण्याला राजेसाहेब हिंदुस्थानांत आल्यानें, त्यांनीं केलेल्या भाषणांनीं व त्याहूनहि विशेष म्हणजे त्यांनीं केलेल्या लोकाराधनाच्या कांहीं कृत्यांनीं पुष्कळच मदत झाली यांत शंकाच नाहीं! किंबहुना अधिकारी व लोक यांच्या परस्पर वागणुकीचा कांहीं अंशीं एक नवीन मनूच अवतरूं पहात आहे असें दिसतें! अधिकाऱ्यांना प्रजेशीं सहकारिता करण्याची इच्छा आणि होतां होईतों जुन्या गोष्टी यापुढें उकरून न काढतां परस्पर आगळिकी विसरल्या जाव्या अशी स्फूर्ति झाल्याचें दिसतें. अशा इच्छेस लोकपक्षाकडून

कृतज्ञतापूर्वक मदतच मिळेल यांत मला शंका वाटत नाहीं. व पुढील जिल्हा-सभेच्या अध्यक्षास या सहकारितेचें फळ म्हणून लोकस्थिति सुधारणेच्या अनेक नवीन गोष्टी नमूद करण्याचा प्रसंग यावा अशी आशा व्यक्त करून मी आपलें भाषण पुरें करितों.

---

## ८ जॉर्ज बादशहांचें स्वागत.

(ता. १५ डिसेंबर सन १९११.)

बादशहा 'येणार येणार' म्हणून एक वर्षभर हिंदुस्थानच्या लोकांस अभिनव-कौतुकपूर्ण अशी उत्कंठा लागून राहिली होती; ती गेल्या शनिवारीं सफळ झाली. पूर्वसंकेताप्रमाणें राजेसाहेबांची स्वारी सकाळीं दहा वाजण्याच्या सुमारास बंदरांत येऊन दाखल झाली, व बंदरावर उभारलेल्या अर्धवर्तुलाकार भव्य सभागृहांत सायंकाळीं मुंबई शहरामार्फत त्यांचें स्वागत होऊन, मिरवणुकीच्या निमित्तानें त्यांनीं मुंबई शहरच्या व मुद्दाम बाहेरून आलेल्या हजारों प्रजाजनांस प्रथम दर्शनाचा लाभ दिला. मुंबई शहरास मिळालेल्या या अपूर्व मानाचें महत्त्व विशेष आहे. चार आठ दिवसांनीं राजेसाहेब दिल्लीस जाऊन दरबार भरविणार; व नंतर हिमालयांत साव-काशपणें मृगयेची क्रीडा करून ते कलकत्त्यास गेल्यावर तेथेंहि त्यांचें स्वागत होणार. पण अर्थात् तोंपर्यंत राजेसाहेबांच्या हिंदुस्थानांतील मुक्कामास दोन तीन आठवडे लोटल्यानें तेथील स्वागतसमारंभ वाफ निवालेल्या अन्नाप्रमाणें शिळा होणार. प्रत्यहीं नवीन नक्षत्रपुंजांच्या वसतिगृहांत पाहुणचार घेत जाणारा चंद्र पौर्णिमेच्या सुमारास जरी अधिकाधिक सतेज होत जातो, तरी बिजेच्या प्रथमचंद्रदर्शनाचा लाभ मनुष्यमात्रास अधिक प्रिय असतो. त्याचप्रमाणें राजेसाहेबांचें प्रथम स्वागत करण्याची संधि मुंबई नगरीस मिळाल्याबद्दल तिला अभिमान वाटल्यास नवल नाहीं. मुंबईच्या वास्तुदेवतेच्या ऐश्वर्याची चढती कमान गेल्या शनिवारच्या समारंभानें पूर्णत्वास पावली असें म्हणण्यास आतां हरकत नाहीं; आणि हिंदुस्थानां-तील ब्रिटिश साम्राज्याच्या स्थापनेपूर्वीपासून पश्चिम द्वारपाळाचें काम मुंबई शहराकडे असून तें त्यानें आजवर मोठ्या दक्षतेनें व इमानेंइतबारें बजावल्यामुळें, या साम्राज्याचा धनी बादशहा या नात्यानें हिंदुस्थानांत येण्याच्या वेळीं त्याच्या प्रथम स्वागताच्या मानाचें पारितोषक त्याच शहरास मिळालें हें पाहून कोणासहीं या औचित्यदर्शनानें बरेंच वाटेल.

मुंबई शहर व इंग्रज यांचा संबंध प्रथम सन १६६१ सालीं जडला. अर्थात् 'आम्ही हिंदुस्थानचे किंबहुना खुद्द मुंबई शहरचे फार जुने रहिवाशी आहों' असा इंग्रज लोकांस अभिमान वाटणें योग्य आहे. श्रीशिवाजीमहाराजांची पुण्याची जहागीर इंग्रजांच्या मुंबईच्या जहागिरीहून थोडी अधिक जुनी आहे हें खरें. तथापि, शिवाजीमहाराजांस राज्याभिषेक होण्यापूर्वी दहा वर्षें मुंबईस इंग्रज गव्हर्नर अधिकार चालवीत होता. पुण्यास पेशव्याची वस्ती किंवा हैद्राबादेस निजामाची वस्ती होण्याच्या पूर्वीपासून मुंबईस इंग्रजांची वस्ती आहे; आणि होळकर, शिंदे, गायकवाड हीं बहुमानाचीं नांवें अस्तित्वांत येण्यापूर्वी मुंबई हें इंग्रजांच्या सत्तेचें एक अधिष्ठान होऊन राहिलेलें होतें, अशी बढाई इंग्रज इतिहासकारांनीं मारली असल्यास ती अयथार्थ नाहीं. खुद्द शेक्सपिअरच्या वेळीं मुंबईत एकहि इंग्रजी अक्षर उच्चारलें जात नव्हतें हें खरें. परंतु त्याच्या मरणापासून अर्धशतकाचे आंतच मुंबईस इंग्रजीचा प्रसार सुरू झाला होता. असो; इंग्रजांचा व मुंबई शहराचा संबंध वर सांगितल्याप्रमाणें सन १६६१ सालीं जडला. त्याचें कारण असें झालें कीं, इंग्लंडचा त्या वेळचा राजा दुसरा चार्लस याचें पोर्तुगीज राजकन्येशीं लग्न झालें, व या लग्नांत पोर्तुगालचा राजा सहावा अलफान्सो यानें मुंबई हें बेट या राजकन्येला आंदण दिलें. या सुमारास इंग्रजांची डोई हिंदुस्थानांत नुकती कोठें वर येऊं लागली होती. यापूर्वी सुमारें शंभर वर्षें सुरतेस इंग्रजांची वखार होती; पण या वखारवाल्यांचें जीवित व मालमत्ता सर्वस्वीं तेथील मुसलमान सुभेदाराच्या मर्जीवर असे. पश्चिम समुद्रावरील आधिपत्य पोर्तुगीज, सिद्दी व आंग्रे यांच्या दरम्यान वांटलेलें होतें. मुंबई बंदर हातीं आल्यावरहि इंग्रजांचा मुंबई इलाख्यांतील मुलूख इतका थोडा होता कीं साधारण एखाद्या मनुष्यास तो सर्व एका दिवसांत पायानें आक्रमितां येत असे! या एकंदर जहागिरीचें उत्पन्न सालाचे तीस हजार रुपयेहि भरण्यासारखें नव्हतें.

खुद्द मुंबई बेट हंफ्रे कुक यानें १६६१ च्या तहाअन्वयें १६६५ सालीं पोर्तुगीज लोकांकडून आपलेकडे घेतलें. त्या वेळीं त्यांत पांच सहा गढ्या, पांच चार पितळेच्या तोफा, शिंदीच्या व नारळाच्या झावळ्यांनीं शिवलेल्या छपरांचीं घरें, व आठ दहा हजार कोळ्यामाळ्यांची वस्ती इतक्याच काय त्या मिळकतीच्या वस्तू होत्या. आज धनाढ्य व अव्वल दर्जाच्या सुखवस्तु बंगलेवाल्यांनीं व्यापलेली 'मलबार-हिल' हें त्या वेळीं निवळ गायरान असून, सगळ्या डोंगरावरील कुरणाचें उत्पन्न सालिना फार तर शेंपन्नास रुपये असेल. इंग्रजांच्या हातीं मुंबई बेट आलें

त्या वेळीं खालीं गोव्यास पोर्तुगीज, देशावर विजापूरचा बादशहा, घाटमाथा व कोंकण येथें मराठी राज्यसंस्थापक शिवाजी, व उत्तरेकडे मोंगल अशा चारहि बाजूंनीं राजसत्तेस तणावे लागले होते. सुरतेच्या वखारवाल्यांची दुर्दशा मोंगल सुभेदार वेळोवेळीं मनास वाटेल तशी करींत असे. जंजिरा, चौल आणि मुंबई या तीन ठिकाणांखेरीज बाकी सर्व कोंकणपट्टीचा मुलूख शिवाजीच्या हातीं होता; व शिवाजी मुंबई बेटावर केव्हां उतरेल याचा नेम नसे. जंजिऱ्याच्या शिद्दीचें सैन्य मधून मधून मुंबईवर येतच असे. हल्लीं मुंबई सरकारच्या ठरावांवर 'जंजिरे मुंबई' असा पत्ता लिहिलेला असतो. तो वाचणारांस सन १६६८ सालीं जंजिऱ्याच्या सिद्यानें वीस हजार फौजेनिशीं शेवरीवर उतरून 'जंजिरे मुंबई'—अर्थात् मुंबईचा किल्ला—यास वेढा दिला होता, हें वाचतांना इतिहासाच्या अघटित घटनापटुत्वाचें कौतुक वाटतें. सन १६९२ सालीं प्लेग येऊन गेल्यावर सुमारें दोन चार मुलकी अधिकारी व शेंसवाशें शिपाई एवढीच काय ती मुंबईस लोकसंख्या असल्याचा दाखला सांपडतो. मुंबईस नेमलेल्या इंग्रज अधिकाऱ्यांस मधून मधून बंड करण्याची हौसहि येई; व कित्येक इंग्रज अधिकाऱ्यांनीं फ्रेंचांना सामील होऊन देशद्रोहाचे व राजद्रोहाचे कट केल्याचेंहि आढळतें.

या सुमारास डच लोकांचें चोहोंकडे समुद्रावर प्राबल्य असल्यानें त्यांचीं लढाऊ जहाजें मुंबईच्या आसपास गोळीबार करीत असत. मुंबईस असणारे इंग्रज लोकहि त्या वेळच्या स्थित्यनुरूप अशिक्षित, कोत्या समजुतीचे, धर्मभोळे असे होते. या बाजूस येऊन पडलेल्या इंग्रजांना सहा सहा महिन्यांतहि एखादें इंग्रजांचें जहाज दृष्टीस पडण्याची मारामार. अर्थात् ते अडाणी, मागसलेले, दारूबाज, अनीतिमान्, असे असत. अशा स्थितींत असणारें मुंबई बेट राजास आंदणादाखल घेतल्याबद्दल इंग्लंडांतील लोकांस आनंद वाटण्यासारखा नव्हता. पोर्तुगीज राजकन्या वांझोटी आणि तिच्याबरोबर मिळालेलें आंदणहि तसेंच निष्फळ असें समजून लोक नाराजच होते. हें आंदण घेतलें त्यांत झालें तरी मुख्य हेतु पश्चिम हिंदुस्थानांत इंग्रजांचें राज्य वाढविण्याचा नसून नवीन उदयास आलेल्या डच दर्यावर्दी लोकांविरुद्ध खालावलेल्या पोर्तुगीज लोकांना मदत करण्याचाच होता. अर्थात् चार्लस राजास आपल्या पोर्तुगीज राणीप्रमाणें तिजबरोबर मिळालेल्या आंदणाचाहि कंटाळा येऊन त्यानें सन १६६८ सालीं मुंबई बेट " ईस्ट इंडिया कंपनी " च्या हवालीं केलें. आणि तिनें सदर जहागिरीच्या स्वामित्वाबद्दल सालीना फक्त दहा पौंड

म्हणजे सुमारें १०० रुपये राजास द्यावे असा करार ठरला ! पण इंग्रजी राष्ट्राच्या एकंदर इतिहासाची मौजच अशी आहे कीं, त्यांतील बराचसा मनोवेधक भाग राजदंड धारण करणाऱ्या राजाच्या राजकीय महत्त्वाकांक्षेपेक्षां तागडी–तुकाप्पांच्या दाम व टक्के यांच्या आवडीनेंच घडून आला आहे. हिंदुस्थानांतील दिल्ली, विजापूर, पुणें वगैरे अर्वाचीन-किंवा तक्षशिला, पाटणा, अवंती वगैरे प्राचीन शहरें केवळ राजधान्या-राजे लोकांचीं राहाण्याचीं व राजदरबारचीं शहरें–म्हणून प्रसिद्धीस व भरभराटीस आलेलीं होतीं. इंग्रजांच्या इतिहासांतील वास्तुदेवतेची आवड निराळ्या प्रकारची दिसते. तिला राजदरबाराच्या वैभवापेक्षां एखाद्या वखारींतील संपन्नता अधिक प्रिय असलेली आढळते. याच नियमास अनुसरून हिंदुस्थानांत मोडणाऱ्या पण इंग्रजांशीं बरेच दिवसपर्यंत संबंध आलेल्या मुंबई नगरचीं भरभराट इंग्रज राजाच्या हातून न होतां इंग्रज व्यापाऱ्यांच्या हातून झालेली आहे. जें मुंबई बेट खुद्द इंग्रजराजाचे ताब्यांत असेपर्यंत नापीक, वांझोटें व निरुपयोगी असें वाटत होतें तें इंग्रज व्यापारी कंपनीच्या हातीं जातांच त्याच्या भाग्योदयास सुरुवात झाली. सन १६८७ सालीं इंग्रज कंपनीनें आपलें सुरतेचें ठाणें मोडून मुंबईस आणिलें. शिवाजी मृत्यु पावल्यामुळें तिला गुजराथेंतलें ठाणें उठवून तें व्यापारास अधिक सोईच्या अशा कोंकणपट्टीच्या बंदरावर आणून ठेवण्यास सहजच उत्तेजन आलें; व पुढें वीस वर्षांनीं दोन्ही व्यापारी कंपन्यांची एक संयुक्त कंपनी झाल्यावर, म्हणजे सन १७०८ सालीं, पश्चिम किनाऱ्याकडील कंपनीच्या मुलुखाचा एक स्वतंत्र इलाखाच बनून मुंबई ही त्या इलाख्याची राजधानी झाली. सन १७७३ सालीं तिन्ही इलाख्यांवर मिळून गव्हर्नर जनरल नेमण्यांत आला, त्या वेळीं मुंबईचा व कलकत्त्याचा संबंध जडला. मुंबईच्या पुढील वृत्तांताचा उल्लेख करण्याची आज विशेष गरज नाहीं, तो महशूरच आहे. पण या इतिहासांतहि मुंबईचें महत्त्व व्यापारी शहर या नात्यानें अधिक आहे. तिन्ही इलाखे एक झाल्यापासून इंग्रजी व्यापाराचें केंद्र आणि हिंदुस्थानच्या साम्राज्यांत प्रवेश करण्याचें मुख्य द्वार या नात्यानें मुंबईस जें महत्त्व आलें तें अजूनहि वाढतें आहे. ही गोष्ट दर्शविण्याकरितांच कीं काय राजेसाहेबांस आगबोटीनें परस्पर प्रथम कलकत्त्यास व तेथून दिल्लीस जातां आलें असतें तरी तसें न जातां ते प्रथम मुंबईस उतरले; आणि मग दिल्लीवरून ते कलकत्त्यास जाणार.

अशा रीतीनें राजेसाहेबांचें स्वागत करण्याचा पहिला मान मुंबईस मिळाला. तथापि, शरीरानें नसली तरी मनानें सर्व हिंदुस्थानची प्रजा शनिवारीं सायंकाळीं

अपॉलो बंदरावर उभारलेल्या सभागृहांत हजर होती. किंबहुना ना. सर फेरोजशहा मेथा हे मुंबई कॉर्पोरेशनच्या तर्फेचें मानपत्र वाचीत असतां सर्व हिंदी प्रजा त्यांच्या मुखानें आपले विचार व आपल्या भावना व्यक्त करीत होती असें म्हटलें असतां त्यांत बिलकूल अतिशयोक्ति होणार नाहीं. राजेसाहेबांना ज्याप्रमाणें लंडनच्या राजवाड्यांत राहून मनानें सर्व हिंदी प्रजेचा परामर्ष घेतां येतो, त्याचप्रमाणें मुंबईंत असलेल्या लाखों लोकांना बंदरकांठच्या सभागृहांत जाण्यास परवानगी न मिळाली, अथवा हिंदुस्थानच्या कोट्यावधी लोकांस या प्रसंगीं मुंबईस जाणें अशक्य असलें तरी त्यांना जागा न सोडतांहि आपली राजभक्ति व्यक्त करून दाखविणें शक्य होतें. सूर्यास्ताच्या वेळीं जगाच्या कोणत्याहि भागांतले भाविक मुसलमान ज्याप्रमाणें मक्केकडे तोंड वळवून प्रार्थना करीत असलेले दिसतील, त्याचप्रमाणें गेल्या शनिवारीं सर्व हिंदुस्थानची प्रजा राजभक्तीच्या होकायंत्राच्या सहाय्यानें थेट मुंबई शहराचा वेध घेऊन व मनानें अपॉलो बंदराला सन्मुख होऊन तेथें घडणाऱ्या स्वागत समारंभांत सामील झाली होती असा चमत्कार पृथ्वी सोडून वरच्या पातळींत भ्रमण करणाऱ्या कोणत्याहि महात्म्यास दिसल्यावांचून राहिला नसेल ! एडन सोडल्यानंतर दूर समुद्रावर असतांहि बिनतारी भौतिक तारायंत्राच्या योगानें मुंबईच्या गव्हर्नरसाहेबांस राजेसाहेबांशीं बोलतां येऊं लागलें. त्याचप्रमाणें बिनतारी मानसिक तारायंत्राच्या योगानें हिंदी प्रजेस अपॉलो बंदरावर राजेसाहेबांस सामोरे जाऊन त्यांना स्वागत समर्पण करितां आलें, यांत काय नवल ?

मुंबई शहरास राजेसाहेबांच्या प्रथम स्वागताचा मान मिळालाच. पण त्यांतूनहि पंचम जॉर्ज हे राजे व बादशहा या नात्यानें हिंदुस्थानांत आलेले पहिलेच राजे होत, या गोष्टीनें दुधांत साखर पडल्यासारखें झालें आहे. ‘आजपर्यंत न झालेली गोष्ट’ या दृष्टीनें राजेसाहेबांच्या आगमनास विशेष महत्त्व आहेच. पण पूर्वीं घडून न आल्याप्रमाणेंच पुढेंहि कधीं घडून न येणारी अशी ही गोष्ट नाहीं व यामुळें आम्हांला तिच्या अपूर्वतेप्रमाणें तिची भावी उपयुक्तताहि भासते. राजेसाहेब हिंदुस्थानांत आले या गोष्टीचें पर्यवसान हल्लींच्या प्रसंगांतच न संपतां, प्रस्तुतचे व भावीहि राजे असेच हिंदुस्थानांत येऊं लागतील हाहि ध्वन्यर्थ ‘राजेसाहेब हिंदुस्थानांत आले’ या शब्दांतून निघण्यासारखा असल्यामुळें, ते शब्द हिंदी प्रजेस विशेष प्रिय वाटत आहेत, यांत शंका नाहीं. राजेसाहेब आल्याचा अपूर्व चमत्कार आम्हीं पाहिला या आनंदापेक्षां, भावी राजेसाहे-

यांच्या आगमनाची वहिवाट किंवा परंपरा इचा पाया हल्लींच्या या आगमनानें घातला जात आहे या जाणिवेनें तोच आनंद द्विगुणित होतो. " चिनांतील मांचु राजांच्या वैभवाचें मुख्य चिन्ह म्हटलें म्हणजे हेंच कीं, त्यांनीं प्रजेच्या दृष्टीस कधींहि पडूं नये; देवाचें देवत्व जसें पुष्कळ अंशीं त्याच्या अदृश्यरूपावर अवलंबून असतें तसेंच चिनी राजांचेंहि हें वैभव आहे " असें म्हणून आम्ही चिनास हंसत होतों. पण हिंदुस्थानची स्थिति तरी या बाबतींत आजवर निराळी कोठें होती? १८५८ सालापर्यंत हिंदुस्थान हें कंपनी सरकारच्या ताब्यांत होतें. अर्थात् इंग्लंडची गादी व हिंदी लोक यांच्यामध्यें राजा व प्रजा असला—म्हणजे सेव्यसेवक—भाव स्थापित झाला नव्हता. म्हणून कदाचित् इंग्लंडच्या राजास हिंदुस्थानांत यावेसें वाटलें नसेल. पण १८५८ पासून ही स्थिति पालटली असतांहि हिंदी प्रजेची राजदर्शनाची मजल चित्र पाहण्यापलीकडे जात नसे. पण ही स्थिति सर्वथा अनिष्ट होय. ईश्वरभक्तींत सुद्धां जर सगुणरूप-दर्शनाचें महत्त्व आहे तर मानव राजभक्तीला सुद्धां मूर्तदर्शन अवश्य असणार हें उघड आहे. राजानें प्रजेची गांठ समक्ष व वारंवार न घेण्यांत दोघांचाहि सारखाच तोटा असतो. अर्थशास्त्रदृष्ट्या ' मिडलमन् ' किंवा दलाल हा जसा अनिष्ट, तशीच राजा व प्रजा यांच्या संबंधांत ' ब्यूरॉक्रसी ' ही संस्था अनिष्ट आहे. 'ब्यूरॉक्रसी' झाली तरी राजसत्तेनेंच नेमलेली असते. तरी पण व्यापारांतील ' मिडलमन् ' किंवा दलालाप्रमाणें ती राजा व प्रजा या दोहोंच्याहि अधिकारांतले थोडथोडे लचके तोडून घेऊन त्यावर आपण पुष्ट होते व दोघांचेंहि तितक्या प्रमाणानें नुकसान करते. पूर्वी आयर्लंडांत मोठमोठ्या इस्टेटी इंग्रज सरदारांच्या मालकीच्या असत; परंतु हे सरदार मिजासी अगर बेपर्वाई असल्यामुळें, आपल्या या इस्टेटीची सर्व व्यवस्था पगारदार मुनिमांच्या हातून करवीत; व स्वतः जन्मजन्मांतरीं त्या इस्टेटी काळ्या का गोऱ्या हें डोळ्यांनीं पाहातहि नसत! आयर्लंडांत दोनतीनशें वर्षें जी भयंकर अस्वस्थता माजून राहिली होती तिचें हेंच कारण होतें. हे सरदार स्वतः मधून मधून जाऊन आपल्या इस्टेटींची व्यवस्था पाहूं लागले तेव्हांपासून आयर्लंडची स्थिति सुधारली! इंग्लंड व हिंदुस्थान यांच्या संबंधांतहि हाच दाखला घेण्यासारखा आहे.

आतां राजेसाहेब हिंदुस्थानांत आले म्हणजे लागलीच हिंदुस्थानास स्वराज्य मिळणार असें थोडेंच आहे! कारण खुद्द इंग्रजी राज्यांत राजा म्हणजे केवळ नामधारी राजा व प्रधानमंडळाच्या हातचें बाहुलें होऊन राहिला आहे हें आम्ही

पूर्णपणें जाणतों. इंग्रज प्रजा राजाचा बडेजाव करिते तो सर्व राजाकरितां नव्हे– आपल्याकरितां आहे. किंबहुना सुप्रसिद्ध अशा एका उपनिषद्वाक्यांत जरूर तो फेरफार करून असेंहि म्हणतां येईल कीं, इंग्रज लोकांना "न वा अरे राज्ञः कामाय राजा प्रियो भवति। आत्मनस्तु कामाय राजा प्रियो भवति" असें म्हणतां येईल ! सर्व सत्ता आपल्या हातीं घेऊन राजाच्या पोटाचा शेरहि पार्लमेंटच्या मंजुरी-शिवाय देतां येऊं नये असें ठरविणाऱ्या प्रजेची मधून मधून ऊतूं येणारी राज-भक्ति हा कांहींसा मायावी मानभावीपणाचाच एक प्रकार आहे असें म्हणण्यास कोणती हरकत ! पार्लमेंटनें राजाच्या हातापायांना बांधलेल्या काढण्या रेशमाच्या असतील व त्यांच्या टोंकांस कलाबतूचे गोंडे लाविले असतील; परंतु त्या बांधल्यानें राजास हलतां येत नाहीं, व त्याच्या मनास कच पडतात ही गोष्ट कांहीं खोटी नाहीं. लोकसत्तेनें इंग्लंडच्या राजाच्या पायांत घातलेले लंगर बावनकशी सोन्याचे असल्या-मुळें ते अत्यंत उज्ज्वल व देदीप्यमान दिसतील; परंतु ते इतके भारी जाड व जड आहेत कीं, ते मऊ सोन्याचे म्हणून राजा तोडूं लागेल तर ते तुटणार नाहींत. अशा निगडबद्ध राजास बादशहा हें उदात्त नांव देऊन इंग्रज लोकांनीं अत्यंत सन्मानपूर्वक हिंदुस्थानांत पाठविलें व हिंदुस्थानांतील अधिकाऱ्यांनीं त्यांचा अत्यंत सन्मानपूर्वक बडेजावीचा पाहुणचार केला तरी, राजानें देणगीदाखल देण्यासारख्या अधिकाराच्या कप्प्यांत घालण्यास त्याचा हात जर मोकळाच नाहीं, तर हिंदी प्रजा कितीहि आशाळभूत असली तरी ती मागणार काय व राजेसाहेबांस देतां तरी येणार काय, हें आम्हांस माहीत नाहीं असें नाहीं. राजेसाहेबांनीं बक्षीस देण्यास उत्सुक असलेला आपला हात सहजस्फूर्तीनें खांद्याकानाशीं नेला, तरी मृच्छकटिकांतील उदार नायकाप्रमाणें दीर्घ निःश्वास सोडूनच कदाचित् तो त्यांस परत घ्यावा लागेल हेंहि आम्ही जाणतों. तथापि, अशा स्थितींत असणाऱ्या राजाचेंहि वारंवार दर्शन व सान्निध्य हें हिंदी प्रजेस हितावह व सुखावह होईल असाच आमचा दृढ विश्वास आहे.

सर्व सत्ता आपल्या हातीं सांठवून ठेवणाऱ्या इंग्रज लोकांस जर राजदर्शन इतकें प्रिय आणि त्यांच्या राजभक्तीच्या भावनेला लहरी आणणारें ठरतें तर हिंदी प्रजेला तें तसेंच कां वाटणार नाहीं ! हिंदुस्थानांत पूर्वीं प्रातिनिधिक राजसत्ता नव्हती 'म्हणून' हिंदी लोकांस पार्लमेंटरी संस्था नको हा युक्तिवाद जर सर्व बाजूंनीं खरा मानावयाचा, तर प्रातिनिधिक सत्तेच्या अभावीं अर्थातच सगुण व मूर्त राजसत्ता

हिंदी लोकांस प्रिय असावी हें उघडच ठरत नाहीं काय ! पूर्वी एके काळीं प्रातिनिधिक सत्ता आमचे हातीं नव्हती म्हणून आतांहि ती आम्हांस देण्याचें कारण नाहीं असें कित्येक युरोपियन म्हणतात. पण मग इंग्रजांचे पूर्वज पूर्वी रंग लावून व कातडीं पांघरून अर्ध नग्नस्थितींत रानांत भटकत होते, म्हणून आज त्यांना तलम रेशमी कपड्याचे सूट व उंची काश्मिरी शाली नको असतील असें कां म्हणूं नये ? अथवा हिंदुस्थानांत आमचे पूर्वज फार दिवस चकमकीनें विस्तव पाडीत होते. म्हणून, नुसत्या करांगुलीचा स्पर्श करून निमिषार्धांत सर्व घरांत लखलखाट करून सोडण्याची ऐपत असतां तंबाकूच्या बटव्याच्या कप्प्यांत ठेवलेली चकमक बाहेर काढून सांजवात करणें हेंच हल्लींहि आम्हांला आवडेल, असेंहि कां म्हणूं नये ? पण प्रजासत्तेच्या प्रकाराचा हा गहन विषय बाजूस ठेविला तरी निदान सत्ताभिलाषी इंग्रज प्रजेइतकें तरी राजदर्शन आम्हांस प्रिय आहे, व त्यांतल्या त्यांत चिरपूर्वसंस्कारानें तर राजदर्शन हें आम्हांस इंग्रज प्रजेपेक्षांहि अधिक प्रिय आहे हें कोणासहि नाकबूल करितां येणार नाहीं. पौर्वात्य देशांत प्रातिनिधिक राजसत्ता नव्हती असा दोष काढणारांनीं, त्या देशांत राजा व प्रजा यांचे संबंध पूर्वी किती निकट असत हें आठवून इकडील राजसंस्थेचा जरूर तो गुण तरी घ्यावा ! मोंगल बादशहा सुलतान तर खरेच, पण खुद्द राजाच्या जनानखान्यांतहि ऐकूं जाणाऱ्या सोनेरी सांखळीचें टोंक दिल्लीच्या राजमहालाच्या देवडीवर लोंबत असे; आणि ज्या कोणा प्रजाजनाला निर्वाणीचा उपाय म्हणून बादशहाची भेट घेणें जरूर वाटेल त्यानें ती सांखळी हातानें ओढावी म्हणजे त्याला राजाचें दर्शन घडे. ही केवळ कविकल्पना नसून इतिहासकारानें ती नमूद केली आहे, यावरून तिच्यांत कांहीं तरी सत्याचा अंश असेलच असेल; व या गोष्टीवरून खचित कांहीं तरी बोध घेतां येण्यासारखा आहे. हिंदु राजांमध्यें तर सुलतानी तऱ्हा एकंदरीनें कमीच. अर्थात् हिंदु राजांच्या अमदानींत प्रजेला राजदर्शन अधिक सुलभ होतें. रघुवंशाच्या पांचव्या सर्गांत, रघूनें पदरचें सर्व द्रव्य खर्चून विश्वजियज्ञ समाप्त केल्यानंतर त्याजकडे वरतंतु ऋषीचा कौत्स नांवाचा शिष्य गुरुदक्षिणेला द्रव्य मागण्याकरितां गेला, तेव्हां राजानें त्याची समक्ष भेट घेऊन जे निरनिराळे प्रश्न विचारले त्यांचें वर्णन कालिदासानें दिलें आहे. त्या प्रसंगाची या बाबतींत आम्हांस तर आठवण होते. "आपले गुरुजी बरे आहेतना ? त्यांचें तप कसें काय चाललें आहे ? आळीं घालून मुलांसारख्या वाढविलेल्या तुमच्या आश्रमपादपांना वाऱ्याचा त्रास होतो काय ?

आपल्या नित्यनैमित्तिक कर्मांना अवश्य असूनाहि जी हरळी हरिणांना प्रिय म्हणून केवळ भूतवत्सलतेमुळें आपले गुरुजी कधीं तोडीत नाहींत, त्या हरळीवर व्यालेल्या हरिणींच्या कोंवळ्या पाडसांना कोणी त्रास तर देत नाहींना ? ज्याच्या वाळवंटावर राजाला देण्याचें साहाव्या हिश्शाचें धान्य खुशाल पडून राहिलें आहे, अशा तुमच्या तीर्थजलांच्या स्वच्छतेला कांहीं विघात तर झाला नाहीं ना ! तुमच्या शेतांभातांना पशूंचा उपद्रव होत नाहीं ना ?"–वगैरे प्रश्न विचारून रघूसारख्या दिग्विजयी सम्राटानें केवळ याचकरूपानें आलेल्या एका पोरक्या पोराचा परामर्ष घेतला, वगैरे वर्णनांत थोडी अतिशयोक्ति असली तरी त्यावरून हिंदु समाजाच्या मनांत मुरलेली राजा व प्रजा यांच्या संबंधाची कल्पना उत्कृष्ट रीतीनें व्यक्त होत नाहीं काय ?

तात्पर्य, राजनिष्ठेचें जुनेंपुराणें वळण अंगीं असलेल्या आम्हा आजच्या हिंदी प्रजाजनांनाहि वारंवार राजदर्शन घडून त्याच्या योगानें मिळणारा ओलावा व शितळाई राजेसाहेबांनीं द्यावयास नको काय ? सर्व प्रकारची माया सहवासानेंच लागते. श्रीमंत लोकांत आईबापांचा व मुलांचा सहवास गरीबापेक्षां थोडा कमी असतो; तथापि केवळ त्यामुळें आईबापांना मुलांचा जिव्हाळा नसतो असें नाहीं हें खरें. पण प्रसूतिसमयीं एखाद्या आईचे डोळे बांधून तिचें मूल उपजतांच दूर नेलें व जन्मांत तिची त्याची गांठ पडूं दिली नाहीं, तर 'हा तुझा मुलगा–ही तुझी आई' असें सांगितल्यानें त्यांच्या मनावर कांहींएक परिणाम होणार नाहीं. आईला फार झालें तर आपली कुस वांझोटी नव्हती एवढेंच समाधान होईल, व मुलाला आई या नात्याचें आपलें कोणी एक मनुष्य आहे असें वाटेल. पण सहवासानें मनांत उचंबळणारा प्रेमाचा पूर येणार नाहीं. इंग्लंडांतील राजे व हिंदुस्थानांतील प्रजा यांचा संबंध आजपर्यंत तरी अशाच नुसत्या 'नात्याचा' होता. पण राजेसाहेबांच्या आगमनानें या शुष्क नात्याच्या संबंधांत प्रेमाचा थोडासा ओलावा येऊं लागेल हें उघड आहे. हिंदुस्थानांतील 'ब्युरॉक्रसी' चें आम्हांवर प्रेम आहे, पण तें वर दूध घालणाऱ्या दाईसारखें आहे. अर्थात् खुद्द राजाला आपल्या प्रजेबद्दल प्रत्यक्ष दर्शनानें फुटणाऱ्या पान्ह्याचे आम्ही प्रजाजन भुकलेले आहों; आणि म्हणून आम्हांस तर असें वाटतें कीं राजेसाहेबांनीं वरचेवर हिंदुस्थानांत यावें एवढेंच नव्हे तर, कोट्यावधि प्रजाजनांपैकीं पांचपन्नासहि खासगी प्रजाजनांशीं विश्रब्धपणें न बोलतां चालतां चार दोन दिवसांतच राजेसाहेबांची स्वारी हल्लीं जी परत जाणार, तसें न होतां त्यांनीं अधिक दिवस इकडे राहावें, अधिक लोकांच्या गांठी घ्याव्या,

व केवळ बगदादचा खलीफ हरून-अल-रसीद किंवा अवंतीचा राजा विक्रम यांच्याप्रमाणें त्यांस गुप्त वेषानें लोकस्थिति पाहण्याकरितां स्वतः शहरांत हिंडणेंच अशक्य असलें तरी त्यांच्या सुखदुःखांची अधिक बारकाईनें चौकशी करावी. ईश्वर करो आणि राजेसाहेब व राणीसाहेब यांस चिरायुरारोग्य प्राप्त होऊन हिंदी प्रजेची ही इच्छा सफल करण्याची स्फूर्ति त्यांस होवो !

---

## ९ दिल्लीचा बादशाही दरबार

( ता. १२ डिसेंबर १९११ )

### ( दिल्लीचा ऐतिहासिक चित्रपट )

ता. १२ डिसेंबर १९११ हा दिवस हिंदुस्थानच्या इतिहासांतील अत्यंत महत्त्वाच्या दिवसांपैकीं एक मानिला जाईल. कारण या देशांत गेलीं तीन शतकें उदयास येत असलेल्या एकछत्री राजसत्तेच्या प्रतिनिधीचा सिंहासनाधिष्ठानसमारंभ आजच्या दिल्लीदरबारानें होणार आहे. इतिहास आणि काळ यांची समव्याप्ति असल्यामुळें इतिहास प्रतिक्षणीं एक एक पाऊल पुढें टाकीतच असतो. पण रस्त्यानें होणारा प्रवास मोजायला जसे मैलाचे दगड, जप मोजायला जसे माळेचे मणी, किंवा काळ मोजायला जसे घड्याळाच्या तबकडीवरील अंक तसे इतिहासगणनेला लोकोत्तर राष्ट्रीय प्रसंग उपयोगीं असतात. या दृष्टीनें पाहातां सन १८५८ सालीं हिंदुस्थानचा राज्यकारभार इंग्रजी पार्लमेंटानें आपणाकडे घेतल्याचा कायदा व राणीचा जाहीरनामा हा या शतकांतील असला पहिला, आणि आजचा दरबार हा दुसरा लोकोत्तर प्रसंग होय. १७५७ ची प्लासीची लढाई ही जशी लष्करी दृष्टीनें, १८५८ चा कायदा हा जसा राज्यघटनेच्या दृष्टीनें, तसाच १९११ चा दिल्ली दरबार हा राजा आणि प्रजा यांच्या दरम्यानच्या खास नात्याच्या दृष्टीनें इतिहासकारांच्या ताम्रपटांवर खोदून ठेवण्यासारखा प्रसंग होय. प्लासीस जें बीज १७५७ सालीं पेरलें गेलें, त्याला १८५८ सालीं अंकुर फुटले; आणि आजच्या दरबारानें त्या अंकुरापासून झालेल्या वृक्षाला फुलें आलीं. यापुढची पायरी म्हणजे ब्रिटिश साम्राज्यांतील इतर भागांप्रमाणें हिंदुस्थानाला स्वराज्य मिळून त्याच वृक्षाला फळ येणें ही होय. हें फळ हिंदुस्थानानें चाखण्याच्या वेळेपर्यंत जगण्याइतका दीर्घ आयुर्दाय आज जिवंत असलेल्या कोणाहि मनुष्यास मिळणें हें ईश्वरी नियमा-

प्रमाणें बहुधा अशक्यच आहे. भीष्म जसे उत्तरायणाची वाट पहात शरपंजरीं पडले होते, त्याप्रमाणें स्वदेशाच्या राष्ट्रीय स्वातंत्र्याचा उदय पाहण्याकरितां घोटाळणारा जीव—तो भीष्माचार्याप्रमाणें इच्छामरणी नसल्यानें—ती प्रिय गोष्ट घडून येईपर्यंत धरून राहणें कोणाहि देशाभिमानी मनुष्यास शक्य नाहीं. म्हणून त्याला त्या भावी गोष्टीची मनानें नुसती कल्पना करून समाधान मानणें प्राप्त आहे. पण मागील पिढीच्या वैभवाच्या आठवणीइतकीच भावी पिढीच्या वैभवाची आकांक्षा मनुष्यमात्रास प्रिय असते. जॉर्ज बादशहांची हिंदुस्थानच्या भावी वैभवाची कल्पना कदाचित् आमच्या कल्पनेसारखीच तंतोतंत नसेल; परंतु ज्या सहानुभूतीचें मर्यादाक्षेत्र अधिकाधिक वाढत जावें असें राजपुत्र या नात्यानें त्यांनीं १९०६ सालीं बोलून दाखविलें, व ज्या वाढत्या अंगाच्या सहानुभूतीचा उल्लेख त्यांनीं राजा व बादशहा या नात्यानें परवां मुंबईस फिरून एकवार केला, त्या सहानुभूतीची अंतिम परिणति आम्ही प्रजाजन म्हणतों त्या प्रकारच्या राष्ट्रीय स्वातंत्र्यांत झालीच पाहिजे, हें थोड्याशा विचाराअंतीं राजेसाहेबांसहि कळून येण्यासारखें आहे. आणि हें राष्ट्रीय स्वातंत्र्य हिंदुस्थानास मिळालेलें त्यांना स्वतःला दिसणें शक्य नसलें तरी, राजांच्या पिढीचा सांधा खासगी व्यक्तींपेक्षांहि अधिक बेमालूम जडत असल्यामुळें आज ज्या सहानुभूतीनें त्यांचें अंतःकरण इतकें व्यापलें आहे तिचें अंतिम कार्य त्यांना, त्या वेळीं इंग्लंडच्या गादीवर असलेल्या वंशजांच्या द्वारें, अनुभवावयास सांपडेल यांत संशय नाहीं. येवढी प्रस्तावना करून बादशाही दिल्ली शहराच्या ऐतिहासिक चित्रपटाकडे आपण क्षणभर नजर टाकूं.

## कुरुक्षेत्राचें महत्त्व

भरतखंडाचा अतिप्राचीन काळापासून आजपर्यंतचा इतिहास व्यापक व स्थूल दृष्टीनें पाहणारांच्या डोळ्यांपुढून या देशांतील कांहीं स्थलें न हालतां सदैव कायमचींच नजरेंत भरलेलीं असतात. भरतखंडाच्या उत्पत्तीपासून पश्चिमेस सिंधुसरस्वती नद्यांचा व पूर्वेस गंगायमुना नद्यांचा प्रवाह जसा अखंड चालूच राहिला आहे, त्याप्रमाणें स्यमंतपंचम ऊर्फ कुरुक्षेत्र, पानपत, हस्तिनापूर, दिल्ली ह्या टापूच्या ऐतिहासिक महत्त्वाचा ओघहि आजतागायत अखंड वाहत आला आहे. भरतखंडांतील बहुतेक सर्व स्वकीय परकीय सार्वभौमांचें वसतिस्थान

या टापूनजीकच असून, या देशाची ऐतिहासिक भवितव्यता निश्चित करणारे आजपर्यंतचे सर्व युद्धसंग्राम याच पुरातन रणभूमिवर झालेले आहेत. भरतभूमीचें रक्षण करण्याऐवजीं स्वतःच्या दुष्कृत्यांनीं भूभार झालेल्या उन्मत्त व मदांध क्षत्रियांस व राजांस मारून परशुरामानें त्यांच्या रक्ताचे पांच मोठे डोह ह्या 'स्यमंतपंचकांत' च निर्माण केले होते; व पुढें ह्याच डोहांचीं तेथें ऋषींच्या आशीर्वादानें पवित्र तीर्थें झालीं! कुरुराजानें या स्थलीं केलेल्या महान् तपश्चर्येच्या पुण्यानें या स्थलास कुरुक्षेत्र हें पावित्र्यदर्शक नांव मिळालें. याच कुरुक्षेत्रांत पुढें चंद्रवंशीय व पुरुकुलोत्पन्न हस्तिराजानें जगप्रसिद्ध हस्तिनापूर नगर वसविलें. या नगराच्या स्थापनेसंबंधानें व नांवाच्या उत्पत्तीसंबंधानें एक निराळीच गोष्ट पुराणांतरीं आढळते. ससा शिकारी कुत्र्यांचा पाठलाग करतांना ज्या जागेवर दिसला ती यशस्वी समजून जसा पुण्यांतील शनवारचा वाडा तेथें बांधण्यांत आला, तसाच एक चमत्कार पुरातन काळीं दृष्टोत्पत्तीस आल्यानंतर हस्तिनापूर नगर वसविण्यांत आलें. अत्रिपुत्र सोमऋषि वनांत हिंडत असतां एकेस्थळीं, एका पक्ष्यानें झपाट्यानें येऊन एका प्रचंड हत्तीस उचलून भरारीसरशीं आकाशांत नेल्याचें त्यास दिसलें. अर्थात् ही भूमि यशस्वी मानून तेथें त्यानें नगर वसविलें व त्यास 'हस्तिनापूर' हें नांव ठेवलें. ह्याच हस्तिनापुरांत पुरुवंशीय राजे अखेरपर्यंत राज्य करीत असून कौरवपांडवांच्या भाऊबंदकीचे तंटे व अखेरचें संहारक भारतीय युद्ध याच नगरांत व नजीकच्या कुरुक्षेत्रांत झालें. धृतराष्ट्र—पांडुराजापर्यंत कुरुदेशाची व पुरुवंशाची राजधानी येथेंच होती. परंतु कौरव व पांडव यांच्या भाऊबंदकीचें, लहानपणच्या खोड्या व कुचेष्टा हें, स्वरूप जाऊन त्यास द्वेषाचें व हाडवैराचें स्वरूप येऊं लागलें, तेव्हां हस्तिनापूरचे जोडीस इंद्रप्रस्थ नांवाचें नवें नगर वसलें. पांडव सर्व संकटांतून निभावून आणि द्रुपदराजाशीं शरीरसंबंध करून हस्तिनापुरास परत आल्यावर उभयतांची भाऊबंदकी सान्निध्यानें विकोपास जाऊं नये, म्हणून धृतराष्ट्रानें पांडवांस अर्धें राज्य तोडून दिलें; व हस्तिनापुरच्या नैऋत्येस ५० मैल दूर असलेल्या खांडव वनांत नवें नगर वसविण्याची त्यांस परवानगी दिली. इंद्रप्रस्थ ऊर्फ अर्वाचीन दिल्ली या शहराचा पाया याप्रमाणें भाऊबंदकीवर उभारल्यामुळेंच कीं काय, आजपर्यंतच्या इतिहासांत बहुतेक प्रसंगीं तिजवर असल्याच भाऊबंदकीमुळें अनेक विपत्ती आल्या आहेत.

## इंद्रप्रस्थाची स्थापना

पांडवांच्या या इंद्रप्रस्थ नगराच्या संबंधानें जें वर्णन महाभारतांत दिलें आहे त्याकडे ऐतिहासिक दृष्टीनें पाहतां त्यांतून पुढील हकीकत निष्पन्न होते. ह्या खांडव वनांत त्या वेळीं असुर नांवाच्या राक्षस जातीची व तक्षक नांवाच्या नाग जातीची बरीच वस्ती होती. या वनाचा एका बाजूचा भाग रान तोडून मोकळा केल्यावर तेथें पांडवांनीं आपलें नगर वसविलें, व त्यास प्रारंभीं खांडवप्रस्थ असें नांव दिलें. या नगराचे भोंवतीं त्यांनीं समुद्रप्राय खंदक खणले व गगन-चुंबित तट उभारले! पंख पसरलेल्या गरुडाकार वेशी, बुरूज व गोपुरें यांजवर नगरसंरक्षणार्थ अनेक शक्ति, शतघ्नी वगैरे शस्त्रास्त्रें चढवून ठेविलीं. नगराबाहेर अनेक बागबगीचे, राया, लताकुंज, कृत्रिम पर्वत वगैरे विहारस्थळें व पुष्करिणीहि त्यांनीं तयार केल्या. अशा प्रकारचें उत्कृष्ट नगर व तेथील युधिष्ठिराची न्यायी राजसत्ता पाहून देशोदेशांचे व्यापारी, कारागिर व विद्वान् ब्राह्मण तेथेंच येऊन राहूं लागले. या नगराचें वैभव व विस्तार इतका वाढला कीं, तेथील रहिवाशांस ही दुसरी इंद्राची अमरावतीच वाटे; आणि म्हणून त्यांनीं आपल्या नगरास अभिमानपूर्वक इंद्रप्रस्थ ( हल्लींचें इंद्रपत–ऊर्फ पुराणाकिल्ला–हा सांप्रतच्या दिल्लीचे दक्षिणेस दोन मैलांवर आहे. ) हें नांव दिलें. पण इंद्रप्रस्थ नगराच्या वाढत्या वैभवास व विस्तारास नगराची संकुचित मर्यादा पुरेनाशी झाली. सांप्रतकाळीं देशाची संपत्ति व लोकसंख्या वाढूं लागली म्हणजे त्याची गर्दी मोडण्यासाठीं जशी परदेश जिंकून वसाहती निर्माण करण्याची अवश्यकता उत्पन्न होते, तसाच प्रकार इंद्रप्रस्थासंबंधानें झाला. नगरानजीकचें सबंध खांडववनच मोकळें करून तेथें वसती करण्याची जरूर पांडवांस भासूं लागली. ह्या वनांत वरचेवर मोठमोठे वणवे पेटून त्याचा बराच भाग पूर्वीं मोकळा होत असे पण पुनः पाऊस पडून तेथें दाट जंगल वाढे. इंद्रप्रस्थनगर स्थापन झाल्यानंतर सात वेळां याप्रमाणें खांडव वनांत मोठमोठे वणवे पेटले, पण सातहि वेळां पुनः तेथें अरण्य वाढलें. अखेर पांडवांनीं सर्वच वन, वणवे पेटले असतां, जास्त पेटवून देऊन तेथें पुनः जंगल वाढूं द्यावयाचें नाहीं असा बेत केला. ही कामगिरी मुख्यतः श्रीकृष्णार्जुनांकडे देण्यांत आली. त्यांनीं पंधरादिवसांत सर्व खांडव वन जाळून टाकून मोकळें केलें. अर्थात् त्या वनांतील तक्षकांची व असुरांची बहुतेक वस्ती या अग्निप्रळयांत सांपडून नाहींशी

झाली, उरलीसुरली कृष्णार्जुनांच्या बाणांस बळी पडली. तक्षक राजा व त्याचा पुत्र अश्वसेन आणि असुरांचा कुशल शिल्पी मयासुर यांचे मात्र प्राण या अग्निप्रळयांतून वांचले. यापैकीं पहिले दोघे कुरुक्षेत्रांत जाऊन राहिले व मयासुर आपल्या या नव्या प्राणदात्या यजमानांचे नोकरीस राहिला.

## दिल्लींतील पहिला राजवाडा

जाळून टाकल्यामुळें मोकळ्या झालेल्या ह्या खांडव वनांत आपणांसाठीं एक उत्कृष्ट व प्रचंड सभा–म्हणजे राजवाडा–प्रथमतः बांधवावा, असें पांडवांनीं ठरविलें. तें काम करण्यास अर्थातच मयासुर एका पायावर तयार झाला; व त्यानें या कामीं आपल्या असुरी शिल्पविद्येचा व असुरांच्या संपत्तीचा पांडवांसाठीं पूर्ण उपयोग केला. हिमालय पर्वताचे पलीकडे कैलासाचे उत्तरेस मैनाक पर्वतानजीकच्या बिंदु सरोवराजवळ वृषपर्वा नामक असुर राजानें मोठा यज्ञ करून राजवाडे बांधले होते; तेथें पांडवांच्या राजवाड्यांस उपयोगी पडतील अशा अनेक उत्कृष्ट शिला, रंग, चूर्णें वगैरे सामुग्री व सोनें वगैरे खनिज संपत्ति होती. ती सर्व तेथें जाऊन मयासुरानें इंद्रप्रस्थास आणली आणि नुकत्याच जाळलेल्या खांडव वनामध्यें त्यानें या असुरांच्या सामुग्रीचा उपयोग करून १४ महिन्यांत १०।१० हजार हात लांबीरुंदीचा अत्युत्कृष्ट राजवाडा पांडवांसाठीं बांधला! या राजवाड्याच्या भिंती, खांब, तट, कमानी वगैरे सर्व रत्नांनीं मढविलेलीं होतीं. राजवाड्यांत ठिकठिकाणीं अनेक चित्रें, व केवळ प्राण मात्र नाहीं इतके हुबेहूब केलेले पुतळेंहि ठेवले होते. राजवाड्याच्या आवारांत मयासुरानें अनेक रत्नांनीं बनविलेलें कृत्रिम सरोवर तर अत्यंत आश्चर्यकारक होतें. ह्या राजवाडा बांधण्यासाठीं बिंदु सरोवराजवळून आणलेले ८००० राक्षस मयासुरानें या राजवाड्याचे संरक्षणासाठींच ठेवून घेतले. मयासुराच्या ह्या अद्वितीय कौशल्याचें चीज करण्याचे हेतूनें पांडवांनीं उदारपणें या राजवाड्यास 'मयासभा' असेंच नांव दिलें. या मयसभेचा प्रथम–प्रवेशसमारंभ अत्यंत थाटाचा झाला. त्या समारंभास तपोनिष्ठ ऋषी, व विद्वान् ब्राह्मण यांजबरोबरच आतांप्रमाणें क्षत्रिय राजे, आाणि नामांकित मल्ल, नट, गवई वगैरे तमासगीर मंडळीहि जमली होती.

## दिल्लींतला पहिला राज्याभिषेक

पांडवांच्या ह्या अफाट इंद्रप्रस्थ नगरींत व मयनिर्मित राजवाड्यांत लवकरच

राजसूय व अश्वमेध हे यज्ञ झाले. त्यांचें विस्तृत व आश्चर्यकारक वर्णन महाभारतांत असून तत्कालीन भरतखंडाच्या वैभवाचा व संपत्तीचा त्यावरून सहज अंदाज बांधतां येतो. भरतखंड व नजीकचे देश यांतील राजांवर दिग्विजय करून पांडवांनीं आपलें वर्चस्व स्थापन केल्यावर हे सर्व राजे अमूल्य करभारासह या यज्ञसमारंभास आले, तेव्हां हस्तिनापूर किंवा इंद्रप्रस्थ नगरांत सबंध जंबुद्वीपांतीलच संपत्ति व वैभव एकवटलेलें आहे, असा भास होत असे! राजांनीं आणलेल्या नजराण्यांत व त्यांचेबरोबरहि अनेक बहुमूल्य रत्नें, सोन्याचीं नाणीं, भांडीं व अलंकार, रत्नखचित व हस्तिदंती मुठीच्या आणि आकाशाप्रमाणें नीलवर्ण तरवारी, जडावाचीं चिलखतें, उत्तम शृंगारलेले रथ, बारीक व तलम अशीं रेशमाचीं व लोंकरीचीं वस्त्रें, भरजरी झुली घातलेले हत्ती व हत्तिणी, बाल्हिक (बाल्क), आनर्त (काठेवाड) व वनायु (इराण) या देशाचे जगप्रसिद्ध घोडे, वगैरे केवळ वर्णनें वाचणाराहि त्या काळच्या वैभवानें दिपून जातो. भारतीय युद्ध संपून सर्व भरतखंड निष्कंटक झाल्यावर धर्मराजानें हस्तिनापुरांत केलेला नगरप्रवेश, व त्यानंतर त्यास झालेला राज्याभिषेक याचेंहि सुंदर वर्णन महाभारतांत आढळतें. या नगरप्रवेशाचे वेळीं युधिष्ठिरासाठीं नवीन रथ तयार केला असून तो तलम लोंकरीचीं वस्त्रें व मृगाजिनें यांनीं मढविला होता; व त्यास सोळा पांढरे बैल जुंपले होते. मिरवणुकींतून जाणाऱ्या या रथाचें सारथ्य भीम करीत होता. अर्जुनानें धर्माच्या मस्तकावर तारांकित शुभ्र राज्यछत्र धरलें होतें; आणि नकुलसहदेव चामरें उडवीत होते. या रथाचे मागून युयुत्सु व श्रीकृष्ण जात असून त्यांचे मागें पालखींतून धृतराष्ट्र व गांधारी वगैरे राजस्त्रिया चालल्या होत्या. त्यांचे मागून क्रमानें अनेक रथ, हत्ती, पायदळ, व स्वार असे चालले होते. नगराचे वेशींत पाण्यानें भरलेले नवे असे मंगलसूचक कुंभ ठेवले होते; व पांडवांचे स्वागतार्थ ठिकठिकाणीं सुंदर व कुलीन कुमारिका उभ्या होत्या. धर्माचे स्वागतार्थ नागरिकांनीं नगर व राजरस्ते पांढऱ्या फुलांच्या माळा व पताका यांनीं शृंगारले असून मधून मधून सुगंधित धूपहि जळत होते. पांडवांचा रथ नगरांत येतांच चंद्रोदयाचे वेळीं समुद्राच्या लाटा उसळतात त्याप्रमाणें राजरस्त्यांत जनसमुदाय उसळत होता; व भोंवतालचीं घरें स्त्रीपुरुषांच्या भारानें कांपत होतीं! स्त्रियांचें लक्ष अर्थात् वैभवशाली द्रौपदीकडेच विशेष ओढलें होतें. मिरवणूक आटोपल्यावर युधिष्ठिराचा राज्या-

भिषेकसमारंभ झाला. त्यावेळीं धर्मराजा पूर्वाभिमुख असलेल्या सुवर्णसिंहासनावर बसला; त्यांच्या दोहों बाजूंस भीमार्जुन बसले असून समोर श्रीकृष्णादि यादववीर होते; कुंती व नकुलसहदेव एकीकडे होते व दुसरीकडे धृतराष्ट्र विदुरादि अवशिष्ट कौरवपक्षीय मंडळी बसली होती. प्रथमतः धर्मानें पांढरीं फुलें, अक्षता, भूमि, सोनें, रुपें व माणकें यांस हस्तस्पर्श केला. नंतर प्रधान व मंत्री यांनीं राजाजवळ जाऊन त्यास नमस्कार केल्यावर व्याघ्रचर्मानें मढविलेल्या व मजबूत अशा अष्टकोनी सर्वतोभद्र आसनावर युधिष्ठिर व द्रौपदी ह्रीं येऊन बसलीं. त्यांनीं राज्याभिषेकविधीप्रमाणें होम केल्यानंतर श्रीकृष्णांनीं स्वतः उठून कुरुक्षेत्र दणदणविलेल्या आपल्या पांचजन्य शंखांतील उदकानें त्यांस राज्याभिषेक केला. शंखांतून अभिषेकाच्या धारा पडूं लागतांच दुंदुभी वगैरे वाद्यांचा एकच गजर होऊन त्या योगानें धर्मास राज्याभिषेक झाल्याचें वृत्त राजवाड्याबाहेरच्या सर्व लोकांस विदित झालें.

## आर्य राजनीतीचा मासला

महाभारतांतील वर्णनावरून त्या काळचें दिल्ली शहर, तेथील राजांचें वैभव, नगरप्रवेश व राज्याभिषेकसमारंभ आणि राजसूय–अश्वमेधादि मोठे प्रसंग यांची जशी ओळख होते, तशीच त्याकाळच्या राजनीतीची व राजांच्या कर्तव्याचीहि माहिती देणारे अनेक भाग महाभारतांत वर्णिले आहेत. त्या सर्वांचा परामर्ष घेणें या लेखांत शक्य नाहीं व जरूरहि नाहीं. परंतु मयसभा निर्माण झाल्यानंतर लवकरच तेथें नारद आले; त्यांनीं धर्मराजास प्रश्नरूपानें जी उत्तम राजनीति उपदेशिली आहे, ती कोणच्याहि प्रसंगीं पाहाण्यासारखी आहे! किंबहुना, नारदांच्या ह्या ‘कच्चित्प्रश्ननीती’–रूपानें हिंदुस्थानांतील उत्तम राजनीति व राजनिष्ठा जगांतल्या सर्वच राजांस पुनः प्रश्न विचारीत आहे, असा ही नीति वाचणारांस भास झाल्यावांचून रहात नाहीं. नारदांची ‘कच्चित्प्रश्ननीति’ सर्व देशच्या व सर्व कालच्या राजांस व राज्यकर्त्यांस पुढील आशयाचे प्रश्न करीत आहे:—

“ राजाचें राज्य टिकण्यास धर्म व अर्थ या दोहोंचेंहि बळ पाहिजे असतें. राजानें अर्थाविषयीं लोभ धरून धर्म बुडवूं नये; धर्माकडे लक्ष देऊन अर्थाकडे दुर्लक्ष करूं नये; किंवा तात्कालिक सुखावर लुब्ध होऊन धर्म व अर्थ ह्या दोन्हींविषयीं उदासीन बनूं नये. राजा, तूं असाच वागत आहेसना?

तुझे राज्याधिकारी पुरुष ऐश्वर्यमदानें धुंद व कर्तव्यपराङ्मुख होऊन स्वतःच्या व तुझ्या भावी नाशास कारणीभूत होत नाहींत ना ?

विजयो मंत्रमूलो हि राज्ञां भवति भारत !

राजाचा विजय त्यांस जो सल्ला मिळेल त्यावरच अवलंबून असतो; तर तुझे सल्लागार–मंत्रि वृद्ध, कुलीन, सदाचरणी, स्वामिनिष्ठ असेच आहेतना ? कृषिकर्म, व्यापार वगैरे थोड्या भांडवलावर होणाऱ्या व पुढें जास्त नफा मिळवून देणाऱ्या धंद्यांस तूं उत्तेजन देतोसना ? निदान हे व्यवसाय करणारास तूं अडथळे तरी करीत नाहींसना ? तुझ्या राज्यांतील आचार्य म्हणजे गुरु–सर्व कुमारांना–तरुण पिढीला–सर्व विद्या–विशेषतः धनुर्विद्या शिकवून वीर बनवीत आहेतना ? शत्रूच्या गुप्त बातम्या काढण्यास गुप्त हेर अवश्य ठेवलेच पाहिजेत; पण आपले अधिकारी प्रजेस पाळतात, कीं गांजतात, हें पाहण्यासाठीं आपल्या प्रत्येक अधिकाऱ्यांचे मागें तूं तीन तीन गुप्त हेर ठेवले आहेसना ?

कच्चिन्नोग्रेण दंडेन भृशमुद्विजसे प्रजाः ।

वरचेवर कडक शासन करून तूं प्रजेला उद्विग्न व असंतुष्ट करीत नाहींसना, ‘ उग्रप्रतिग्रहीता ’–‘ जबर कडकपणें वसूल करणारा ’ अशीं नांवें तुला लोक ठेवीत नाहींतना ? युद्धांत पराभूत करून एकदां जिंकल्यावर मग जिंकलेल्यांना तूं पुत्रवत् मानीत आहेसना ? सर्व प्रजाजनांशीं सारखा वागून ते आपल्या कुटुंबांतलेच आहेत असें तूं मानतोसना ? राजा हा आपला मातापिताच आहे, असें प्रजाजनांस वाटत आहेना ?

कच्चिदायस्यचार्धेन चतुर्भागेन वा पुनः ।
पादभागैस्त्रिभिर्वापि व्ययः संशोध्यते तव ॥

स्वस्ताईचे वेळीं उत्पन्नाचा $\frac{1}{4}$, मध्यम स्थितींत उत्पन्नाचा $\frac{1}{2}$ व दुर्भिक्षाचे वेळीं उत्पन्नाच्या $\frac{3}{4}$ चे आंत तुझ्या राज्याचा खर्च आहेना ? तूं राष्ट्रास पीडा देत नसून तुझे शेतकरी संतुष्ट आहेतना ?

कच्चिद्राष्ट्रे तडागानि पूर्णानि च बृहंति च ।
भागशो विनिविष्टानि न कृषिर्देवमातृका ॥

मोठमोठे व पाण्यानें भरलेले तलाव शेतांस पाणी देण्यासाठीं तूं योग्य अंतरानें बांधले आहेसना ? आकाशांतून देव पाऊस पाडतील तेवढ्यावरच तुझ्या राज्यांतील शेती अवलंबून नाहींना ? तुझ्या राज्यांतल्या शेतकऱ्यांजवळचा

भरपूर पोटगी व बीं-बियाणें कमी कमी होत नाहींतना ? कारागिरांस लागणारें भांडवल व धंद्याचीं हत्यारें वगैरे साधनें तूं त्यांस चार चार महिन्यांनीं पुरवितोसना ? तूं व तुझे अधिकारी; लोभ, मोह किंवा अभिमान यांस वश होऊन रयतेस न्याय देण्याकडे दुर्लक्ष करीत नाहींतना ? तुझ्या कृत्यामुळें प्रजेंत दुःख किंवा क्रोध उत्पन्न होत नाहींना ? खरोखर निष्पाप, कुलीन व सदाचरणी अशा पुरुषांवर खोटे आरोप येऊन त्यांस तुझे राज्यांत विनाकारण शासन झालेलें नाहींना ? "

नारद-नीतीनें विचारलेल्या या व इतर प्रश्नांस आत्मविश्वासपूर्वक प्रामाणिकपणें जो राजा 'होय' असें उत्तर देऊं शकेल किंवा 'एवं करिष्यामि यथा त्वयोक्तम्' असें वचन देऊन नंतर 'उक्त्वा तथाचैव चकार राजा,' असें वागणाऱ्या युधिष्ठिराचें अनुकरण करील त्याचे राज्यास काळाचीहि भीति बाळगावयास नको.

## दिल्लीचे जुने हिंदु राजे

पांडवांच्या अमदानींत दिल्ली शहर अर्थातच विशेष भरभराटीस चढलें; व पुढेंहि पांडवांनंतर 'पुरोत्तम' म्हणजे सर्व नगरांमध्यें श्रेष्ठ अशी त्या शहरची ख्याति इतिहासपुराणांतरीं चालत आलेली होती. पांडवांनंतर यादव वंशाची एक शाखा दिल्ली येथें राज्य करीत होती. अनिरुद्धाचा मुलगा वज्र याला दिल्ली येथेंच राज्याभिषेक झाल्याचा उल्लेख आहे. पौराणिक काल आणि ऐतिहासिक काल यांच्या दरम्यानच्या मंद संधिप्रकाशांत इतर अनेक गोष्टींप्रमाणें दिल्लीचा वृत्तांतहि लोपून गेलेला आहे. ऐतिहासिक कालाच्या प्रारंभीं दुसऱ्या शतकांत धाव नामक राजा दिल्लीस राज्य करीत असून हल्लीं त्याचा एक जयस्तंभ तेथें आहे. अकराव्या शतकांत दिल्लीस अनंगपाळ नांवाचा क्षत्रिय राजा राज्य करीत होता हेंहि निश्चित आहे; व येथपासून पुढें झालेले निरनिराळे राजवंश व त्यांतील प्रसिद्ध पुरुष यांची सर्व संगति लागते-किंबहुना ही संगति पटविणाऱ्या इमारती अद्यापि दिल्लीस उभ्या असून प्रत्यक्ष पहाण्यास सांपडतात. दहाव्या शतकापूर्वीचीं हिंदु राज्यें दक्षिणेस मथुरेकडे व पूर्वेस गंगा नदीच्या कांठीं पसरलीं होतीं. या वेळीं दिल्लीच्या पूर्ववैभवाचा कांहीं कालापर्यंत लोप झाला असवा, व पुढें दक्षिणच्या राज्यांची अवनतीची पाळी येऊन दहाव्या शतकाच्या सुमारास दिल्लीस फिरून वैभव येत चाललें असावें. इ. स.

१०५२ सालीं अनंगपाळानें, हल्लींच्या कुतूबमिनारच्या जागेवर असलेला किल्ला बांधला, आणि मथुरेस असलेला चंद्रगुप्त विक्रमादित्याचा जयस्तंभ तेथून काढून आणून दिल्लीस या किल्ल्याशेजारीं रोविला तो अजूनहि पहाण्यास मिळतो. अनंगपाळाच्या वंशानें सुमारें १०० वर्षें राज्य केल्यावर विशाळदेव नामक अजमीर येथील चव्हाण राजानें दिल्लीस राज्य स्थापलें. याचाच नातू प्रसिद्ध पृथ्वीराज चव्हाण हा होय, व कुतुबमिनारच्या लगत आजहि ज्याचे प्राकार दिसतात, ते हल्लींच्या दिल्लीपासून सात आठ मैलांच्या अंतरावरचें जुनें दिल्ली शहर यानेंच वसविलें. याच पृथ्वीराज चव्हाणानें महमद् घोरी याचा प्रथम सरस्वती नदीच्या तीरीं पराभव केला. परंतु दुसऱ्या खेपेस महमद् घोरीकडून त्याचा पराभव झाला. महमद् घोरीचा तुर्की गुलाम कुतुबुद्दीन यानें दिल्ली हस्तगत केली, व मुसलमानी राज्याच्या पायाचा दगड सन १२०६ सालीं दिल्लीस बसविला गेला.

## दिल्ली व मुसलमान पातशहा

यानंतर एकामागून एक झालेल्या मुसलमानी राजवंशांची हकीकत इतिसवाचकांस माहीत आहेच. येथें सांगावयाचा मुद्दा इतकाच कीं, सन १२०६ पासून सन १८०३ पर्यंत दिल्ली शहर मुसलमान राजांच्या ताब्यांत होतें तरी हीं सर्व सहाशें वर्षेंभर दिल्ली हीच मुसलमानांची राजधानी होती, असें मात्र नाहीं. तघलख व खिलजी यांच्या अमदानींत दिल्ली ही मुसलमानांची राजधानी होती. वेड्या महमद् तघलखानें दिल्ली सोडून दक्षिणेंत दौलताबादेस राजधानी स्थापण्याचा दोन वेळां प्रयत्न केला; परंतु तो सिद्धीस गेला नाहीं. तघलखाच्या कारकीर्दींत जुन्या दिल्लीजवळ दुसरीं दोन गांवठाणें आणखी वसविण्यांत आलीं; व त्यांपैकीं हल्लींच्या दिल्लीपासून सुमारें चार मैलांवर असलेलें तघलखाबाद् अद्याप आहे. इब्नबतूता नांवाचा पाश्चात्य प्रवासी चवदाव्या शतकांत उत्तर हिंदुस्थानांत येऊन राहिला होता. त्यानें चार दिल्ली शहरांचें—अर्थात् दिल्ली या नांवाच्या जुन्या व नव्या चार गांवठाणांचें—वर्णन दिलें आहे. इ. स. १३९८ सालीं तैमुरलंगानें दिल्ली शहर हस्तगत केलें. परंतु तो नुसती लूट व गुलाम घेऊन लवकरच समरकंद् येथें परत गेला. यानंतर झालेल्या लोदी घराण्याच्या वेळींहि दिल्ली हीच मुसलमानांची राजधानी होती. पुढें बाबरानें इब्राइम लोदीचा पानपत येथें पराभव करून मोंगल राजवंश स्थापला,

पण औरंजेबाच्या मृत्यूपर्यंत दिल्ली येथें मोंगल राजांचें कायमचें ठाणें असें नव्हतें. बाबराचे पुष्कळ दिवस लाहोर येथेंच गेले. त्याचा मुलगा हुमायून यानें, हल्लीं पुराणा किल्ला या नांवानें प्रसिद्ध असलेला किल्ला दिल्लीस बांधला, पण हुमायून दिल्लींत असा फार थोडे दिवस राहिला. अकबर जरी दिल्लीचा बादशहा होता तरी त्याचे बहुतेक दिवस आग्रा येथेंच गेले. किंबहुना फत्तेपूर शिकरी येथें बांधलेल्या प्रचंड इमारतीमुळें कांहीं काळापर्यंत मोंगल राजधानी दिल्लीहून उठून या नवीन नगरींत जाऊन राहिली होती असेंहि म्हणतां येईल. अबुल फजल यानें 'ऐन–ई–अकबरी' मध्यें दिल्ली शहराचें वर्णन केलें आहे. पण त्यावरून त्या राजधानीच्या ऐश्वर्यापेक्षां तिच्या खालावलेल्या स्थितीचा उदासपणाच अधिक प्रकट होतो. जहांगिराच्या वेळेसहि आग्रा हीच मोंगल-राजधानी होती. त्याचा मुलगा शहाजहान हाहि आग्र्यास बरेच दिवस होता. परंतु हल्लींच्या दिल्ली शहराचें गांवठाण शहाजहानानेंच प्रथम वसविलें. त्यानेंच जुम्मामशीद बांधिली. पुढें औरंगजेबाच्या वेळेपासून मात्र मोंगलवंशाची समाप्ति होईपर्यंत दिल्ली हीच कायम राजधानी राहिली. औरंगजेबहि मधून मधून आग्र्यास राही. शिवाजीमहाराज संभाजीसह औरंगजेबाकडे दिल्ली येथें गेले, अशी आजपर्यंत समजूत होती. पण या वेळीं औरंगजेब आग्र्यास रहात असे; व शिवाजीमहाराज औरंगजेबाच्या कैदेंत पडल्यावर पेटाऱ्यांत बसून निसटून आले ते आग्र्याहून–दिल्लीहून नव्हे–असें आतां निश्चित झालें आहे. औरंगजेबानंतर मोंगल वंश खालावला असतां, सन १७३९ सालीं इराणचा बादशहा नादिरशहा यानें, सन १७५६ सालीं दुराणी अहमदशहा अबदाली यानें, सन १७५९ सालीं मराठ्यांनीं, व १८०३ सालीं इंग्रजांनीं दिल्ली जिंकून हस्तगत केली. परंतु १८५७ सालापर्यंत ती नांवानें तरी मोंगलांचीच राजधानी होती. अखेर १८५७ सालीं बंडाचा मोड झाल्यावर शेवटचा मोंगल बादशहा बहादूरशहा याचे मुलगे दिल्लीस मारले जाऊन बहादूर शहास उचलून ब्रह्मदेशांत नेऊन ठेवण्यांत आलें, व तेव्हांपासून राजधानी या नात्यानें मुसलमानांचा व दिल्लीचा कायमचा संबंध तुटला.

## दिल्ली व मराठे

मुसलमान लोक व दिल्ली शहर यांचा संबंध सर्वांत अलीकडचा, यामुळें तो विशेष प्रमुख व ढळढळीत दिसतो. तथापि, हिंदु लोकांचा सदर शहराचा

संबंध कांहीं थोडाथोडका नाहीं. पौराणिक काळांत दिल्ली ऊर्फ इंद्रप्रस्थ नगरची स्थापना हिंदूंनींच केली; व तेराव्या शतकापर्यंत ती सर्व वेळ हिंदु राजांची राजधानी नसली तरी हिंदु राजांच्याच ताब्यांत तें होतें. आजहि तेथें मुसलमानांपेक्षां हिंदूंचीच वस्ती अधिक आहे. खुद्द मराठ्यांचा मात्र दिल्लीशीं संबंध फारसा जुना नाहीं. तेराव्या शतकांत मुसलमानांनीं दक्षिण प्रांत जिंकण्यास सुरुवात केली, व त्यांच्या सुभेदाऱ्या इकडे स्थापन झाल्या. परंतु पुढें लवकरच मुसलमानी सुभेदार स्वतंत्र होऊन त्यांनीं स्वतःचीं राज्यें स्थापिलीं; आणि महाराष्ट्र दोन शतकेंपर्यंत मधूनमधून व जाऊन येऊन या स्वतंत्र झालेल्या मुसलमानी राजाच्या ताब्यांत होतें. दिल्लीच्या बादशहांचा प्रत्यक्ष असा अंमल महाराष्ट्रांत फारच थोडा व थोडा वेळ होता. औरंगजेबानें दक्षिणेंतील मुसलमानी राज्यें बुडविल्यावर महाराष्ट्र हें दिल्लीच्या बादशहांच्या ताब्यांत जाण्याचा संभव होता. परंतु खुद्द शहाजहान व औरंगजेब यांच्या कारकीर्दींत ज्याप्रमाणें शिवाजीनें दिल्लीच्या मुसलमानांशीं विरोध करून यश मिळविलें, त्याचप्रमाणें औरंगजेबाच्या कारकीर्दीच्या अखेर राजाराम व त्याचे मराठे सरदार यांनीं मोंगलांची डाळ महाराष्ट्रांत शिजूं दिली नाहीं. औरंगजेबाच्या मरणानंतर दक्षिणेंत त्याच्याबरोबर असलेला त्याचा मुलगा अज्जमशहा यानें दिल्लीचें तक्त मिळविण्याकरितां उत्तरेकडे तोंड फिरविलें; पण लवकरच त्याचा भाऊ मोअज्जम याजकडून तो मारला गेला; व पुढील सालीं त्याचा भाऊ—विजापुरचा सुभेदार—कामबक्ष हाहि मारला जाऊन दक्षिणेंत मोंगल निर्मूल झाले. औरंगजेबाचा उरलेला मुलगा मुअज्जम ऊर्फ बहादुरशहा याच्या कारकीर्दींत दिल्लीस कैदेंत असलेला शिवाजीचा नातू शाहू हा सुटून दक्षिणेंत आल्यानें उलट मराठी राज्याच्या सुस्थितीस मदतच झाली. शाहूच्या कारकीर्दींत मराठे व दिल्लीचे बादशहा यांचा संबंध मित्रत्वाचा होता. दिल्लीच्या बादशहाकडून सनदा आणण्याकरितां बाळाजी विश्वनाथ दिल्लीस गेला असतां तेथें मत्सरी मुसलमान सरदारांनीं रस्त्यांत त्याच्यावर हल्ला करून सनदा हिसकावून घेण्याचा प्रयत्न केला, तो प्रसंग प्रसिद्धच आहे.

## बाजीरावाची महत्त्वाकांक्षा

मोंगल बादशहाचा परवाना घेऊन उत्तरेस मुलूख काबीज करीत करीत मराठ्यांचें वजन दिल्लीपर्यंत नेऊन बसविण्याची कल्पना बाळाजी विश्वनाथाचा

मुलगा पहिला बाजीराव याचे मनांत चांगलीच जागृत होती. चंबळा-नदीच्या दक्षिण मुलखाची सर्व जहागीर, दक्षिणच्या सहाहि सुभ्यांची सरदेशपांडेगिरी, आणि अलाहाबाद, बनारस, गया, मथुरा, या हिंदु क्षेत्रांची जहागीर हीं मिळण्याविषयीं त्यानें दिल्लीच्या बादशहाकडे उघड मागणीहि केली होती; व ती नाकारण्यांत आल्यामुळें सन १७३६ सालीं बाजीरावानें दिल्लीवर स्वारी करून दिल्लीच्या वेशीबाहेर छावणीचा तळहि दिला होता. पण त्याचेजवळ थोडे लोक असल्यामुळें त्यास परत फिरावें लागलें. तरी माळव्याची जहागीर व तेरा लक्ष रुपये बाजीरावास मिळालेच. सन १७३८ सालीं नादिरशहानें दिल्ली घेतली तेव्हां दिल्लीच्या बादशहाच्या कुमकेस जाण्याचा बाजीरावाचा विचार होता. या कामाकरितां वसईची फत्ते झाल्याबरोबर चिमणाजीआप्पा वगैरे सर्व सरदार आणि निजाम नासरजंग यांसहवर्तमान दिल्लीस जाऊन तो नादिरशहाशीं सामना करणार होता. दिल्लीचे मोंगल बादशहावर आपली सत्ता आतां बहुतेक स्थापित झाली आहे अशी मनांतून जाणीव असल्यामुळें इराणच्या शहानें दिल्ली हस्तगत करून तेथें नवीन बादशाही स्थापित करणें, हें अस्तास जाणाऱ्या मोंगलाप्रमाणेंच उदयास येणाऱ्या मराठ्यांनाहि एक नवीन अरिष्टच उद्भवत आहे असें बाजीरावास वाटलें; आणि हिंदु लोकांबरोबर मुसलमान लोकहि या कामीं खांद्यास खांदा लावून लढतील अशी त्यास अपेक्षा होती. नादिरशाहावर स्वारी करण्याकरितां नर्मदा आणि चंबळा यांच्यामधील मुलूख आपण लवकरच 'मराठामय' करून सोडणार असें बाजीरावानें जाहीर केल्याचें ग्रँडडफहि लिहितो. परंतु इतक्यांत नादिरशहा हा मोंगल बादशाहा महमदशहा यास फिरून तक्तावर बसवून, त्याचा अंमल सर्व हिंदु-मुसलमानांनीं पूर्ववत् मानावा अशीं हिंदुस्थानांतील राजेरजवाड्यांस पत्रें लिहून इराणाकडे निघून गेला, त्यामुळें बाजीरावास दिल्लीस जाण्याचें कारण राहिलें नाहीं. पुढील सालीं बाजीराव नर्मदातीरीं मरण पावला. तात्पर्य, शाहूचें तोंड दक्षिणेकडे आणि औरंगजेबाच्या मुलांचें तोंड उत्तरेकडे फिरल्यापासून दिल्लीच्या कारस्थानांत मराठ्यांचा जो प्रवेश झाला त्यास बाजीरावानें बरेंच स्वरूप आणिलें.

## शिंद्यांचा दिल्लींत प्रवेश

बाजीरावाच्या मरणानंतर नानासाहेब पेशव्यांनीं माळव्याच्या जहागिरीसंबंधानें फिरून दिल्लीस कारवाई सुरू केली. चिमाजी आप्पा व नानासाहेब पेशवे या

दोघांनीं मिळून दिल्लीच्या बादशहास १७४१ सालीं एक अर्ज केला. त्यांत पंधरा लक्ष रुपये देणगीची मागणी केली असून त्याच्या मोबदला " नर्मदेच्या उत्तर मुलखाचा आम्ही बंदोबस्त ठेवूं, स्वतः दिल्लीस जाऊन बादशहास भेटूं, बादशहाच्या नोकरीस चार हजार मराठे घोडेस्वार देऊन, पांचशें घोडेस्वारांनिशीं एक मातबर मराठा सरदार खास हुजरातीच्या नोकरीकरितां व बादशहाच्या रक्षणाकरितां दिल्लीस ठेऊन देऊं" असें आश्वासन दिलें होतें, परंतु तें प्रकरण त्यावेळीं तसेंच राहून गेलें. पुढें लवकरच महमदशहा मृत्यु पावला. इकडे नादिरशहाच्या मृत्यूनंतर प्रथम त्याचा बंदिवान असलेला व नंतर त्याचा सरदार झालेला अफगाण योद्धा अहमदशहा अबदाली यानें हिरात जिंकून सन १७४८ सालीं मुलतान व लाहोर घेतलें; व दिल्लीकडे रोंख फिरविला. दिल्लीचा वजीर मीर शहा उद्दीन यानें शिंदे व होळकर यांची मदत मागितली व अहमदशहास पदच्युत करून दुसरा अलमगीर यास तक्तावर बसविलें. यामुळें अहमदशहा अबदाली पुढें चाल करून आला; व हेंच प्रकरण जोरानें वाढत जाऊन दिल्लीच्या कारस्थानांचा परिणाम सन १७६१ सालीं पानपतच्या लढाईंत झाला. ह्या युद्धांत मराठ्यांची जवळजवळ सबंध एक पिढी मारली गेल्यानें मराठ्यांस दिल्लीकडे फिरून पाहण्यास कांहीं वर्षें लागलीं. दिल्लीच्या बादशहाची स्थितिहि या अवधींत चांगलीशी नव्हती. बादशहा शहाअलम हा सुजाउद्दवला व नजीबखान यांच्या तंत्रानें वागूं लागला; त्याची दिल्ली सुटली; व बंगालमध्यें इंग्रज उदयास येऊन सन १७६४ सालीं बादशहानें बंगाल प्रांताची दिवाणी इंग्रजांस दिली. पुढें 'आपणांस दिल्लीस नेऊन तक्तावर बसवावें' असें सन १७६६ सालीं बादशहानें अलाहाबादेहून मराठ्यांकडे बोलणें लाविलें. प्रथम तें त्यांस मान्य करितां आलें नाहीं. पण पानिपता-नंतर अवघ्या सात वर्षांत थोरल्या माधवराव पेशव्यानें दक्षिणेंत मराठ्यांचा फिरून चांगला जम बसविल्यामुळें महादजी शिंदे व तुकोजी होळकर यांना सन १७६८ सालीं उत्तर हिंदुस्थानांत प्रवेश करितां आला. मराठ्यांचा मुख्य शत्रु व पानपताच्या अपयशास कारणीभूत झालेला नजीबखान रोहिला यापूर्वी नुकताच वारला होता. यामुळें महादजीस खुद्द नजिबखानाचा सूड जरी घेतां आला नाहीं, तरी एकंदरीनें पठाणांस जरब बसविण्याचें त्याचें काम सोपें झालें. सन १७७१ सालीं बादशहानें मराठ्यांकडे फिरून मदत मागितली. व

त्या सालीं डिसेंबर महिन्यांत—म्हणजे पानपतच्या लढाईपासून अवघ्या दहा वर्षांच्या आंत—महादजी शिंद्यानें शहाअलम यास बरोबर घेऊन दिल्लींत प्रवेश केला; व तेव्हांपासून मराठ्यांचें वजन खुद्द दिल्लीच्या दरबारांत जें पडलें तें पुढें सुमारें वीस पंचवीस वर्षें कायम होतें.

## पाटीलबुवांचें यश

नारायणराव पेशव्यांच्या मरणोत्तर पेशवाईतील भांडणामुळें शिंद्यास दिल्ली सोडून दक्षिणेकडे येऊन राहावें लागलें. यामुळें, मराठ्यांचा हात दिल्ली येथील कारस्थानांतून सुटत चालला होता; पण सन १७८३ सालीं सालबाई येथें इंग्रज व पेशवे यांचा तह झाल्यानंतर महादजी फिरून द्विगुणित तेजानें दिल्लीस गेला, आणि इंग्रज व मराठे यांचें तूर्त सख्य असल्यामुळें, बादशहानें महादजीस दिल्लीचा सर्व कारभार देण्याच्या कामीं इंग्रजांनीं अडथळा केला नाहीं. महादजीनें बादशहाकडून पेशव्यांच्या नांवानें 'वकील–ई–मुतलक्' ही पदवी व बहुमानाची पालखी घेतली; आणि स्वतः गंगा व यमुना यांचे आसपास राहून तो उत्तर हिंदुस्थानच्या सर्व कारभाराचीं सूत्रें हालवूं लागला. पुढें गुलाम कादर दिल्लीस जाऊन राहिल्यावर त्यानें महादजींचें वर्चस्व कमी करण्याचा कट आरंभिला. या गोष्टीस दुर्दैवी बादशहानेंहि भर दिली. पण तिचा परिणाम अखेर असा झाला कीं, गुलाम कादरनें बादशहावरच उठून त्याचे अनन्वित हाल केले; व दिल्ली शहरांत—नादीरशहा अहमदशहा किंवा तैमूरलंग यांनींहि न केलेला असा—दिल्लीच्या तक्ताचा त्यानें अपमान केला. अखेर महादजीचा सरदार राणाखान यानें दिल्लींत प्रवेश करून बादशहास सोडविलें; आणि गुलाम कादरास महादजीनें भयंकर शासन केलें. गुलाम कादरची व्यवस्था लागल्यावर महादजीनें बादशहास सन १७८९ सालीं नेमणूक बांधून दिली. नंतर रजपुतांचें शासन करून महादजी दक्षिणेंत आला, व सन १७९३ सालीं पुण्यास मरण पावला. दिल्लीस मराठ्यांचा अंमल व व्यवस्था पाटीलबुवांनीं घालून दिल्याप्रमाणें सन १८०३ पर्यंत चालू होती. पण या सुमारास इंग्रज हे मराठे व मोंगल यांस भारी झाल्यामुळें, नाना फडणविसांच्या मृत्यूनंतर दोन वर्षांनीं सन १८०३ च्या ११ सप्टेंबर तारखेस दिल्ली येथील लढाईत लॉर्ड लेक यानें शिंद्याचे फौजेचा पराभव केला व या एका घावानें मराठ्यांचा दिल्लीचा संबंध तुटला; एवढेंच नव्हे तर त्याच्या योगानें मुसलमानी बादशाहीचाहि अंत होऊन दिल्ली शहर इंग्रजांचे स्वाधीन झालें.

## दिल्लीची रुधिरप्रिय देवता

' दिल्ली ' हें नांव उच्चारल्याबरोबर जशी अनेक ऐतिहासिक गोष्टींची आठवण होऊन मनांत कालवाकालव होते, तशी दुसऱ्या कोणत्याही शहराच्या नांवानें होत नाहीं. कारण या शहरानें जितकें सुख व ऐश्वर्य पाहिलें तितकेंच दुःखहि पाहिलें. पण सुख तेवढें विसरून जाऊन दुःखाची तेवढी आठवण अधिक राहाण्याची मनुष्याच्या मनाची प्रवृत्ति असते. यामुळें दिल्ली हें नांव उच्चारतांच इतिहासज्ञांना दुःखदायक गोष्टीच अधिक आठवतात. दिल्ली अथवा इंद्रप्रस्थ हें नगर प्रथम वसविण्यांत आलें तें खांडववन जाळून, हें वर सांगण्यांत आलेंच आहे. या प्रसंगीं नाग म्हणजे रूपकदृष्ट्या सर्प, पण वस्तुतः नाग नांवाचे लोक यांची जी कत्तल झाली असें मानितां येईल, त्याच कत्तलीची दिल्लीच्या पुढील इतिहासांत अनेकवार पुनरुक्ति झाल्याचें आढळतें. इंद्रप्रस्थ नगरीच्या वास्तुदेवतेस रक्तप्राशनाची कांहीं अनिवारच हाव असली पाहिजे; कारण असें एकहि शतक किंवा अर्धशतक लोटलें नसेल कीं, ज्या अवधींत दिल्लीस एकादी प्रचंड कत्तल होऊन नगरभूमीवर रक्ताचा सडा शिंपला गेला नाहीं ! सन १३३९ सालीं महमद तघलखानें आपली राजधानी दौलताबादेस नेण्याचा विचार केला, तो दिल्लीच्या नागरिकांस पसंत नव्हता; व तो सक्तीनें अमलांत आणण्याचे कामीं हजारों लोक मारले गेल्याचें सांगतात. १३९८ सालीं तैमूरलंगानें दिल्ली घेतल्यावर त्याचे शिपाई लोक एकसारखी पांच दिवसपर्यंत दिल्लीच्या नागरिकांची कत्तल करीत होते ! " रस्त्यांतून जाण्यास मार्ग नाहीं इतक्या प्रेतांच्या राशी सर्व शहरभर पसरल्या. हिरे, माणकें, सोनें, चांदी, वगैरे लूट तर किती जमा झाली याची गणतीच नाहीं ! पकड, लूट व मारहाण याशिवाय कोणास कांहींच सुचेना. प्रत्येक शिपायानें निदान पंचवीस गुलाम पकडून आणले व सर्व दिल्ली शहर ओस पडलें." नादिरशहानें १७३९ सालीं दिल्लीस केलेली कत्तल प्रसिद्धच आहे. पुनः एक वेळ इतिहासकाराच्या शब्दांनीं बोलावयाचें तर " त्या वेळीं जे अनर्थ त्या राजधानीवर कोसळले ते ऐकूनहि अंगावर रोमांच उभे राहातात. इराणी लोकांनीं सर्व शहर जाळून लुटून फस्त केलें. प्रेतांचे ढीग व रक्तांचे पाट यांनीं सर्व रस्ते भरून गेले. तीस हजारांहून जास्त माणसें प्राणांस मुकलीं ! " शिवाय व्यक्तिविषयक महत्त्वाकांक्षेनें दिल्लीच्या एकंदर इतिहासांत किती राजवंशांची उलथापालथ झाली, व त्या उलथा-

पालथीच्या अनुषंगानें किती कत्तली झाल्या, याची गणती करणें कठिण आहे. राजकारणानें घडून येणारा असा कोणताहि गुन्हा नसेल कीं जो दिल्लीस घडून आला नाहीं! हल्लींच्या दिल्लीच्या आसपास कमींत कमी उध्वस्त अशीं सात जुनीं गांवठाणें दिसतात; आणि जेथें एकहि जिवंत मनुष्य दिसत नाहीं अशा ठिकाणीं मोकळ्या ओसाड किंवा पडक्या इमारती व गवत उगवलेलीं आणि किड्यामुंग्यांनीं घरें केलेलीं जोतीं पाये वगैरे पाहाणाराचें मन उदास झाल्या-शिवाय रहात नाहीं. त्यांतूनहि मृत मनुष्यांस पुरून त्यांच्या थडग्यावर इमा-रती बांधण्याची मुसलमान लोकांची चाल असल्यामुळें हुमायुनाच्या कबरस्था-नासारख्या प्रचंड इमारती शिल्पकला या दृष्टीनें नेत्रांस जरी आल्हाद देतात, तरी मृत्यूची आठवण करून देऊन मनास उद्विग्नच करितात. कलकत्त्यास जसें " सिटी ऑफ पॅलेसेस " ( प्रासादनगर ) म्हणतात तसेंच दिल्लीस " सिटी ऑफ टूम्ज " ( स्मशाननगरी ) हें नांव आहे. कर्मधर्मसंयोगानें दिल्लीइतके जयस्तंभहि दुसरे कोठें एकत्र पाहावयास मिळत नाहींत. म्हणून वर सांगि-तल्याप्रमाणें थडगीं–जयस्तंभ, मनोरे–कत्तली, राजे लोकांनीं भोगलेलें ऐश्वर्य व आपत्ति या सर्व गोष्टी ' दिल्ली ' या नांवाचा उच्चार होतांच आठवून मनुष्याच्या मनांत कालवाकालव झाल्याशिवाय रहात नाहीं!

## दरबार दिल्लीसच कां ?

संसारांत मनुष्याचें आयुष्य नेहमींच्या सरासरीपेक्षां अधिक लांबलें तर दुःख पाहिल्याशिवाय डोळे मिटणें त्याला दुरापास्तच असतें. तशीच कांहींशी स्थिति जुन्या पुराण्या दिल्लीची झालेली आहे, असें म्हणण्यास हरकत नाहीं अशा तऱ्हेचें हें शहर दरबारास इंग्रज सरकारनें तीन वेळां पसंत केलें, याचें सकृद्दर्शनीं कोणासहि आश्चर्य वाटेल. पण एक तर जुन्या राजपरंपरेच्या इति-हासानें दिल्ली शहरास लोकोत्तर राजकीय महत्त्व येत आहे–हिंदु व मुसलमान सम्राटांनीं ज्या राजधानींत अनेक शतकें राज्य केलें त्या शहरास हल्लींहि निरं-तर मुख्य राजधानीचा मान देणें शक्य आहे किंवा नाहीं हा एक वादच आहे; व हा वाद हल्लीं ' पायोनिअर ' पत्रानें जोरानें लोकांपुढें आणिला आहे, परंतु कायमच्या राजधानीसहि जो मान मिळत नाहीं तो दरबाराचा मान दिल्लीस मिळण्याचें कारण उघडच असें आहे कीं पूर्वीं या देशांत हिंदु व मुसलमान सम्राट ज्या स्थानावर होते त्याच स्थानावर इंग्रज प्रभु आज आहेत, असें सर्व

जगाच्या निदर्शनास विशेष रीतीनें यावें. आठवण हा मनाचा खेळ आहे; आणि जुन्याच्या जागीं नवें येईल तेव्हांच जुन्याची आठवण नाहींशी होते, असा मनाचा धर्म असल्यामुळें जें कार्य कायद्याच्या दृष्टीनें १८५८ सालीं तमसा नदीच्या कांठीं असणाऱ्या पार्लमेंटच्या सभागृहांत घडून आलें, तेंच कार्य मानवी मनाच्या दृष्टीनें घडवून आणण्यास दिल्लीस दरबार भरविणें हेंच योग्य आहे हें कोणीहि कबूल करील. दिल्ली शहराशीं आपला संबंध कायमचा जोडण्याकरितां इंग्रजांनीं तेथें अद्यापि प्रचंड इमारती बांधल्या नाहींत. किंबहुना इंग्रज हे केवळ काव्यमय रम्य पण पोकळ अशा गोष्टीचे भुकेलेले नसून, व्यवहारपटुत्व हाच त्यांचा मुख्य गुण आहे. यामुळें पुढेंमागें ते दिल्लीस अशा इमारती बांधतील किंवा नाहीं याचीहि शंकाच आहे. हिंदुस्थानांत पूर्वीचे राजे लोक राज्यारोहणाच्या प्रसंगीं आपापल्या ऐपतीप्रमाणें हिरेमोत्यांचीं ताटें उधळीत व रस्त्यांतून दोन्ही दोन्ही हातांनीं चलनी नाण्यांची हत्तीवरून खैरात करीत; हा हौसेचा पण फाजील उधळेपणाचा प्रकार इंग्रज राजे इंग्लंडांत किंवा खुद्द दिल्लींतहि करीत नाहींत. परंतु अशा नीरस पण व्यवहारदक्ष इंग्रजांनाहि परंपरेचें दास्यत्व सर्वस्वीं झिडकारून अलिप्त राहतां येत नाहीं. खुद्द इंग्लंडांतहि नव्या राजाचा १९११ सालीं झालेला मुकुटधारण-समारंभ ज्या विधींनीं व ज्या शब्दोच्चारांनीं करण्यांत आला, तेच विधी व तेच शब्दोच्चार सन ७९५ सालच्या म्हणजे सुमारें अकराशें वर्षांपूर्वीं झालेल्या-राज्यारोहणाच्या वेळीं उपयोगांत आणिलेले होते, असा दाखला निघतो! एरवींच्या प्रसंगीं इंग्रज राजाचा पोषाख पेहेराव इतका साधा असतो कीं, तो हलकारे ललकारे बरोबर न घेतां चार लोकांत मिसळेल तर तुम्हाआम्हांस ओळखितांहि येणार नाहीं. पण इतक्या सुसंस्कृत मनाच्या राजास व प्रजेस मुकुटधारणविधीचा अगदीं जुनाट व फाटका तुटका कित्ता गिरविल्याशिवाय समाधान वाटत नाहीं! देशी नाटकांतल्या इंद्रसभेंतील सोंगासारखा पोषाख आणि बुडकुलींतून पवित्र तेल चमचानें घेऊन ठराविक रीतीनें डोक्याखांद्यावर काढलेलीं स्वतिकें, वगैरे गोष्टी एरवींच्या प्रसंगीं पाहून कोणासहि कदाचित् हंसूंच येईल. पण त्याच गोष्टी राज्यारोहणाच्या प्रसंगीं केल्यानें त्यांपासून गहन गांभीर्य उत्पन्न होऊं शकतें. अशाच कांहींशा मनोवृत्तीनें दरबार भरविण्याचेहि समारंभ केले जातात; व म्हणून कलकत्ता मुंबईसारखीं प्रचंड व धनाढ्य राजधानीचीं शहरें सोडून दिल्लीसारख्या मागसलेल्या

व एका बाजूच्या शहरीं मुद्दाम जाऊन दरबार भरविण्यांत येतात हें अगदीं उघड आहे; व या दृष्टीनें पाहतां तें योग्यहि आहे. वास्तविक इंग्रजांसारख्य दर्यावर्दी व समुद्रावर स्वामित्व गाजविणाऱ्या व्यापारी योद्ध्यांस मुंबई किंवा कलकत्ता हींच शहरें दरबार भरविण्यास योग्य दिसावीं. तथापि दिल्ली शहर हें जुन्या ऐतिहासिक उपाधींनीं वेष्टिलेलें असल्यामुळें; हिंदुस्थानांतील इंग्रज राजाचा दरबार इंग्रजांनीं स्वतः वसाविलेल्या व अभिमानास्पद अशा कलकत्ता व मुंबई शहरीं न भरवितां, जेथें पूर्वीच्या हिंदुमुसलमान राजांच्या मोडक्या तोडक्या किंवा रिकाम्या इमारती—व अद्यापि गाडलें गेलें नसल्यास—त्या इमारतींतून संचारणारें दिल्लीच्या रुधिरप्रिय वास्तुदेवतेचें भूत—याशिवाय जुन्या ऐतिहासिक साम्राज्यांची आठवण करून देणारें किंवा सांधा जोडणारें दुसरें कांहीं एक अवशिष्ट नाहीं, अशा ठिकाणीं दरबार भरविल्याशिवाय इंग्रज राज्यकर्त्यांचें समाधान होऊं नये, यांतहि कांहीं आश्चर्य नाहीं. विसाव्या शतकांतील देखील सुधारणा, इंग्रजांसारख्या केवळ व्यवहारदक्ष लोकांच्याहि मनांतील राजकीय भावनेवर किंवा श्रद्धाळूपणावर, हरताळाचा बोळा फिरवूं शकत नाहीं. दिल्लीस दरबार भरविणें हें मेलेल्या हिंदीमुसलमान सम्राटांच्या नाकावर टिचण्यासारखें उन्मत्तपणाचें कृत्य नसलें तरी, ज्या स्थळीं पूर्वीचे ऐश्वर्यसंसपन्न सम्राट होऊन गेले त्या वास्तूवरच दरबार भरविण्यांत विशेष औचित्य आहे, असें मानणें हें भोळेपणाचें किंवा श्रद्धाळूपणाचें लक्षण होय यांत शंका नाहीं. पण इंग्रज सुधारलेले असले तरी, जोंपर्यंत त्यांनीं मनुष्यस्वभाव सोडला नाहीं तोंपर्यंत, दिल्लीस दरबार भरविल्यानें हिंदी प्रजेच्या मनावर साम्राज्याची विशेष छाप बसेल, असें प्रामाणिकपणानें मानण्याइतका भोळेपणा त्यांचे अंगीं मधून मधून चमकल्यास त्यांत आश्चर्य वाटण्यासारखेंहि कांहीं नाहीं. आतां दिल्लीस दरबार भरविण्याचें औचित्य पहावयाचेंच झालें तर तें एका दृष्टीनें दिसेल. म्हणजे सर विल्यम ली वॉर्नर यांनीं नुकेंच एके ठिकाणीं लिहिल्याप्रमाणें इंग्रज सरकारच्या राज्यांत मिळालेल्या शांततेचें खरें चीज, घातपात व रक्तस्राव यांचेंच निरंतर साहचार्य असणाऱ्या दिल्लीसारख्या शहराचें उदाहरण लक्षांत घेतलें असतांच होणार आहे. सन १८०३ सालापासून—५७ सालची धामधूम अपवाद म्हणून सोडून दिली तर—दिल्ली शहरांत नांदणारी स्वस्थता, व तोंपर्यंत पूर्वीच्या काळीं त्या शहरांत माजलेली अस्वस्थता, या दोहोंमध्यें जितका विरोध आहे तितका

दुसऱ्या कोणत्याहि दोन गोष्टींमध्यें सांपडणार नाहीं. आतां सर विल्यम ली वॉर्नर भासवितात त्याप्रमाणें वरील विरोध स्पष्ट करून दाखविणें हाच कांहीं दिल्लीस दरबार भरविण्याचा खरा हेतु नाहीं हें निर्विवाद होय; तथापि, दिल्लीचें पूर्ववृत्त लक्षांत घेतां ली वॉर्नरसाहेबांचा हा युक्तिवाद यथार्थ नसला तरी शोभण्यासारखा मात्र खचित आहे.

## विधि कीं समारंभ ?

असो; आज दोन प्रहरीं दिल्लीस जो दरबार भरणार आहे तो प्रत्यक्ष राज्यारोहणविधि नव्हे, तर राज्यारोहण गेल्या जून महिन्यांत झालें ही गोष्ट राजेसाहेब हिंदुस्थानांत येऊन हिंदी प्रजेस स्वतःच्या मुखानें सांगणार, त्या प्रसंगाकरितां भरविलेला दरबार होय. विधि आणि समारंभ या दोन गोष्टी वर वर पहाणाऱ्याच्या दृष्टीनें एकमेकांत मिसळण्यासारख्या आहेत. परंतु त्या वस्तुतः वेगळ्या असतात. दोहोंतील फरक थोडक्यांत सांगावयाचा तर असें म्हणतां येईल कीं, जी गोष्ट सकृत् म्हणजे केवळ एकच वेळ होऊं शकते तो विधि; व जी गोष्ट अनेक वेळां केली जाते किंवा होऊं शकते तो समारंभ. लग्नांत कन्यादान एकदांच होतें; पण जेवणावळी व पानसुपाऱ्या अनेक वेळां होतात. अर्थात् विधीला धार्मिक स्वरूप आणि समारंभास लौकिक स्वरूप असतें. राजेसाहेबांचा मुकुटधारणविधि गेल्या जूनमध्यें लंडन येथील देवालयांत झाला तो; मिरवणुकीचे समारंभ अनेक झाले व हिंदुस्थानांतील दरबार हाहि मिरवणुकीसारखाच एक समारंभ आहे. त्यास धार्मिक स्वरूप मुळींच नाहीं, एवढेंच नव्हे तर केवळ कायद्याच्या दृष्टीनें पहातांहि दरबार हा कायद्याच्या टापूबाहेरचा आहे ! कारण दरबारांत राजानें केलेलें भाषण किंवा दिलेलें दान यापासून केवळ स्वतःप्रामाण्यानें हिंदुस्थानसंबंधीं 'कायद्यांत' फेरबदल करणारे असे कांहींच परिणाम घडून येऊं शकत नाहींत. राजा पार्लमेन्टच्या बंधनानें बद्ध असला तरी—बरोबर एखादा प्रधान म्हणजे पार्लमेन्टचा प्रतिनिधि घेऊन कां होईना—त्याला स्वेच्छेनें वाटेल तिकडे जातां येतें, व त्याचप्रमाणें राजेसाहेब हल्लीं हिंदुस्थानांत आले आहेत. तसेंच राजा हा राष्ट्राचा मुख्य "एक्झिक्युटिव्ह ऑफिसर" म्हणजे अंमलबजावणी करणारा अंमलदार असल्यामुळें 'अंमलबजावणी' च्या सदराखालीं पडणारी वाटेल ती गोष्ट स्वेच्छेनें करण्यास तो मुखत्यार असतो. हिंदुस्थानांत जे अधिकार व्हॉइसरॉय म्हणजे 'राजप्रतिनिधी' ला आहेत ते स्वतः राजाला

आहेत हें उघडच आहे. यामुळें पूर्वीं दोन दरबारच्या प्रसंगीं जशा प्रकारच्या देणग्या देण्यांत आल्या तशा प्रकारच्या देणग्या, राजेसाहेबांस वाटतील तर, यंदांहि त्यांना स्वेच्छेनें देतां येतील. आजच्या दरबारांत कोणच्या देणग्या दिल्या जाणार हें या घटकेस नक्की कळणें शक्य नाहीं. परंतु अलीकडे निरनिराळ्या लोकांकडून ज्या देणग्या द्याव्या म्हणून सुचविण्यांत आल्या आहेत त्या राजेसाहेबांना वाटतील तर सहज देतां येतील; उदाहरणार्थ, राजकीय बंदिवान सोडणें, बंगालची फाळणी रद्द किंवा दुरुस्त करणें, कायमधाऱ्याची पद्धति सर्व इलाख्यांत सुरू करणें, नेटिव लोकांना व्हॉलंटियर पलटणींत सामील होऊं देणें; या व असल्या ज्या मागण्या भारींत भारी म्हणून मागण्यांत आल्या आहेत, त्या सर्व राजेसाहेबांस देतां येतील. आतां अँग्लो-इंडियन लोकांच्या अडचणी लक्षांत येऊन राजेसाहेब कदाचित् एकाद्या विशिष्ट गोष्टीचा आग्रह धरणार नाहींत. पण उलटपक्षीं एखादी गोष्ट, राजेसाहेबांना विशेष प्रिय आहे असें दिसून येईल तर, त्यांजबरोबर आलेले स्टेट सेक्रेटरी त्यांची ही इच्छा आज्ञा म्हणून शिरसावंद्य करतील यांत संशय नाहीं. मात्र राजेसाहेबांस हिंदुस्थानासंबंधीं ज्या गोष्टींत पार्लमेंटनें पूर्वीं कायदे केलेले आहेत, अथवा स्वतःकडे अधिकार राखून ठेवलेले आहेत, त्या गोष्टींत फेरफार करितां येणार नाहीं. अशा रीतीनें दरबारास धार्मिक विधीचें स्वरूप नाहींच; पण त्या प्रसंगीं प्रसिद्ध होणाऱ्या जाहीरनाम्यास कायद्याचेंहि स्वरूप नाहीं. राज्यारोहण ही एकदांच होण्याची गोष्ट आहे; व ती गेल्या महिन्यांत होऊन गेली. त्या प्रसंगीं मुकुट व गादीच्या पदव्या धारण करितांना गर्भित रीतीनें हिंदुस्थानचा काय संबंध आला असेल तो असेल !

## बादशहाच कां ? राजा कां नव्हे ?

पण इंग्लंडचा राजा या नात्यानें हिंदुस्थानचा जो संबंध येऊन शिवाय उरेल त्याची वासलात लावण्याकरितां सन १८७७ सालीं खुद्द पार्लमेंटच्या मंजुरीनें इंग्लंडच्या राजास 'हिंदुस्थानचा बादशहा' हा किताब देऊन टाकण्यांत आलाच आहे. या किताबाची मौज अशी आहे कीं, तो कोणच्याहि राजानें धारण करण्यास धर्मविधि करावा लागत नाहीं. आमच्या इकडे स्त्री व शूद्र हे यजमान असतां, अमंत्रक कर्म केलेलें चालतें; तशांतलाच कांहींसा हाहि प्रकार आहे ! राणीसाहेबांनीं "काइसर-ई-हिंद" हा किताब घेण्याविषयींचें

बिल सन १८७७ सालीं पार्लमेंटपुढें आलें असतां, या नवीन पद्वीच्या सर्व बऱ्यावाईट गोष्टींची उघड चर्चा पार्लमेन्टमध्यें झाली होती. त्या वेळीं ग्लॅडस्टन-प्रभृति लिबरल मुत्सद्दी अधिकारारूढ नव्हते. यामुळें त्यांनीं या नवीन पद्धती-विरुद्ध जें काय बोलतां येईल तें खुल्या दिलानें बोलून दाखविलें होतें! "इंग्लंडच्या राजास वेगळी पद्वी नसल्यानें इंग्लंडबरोबर सहजच हिंदुस्थान-चाहि राजा म्हणण्यांत येतें, व केवळ या गोष्टीमुळें इंग्लंड व हिंदुस्थान यांचा सारखा दर्जा असल्याचा अप्रत्यक्ष ध्वनि निघतो, येवढीहि गोष्ट साम्राज्यवादी कॉन्झरवेटिव्ह लोकांस खपूं नये काय?" असा सवाल उदारमतवादी ग्लॅडस्टन-साहेबांनीं केला होता; व तो बरोबर होता. हिंदुस्थानचें राज्य इंग्रजांना प्रत्यक्ष तरवार चालवूनच मिळालेलें असो अगर नसो, राजाच्या पद्वीमध्यें हा 'जांवई शोध' घालून इंग्रज राजाची प्रजा म्हणून बिनबोभाट वागणाऱ्या राजनिष्ठ हिंदी राष्ट्राला "तुम्ही लोक जिंकलेले आहांत" असें मुद्दाम डिवचून बजावण्यांत काय शहाणपणा किंवा कोणती मुत्सद्देगिरी आहे? असा मि. ग्लॅडस्टन यांचा आक्षेप होता. पण लिबरल पक्षाचें त्यावेळीं कांहीं चाललें नाहीं आणि इंग्लंडच्या राजाच्या नांवास 'हिंदुस्थानचा बादशहा' ही वेगळ्या पद्वीची उपाधी कायमची जडून राहिली. वास्तविक राजा म्हटल्यानें आम्हा हिंदी लोकांची भक्ति कमी होत नाहीं; व बादशहा म्हटल्यानें ती वाढत नाहीं. पण एवढी गोष्ट मात्र निर्विवाद आहे कीं, हिंदुस्थानासंबंधानें 'राजा' ही पद्वी काढून टाकून 'बादशहा' ही पद्वी ज्या कारस्थानी श्लेषबुद्धीनें निर्माण करण्यांत आली ती कारस्थानी श्लेषबुद्धि न कळण्याइतके कांहीं आम्ही हिंदी लोक मंदमति खास नसल्यामुळें या कारस्थानी श्लेषबुद्धीचें मात्र आम्हांस विशेष वाईट वाटतें.

## प्रार्थना

असो; कसेंहि असलें तरी १८७७ च्या अनुभवानें दरबार भरविण्याची वहि-वाट पसंत पडून आतां कायम झाली आहे. पण मागील दरबारच्या प्रसंगीं प्रजेला विशेष समाधान होईल अशी कोणतीहि देणगी देण्यांत आलेली नव्हती. सुदैवानें आजच्या दरबारच्या प्रसंगीं खुद्द महाराणी व बादशहा हे दिल्लीस जातीनें हजर असल्यामुळें प्रस्तुतच्या दरबारचा दर्जा मागील दरबारापेक्षां पुष्कळच अधिक आहे; व याकरितां आम्हांस अशी आशा वाटते कीं, लहानथोर—

गरीब श्रीमंत अशा सर्व प्रकारच्या प्रजाजनांस खरोखर आनंद होईल आणि मान्यता व अधिकार यांच्या दृष्टीनें आज आपल्या अंगावर मूठभर मांस अधिक चढलें असें त्यांस वाटेल अशा एक किंवा अनेक देणग्या राजेसाहेब देतील. आजच्या दरबारासंबंधानें आम्ही लिहीत आहों. या घटकेस, कोणत्या देणग्या मिळणार याची कल्पना निश्चित अशी करवत नाहीं. तथापि देणग्या कोणत्याहि मिळोत अगर न मिळोत; हिंदी प्रजा व चार हजार कोसांवर राहणारा त्यांचा राजा यांची आजच्या दरबारामध्यें समक्ष खुली दृष्ट–भेट होणार हा नुसता प्रसंगच अत्यंत शुभ व मंगल असल्यामुळें–स्वार्थत्याग बाजूस ठेवून, केवळ अहेतुक राजनिष्ठेच्या भावनेनेंहि–तो दरबार आम्हांस अत्यंत अभिनंदनीय वाटतो व महाराणी व बादशहा यांना दीर्घायुष्य लाभो; आणि त्यांच्या पूर्वोद्गारांप्रमाणें "हिंदी राष्ट्राचे उदात्त हेतु व उच्च आकांक्षा" सफल करण्याच्या कामीं उभयतांकडून पूर्ण सहाय्य होवो, अशी आशा व्यक्त करून हा बराच लांबलेला लेख पुरा करूं !

---

## १० दरबार व देणग्या.

(ता. १९ डिसेंबर सन १९११)

### न भूतो ! न भविष्यति–!

ईश्वरकृपेनें, गेल्या मंगळवारचा दिल्ली येथील बादशाही दरबार—पूर्वीं ठरलेल्या कार्यक्रमाप्रमाणें–मोठ्या समारंभानें पार पडला. कित्येक बाबतींत वस्तुस्थिति कल्पनेच्याहि आवांक्याबाहेर असूं शकते. ता. १२ रोजीं दोनप्रहरीं बारा वाजतां दिल्लीस भरलेल्या या प्रचंड 'बादशाही संमेलना'च्या वैभवाची खरी कल्पना केवळ कल्पक मनानें करितां येणें कठिण आहे. चार हजार कोसांवरील इंग्लंडसारख्या कीर्तिमान् व ऐश्वर्यपूर्ण परराष्ट्राचा राजा हिंदुस्थानचा बादशहा या नात्यानें दिल्लीस येऊन सिंहासनावर बसला आहे; त्याच्या प्रभावळींत सर्व हिंदुस्थानांतील ठळक ठळक राजेरजवाडे, अमीरउमराव, सरदार, मानकरी, कायदेशीर रीतीनें नेमले गेलेले प्रजेचे प्रतिनिधी, व विद्यावंत वर्गाचे नामांकित पुढारी आहेत; पलीकडे एका बाजूस लाख–पन्नास हजार प्रेक्षकगण उत्कंठतेनें एकाग्रदृष्टि होऊन उभा राहिला आहे; दुसरे बाजूस पन्नाससाठ हजार निवडक

सैन्य सशस्त्र असें सर्व मैदानभर अनेक रांगांनीं पसरलें आहे, बादशहा महाराणीसहवर्तमान उभे राहून आपल्या राज्यारोहणविधीची शुभ वार्ता स्वमुखानें जाहीर करतांच लाखों लोकांनीं एकदम हातानें वाजविलेल्या टाळ्यांचा कडकडाट व तोंडानें केलेला जयजयकार, सर्व लष्करानें एकदम झाडलेली फैर, आणि क्षणोक्षणीं सुटणाऱ्या तोफांचा गडगडाट यांनीं दशदिशा व्यापून गेल्या आहेत—या सर्व गोष्टींनीं मनावर उमटणाऱ्या ब्रिटिश साम्राज्य सत्तेच्या ऐश्वर्याच्या चित्राची कल्पना तोंडानें किंवा लेखणीनें यथार्थ रीतीनें व्यक्त करण्यास कोणीहि समर्थ होईल असें आम्हांस वाटत नाहीं ! अशा तऱ्हेचा समारंभ पुढें कोठें कधीं होईल कीं नाहीं हें कोणीं सांगावें ! पण हिंदुस्थानांत पूर्वीं मात्र कधींहि झालेला नव्हता, असें म्हणण्यांत मुळींच अतिशयोक्ति नाहीं. कारण विस्तार हें वैभवाचें एक मुख्य अंग असतें, आणि विस्ताराच्या दृष्टीनें पाहतां तरी परवांच्या दिल्ली दरबारच्या प्रसंगीं जेवढ्या मोठ्या टापूंतील राजे-रजवाडे व प्रजाजन जॉर्ज बादशहांस 'धनी' म्हणून मुजरा करण्यास आले होते, तेवढ्या मोठ्या टापूवर एकछत्री असें राज्य पूर्वींच्या भारत-वर्षाच्या इतिहासांत कधींहि झालेलें नव्हतें, हें निर्विवाद आहे. खुद्द पांडवांनींहि केलेल्या दिग्विजयाचा विस्तार, इंग्रजांनीं हिंदुस्थानाबाहेरच काय पण हिंदुस्थानांतहि केलेल्या दिग्विजयाच्या विस्ताराहून पुष्कळच कमी होता ही गोष्ट अगदीं उघड आहे. मोंगल बादशाहीचें क्षेत्र तर पांडवांच्या दिग्विजयाच्या क्षेत्राहूनहि कमी होतें. विस्तारानें सर्वांत श्रेष्ठ असलेल्या इंग्रज पातशाहीच्या या दरबारांत मोंगलाई ऐश्वर्याचा दिखाऊ झगझगीतपणा कदाचित् नसेल; पण साधेपणानेंहि ऐश्वर्य व्यक्त होत नाहीं असें नाहीं. आणि साधेपणानें ऐश्वर्य व्यक्त करण्याचा इंग्रज लोकांचा सात्विक गुण खरो-खरच वाखाणण्यासारखा आहे. पोशाख वगैरेंच्या या साधेपणाच्या गुणास सुव्यवस्थितपणा, टापटीप—विशेषतः हिंदुस्थानांत आजपर्यंत राजे लोकांत कधींहि दृश्यमान न झालेला असा वक्तशीरपणाचा सर्वोत्कृष्ट गुण—या गोष्टींनीं दरबारास सदभिरुचीच्या दृष्टीनें जें मनोहर रूप आलेलें होतें, तशा प्रकारचें रूप हिंदुस्थानांत पूर्वीं भरलेल्या कोणच्याहि राजदरबारास आलेलें नसेल असें म्हणण्यांत कोणाहि सत्यप्रिय मनुष्यास आपलेपणाचा अभिमान सुटला असें वाटण्याचें कारण नाहीं. डोळ्यांपुढें घडत असलेल्या गोष्टींचें महत्त्व जुन्या गोष्टींपेक्षां

कमी मानण्याकडे मनुष्याच्या मनाची स्वाभाविक प्रवृत्ति असते. पण ऐश्वर्य, सत्ता व संपत्ति यांच्या दृष्टीनें पाहतां पूर्वी इंद्रप्रस्थास भरलेले पौराणिक काळांतील दरबार व ऐतिहासिक काळांतील हिंदु-मुसलमान राजांचे दरबार यांचीं हृदयंगम वर्णनें वाचून आज आपल्या मनांत जी उदात्त कल्पना येते, तिच्यापेक्षां रतिभर अधिक उदात्त अशीच कल्पना, गेल्या दरबारप्रसंगाचीं इतिहासकारांनीं लिहून ठेवलेलीं वर्णनें वाचून, भावी पिढ्यांच्या मनांत बिंबेल यांत आम्हांस बिलकूल शंका वाटत नाहीं.

## 'नाटकी' दरबार

अशा तऱ्हेच्या लोकोत्तर दरबाराचें पर्यवसान कांहींतरी लोकोत्तर रीतीनेंच व्हावयास पाहिजे हें उघड होतें; व म्हणून हें पर्यवसान लोकोत्तर होण्यासारख्या कोणत्या देणग्या मिळणार हा जसा प्रजाजनांना बराच वेळ कुतूहलीचा विषय होऊन राहिला होता, तसाच या देणग्या कोणत्या द्याव्या याविषयीं सरकारासहि मोठा विचार पडला असल्यास नवल नाहीं. दरबार हें—चांगल्या अर्थानेंच पण—एक नाटक आहे असें म्हणण्यास कांहीं हरकत नाहीं. मुंबईच्या टाइम्सनें देखील दिल्ली दरबारास अशा चांगल्याच अर्थानें "नाटकी दरबार" असें नांव दिलें आहे. ज्याच्यामुळें दरबारास "नाटकी" हें रूपकगर्भ विशेषण यथार्थतेनें लावितां येईल, असें या दरबारांत होतें तरी काय? या प्रश्नाचें उत्तर फारसें कठिण नाहीं. कोणत्याहि नाटकांचें नाटकत्व हें चमत्कृति उत्पन्न करण्याच्या त्याच्या अंगच्या शक्तीवर अवलंबून असतें. खरें किंवा उत्कृष्ट 'नाटकी' नाटक म्हणजे जें रसोत्कर्षानें अथवा अकल्पित गोष्टींच्या घटनाचातुर्यानें प्रेक्षकांस विस्मयानें थक्क करून सोडतें तें. साहित्यशास्त्रांतील हीच उपपत्ति दिल्लीच्या दरबारास लाविली असतां, "दरबारसारख्या प्रसंगीं काय केल्यानें रसोत्कर्ष होईल? अथवा प्रेक्षक विस्मयानें थक्क होऊन जातील?" अशा तऱ्हेची विवंचना दरबाररूपी नाट्यग्रंथाच्या कर्त्यास सहजच पडली असावी व ती पडली होती असें हल्लीं जो सरकारी पत्रव्यवहार प्रसिद्ध झाला आहे त्यावरून उघड दिसून येत आहेहि. दरबारचा नाट्यप्रयोग पाहाण्यास खुद्द दिल्लीस जरी लाख-पन्नास हजारच लोक जमा झाले होते, तरी दिल्लीस हजर नसतांहि मनाच्या दुर्बिणींतून दिल्लीच्या बादशाही रंगभूमीवर नजर लावून तटस्थ बसलेला असा प्रेक्षकवर्ग सर्व हिंदुस्थानभरच काय पण सर्व जगभर

पसरला आहे ही गोष्ट, जबाबदार राजकारस्थानी 'नटवर्ग' आणि राजकीय रंगभूमीच्या यशाचा क्षणिक अभिमान बाळगणारे 'स्टेज मॅनेजर' यांच्याहि लक्षांत पुरी बाणलेली होती; व तदनुसारच सर्वांचा प्रयत्न होता. हिंदु व मोंगल राजांच्या वेळीं त्यांच्या राज्याच्या मर्यादा लहान म्हणून त्यांची अब्रू-बेअब्रूहि मर्यादित क्षेत्रांतच व्हावयाची. आजच्या इंग्रज प्रभूंची गोष्ट तशी नाहीं. दरबार यशस्वी झाला असतां त्यांची अब्रू जशी सबंध जगांत वाढणार, तशीच तो फिका पडला असतां बेअब्रूहि सर्व जगभर होणार, असाच तो बिनतोड प्रसंग होता. इंग्रज सरकारचे टिकाकार त्यांच्या प्रजाजनांतच आहेत असें नाहीं, तर इतर राष्ट्रांतहि पुष्कळ आहेत. प्रजाजनांनीं टीका केली तर ती सद्धेतूची तरी असते; व तिला आंतल्या अंगानें ममतेचा जिव्हाळा नसतो असेंहि नाहीं. पण काकदृष्टि परराष्ट्रीय ( उदाहरणार्थ, जर्मन ) टीकाकार इंग्रजी साम्राज्यशरीरावर छिद्रान्वेषण करण्यास सदोदित चोंच पाजळून सज्ज बसलेले आहेत ! या सर्व गोष्टींचा विचार करितां, दरबारचा रंग फिका न पडेल, व हा सर्व प्रेक्षकवर्ग विस्मयचकित करून सोडण्यासारखा रसोत्कर्ष ज्यांच्या योगानें होईल, अशा देणग्या देण्याचा सरकारानें आपल्याकडून निश्चय केला असावा ! नवरसांपैकीं वीर व अद्भुत रसांचा परिपोष करण्याची कामगिरी, दिल्लीच्या मैदानांत जमविलेल्या अर्धा लाख सैन्याच्या कवाइतीनें, गोळीबारांच्या फैरींनें, आणि तोफांच्या गडगडाटानें सहजच भागण्यासारखी होती. 'दरबार' सारख्या नाटकांत परिपोष करितां येण्यास चांगला असा दुसरा एकच रस मिळतो व तो 'वत्सल' रस हा होय. कित्येक अप्रयोजक व उतावळे व 'प्रेमवेडे' वर्णन करतात त्याप्रमाणें, जित राष्ट्र व विजयी राष्ट्र यांजमध्यें प्रेमबद्ध स्त्रीपुरुषाचा संबंध असत नाहीं. तर प्रजा ही कन्या किंवा समाज हा पुत्र आणि राजा हा पिता, हाच संबंध—हेंच नातें—अधिक शोभतें. 'प्रजा' या शब्दाचा यौगिक अर्थच मुळीं 'अपत्य किंवा संतती' असा आहे; अर्थात् कविकल्पनेंतील लाक्षणिक अर्थ केव्हां केव्हां प्रेमानें यौगिक अर्थास अंगस्पर्श करतो, तरी त्यानें 'कन्येस' 'पत्नी' बनविणें हा शब्दशः कवीचा 'लायसेन्स' म्हणजे बेसुमार 'मर्यादातिक्रम' आहे ! अर्थात् दरबारच्या नाटकांत 'प्रेम' या स्थायीभावामुळें ज्या रसाचा उत्कर्ष शक्य आहे तो 'वत्सल' रसच होय; व या रसाचाहि उत्कर्ष करण्याचा प्रयत्न सरकारानें आपल्याकडून होईल तितका केला होता.

## गोखल्यांच्या बिलाची सवत

दरबार खलास होण्याच्या सुमारास ज्या देणग्या जाहिर करण्यांत आल्या त्यांत अनेक वर्गांच्या प्रजाजनांचा परामर्ष घेण्याची दृष्टि सरकारानें ठेविली होती, यांत शंका नाहीं. या देणग्यांमध्यें शिक्षणाला अग्रस्थान देऊन असें जाहीर करण्यांत आलें कीं, 'लोकांमध्यें शिक्षणाचा प्रसार होण्याकरितां एकदम ५० लक्ष रुपये खर्चासाठीं सरकारानें मंजूर केले आहेत; व पुढेंहि प्रतिवर्षी लागतील तशा अधिक रकमा देण्याचें सरकार आश्वासन देत आहे.' या देणगीच्या योगानें ज्यांस फायदा होईल असें म्हटलें म्हणजे खेड्यापाड्यांतले मागसलेले किंवा शेतकीसारखे धंदे करणारे अथवा अस्पृश्य मानलेले वगैरेच लोक होत. सबब अशा लोकांची पहिली आठवण करून "ज्यांसी अपंगिता नाहीं, त्यांसी धरी जो हृदयीं" या वर्णनानें तुकारामबुवांनीं निर्दिष्ट केलेल्या सज्जनांच्या स्तुतीस सरकारानें स्वतःस पात्र करून घेतलें आहे यांत शंका नाहीं. आतां या पन्नास लक्षांच्या देणगीनें बजेटांतील नेहमींच्या शिक्षणविषयक खर्चास ताण बसेल कीं काय ? असें कदाचित् कित्येकांस विचारावेसें वाटेल. पण आम्हांस तसें वाटत नाहीं. दुसऱ्या कित्येकांच्या मतें सदरहू देणगी म्हणजे ना. गोखले यांच्या बिलास ही एक 'सवतच' उत्पन्न झाली. कां कीं, या नवीन मोहक देणगीचें कौतुक करण्यांत लोक गुंग होऊन गेले म्हणजे अर्थातच त्यांचें लक्ष ना. गोखले यांच्या बिलावरून कमी होईल. "कोणाकडून कां होईना ! सरकार शिक्षणाचें क्षेत्र वाढविणें हें आपलें पवित्र कर्तव्य आहे अशी कबुली देत आहे कीं नाहीं ! मग तुमचें तें बिल, त्यांतली ती फीची माफी, आणि ती सक्तीची खुपी हीच कशाला हवी !" असें यावर म्हणणारे लोक भेटतील अशी आम्हांस खात्री आहे. ना. गोखले यांचें बिल पास झालें असतां त्याचे योगानें प्राथमिक शिक्षणाचें क्षेत्र जितकें वाढण्याचा संभव असता तितकाच वाढावा सरकार खरोखरच स्वेच्छेनें व स्वतःच्या खर्चानें करणार आहे, हाच या पन्नास लक्षांच्या देणगीचा अर्थ असेल तर मग आमचेंहि कांहीं म्हणणें नाहीं. ना. गोखल्यांच्या बिलाप्रमाणें लोकांवर एकतृतीयांशच कां होईना पण आपखुषीनें पतकरलेल्या खर्चाचा जो बोजा पडणार तो न पडतां, तेंच कार्य परस्पर सरकारनें केलें तर मग "आंधळा मागतो एक डोळा आणि देव देतो दोन" या म्हणीप्रमाणेंच होईल. मग, आपल्या बिलाला नवीन देणगी ही एक सवत उत्पन्न

झाली असें गोखल्यांनाहि वाटणार नाहीं. कारण सपत्नी झाली तरी—ती जर खरोखर पतिव्रता असेल तर—तिला असेंच वाटणार कीं, 'आपल्या-कडून नसलें तरी आपल्या सवतीकडून कां होईना पण आपल्या पतीला एक-दांचें पुत्रसंतान लाभो!' ना. गोखल्यांच्या बिलांतील नियमबद्ध राजनीति किंवा सरकारची स्वेच्छाचारी राजनीति—यांपैकीं कोणत्याहि कामिनीच्या पोटीं कां होईना खऱ्या राष्ट्रीय अशा प्राथमिक शिक्षणाचें बाळ जन्मास येवो म्हणजे झालें! तात्पर्य, शिक्षणास दिलेली पन्नास लाख रुपयांची देणगी आज आम्हांस प्रिय आहे. तिच्या अंगीं गुप्त अशीं दुसरीं कांहीं लक्षणें—कुलक्षणें असल्यास तीं दृष्टोत्पत्तीस आल्यावर मग पाहतां येईल.

## नगदी दान व कागदी मान

रोख पैशाच्या अशा दुसऱ्याहि एक दोन देणग्या बादशहांकडून देण्यांत आल्या. पन्नास रुपयांहून अधिक पगार नसणाऱ्या मुलकी व लष्करी नोकरांस अर्ध्या महिन्याचा पगार बहाल करण्यांत आला. गरीब लोकांस राजेसाहेबांनीं अशा रीतीनें गुंज-मासा-तोळा कांहीं तरी सोनें दिलें, याबद्दल त्यांना दरबारचीं आठवण व राजेसाहेबांविषयीं कृतज्ञता वाटेल यांत शंका नाहीं. प्रत्यक्ष द्रव्याप्रमाणेंच बहुमानाकरितां भुकेलेले याचक इतर सर्व देशांप्रमाणें हिंदुस्थानांतहि पुष्कळच असतात, सबब त्यांच्या—आणि बहुमानाची अपेक्षा न करणाऱ्या अशा निस्पृह नोकर लोकांच्या व खासगी प्रजाजनांच्या-सेवेबद्दलहि सरकार उतराई झालें हें या प्रसंगीं योग्यच झालें. आपल्या मांडलिक सामंत वर्गाला प्रेमदर्शक व स्नेहदर्शक अशा पदव्यांखेरजि दुसरी कोणती देणगी कोणताहि सम्राट देऊं शकणार? व लक्ष्मीच्या कृपाकटाक्षामुळें आधींच संपन्न असलेल्या राजेरजवाड्यांस दुसरी कोणती देणगी अधिक प्रिय असणार? अशांची, कोणास तोफांची सरबत्ती तर कोणास किताब देऊन बादशहांनीं संभावना केली. प्रत्यक्ष जमीनजुमला व जहागिरी देण्याची पद्धत इंग्रजी राज्यांत एकंदरीनें पाहातां कमीच आहे! तथापि, एक दोन पिढ्यांपर्यंत चालणारीं कांहीं वतनें व जहागिरी देण्याचें उदक सुटलें असून त्या कोणाच्या पदरांत पडतात हेंहि सरकारी ग्याझिटांत प्रसिद्ध झालें आहे. दरबारच्या प्रसंगीं बादशहांना हिंदुस्थानांतील आपल्या इमानी लष्कराचा विसर पडणें शक्यच नव्हतें; व लष्करी दृष्टीनें शूर शिपायांस प्रिय अशा 'व्हिक्टोरिआ क्रॉस' चें पदक छातीवर लटकवण्याचा

मान जो आजपर्यंत फक्त गोऱ्या सैन्यास मिळत असे तो, यापुढें काळ्या सैन्या-सहि मिळावा, असें ठरवून सरकारनें या कामीं इतके दिवस झोंपी गेलेल्या न्यायबुद्धीस जागें करून दरबार पहावयास आणिलें ही फार चांगली गोष्ट झाली. छातीवर लटकविण्यास बहुमनाचा बिल्ला जो देईल त्याला आपलें काळीजहि कापून देण्यास खरा शिपाई गडी तयार असतो; आणि सन १८५७ चें अपवादात्मक साल वगळलें असतां, कंपनी सरकारच्या वेळेपासून काळ्या पलटणींनीं इंग्रज सरकारची जी इमानानें नोकरी केली तिजबद्दल व्हिक्टोरियाच्या नांवाचा बिल्लाच काय पण त्याहूनहि एखादा विशेष मान दिला असता तरी तो हवाच होता. उदाहरणार्थ, लष्करी नोकरी करितां करितां ज्यांच्या काळ्या केसांचे पांढरे केस झाले आहेत, लष्करी बहुमानाच्या अजबखान्यांत सांठविलीं जाणारीं सर्व पदकें व फिती लटकविल्या असतांहि झांकून न जाणाऱ्या कशा हंसतमुख जखमांच्या रूपानें ज्यांची वीर्यश्री वक्षस्थळावर विनटली आहे अशा योद्ध्यांना, ते केवळ कृष्णवर्णदूषित म्हणून, सुभेदार-मेजर किंवा रिसालदार–मेजर यांच्याहून वरच्या पायरीस पाय लावितां येत नाहीं! आणि इंग्लंडांत कांहीं थोडे महिने लष्करी शिक्षण घेतांच कमिशन मिळून लेफ्टनंटच्या हुद्यावर येऊन बसणाऱ्या पण अद्याप 'मिसरू'–हि न फुटलेल्या–गोऱ्या अधिकाऱ्यांच्या हुकमतींत त्यांना नोकरी करावी लागते! ही केवढी अन्यायाची गोष्ट आहे! बिनलष्करी पेशाच्या हिंदी लोकांचें गाऱ्हाणें तर याहूनहि फार मोठें आहे. कारण त्यांना लष्करी शिक्षण मुळींच मिळत नाहीं किंवा व्हॉलंटियर होण्याची परवानगी देण्यांत येत नाहीं. यामुळें राष्ट्राच्या संरक्षणास यथाशक्ति हातभार लावून घडणारी राजसेवा करण्याची आकांक्षा यत्किंचितहि सफळ झाल्याशिवाय त्यांच्या पिढ्यानुपिढ्या लोटत आहेत. यास्तव या बाबतींत एक पाऊल पुढें टाकून लष्करी शिक्षणाचा 'ओनामा' तरी शिकविण्याची लहानशी देणगी बादशहांच्या हस्तें मिळाली असती तर आम्हांस फार बरें वाटलें असतें.

## औदार्यांतला पंक्तिप्रपंच

राज्यारोहणाचे प्रसंगीं बंदिवान मुक्त करण्याची चाल सर्व देशांत सर्व काळीं प्रचारांत होती; व तिला अनुसरून या दरबारच्या प्रसंगीं अकरा हजार कैदी मोकळे करण्यांत आले. तसेंच, दिवाणी तुरुंगांतील दोनशें बंदिवान सोडून

त्यांच्या कर्जाची रक्कम सरकारी तिजोरींतून देण्याचें ठरलें आहे. मनुष्यमात्रास स्वतंत्रता प्रिय असतेच, व हल्लीं सोडलेल्या अकरा हजार कैद्यांमुळें तुरुंगांतील गर्दी थोडीबहुत मोडून इतके तरी लोक, ईश्वरानें त्यांस सुबुद्धि दिल्यास, कांहीं तरी प्रामाणिक उद्योगधंदा करून पोटास मिळवूं लागतील. परंतु राजकीय अशा स्वरूपाचे कैदी फारच थोडे सोडण्यांत आले असून इतरांस–व तेंहि पाहून पाहून–दरवर्षामागें एक महिना याप्रमाणें कैदेच्या मुदतींत सूट मिळणार आहे. पण असल्या या पंक्तिप्रपंचानें या विशिष्ट देणगीस बरीच गौणता आली आहे. दरबारासारखे प्रसंग हे इतके उदात्त आहेत कीं, त्या वेळीं राजा व प्रजा या उभयतांच्याहि मनांतील खुनशीपणा, हेकेखोरपणा, वगैरे क्षुद्र मनोवृत्तींचा लोप होऊन, प्रजेच्या बाजूनें राजनिष्ठा व कृतज्ञता तर राजाच्या बाजूनें क्षमा व दया या सात्विक भावनांचाच उदय झाला पाहिजे. राजा व प्रजा दोघांनींहि परस्परांशीं, मोरोपंतांच्या एका प्रसिद्ध आर्यार्धांत म्हटल्याप्रमाणें, "चुकणें भूषण आम्हां भूषण करणें तुम्हां क्षमा देवा" असे नम्रतापूर्वक प्रत्यक्ष तोंडानें उद्गारच न काढले तरी ते उद्गार काढल्याप्रमाणें हातून कृति करावयास पाहिजे! अमूर्त राजा व अमूर्त प्रजा यांचें भांडण कदाचित् अबाधित रीतीनें अनंत काळ टिकणारें असेल; परतु हें भांडण उभयपक्षांकडील व्यक्तींनीं मधून मधून संपविलें पाहिजे! रजोगुण व तमोगुण ही जरी मनुष्यप्रकृति असली तरी, सत्वगुणाचें अतिमानुष तेज मनुष्यामध्येंहि उदित होऊं शकतें हें दाखविलें पाहिजे!

## बंगालनें बाजू सावरली

वरील विवेचनावरून हें दिसून येईल कीं, बादशाही देणग्या जर येथेंच थांबल्या, तर त्या कांहीं गौण व कांहीं अपूर्ण असल्यामुळें दरबार सर्वस्वीं नीरस व फिका पडला असता. मग, आशेनें सतेज केलेल्या मुखांनीं दिल्लीस जाणारी प्रजा, आणि अठरा विसवे निराशेनें निस्तेजमुख होऊन परत येणारी प्रजा यांतील विरोधाचें चित्र खुद्द एखाद्या चित्रकारास कोणत्याहि उपायानें काढतां आलें नसतें! पण सर्वांच्याच सुदैवानें बंगालची फाळणी–अगदींच रद्द न केली तरी–बंगाली लोकांच्या म्हणण्याप्रमाणें दुरुस्त करण्याची देणगी देण्याचा सल्ला लॉर्ड हार्डिंज व त्यांचें कौन्सिल यांजकडून राजेसाहेबांस मिळाला; व त्यांनींहि तो मान्य केला. या गोष्टीनें थोडी तरी बाजू संभाळली! फाळणी दुरुस्त होऊन बंगालचें

एकीकरण झाल्याची बातमी ऐकून, ' आतां आपणांस मृत्यु आला तरी आपण आनंदानें मरूं ' असें बोलून दाखविण्याइतका जरी कित्येक वृद्ध बंगाली पुढा-यांस हर्ष झाला असला तरी वास्तविक पहातां, फाळणीची दुरुस्ती केली यांत तरी अधिक तें काय झालें ? यानें कांहीं सर्व हिंदी प्रजेस, किंवा खुद्द बंगाली लोकांनाहि, पूर्वी नव्हता असा एखादा नवीन अधिकार किंवा मान मिळाला असें नाहीं. बंगालची फाळणी केली—एका नाऱ्याचे दोन नाऱ्ये केले— हीच मूळची चूक ! बंगाली लोक ' नको, नको ' असें म्हणत असतां ती केली ही दुप्पट चूक ! आणि केवळ बंगाली लोकांचें वैर साधण्याच्या आणि त्यांचे कायमचें नुकसान करण्याच्या असदूहेतूनें कर्झनसाहेबांनीं ती वेड्यावांकड्या रीतीनें केली ही तर घोडचूक ! लॉर्ड कर्झन यांच्यासारख्या बिनमुरवतखोर कारभाऱ्यानें केलेली ही घोडचूक लॉर्ड मोर्ले यांच्यासारख्या सरळ व उदार मनोवृत्तीच्या मुत्सद्यानें, तिच्यांतील दोष कळतांच, सुधारावयास पाहिजे होती. पण तसें न करतां उलट त्यांनीं तिच्यावर " वज्रलेप " म्हणून शिक्का मारला ! पुढें असल्या अन्यायी हेकेखोरपणाचे परिणाम कोणत्याहि जिवंत राष्ट्रांत व्हावयाचे तसेच हिंदुस्थानांतहि झाले. आधींच थंड असलेल्या डोक्यांवर, असल्या प्रचंड खळबळींतहि, शांततेच्या बर्फांची अक्षय घडी पडल्याप्रमाणें ज्यांचें मन व जिव्हा निर्विकार व निष्कंप भासल्यामुळें, जे शहाणपणाच्या मुत्सद्दीगिरीचा अवतार असें इंग्लंडांतील अधिकाऱ्यांस वाटलें—व ज्यांना विचारलें असतां खासगी संभाषणांत किंवा पत्रव्यवहारांत तरी ते आपणांस बरें म्हणून आधार देतील अशी लिबरल प्रधानमंडळास आशा होती—त्यांनींहि " भरंवशाच्या म्हशीस टोणगा " ही म्हण खरी करून दाखविली; उलट खासगी संभाषणाच्या आवरणानें कुशल सल्लागारास स्पष्ट व निर्भीडपणें बोलण्याचा जो फायदा मिळूं शकतो तो घेऊन त्यांनीं मृदुवाक्पुष्पांऐवजीं तीक्ष्ण वाक्शरांचाच प्रहार केला ! तेव्हां लिबरल प्रधानमंडळाचा नूर सहजच बदलला. पार्लमेंटांतील पक्षभेदांच्या अडचणी यांतच भर पडली. व सर्वांत विशेष हें कीं राजेसाहेब हिंदुस्थानांत जाऊन दरबार भरविणार ही लोकोत्तर संधि उपस्थित झाली. उलटी उडी मारण्याचें जबाबदार अधिकाऱ्यांना जें केव्हांहि प्राणसंकट वाटत असतें तें निभावून नेण्यास असा सोन्यासारखा प्रसंग दुसरा कोणता येणार ? व हा प्रसंग साधून बंगालची फाळणी दुरुस्त करण्याचा शहाणपणाचा निश्चय प्रधान-

मंडळानें केला; व तो शेवटीं सिद्धीसहि गेला. पण यांत खरोखर पाहातां नवीन असें काय मिळालें ! बंगाली राष्ट्रावर जें एक गंडांतर आलें होतें तें टळलें इतकेंच काय तें; पण गंडांतर टळणें व पुत्रजन्म होणें हें कांहीं एकच नव्हे. अर्थात् ही देणगी ' निगेटिव्ह ' ( अभावरूप ) अशा स्वरूपाची आहे. इसापनीतींतलि कोल्ह्याची व बगळ्याची गोष्ट प्रसिद्धच आहे कोल्ह्याच्या घशांत अडकलेलें हाडूक बगळ्यानें चोंचीनें बाहेर काढल्यावर हा लांबमान्या भोळा वैद्य आपल्या या शस्त्रक्रियेची फी कोल्होबापाशीं मागूं लागला ! तेव्हां कोल्ह्यानें उत्तर केलें कीं, " तुझी मान माझ्या जबड्यांत सांपडली असतां ती मीं दांतानें कापली नाहीं याबद्दल तूंच उलट माझे आभार मानिल पाहिजेस ! फी कसची मागतोस ! !" बंगालची फाळणी रद्द केली—अर्थात् बंगाली राष्ट्राचें शरीर चिरून दोन शकलें करण्याचा जो नसता प्रसंग आला होता तो सरकारानें हल्लीं टाळला—याबद्दल बंगाली लोकांनीं सरकारचे आभार मानणें खरोखर इसापनीतींतील या बगळ्यानें आभार मानण्याइतकेंच सकारण होईल. नको नको म्हणत असतां आधीं बंगालचे तुकडे केले कां ! व ते शिवून आतां शरीर पूर्वीसारखें बेमालूम करून दिलें—बंगाली लोकांच्या दृष्टीनें खरोखर तें पूर्वीइतकें बेमालूम झालेंहि नाहीं—याबद्दल आभार व कृतज्ञता मागतां तरी कसली ? पण मनुष्यस्वभावच असा आहे की, संकट नसतां जो आनंद त्यास असतो तोच आनंद संकट येऊन त्याचें निवारण झालें असतां द्विगुणित होतो. घाट चढून उतरलें म्हणजे सपाट मैदानाची किंमत कळते. तसेंच राष्ट्राच्या चरित्रांतहि चढ—उतारापासूनच नवीन नवीन आनंद लाभतात. या दृष्टीनें पहातां, बंगालचीं शकलें होण्याचें गंडांतर टळून फिरून सर्व बंगाली लोकांचें एक राष्ट्र झालें, याचा त्यांना आनंद वाटणें साहजिकच आहे. वाइटांतल्या चांगल्याशिवाय, वाइटांतून चांगलें निघालेलें पहाण्याकडे नेहमीं तत्ववेत्त्यांची दृष्टि असते हें तर खरेंच; पण बंगालची फाळणी होऊन ती रद्द झाली या अकारण अनर्थापातापासून खरोखरच कित्येक चांगल्या गोष्टी उद्भवल्या आहेत. सरकारच्या नजरेनें पहतां, बंगालची फाळणी रद्द केल्यामुळें बंगाली लोकांच्या राजनिष्ठेस जो आज पूर येत आहे, तो फाळणी होण्याच्या पूर्वी बंगाली लोकांच्या मनांत असलेल्या अर्धकोमट राजभक्तीहून व बिनमुर्वतखोरपणाहून अधिक प्रिय व उपयुक्त होईल यांत शंका नाहीं. क्षुल्लक कारणांनीं क्षणभर होणाऱ्या अबोल्यानें प्रेमाची किंमत दुणावते.

इंग्रजी कवि टेनिसन याचें

Blessings on the falling out
That all the more endears

हें सुभाषित यथार्थ आहे. "तप्तेन तप्तमयसाघटनाय योग्यं"–लोखंडाचे तुकडे सांधावयाचे असल्यास ते प्रथम खूप तापवावे तेव्हांच सांधतात–हा प्रेमाच्या दृढसंयोगाला कालिदासानें दिलेला दाखला प्रसिद्धच आहे. तात्पर्य, बंगालची फाळणी होऊन मग रद्द झाल्यानें सरकार व प्रजा यांच्या मनाचें एकीकरण, फाळणीचें संकट उद्भवण्याच्या पूर्वीच्या एकीकरणाहून अधिक दृढ झालें आहे हें कोणीहि कबूल करील. दुसरे पक्षीं, बंगाली लोकांच्या दृष्टीनेंहि वाइटांतून चांगलें असें बरेंच निघालें आहे. केवळ बंगालची फाळणी दुरुस्त करण्याचा एक प्रकार म्हणून बंगाल्यास स्वतंत्र गव्हर्नर व कौन्सिल मिळालें; अर्थात् बंगालचा राजकीय दर्जा वाढला आहे. पण फाळणीचा हा प्रश्न मुळीं नच निघता तर, स्वाभाविक प्रगतीच्या नेहेमींच्या मंद चालीनें चालत असतां, हा मान आज तारखेस बंगाल्यास मिळता किंवा नाहीं याची शंकाच आहे. बंगाली लोकांप्रमाणें बिहारी लोकांनाहि स्वतंत्र प्रांतिक बहुमानाची आकांक्षा होती. पण फाळणीचा पहिला ब्रह्मघोटाळा व त्यांतून कांहीं तरी मार्ग काढण्याची जरूरी प्राप्त झाली नसती तर, बिहार हा आजवर स्वतंत्र प्रांत झालाच नसता. वरील मानीव फायद्यांपेक्षां बंगाल्यास दुसरा एक फायदा झाला आहे, व तो मात्र अगदीं खराखुरा व भरीव आहे. हा फायदा म्हणजे फाळणीच्या प्रसंगानें बंगाली राष्ट्राला राजकीय भांडण भांडण्याचें आपलें सामर्थ्य व आपली करामत सरकारच्या नजरेस आणून त्याविषयीं त्यांची लेखी कबुलीहि घेतां आली! या बाबतींत नुकत्याच प्रसिद्ध झालेल्या सरकारी खलित्यामध्यें बराच पुरावा सांपडण्यासारखा आहे. बंगालची फाळणी रद्द करण्याची सूचना स्टेट सेक्रेटरीस करतांना, हिंदुस्थानसरकारानें बंगाली चळवळीस बळसा घालून बगल मारून जाण्याचा आपल्याकडून प्रयत्न केला. कर्झनसाहेबांनीं केलेली फाळणी अशी चुकली आहे, तशी बरोबर नाहीं; तिजपासून अमुक नफे झाले नाहींत, तमुक तोटे झाले आहेत–वगैरे एरवींचा तपशील पुष्कळ सांगितला. पण बंगाली चळवळीचा मल्ल त्यांच्या मार्गांत हात पसरून वाट अडवून उभा असल्यामुळें, त्याची नजर चुकवून स्टेटसेक्रेटरीकडे जाणें हिंदुस्थानसरकारला अशक्य झालें; व त्यांनीं या चळवळीच्या मल्लाला आदरपूर्वक हस्तस्पर्श करून सलामी दिली तेव्हांच त्यांचा

मार्ग खुला झाला; आणि त्यांनीं सूचनेच्या समर्थनार्थ केलेल्या युक्तिवादाला समर्पकता आली. या मुद्यास अनुसरून हिंदुस्थानसरकार आपल्या खलित्यांत म्हणतात–" बंगालच्या फाळणीपासून उत्पन्न झालेला ताप व तोंडाचा कडवटपणा कितीहि गोड गोड औषधें दिलीं तरी, नाहींसाच होत नाहीं. काय करावें ? उलट हट्टास पेटल्याप्रमाणें तो दिवसेंदिवस वाढतच आहे. ही खात्री अनेक गोष्टींनीं आमच्या मनावर आतां अगदीं चांगली बिंबली आहे ! " या अनेक 'गोष्टी' कोणत्या याचा थोडासा तपशील अगर खुलासा खलित्यांत केला असता तर हिंदुस्थानचा 'कॉन्स्टिटयूशनल' इतिहास लिहिणारास बराच उपयोग झाला असता. पण कसेंहि असो; बंगाली भावनेचा व चळवळीचा आदरपूर्वक उल्लेख करून फाळणी रद्द करावी असें म्हणून सरकारानें मनाचा जो निष्कपटपणा व प्रांजलपणा दाखविला, त्याबद्दल त्यांची प्रशंसा करावी तेवढी थोडीच होणार आहे ! प्रथम तिरस्कारपूर्वक वागवून व अखेर प्रत्यक्ष शरीर चिरून बंगाली राष्ट्राचें जें मूठभर मांस लॉर्ड कर्झन यांनीं काढून घेतलें होतें, तें लॉर्ड हार्डिंज यांनीं सव्याज परत दिलें यांत शंका नाहीं ! फाळणीच्या पूर्वी बंगाली बाबू हा 'भित्रा' मानला जात असे; फाळणीनंतर तोच बाबू 'फाजील धीट' आहे अशी उलट तक्रार झाली. फाळणीपूर्वी युरोपियन लोकांनीं बंगाली बाबूकडे खुशाल टवकारून पहावें व बाबूनें मान खालीं घालावी असा प्रकार होता; फाळणीनंतर तोच बाबू 'उन्मत्तपणें आमच्याकडे टक लावून पहातो' असें गाऱ्हाणें युरोपियन लोकांकडून होऊं लागलें. अशा एक कां दोन गोष्टी म्हणून सांगाव्या ? थोडक्यांत सांगावयाचें तर असें म्हणतां येईल कीं, लॉर्ड मेकॉले यांनीं साठसत्तर वर्षांपूर्वी बंगाली लोकांचें जें तिरस्करणीय व हिडिस चित्र रंगवून ठेविलें होतें त्यावर; बंगाली राष्ट्रानें फाळणीनंतर एकजात पांढऱ्या रंगाचा बोळा फिरवून पुढें येणाऱ्या एखाद्या चित्रकाराकरितां त्याच चित्र-फलकावर कोरी करकरित भूमिका तयार करून ठेविली, ही सर्व कामगिरी एकट्या फाळणीची ! हा सर्व उपकार एकट्या कर्झनचाच ! आणि खरोखरच मार्मिक राष्ट्रीयदृष्ट्या बंगाली लोकांनीं पुतळाच उभागवयाचा तर तो लॉर्ड हार्डिंज यांचा न उभारतां लॉर्ड कर्झन यांचाच उभारला पाहिजे ! पण लॉर्ड कर्झन यांनीं तरी काय करावें ? साडेसातींतल्या शनीला देखील नाइलाजानें कांहीं वेळ उदरीं येऊन आपल्या घातक पाशांत पकडलेल्या मनुष्याचें थोडेंबहुत हित झालेलें

पहावें लागतें! मत्त हत्तींच्या गंडस्थळांतून वहाणाऱ्या मदसेकाहूनहि ज्यांच्या अहंकाराचा दर्प लोकांस अधिक दुःसह झाला अशा ज्या कर्झनसाहेबांनीं, १९०३ सालीं संस्थानांतून गोळा केलेल्या खिल्लारभर हत्तींच्या पाठीवरील देव्हाऱ्यांत स्वतःस व आपल्या आश्रितांस बसवून इंद्रप्रस्थासंन्निध स्वतःचा इंद्राप्रमाणें जयजयकार करून घेतला व लगेच त्या अहंकाराच्या भरांत बंगाली राष्ट्रावर ‘ तरवार ’ चालवून त्याचीं दोन शकलें केलीं त्या कर्झनसाहेबांना, खुद्द राजेसाहेबांनीं त्याच दिल्लीस येऊन मवाई बडेजावीचा दरबार भरवून, तेथेंच बंगालची फाळणी आपल्या मुखानें रद्द केलेली पहावी लागली; व पार्लमेंटांत बसल्या जागेवर दांत ओठ चावण्यापलीकडे त्यांना आपल्या स्मृतीच्या या अधःपाताचा दुसरा कांहींएक प्रतीकार करतां आला नाहीं हें पाहून प्रबळ व दुर्बळ या दोघांनाहि बोध घेतां येण्यासारखा आहे!

## वास्तुदेवतेचें दर्शन

लोकांच्या दृष्टीनें दरबारच्या नाटकाचा रसोत्कर्ष बंगालची फाळणी रद्द केल्यानें बराच घडून येण्यासारखा होता. पण खुद्द सरकारचें समाधान तेवढ्यानें झालें नाहीं हें उघड दिसतें; कारण याहूनहि अधिक आश्चर्योत्पादक असा देखावा दाखविण्याची त्यांनीं गुप्त योजना केली होती. कारण कोणास यत्किंचितहि मागमूस नसतां दरबारच्या अखेरीस राजेसाहेबांनीं उठून असें जाहीर केलें कीं, “ आजपासून दिल्ली ही बादशाही राजधानी होईल. ” नाटकांतील एकदम बदलणारे देखावे पहाण्याची संवय झालेल्या प्रेक्षकांस वरील उद्गारांनीं लोक किती आश्चर्यचकित झाले असतील याची थोडीशी कल्पना येईल. “ राजा बोले व दळ हाले ” अशी एक म्हण असून तिचा अनुभव बरेच वेळां पहावयास सांपडतो. या प्रसंगीं ‘ राजा बोले राजधानी हाले ’ असा चमत्कार घडून आला! “ दिल्ली ही आजपासून राजधानी झाली आहे ” ह्या एका वाक्यानें, जादूगाराच्या एखाद्या महामंत्राप्रमाणें, क्षणार्धांत भव्य प्रासादपूर्ण व ऐश्वर्यसंपन्न अशा कलकत्ता नगराचे प्राणच नसले तरी चिच्छक्तीचें सर्व तेज शोषून घेतलें गेलें; व त्याच क्षणीं त्याच मंत्रानें शिलामय होऊन पडलेल्या दिल्ली नगरीच्या वास्तुदेवतेस सजीव करून आपल्या समोर उभे केलें, असें म्हणण्यास हरकत नाहीं. रघुकुलोत्पन्न राजा कुश हा कुशावती नगरींत राज्य करीत असतां, रामचंद्राच्या अवतारसमाप्तीनंतर ओसाड पडलेल्या अयोध्या नगरीची अधिदेवता मध्यरात्रीं राजवाड्यांतील शय्यागृहांत शिरून, तिनें मलीन अश

प्रोषित-भर्तृका-वेशांत वनितारूपानें कुशाला स्वप्नांत दर्शन दिलें, आणि खालील दीन उद्गार काढिलेः—

विशीर्णतल्पाट्टशतो निवेशः !
पर्यस्तशालः प्रभुणा विना मे ॥
विडंबयत्यस्तनिमग्नसूर्यम् ।
दिनान्तमुग्रानिलभिन्नमेघम् ॥

आणि

तदर्हसीमां वसतिं विसृज्य ।
मामभ्युपैतुं कुलराजधानीम् ॥

अशी याचना केली असें वर्णन कालिदासानें केलें आहे. जॉर्ज बादशहा हिंदुस्थानांत येण्याचें ठरल्यावर त्यांच्या लंडन येथील शय्यागृहांत असाच अर्धरात्रीं प्रवेश करून, अनाथ झालेल्या दिल्ली नगरीच्या अधिदेवतेनें आपणास सनाथ करण्याची याचना त्यांना केली व दुसरे दिवशीं सकाळीं लॉर्ड हार्डिंज यांचा खलिता त्यांचे हातीं पडला, असें झालें कीं काय कोण जाणें ! परंतु स्वप्नामधील देवतादर्शनानें उल्हास पावलेल्याप्रमाणें व उत्सुक झालेल्याप्रमाणें बादशहांनीं तांतडी करून दिल्लीस आगमन केलें, व दरबारच्या अखेरीस दिल्लीची पुनः प्राणप्रतिष्ठा केली. हा सर्व प्रकार इतका अकल्पित झाला कीं, एखाद्या उज्ज्वल कल्पनेच्या नाटककारासहि तो सुचवितां आला नसता ! आतां नाटककारांची पाणचट मित्रमंडळी एखाद्या प्रसंगीं पडदा बाजूस सारून आंतील देखावा अवेळींच उघडा पाडतात, त्याप्रमाणें अलाहाबादच्या 'पायोनिअर' पत्रानें, कलकत्ता सोडून खलित्यांत बसून दिल्लीकडे चाललेल्या राजधानीच्या विमानाचे खूर लोकांच्या नजरेस पाडिले होते; व या गोष्टीचा मागिल लेखांत आम्हीं थोडासा उल्लेख केलाच होता. तथापि, कलकत्ता नगरीवरचीं सौभाग्यचिन्हें निघून तीं दिल्ली नगरीवर हटकून चढणार अशी फारच थोड्यांना कल्पना होती, व नक्की बातमी अशी कोणासच नव्हती. यामुळें दरबारच्या नाटकाचा अखेर प्रवेश फारच रंगला यांत शंका नाहीं. कलकत्त्याहून राजधानी उठवून ती दिल्ली येथें स्थापल्याबद्दल आम्हां स्वतःस विशेष बरेंहि वाटत नाहीं, व विशेष वाईटहि वाटत नाहीं. कलकत्त्याच्या व्यापारी मंडळाचें मत जाहिर करणाऱ्या अँग्लो-इंडियन वर्तमानपत्रांनीं लॉर्ड

र्हार्डिंज यांस उघड शिव्याशाप देण्यास सुरवात केली आहे. बंगाली वर्तमानपत्रांनींहि थोडीबहुत अप्रियता व्यक्त केली आहे. राजधानी उठल्यानें कलकत्त्याच्या लोकांचें थोडेंबहुत नुकसान होणार हें खरें; तथापि बंगालची फाळणी करूं नये हें म्हणण्याचा बंगाली लोकांना जितका हक्क होता, तितका राजधानी बदलली म्हणून गवगवा करण्यास त्यांस पोहोंचेल किंवा नाहीं याची शंका आहे, व या शंकेची जाणीव खुद्द बंगाली पत्रांनाहि आहे असें त्यांच्या स्तिमित टीकेवरून वाटतें. पार्लमेंटातहि याविषयीं चर्चा झाली; परंतु तेथील सर्व स्पष्टोद्गार ऐकूं येण्यास अजून अवकाश आहे.

## तरी हें ठीकच

कसेंहि असलें तरी, दिल्ली ही राजधानी झाली खरी ! व वंगभंगाच्या 'वज्रलेपाहून' हा लेप अधिक चिकट ठरणार ! नवीन राजधानी बसविण्यास लागणारी जमीन व इमारती बांधण्यास लागणारा पैसा यांची तरतूद होऊन ता. १५ रोजीं नव्या शहराची कोनशिलाहि बादशहांच्या हस्तें बसविण्यांत आली व हिंदुस्थानच्या भावी इतिहासांतील एका नव्या युगास प्रारंभ झाला हें निश्चित होय. दिल्लीस राजधानी करण्यापासून साम्राज्यवादी भावनेच्या समाधानाशिवाय दुसरा अमुक एक विशेष फायदा आहे असें आज तर दिसत नाहीं. हिंदुस्थानचे लोक भावनेनें भारले जातात अशी राज्यकर्त्यांची समजूत असल्यामुळें, त्यांना जिकडून मोह पडेल व इंग्रजी साम्राज्य अधिक प्रिय होईल तें करण्याच्या वर्गांत हल्लींचें हें कृत्य उघड पडत आहे; पण हरिणांना मोह पाडण्याकरितां फासेपारधी गोड गाणें गाऊं लागला असतां त्या गाण्याच्या गोडीचा अंमल हरणाप्रमाणें फासेपारध्यावरहि केव्हां केव्हां चढून, त्या गाण्यानें कोण अधिक तल्लीन झाला व देहभान विसरला ! हरिण कीं पारधी—हें सांगणें कठीण पडतें असाहि चमत्कार कित्येक वेळां घडून येतो. दिल्ली शहर हिंदुस्थानची राजधानी करून सरकारानें लोकप्रिय अशा एक गोड गाण्याची तबकडी 'ग्रामोफोन' वर ठविली खरी; पण त्यापासून निघणाऱ्या व काळजास हात घालणाऱ्या रम्य मधुर सुरांचा अंमल लोकांवर अधिक चढतो का राज्यकर्त्यांवर अधिक चढतो, हें भावी इतिहासकारच दाखवूं शकतील. कलकत्त्यासारख्या बकाली व व्यापारी शहरांत राजधानी असतां हिंदुस्थानांत राज्य करून कायमचे राहण्याचा आमचा निश्चय होता तोच दिल्लीच्या खानदानी व बादशाही नगरींत राजधानी स्थापून

आपण दृढ करीत आहों, हें दाखविण्याचा सरकारचा इरादा असल्याचें खुद्द खलित्यांतच लिहिलें आहे. असला निश्चय उत्साही व शूर राज्यकर्त्यास खराच शोभतो. ग्रीक इतिहासांत अशी एक गोष्ट आहे कीं, एके वेळीं एका सरदारानें आपलें सैन्य जहाजांतून जमिनीवर उतरविल्यावर त्यानें तीं जहाजें स्वतःच जाळून टाकिलीं. मनांतील हेतु हा कीं, पळून जाण्यास आपल्या जवळ साधन आहे ही नुसती कल्पना जरी शिपायांच्या मनांत राहील, तरी या युद्धाच्या कामीं हात चालविण्यास त्यांची जरा तरी ढिलाई होईल. अर्थात् जहाजें हें जें पळून जाण्याचें साधन तेंच नाहींसें केलें म्हणजे ती शंकाहि निर्मूळ झाली. तानाजी आपले मावळे घेऊन सिंहगडावर चढला तेव्हां, अपयश घेऊन दोर धरून पळून जाण्याचा शिपायांना मोह पडूं नये म्हणून, त्यानें दोरच कापून टाकला असें सांगतात. कलकत्त्यासारखी किनाऱ्यावरील राजधानी सोडून पांचशें कोस आंत असलेल्या दिल्ली शहरांत सरकारनें राजधानीचें ठाणें वसाविलें, ही गोष्ट खुद्द सरकारच्या निश्चयी व करारी स्वभावास जितकी भूषणभूत आहे, तितकीच हिंदी प्रजेलाहि आशाजनक व उल्हासकारक आहे असें आम्ही म्हणतों. कारण इंग्रज लोकांनीं जगांत ज्या ज्या ठिकाणीं कायमची वस्ती केली त्या त्या ठिकाणीं विद्या, सुधारणा व राष्ट्रीय स्वातंत्र्य यांचे वाडे त्यांनीं उठविले. मग हिंदुस्थानांतच हे वाडे कां न उठतील !

---

## ११ एडवर्ड बादशहांचा मृत्यु ! !

( तारीख १० माहे मे सन १९१० )

इंग्लंडचे राजे व हिंदुस्थानचे बादशहा सप्तम एडवर्ड यांस गेल्या शुक्रवारीं रात्रीं कफाचे विकारानें एकाएकीं देवाज्ञा झाल्याची दुःखकारक वार्ता शनिवारीं सकाळीं सर्व जगभर पसरून, सर्व जगभर त्यांच्या मृत्यूमुळें जी हळहळ वाटला त्याच्या ताराहि गेल्या दोन दिवसांत हिंदुस्थानांत येऊन दाखल झाल्या आहेत. चोहोंकडे त्यांच्या मृत्यूमुळें एकजात खिन्नता आलेली असून, राजेसाहेबांच्या जिवावर दुर्धर रोगानें अगदीं आकस्मिक रीतीनें घाला घातल्यामुळें दुःख दुणावलें आहे. राजेसाहेबांची प्रकृति गेल्या आठवड्यापर्यंत नेहमींप्रमाणें चांगली

निकोप असून अॅटलांटिक महासागराच्या किनाऱ्यावरील बायरट्झ नांवाच्या त्यांच्या आवडत्या फ्रेंच आरोग्य–भवनाहून नेहमींप्रमाणें हवा खाऊन ते नुकतेच परत आले होते. तथापि, हल्लीं प्रसिद्ध झालेल्या हकीकतीवरून असें दिसतें कीं, या आरोग्य-भवनामध्यें हवा खात असतां राजेसाहेबांस थंडी झाली, व ती इंग्लंडला परत आल्यावर कमी न होतां उलट वाढली. उतारवयामध्यें मनुष्यावर वात, पित्त किंवा कफ यांपैकीं एकनाएक विकाराचा अंमल कळत न कळत बसलेला असतो. त्याप्रमाणें एडवर्ड बादशहांस कफाचा विकार थोडाबहुत जडलेला होताच; व त्यांत या आगंतुक शैत्यविकाराची भर पडून गुरुवार-पासूनच त्यांचें दुखणें जरा जड झालें होतें. उतारवयांत देखील त्यांची प्रकृति बारमाहाची सुदृढ असल्यामुळें, या आजारास, त्यांनीं प्रथम दाद दिली नाहीं; व बुधवारपर्यंत ते आपल्या बिछान्यावर पडल्या पडल्या नित्याचें कामकाज पाहात असत. परंतु प्राणिमात्राच्या आयुष्याची दोरी तुटण्याचे वेळीं निमित्त हटकून हुडकून काढण्याची मृत्यूची लालसा सफळ होते ती या प्रसंगींहि होऊन शुक्रवारच्या उत्तर रात्रीं कफविकाराचा अतिरेक झाला, व राजेसाहेबांची आयुर्यात्रा संपली; आणि साठ वर्षें युवराजपदाचा व १० वर्षें प्रत्यक्ष राजपदाचा उपयोग घेतलेल्या पिंडाचें अशा रीतीनें देहावसान झालें! परंतु मृत्युलोकच्या या भूमींत स्वतः मृत्यूखेरीज इतर कोणीच अमर नाहीं. यामुळें एडवर्ड बादशाहांची प्रजा काय, किंवा त्यांच्या प्रत्यक्ष कुटुंबांतील माणसें काय, यांना कितीहि हळहळ वाटली तरी त्याचा फारसा उपयोग नाहीं, हें उघड आहे.

राजेसाहेबांचा जन्म १८४१ सालच्या नोवेंबर महिन्याचे ९ वे तारखेस झाला. अर्थात् हल्लीं त्यांस ६८ वें वर्ष संपून ६९ वें वर्ष सुरू होतें. मनुष्यमात्राच्या आयुष्याची सरासरीची मर्यादा ७० हून पुष्कळ खालीं असली तरी ७० वर्षेंपर्यंत आयुष्याचा लाभ घेणारे लोक कोणत्याहि देशांत थोडेबहुत तरी सांपडतीलच. पौर्वात्य देशांपेक्षां थंड हवेच्या पश्चिम देशांत तर आयुर्मर्यादा प्रायः जास्त विस्तृत असते. खुद्द एडवर्ड बादशहांच्या मातोश्री ८० वर्षांपर्यंत जगल्या होत्या; व राजेसाहेबांची सुदृढ प्रकृति लक्षांत आणली असतां ते आणखी दहा पांच वर्षें जगते तर त्यांत आश्चर्य मानण्यासारखें कांहींच नव्हतें. या दृष्टीनें पहातां त्यांस हा मृत्यु अकालीं आला असेंच मानावें लागतें. शिवाय, आयुष्यरूपी ईश्वरी प्रसाद खरोखरच सुखकारक वाटण्यास मनुष्यास जी परिस्थिति असावी तीहि सुदैवानें

राजेसाहेबांस अनुकूल होती. निरोगी शरीरप्रकृति, प्रेमळ स्त्री, आज्ञाधारक मुलें, खेळकर नातवंडें, भरपूर इष्टमित्र, सुखोपभोग सुलभ करून देणारी संपत्ति, इत्यादि खासगी मनुष्याला प्रिय अशा गोष्टी तर राजेसाहेबांच्या वांट्यास आलेल्या होत्याच; परंतु जगांतील फारच थोड्या–किंबहुना अगदीं मोजक्या–मनुष्यांच्या वांटणीस येणारें जें राजपदाचें सुख तेंहि अगदीं उत्कृष्ट प्रकारचें असें एडवर्ड बादशहांच्या वांटणीस आलें होतें. 'माझ्या राज्यावर सूर्य सदोदित उगवलेलाच असतो, तो कधींहि मावळत नाहीं,' अशी थोरवी कारणपरत्वें इंग्रजी साम्राज्याच्या या धन्याला जशी यथार्थतेनें गातां आली असती, तशी ती आजपर्यंतच्या इतिहासांतील कोणच्याहि राजाला किंवा अधिराजाला गातां आली असती किंवा नाहीं याची शंकाच आहे. अशा सुखांतून अशा ऐश्वर्योपभोगांतून–काळ ओढून नेऊं लागला असतां भरलेलें जग सोडून जाणें, संसारसुखांत मोरावळ्याप्रमाणें मुरलेल्या कोणाहि जीवाला, कठीण वाटावें हें मनुष्यस्वभावास अनुसरूनच आहे. तथापि त्यांच्या मरणानें खुद्द बादशहांची जी हानि झालेली आहे, तिच्याहून ब्रिटिश साम्राज्याची हानि फार अधिक झाली आहे, यांत शंका नाहीं; व सर्व जगभर जी हळहळ आज वाटत आहे ती याच दृष्टीनें. राजा या नात्यानें गेल्या दहा वर्षांत कधींहि न मिळालेली प्रजाहितपालनाची संधि एडवर्ड बादशहांस हल्लीं आलेली होती. ब्रिटिश राज्यघटनेच्या गेल्या दोनशें वर्षांत कधीं निघाले नव्हते असले वादाचे प्रश्न गेल्या सालांत इंग्लंडांत उपस्थित झालेले असून, ते प्रश्न आपल्या मनाप्रमाणेंच सोडवून घेऊं अशा निश्चयानें व आग्रहानें लॉर्ड्स व कॉमन्स हे दोन पक्ष अस्तन्या वर सारून, कुस्तीकरितां आखाड्यांत उतरलेले आहेत; आणि हल्लींचा काळ जरी शांततेचा आहे,–उद्यां होऊं घातलेल्या राज्यक्रांतीस सतराव्या शतकाप्रमाणें रक्तपाताचाच नैवेद्य हवा असें जरी नसलें व या भांडणाचें पर्यवसान जरी युद्धांतच होण्याचा संभव नसला–तरी, वादाचा मुद्दा फार महत्त्वाचा आहे. ब्रिटिश लोकांच्या मुत्सद्दीगिरीस कसोटीला लावण्यासारखा हल्लींचा हा प्रसंग प्राप्त झाला आहे, असें म्हणण्यास हरकत नाहीं. सुदैवानें हा वाद राजेसाहेबांच्या मध्यस्थीनें मिटेल अशी दोन्ही पक्षांस आशा वाटत होती; परंतु दुर्दैवानें या मध्यस्थास याच वेळीं मृत्यु आल्यानें उभयपक्षांचींहि मनें चिंताग्रस्त झालीं असल्यास नवल नाहीं.

इंग्लंडच्या राजकारणांत प्रत्यक्ष मन घालण्यासारखा राजेसाहेबांस हा

पहिलाच प्रसंग आला होता असें वर म्हटलेंच आहे. याचें कारण असें कीं, वयाचीं पहिलीं साठ वर्षें त्यांना युवराजपदामुळें प्राप्त झालेल्या अज्ञातवासांत घालवावीं लागलीं. सार्वजनिक कामांत राजघराण्यांतील लोकांनीं मन घालूं नये अगर ढवळाढवळ करूं नये, असा एक शिष्टाचार मोठमोठ्या राज्यांत–विशेषतः प्रजासत्ता ज्यांत प्रबळ झालेली आहे अशा राज्यांत–सहजच निर्माण होतो. व त्याला कारणेंहि तशींच आहेत. राजघराण्यांतील पुरुष श्रीमंतीच्या डौलांत अतएव अज्ञानांत प्रायः वाढलेले असतात. श्रीमंतांच्या-भोंवतीं अप्पलपोट्या, तोंडपुज्या व मिथ्यावादी लोकांचाच परिवार असल्यामुळें त्यांना स्वतःच्या अगर इतरांच्या परिस्थितीचें यथार्थ ज्ञान होत नाहीं, व हें ज्ञान नसल्यामुळें ते व्यवहारशून्य निपजतात. थोर पदवीच्या अनुषंगानें त्यांचे अंगीं एक प्रकारचा शिष्टाचार आलेला असतो, नाहीं असें नाहीं. परंतु तो तकलुपी असतो; आणि श्रीमंतांनीं थोडें बोलावें, थोडें हंसावें, इत्यादि आढ्यतामूलक आचारसूत्रांमुळें त्यांच्या अवगुणांचें प्रदर्शन होण्याचें पुष्कळ वेळां टळतें इतकेंच काय तें. पण खासगी व्यवहाराच्या मानानें सार्वजनिक लोक-व्यवहार हा जितका अधिक महत्त्वाचा तितकेंच सार्वजनिक व्यवहारांत पडणाऱ्या मनुष्याच्या गुणावगुणांचें प्रदर्शनहि अधिक मोठ्या प्रमाणावर होत असतें. यामुळें एक तर स्वतःच्या लज्जारक्षणार्थच मुळीं राजघराण्यांतील पुरुषांस राजकारणाच्या उलाढालींत व हमरीतुमरींत पडावेंसें वाटत नाहीं. पण त्यांतू-नहि एखादा पुरुष सुबुद्ध व सतेज असा निपजला तरी त्याला राजकारणांत पडण्यास दुसरी एक अडचण असते. राजकारणांत नेहमीं पक्ष असतात; व कोणत्याहि पक्षाला, राजघराण्यानें आपल्या वजनाचा फायदा आपल्या प्रति-पक्षास दिला तर त्याचा राग येतो. यामुळें जसें आपली अब्रु संभाळण्याकरितां कित्येक वेळां त्यांना मौन स्वीकारावें लागतें त्याचप्रमाणें लोकांची अप्रीति संपा-दून न व्हावी याकरितां कित्येक वेळां तें पत्करावें लागतें. राजकाजाचा प्रत्यक्ष अनुभव नसणें हें गादीनशीन पुरुषांमध्यें मोठें व्यंग होय. परंतु इंग्लं-डच्या लोकांत तरी तरतरीत राजापेक्षां मेंगा राजाच गादीवर असलेला अधिक आवडतो. विलायती राज्यश्री ही स्वायत्त असली तरी, तिला अद्यापि सौभा-ग्याची चाड आहे खास; तिला नांवाचा धनी राजा हवा असला तरी तो जन-तेच्या स्वातंत्र्यांत मन न घालणारा असा हवा असतो. राणी व्हिक्टोरिया

गादीनशीन होत्या तेव्हां तर काय या राज्यश्रीचें बोलून चालून स्त्रीशींच लग्न लागलेलें. आणि राणीसाहेब या स्वतः जरी स्वाभिमानी होत्या व किरकोळ गोष्टींत–वाद न माजणाऱ्या गोष्टींत–त्या आपल्या राजपदाचा अधिकार गाजविल्यासारखें दाखवीत तरी वस्तुतः त्यामुळें जनतेच्या स्वातंत्र्यास मुळींच धक्का येत नसे.

पण राणीसाहेबांनीं स्वतः कितीहि अधिकार गाजविला न गाजविला तरी त्यांनीं एक गोष्ट निर्विवादपणें केली. ती ही कीं, त्यांनीं युवराजांस राजकारणांत अगदीं मन घालूं दिलें नाहीं. यामुळें कांहीं स्वेच्छेनें व कांहीं परेच्छेनें राजेसाहेबांच्या वयाचीं साठ वर्षें नुसत्या चैनींत व ख्यालीखुशालींत गेलीं. अनुपयुक्त असें कांहिं एक न करितां उपयुक्त अशाच कामांत आपण अहोरात्र गढून गेलों आहों असें लोकांस भासविणारें वर्तन ठेवावयास भाग पडणें, हा राजघराण्यांतील पुरुषांवर परमेश्वराचा एक निरंतरचा जुलूम आहे. यामुळें हरएक प्रकारच्या सुखोपभोगाच्या आहुत्यांवर आहुत्या देऊन अधिकाधिक प्रज्वलित होणाऱ्या प्रखर वासनारूप अग्नीवर प्रजाहितबुद्धीच्या पवित्र व शुचिर्भूत भस्माची निदान पातळ अशी तरी अस्तरगिरी लौकिकखोर राजपुत्रांना राखावी लागते. अर्थात् राजेसाहेबांनाहि खासगी उद्यानमंदिरांत, शर्यतीच्या मैदानावर, नाटकगृहांत वगैरे ठिकाणीं स्वतःची करमणूक करीत असतांना आपण युवराज आहों हें लक्षांत धरून प्रजारंजन होईल अशा रीतीनेंच वागावें लागे. परंतु खरें पाहिलें तर युवराजत्वाचा बुरखा जर त्यांना काढून ठेवतां आला असता तर तें त्यांस स्वतःच्या मनासारखें वाटलें असतें. या युवराजांनीं पूर्वीं एका रोजनिशींत खालीलप्रमाणें आपलें हृद्गत आपल्या हातानें लिहून ठेवलें आहे. ते असें म्हणतातः—'जेव्हां सार्वजनिक कामगिरीचें जूं माझ्या मानेवर नसतें; तेव्हां मी अत्यंत सुखी असतों. मी आतां राजपुत्र नाहीं असें वाटून, तोंडांत उत्तम फर्मासदार चिरूट व हातांत चटकदार कादंबरी घेऊन निर्मक्षिक अशा जागीं जेव्हां आरामखुर्चीवर मला पडतां येतें; किंवा एखाद्या सोम्यागोम्याप्रमाणें शर्यत पहाण्यास गेल्याबरोबर, 'युवराजाला जुगारीचें व्यसन लागलें हो लागलें,' अशी हाकाटी करीत वर्तमानपत्रांचें सैन्य उठणार नाहीं अशी जेव्हां मला खात्री वाटते; प्रधानमंडळ किंवा मुत्सद्दीगण यांच्यापैकीं खासगी स्नेह्यांशीं क्षणभर सुखदुःखाच्या गोष्टी बोलत असतां, मी प्रचलित राजकारणांत ढवळाढवळ करीत

आहे, असे आरोप लोक आणतील ही भीति जेव्हां मला वाटत नाहीं; किंवा माझी बायको व मुलेंबाळें घेऊन सुखानें गप्पागोष्टी करीत बसलों असतां माझा रसभंग कोणी करणार नाहीं अशी जेव्हां मला खात्री वाटते—तेव्हां मात्र मी खरा सुखी असतों, नाहीं तर एखाद्या सार्वजनिक कार्याची सुपारी घेऊन चुकल्यामुळें तें तर टाळतां येत नसावें; व इकडे दाढ ठणकते आहे, क्षणोक्षणी मेंदूपर्यंत कळ जातच आहे, असें असतां इकडे तर ज्याची ज्याची म्हणून दृष्टादृष्ट होईल त्याच्याशीं नमस्कार चमत्कार करीत शिष्टपणानें मंदस्मित हास्य करून मी फार सुखी आहें असें भासविण्याचा प्रसंग जेव्हां मजवर येतो तेव्हां मात्र मी अत्यंत दुःखी असतों." तात्पर्य, धड ना स्वार्थ, ना धड परमार्थ अशा दुहेरी बिकट स्थितींत राजेसाहेबांचीं पहिलीं साठ वर्षें गेलीं. मातृसुख साठ वर्षेंपर्यंत मिळण्याचें फार थोड्यांच्या नशिबीं असतें खरें. परंतु राज्यश्रीशीं विवाह होणें तो तरुणपणांत झाला तरच त्यांत खरें स्वारस्य उत्पन्न होतें हेंहि कांहीं खोटें नाहीं. पंडित, वैद्य व राजा यांना वृद्धपण शोभतें असें एक सुभाषित आहे खरें. तरी पण तें वृद्धपणापूर्वीं गादीनशीन झालेल्या राजासच लागू पडतें. राज्यश्रीच्या विवाहांतील 'बाशिंगें' झालीं तरी तरुणपणीं जशीं शोभतात तशी तीं वृद्धपणीं शोभत नाहींत.

असो; गादीवर बसल्यापासून मात्र राजेसाहेबांचा बराच काळ राजकाजाच्या व्यासंगांत गेला. पांचव्या हेनरी राजाप्रमाणें युवराजपदाच्या अल्लड स्थितींतले खेळगडी व नर्मसुहृद् यांना त्यांनीं गादीवर आल्यापासून रजा दिल्यासारखी केली होती, आणि स्वदेशाच्या व परदेशाच्या राजकारणांत मन घालून राज्यकारभाराचें तारूं होतां होईतों निवांत अशा दिशेनें जाईल असें धोरण त्यांनीं ठेवलें होतें. 'शांततेचा मित्र' अशी त्यांची युरोपभर ख्याति व्हावयास लागली होती, व या त्यांच्या गुणाची परीक्षा होण्यासारखें खुद्द इंग्लंडांतच राजकारण रंगलें होतें, परंतु त्यांच्या व इंग्लंडच्या दुर्दैवानें ही परीक्षा देण्यापूर्वींच त्यांना हें जग सोडून जावें लागलें. हिंदुस्थानसंबंधानें पाहतांहि राजेसाहेबांच्या मृत्यूमुळें बरीच हानि झालेली आहे. हिंदुस्थानचें साम्राज्य डोळ्यांनीं पाहिलेले असे हे पहिले बादशहा असून त्यांना हिंदी लोकांबद्दल बरीच सहानुभूति असे. शिवाय लॉर्ड मोर्लेसाहेबांच्या उद्योगामुळें स्वराज्याच्या अधिकारांचा जो पहिला अल्पसा हक्क हिंदी प्रजाजनांना मिळाला तोहि त्यांच्याच कारकीर्दींत

होय. राजेसाहेब आणखी जगूनवांचून या जाहीरनाम्याच्या उद्देशाप्रमाणें, या अधिकारांचा आणखीहि एखादा हप्ता मिळण्याचा योग येता तर आम्हांस फार बरें वाटलें असतें, हें सांगणें नकोच. तथापि, व्यक्ति व राष्ट्रें यांच्या आयुष्यमर्यादेप्रमाणेंच, त्यांचीं आयुष्यांतर्गत युगांतरें हीं समानावधि असूं शकत नाहींत हें जाणून, राजेसाहेबांच्या हातून शिल्लक राहिलेलें प्रजापालनाचें काम कालचे युवराज प्रिन्स जॉर्ज व आजचे राजेसाहेब पांचवे जॉर्ज यांच्या हातून पूर्णावस्थेस येण्यास त्यांस चिरायुष्य मिळावें, अशी आमची प्रार्थना आहे. " The King is dead—Long Live the King " ! " राजा मेला !—छे राजाचा जयजयकार असो ! " ही इंग्रजी म्हण मृत्यूच्या बिनतोड मानलेल्या मानेच्या डावाला उत्तरादाखल आहे. व्यक्ति मर्त्य असोत; पण संसार, राजपरंपरा व सत्क्रिया या अमर आहेत, हाच त्यांचा अर्थ आहे. व तो बरोबरहि आहे !

---

## १२ इंग्रजी साम्राज्याचा महोत्सव.

( ता. २७ जून सन १९११ )

गेल्या महिन्यापासून ब्रिटिश साम्राज्याचें केंद्र जें लंडन शहर त्या ठिकाणीं सर्वतोपरी अपूर्व असा साम्राज्यमहोत्सव सुरू झाला आहे. नूतन राजे पंचम जॉर्ज यांच्या राज्यरोहणासंबधाचा हा महोत्सव असून, त्याकरितां छपन्न देशचे राजे, मांडलिक व प्रतिनिधी विलायतेंत गोळा होत आहेत. या महोत्सवास खरा प्रारंभ ता. १५ मे रोजीं—माजी राणी व्हिक्टोरिया यांच्या स्मारकाच्या अनावरणाविधीपासून—झाला. किंबहुना हा विधि येत्या गुरुवारीं होणाऱ्या मुकुटधारणविधीच्या केळवणाप्रमाणें प्रास्तविक म्हणून योजला होता, असें म्हटलें तरी चालेल. या केळवणास खुद्द जर्मनीचे बादशहा काइसर विल्यम हेहि हजर होते. काइसर विल्यम हे राणीसाहेबांचे नातू म्हणजे पंचम जॉर्ज राजेसाहेबांचे आतेभाऊ आहेत. तथापि, राष्ट्रीय दृष्ट्या जर्मनी हाच काय तो इंग्लंडचा आजचा वैरी असल्यामुळें, इंग्लंडच्या राजमंडळाची काइसरसंबंधानें जी स्नेहभावपूर्ण दृष्टि आहे तशी इंग्रजी ' राष्ट्रा ' ची नाहीं. या पक्षाभिमानाच्या दिवसांत जितका एखादा

पक्ष प्रबळ त्या मानानें पक्षाभिमानहि प्रबळ असावा लागतो. त्यांतूनहि सर्व राष्ट्राचें प्रतिनिधित्व ज्याच्याकडे असतें त्याला तर असले खासगी मनोभाव राष्ट्राच्या मनोभावाखालीं दडपून टाकावे लागतात. राजनीति ही या दृष्टीनें फारच निष्ठुर आहे. कारण, समजा, उद्यां जर्मनी व इंग्लंड यांची लढाई जुंपली, तर राष्ट्राचे मुख्य लष्करी सेनापति या नात्यानें जॉर्ज बादशहा व काइसर विल्यम यांना—म्हणजे सख्या आतेमामेभावांना—हातांत तरवार घेऊन समारांगणावर परस्परांस मारीन किंवा मरेन अशा तीक्ष्ण भावनेनें उभें राहावें लागेल. पण प्रत्यक्ष युद्ध जुंपेपर्यंत गोड बोलावें व शिष्टाचार पाळीत राहावें अशीहि राजनीति असल्यामुळें, तिचा फायदा घेऊन पंचम जॉर्ज यांना काइसर विल्यम यांस विलायतेंत पाहुणचारास बोलावतां आलें; आणि प्रत्यक्ष आपल्या आजीचाच स्मारकसमारंभ असल्यामुळें जर्मन राष्ट्रास नाखुष न करितां त्यांसहि सदर प्रसंगीं हजर रहातां आलें. असो; या स्मारकसमारंभाच्या दिवशीं परलोकवासी राणीचे गुणानुवाद वर्णन करण्यांत आले. जर्मनी व इंग्लंड यांच्यामध्यें सलोखा असल्याचें शुभवर्तमान सर्व जगास मुद्दाम जाहीर करण्यांत आलें, व या शांतिपाठानें केळवणाची समाप्ति झाली.

अशा रीतीनें या वहिमी जर्मन पाहुण्यास शिष्टाचारपूर्वक बाहेर घालविल्यावर महोत्सवाचा दुसरा भाग सुरू झाला. हा भाग म्हणजे 'साम्राज्य-संमेलन' होय. या प्रसंगाचे पाहुणे म्हणजे निरनिराळ्या ब्रिटिश वसाहतींचे मुख्य व उपप्रधान हे होत. यांना दिलेलें स्वागत अर्थातच निराळ्या प्रकारचें होतें. त्यांत काइसर विल्यमच्या स्वागताप्रमाणें पोकळ बडेजाव व सूज आलेली दरबारी भाषा नव्हती. घरचे यजमान—म्हणजे इंग्लंडचें मंत्रिमंडळ व बाहेरचे पाहुणे—म्हणजे वसाहतींचें मंत्रिमंडळ--यांचें तें स्नेहपूर्वक संमेलन होतें, आणि प्रत्यक्ष मुकुटधारणासुद्धां चालू महोत्सवांत जे अनेक प्रकारचे अनेक समारंभ होणार आहेत, त्यांमध्यें साम्राज्यसंमेलनाचा हा समारंभ आमच्या दृष्टीनें तरी अत्यंत महत्त्वाचा आहे. लग्नसमारंभप्रसंगीं कानठळ्या बसविण्यासारखा गाजावाजा आणि उणाडटप्पू वऱ्हाडयांचा निष्काळजीपणाचा मनसोक्त धांगडधिंगा मांडवांत माजला असतां, एकादे वेळीं अगदीं शेलके शेलके यजमान कोठीच्या खोलींत कोपऱ्यामध्यें कानाला तोंड लावून बोलत व खलबत करीत बसलेले आढळतात; त्यांच्या तोंडांवर बाहेरच्या आनंदी आनंदाचा मागमूसहि

नसतो, उलट एकादें अकल्पित संकट टाळण्याच्या योजनेची काळजी मात्र त्यांच्या तोंडांवर पसरलेली असते. तसाच प्रकार या साम्राज्यसंमेलनाचा आहे. संमेलनाचा मुख्य विषय साम्राज्यावरील परचक्राचीं संकटें कशीं टळतील हा असून त्याची वाटाघाट गुप्तरीतीनें चाललेली आहे. बाहेरून आनंदोत्सवाचा मुखवटा सर्वांनीं धारण केला आहे खरा; पण साम्राज्याचा बचाव होण्यास कोणते टिकाऊ उपाय करावे या योजनेंतच घरचें आणि बाहेरचें साम्राज्याभिमानी प्रधानमंडळ चूर आहे. बहुमानाचीं महावस्त्रें भर दरबारांत अंगावर घालीत असतां अस्तनींत दडलेला विंचू नांगी मारूं लागल्यानें धीर पुरुषाची जशी स्थिति होईल तशी स्थिति राज्यारोहणाच्या निमित्तानें साम्राज्या-संमेलनास जमलेल्या या ब्रिटिश देशभक्तांची आहे.

वास्तविक इंग्लंडवर आजच परचक्र आलें आहे असें नाहीं; पण पुढेंमागें येणार अशा समजुतीनें इंग्लंडचे आजचे सर्व व्यवहार चालू आहेत. जपान व चीन या राष्ट्रांशीं सलोखा, काबूलच्या अमीराचें स्नेहसंपादन, टर्कींतील लोकपक्षास सहानुभूतिदान, एकंदर मुसलमान वर्गास पक्षपाती उत्तेजन—या सर्व गोष्टी इंग्लंडचा निरपेक्ष परोपकार अथवा त्याची सात्विक शांतताप्रियता यांचें लक्षण होय असें कोणीहि मानीत नाहीं. ही सर्व मंडळी किती झालें तरी परकी. त्यांचा धर्म वेगळा, जात वेगळी, हितसंबंध वेगळा. यांच्याहून जगांत इंग्लंडला जवळचे म्हटले म्हणजे अमेरिकन लोक; कारण रक्ताला रक्त अधिक ओळखतें. अमेरिकन व इंग्रज यांचें रक्त मूळ बहुतेक एकच व हल्लीं तरी त्यांच्यामध्यें परस्पर चुरस नाहीं. कारण, अमेरिकन लोकांना स्वदेशाबाहेर जाऊन सुधारणादानाचा परोपकार करण्याचा कंटाळा आहे. चुकूनमाकून एक फिलीपाइन बेट त्यांच्या हातीं पडलें आहे तर ' ही कोण पीडा ! ही ब्याद लवकर हातावेगळी होईल, तर बरें होईल ' असें अमेरिकेस झालें आहे. अमेरिकन लोकांचा देश त्यांना पुरून उरण्यासारखा आहे म्हणा, किंवा त्यांना आपल्या पदरीं 'दिसण्यास स्वतंत्र' दिसणारे गुलाम पाळण्याचा कंटाळा आहे म्हणा, वसाहती व साम्राज्यें या खटपटींत आजपर्यंत ते पडले नाहींत, व पुढेंहि पडण्याची त्यांची इच्छा नाहीं. त्यांची महत्त्वाकांक्षा अंतर्मुख आहे. आपल्या स्वराज्यांत सुराज्य व प्रजास्वातंत्र्य यांची परमावधि कोणच्या रीतीनें होईल या खटपटींत व विचारांत ते सदा मग्न आहेत. बाहेर जगांत कोणास मदत करावयाची झाली—आपल्या संस्कृतीचा व सुधारणेचा

फायदा द्यावयाचाच झाला-तर घोड्याप्रमाणें त्याच्या पाठीवर स्वार होऊन व त्याच्या तोंडांत कांटेलगाम घालूनच तो फायदा देतां येईल, एरवीं देतां येणार नाहीं, अशी अमेरिकन लोकांची समजूत नाहीं. या सर्व कारणांमुळें, इंग्रजांच्या महत्त्वाकांक्षेचा व अमेरिकन लोकांच्या महत्वाकांक्षेचा विरोध तूर्त सहसा येण्याचा संभव नाहीं. अर्थात् अमेरिकन लोकांशीं शांततेचा तह झाल्यास फायदेशीर होईल असें समजून त्या खटपटींत इंग्लंड आहेच.

पण अमेरिकन लोकांपेक्षांहि इंग्लंडचे जवळचे हितसंबंधी म्हटले म्हणजे आज वसाहतवाले होत. अमेरिकन लोकांपेक्षांहि वसाहतवाल्यांचा व इंग्रजांचा रक्त-संबंध अधिक ताजा आहे. अद्यापि, वसाहतवाले इंग्रज राजाचें साम्राज्य कबूल करतात. शिवाय या वसाहती दूरदूर पसरलेल्या असून जपान व जर्मनी यांजसारख्या लढाऊ राष्ट्रांच्या मानानें अगदींच दुर्बल आहेत. अर्थात् इंग्लंड व वसाहती या उभयतांना परचक्राची भीति समान असल्यामुळें त्यांना एकमेकांस चिकटून व एकमेकांचा आश्रय घेऊन राहणें सोईचें आहे; व म्हणून परस्पर आराधनाचा हा प्रयत्न चालू आहे. कारण, इंग्लंड व वसाहती यांनीं अभिमान बाळगावा असेंच हें संयुक्त साम्राज्य आहे यांत शंका नाहीं. सुमारें नव्वद लक्ष चौरस मैलांइतका म्हणजे जवळ जवळ तीन युरोपखंडांइतका प्रदेश या साम्राज्यानें व्यापला आहे. या साम्राज्याचा सरकारी महसूल सुमारें सालिना चोवीसशें लक्ष पौंड आहे व दर्यामार्गानें चालणारा सर्व जगांतला अर्धा व्यापार या साम्राज्याच्या हातीं आहे. एक हजार लक्ष लोकांची इंग्रजी ही मायभाषा आहे; सुमारें तितकेच लोक इंग्रजीहि भाषा मायभाषा नसतां तिचा व्यवहारांत सरांस उपयोग करणारे आहेत; व चार हजार लक्ष लोक या साम्राज्याची प्रजा म्हणवितात. इतकें मोठें हें साम्राज्य चिरंजीव व्हावें असें त्यांतल्या कोणत्या इंग्रजास वाटणार नाहीं ! पण इंग्रजांसहि हें माहित आहे कीं, अशा जगड्व्याळ साम्राज्यासहि धोका नसतो असें नाहीं.

या साम्राज्यांत संतति, संपत्ति, कलाकौशल्य, धैर्य, शौर्य सर्व कांहीं आहे. असें असतांहि त्याजवर प्रेम करणाऱ्या मनुष्यांस त्याच्या चिरस्थायित्वाबद्दल मधून मधून शंका येतेच. प्रेम हें नेहमींच शंकेखोर असतें असें म्हणतात. पण प्रस्तुत प्रकरणीं प्रेमी मनुष्याच्या शंकेला थोडींबहुत कारणेंहि आहेत. सर चार्लस डिल्क यांनीं सन १८९० सालीं ब्रिटिश साम्राज्यावर लिहिलेल्या आपल्या पुस्त-

काच्या प्रस्तावनेंत या बाबतींत कांहीं विशेष उद्गार काढले होते. याच्या आधीं तीनच वर्षें कॉलोनिअल कॉन्फरन्स म्हणजे वसाहतीची परिषद्-जिला हल्लीं साम्राज्यपरिषद् हें नांव देण्यांत आलेलें आहे. ती—भरली होती; व साम्राज्याच्या असुरक्षिततेसंबंधीं इंग्रजांस दुष्टस्वप्नें पडण्यास सुरुवात झालेली होती. सर चार्लस डिल्क म्हणतात:— "ज्या ज्या गोष्टीसंबंधानें मनुष्यानें अभिमान बाळगावा अशा सर्व गोष्टींची समृद्धि या साम्राज्यांत आहे, पण युरोपांत लष्कर व आरमार यांच्या बाबतींत राष्ट्राराष्ट्रांमध्यें विलक्षण चढाओढ लागून राहिली असून इंग्लंडवर एकदम हल्ला होण्याचा संभव आहे. वसाहती पुष्कळ आहेत व मोठ्या आहेत खऱ्या. पण त्यांचें लष्करी सामर्थ्य हल्लीं मुळींच तयार झालेलें नसून, असा अकल्पित हल्ला झाला तर, या वसाहतींच्या देखत, पण त्यांना कांहीं एक मदत करण्यास न सांपडतां जुनापुराणा इंग्लंड देश चेंचला जाईल; तसें झालें म्हणजे हिंदुस्थान हातचें गमावेल, आणि कॅनडा, ऑस्ट्रेलिया या वसाहती स्वतंत्र होतील! इंग्लंडचें निमेंअधिक अन्न आणि उद्योगधंद्यांकरितां लागणारा बहुतेक कच्चा माल बाहेरून आणवावा लागतो, अर्थात् हीं दोन्हीं मिळण्यास पंचाईत पडेल! इंग्लंडचा व्यापार जगभर पसरला आहे; पण हा बेसुमार विस्तारच त्याला आयत्या वेळीं नडेल! मदत हवी तेथून हवी तितकी मागून मिळण्यासारखी आहे. पण ती मागायला व यायला शत्रू फुरसद देतील तेव्हां मिळणार!"

सर चार्लस डिल्क यांनीं वरील उद्गार काढले तेव्हांहून इंग्लंडची आज सर्वच स्थिति सुधारली आहे असें नाहीं. किंबहुना जर्मनीचें वैर व लढाईची तयारी हीं दिवसेंदिवस वाढतच आहेत. तथापि, वसाहतींच्या संबंधाच्या बाबतींत तरी तेव्हांपासून गेल्या वीस वर्षांत इंग्लंड अधिक सुखी झालें आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. दरम्यान दक्षिण आफ्रिकेंत युद्ध झालें खरें. तरी युद्ध संपतांच बोअर लोकांना इंग्रजी मुत्सद्यांनीं स्वराज्य दिल्यानें सलोखा झाला; व आज कोणच्याहि वसाहतींच्या मातृभक्तीबद्दल इंग्लंडास शंका उरली नाहीं. अर्थात् या सर्वांचें कारण 'स्वराज्याची किमया' हेंच होय. इंग्लंडनें वसाहतींस स्वराज्याचे हक्क दिलेच आहेत; पण हल्लीं इंग्लंडांत जमलेल्या वसाहतींच्या प्रधानांना खुष ठेवण्याचा इंग्लंड जो प्रयत्न करीत आहे तो पाहिला म्हणजे मोठी मौज वाटते; व असा प्रश्न आपोआप तोंडाला येतो कीं, "अठराव्या शतकांत तिसऱ्या

जॉर्ज राजाच्या कारकीर्दींत वसाहतींना कस्पटाप्रमाणें लेखणारें, त्यांना लाथे-खालीं तुडविणारें, त्यांच्यावर वाटेल तसे कर बसविणारें, त्यांना पार्लमेंटचे हक्क देत नाहीं म्हणणारें, त्यांच्या अर्जदारांना बंडखोर ठरविणारें, त्यांच्या विनंतीला तरवार उगारणारें, तें इंग्लंद् हेंच कां !" अठराव्या शतकांत वसाहतवाल्यांनीं जोडलेल्या हाताला पाय लावणें हें देखील कमीपणाचें जें इंग्लंड मानीत होतें तेंच आज त्याच वसाहतींच्या पायाला हात लावून हांजी हांजी करण्यास तयार झालें आहे!

साम्राज्यपरिषदेच्या बैठकी अद्यापि सुरू आहेत व साम्राज्यविषयक निरनिराळ्या प्रश्नांवर ठरावहि पास होत आहेत. साम्राज्याच्या दूरदूर पसरलेल्या भागांत परस्पर दळणवळण अधिक कसें वाढेल; तारेच्या व बिनतारेच्या पद्धतीनें विद्युत्संदेश हल्लींहून अधिक हुकमी व स्वस्त कसे पाठवितां येतील; टपालाची व्यवस्था सर्वत्र एका नमुन्याबरहुकूम कशी होईल; टपाल व तार हीं लढाई सुरू झाली तरी इंग्रजांच्याच हातीं बिनधोक कशीं राहतील, मालाच्या व उतारूंच्या आगबोटी सर्व साम्राज्यभर एकतंत्री कशा सुरू होतील आणि स्वदेश व वसाहती यांच्याच खलाशांना त्यांपासून अधिक फायदा कसा होईल, साम्राज्याच्या नागरिकत्वाच्या हक्काप्रमाणें वसाहतींच्या नागरिकत्वाचा हक्कहि अनायासानें वाटेल त्या इंग्रजास कसा मिळेल, लढाईच्या प्रसंगीं जगांतील एका टोंकाच्या इंग्रजांच्या मदतीस दुसऱ्या टोंकाचा इंग्रज धांवून जाण्याची सोय कशी होईल–वगैरे सर्वथा केवळ इंग्रजांच्याच फायद्याच्या अशा प्रश्नांचा खल साम्राज्यपरिषदेंत झाला. या प्रसंगीं स्वराज्यसुख भोगणाऱ्या वसाहतींचे प्रधान इंग्लंडच्या प्रधानांच्या मांडीस मांडी लावून बसले. व बरोबरीच्या नात्यानें बोलले चालले. हिंदुस्थान मात्र या साम्राज्याच्या परिषदेंत कोठें दिसलें नाहीं ! हिंदुस्थानच्या वतीनें सर्व अधिकाऱ्यांचे अधिकारी, स्टेट सेक्रेटरी हे हजर होते. पण खास हिंदुस्थानचा असा विषय परिषदेंत निघालाच नाहीं. बिचारें हिंदुस्थान! साम्राज्यपरिषदेच्या या दंगलींत त्याला कोण पुसणार ?

---

## १२ लोकमतानें कुस्ती जिंकली

( ता. १५ ऑगष्ट सन १९११ )

विलायतेंतील हाऊस ऑफ कॉमन्स म्हणजे लोक–सभा व हाऊस ऑफ लॉर्ड्स् म्हणजे सरदार–सभा यांच्यामध्यें आज दीड दोन वर्षें जी कुस्ती जुंपून राहिली होती ती गेल्या शुक्रवारीं लोकसभेनें जिंकली।

व आजच्या घटकेस तरी सरदारसभा चारी मुंड्यांनीं चीत झाली असें म्हणण्यास हरकत नाहीं. या दोन पहिलवानांच्या कुस्त्या आज कांहीं नाहीं म्हटलें तरी दोन तीनशें वर्षांपासून ठरून राहिलेल्या आहेत; प्रत्यक्ष सामने मधून मधून प्रसंगोपात्त होत असतात; पण या कुस्त्यांमध्यें मिळणाऱ्या यशाचें पर्यवसान, नेहमींच्या कुस्त्यांप्रमाणें पैशाचें एखादें बक्षीस दिल्यानें, मानाचें पांगोटें बांधल्यानें, तालीमवाल्यांच्या खांद्यावर कुस्ती जिंकणारास बसवून ढोल ताशे लावून मिरवणूक काढल्यानें, किंवा वर्तमानपत्रांत स्तुति केल्यानें होणारें नाहीं. पार्लमेंटांतील ही कुस्ती जिवावरची आहे, व तिचा शेवट राजकीय सत्ता एका पक्षाचे हातीं जाऊन दुसरा पक्ष या सत्तेच्या दृष्टीनें मृतप्राय होण्यानेंच लागणारा आहे !

विलायतेंतील प्रजासत्तारूपी तरुण मल्ल प्रथम सुमारें अडीचशें वर्षांपूर्वीं आखाड्यामध्यें दंड थोपटून उभा राहिला. त्या वेळचा नांवाजलेला पहिलवान म्हटला म्हणजे राजसत्ता हा होता, आणि नांवाप्रमाणेंच त्याचा दरारा व दहशतहि होती. राजसत्तेला विरोध करणाऱ्या प्रजाजनांचा—मग ते अमीरउमराव असोत, अगर जनतेचे पुढारी असोत—नाश व नायनाट करणें हा, सोळाव्या–सतराव्या शतकांत इंग्लंडच्या गादिवर असणाऱ्या राजांच्या तळहाताचा मळ होता. त्यांनीं कैकांना जन्मभर अंधारकोठडींत तुरुंगवास भोगविला, कैकांचे कान कापले, व कैकांचीं डोकीं मारलीं. पण सन १६४९ सालीं लोकपक्षाच्या तरुण पहिलवानानें डोकें मारण्याचा हा अजब पेंच आपणासहि येतो ही गोष्ट खुद्द चार्लस राजाचा सशास्त्र व सशस्त्र शिरच्छेद करून सिद्ध केली. तेव्हांच या होतकरू पहिलवानानें पहिला खरा जय मिळविला. पुढील चाळीस वर्षांतच या कुस्तीचा फिरून एकवार सामना झाला. पण एवढ्या अवधींत या तरुण मल्लाचा दरारा व दहशत पुरी बसून गेली असल्यानें सन १६८८ सालीं राजपक्षाच्या वतीनें लढण्यास आलेला नविन मल्ल, म्हणजे दुसरा जेम्स, यानें प्रतिपक्षाशीं सलामी होतांच, त्याची शक्ति ओळखून शिरच्छेदाचा पेंच घालण्यापर्यंत मजल येऊं न देतां, आधींच रंगण सोडून पळून गेला. यानंतर अठराव्या शतकांत तिसरा जॉर्ज वगैरे राजांनीं वेळोवेळीं राजसत्तेचें डोकें वर काढण्याचा प्रयत्न केला. पण त्यांच्या राजसत्तेच्या तेजानें फार तर लोकसभेंतील पक्षांची उलटापालट होणें आणि प्रधानमंडळांचा पाणउतारा होणें

याहून अधिक कांहीं परिणाम झाला नाहीं; आणि एकुणिसाव्या शतकांत तर इंग्लंडच्या राजांच्या अंगांतील जीवनकलेचा हा शेवटचा अंशहि लोपून, राजा म्हणजे एक कळसूत्री बाहुलें–किंवा विशेष आदरानें बोलावयाचें तर सुपारीचा गणपती–होऊन बसला! त्याला द्याल तो नैवेद्य, लावाल तो धूपदीप, कराल तसें आवाहन—विसर्जन अशी स्थिति होऊन राहिली. अशा सुपारीच्या गणपतीकडून मागाल तो कऊल मिळणारच, कारण तो तुम्ही आपल्याच हातानें घेणार! राजसत्तेच्या दुर्दशेच्या या कहाणींत एका अक्षराचीहि अतिशयोक्ति नाहीं. कारण हल्लींच्या वादांत मि. ॲस्किथ यांनीं असें उघड बोलून दाखविलें कीं, " औपचारिकरीत्या राजानें जरी मला मुख्य प्रधान नेमलें आहे, तरी माझी नेमणूक करण्याचा हुकूम प्रजेकडून झाला आहे. त्यांच्या आज्ञेवरून जरूर तर शेंपांचशें अमीरउमराव मी निर्माण करण्याचा हुकूम–ज्याला शिष्टपणाच्या भाषेंत सल्ला हें नांव आहे–सोडीन, व तो राजानें ऐकलाच पाहिजे; व राजेसाहेब पांचवे जार्ज यांनीं तो हुकूम मान्य केलाहि आहे. " अर्थात् या स्थितींत राजाचें राजेपण तें काय राहिलें हें दिसतेंच आहे.

असें असतांहि गादीवर असलेल्या व्यक्तीस बहुमान देणें, त्याचा बडेजाव करणें, त्याचा उत्सव मांडणें व मिरवणुकी काढणें याचें खरें मर्म काय आहे–हें सर्व करणारी जनता आपल्या स्वतःच्या वैभवाचें व सत्तेचें प्रतिबिंब पाडण्यास देदीप्यमान मुगुटधारी अशा राजाचा केवळ एखाद्या निर्जीव व निर्गुण आरशाप्रमाणें उपयोग करून कसा घेते–हें अगदीं उघड आहे. तथापि तो प्रस्तुतचा मुद्दा नाहीं. लोकपक्ष व खुद्द राजपक्ष यांतील कुस्तीचा निकाल पूर्वींच लागला असून, उलट ज्या दुसऱ्या एका मल्लाशीं जनतेचें युद्ध अलीकडे जुंपून राहिलें आहे, त्यांत राजा हा कोणत्याहि प्रकारें स्वतः शस्त्रधारी नाहीं, मात्र लढवय्या लोकपक्षाच्या मुख्य सरदारास त्याचीं शस्त्रास्त्रें पुसून साफ करून ठेवणें व गोळीबाराच्या वेळीं बंदुका भरून त्याच्या हातीं देणें असलें काम त्याजकडे येऊन राहिलें आहे. लोकपक्षाचा हा दुसरा प्रतिपक्षी म्हणजे अमीरउमराव वर्ग होय. राजसत्तेचा लोप झाल्यानंतर राजाचें स्थान या अमीरउमरावांनीं मिळविलें. जमीनजुमला, संपत्ति, वंशपरंपरेनें पार्लमेंटमध्यें बसण्याचा अधिकार, आणि राजघराण्याशीं शरीरसंबंधाची अगर इतर बहुमान परंपरा वगैरे गोष्टींमुळें, खानदानीच्या उमरावांना आपण आकाशांतले चंद्रच–खुद्द सूर्य नसलों तरी त्यांच्या प्रभावळे-

पैकीं कोणी ग्रहउपग्रह तरी खास आहों–अशी अहंकारबुद्धि अजूनहि आहे; व अशांतच पुण्ययोगानें ज्यांना नक्षत्रदेह मिळतो अशा तहाहयात नवीन अमीर-उमरावांची वरचेवर भर पडत असते. अंतराळांत उच्च स्थान ज्यांना मिळालें त्यांना मग भूलोकावरच्या सामान्य जनतेच्या सुखदुःखाची कितपत पर्वा राहणार. शिवाय भूमंडळावरहि श्रीमंत व गरीब असा भेद आहेच. यामुळें या खगोलस्थ अमीरउमरावांचा अनुयायी असा एक पक्ष भूगोलावरहि निर्माण झालेला असतो. राजा जरी राजकीय सत्तेच्या समरांगणावरून नाहींसा झाला, तरी आपण राजाशीं तद्भव किंवा तत्सम अशा नात्यानें बांधले गेलों आहों, आणि सामान्य जनता हा जो उभयसमान वैरी त्याच्याशीं झगडण्याचें काम आपलें आहे अशा भावनेनें लॉर्ड सभेंतले अमीर उमराव आणि लोक सभेंतले कॉंझरवेटिव्ह या नांवानें ओळखले जाणारे लोकशत्रु असे मिळून तें काम करीत असतात; व अशा रीतीनें ही युद्धपरंपरा सुरू राहिली आहे.

पूर्वीं राजा या नात्यानें एकट्या व्यक्तीच्या हातीं प्रजाहितविरोधी अशी सत्ता होती ती अमीरउमरावांत वांटली गेली हें खरें, तरी कोणताहि कायदा पास होण्यास लोकसभेप्रमाणें उमराव–सभेचीहि संमति कायद्यानें जरूर असल्यामुळें एका व्यक्तीला जो अडथळा पूर्वीं करितां येत असे तोच पुढें सर्व अमीरउमरावांना मिळून वरिष्ठ सभेच्या द्वारें करितां येऊं लागला, इतकेंच काय तें. परंतु यामुळें प्रजेच्या सत्तेस श्रीमान् लोकांच्याकडून व्हावयाचा तो विरोध कमी झाला नाहीं. खुद्द लोकसभेंतच जेव्हां कॉन्झरवेटिव्ह किंवा प्रतिगामी पक्षाचें बहुमत असे तेव्हां वरिष्ठ सभेकडून होणाऱ्या अडथळ्याचा जाच फारसा प्रत्ययास येत नसे. परंतु लोकसभेंत लिबरल किंवा प्रागतिक पक्षाचें जेव्हां जेव्हां बहुमत असे तेव्हां तेव्हां हा जाच जनतेला दुःसह होई. कॉमन्स व लॉर्डस यांजमधील हीं भांडणें सतराव्या शतकाच्या अखेरपासून सुरू झालीं. प्रथम प्रथम राजसत्तेचें वरिष्ठ सभेस बरेंच पाठबळ असे. म्हणून चार्लस राजाचा शिरच्छेद झाला त्याच सालीं लोकपक्षाचा सरदार ऑलिव्हर क्रॉमवेल यानें वरिष्ठ सभा अजीबात मोडण्याचा कायदा पास करवून तो अमलांतहि आणिला. परंतु लोकपक्षाची अनियंत्रित सत्ता कायमची संस्थापित होण्याइतकी इंग्लंडची त्या वेळीं तयारी नव्हती. क्रॉमवेलच्या मरणानंतर दोन वर्षांच्या आंतच फिरून राजसत्तेची व तिच्याच बरोबर वरिष्ठ सभेचीहि फिरून प्राण–

प्रतिष्ठा झाली. एवढेंच नव्हे तर पुढील शेंसव्वाशें वर्षांत, वंशपरंपरेनें वरिष्ठसभेंत स्वतःसिद्ध बसण्याचा अधिकार ज्यांस आहे असे सुमारें चारशें उमराव निर्माण करण्यांत आले. हे सर्वच उमराव राजानें केवळ स्वेच्छेनें निर्माण केले होतें असें नाहीं. तर त्यांत राजाचीं नाजूक कामें केलेले, राजाच्या पोटीं अधर्मानें उत्पन्न झालेले, राष्ट्राचीं कामें केलेले, प्रधानमंडळास मदत केलेले, विशिष्ट राजकीय पक्षास नेहमीं उपयोगी पडणारे, आणि वरिष्ठ सभेंतील बहुमताचा तोल संभाळण्यास मुद्दाम नेमलेले—तात्पर्य, अशा अनेक कारणांनीं निर्माण झालेले उमराव लोक या वाढाव्यांत होते.

तथापि, उत्पत्तीचें कारण कांहींहि असलें तरी, वरिष्ठ सभेंत एकदां कां अमीर-उमरावांचा समावेश झाला म्हणजे, तेथील हवेचाच गुण असा कांहीं विलक्षण असतो कीं त्यांस लोकहितविरोधाची दीक्षा आपोआप मिळते. आजतागायत केव्हांहि पाहिलें तरी वरिष्ठ सभेमध्यें कॉन्झरवेटिव्ह ऊर्फ प्रागतिक पक्षाचेंच नेहमीं प्राबल्य चालत आलेलें आहे; यावरून वरील विधानास पुष्टिच येते. लोकसभेंतहि लिबरल पक्षाचें वर्चस्व आजवर नेहमींच असे असें नाहीं. परंतु आलटून पालटून तरी लिबरल पक्षाचें लोकसभेमध्यें प्राबल्य होई. परंतु उलट असें एकहि वर्ष कधीं गेलें नाहीं कीं, ज्यामध्यें वरिष्ठ सभेंत लिबरल पक्षाचें बिनतोड वर्चस्व ठरलें. असें जर आहे व कोणताहि कायदा पास होण्यास वरिष्ठ सभेची संमति असल्याशिवाय चालत नाहीं हें जर खरें आहे तर, आजवर पायरी पायरीनें तरी जनतेच्या हातीं सत्ता जाऊन लोकहितसाधक असे कायदे झाले कसे ! असा एक प्रश्न सहजच उत्पन्न होतो. याला अनेक उत्तरें आहेत. एक तर उमराव लोक हे स्वभावतः आयदी व आळशी असतात. लोकसभेंतील सभासदांप्रमाणें ते चालू राजकारणांत फारसें कसून मन घालीत नाहींत. यामुळें लोकसभेनें केलेल्या सुधारणेच्या किरकोळ गोष्टी—त्यांची इच्छा म्हणून नव्हे पण त्यांचा हलगरजीपणा म्हणून—मंजूर होऊन जातात. दुसरें असें कीं, जमाखर्चाच्या बाबनींत सर्व सत्ता लोकांची आहे, वरिष्ठ सभेस तींत हात घालतां येत नाहीं असें पूर्वींच ठरून गेलें असल्यामुळें, राज्यकारभाराचा हा जो एक मुख्य भाग तो वादांतून अजीबातच निघून गेलेला आहे. राहतां राहिल्या अधिकाराच्या व सुधारणेच्या इतर बाबी. अशा बाबतींत विरोध उत्पन्न झाला असतां, एक तर प्रायः उभयपक्षांकडील समंजस पुढारी तोडजोड करून एकवाक्यता करतात, तें

न जमेल तेथें राजा आपलें वजन खर्च करून तंटा मिटवितो, हेंही न साधेल तेथें गोष्ट निकरावर येते, परंतु अशा वेळीं लोकपक्षाजवळ जीं दोन अमोघ अस्त्रें आहेत तीं उपयोगीं पडतात. पैकीं एक म्हटलें म्हणजे राजास हवे तितके नवीन उमराव निर्माण करून वरिष्ठ सभेंत लोकपक्षाच्या बाजूस कृत्रिम बहुमत तयार करणें, व दुसरें निर्वाणीचें अस्त्र म्हणजे रोजच्यारोज राज्यकारभारास व राजमंडळाच्या खर्चास लागणारा पैसा मंजूर न करणें हें होय ! परंतु या दोन्ही अस्त्रांचा उपयोग प्रत्यक्ष फारसा करावा लागत नाहीं. त्यांच्या दहशतीनें व धाकदपटशानेंच बहुधा काम भागतें. या निर्वाणीच्या अस्त्रांचा उपयोग लोकपक्षानें खुद्द पहिल्या चार्लस राजाशीं भांडण केलें त्यांत केला; व तें झाल्याबरोबर पुढें प्रत्यक्ष सशस्त्र अशा रणसंग्रामासच सुरुवात झाली ! कृत्रिम बहुमत बनविण्याकरितां नवीन उमराव बनविण्याच्या अस्त्राचा उपयोग प्रत्यक्ष करण्याचे प्रसंग मधून मधून इतरहि आले. या बाबतींत लक्षांत घेण्यासारखा प्रसंग म्हटला म्हणजे सन १८३१–३२ सालीं झालेल्या रिफॉर्म बिलाच्या वादाचा. हल्लीं मुख्य प्रधान मि. ॲस्क्विथ यांनीं जरूर तर शेंपांचशें उमराव नवीन करण्याची धमकी जशी घातली, त्याचप्रमाणें त्या वेळीं लॉर्ड ब्राऊहॅम व लॉर्ड ग्रे यांनीं ८० उमराव निर्माण करण्याचा घाट घातला होता, व हें करण्यास राजाची लेखी संमतिहि मिळाली होती. परंतु हल्लींप्रमाणेंच तेव्हांहि लोकपक्षाचा हा सवाईसोटा पाहतांच वरिष्ठ सभेनें माघार घेतली, म्हणून अखेर रिफॉर्म–बिल पास झालें.

परंतु वरिष्ठ सभेंतील लोकांना आपल्या अपमानाचा विसर तेव्हांच पडतो, व फिरून एखादें प्रकरण रंगास आलें कीं, लोकहितास विरोध करण्याचें कंकण ते हातीं बांधून सिद्ध होतातच. सन १८३२ सालापूर्वीं पांच सात प्रसंगीं वरिष्ठ सभेनें लोकसभेशीं असाच विरोध केला होता; व १८३२ सालीं आपली खरी शक्ति काय आहे हें त्यांस कळून चुकलेंहि होतें. परंतु या गोष्टींचा विसर लवकरच पडून फिरून त्यांनीं विरोधास सुरुवात केली. १८९०–१८९२ सालापासून–म्हणजे आयरिश होमरूलचें बिल लोकसभेनें मंजूर केलें असतां वरिष्ठ सभेनें तें हाणून पाडलें व बुडविलें तेव्हांपासून–वरिष्ठ सभेविरुद्ध लोकमताची प्रचंड खळबळ सुरू झाली. सन १८९३ सालीं आयरिश होमरूलच्या पायीं मि. ग्लॅडस्टन यांची कारकीर्द अकालीं संपल्यापासून पुढचीं दहा वर्षें लिबरल पक्षास फार वाईट गेलीं. यामुळें

तर उमराव लोक फारच शेफारून गेले. आणि लिबरल पक्ष फिरून अधिकारारूढ झाल्यापासून लोकहिताच्या दृष्टीनें व राज्यकारभाराच्या सुधारणेच्या दृष्टीनें गेल्या पांच सात वर्षांत जे जे कायदे लोकसभेनें मंजूर केले ते ते सर्व वरिष्ठ सभेंत उमरावांनीं फेंटाळून लाविले. लोकांना शिक्षण मिळावें, लोकांची दारूबाजी कमी व्हावी, श्रीमंतांच्या मानानें गरीबांवर करपट्टी जास्त आहे ही स्थिति पालटून श्रीमंतांवर त्यांच्या ऐपतीप्रमाणें करपट्टी वाढली जावी, देशांतील लाखों एकर जमीन उमराव लोक जवळ जवळ कायमधाऱ्याच्या पद्धतीनें वापरीत असून आपल्या रयतेस मात्र ते पिळून काढतात, सबब त्यांनीं थोडीशी अधिक करपट्टी द्यावी, अशा रीतीनें झालेल्या वाढाव्याचा उपयोग वयोवृद्ध निराश्रित लोकांस पेन्शनें देण्याकडे करावा, लोकसभेंत गरीब सभासदहि येऊं शकतात सबब त्यांना पगार ठरवून द्यावा, निवडणुकीच्या मतांची यथान्याय वांटणी करावी, लष्करी खर्च थोडेबहुत कमी करावे, अधिकार बजावण्यास योग्य झालेल्या आणि राष्ट्रीयत्वाची आकांक्षा निरंतर जागृत ठेवणाऱ्या दक्षिण आफ्रिकेंतील प्रजाजनांस स्वराज्याचे अधिकार द्यावे, शंभर वर्षेंपर्यंत स्वराज्य नसल्यानें आयर्लंडांत जो द्वेषाग्नि जळत राहिला आहे तो त्यांना होमरूल देऊन शमवावा; तात्पर्य, अशा प्रकारच्या लोकहिताच्या अनेक बाबी अधिकारारूढ लिबरल पक्षानें पुढें आणिल्या असतां त्यांपैकीं प्रत्येकीस वरिष्ठ सभेनें एकजात विरोधच केला व अशा रीतीनें त्यांनीं आपल्या पापाचे घडे आपल्या हातांनीं भरून घेतले.

इकडे लोकांत खळबळ माजून निवडणुकीवर निवडणुकी होऊन राष्ट्रांतील जनतेनें लिबरल पक्षासच फिरून फिरून निवडून दिलें, व त्यांच्यावरील सर्व कृत्यांस प्रत्यक्ष व अप्रत्यक्ष दोन्ही तऱ्हेची मंजुरी दिली. अशा प्रसंगीं वरिष्ठ सभेच्या अधिकाराचा प्रश्न ८० वर्षांनीं फिरून उपस्थित झाला. आजपर्यंतच्या अनुभवानें पहातां वरिष्ठ सभा पुढें जोंपर्यंत अस्तित्वांत राहील तोंपर्यंत तिचा जाच कधींहि टळणार नाहीं, सबब ती सभाच मुळीं सफई बुडवावी, असें जनतेस वाटूं लागल्यास त्यांत आश्चर्य नाहीं. परंतु इंग्लंडचे मुत्सद्दी आपल्या घरच्या कारभारांत तरी फार शहाणे व समंजस आहेत. यामुळें आज लोकमत सर्वस्वीं आपल्या बाजूस असतांहि, आणि लिबरल पक्षांतील कित्येक अत्याग्रही लोक अमीरउमरावरूपी हा शत्रु कायमचाच समूळ कापून काढावा–दयामाया कांहीं दाखवूं नये–असा हट्ट घेऊन बसले असतांहि, लिबरल प्रधानमंडळानें

सात्विक अशा मध्यम मार्गाचा अवलंब करून, " वरिष्ठ सभा राहिली तर राहो, परंतु लोकसभेनें एखादें बिल लोकसभेच्या तीन स्वतंत्र बैठकींत मंजूर केलें असतां वरिष्ठ सभेनें तें मंजूर केलेंच पाहिजे, व तिनें तें प्रत्यक्ष नामंजूर केलें तरीहि त्या बिलाचा अंमल कायदा म्हणून झालाच पाहिजे " असा ठराव केला. परंतु या ठरावासहि कायद्याचें स्वरूप येण्यास लॉर्डांची मंजुरी पाहिजे; व अशी मंजुरी देणें म्हणजे केवळ आपली मानच आपल्या हातानें कापून घेणें असें नसलें तरी, आपल्याच हातानें आपल्या पायांत खोडा चढविण्यासारखें निःसंशय असल्यानें अशा ठरावास मंजुरी देण्यास लॉर्ड लोकांनीं अतिशयच आढेवेढे घेतले. लॉर्डांच्या बाजूनें वादांत शिव्याशापांची लाखोली वाहिली गेली; अंग चोरून अडचणींतून निसटून जाण्याचे सर्व कावेबाज उपाय थकले; कालगत करण्याची सीमा झाली; उलटे सुलटे ठराव करून त्यांत वरिष्ठ सभेस पकडून ठेवण्याचे प्रयत्न संपले; राजाकडे व्हावयाच्या तितक्या सर्व कागाळ्या झाल्या; लोकसभेंत बंडाळी माजवून काम बंद पाडलें; प्रधानमंडळावर राजद्रोहाचे आरोप व फौजदारी खटले यांची धमकी घालून झाली; व देशांत युद्ध माजून प्रत्यक्ष रक्तपात होण्याच्या भीतीचें ब्रह्मास्त्रहि सोडून पाहिलें ! परंतु लोकसभेमध्यें प्रधानमंडळास निष्ठापूर्वक भरपूर पाठबळ असल्यामुळें अमीरउमरावांच्या अष्टांगमय चळवळीचा व वळवळीचा उपयोग कांहीं एक झाला नाहीं. वरिष्ठ सभेचे अधिकार छाटण्याच्या मुद्यावर दोनदां निवडणुकी झाल्या व दोनदोनदां तींच तींच बिलें लोकसभेंत मंजूर झालीं. अर्थात् यापुढें राजानें प्रधानमंडळाचें ऐकून जरूर तितके लॉर्ड निर्माण करावे, किंवा लॉर्डांनीं आपण होऊन बिल मंजूर करावें; याशिवाय तिसरी गोष्टच उरली नव्हती. १८३२ सालाप्रमाणें याहि वेळीं राजानें नवीन लॉर्ड उत्पन्न करण्यास मंजुरी दिली होती. परंतु आपल्या हातानें खोडा पायांत न घातला तरी तो दुसऱ्याच्या हातानें तरी घातला जाणारच, पण शेंकडों नवीन लिबरल लॉर्डांची भरती वरिष्ठ सभेंत झाल्यानें या खोड्यास वरतीं खीळ बसून कुलूप मात्र लागणार तें तरी टाळावें, व आज बिल मंजूर करून पुढेंमागें कॉन्झरवेटिव्ह पक्षाची लोकसभेंत सरशी झाल्यास हा गाडा उलथून टाकतां येईल या आशेवर दिवस कंठावे, हें लॉर्ड लॅन्सडौन यांचें मुत्सद्दीपणाचें धोरण अखेर विजयी होऊन वरिष्ठ सभेंत व्हेटो-बिल मंजूर झालें; व अशा रीतीनें लोकपक्षानें ही कुस्ती बिनतोड जिंकली !

विलायतेंतील या लोकपक्षाच्या लोकोत्तर यशाचें महत्त्व पुष्कळच आहे. एक तर हल्लीं पास झालेलें 'व्हेटो बिल' जोंपर्यंत अमलांत राहील तोंपर्यंत लोकपक्षाचें कोणतेंहि काम सिद्धीस जाण्यास लोकपक्षास फक्त कॉमन्स सभेमध्यें आपलें बहुमत असलें म्हणजे पुरे. पार्लमेंटच्या निवडणुकी हल्लीं सर्वस्वीं लोकांच्याच हातीं असल्यामुळें खऱ्या लोकपक्षीय प्रतिनिधींचें बहुमत करून देणें ही त्यांच्या हातची गोष्ट आहे, व तसें ते न करतील तर त्याचा दोष केवळ त्यांजकडे राहील. दुसरे पक्षीं हें बहुमत त्यांस लागोपाठ पार्लमेंटच्या तीन बैठकींपर्यंत कायम ठेवितां आलें तर ते जो करतील तो कायदा होईल; कारण त्यांनीं त्रिवार मंजूर केलेल्या बिलास यापुढें स्वतःप्रामाण्य व स्वतःसिद्धि येणार आहे. नवीन लॉर्ड्स उत्पन्न करण्याचा प्रश्नच यापुढें रहात नाहीं; व लॉर्डांनीं आपली संमति न दिली तरी त्यांनीं ती आपल्या पदरांत खुशाल बांधून ठेवावी! तिचा काडीइतकाहि उपयोग नाहीं. शिवाय त्यांतल्या त्यांत दुसरी एक गोष्ट साधली ती ही कीं, नवीन लॉर्ड निर्माण करण्याच्या कामीं प्रधानमंडळास राजाच्या तोंडाकडे पूर्वीं पहावें लागे व त्याची संमति मिळविण्यास आततायिपणा करावा लागे; व इतकेंहि होऊन ही मंजुरी न देतां प्रधानमंडळाचे राजीनामे पत्करून पार्लमेंट बरखास्त करून फिरून नव्या नव्या निवडणुकींचा घोळ घालणें राजास शक्य होतें. तेंहि यापुढें राहिलें नाहीं. राहतां राहतां लोकपक्षाच्या मार्गांत एकच अडचण राहिली, ती कोणत्याहि बिलास अखेर खुद्द राजाची संमति मिळणें ही होय. परंतु लोकमतानें धारण केलेलें हें उग्र रूप दिसत असतां, अमीरउमरावांची झालेली दुर्दशा डोळ्यांपुढें असतां, आपल्या नामंजुरीच्या गवताची काडी लोकमताच्या झंझावतास आड करूं पाहणारा वेडा राजा इंग्लंडच्या गादीवर यापुढें कधीं येईल हें शक्य नाहीं; व आलाच तर मि. केरहार्डी यांनीं "राजमुकुट मुशींत घालून वितळविण्याची" जी अघोरपंथी रसायन-प्रक्रिया बोलून दाखविली आहे तिचाच प्रयोग होईल, हें भविष्योत्तर पुराण कोणासहि लिहून ठेवितां येण्यासारखें आहे. अशा रीतीनें मिळालेल्या सत्तेचा उपयोग विलायतेंतलि लोकपक्ष बरा करील किंवा वाईट करील—या सत्तेच्या भरांत त्यांजकडून होणाऱ्या गोष्टी चांगल्या होतील किंवा वाईट होतील—असल्या शंका मनांत आणण्याची ही वेळहि नाहीं व कारणहि नाहीं! स्वावलंबनवादी स्वातंत्र्यप्रिय प्रजासत्तेचें आदितत्त्वच असें आहे कीं, मनुष्यमात्राला जें चांगलें वाटेल तें त्याचें त्यानेंच

करावें; येवढेंच नव्हे पण त्याच्या हातून जरी चूक होईल असाच संभव असला तरी ती चुकहि पण करण्याचा अधिकार त्याचाच आहे. पापपुण्याचा अखेर धनी ज्याचा तोच परंतु तें करण्याला पूर्ण स्वातंत्र्य पाहिजे, असा वाद खुद्द ईश्वराशींहि घालण्यास मनुष्यमात्राला जन्मसिद्ध हक्क आहे. मग राजे व अमीर-उमराव यांची कथा काय ?

---

## १४. चीनला स्वराज्य मिळालें !

( ता. ११ ऑक्टोबर सन १९१० )

सोमवार ता. ३ आक्टोबर १९१० हा दिवस जगाच्या इतिहासांतील महत्त्वाच्या दिवसांपैकीं एक गणला जाईल यांत शंका नाहीं. या दिवशीं पृथ्वीच्या दोन टोंकांस दोन मोठ्या राज्यक्रांत्या झाल्या. पहिली राज्यक्रांति युरोपखंडांतील सर्वांत पश्चिमेकडे असलेल्या लहानशा पोर्तुगाल नामक राष्ट्रांत घडून आली. या क्रांतीमुळें पोर्तुगाल देशांत प्रजासत्ताक राज्य स्थापित झालें आहे. असलें राज्य स्थापण्याची चळवळ पोर्तुगालमध्यें आज बरेच दिवस सुरू असून अडीच वर्षांपूर्वी, म्हणजे १९०८ सालच्या जानेवारी महिन्यांत, पोर्तुगालचा माजी राजा डॉन कार्लो व त्याचा थोरला मुलगा फिलिप यांचे दिवसाढवळ्या भररस्त्यांत खून झाले. ही याच चळवळींत सामील असलेल्या कांहीं थोड्या तामसी व आततायी लोकांची कामगिरी होती. या खुनांपूर्वी कांहीं वर्षेंपर्यंत कार्लो राजानें एकतंत्री व स्वायत्त अशा राज्यकारभाराची कमाल करून सोडली होती. प्रजासत्ताक राज्यपद्धतीचें जें बीज पोर्तुगीज लोकांच्या मनांत रुजलें होतें, तें १८८९ पासून सुमारें वीस वर्षें हा राजा निर्मूल करण्याची खटपट करीत होता. अखेर दडपशाहीचा कळस होऊन १९०७ सालीं त्यानें दंग्याधोप्याचें निमित्त करून म्युनिसिपालिट्या, वर्तमानपत्रें, शाळा, विश्वविद्यालय व एक शतकभर अस्तित्वांत असलेली पार्लमेंट सभाहि बंद करून सर्व राज्यकारभार आपल्या एकट्या प्रधानाच्या हातीं दिला. यामुळें राज्यक्रांतिकारक असा एक कट निर्माण होऊन युद्धास प्रारंभहि झाला. परंतु त्या वेळीं लष्कर व आरमार हीं प्रजापक्षास हवीं तितकीं अनुकूल न झाल्यानें कटवाल्यांचा मोड झाला. तथापि, व्यक्तिशः कटवाल्यांनीं पुढें राजाचा खून करून कटाचा कार्यभाग अंशतः सिद्धीस नेला.

कार्लो राजाच्या खुनानंतर त्याचा धाकटा मुलगा, म्हणजे हल्लीं पदभ्रष्ट झालेला राजा मॅन्युएल, यास गादीवर बसविण्यांत आलें; पण माजी राजाचा जुलमी प्रधान सीनोर फ्रांको यास हद्दपारीची शिक्षा झाली, आणि प्रधानमंडळानें पार्लमेंट वगैरे पूर्वीच्या संस्थांची फिरून प्राणप्रतिष्ठा केली. इतकें झालें तरी प्रजासत्ताक राज्य स्थापण्याच्या कल्पनेचें सल लोकांच्या मनांतून अद्यापि गेलें नव्हतें हें उघड आहे; कारण, गेल्या दोन अडीच वर्षांत प्रजासत्तात्मक स्वराज्याच्या कल्पनेची वाढ पोर्तुगालमध्यें झाली एवढेंच नव्हे, तर पूर्वी लष्कर व आरमार यांच्या प्रतिकूलतेची जी अडचण झाली होती, तीहि हल्लीं नाहींशी होऊन क्रांतिकारक मत फिरून बळावलें, व त्याचा परिणाम गेल्या सोमवारच्या गोष्टींनीं घडून आला. या वेळीं राजक्रांतीचे दोन बाहु लष्कर व आरमार-हीं लोकांस अनुकूल झाल्यामुळें त्यांनीं राजधानीचें शहर हस्तगत केलें; राजवाड्यावर तोफांचा भडिमार केला; व युद्धाच्या सुरुवातीपासून तीस तासांचे आंत प्रजासत्ताक राज्य स्थापिलें!

पृथ्वीच्या या पश्चिम टोंकास ज्या दिवशीं हा प्रकार घडून आला, त्याच-दिवशीं तिच्या पूर्वेकडच्या टोंकास दुसरी एक राज्यक्रांति घडून आली; ती चिनांतील होय. 'युद्धांतील विजयाच्या यशापेक्षां शांततेंतील विजयाचें यश मोठें असतें'–अशी एक विरोधाभासात्मक म्हण इंग्रजी भाषेंत आहे. चिनांत झालेली राज्यक्रांति ही या म्हणीची सत्यता पटविणारी आहे, यांत शंका नाहीं. पोर्तु-गालमध्यें घडून येणारी क्रांति अमुक दिवशीं अमुक रीतीनें घडून येणार अशी कोणास माहिती नव्हती, किंवा कोणीं तसें भविष्यहि वर्तविलेलें नव्हतें. यामुळें झालेला प्रकार अद्भुतसा वाटतो; व प्रायः सर्वच अद्भुत गोष्टी त्यांच्या अद्भुतत्वामुळें रम्य वाटतात. चिनांत घडून आलेली क्रांति वरील अर्थानें अद्भुत नव्हती; तिची नक्की तारीख एक वर्षापूर्वीच ठरून गेली होती–तथापि रम्यपणाच्या दृष्टीनें पोर्तुगालमध्यें घडलेल्या क्रांतीहून ती खाचित कमी नाहीं; उलट जास्तच आहे. युद्धाचा रम्यपणा केवळ प्राकृत जनांच्या दृष्टीनेंच असतो; पण ज्यांचीं मनें सुसंस्कृत झालेलीं असतात, ज्यांना कार्यकारण भाव चांगला समजतो, ज्यांना राष्ट्रीय इतिहासाचें सूक्ष्म मर्म कळतें, त्यांचें मन रिझविण्याला किंवा त्यांच्या मनांत उदात्त विचार उत्पन्न करण्याला तरवारींचा चकचकाट किंवा तोफांचा धडधडाटच पाहिजे असें नाहीं, अशा लोकांच्या दृष्टीनें या

जुन्यापुराण्या पौर्वात्य राष्ट्रांत घडून आलेली राज्यक्रांति या पाश्चात्यराष्ट्रांत घडून आलेल्या क्रांतीइतकीच किंबहुना रतिभर अधिकच महत्त्वाची वाटेल यांत शंका नाहीं.

चिनांत घडून आलेली क्रांति म्हणजे सर्व राष्ट्रांकरितां मिळून स्थापित झालेल्या नूतन पार्लमेंट सभेचा प्रवेशसमारंभ होय. या पार्लमेंटचा इतिहास थोडक्यांत सांगावयाचा म्हणजे असा आहेः—या इतिहासास १८९५ सालापासून खरा प्रारंभ होतो. १८९५ सालीं कोरिया प्रांतांतील अंतर्व्यवस्थेच्यासंबंधानें जपान व चीन या दोन राष्ट्रांत युद्ध होऊन, चिमुकल्या जपाननें प्रचंड चीनचा हां हां म्हणतां पराभव करून, त्यापासून फोर्मोसा नांवाचें वीस लक्ष लोकवस्तीचें व चीनच्या सरहद्दीजवळ असणारें बेट हस्तगत केलें, आणि नुकसानी व लष्कर खर्च यादाखल ४५ कोट रुपयांचा दंड चोपून घेतला. आकस्मिक संकटें किंवा विपत्ति हीं संसारांत ज्याप्रमाणें व्यक्तीच्या वैराग्यबुद्धीस उत्तेजक होतात, त्याचप्रमाणें राष्ट्रीय इतिहासांतहि राष्ट्रांतील लोकांच्या मनांत आत्मनिरीक्षण करण्यास व त्यांची सुधारणा होण्यास तीं उपयोगीं पडतात. जपाननें केलेल्या पराभवानें चीनचे डोळे लक्कन उघडले. जपान इतका लहान असतां त्याच्या अंगीं इतकें सामर्थ्य कशानें आलें ! व चीन इतका जुनापुराणा व प्रचंड असत त्यास इतका कमकुवतपणा कशानें आला ! या गोष्टीकडे चिनी लोकांचें लक्ष वेधलें. बुद्धिसामर्थ्यांत अग्रेसर, देशभक्तिपूर्ण व स्वार्थत्यागी असे चिनी 'ब्राह्मण' पुढें सरसावले; तरुण पिढीमध्यें विद्या व ज्ञान हीं संपादण्याची 'अहमहमिका' सुरू झाली; सर्व देशभर राजकीय सुधारणा घडवून आणण्याच्या हेतूनें सभा व मंडळ्या स्थापन झाल्या; या मंडळ्यांस अधिकारीवर्गहि सहानुभूति दाखवूं लागला; व चहूंकडे 'सुधारणा सुधारणा' असा एकच ध्वनि दुमदुमूं लागला. सुदैवानें या सर्व गोष्टींमुळें अंतःप्रेरणा होऊन १८९८ सालीं चीनच्या खुद्द बादशहानें राष्ट्रांतील प्रमुख सुधारणावादी लोक राजधानीच्या शहरीं एकत्र जमविले, व त्यांच्या सल्ल्यानें, आजची चीनची पार्लमेंट हें ज्यांचें फळ आहे, असे सुधारणेचे हुकूम एकामागून एक प्रसिद्ध करण्यास सुरुवात केली. हे हुकूम एकाच विवक्षित खात्यासंबंधींचे होते असें नाहीं. सामाजिक, नैतिक व राजकीय ज्या ज्या म्हणून गोष्टींनीं राजसत्ता थोड्या व्यक्तींच्या हातीं राहून प्रजा परतंत्र, अज्ञानी व दुर्गुणी झाली होती त्या सर्व गोष्टींचा नायनाट करण्याचा चिनी बादशहा 'वंग सू"

थानें जणूं काय विडाच उचलला होता. या व्यापक सुधारणा सुरू करितांना सर्व राष्ट्रास कैफ व अंमल यांत निरंतर लोळत ठेवणाऱ्या अफूच्या व्यसनावर तर अर्थातच प्रथम हल्ला केला होता; पण पूर्वी एके काळीं मँचू घराण्याच्या अमलांत, परदास्याच्या सुखस्वप्नांत परकीयांचें अनुकरण करण्याच्या हेतूनें केसांच्या लांबलांब वेण्या पुरुषांनीं घालण्यांत भूषण मानण्याची जी रूढि चिनांत पडून गेली होती तीहि या बादशाही हुकमांनीं दूषणास्पद ठरविली. तात्पर्य, या एका लहानशा गोष्टीवरून, १८९८ सालीं जी सुधारणा व आत्मोन्नति यांची लाट चिनी राष्ट्रांत प्रथम उठली ती किती व्यापक होती, याची चांगली कल्पना करितां येईल.

इकडे आपणांस हिंदुस्थानांत चिनांतील बातमी पद्धतशिर कळण्यास साधनें नाहींत यामुळें केवळ इंग्रजी पत्रांस मनोरंजक व महत्त्वाची अशी वाटेल तेवढीच बातमी मधून मधून आपल्या कानावर येते. पण सर्व राष्ट्रास गुलाम करून सोडणारें पिढीजाद अफूचें व्यसन चिनी लोकांनीं अवघ्या दहा वर्षांत निश्चयानें पार नाहींसें केलें, आणि तिबेटांत ब्रह्मदेशच्या सरहद्दीवर सैन्य पाठवून पिंवळ्या चिनी लोकांचा आजपर्यंत जो नुसता 'पेटींतला'च बागुलबोवा होता, तो तसा नसून तो चालता बोलता प्राणी आहे, तो शक्तीनें प्रचंड आहे व सर्व मनुष्यमात्राप्रमाणें त्याला स्वाभिमानादि गुण व क्रोधादि मनोविकार आहेत ही गोष्ट युरोपियन राष्ट्रांस चिनानें अवघ्या दहा वर्षांत पटविली, ही हकीकत तरी हिंदुस्थानच्या लोकांस आतां प्रत्यक्ष माहीत झाली आहे. असो; बादशहानें योजलेल्या सुधारणेच्या धोरणास त्याची सावत्र आई, राजमंडळ, पूर्वीं राजकीय प्रतिष्ठा पावलेला मँचू अभिजात वर्ग, वगैरे सर्व प्रतिकूल होतीं; व पुढें लवकरच म्हणजे १८९९ सालीं युरोपियन लोकांविरुद्ध 'बॉक्सर' लोकांचें बंड झाल्यामुळें सुधारणेच्या या प्रवाहास बराच प्रतिबंधहि झाला. एवढेंच नव्हे तर ज्या युरोपियन राष्ट्रांचीं नखें चीनच्या काळजापर्यंत आजपर्यंत हळूहळू शिरलीं होतीं, तीं राष्ट्रें या बंडाचा फायदा घेऊन तें काळीज व त्या काळजाला कोंदणभूत असें चिनी राष्ट्राचें शरीर हीं फाडून वांटणी करून खातात कीं काय, अशीहि भीति वाटूं लागली होती. परंतु सुदैवानें तसा परिणाम झाला नाहीं. १९०१ सालीं सर्व राष्ट्रांच्या संमतीनें तह झाला, व युरोपियन राष्ट्रांचें नुकसान भरून देण्यापलीकडे चिनावर फारशी जोखीम पडली

नाहीं. दरम्यान राष्ट्रीय सुधारणेचें बीज जें लोकांच्या मनांत रुजलें होतें, तें हळू हळू वाढतच होतें. बॉक्सर लोकांनीं केलेल्या बंडांत युरोपियन-द्वेष-मूलक असें स्वदेशभक्तीचें बीज होतें हें खरें; तथापि, तें बंड शमल्यावर पाश्चात्य विद्या, सुधारणा व राज्यव्यवस्था यांजबद्दल तरुण पिढीची प्रीति दिवसेंदिवस वाढतच चालली. शिवाय, १८९५ सालीं चीनचा पराभव करून जपाननें चिनी लोकांस जी जालीम मात्रा दिली, तिला पुढें लवकरच जपाननें प्रचंड रशियाचा जो पराभव केला त्याच्या योगानें उत्कृष्ट अनुपानच मिळाल्यासारखें झालें. चिनांतून जपानांत व युरोपांत जाणाऱ्या विद्यार्थ्यांची संख्या वाढूं लागली. १९०५ सालीं राज्यकारभारांत सुधारणा करण्यास प्रत्यक्ष सुरुवात झाली. या सालीं चिनी सरकारनें पांच वरिष्ठ अधिकाऱ्यांचें कमिशन नेमून परदेशांत जाऊन तेथील लोकस्थिति व राज्यकारभार यांची माहिती मिळवून आणण्याचा हुकूम केला. या कमिशननें सर्व युरोपखंडांत फिरून १९०६ सालीं रिपोर्ट केला. त्यांत राष्ट्रामध्यें 'स्वराज्यात्मक' अशी राज्यपद्धति असणें, म्हणजे अधिकारीवर्गाचे अधिकार नियमित व मर्यादित असून त्यांच्यादर जनतेनें निवडून दिलेल्या प्रतिनिधींची सत्ता व हुकमत चालणें—या गोष्टींपासून खरें राष्ट्रहित साधतें, व चिनांतहि अशा प्रकारचें स्वराज्य स्थापण्यांत यावें, असा अभिप्राय दिला होता. कमिशनच्या या रिपोर्टाचा विचार करण्याकरितां १९०६ सालच्या ऑगस्ट महिन्यांत सर्वांत वरिष्ठ अशा अधिकाऱ्यांची कमिटी नेमण्यांत आली; व पुढें सप्टेंबरच्या पहिल्या तारखेस बादशाही वटहुकूम ऊर्फ जाहीरनामा निघून त्याच्या द्वारें राष्ट्रास निश्चयात्मक असें कळविण्यांत आलें कीं, खुद्द चिनी बादशहाचे अधिकार जरी पूर्वीप्रमाणें अबाधित राहतील तरी यापुढें जमाखर्चाची व्यवस्था नियमबद्ध होईल; लष्कराची सुधारणा करण्यांत येईल; कायद्यांची दुरुस्ती होईल; व या व्यवस्थेचा अनुभव घेऊन पुढें थोड्याच वर्षांत अस्सल स्वराज्याचें मुख्य हक्क प्रजेस देण्यांत येतील. १९०७ सालच्या सप्टेंबर महिन्यांत 'स्वराज्याच्या' घटनेचा मसुदा करण्याकरितां प्रधानमंडळाची कमिटी नेमण्यांत आली. ह्या वेळपर्यंत चिनांत फक्त प्रधानमंडळ एवढेंच काय तें मंडळ म्हणून असे. १९०७ सालच्या आक्टोबर महिन्यांत प्रांतानिहाय कौन्सिलें (Provincial Assemblies) व जिल्ह्यानिहाय स्थानिक कमिट्या करण्याचें ठरलें. प्रथमतः ह्या कौन्सिलाचे सभासद प्रांतानिहायच्या गव्हर्नरांनीं नेमिले. १९०८ सालच्या

जुलैच्या २२ तारखेस प्रांतिक कौन्सिलांच्या कायमच्या नियमाचा मसुदा प्रसिद्ध करण्यांत आला. हे नियम बहुधा सर्व जपानांतील स्वराज्यघटनेच्या नियमाच्या आधारें करण्यांत आलेले होते. या नियमांप्रमाणें प्रांतिक कौन्सिलांचे सभासद लोकनियुक्त असतील; पण कांहीं दिवसपर्यंत हीं कौन्सिलें केवळ सल्लागारांचें काम करतील. या नियमांनीं मतदारांचे हक्कहि ठरविण्यांत आले; यासंबंधानें एक गोष्ट ध्यानांत ठेवण्यासारखी आहे ती ही कीं, जो कोणी म्हणून अफू खात असेल त्यास मतदारीचा हक्क मिळणार नाहीं असें ठरविण्यांत आलें होतें! पुढें आगस्ट महिन्यांत स्वराज्याचे अखेरपर्यंतचे अधिकार कसकशा अनुक्रमानें लोकांस द्यावयाचे, यासंबंधीं एक जाहीरपत्रक निघालें. हे अधिकार मिळण्याची अखेरची मर्यादा नऊ वर्षांची ठरविण्यांत आली; म्हणजे गेल्या ३ तारखेस ज्या पार्लमेंटचा अरुणोदय झाला तो स्वराज्यरूपी सूर्य १९१७ सालीं पूर्ण दृग्गोचर होणार म्हणजे या सालीं पार्लमेंटचीं दोन्हीं अंगें लॉर्ड व लोकनियुक्त कॉमन्स यांच्या सभा सरास भरण्यास व या सभांनीं प्रधानमंडळाच्या हातून राज्यकारभार जबाबदार रीतीनें घेण्यास सुरुवात होणार!

तात्पर्य, ज्या क्रमानें तीस वर्षांपूर्वी जपानच्या प्रजेनें 'स्वराज्य' संस्थापण्यास सुरुवात केली, त्याच क्रमानें चीनमध्यें आज त्याच कार्यास सुरुवात झालेली आहे, व त्याच क्रमानें तें कार्य आणखी आठ वर्षांत पुरें होईल. अशा रीतीनें जपानच्या शेजारसंगतीचा फायदा चिनास मिळाला आहे. जपान व चीन यांजमध्यें आज किंवा यापूर्वी मोठासा प्रेमभाव वसत होता असें नाहीं; व १८९५ सालीं तर दोघां शेजाऱ्यांत युद्ध झालें. तथापि जपान हा चीनला धर्मदृष्ट्या जितका जवळ आहे, तितकें इतर कोणचेंहि राष्ट्र जवळ नाहीं. शिवाय, युरोपियन राष्ट्रांशीं संबंध आलेलीं स्वतंत्र पौर्वात्य राष्ट्रें या नात्यानें जपान व चीन हे देश आज एकाच नावेंत बसल्यासारखे आहेत. वास्तविक दिशा या परस्पर विरुद्ध असल्या तरी त्या स्वतः भांडत नाहींत; पूर्व पश्चिम यांचा विरोध मनुष्यकृत आहे; भांडण्यास दुसरें कांहीं कारण नसलें तर तूं पूर्वेचा व मी पश्चिमेचा, एवढ्यावरहि भांडण सुरू करण्याची मनुष्याची प्रवृत्ति असते. १८९८–९९ सालीं अशाच तत्त्वावर चीनविरुद्ध युरोपियन राष्ट्रांची घटना झाली होती, व पुढें मागें पूर्व विरुद्ध पश्चिम अशा तत्त्वावर युद्धहि होण्याचा संभव नाहींच असें कोणीं म्हणावें?

अशा स्थितींत चीन व जपान यांस आपण एकपक्षीय असें वाटावें हें स्वाभाविकच आहे. जपाननें चीनप्रमाणें कोरियासहि आपल्या शिक्षणाचा फायदा देऊं केला होता, पण 'वितरति गुरुः प्राज्ञे विद्यां यथैव तथा जडे' या सुप्रसिद्ध श्लोकांत सांगितल्याप्रमाणें विद्या तीच पण चीननें ती उचलली; यामुळें चीनचें स्वातंत्र्य कायम राहून त्याच्या प्रगतीस प्रारंभ झाला आहे, पण तेंच कोरिया मागें पडून अखेर जपानच्या राज्यास जोडलें गेलें.

असो; जो चीन केवळ दहा पंधरा वर्षांपूर्वी तुकडे तुकडे होऊन युरोपियन राष्ट्रांच्या भक्ष्यस्थानीं पडणार कीं काय अशी भीति वाटत होती, तोच आज ती भीति समूळ नष्ट होऊन उलट राष्ट्रोन्नतीचा मार्ग संथपणें आक्रमूं लागला आहे. ही प्रगति अशीच कित्येक दिवस चालेल तर जगांतील राष्ट्रीय सामर्थ्यांचा ताजवा कसे काय झोके खाऊं लागेल, याचा अंदाज करतां येणें कठिण आहे. जपानप्रमाणें चीनच्या उदाहरणानें दोन गोष्टी चांगल्याच सिद्ध होतात एक तर सजीवतेचें बीज नष्ट न झालेलें राष्ट्र कितीहि मागसलेलें असलें, तरी आपल्या पायांवर उभे राहून सुधारण्याच्या मार्गास लागलें असतां, त्याची राजकीय प्रगति किती थोडक्या काळांत होऊं लागते; व दुसरी ही कीं स्वराज्याच्या अधिकारास मुळींच पात्र नसल्याचा ज्या पौर्वात्य देशांतल्या राष्ट्रांवर पाश्चात्यांचा आरोप आहे, त्याच राष्ट्रांपैकीं एक पूर्वी अगदीं नादान वाटणारें राष्ट्र आज स्वराज्यसुखाच्या मार्गास लागलें आहे. पार्लमेंटरी राजसंस्थेची ही लाट तुर्कस्थान व इराण या पश्चिम देशांतून जशी हिंदुस्थानच्या पश्चिम सरहद्दीस येऊन भिडली, तशीच ती चीनच्या महत्त्वाकांक्षेमुळें हल्लीं हिंदुस्थानच्या पूर्वसरहद्दीस येऊन भिडली आहे. दोन बाजूंनीं येऊन भिडणाऱ्या या प्रगतिसमुद्रांच्या लाटा अखेर हिंदुस्थानावरून जाऊन एक जीव होणार, किंवा हे पूर्वपश्चिम समुद्र निरंतर अलग ठेऊन हिंदुस्थान स्वतः कोरडा ठणठणीत पाषाणमय असा मेरुपर्वत ठरणार—हें भविष्य अद्यापि अगाध कालाच्या प्रचंड उदर—कंदरांतील एक अदृश्य रत्न आहे. याहून जास्त कांहीं म्हणण्याची आज सोय नाहीं.

---

# १५ बादशाही मनोरा ढांसळला !

( ता. ११ आक्टोबर सन १९१० )

गुदस्त सालीं सुमारें याच दिवसांत चिनी लोकांना स्वराज्य मिळणार अशी खबर केसरीनें वाचकांस दिली होती. त्या वेळच्या समजुतीप्रमाणें या स्वराज्याचा प्रत्यक्ष अंमल सुमारें सात वर्षांनीं व्हावयाचा होता. म्हणजे १९१७ सालापासून, विलायतेंतील पार्लमेंटप्रमाणें, चिनी लोकांस सामान्य लोकांची एक व बड्या लोकांची एक अशा कायदे करणाऱ्या दोन पार्लमेंटसभा मिळून, अंमलबजावणी करणारे दौलतीचे सर्व नोकर लोक—प्रधान मंडळासुद्धां—या दोन सभांना जबाबदार राहून राज्यकारभारास सुरुवात व्हावयाची होती. पण गेल्या बारा महिन्यांत हा सप्तवार्षिक वायदाहि दुःसह होऊन, त्यांना मूर्त स्वरूपाचें स्वराज्य याहूनहिं लवकर हातीं यावयास पाहिजे असा स्तुत्य उतावळेपणा अथवा अभिनंदनीय उत्कंठा उत्पन्न झाल्याचीं स्पष्ट चिन्हें दिसूं लागलीं आहेत. कांहीं महिन्यांपूर्वी, या सातांतील तीन वर्षे लोकाग्रहास्तव चिनी बादशहानें कमी केल्याचें प्रसिद्ध झालें होतेंच. पण उरलेलीं चार वर्षे देखील चार युगांप्रमाणें वाटूनच कीं काय, 'बंडवाले' हें नांव मिळालेल्या चिनी देशभक्तांनीं एका हातांत शस्त्र घेऊन दुसऱ्या हातानें प्रजासत्ताक राज्याचें निशाण फडकविण्यास नेटानें—प्राण खर्ची घालण्याइतक्या स्वार्थत्यागबुद्धीनें—चळवळ आरंभिली आहे. ही चळवळ निवळ शाब्दिक सामोपचाराची नसून राजपक्ष व प्रजापक्ष यांचे दरम्यानचा वाद तोफखान्याच्या गोळागोळीनें सुरू आहे. चिनी राजधानीपासून बऱ्याच अंतरावर दक्षिण दिशेस या सशस्त्र चळवळीस सुरुवात झालेली असून प्रजापक्षीय सैन्य लढत लढत व ठाणीं जिंकीत जिंकीत उत्तरेकडे येत आहे. पण इतक्या दुरूनच या चळवळीचा शह पेकिन राजधानीस बसला. प्रजापक्षाच्या मागण्यांचा प्रवेश अभेद्य अशा चिनी दरबारांत होऊन बादशहाचें धाबें हल्लीं दणाणून गेलें आहे. गेल्या आठवड्यांतील तारांतून अशी बातमी प्रसिद्ध झाली आहे कीं, चिनी दरबारनें 'कॉन्स्टिट्यूशन'—स्वराज्याची सनद—ताबडतोब अमलांत आणण्याचें कबूल केलें आहे. इतकेंच नव्हे तर आजपर्यंत या कामीं दिरंगाई झाली त्याबद्दल बादशहानें प्रजेची सपशेल माफीहि मागितली आहे. चिनी राजाचें मुख्य

वैभव म्हटलें म्हणजे त्याची मूर्ति प्रजेच्या दृष्टीस कधीं पडावयाची नाहीं. त्याला ' ईश्वराचा पुत्र ' हा दरबारी किताब आहे. पण गेल्या आठवड्यांत स्वराज्यनिष्ठ अशा चिनी देशभक्तांच्या तोफखान्याच्या हुंकारानें बादशहाच्या सिंहासनाभोंवतीं उभारलेल्या दैवी संपत्तीच्या खोट्या कल्पनांचा जाळीदार मोहक रेशमी पडदा केरसुणीच्या बुरखुंड्यानें कोळिष्टिकें झाडून निघावीं त्याप्रमाणें, साफ उधळून गेला आहे. लोभमूलक, मानवी दुर्गुणपूर्ण अशी चिनी बादशहाची निस्तेज मूर्ति दरबाराच्या बेगडी मखरांत आतां उघडी पडली आहे, आणि ज्या मूर्तीपुढें चिनी प्रजाजनांनींच काय पण कोणत्याहि दर्जाच्या परकीय मनुष्यानें जमिनीवर तीन वेळां गुडघे टेंकून व नऊ वेळ कपाळ आपटून–म्हणजे नीचांतलें नीचत्व पतकरून–मुजरा करावा असा दरबारचा हट्ट, व तो कोणी न करील तर अपमान केल्याबद्दल डोकें मारून घेण्यास तयार व्हावें अशी ज्या गादीची कदर, त्याच गादीवरील बादशहानें हल्लीं असे केविलवाणे शब्द उच्चारले आहेत कीं, " स्वराज्य याहून लवकर दिलें नाहीं ही माझी चूक झाली. स्वराज्य तावडतोब देण्याचा मी हुकूम करितों. हा हुकूम म्हणजे कांहीं तरी भुलथापीचा प्रकार आहे असें समजूं नका. या वेळीं गय करा व दौलतीची अब्रू राखा. " सर्व ' पौर्वात्य ' राष्ट्रें मंदगति हें तर ठरलेंच ! निदान, पंचतंत्रांतील तीन धूर्तांच्या गोष्टीप्रमाणें जो जो युरोपियन भेटतो तो तो हेंच सांगत आल्यामुळें आपण खरोखरच मंदगति आहों अशी पौर्वात्य लोकांची खात्री होत चाललेली होती. त्यांतून चिनाविषयीं तर बोलावयास नको. चिनांतील ढिलाईच्या प्रकाराचीं युरोपियन लोकांनीं केलेलीं वर्णनें वाचलीं असतां तें राष्ट्र खरोखर जिवंत तरी आहे कीं नाहीं, अशीच शंका कोणाहि वाचकास यावयाची. पुष्कळांच्या मतें, राष्ट्राच्या निशाणावरील चित्रांत जर कांहीं अर्थ असला तर, चिनी राष्ट्राच्या निशाणावर गोगलगाईचें चित्र फार चांगलें शोभलें असतें ! चिनी लोकांविषयींचे हे सर्व अंदाज एका बाजूस त्यांच्या नांवें लिहिले, आणि गेल्या दहा पांच वर्षांत चिनी लोकांनीं सुराज्ययुक्त स्वराज्याविषयीं दाखविलेली विलक्षण उत्कंठा दुसरीकडे जमेला धरली तर, ही चिनी असामी दिवाळखोर नाहीं, तरी चांगली शहाजोग असून तिच्या अब्रूच्या भांडवलाचा ठेवा कांहीं अकल्पित असा आहे असेंच म्हणणें भाग येतें.

चिनांतील चालू बंडाळीचें खरें स्वरूप काय आहे हें मागील अंकीं एका

स्फुट लेखांत आम्हीं दिलेंच आहे. परंतु चिनांतील हल्लींच्या एकंदर परिस्थितीचें कारण वाचकांच्या थोडक्यांत समर्पक रीतीनें लक्षांत यावें म्हणून दोन शब्द जास्त सांगण्याचें आम्हीं आज योजिलें आहे. चिनी राष्ट्र फार प्राचीन आहे, याविषयीं वाद नाहीं. चिनी लोकांच्या युगगणनेप्रमाणें त्यांच्या राष्ट्रास जन्मून २२–२३ लक्ष वर्षें झालीं आहेत! पण ही अभिमानमूलक अतिशयोक्ति सोडून दिली तरी असीरिया, इजिप्त व हिंदुस्थान यांच्याइतकेंच चिनी राष्ट्र जुनेंपुराणें आहे. चिनाचा तीन हजार वर्षांपूर्वींचा इतिहास तुरळक व त्रुटित कां होईना पण सांपडतो. चिनांतील अगदीं अलीकडला धर्मगुरु कॉनफ्यूशिअस हा जवळ जवळ गौतमबुद्धाइतका जुना आहे. २२ शें वर्षांपूर्वीं चिनावर स्वदेशी अशा राजाचें एकछत्री राज्य होतें, असे ऐतिहासिक स्पष्ट उल्लेख सांपडतात. सर्वच देशांत निरनिराळ्या वेळीं बाहेरून लोक येऊन वसाहत करून राहिलेले असतात, आणि कालांतरानें जित व जेते—देशी व विदेशी—लोक यांचा एक जीव होऊन निरनिराळे मानव वंश बनतात व राष्ट्ररचना होतात, अशी सर्व जगाच्या इतिहासाची साक्ष असल्यामुळें ज्यांना आपण आज चिनी म्हणतों त्यांची वस्ती चिनांत आज किती हजार वर्षांची आहे हें कोणीं नक्की कसें सांगावें? अर्थात् चिनी लोक हेहि स्वतः चिनांत एक वेळ परकेच नव्हते कशावरून? इंग्लंडांत इंग्रज हे सुद्धां एका दृष्टीनें परकेच नव्हेत काय? पण हे चिनी लोक व चीन देशाची भूमि यांचा निकट संबंध इतक्या जुन्या काळापासून चालत आला आहे कीं, इतर कोणत्याहि राष्ट्रांतील लोकांप्रमाणें चिनांतील हल्लींचे लोक हेच खरे स्वदेशी रहिवाशी, व इतर कोणी असतील तर ते परकीय, असें म्हणण्याची स्थिति कालानें आज सहजच येत आहे. अर्थात् या चिनी लोकांपैकींच कोणी राजा गादीवर असेल तो खरा चिनी राजा, व दुसरा कोणीहि कितीहि वर्षांचा कसाहि असला तरी परकाच राजा, असें चिनी लोकांस वाटणें स्वाभाविक आहे. पण आपणावर स्वदेशी राजा हवा अशी आकांक्षा असली म्हणून राष्ट्रास स्वदेशी राजाच नेहमीं मिळतो असें नाहीं. सातव्या शतकांत चिनांत स्वदेशी राजाचें राज्य असून त्याच्या राज्याचा विस्तार पूर्वेस पिवळ्या समुद्रापासून पश्चिमेस खोतान व काशघर येथपर्यंत होता. यानंतर कित्येक शतकें चिनावर परकी राजांचा अमल झाला. तेराव्या शतकांत योद्धा चंगीजखान यानें चीनचें राज्य जिंकलें, पण फिरून चवदाव्या शतकांत 'मिंग' नामक

चिनी राजवंशानें स्वदेश परत मिळविला. या राजवंशानें ३०० वर्षें राज्य केल्यावर फिरून दैवयोगानें उलथापालथ झाली, आणि चीनची बादशाही हल्लींच्या 'मांचू' नामक परकी राजवंशाकडे आली. चीनचे राजे चिनी असणार असें परक्या लोकांना सकृद्दर्शनीं वाटणें स्वाभाविक आहे. एवढेंच काय पण दोन अडीचशें वर्षांच्या परिचयानें मांचू राजांविषयीं, या परकी राजांविषयींहि, चिनी मुत्सद्यांच्या मनांत एक प्रकारची स्वामिभक्ति उत्पन्न झाली होती. कालावधीनें सर्वच गोष्टी परिचित होतात, आणि परिचयानें प्रेम उत्पन्न होतें, ही नेहमींचीच गोष्ट आहे.

मांचू हे मूळचे तातार, चिनी नव्हेत. इसापनीतींतील घोड्यानें केवळ वैरभावास बळी पडून अविचारानें मनुष्यास आपल्या पाठीवर बसविलें व अखेर तो त्याचा कायमचा गुलाम झाला. तशाच कांहींशा प्रकारानें सतराव्या शतकांत चिनी लोकांनीं या मांचू लोकांना चिनांत येण्यास आमंत्रण केलें, व ते जे एकदां आले ते आपल्या लष्करी सामर्थ्याच्या जोरावर राज्यपद मिळवून कायमचेच सिंहासन बळकावून बसले. राजाची एकटी व्यक्तीच परकीय असली तर कोणत्याहि राष्ट्रांतली प्रजा कदाचित् त्यास हरकत घेणार नाहीं. पण राजाला प्रभावळीशिवाय शोभा नाहीं, आणि ही सर्व परकी प्रभावळच्या प्रभावळ जेव्हां राजा आपल्या बरोबर आणतो तेव्हांच काय तें बिघडतें. एकटा राजा खाऊन किती खाणार! पण त्याची प्रभावळ ही सहस्रमुखी राक्षसाप्रमाणें जित राष्ट्रास घातक होतें हें खुद्द इंग्रज लोकांसहि नॉर्मन लोकांच्या अनुभवानें माहीत आहेच. मांचू राजे सिंहासनस्थ झाल्यानंतर क्रमानें सर्व सत्ता, सर्व संपत्ति व सर्व ऐश्वर्य मांचू लोकांच्या हातीं जाऊन चिनी लोक हे स्वदेशांत भणंग भिकारी होऊन बसले ही सर्व हकीकत सांगण्याचें कारण असें कीं, हल्लींच्या राष्ट्रीय चळवळींत मांचू राजे परकी-स्वदेशी नव्हेत-सबब ते जावे असा एक मुद्दा आहे. मांचू राजांचा चिनी प्रजेस कंटाळा आला असल्याचीं पुष्कळ चिन्हें आहेत. फार काय अलिकडे लांब शेंडी न ठेवितां ती कापून टाकणें हें चिनी राष्ट्राभिमानाचें एक द्योतक असें मानण्यांत येत असतें याचें कारण तरी हेंच कीं, या लांब वेण्यांची 'फासन' चिनांत मांचू लोकांबरोबर आली, आणि त्याच कारणामुळें ती त्यांस हल्लीं नकोशी झाली आहे! एका देशाभिमानी चिनी आंकडेशास्त्र्यानें या लांब वेण्या कापून टाकण्यापासून चिनी राष्ट्रास दरसाल एक अब्ज रुपयांची बचत होईल असा अंदाज

केला आहे ! चिनी लोकांनीं वेण्या कापण्याचा प्रघात पाडून त्यांच्यांचा रोजगार चालू ठेवल्यास देशी कामकरी वर्गास रोजगार मिळेल, वेण्या छाटून टाकल्या असतां वरचेवर हट्टानें उगवणाऱ्या केशकलापांच्या शेतीच्या पिकावर केसांचे मऊ कपडे करण्याचे नवीन कारखाने निघतील, आणि सालिना साठ लक्ष रुपये किंमतीचे स्वदेशी कपडे चिनांत अधिक खपतील असें त्यानें सिद्ध केलें आहे! आंकडेशास्त्री कशांतून काय काढतील याचा नियम नसतो, व केवळ अभिमानानें प्रवृत्त झालेल्या या आंकडेशास्त्र्यानें केलेल्या केसांच्या हिशेबांची खरी सांपत्तिक किंमत कदाचित् केसाइतकीच असेल. पण मोठमोठ्या गोष्टींची मार्मिक परीक्षा कित्येक वेळां दिसण्यांत क्षुद्र अशा गोष्टींवरून करितां येते, तशांतलाच हाहि एक प्रकार आहे. या चिनी आंकडेशास्त्र्याचें हत्यार खरोखर चिनी वेण्यांवर नसून, त्या ठेवण्याची पद्धत ज्या परकी राज्याबरोबर आली त्याच्यावरच तें हत्यार उगारलेलें आहे हें मर्म कोणाच्याहि सहज लक्षांत येण्यासारखें आहे.

असो; गेल्या पन्नास साठ वर्षांत मांचू राजांविषयीं चिनी लोकांच्या मनांत बरेंच वैर उत्पन्न झालें आहे. सन १७५२ सालीं चिनांत टेपिंग नांवाचें प्रचंड बंड झालें, तें परकी मांचू राजा काढून टाकून स्वदेशी चिनी राजा गादीवर बसविण्याकरितांच झालें होतें. तें बंड तेव्हां यशस्वी झालें नाहीं तथापि ती कल्पना मात्र नष्ट झाली नाहीं. एखादा चिनी मुत्सद्दी अगर योद्धा प्रबल व वजनदार झाला असें पाहिलें कीं त्यानें फिरून स्वदेशी राजवंश स्थापावा अशी आकांक्षा चिनी प्रजेच्या मनांत हमेशा उत्पन्न होत असते. प्रसिद्ध मुत्सद्दी लीहंगचंग यानें मनांत आणलें असतें तर चिनी लोकांनीं त्याला गादीवर बसवून त्याचा राजवंश चालविला असता आणि या कामीं त्याचा मानस काय आहे हें पाहण्याकरितां फ्रान्स व इंग्लंड यांनीं खडाहि टाकून पाहिला होता, असें लॉर्ड कर्झन यांनीं आपल्या चीनच्या प्रवासाच्या पुस्तकांत नमूद केलेलें आहे. पण असली महत्त्वाकांक्षा पुष्कळांच्या मनांत असली तरी ती सफळ करण्यास लागणारें धाडस थोडक्यांतच असतें. लीहंगचंग यांना परकी मांचू राजवंशाची सेवा करण्यांतच विशेष भूषण वाटत असे; व स्वामिभक्तीच्या गोड नांवाखालीं त्यांस आपल्या अंगचा कमकुवतपणा झांकतां आला. हल्लीं युआन-शि-काई हा चिनी सरदार शहाणपणांत लीहंगचंगच्या तोडीच्या मानण्यांत येत आहे. त्याचाहि प्रकार असाच आहे. चिनी प्रजेस स्वराज्याचे हक्क व राष्ट्रीय स्वातंत्र्य देण्याच्या चळवळींत या सरदारानें

आज बरेच दिवसांपासून पुढाकार घेतलेला आहे. तथापि हल्लींच्या बिकट प्रसंगांतून मांचू–राजवंशाला, ‘ आपणास कोणी निभावून नेईल तर हाच नेईल ’ असें वाटत असून, चिनी बादशहानें त्यास बंड मोडण्याच्या कामगिरीवर मुख्य अधिकारी नेमलें आहे. या दृष्टीनें युआन-शि-काई हा इटॅलिअन ग्यारीबॉल्डीसारखा व डॉ. सन्यत्सेन हा मॅझिनीसारखा भासतो. चीनच्या लोकांना राष्ट्रीय स्वातंत्र्य मिळावें असें दोघांसहि सारखेंच वाटतें, पण मॅझिनीप्रमाणें डॉ. सन्यत्सेन यांस राजसंस्था ही कुचकामाची वाटत असून खरें राष्ट्रीय स्वातंत्र्य प्रजासत्ताक राजसंस्थेच्याच द्वारें मिळेल असें त्याचें मत आहे. आणि युआन-शि-काई यास ग्यारीबाल्डीप्रमाणें हें राष्ट्रीय कार्य सुद्धा राजाच्या हातूनच पार पाडावें म्हणजे तें चांगलें होईल, असें वाटत आहे. यावरून पाहतां मांचू–घराण्याच्या पापाचे घडे भरले असले तरी त्यांच्या आयुष्याची दोरी अगदींच तुटली आहे असें वाटत नाहीं. समंधानें पछाडलेल्या पिंपळास “ मुळापासून तोडूं का हातभर ठेवून तोडूं ” असा जेव्हां कौल लावावा तेव्हां “ सर्वनाशे समुत्पन्ने अर्धं त्यजति पंडितः ” या न्यायानें झाड थोडेंबहुत तरी तोडण्याची परवानगी मिळते. कोल्ह्याच्या शिकारीला वाघाच्या शिकारीची तयारी करावी लागते, या म्हणीचें मर्महि हेंच आहे. चिनी राष्ट्रभक्तांनीं मांचू–राजवंशच समूळ खणून टाकतों असें जेव्हां महद्भय उत्पन्न केलें, तेव्हां स्वराज्याची देणगी एकदम देण्याची कबुली बादशहांच्या तोंडून माफीसहवर्तमान बाहेर पडली. तात्पर्य, चालू बंडाळीच्या परिणामीं मांचू–राजवंशाचा समूळ उच्छेद होईल असें जरी नाहीं, तरी ज्या कारणामुळें या राजवंशाचा अधिकार व कारभार चिनी लोकांस दुःसह झाला होता, तीं कारणें म्हणजे परकीय अधिकाऱ्यांचा त्रासदायक कारभार वगैरे तरी नाहींशीं होतील असें अनुमान करणें रास्त होईल.

वीस वर्षांपूर्वी लॉर्ड कर्झन यांनीं आशिया खंडांत प्रवास केला तेव्हां त्यांना इस्तंबूलपासून पेकिनपर्यंत एकसारखी सापाची सरपट दिसली ! ही सरपट अधिकाऱ्यांच्या एकतंत्री अधिकारानें पडली होती, असें त्यांनीं लिहिलें आहे. सुदैवानें या सरपटीच्या दोन्ही टोंकांस असणारीं सापाचीं बिळें बुजवून टाकण्याचा प्रयत्न अलीकडे चांगलाच सुरू झाला आहे. पश्चिमेस इस्तंबूल येथें तरुण तुर्कांनीं सुलतानाच्या एकतंत्री कारभाराला कंटाळून सुलतानास

सिंहासनावरून ओढून काढला आणि राज्यक्रांति केली. त्याच्याच अलीकडे इराणांतहि तोच मासला घडून आला; म्हणजे शहा पदच्युत व हद्दपार झाला आणि पार्लमेंट सभेस जबाबदार अशा प्रधानमंडळाकडून कारभार घेण्याची पद्धत सुरू झाली. पूर्वेच्या या टोंकास जपानानें ४० वर्षांपूर्वीच सुरुवात केली होती म्हणून ती गोष्ट जमेस न धरली तरी, स्वराज्य मिळविण्याची चीनची चळवळ अगदीं ताजी–फार काय पण आज चालूच आहे. अर्थात् लॉर्ड कर्झन हे फिरून आणखी थोडे दिवसांनीं पूर्वेकडे प्रवासास निघतील तर, पूर्वी त्यांच्या दृष्टीस पडलेली सापाची सरपट बहुतेक बुजून गेली आहे, व जी थोडी राहिली आहे ती इराण व चीन यांच्या दरम्यानाच्या अफगाणिस्थान वगैरे राष्ट्रांत राहिली आहे हें त्यांस दिसून येईल. अधिकाऱ्यांच्या बेपर्वाई कारभारास खरें औषध म्हणजे त्यांची बहाली बडतर्फी राष्ट्रांतील मतदारांनीं विश्वास टाकून निवडलेल्या प्रतिनिधींच्या सभेच्या हातीं देणें हेंच होय, ही गोष्ट निर्विवाद आहे. असें असतां हिंदुस्थानांत मात्र जनतेचा ताबा अधिकाऱ्यांवर मुळींच नाहीं. प्रधानमंडळाची बहाली बडतर्फी तर राहूं द्याच, पण अ गांवांतील ब हा पांच रुपड्यांचा कुळकर्णी किंवा सात रुपड्यांचा पोलीस कामावरून दूर व्हावा असा आग्रह हिंदुस्थानच्या ३० कोटी प्रजेनें जरी धरला तरी सदर कुळकर्णी अगर पोलीस शिपाई, त्याच्या वरिष्ठाची त्याजवर मर्जी असेल तर, या ३० कोटी मुखाच्या जनतेलाहि बडतर्फ करणें आजच्या राज्यकारभाराच्या व्यवस्थेंत अशक्य आहे. तुर्कस्थान, इराण, चीन व जपान यांच्या उदाहरणावरून तरी अधिकाऱ्यांवर जनतेचा हुकूम चालावा अशी इच्छा हिंदुस्थानच्या लोकांस असणें अस्वाभाविक नाहीं. लॉर्ड कर्झन यांनीं हिंदुस्थानचा कारभार सोडल्यानंतर आशिया खंडांत झालेल्या घडामोडींनें त्यांच्या दृष्टीस पडलेली सापाची सरपट बहुतेक बुजून गेलीच आहे. पण त्यांना प्रिय असलेल्या पुराणवस्तुसंशोधनाच्या दृष्टीनें जर आशियाखंडांत ते फिरून प्रवास करतील तर हिंदुस्थानांतील राज्यपद्धतीचें वैलक्षण्य मात्र त्यांच्या नजरेस पडेल. आणि विलायतेंत परत गेल्यावर हिंदुस्थानचें हितशत्रुत्व करण्याचें ते सोडून देतील अशी आम्हांस खात्री आहे. कसेंहि असो, यूरोप खंडाला जशीं १८४८ च्या सुमाराचीं एक दोन वर्षें राष्ट्रीय जागृतीचीं गेलीं, तशींच विसाव्या शतकांतील पहिलीं दहा वर्षें आशिया खंडाला गेलीं, असेंच कोणाहि इतिहासकारास लिहावें लागेल यांत संशय नाहीं !

# १६ जशी कामना तशी भावना

( तां. ३ सप्टेंबर सन १९१२ )

चीनच्या लोकांना स्वराज्याच्या हक्काकरितां फारच थोडी बंडाळी करावी लागली; व ती यापूर्वीच संपूनहि गेलेली आहे. आणि हल्लीं चिनी राष्ट्रांतील प्रमुख मुत्सद्दी एकत्र बसून, पूर्वी घडून आलेली शांततेची राज्यक्रांति पुढेंहि कशी टिकेल व प्रजेनें मिळविलेले स्वराज्याचे अधिकार अबाधित कसे राहतील, याचा पोक्त विचार करीत आहेत. या गोष्टीचा एशियाटिक लोकांस जितका आनंद होईल तितकेंच युरोपियन लोकांस त्याचें आश्चर्य वाटेल. " चिनी प्रजापक्षाचा पुढारी डॉ. सन्यत्सेन याचा खून राजपक्षपाती पुढारी युआन–शिकाई यानें करविला; आणि सन्यत्सेनचीं मुलें अमेरिकेंत जीव बचावण्यासाठीं पळून गेलीं असून तेथून त्यांनीं आपल्या बापाच्या खुनाची हाकाटी केली;" अशी एक तार सुमारें दहा बारा दिवसांपूर्वी इंग्रजी वर्तमानपत्रांतून प्रसिद्ध झालेली पुष्कळांनीं वाचलीच असेल. ही बातमी खरी ठरती तर मोठाच अनर्थ गुदरला, असें म्हणणें प्राप्त होतें ! व चिनाबाहेरील लोकांना चीनच्या पोटांतील या घटकेस चालणाऱ्या अंतस्थ कारस्थानांची खरी माहिती नसल्यामुळें युआन–शिकाई हा खरा मुत्सद्दी नसून रक्तपाताची ज्याची तहान कधींहि भागत नाहीं असा एक लष्करी वेताळ आहे. असें कोणालाहि म्हणावें लागलें असतें. अशा तऱ्हेचीं अनुक्रमानें खोट्या गोष्टींच्या पायावर रचलीं गेलेलीं असल्यामुळें तीं अन्यायमूलक तर असतातच; परंतु चीनसारख्या एशिॲटिक राष्ट्रांत आज इतिहास खरोखर कसा घडून येत आहे, याविषयींच्या जगाच्या कल्पना त्यांमुळें दूषित होतात हा तोटा, केवळ कांहीं प्रतिष्ठित व्यक्तींना अन्याय होण्यापेक्षां अधिक, मानला पाहिजे. वर सांगितलेल्या प्रकारच्या बातम्या कोण व कां प्रसिद्ध करतें, याची मीमांसा करणे फारसें कठीण नाहीं. वरील बातम्यांच्या मुळाशीं मुख्य कल्पना उघडच अशी आहे कीं, चिनांत मूर्खपणा, बेअकलपणा, किंवा बंडखोरपणा यांची आज लयलूट आहे; आणि शहाणपणा, मुत्सद्दिगिरी आणि नियंत्रण–प्रियता यांचें व चिनी लोकांचें अगदीं वांकडें आहे. ठीकच आहे; कारण सन्यत्सेनसारखा मनुष्य राष्ट्राचा पुढारी होतो काय ! प्रजासत्ताक राज्य स्थापलें जातें काय ! युआन-शि-काई हाच स्वराज्यसंस्थेचा अध्यक्ष होण्यास सर्वांत लायक मनष्य आहे असें सन्यत्सेन जाहीर करितो काय ! तोच सन्यत्सेन व प्रजापक्षाकडील दोन सरदार यांचे खून युआन-

शि-काई करवितो काय ! आणि त्यांचा सूड घेण्याकरितां दाक्षिणेकडील प्रजा-पक्षीय सैन्य उत्तरेकडे म्हणजे पेकिनवर चाल करून जाण्याचा विचार करितें काय ! तात्पर्य, हा सर्वच घोंटाळा आहे, व चिनांत आज कोणाचा पायपोस कोणाच्या पायांत नाहीं, असें अनुमान वरील बातम्या खऱ्या ठरल्यास कोणीहि सहजच काढील. पण सुदैवानें तशी वस्तुस्थिति नाहीं. बातम्या या नेहेमीं वाव-टळीच्या वाऱ्यासारख्या वाटेल तशा उठत असतात; त्यांत कांहीं विशेष नाहीं. परंतु बातम्या प्रसिद्ध करण्याकरण्यांत फरक असतो. विश्वास ठेवून प्रसिद्ध केलेल्या बातमीचा झोंक, विश्वास न ठेवून प्रसिद्ध केलेल्या बातमीच्या झोंका-पेक्षां वेगळा असतो, हें वर्तमानपत्रें वाचण्याचा अनुभव असणारा कोणीहि मनुष्य सांगूं शकेल. याच झोंकावरून आम्ही असें म्हणतों कीं, सन्यत्सेनाच्या खुनाची बातमी निराधार ठरून लगेच दोन दिवसांनीं सन्यत्सेन व युआन-शि-काई यांचें गुप्त मसलतीचें खलबत होत आहे व दोघांनाहि चीनच्या भावी सुस्थितीविषयीं आशा व भरंवसा वाटत आहे अशी बातमी प्रसिद्ध होणें, हें एशिआटिक लोकांस आनंदाचें व पाश्चात्य लोकांस आश्चर्याचें—केवळ सखे-दाश्चर्याचेंच असें आम्ही म्हणत नाहीं—कारण होऊन राहिलें आहे.

एकाच गोष्टीचा एकास आनंद व दुसऱ्यास विस्मय वाटावा याचें कारण हेंच कीं, त्या एका गोष्टीविषयीं दोघांचे विचार व दोघांच्या भावना वेगवेगळ्या अस-तात. चीनसंबंधीं उत्पन्न होऊन लगेच विराम पावलेल्या वरील बातम्यांचेंच उदाहरण घेतलें असतां आपणांस असें दिसून येईल कीं, 'Wish is father to the thought' ही इंग्रजी म्हणच खरी ठरणार. एशिआंतील व हिंदुस्थानां-तील लोकांची आज इच्छाच अशी आहे कीं, चिनांतील स्वराज्यप्राप्तीचा प्रयोग यशस्वी व चिरस्थायी व्हावा. या इच्छेस समर्थनकारक अशा गोष्टींवर त्यांचा सहजच विश्वास बसणार; आणि या इच्छेस प्रतिकूल अगर विरोधी अशा ज्या गोष्टी त्यांजवर भरंवसा न बसून त्या प्रायः खोट्या आहेत असेंच त्यांस स्वाभाविकपणें वाटणार. याच्या उलट किंवा परिवृत्त विधान म्हटलें तर असें कीं, युरोपियन लोकांस सर्व साधारणपणें चिनांतील राज्यक्रांति यशस्वी होऊं नये अशी स्वाभाविक इच्छा असते; यास्तव हें यश मलीन कर-णाऱ्या गोष्टी खोट्या किंवा अर्धखोट्या असल्या तरी त्या खऱ्याच असें घेऊन

चालण्याची–निदान त्या चिकित्सेच्या कसास लावाव्या तितक्या लावून न पहाण्याची–प्रवृत्ति त्याजमध्यें दिसून यावी, हें साहजिक आहे.

पण एवढें म्हटल्यानेंहि निर्वाह होत नाहीं! विशिष्ट इच्छा किंवा भावना ही विशिष्ट प्रकारच्या विचारांची जननी असते हें खरें मानिलें तरी, एशिआटिक लोकांस चिनांतील चळवळ यशस्वी व्हावी अशी इच्छा कां व्हावी? आणि युरोपियन लोकांस त्या चळवळीच्या यशाची हुंडी शिंक्यास चढूं नये अशी तरी इच्छा कां व्हावी? या प्रश्नाचा उलगडा समाधानकारक रीतीनें होत नाहीं! युरोपियन लोक मात्र एकजात हेवेखोर व दुष्टबुद्धीचे आणि आम्ही एशियाटिक लोक मात्र सद्भावी किंवा दुसऱ्याचा आनंद तोच आपला आनंद असें मानणारे परोपकारी महात्मे खरोखर आहोंत काय? चिनानें इंग्लंडचें किंवा युरोपचें असें काय घोडे मारलें आहे कीं, चिनी प्रजेनें स्वराज्यसुख भोगलेलें पाहून त्याला मळमळावें अगर कपाळास आंठी पडावी? उलटपक्षीं चीनानें हिंदुस्थानावर तरी असे काय उपकार केले आहेत? अथवा चीनची व हिंदुस्थानची अशी काय मोठी जिव्हाळीला जिव्हाळी लागून राहिली आहे कीं, चिनी लोकांच्या सुखदुःखात्मक संवेदनांचा प्रतिध्वनि हिंदुस्थानांतील लोकांच्या मनांत उमटावा? आम्हांस तर असें वाटतें कीं, या उभयपक्षांचा दुष्टपणा किंवा सुष्टपणा हा चिनासंबंधींच्या भावनेच्या मुळाशीं नसून, स्वार्थाची थोडीबहुत कल्पना व तीहि बहुतांशीं चुकीची कल्पना त्यांच्या भावनेच्या मुळाशीं आहे, हें एक. व दुसरें कारण म्हटलें म्हणजे आत्मप्रीति किंवा गर्व या विकाराच्या अनुरोधानें पुष्कळसा वावदूकपणा युरोपिअन काय किंवा एशिआटिक काय, करीत असतात हें होय. चिनांतील राजसत्ताक पद्धतीच टिकावी आणि प्रजासत्ताक पद्धतीला यश येऊं नये, अशी इच्छा युरोपियन राष्ट्रांना होण्याचें कारण असें कीं चिनच्या गादीवर मँचू घराण्यांतील राजे होते तोंपर्यंत आपला हात चीन देशांत व चीनच्या राजकारणांत जितका घुसला, तितका स्वराज्यवादी लोक अधिकारारूढ झाले असतां तो यापुढें घुसणार नाहीं–किंबहुना पूर्वीं घुसला होता तितका यापुढें टिकणारहि नाहीं–असें युरोपियन राष्ट्रांस माहीत आहे. अर्थात् चिनी प्रजेला स्वातंत्र्यसुख मिळूं नये, अशी त्यांची दुष्टपणाची भावना नव्हे, तर आपल्या साम्राज्याच्या हितास अनुपकारक म्हणून चिनांत स्वराज्यसंस्था नसावी, अशी त्यांस इच्छा

होते. आत्मप्रीतीच्या हेतूस अनुलक्षून याच गोष्टीची मीमांसा अशी ठरते कीं "प्रजास्वातंत्र्याची खरी आवड ही ईश्वराची कांहीं एक विशेष प्रकारची देणगी आहे; व ती फक्त आम्हां युरोपखंडांतील लोकांसच दिलेली आहे"! असें युरोपियन राष्ट्रांतील लोकांस वाटतें. धर्म, जाति, सुधारणा वगैरे इतर गोष्टी युरोपियन लोकांस आम्हीं एशिआटिक लोकांहून श्रेष्ठ असा गर्व वहाण्यास आधीं साधनभूत होतातच; परंतु प्रजास्वातंत्र्याची लालसा हें सामाजिक श्रेष्ठतेचें सर्वोत्तम लक्षण असें मानलें जात आहे; व म्हणूनच आत्मप्रीतिविशिष्ट युरोपियन वावदूकांच्या तोंडांतून उद्गार नेहमीं बाहेर पडतात कीं, "चालले आपले एशिआटिक लोक स्वराज्याच्या पोकळ गप्पा मारावयाला! प्रजास्वातंत्र्याची खरी लज्जत यांना काय कळणार? आम्हीं प्रजास्वातंत्र्य मिळवूं व भोगूं अशी दांडगी कल्पना यांच्या बापजादांच्याहि डोक्यांत कधीं आल्याचें इतिहास सांगत नाहीं। व जें मुळीं विहिरींतच नाहीं तें पोहऱ्यांत येणार कोठून? युरोपियन लोकांचें पाहून एशिआटिक लोकांनीं प्रजास्वातंत्र्याच्या गप्पा मारणें म्हणजे मोर नाचतो म्हणून लांडोरीनेंहि नाचण्यासारखें हास्यास्पद आहे." बाल्फोरसारखे मुत्सद्दी! लोकविश्वासाचीं कधीं कोणास न दिसणारीं अशीं गुप्त कारणें हुडकून काढणारे पटाईत तत्ववेत्ते! पण हिंदी लोकांच्या धार्मिक व राजकीय ग्रंथांत प्रजासत्तेची कल्पना खाणींतील सोन्याप्रमाणें अंधुक कां होईना पण-कोठें तरी चमकते कीं नाहीं? याची चौकशी न करतां जवळ जवळ असाच शेरा ठोकून देतात कीं, 'जगाच्या सर्व पूर्व भागांत प्रजास्वातंत्र्याची कल्पना कोणासच केव्हांहि नव्हती. अंधराजनिष्ठा हाच पौर्वात्य लोकांचा मुख्य गुण!' याचा अर्थ असा कीं, 'लाथा मारणाऱ्या राजाच्या पायाला श्रम झाले म्हणून प्रजेनें आपल्या शिरकमलांनीं ते हळूहळू चुरावे इतकीच यांची योग्यता!' वरील विधान हें खरोखर कशाचें द्योतक आहे! पौर्वात्य लोकांच्या अंधदास्यप्रियतेचें? कीं बाल्फोरसाहेबांच्या आंधळ्या आत्मप्रीतीचें?

पण ही मीमांसा फक्त युरोपियन लोकांसच लावण्याचा पक्षपात आम्ही करणार नाहीं. आम्ही हेंहि पक्कें जाणून आहों कीं, चिनांतील काय किंवा इराण व तुर्कस्थान यांतील काय, प्रजास्वातंत्र्यचळवळीच्या कल्पनेच्या अभ्युदयाचा संबंध आम्ही हिंदुस्थानांतील लोक आपणाकडे जो लावून घेतों त्यांतहि स्वार्थ, व स्वार्थापेक्षांहि आत्मप्रीतिमूलक वावदूकता, ही बऱ्याच अंशीं कारणीभूत आहे.

युरोपियन राष्ट्रांचा चिनांतील राजकारणाशीं आमच्याहून अधिक निकट संबंध आहे. कां कीं, चिनांत पूर्वापार चालत आलेली 'कुराज्य' व्यवस्थाच अखेर प्रभावी होऊन, व स्वराज्याचा प्रयत्न निष्फळ ठरून, चीनचा एकेक तुकडा निरनिराळ्या युरोपिअन राष्ट्रांना खावयास मिळणें हें कल्पनादृष्टीला जवळ आहे. पण चिनांत स्वराज्यसंस्था पूर्ण यशस्वी होऊन सर्व राष्ट्रानें एकात्मतेनें दिग्विजयास बाहेर निघावें, आणि स्वराज्याचें निशाण हिंदुस्थानच्या भूमींत निश्चलपणें रोवण्यास येऊन मदत करावी, ही गोष्ट कल्पनादृष्टीलाहि इतकी जवळ नाहीं. चीन व हिंदुस्थान या उभयतांना अमुक एक धर्मपंथ तर नाहींच पण कांहीं कांहीं धर्मकल्पना मात्र साधारण आहेत. पण "चीनचा धर्म बौद्ध आणि हिंदुस्थान ही बौद्धधर्माची जननी, यामुळें चीन हिंदुस्थानचें कल्याण करण्यास धांवून येऊन आपणाप्रमाणें त्यालाहि केवळ कृतज्ञतायुक्त परोपकारबुद्धीनें स्वातंत्र्यसुख मिळवून देईल" हा कल्पनेचा दूरान्वय समंजस मनुष्यास सहन होण्यासारखा नाहीं. युरोपिअन राष्ट्रापेक्षां कांहीं कांहीं बाबतींत चीन आम्हांला जवळ आहे खरा. पण चिनांतील राज्यक्रांतीच्या उदाहरणांतील खरें मर्म न जाणतां तें देणें, आणि चीन जसा आशियाखंडांत मोडतो तसें हिंदुस्थानहि मोडतें या एकाच गोष्टीवरून जें चिनास साध्य झालें तें तसें व तितकें हिंदुस्थानासहि साध्य होईल असें म्हणणें हें केवळ, आडनांव एक एवढ्यावरून गरिबानें श्रीमंतांच्या दौलतींत निम्मेनिम सारखा हिस्सा मागण्यास वाद मांडण्यासारखेंच आहे! हीच गोष्ट कांहीं अंशीं जपानची. जपान आशियाखंडांत मोडतो व हिंदुस्थानहि त्याच खंडांत मोडतें. केवळ एवढ्यामुळें जपानला जें मिळालें तेंच हिंदुस्थानालाहि मिळेल असें कोणीं कसें म्हणावें? जगाचे पूर्वगोलार्ध व पश्चिमगोलार्ध असे दोन सारखे भाग होतात; आणि प्रत्येक भागांतील स्वभावरचना, चालीरीति व राजकीय लायखी हीं आत्मसापेक्ष एकसारखी व अन्यसापेक्ष अगदीं वेगळी असा सिद्धांत—वास्तविक हा केव्हांच पूर्ण सिद्ध झालेला नाहीं—खरा मानला तरी, या दोन गोलार्धांच्या मर्यादेच्या रेषा निश्चितपणें अमुकच एका अक्षांश रेखांशावर पडतात असें तरी कोठें आहे? व हें असें नसल्यामुळें इंग्लंड व जपान हे पूर्वगोलार्धांत पडतात आणि इटली व हिंदुस्थान हीं पश्चिम गोलार्धांत पडतात असें तरी कां म्हणूं नये? तात्पर्य, कोणच्याहि ठोकळ सिद्धांतांत सत्यापेक्षां वावदूकपणाचाच भाग अधिक असतो. आतां

अमुक एक देश म्हणजेच पूर्वगोलार्ध, आणि एवढ्या मर्यादेंतील लोकांच्या कपाळीं ब्रह्मदेवानें स्वराज्य सुख लिहिलें नाहीं, असें आग्रहाचें विधान युरोपिअन लोक करितात यामुळें, वर दर्शविलेल्या वावदूकतामूलक असमंजसपणाचे उत्पादक तेच ठरतात! व चिनांतील राज्यक्रांति कदाचित् यशस्वी होणार नाहीं अशी कोणी युरोपिअन लोकांनीं शंका दर्शविली म्हणजे "हे पहाना! तुमचे गुरु सन्यत्सेन व युआन–शि-काई हे कसे एकदिलानें खलबतें करीत बसले आहेत! तुम्हांस चीनचे तुकडे करून गिळावयाचे होतेना! आतां बसा मनगटें चावीत आकाशाकडे पहात!!" असें म्हणून प्रश्नास समर्पक उत्तर देतां येईल व तें प्रत्येक एशिआटिक देईलहि. पण ही बरीचशी वावदूकता आहे. यांत कोटिबाजपणाचाच भाग विशेष आहे हें मनांत न समजण्याइतके मात्र असमंजस आम्ही एशिआटिक लोक खास नाहीं.

---

## १७. हिंदु लोकांच्या राजकीय कल्पना

(ता. २ आगस्ट सन १९१०)

पांचसहा महिन्यांपूर्वीं नवीन कायदेकौन्सिलांसंबंधानें विचार करतांना 'आजचें कौन्सिल–उद्यांचें पार्लमेंट' या मथळ्याखालीं केसरीमध्यें आम्हीं जो अग्रलेख लिहिला होता तो वाचकांस स्मरत असेलच. आमच्या कायदेकौन्सिलांची आजमित्तीस कितीहि असमाधानकारक स्थिति असली तरी आम्हांस मिळणाऱ्या भावी स्वराज्याची संस्था या कौन्सिलांतूनच निर्माण व्हावयाची आहे, असा आमचा भरंवसा सदरहु लेखांत आम्हीं व्यक्त केला होता. परंतु आंग्ल लोकांनीं केलेल्या आमच्या हितशत्रुत्वाची मजल इतकी पुढें गेलेली आढळून येते कीं, आम्हांस भविष्यकाळीं पार्लमेंट मिळविण्याविषयीं आज नुसती आशा वाटते तीसुद्धां कित्येकांस खपत नाहीं. खरोखर विरोध करावा तर असाच, व हें उदाहरण राजकीय कामकाजांत नूतन प्रवेश होणाऱ्या पौर्वात्य लोकांनीं कदाचित् शिकण्यासारखेंहि आहे असें म्हणतां येईल. कोर्टांत वादीप्रतिवादी हे दोघे आले म्हणजे मग मनुष्य या नात्यानें त्यांचे अंगीं असलेल्या साधारण न्यायबुद्धीसहि रजा देण्यास ते कसे तयार होतात, हें न्यायकोर्टांचा थोडाबहुत अनुभव असणाऱ्या मनुष्यासहि चांगलेंच माहीत असेल. पुष्कळ प्रतिवादींची कल्पना अशी असते कीं, फिर्यादअर्जींत सांगितलेल्या प्रत्येक गोष्टीस नकार देणें, ती साफ नाकबूल

करणें हेंच काय तें उत्तम व समर्पक कैफियतीचें मर्म होय, व यामुळें वादीनें आपणांकडून सत्याची चाड बाळगून व जीव तोडून फिर्यादअर्जीत कितीहि नेमस्त विधानें केलीं असलीं तरी प्रतिवादी प्रायः येथून तेथून सर्व गोष्टी नाकबूल जातो व 'वादी व प्रतिवादी यांचीं नांवें खेरीज करून फिर्यादअर्जींतील बाकीचा सर्व मजकूर खोटा आहे' अशी सरसकट कैफियत तो देऊन टाकतो. कित्येक प्रतिवादींस तर आपण परस्पर विरुद्ध अशा गोष्टी कैफियतींत मागेंपुढें लिहितों याचेंहि भान रहात नाहीं. एक गोष्ट सांगतात कीं, एका मुकदम्यांत वादीनें अशी फिर्याद आणली कीं, आपण प्रतिवादीस हंडा वापरण्यास दिला, तो देतांना धड असतां प्रतिवादीनें तो फोडून परत आणून दिला, सबब प्रतिवादीकडून नुकसानी देववावी. यावर प्रतिवादीनें खालीलप्रमाणें कलमवार कैफियत दिली. १ "वादीकडून हंडा नेला तेव्हांच तो फुटका होता. २ वादीस त्याचा हंडा परत दिला त्या वेळीं तो धडका होता. ३ प्रतिवादीनें वादीकडून हंडा मुळींच नेला नाहीं." हिंदी लोक वादी या नात्यानें स्वराज्याच्या मुकदम्यांतील फिर्यादअर्जीत जीं विधानें व ज्या मागण्या करितात त्यांस इंग्रज लोक कैफियतीदाखल जीं निरनिराळीं उत्तरें देतात तीं पुष्कळ वेळां अशाच मासल्याचीं असतात. इंग्रज लोकांची कैफियत वरील प्रतिवादीच्या कैफियतीप्रमाणेंच पुष्कळ वेळां परस्परविसंगत असते.

असो; मागें एकदां लॉर्ड मोर्ले यांनीं हिंदुस्थानच्या भविष्यकालीन इतिहासाच्या खगोलाकडे आपल्या कल्पनाशक्तीची दुर्बीण लावून मोठ्या परिश्रमानें वेध घेतला व जगास असें जाहीर केलें कीं, भावी अनंतकालपर्यंत हिंदी लोकांना आपल्या कक्षेंत स्वराज्याचा तारा भेटण्याचाहि संभव नाहीं. हल्लीं दुसऱ्या एका हितचिंतकानें आपली दुर्बीण हिंदुस्थानच्या पूर्वेतिहासाच्या खगोलार्धाकडे फिरवून असें जाहीर केलें आहे कीं, या पूर्वेतिहासांत केव्हांहि हिन्दी प्रजेला स्वराज्यसुख मिळालें होतें अगर प्रजास्वातंत्र्याची कल्पना आली होती, असें आढळून येत नाहीं. एवंच पुढें आणि मागेंहि प्रजास्वातंत्र्याच्या कल्पनेचा अभाव अशा रीतीनें सिद्ध होत असतां, हिन्दी लोकांनीं आज स्वराज्याच्या हक्काच्या नांवानें जो हा बखेडा माजविला आहे तो गैरशिस्त आहे व तो निष्फळ होणार असें अनुमान उघडच निघतें!

त्यांतल्या त्यांत पाहिलें तर लॉर्ड मोर्ले यांच्या तक्रारीपेक्षां दुसऱ्या या हित-

चिंतकाची तक्रारच विशेष महत्त्वाची आहे. मोर्लेसाहेबांनीं आपल्या कल्पनेच्या दुर्बिणीनें घेतलेल्या वेधाचें आम्हांस कांहींच वाटत नाहीं. आधीं भविष्यें सहसा खरीं ठरत नाहींत–त्यांचा अर्थ स्वप्नाच्या अर्थाप्रमाणें उलटासुलटा हवा तसा लावावा. त्यांतून मोर्ले हे कांहीं असे मोठे तपस्वी लागून गेले नाहींत कीं, त्यांचा शब्द खरा न ठरविण्याचें परमेश्वरास मोठेंच संकट पडेल. भविष्यवादी तर राहोत, परंतु नुसते सिद्धांती या नात्यानेंहि मोर्लेसाहेबांची पूर्वीची कीर्ति आजमितीस अबाधित राहिली आहे, असें आम्हांस वाटत नाहीं. स्वतः त्यांच्या उत्तरचरित्रानेंच त्यांच्या पूर्वचरित्राचें खंडन केलें आहे. पूर्व वयांतले मोर्ले व उत्तर वयांतले मोर्ले यांच्यामधील जमीनअस्मानचा भेद पाहून लोक तोंडांत बोट घालून राहिले नाहींत काय ? ‘ पालमाल ग्याझिटा ’ चे संपादक मोर्ले, फ्रेंच राज्यक्रांतीचे भोक्ते व ती घडवून आणणारांचे चहाते मोर्ले, आयरिश स्टेट सेक्रेटरी मोर्ले, होमरूल ( आयरिश स्वराज्य ) चे पुरस्कर्ते मोल, आयरिश कोएर्शन ( दडपशाही ) चे निषेधक मोर्ले, इंपिरिॲलिझम ( साम्राज्यवाद ) आणि युद्धवाद ( मिलिटॅरिझम ) चे निंदक मोर्ले–हे सर्व मोर्ले साहेबांचे पूर्वाश्रमींचे अवतार कोणीकडे ! व हिंदुस्थानचे स्टेट सेक्रेटरी लॉर्ड मोर्ले हे कोणीकडे ! आपल्या वृद्धपणीं आपल्या राजनीतीस अशी मलीनता व मवाळी येणार असें भविष्य लॉर्ड मोर्ले यांस जर आधींच करतां आलें असतें तर ते आपल्या तरुणपणीं इतके जहाल झालेच नसते; व ज्याला आपल्या स्वतःच्या मनाचेंच भविष्य वर्तवितां येत नाहीं, त्यानें हिंदुस्थानच्या भावी इतिहासाचें भविष्य वर्तविण्याचें काम करणें हें एक प्रकारचें धाडसच होय, असें आम्हांस वाटतें. परंतु दुसरा जो हितचिंतक वर्ग वर सांगितला त्याची गोष्ट थोडी निराळी आहे. तो भविष्यकथनाच्या भानगडींत पडत नाहीं; तो आपली भिस्त हिंदुस्थानच्या जुन्या इतिहासावर ठेवतो. आणि इतिहास-संशोधकाचा आव घालून असें जाहीर करतो कीं, एखाद्या राष्ट्राच्या पूर्वेतिहासांत जर प्रजास्वातंत्र्याचा मागमूसहि दिसला नाहीं तर तें स्वातंत्र्य त्यास पुढेंहि कधीं मिळणार नाहीं असें अनुमान करणें जरूर आहे !

“ पूर्वेकडील लोकांस नियंत्रित राजसत्तेची कल्पनाच नाहीं आणि अनियंत्रित राजसत्ताच त्यांच्या हाडीं मासीं खिळलेली असल्यामुळें तीच त्यांस आवडते व योग्य असते. लोकनियंत्रित राज्यपद्धतीपासून ‘ पूर्वे ’ कडच्या लोकांचें कल्याण

होणें नाहीं." अशा प्रकारच्या उद्गारांस आजकाल अगदीं पूर आलेला आहे. वास्तविक रीतीनें पहातां प्रातिनिधिक किंवा नियंत्रित राज्यपद्धति ही विशिष्ट संस्कृतिसंपन्न असलेल्या लोकांमध्यें असूं शकते; तिचा स्थलविशेषाशीं कोणत्याच प्रकारचा संबंध नाहीं. पूर्वेकडचे देश म्हणजे केव्हांहि त्या प्रकारच्या संस्कृतीनें युक्त होणार नाहींत किंवा पूर्वीं नव्हते अशांतला प्रकार मुळींच नाहीं. पश्चिमेकडचे देश जर परमेश्वरानें प्रातिनिधिक पद्धतीच्या राज्यशासनालाच सदैव योग्य बनवले असते, तर पूर्वी हजारों वर्षे अंगाला रंग लावून व चामडीं पांघरून ताबेदारींत जे त्यांनीं दिवस काढले ते कधींहि काढले नसते! हल्लींच तिकडे 'पश्चिम' झालेली आहे व पूर्वीं नव्हती असा कांहीं भाग नाहीं, मग अमुक दिशेच्या लोकांना अमुक पद्धति योग्य असणारच नाहीं, अशीं विधानें जीं केलीं जातात, तीं निव्वळ खोडसाळपणाचीं आहेत असें म्हटल्यावांचून राहवत नाहीं.

दुसरें असें कीं, पृथ्वी गोल असल्यामुळें प्रत्येक देश पूर्वेकडचा व प्रत्येक देश पश्चिमेकडचा आहे, हें सहज सिद्ध करून देतां येईल. अमुक देश पूर्वेकडचा किंवा पश्चिमेकडचा आहे, हें दुसऱ्या एखाद्या विवक्षित देशाच्या अपेक्षेनेंच ठरतें. ज्यास आपण पूर्वेचा असें म्हणतों, तोच देश दुसऱ्या एकाद्या देशाच्या अपेक्षेनें पश्चिमेकडचा होऊं शकेल. अमेरिका, चीन, जपान, हिंदुस्थान व युरोप या चार भूभागांचा संबंध पाहिला असतां प्रत्येक देश मागच्या पुढच्यांच्या अपेक्षेनें पश्चिमेचा किंवा पूर्वेचा होऊं शकेल. तेव्हां विशिष्ट देशांना कायमचा 'पूर्वदेश' असें कधींहि म्हणतां येणार नाहीं हें उघड आहे. तात्पर्य, प्रातिनिधिक राज्यपद्धतिहि जर 'पूर्व' देशाला अयोग्य असेल, तर ती प्रत्येक देशाला अयोग्य असली पाहिजे; कारण पश्चिमभूभागाच्या अपेक्षेनें प्रत्येक देश पूर्वेकडचा होऊं शकतो. परंतु असल्या युक्तिवादाशीं आपणास तूर्त कांहीं कर्तव्य नाहीं. निबंधाच्या आरंभीं लिहिलेलें विधान हिंदुस्थानाला उद्देशून वारंवार करण्यांत येतें. तें विधान करणारांच्या देशाच्या अपेक्षेनें आमचा पितृदेश पूर्वेस असल्यामुळें त्याला ते " पूर्वदेश " असें म्हणतात. तेव्हां आपणहि तोच अर्थ समजूं. आमचा देश " पूर्वदेश " आहे व तितकाच तो " अपूर्व-देश " हि आहे, हें मात्र या लोकांच्या लक्षांत येत नाहीं. आमच्या देशानेंच संस्कृतीच्या सूर्याला प्रथमतः जन्म दिला, हें इतिहासज्ञ लोक तरी कधींहि विसरणार नाहींत.

—२—

खुद्द वेदांमध्येंच हिंदु लोकांच्या राजकीय कल्पनांसंबंधानें पुरावा सांपडतो.

या हिंदु लोकांचे इतिहास व त्यांचीं पुराणें यांजमध्यें याच विषयावर कांहीं पुरावा सांपडण्यासारखा आहे.

प्रातिनिधिक तत्त्वासंबंधानें विचार करितां, रामायणामध्यें निदान दोन प्रसंग तरी असे आढळतात कीं, लोकांच्या मताप्रमाणेंच राजाकडून राज्याधिकाराची व्यवस्था लावण्यांत आली. पहिला प्रसंग श्रीरामचंद्राला युवराजपदावर नेमण्याचा होय. वाल्मिकी रामायणांत अयोध्याकांडाच्या तिसऱ्या सर्गांत या प्रसंगाचें वर्णन आहे. आपला वृद्धापकाळ झाल्यामुळें आपण आतां विश्रांति घ्यावी असें दशरथाला वाटूं लागलें. तेव्हां युवराज कोणास नेमावें याविषयीं निश्चय करण्यासंबंधानें त्यानें एक सभा भरविली.

नानानगरवास्तव्यान् पृथग्जानपदानपि
समानिनाय मेदिन्यां प्रधानान् पृथिवीपतिः ॥

या सभेस आलेल्या राजांचें वर्णन 'लोकसंमत' अशा शब्दानें केलेलें आहे. या सभेस 'परिषद्' अशी संज्ञा वाल्मिकीनें दिलेली आहे. रामचंद्राला युवराजपदावर नेमण्याचा आपला विचार आहे असें जमलेल्या लोकांस दशरथानें प्रथम सांगितलें; व नंतर

यदिदं मेऽनुरूपार्थं मयासाधु सुमंत्रितं
भवंतो मेऽनुमन्यंतां कथं वा करवाण्यहं

'माझा विचार योग्य वाटत नसेल तर कसें करावें तें सांगा—' अशा शब्दांनीं त्या वृद्ध राजानें सभेचा सल्ला घेतला. तेव्हां सभेनें 'रामं युवराजानमभिषिंचस्व' अशा विशिष्ट शब्दांनीं संमति दिली. सभेनें दिलेली संमति कदाचित् भीडभाडेनें दिली असेल म्हणून तिचें मत स्पष्ट कळण्याकरितां दशरथानें सभासदांची उलटतपासणीहि केली. तो म्हणाला—

कथं नु मयि धर्मेण पृथिवीमनुशासति
भवंतो द्रष्टुमिच्छंति युवराजं महाबल ?

—"मी धर्मानें राज्य करीत आहें. मी म्हातारा व अनुभवी आहें, यामुळें तुम्हांस त्रास होण्याचा संभव नाहीं; पण माझ्या जागीं तरुण तरतरीत असा युवराज येऊन राजदंड त्यानें हातीं घेतला तर तुम्हांस कदाचित् त्रास होण्याचा संभव आहे. याचा तुम्हीं पुरता विचार केलात का ?" तेव्हां सभेनेंहि—जमलेल्या राजांनीं व पौरजनपदांनीं मिळून—असें उत्तर दिलें कीं--

बहवो नृप कल्याणगुणाः सांति सुतस्य ते

' राजा, तुझ्या मुलाच्या ठिकाणीं पुष्कळ चांगले गुण आहेत, तो केवळ तुझा थोरला मुलगा आहे म्हणून त्याला आम्हीं युवराज पसंत करितों असें नव्हे, तर तो गुणांनीं त्या पदाला योग्य आहे म्हणूनच त्याला आम्ही निवडतों.' मग त्याप्रमाणें रामचंद्राची युवराजपदावर योजना करण्यांत आली.

दुसरा प्रसंग, दशरथाच्या मरणोत्तर श्रीरामचंद्र लक्ष्मणासह वनांत निघून गेल्यावर गादीवर राजा बसविण्याची वेळ आली तेव्हांचा होय.

अराजकंहि नो राष्ट्रं विनाशं समवाप्नुयात् ।
इक्ष्वाकूणामिहाद्यैव कश्चिद्राजाविधीयतां ॥

' गादीवर राजा नाहीं; जनपद अराजक झाल्यामुळें महाअनर्थ होतात; त्या अर्थीं इक्ष्वाकूच्या वंशापैकीं कोणी तरी पुरुष आजच्या आज राजपदावर बसविला पाहिजे,' अशा हेतूनें राजकर्ते द्विज—ब्राह्मण क्षत्रिय वैश्य ( ' सभां 'ईयुः) सभेमध्यें जमते झाले. त्या ठिकाणीं मार्कंडेयादि ऋषि व अमात्य म्हणजे प्रधानमंडळ यांनीं जमून, प्रथम निरनिराळ्या 'उपसभां ' तून राजा कोणाला करावें, या विषयीं वाटाघाट केली. सर्व सभेनें वसिष्ठास आपला पुढारी नेमिलें, व वाटेल तर इक्ष्वाकू कुळांतील, नाहीं तर इतर कुळांतील पुरुष गादीवर बसविण्याबद्दल ठरविण्याचा अधिकार देण्यांत आला. वसिष्ठानें असें ठरविलें कीं, ज्या अर्थीं दशरथानें मरणसमयीं रामचंद्राला वनवास व भरताला राजपद दिलें आहे, त्या अर्थीं त्याचें वचन खरें करण्याकरितां भरतासच राजपद दिलें पाहिजे. हें मत सर्व सभेस कबूल झालें, तेव्हां आजोळाहून भरतास आणून राज्यावर बसविण्याचें ठरलें.

रामायणांतील किष्किंधाकांडांतहि राजपदावर कोणास बसवावें याचा निर्णय करण्याचा अधिकार लोकांकडे होता, याविषयीं थोडाबहुत दाखला सांपडतो. दुंदुभिसुत मायावी राक्षसाबरोबर युद्ध करण्याकरितां निघून गेलेल्या वालीचा पत्ता लागेनासा झाल्यावर किष्किंधेच्या मंत्रिमंडळानें एकत्र जमून सुग्रीवास राज्याभिषेक केला. ( तैः समागम्य समेतैः अभिषेचितः ) वाली युद्धांत मरण पावला अशीच समजूत होती. पण एक वर्षानंतर तो जिवंत परत आला व पाहतो तों सुग्रीवास राजपदावर बसविलें आहे. तेव्हां त्यास फार राग आला.

सुग्रीवानें हा राग घालविण्याकरितां वालीस सर्व खरी हकीकत सांगितली. तो म्हणाला--

विषादात्त्विहमां दृष्ट्वा पौरैर्मन्त्रिभिरेवच ।
अभिषिक्तो न कामेन तन्मे क्षंतुं त्वमर्हसि ।
त्वमेव राजा मानार्हः सदा चाहं यथा पुरा ।
राजभावे भियोगोऽयं मम त्वद्विरहात्कृतः ।
बलादस्मिन् समागम्य मंत्रिभिः पुरवासिभिः
राज्यभावे नियुक्तोहं शून्यदेशजिगीषया ।

( कि. कां. अ. १० )

वरील उताऱ्यांत 'पौरैः मंत्रिभिरेवच' हें पद ध्यानांत ठेवण्यासारखें आहे. पूर्वेकडील देशांत राजपद व जानपद यांचा केव्हांहि कसलाहि अर्थाअर्थी संबंध नव्हता, हें युरोपियन आक्षेपकांचें विधान जर खरें मानलें तर प्रधानमंडळ आणि पौर म्हणजे लोक यांनीं मिळून मला राज्याभिषेक केला, व तोहि माझी इच्छा नसतां केला, या सुग्रीवाच्या म्हणण्याचा काय अर्थ करावयाचा ?

भारतांतहि अशाच प्रकारचा थोडासा पुरावा सांपडतो. हास्तिनापूरच्या राजपदावर कोणास बसवावें, धर्माला किंवा दुर्योधनाला ? याची जेव्हां वाटाघाट सुरू झाली तेव्हां दुर्योधनास अशी भीति पडली कीं, पांडवांच्या गुणांवर लुब्ध होऊन ' प्रजाजन ' धर्मासच राज्यावर बसवितील; मग आपलें कांहीं चालणार नाहीं. अर्थात् त्यांना आपल्या मार्गांतून अन्य उपायांनीं काढून टाकलें पाहिजे या हेतूनें त्यानें पुढील सर्व कुटिल नीतीचा पाया घातला.

गुणैः समुदितान् दृष्ट्वा पौराः पांडुसुतांस्तदा ।
कथयांचक्रिरे तेषां गुणान् संसत्सु भारत ॥
राज्यप्राप्तिं च संप्राप्तं ज्येष्ठं पांडुसुतं तदा ।
कथयंति च संभूय चत्वरेषु सभासुच ।
प्रज्ञाचक्षुरचक्षुत्वात् धृतराष्ट्रो जनेश्वरः ।
राज्यं न प्राप्तवान् पूर्वं स कथं नृपतिर्भवेत् ॥
तथा शांतनवो भीष्मः सत्यसंधो महाव्रतः ।
प्रत्याख्याय पुरा राज्यं न स जातु ग्रहीष्यति ॥

ते वयं प्रांडवज्येष्ठं तरुणं वृद्धशीलिनं ।
अभिषिंचाम साध्वद्य सत्यकारुण्यवेदिनं ॥

हस्तिनापूरच्या गादीवर कोणास बसवावें, याचा निर्णय प्रजाजनांच्या हातीं होता, हें वरील उताऱ्यांवरून उघड होत आहे. एरवीं गादीवर अमक्याला बसवूं, तमक्याला बसवणार नाहीं, अमक्यालाच आपण राज्याभिषेक करूं, अशा तऱ्हेचे ठराव सभांमधून प्रजाजन करीत होते व यामुळें दुर्योधनास चिंता लागून राहिली होती, या म्हणण्याला अर्थ काय ? गादीवर कौरवांस बसवावें तर ते दुर्गुणी आहेत; शिवाय बाप जो आंधळा धृतराष्ट्र त्याला जर पूर्वी गादी दिली नाहीं तर त्याच्या मुलालाहि ती देऊं नये हेंच रास्त, असें लोकांनीं ठरविलें. भीष्माला हास्तिनापूरची गादी द्यावी, असाहि एक पक्ष होता, परंतु भीष्मच ती पत्करणार नाहीं, ' मीं राज्यपदावर उदक सोडलें आहे ' अशी त्यानें पूर्वी प्रतिज्ञा केली होती, व ती सत्य प्रतिज्ञा असल्यामुळें आम्हीं त्याला गादी दिली तरी तोच पत्करणार नाहीं असें वाटल्यामुळें लोकांची निराशा झाली; नाहीं तर ते भीष्मालाच अभिषेक करिते. परंतु भीष्म नाहीं, तेव्हां त्याच्या अभावीं धर्मालाच गादीवर बसविण्याचें त्यांनीं ठरविलें. लोकनियुक्त अधिकारी नेमण्याच्या सर्व कल्पना पौर्वात्यांस असतील नसतील, त्या आम्हींच त्यांना शिकविल्या, त्यांच्या मनांत त्या भरण्यास आम्हीच कारणीभूत झालों, असें बाल्फोरप्रभृति युरोपियनांचें म्हणणें आहे. परंतु वर सांगितलेल्या सारख्या कल्पना रामायण—महाभारतांसारख्या प्राचीन ग्रंथांत सांपडतात यांचें उत्तर काय ? हे ग्रंथ आमच्या इकडे लिहिले गेले त्यावेळीं युरोपिअन लोकांची स्थिति कशी होता असा प्रश्न केला असतां, तिचें वर्णन न केलेलें बरें, असेंच उत्तर मिळेल. मग या कल्पना आल्या कोठून ? रामायण-महाभारतांचे कर्ते तर कोणी युरोपियन नव्हतेना ? निदान आजपर्यंत निघालेल्या अनेक उपपत्तींत तरी अशी उपपत्ति कोठें ऐकण्यांत आली नाहीं. मग साम्राज्यवादी राजकारणाला अवश्य दिसतें म्हणून अशी उपपत्ति यापुढें निर्माण झाल्यास सांगवत नाहीं !

# १८ प्रजासत्ताक राज्यावर मोहीम

( ता. १२ सप्टेंबर १९१२ )

गेल्या गुरुवारीं ना. गव्हर्नरसाहेबांनीं येथील फर्ग्युसन कॉलेजास जोडलेलें नवीन भव्य सभागृह खुलें करण्याचा समारंभ साजरा केला. हा समारंभ अनेक दृष्टींनीं संस्मरणीय असा झाला. एक तर फर्ग्युसन कॉलेजाच्या द्वारें येथील डेक्कन ए. सोसायटीचें जें लोकोपयोगी काम आज इतकीं वर्षें चालू आहे, त्याचा आढावा पुण्यांतील–किंबहुना महाराष्ट्रांतील–लोकांपुढें जाहीर रीतीनें मांडण्याचा सुप्रसंग या समारंभामुळें आला; व दुसरें सत्तर हजार रुपये खर्च करून विद्यार्थ्यांकरितां सभागृह बांधणें सोसायटीस जरूर वाटलें. या गोष्टीनें सोसायटीची भरभराट किती झालेली आहे ही गोष्ट लोकांच्या निदर्शनास प्रत्यक्ष आली. डेक्कन एज्युकेशन सोसायटी ही कोण व कशाकरितां स्थापित केली गेली ही गोष्ट महशूर आहेच. कित्येक बाबतींत मूळ उत्पादकांच्याहि मनांत कल्पना आली नसेल इतकी या सोसायटीची मजल पुढें गेली आहे; तिच्या मूळ उत्पादकांना कधीं स्वप्नांत आलेली नसेल इतकी भरभराट कित्येक बाबतींत तिची आज झालेली आहे. तसेंच याच्या उलट, कित्येक बाबतींत मूळ उत्पादकांच्या मनांत सोसायटीनें करण्याच्या अशा ज्या गोष्टी होत्या त्यांपैकीं कांहीं गोष्टी अजूनहि सिद्धीला गेलेल्या नाहींत, व दुसऱ्या कित्येक गोष्टींत मूळ उत्पादकांचें जें धोरण होतें त्यांत आज उघडउघड फेरबदल झाला आहे. पण कोणतीहि संस्था म्हटली म्हणजे, मूळ उत्पादकांच्या हेतूंप्रमाणेंच ती सर्वस्वीं चालावी हें इष्ट व सर्वमान्य असलें तरी, कालांतरानें व अनुभवानें मूळ उत्पादकांच्याहि कल्पना कांहींशा बदलणें शक्य असतें; निदान एखाद्या गोष्टींत प्रारंभीं स्थूलपणें एकच हेतूनें पडणाऱ्या अनेक व्यक्तींच्या सूक्ष्म अशा स्वभावधर्मामुळें संस्थेच्या उत्पत्तीच्या वेळचें कल्पनाचित्र व कालांतरानें प्रत्यक्ष अनुभवानें रेखाटलें जाणारें चित्र यांत तफावत पडणें, हें स्वाभाविक आहे असें कोणीहि म्हणेल. डेक्कन ए० सोसायटी ही शिक्षणाचे कामीं सरकारकडून द्रव्यसाहाय्य घेते; सरकारचें वर्चस्व ज्यांत आहे अशा विश्वविद्यालयास सोसायटीचें कॉलेज व शाळा हीं जोडलेलीं आहेत. व एवढा मोठा गाडा चालविण्यास लागणारें द्रव्यसहाय्य खाजगी लोकांकडून जें थोडेंबहुत मिळतें, तेंहि बऱ्याच अंशीं सोसायटीवर सरकारची इतराजी नसण्यावर अवलंबून रहातें, या अनेक निर्बंधांमुळें आपले

हातपाय थोडेसे जखडल्यासारखे होतात, आणि एरवीं स्वतंत्रपणें केवळ स्वयंस्फूर्तीनें लोकशिक्षणाचें जें धोरण व जी व्यवस्था आपणास ठेवतां आली असती ती कांहींशा पराधीन अशा विद्यमान स्थितींत आपणांस ठेवितां येत नाहीं, ही गोष्ट सोसायटींतील लोकांस जाणवत नसेल, अथवा या स्थितीचा त्यांना केव्हां केव्हां खेदहि होत नसेल असें आम्हांस वाटत नाहीं; परंतु महाराष्ट्रांतील प्रचंड विद्यार्थिवर्गास थोड्या खर्चात चांगलें उच्च शिक्षण आपणांस देतां येतें, सर्व इलाख्यांत अनेक अंगांनीं श्रेष्ठ असें कॉलेज आपण केवळ स्वदेशी शिक्षकवर्गाच्या हिंमतीवर चालवूं शकतों, व अपरंपार साधनें संग्रहीं असणाऱ्या सरकारकडून आपण सक्तीनें आपले धन्यवाद गाववूं शकतों या गोष्टींच्या योगानें सोसायटीस समाधान मानून घेण्यास जागा आहे. सोसायटींतील विद्यमान सर्वच सभासद स्वार्थत्यागाचे पुतळे म्हणून दाखवितां येण्यासारख्या लायखीचे नसले तरी, त्यांपैकीं निदान कित्येकांच्या स्वार्थत्यागाबद्दल तरी कोणासहि शंका घेतां येणार नाहीं. तात्पर्य, एकंदरीनें पहातां लोकशिक्षणाचे उपयुक्त पण स्वच्छंदी असे हरतऱ्हेचे प्रयोग करून पहाण्यास, दिवसेंदिवस बूड अधिकाधिक जड होत जाणारी डेक्कन ए. सोसायटी जरी सर्वस्वीं लायख अशी रहाणार नाहीं, तरी बहुजनसमाजाचें लोकशिक्षणाचें अडून रहाण्यासारखें जें मुख्य काम तें सुव्यवस्थितपणें व मान्यतेनें अखंड चालविण्यास हल्लींच्या स्थितींत ही अगर अशाच तऱ्हेची खाजगी संस्था लायख आहे, आणि तिला जो लोकाश्रय मिळत आहे तोहि याच दृष्टीनें होय.

अशा संस्थेच्या एका महत्त्वाच्या समारंभाचा फायदा घेऊन ना. गव्हर्नरसाहेब यांनीं गेल्या गुरुवारीं जें भाषण केलें तेंहि महत्त्वाचेंच होतें. डेक्कन ए. सोसायटीविषयीं समयोचित असे प्रशंसापर चार शब्द बोलून, लवकरच आपण योजिलेल्या मुख्य विषयाकडे ते वळले. हा विषय अर्थातच राजकीय ध्येयासंबंधाचा होता. कांहीं आठवड्यांपूर्वीं पुण्यास भरलेल्या महंमदी शिक्षणपरिषदेपुढें नामदारसाहेबांनीं प्रजासत्ताक राज्यपद्धतीचा उल्लेख केला होता; व तोच विषय पुढें घेऊन परवांच्या भाषणांत ते पुरा करतील, अशी जी कित्येकांची अपेक्षा होती ती खरीच ठरली ! सुशिक्षित तरुण पिढीलाच उज्वल राजकीय ध्येयाचीं स्वप्नें पडतात. तिला मिळावें तसें शांत निद्रासुख मिळत नाहीं, यामुळें अशीं स्वप्नें न

पडण्याला सदुपदेशरूपी जें काय औषध तें विद्यार्थिवर्गालाच देणें जरूर आहे. या दृष्टीनें पाहतां प्रजासत्तेच्या विरुद्ध गव्हर्नरसाहेबांनीं फर्ग्युसन कॉलेजमध्यें केलेलें भाषण समयोचित होतें हें कोणीहि कबूल करील ! शिवाय वसाहतींचें स्वराज्य हिंदुस्थानास हवें असें म्हणणारांचे अग्रगण्य पुढारी ना. गोखले हे डे. ए. सोसायटीच्या उत्पादकांपैकीं नसले तरी फर्ग्युसन कॉलेजाच्या उत्पादकांपैकीं ते एक होत. आणि ' लाइफमेंबर ' या नात्यानें सदर कॉलेजांत वीस वर्षें काम करून ते हल्लीं बाहेर पडले असले तरी, अद्यापि तेथें त्यांची व्यक्ति व त्यांचीं मतें यांचें दैवत चांगलच जागृत आहे, हाहि मुद्दा गव्हर्नरसाहेबांच्या भाषणास औचित्याच्या दृष्टीनें कमी महत्त्वाचा नाहीं.

असो; हल्लींच्या गव्हर्नरसाहेबांच्या भाषणाचा आशय काय असावा हें आतां कोणास सांगितल्याशिवायहि कळण्यासारखें झालें आहे. "लोकसत्ताक राज्यपद्धति उपपत्तिदृष्ट्या सयुक्तिक व कल्पनादृष्टीस मोहक अशी खास आहे. पण प्रत्यक्ष व्यवहारांत ती यशस्वी होण्यासारखी अनुकूल परिस्थिति फार थोड्या ठिकाणीं सांपडते. स्वित्सरलंडसारख्या देशांत लोकसत्तेचें उत्कृष्ट स्वरूप व मेक्सिकोसारख्या देशांत तिचें अपकृष्ट स्वरूप ढळढळीत दिसत असून,अमेरिका व युरोपखंड यांतील देशांत या पद्धतीचे गुणावगुण निरनिराळ्या प्रमाणानें दृष्टोत्पत्तीस येतात; व त्यावरून पाहतां लोकसत्तेचा प्रयोग तिकडे फारसा यशस्वी झाला असें दिसत नाहीं. या गोष्टीवरून हिंदुस्थाननें बोध घेतां येण्यासारखा आहे. पण राजकीय समाजघटनेचें अध्ययन हिंदुस्थानांत व्हावें तसें होत नसून कित्येक पुढारी लोक तर असें गृहीत घेऊन चालतात कीं, वसाहतींच्या स्वराज्यासारखें स्वराज्य हिंदुस्थानास मिळणें ही अगदीं ओघानें प्राप्त होणारी गोष्ट आहे व ती लवकर घडून यावी; पण या मताचे लोक असा विचार करीत नाहींत कीं, मिश्रगुणवर्णनात्मक अशी जी प्रजासत्ताक पद्धति ती इंग्लंडपेक्षांहि वसाहतींतच अधिक उत्कर्षास पोहोंचलेली आहे. उलट हिंदुस्थानाकडे पहावें तर सर्व परंपरा अगदीं उलट्या दिशेची आहे असें असतां, लेखणीच्या एका टाकांत ' वसाहतींचें स्वराज्य ' एवढे शब्द लिहिल्यानें ही सर्व परंपरा आपणास बदलतां येईल; वंश, जाति, भाषा, धर्म यांच्या वैचित्र्यापासून स्वराज्यास येणारे अडथळे नाहींसे होतील आणि स्वराज्याच्या कल्पनेच्या मागोमाग भिडणारा इंग्लंडचा संबंध तुटण्याचा जो प्रसंग तो आला असतांहि हिंदुस्थानास आत्मसंरक्षण करितां येईल,

असें या लोकांस वाटतें तरी कसें ! ” याविषयीं गव्हर्नरसाहेबांनीं आश्चर्य प्रदर्शित केलें ! आणि हे स्वराज्यवादी जुने पुढारी मागें पडून भिन्न मताचे असे नवीन पुढारी सुशिक्षित तरुण पिढींतून निर्माण होतील, अशी गर्भित आशा त्यांनीं व्यक्त केली.

महंमदी शिक्षणपरिषदेपुढें गव्हर्नरसाहेबांनीं केलेल्या भाषणावर टीका करितांना, अशा भाषणावर काय म्हणतां येण्यासारखें आहे, तें आम्हीं थोडक्यांत दर्शविलेंच होतें. तथापि, त्या प्रसंगीं आम्हीं घेतलेल्या आक्षेपांपैकीं एक दोन आक्षेप प्रस्तुतच्या भाषणानें गव्हर्नरसाहेबांनीं यापुढें निर्मूल केले याचा आम्हाला आनंद वाटतो. ‘ लोकसत्तेविरुद्ध भाषण करितांना केवळ निराशाजनक असेच उद्गार ते काढतात, आशा व उल्हास वाटण्यासारखें बोलावें तें मात्र ते कांहीं बोलत नाहींत, ’ असा एक आमचा आक्षेप होता, पण तो प्रस्तुतच्या भाषणानें उरत नाहीं. कारण त्यांत गव्हर्नरसाहेबांनीं असें स्वच्छ बोलून दाखविलें कीं, “ राष्ट्र या नात्यानें हिंदुस्थानला पुढें उच्च पद प्राप्त व्हावें अशी बुद्धि मी नेहमीं मनांत बाळगितों. राजकीय प्रगति होण्यासारख्या कांहीं थोड्या तरी गोष्टी मला स्वतः करितां आल्या व झालेल्या पहाण्यास मिळाल्या याचा मला आनंद व अभिमान वाटतो. ही प्रगति पुढेंहि अशीच हळू हळू कां होईना, पण होईल अशी मला आशा आहे, एवढेंच नव्हे तर या दृष्टीनें हिंदुस्थानच्या परिस्थितींत होणारे फेरबदल अमुक इतक्या मर्यादेपर्यंतच जावे, पुढें जाणार नाहींत असें म्हणणाऱ्या मनुष्याला मी मूर्खांतच काढीन ! ” हे उद्गार अर्थातच समंजसपणाचे आहेत, आणि असे उद्गार काढणाऱ्यानें जर असेंहि म्हटलें कीं, वसाहतींचें स्वराज्य हा हिंदुस्थानाला अनुकरण करण्यास योग्य असा नमुना नाहीं तर हें म्हणणें केवळ सद्बुद्धिप्रेरित असेंच आम्ही मानूं व त्याचा आम्हांस राग येणार नाहीं. हिंदुस्थानास पुढें राष्ट्र या नात्यानें उज्ज्वल स्वरूप येवो अशी गव्हर्नरसाहेबांप्रमाणें आकांक्षा बाळगणारा कोणताहि मनुष्य हिंदुस्थानांत प्रजेनें हल्लींप्रमाणें सर्वस्वीं राजतंत्रानेंच चालाव व तिला स्वतंत्र असे अधिकार असूं नयेत, असें कधींहि म्हणणार नाहीं; व प्रजेला स्वतंत्र अधिकार असावेत एवढी गोष्ट एकदां कबूल झाल्यावर ते अधिकार एखाद्या युरोपियन राष्ट्रांतील नमुन्याबरहुकूम देण्यांत यावे, अगर खास हिंदुस्थानचा असा एखादा निराळाच नमुना बनावा यापैकीं कसेंहि म्हटलें तरी चालेल.

पण लोकसभा एक असावी कां दोन असाव्या? हजार मतदारांना एक प्रतिनिधि द्यावा अगर एक लक्षाला एक द्यावा? अल्प-संख्याक लोकांचे हितसंबंध अशा रीतीनें संभाळावे कीं तशा रीतीनें संभाळावे? याचा वाद पडणें हें निराळें; आणि हिंदुस्थान पूर्वपरंपरेप्रमाणें सर्वस्वीं पराधीन असावा, त्याचें रक्षण नेहमीं दुसऱ्यांनीं करावें, राजदंड हाच त्यांनीं आपल्या राष्ट्राचा मुख्य अलंकार मानावा व तो अंगाखांद्यावर मिरवावा, हें म्हणणें निराळें;व तें मात्र आम्हांस केव्हांहि पटणार नाहीं. कित्येक निराशावादी लोक म्हणतात त्याप्रमाणें, परतंत्रपणा हा जर ब्रह्मदेवानें हिंदुस्थानच्या ललाटीं लिहिलाच असेल, तर केवळ स्वराज्यवादी लोकांनीं तो निघेल असें म्हटल्यानें तो निघेल असें नाहीं हें आम्हींहि जाणतों. भविष्य कोणाला कळणार? पण जर हिंदुस्थानांतील लोकांनीं आज कांहीं ध्येय मनांत धरावयाचें तर तें कोणतें धरावें? राजसत्तेचें कीं प्रजासत्तेचें? त्यांनीं निरंतर दास्यांतच रहावें असा जरी ब्रह्मदेवाच्या घरचा लेख होऊन चुकला असला तरी, राजतंत्राच्या ध्येयाचें ध्यान करीत बसणें हें त्यांना भूषणावह आहे काय? त्यास कोणी उपदेश करावयाचा तर तो असल्या ध्येयाचाच करावा काय? व असल्या ध्येयाचा त्यांना कोणीं उपदेश केला तर ते तो ऐकतील काय? मोठेपणा हा सर्वांस साध्य नसला तरी मोठेपणाची आकांक्षा तरी सर्वांस असणारच. हिंदुस्थानांतील प्रजेनें प्रजासत्ताक राज्य हें जें साध्य तें मिळविण्याच्या मार्गांतील अनेक अडचणी खऱ्या असतील. पण हिंदुस्थानच्या खऱ्या हितचिंतकानें त्यांना मार्गांतील या अडचणी कशा दूर होतील व कराव्या याचा उपदेश करावा? कीं त्या मार्गाकडेच तुम्ही ढुंकूनहीं पाहूं नका असा उपदेश करावा? युरोपांत झालें तरी प्रजासत्तेच्या प्रत्यक्ष प्रकाराविषयीं पुष्कळ मतभेद असला तरी, तात्त्विक स्वरूपाच्या प्रजास्वातंत्र्याच्या इष्टतेविषयीं मतभेद नाहीं. हिंदुस्थानांतील लोकांना उपदेश करावयाचा तेव्हां झालें तरी या साध्याचें महत्त्व प्रजेच्या मनावर कां बिंबवून देऊं नये? पण तसें न होतां साधनांचा बाऊ करून साध्य हें दृष्टिआड लपविण्याचा प्रयत्न होतो, यालाच काय ती आमची हरकत आहे.

हिंदुस्थानांतील राजकीय पुढारी भावी राज्यघटनेचा खोल विचार असा फारसा करीत नाहींत ही गोष्ट कदाचित् खरी असेल. पण अशा घटना रचण्याचें ज्ञान गव्हर्नरसाहेबांप्रमाणें ज्यांना आहे त्यांनीं तरी भविष्य काळांत थोडीशी नजर

पोंचवून, त्यांच्या मतें चांगली अशी एखादी घटना कां सुचवूं नये ? तसें न करितां शल्यानें ज्याप्रमाणें कर्णाचा पदोपदीं पाणउतारा किंवा तेजोभंग करण्याचें व्रत पत्करिलें होतें, तसें एखादें व्रत पत्करल्याप्रमाणें, केवळ पोक्तपणाचा आंव घालून व नाकें मुरडून फक्त नकारार्थी किंवा निषेधार्थी व्याख्यानें झोडण्याच्या मार्गे अधिकाऱ्यांनीं कां लागावें ? कानडाचें स्वराज्य मागणाऱ्या गोखल्यांना वस्तुस्थितीची बरोबर कल्पना होत नसेल, म्हणून ते राहोत. पण " I cherish high aspirations for the future of Indian Nationhood. " म्हणजे ' हिंदी राष्ट्राच्या भावी स्थितीविषयीं मी मनांत उज्ज्वल आकांक्षा बाळगितों ' अशी प्रतिज्ञा सांगणाऱ्या गव्हर्नरसाहेबांनीं तरी शेंपन्नास वर्षांनीं म्हणा–शेंदोनशें वर्षांनीं म्हणा–इंग्रजांच्या अमलाखालीं हिंदुस्थानांत कशा प्रकारची सुराज्यघटना नांदत असेल अगर असावी व त्या घटनेंत हिंदी प्रजेच्या स्वातंत्र्यानें केवढें क्षेत्र व्यापिलेलें असेल अगर असावें, याचेंहि एखादें शब्दचित्र प्रजेपुढें कां मांडूं नये ! वसाहतीचें स्वराज्य हेंच आपलें मार्झे कल्पनाचित्र असें लिहून देऊन त्या खालीं ना. गोखले यांनीं सही तरी केलेली आहे. पण ना. गव्हर्नरसाहेबांचें कल्पनाचित्र काय हें आजवर पहाण्यास कां सांपडूं नये ? आजपर्यंतच्या त्यांच्या भाषणावरून पाहतां आमच्या भावी स्वराज्याचें त्यांचें कल्पनाचित्र म्हणजे एक निव्वळ कोरा कागद आहे ! मग आपल्या मनांतील उज्ज्वल आकांक्षा कागदावर रेखाटल्या तरी त्यांतून चिरंतन राजदास्याची मूर्तिच दृग्गोचर होऊं लागेल अशी त्यांस भीति वाटत असल्यास नकळे ! त्यांच्या हातून निघणारें चित्र खरोखरच सुरम्य व आल्हादजनक असेल तर त्यांना तें रेखाटण्यास उल्हासच वाटावा; उलट तें जर भेसूर व निराशाजनक असेल तरीहि त्यांनीं माघार घेतां कामा नये. कारण लोकप्रियतेची ते फारशी चाड बाळगीत नाहींत, व आपण अप्रिय होऊं म्हणून आपलीं खरीं मतें लपवून ठेवूं नये, तीं उघड करून सांगावीं असा बाणा ते स्वतः बाळगतात व दुसऱ्यासहि ते असा उपदेश करितात. असें असतां गव्हर्नरसाहेबांसारख्या विचारवंत व अनुभवी मुत्सद्याच्या उज्ज्वल आकांक्षामय भावनेनें रेखाटलेल्या चित्रांत आमच्या भावी स्थितीचें नाक तोंड वगैरे अवयव कसे काय आहेत, हें आम्हांस पाहण्यास कां सांपडूं नये हें खरोखर कळत नाहीं. आमचें वसाहतीच्या स्वराज्याचें चित्र खोटें पडलें, तें आम्ही बाजूस ठेवतों, पण त्याच्या मोबदला तुमचें तरी काय चित्र आहे तें पुढें येऊं द्या ना !

ह्रा सवाल अवघड असला तरी तोंड उघडून बोलणाऱ्या व आम्हांस वेडे ठरविणाऱ्या कोणाहि ब्रिटिश मुत्सद्यास आम्ही तो विचारणारच ! जो आपले ओठच उघडणार नाहीं तोच मात्र यांतून सुटेल ! पण आमच्या ध्येयाची विटंबनाहि त्याच्या हातून होणार नाहीं. ना. गव्हर्नरसाहेब जोंपर्यंत हल्लीं बोलतात इतकेंच बोलतील, वर दर्शविलेल्या मार्गानें पुढें जाऊन आपलें हृद्गत खुल्या दिलानें सांगणार नाहींत, व केवळ नकारार्थी व निषेधार्थी न बोलतां विधायक विधानाची जबाबदारी पत्करणार नाहींत, तोंपर्यंत हिंदी पुढाऱ्यांना नांवें ठेवण्यास त्यांना अधिकार कसा पोंचतो हें आम्हांस कळत नाहीं.

---

## १९ पायापुरतें पहा तर दोघेहि पहा

( ता. १३ ऑगष्ट सन १९१२ )

गेल्या तीन चार आठवड्यांत हिंदुस्थानची प्रगति व त्याचें ध्येय यासंबंधानें हिंदुस्थानांत व विलायतेंत मिळून तीन चार महत्त्वाचीं भाषणें झालीं. त्यांत अधिकारी पक्षाच्या बाजूचींच बहुतेक असून फक्त एकच भाषण हिंदुस्थानांतील प्रजापक्षातर्फेंचें झालें. या सर्व भाषणांत राज्यकारभाराच्या किरकोळ बाबींचा उल्लेख नसून, या कारभाराचें धोरण व ध्येय यांचाच स्थूल विचार त्यामध्यें करण्यांत आला होता. " ज्यानें त्यानें आपापल्या पायापुरतें पहावें, उगाच उंच मान करून डोळे ताणून क्षितिजावर किंवा त्याच्याहि पलीकडे काय दिसतें हें पहाण्यांत फारसा अर्थ नाहीं. " असा उपदेश जो तो करतो, पण वेळ आली असतां स्वतः मात्र तसें करण्यास चुकत नाहीं; हा मनुष्यस्वभावाचा मासला लक्षांत ठेवण्यासारखा आहे. हिंदुस्थानच्या जवळच्या व दूरच्या ध्येयासंबंधानें स्थूल विधानें करण्याचा मक्ता एका विवक्षित राजकीय पक्षाकडे कांहीं थोडें वर्षांपूर्वी होता म्हणून त्या पक्षाची टवाळीहि करण्यांत येत असे. सुदैवानें अगर दुर्दैवानें कसेंहि म्हणा या पक्षाचा हा परवाना देशहितास विघातक या सबबीवर काढून घेण्यांत आला, तेव्हां तसल्याच प्रकारचें वेडेपण यापुढें इतर कोणी करणार नाहीं, अशी सहजच अपेक्षा होती. पण अलीकडे पहावें तों ध्येयाविषयीं बोलणें हा नियम आणि किरकोळ गोष्टींविषयीं बोलणें हा अपवाद असेंच जणूं काय ठरूं पहात आहे ! विशेष लक्षांत ठेवण्याची गोष्ट ही कीं, या नवीन मक्तेदारांपैकीं बरेच लोक अधिकारी वर्गांत मोडतात !

हिंदुस्थानच्या राजकीय ध्येयासंबंधाचा वाद अलीकडे खुद्द हिंदुस्थान सरकारानेंच सुरू केला आहे. या वादाची जन्मतिथि ता. २५ ऑगस्ट सन १९११ ही होय. या दिवशीं हिंदुस्थानसरकारनें सिमल्याहून विलायत सरकाराकडे एक महत्त्वाचा खलिता पाठविला. त्यांतील तिसऱ्या पॅरिग्राफांत या वादाचें बीज मूळ पेरिलें गेलें. हा खलिता कशाविषयीं आहे, पॅरिग्राफ तीन यामध्यें कांहीं वादग्रस्त शब्द चुकून अगर मुद्दाम कसे योजिले गेले व त्यावर टीका–प्रतिटीकारूप वाद कसा माजला हें आज सांगत बसण्याचें कारण नाहीं, तें आतां सर्वांस माहीतच आहे. पण त्यासंबंधानें आज सांगावयाचा मुद्दा इतकाच कीं ज्या विशिष्ट कामाकरितां हा खलिता लिहिण्यांत आला त्याच्या दृष्टीनें पाहिलें असतां, तिसरा पॅरिग्राफ, निदान त्यांतील हिंदुस्थानाविषयक ध्येय किंवा धोरण दर्शविणारे शब्द मुळींच लिहिले गेले नसते तरी चालण्यासारखें होतें. बंगालची फाळणी झाली ती सरकारास रद्द करावीशी वाटली तर ती फारशीं कारणें देत बसल्याशिवाय करून टाकण्यास काय हरकत होती ? व कारणेंच द्यावयाचीं होतीं तर " फाळणीमुळें फार असंतोष माजला, फाळणी पूर्वीं अशी– केली ती आतां तशी केली तरी चालेल, दोन लेफ्टेनंट गव्हर्नर केल्यामुळें बंगाली राष्ट्राचा सांधा उखळला गेला असें कोणाचें म्हणणें असेल तर दोन कच्च्या गव्हर्नरांऐवजीं एक पक्का गव्हर्नर नेमल्यानें तो सांधा फिरून जोडला जाईल " हीं व अशीं इतर कारणें द्यावयाला काय थोडीं होतीं ? पण नाही.

सरकाराला फाळणी जशी रद्द करावयाची होती तशीच कलकत्त्याहून राजधानी हलवून दिल्लीस न्यावयाची होती. ही गोष्ट करण्यालाही अशींच वेगळीं कारणें शेंकडों दाखवितां आलीं असतीं. पण नाहीं तीही बाब त्यांतच घातली व सर्वांत मौज ही कीं, या वरील दोन्ही स्वतंत्र कल्पनेशीं ज्याचा अर्थाअर्थीं कांहीं संबंध नाहीं असें हिंदुस्थानाविषयक ध्येयाचें व धोरणाचें पिल्लूं खलिता लिहिणारानें उगीच मध्यें घुसडून दिलें. दूरान्वित विचार, बाधित अनुमानें, व अप्रस्तुत विधानें या सर्वांची खिचडी प्रस्तुत खलित्याइतकी सरकारी कागदपत्रांत दुसरीकडे क्वचितच पहावयास सांपडेल. वावदूकपणाची शक्ति अंगीं न आलेलीं—पण वावदुकपपणा करण्याची इच्छा असलेलीं हुषार लहान मुलें पुष्कळ वेळां ' म्हणून ' या एका अव्ययावर सर्व युक्तिवाद मारून नेतात. अमुक असें कां ? असें त्यास कोणीं विचारलें कीं, ' म्हणून ' हें त्यांचें

उत्तर ठेविलेलेंच! प्रस्तुत खलित्यांतहि 'म्हणून' या अव्ययाच्या अर्थाचा वाटेल तसा उपयोग करून जवळ जवळ गोंधळ घातला आहे, असें म्हटल्यावांचून आमच्यानें राहवत नाहीं. फाळणी रद्द करणें, राजधानी दिल्लीस नेणें हे दोन मौल्यवान् कापडाचे तुकडे वास्तविक परस्पर वेगळे. पण ते एकत्र शिवण्याकरितां केवळ शोभिवंत अस्तर म्हणून हिंदुस्थानाविषयक धोरणाचा व ध्येयाचा उपयोग करण्यांत आला हें अगदीं उघड आहे. पण या कुशल शिंप्यांस असाही खेळ सुचला कीं, अस्तर कोणतें आणि मुख्य कपड्याचे तुकडे कोणते हेंच उमगूं नये इतके ते बेमालूम शिवावे. पण असें करण्यामध्यें अंगांत घालण्याच्या व ओढाताण सोसण्याच्या कपड्याऐवजीं ती फक्त एक दिखाऊ गोधडी झाली!

वर्तमानपत्रकर्ते युक्तिवाद करण्यांत चुकले म्हणजे 'ही त्यांच्या केवळ बुद्धीची चूक असेल,' अशी कोणी उदार कल्पना न कारितां, 'ते बुद्धिवान् आहेत' आणि म्हणून व त्या अर्थी तो युक्तिवाद अप्रामाणिकपणानेंच जाणून बुजून केला असावा असें ठरून टोकेवर 'अप्रामाणिक' असा शेरा पडण्यास उशीर लागत नाहीं. पण खुद्द हिंदुस्थानसरकारच्या खलित्यांत युक्तिवादाचा गोंधळ माजला तरी त्यावर नुसता बुद्धिमांद्याचा तरी दोषारोप करण्याची छाती कोणाची होणार! हिंदुस्थान सरकार कांहीं कोणास जबाबदार नाहीं, व असलें तरी खलित्यांत काय व कसें लिहावें याविषयीं तरी त्यांना कोणी विचारिता नाहीं. खलिता लिहावयास बसण्याचे वेळीं हिंदुस्थानसरकारचें मन औदार्याच्या समुद्रांत पोहत होतें; केवळ हिंदुस्थानांतीलच नव्हे तर जगांतील इतर लोकांसही आश्चर्यानें थक्क करून सोडण्यासारख्या 'मोठ्या गोष्टी' करण्याच्या नादांत त्यांचें मन व्यग्र होऊन गेलें होतें. अर्थात् "उदार मनानें आपण योजलेल्या गोष्टी कोणीकडून कां होईना घडून येवोत म्हणजे झालें!—चांगले सिद्धांत सिद्ध करण्याचा युक्तिवाद कितीहि वाईट म्हणजे असंबद्ध असला तरी त्यांत काय गेलें!—असें हें हिंदुस्थानसरकारच्या त्या वेळच्या मनःस्थितीचें चित्र आमच्या तरी डोळ्यांस दिसतें. मग खरी स्थिति एक परमेश्वरास माहीत. असंबद्ध वस्तु सूत्ररूपानें एकत्र गुंफणें हें वैय्याकरणांना योग्य असेल; पण राजकर्त्यांच्या खलित्यांत तें शोभत नाहीं. 'श्वा युवा मघवा' हे तीन व्याकरणदृष्ट्या एकाच सूत्रांत गोवले गेले तरी त्या तिघांचा संबंध वर

सांगितल्याप्रमाणें केवळ ‘ म्हणून ’ या अव्ययानें जोडूं गेलें असतां परिणाम काय होईल हें सांगावयास नकोच.

पण जगांत नुसत्या वाईट बुद्धीनें केलेल्या गोष्टींचाच पश्चात्ताप करण्याची पाळी येते असें नाहीं! तर चांगल्या उदारबुद्धीनें केलेल्या गोष्टीसंबंधानेंहि केव्हां केव्हां अशीच पाळी येऊं शकते. १८५८ सालीं राणीसरकारानें काढलेल्या उदार जाहीनाम्याचा असला पहिला प्रसंग; आणि गेल्या ऑगस्टांतील खलित्याचा हा दुसरा प्रसंग होय. जाहिरनाम्याच्या शब्दांचा आधार घेऊन हिंदुस्थानची प्रजा आपल्या मागण्या घेऊन जसजशी पुढें येऊं लागली तसतसे अधिकारी एकेक पाऊल मागें हटत चालले. आंथरूण न पाहतां हातपाय पसरल्याचा परिणाम जसा खाजगी व्यवहारांत तसाच राज्यकारभारांतहि होतो. मनाइतकें उदार प्रत्यक्ष हातानेंहि होतां येणें, हें देणें दुर्दैवानें ईश्वरानें मनुष्याला सहसा दिलेलें नाहीं ! औदार्याची ऊर्मी मनांत आली असतां फक्त भलेपणा तेवढा दिसत असतो पण एक बोलून जातो आणि दुसरा तें निस्तरूं लागला म्हणजे त्याला मार्गांतील व्यावहारिक खऱ्या अडचणी भासूं लागतात, या कारणामुळें कां म्हणाना, परंतु अधिकाऱ्यांची ही पीछेहाट अखेर इतकी झाली कीं, लॉर्ड कर्झन यांना वैतागून जाऊन, जाहिर-नाम्यावर ‘अशक्य सनद’ असा शेरा मारून तो कायमचा विल्हेत काढून आपल्या मागचा परोपकाराचा काच चुकवावा, अशी बुद्धि झाली ! हल्लींच्या या दुसऱ्या प्रसंगींहि जवळ जवळ तोच नमुना वठला आहे. खलिता लिहून एक वर्षहि झालें नाहीं तोंच त्या खलित्यांतील बाकी सर्व मुद्यांची अंमलबजावणी करणाऱ्या स्टेट सेक्रेटरींनीं खलित्याच्या तिसऱ्या पॅरिग्राफांतील औदार्यानें ओथंबलेल्या शब्दांवर हरताळ फिरविला; व हरताळाचा हा पहिला हात नीट बसला नाहीं असें पाहून भला थोरला मोठा कुंचा घेऊन तो त्यांनीं पुनः एकदां आडवा तिडवा प्रशस्त फासून ठेविला !

राजकीय पीछेहाटीचीं हीं दोन उदाहरणें लक्षांत आलीं असतां विषाद वाटल्यावांचून रहात नाहीं. मनांत असा प्रश्न येतो, कीं असलीं स्थूल पोकळ विधानें औदार्याच्या भरांत येऊन अधिकारी प्रथम करतात तरी कां ? व मग त्यांच्या पकडींतून पावलापावलांनीं निसटून जाण्याचा प्रयत्न करितात कां ? हें आम्ही खिजविण्याच्या हेतूनें म्हणत नाहीं; पण खऱ्या प्रेमानें व आदरानें म्हणतों. कोणतीहि गोष्ट फारशीं कारणें न देत बसतां

करण्याचा जर अधिकार सुदैवानें सरकारच्या हातांत आज आहे, काय-देकौंसिलांतहि त्यांच्या इच्छेचें उल्लंघन जर शक्यच नाहीं, तर त्या अधिकाराचा पूर्ण उपयोग सरकार कां करून घेत नाहीं? इंग्रज सरकार सुधारलेलें आहे, नीतिमान् आहे, सद्बुद्धिप्रेरित आहे, होईल तितकें हिंदुस्थानचें कल्याण करण्याचा त्यांचा हेतु असतो, हात देऊन हिंदुस्थानाला हळूहळू वर काढण्याचा त्यांचा विचार आहे, युरोपांतील कोणत्याहि राष्ट्रापेक्षां त्यांच्या ठायीं लोकमताला अनुसरण्याची बुद्धि स्वाभाविकपणेंच अधिक आहे, व चोहोंकडे पाहिलें तर इंग्लंडच्या हातून हिंदुस्थानचें जितकें कल्याण होईल तितकें आजच्या स्थितींत दुसऱ्या कोणत्याहि परकी राष्ट्राकडून होणार नाहीं या गोष्टी हिंदी प्रजेला सर्वस्वीं मान्य आहेत. या सिद्धांतावरील विश्वास ह्या सरकारशीं विरोध करणाऱ्या राष्ट्रीय सभेच्या धोरणाचें मूळ अधिष्ठानच आहे; आणि हिन्दी वर्तमानपत्रें जरी पुष्कळशीं कडक टीका करितात तरी ती टीका केवळ कारभाराच्या बाबींवर असते; त्यांनाहि वरील मूलभूत गोष्टी मान्य आहेत. त्या मान्य न करण्याइतकीं अक्कलमंद तीं नाहींत हें कोणीहि प्रामाणिकपणानें विचार करणारा अधिकारी कबूल करील. प्रजेचा असा विश्वास असल्यामुळें सरकारास जें रीतसर वाटेल तें त्यांनीं करावें, कारण आजपर्यंत झालेली प्रगति त्यांच्या सद्हेतूविषयीं साक्ष देतच आहे. तात्पर्य पुढच्या धोरणाविषयीं स्थूल विधानें करणें किंवा आजच्या कारभाराविषयीं दूरान्वित कारणें देत बसणें ही नसती जबाबदारी सरकार आपण होऊन आपल्या अंगावर कां घेतें हें आम्हांस समजत नाहीं. अशी जबाबदारी घेऊन ती पुरी न पडणें हें मुळींच न जबाबदारी घेण्यापेक्षां लौकिकांत अधिक वाईट दिसतें हें सरकारास आम्ही सांगावयास पाहिजे असें नाहीं.

पण अधिकाऱ्यांनीं नसती जबाबदारी अंगावर घेण्याचा याहूनहि एक गौण प्रकार नजरेस पडतो, तोहि न पडावा हें बरें. "खालित्यांतील भाषेबद्दल बरोबरीच्या प्रतिपक्ष्यांनीं पार्लमेंटांत वाद उकरून काढला; व अगदीं खिंडींत गांठून उत्तर देण्यास भाग पाडलें म्हणून आपण खुलासा केला." अशी सबब तरी लॉर्ड क्र्यू यांस होती. पण एक महिन्यापूर्वीं ना. मि. हिल यांनीं येथील डेक्कन कॉलेजांत 'पौर्वात्य लोक व प्रजासत्ताक राज्यपद्धति' या विषयावर जें व्याख्यान दिलें, किंवा गेल्या बुधवारीं पुण्यास भरलेल्या मुसलमानी परिषदेपुढें भाषण

करितांना ना. गव्हर्नरसाहेबांनीं 'प्रजासत्ताक पद्धतीचे कांहीं दोष' दाखविले, या दोन्ही गोष्टींना वरील सबबीचा फायदा मिळण्यासारखा नाहीं. ना. हिल व ना. गव्हर्नरसाहेब यांच्या मनांत हिंदी प्रजेविषयीं खरी सहानुभूति किती भरपूर आहे हें कोणीहि सांगूं शकेल. विशेषतः खाजगी संभाषणांत हिंदुस्थानच्या भवितव्याविषयीं ते जे उज्ज्वल व उत्तेजनपर विचार प्रदर्शित करितात ते ऐकणारास त्यांच्या उदारमतवादित्वाची खात्री पटून कौतुकच वाटतें. पण अशा विषयांवर उघडपणें बोलूं लागल्यास, ते जबाबदार अधिकारी असल्यामुळें, स्वाभाविकपणें त्यांचे पाय अर्धवट मोडल्यासारखे होतात. निदान सद्हेतूनें केवळ सावधगिरीचा इषारा म्हणून ते जें बोलावयास जातात त्यांत राष्ट्रीय आकांक्षांना कांहींसें प्रतिकूल व विरोधी असें नसतें स्वरूप येतें. ना. हिल यांनीं आपल्या व्याख्यानांत वास्तविक हिंदुस्थानास प्रजास्वातंत्र्य मिळूं नये असें मुळींच सांगितलें नाहीं. त्यांनीं फक्त इतकेंच दाखवून दिलें कीं, पूर्वदिशेकडील व पश्चिमदिशेकडील परिस्थिति—विशेषतः सामाजिक व धार्मिक परिणतीची दिशा—वेगवेगळी असल्यामुळें पश्चिम दिशेकडील प्रजास्वातंत्र्याचे नियम व अनुमानें पूर्वेकडे तंतोतंत लावणें बरोबर होणार नाहीं. वास्तविक पाहतां गोष्ट अगदीं खरी आहे. परंतु हिलसाहेबांचें व्याख्यान केवळ निषेधार्थक झालें, आणि त्यांच्या मनांत हिंदी राष्ट्राच्या भवितव्यतेविषयीं खरोखर असणाऱ्या उदार व उज्ज्वल कल्पनांचा एक कसहि त्यांत उमटला गेला नाहीं. यामुळें 'प्रजास्वातंत्र्य' हें आपलें उद्दिष्ट म्हणून धरून बसणाऱ्या या इलाख्यांतील किंबहुना इतर प्रांतांतील लोकांचा पुष्कळ गैरसमज झाला. फार काय पण सरकारशीं नेहमीं गोडीनें, भलाईनें वागणाऱ्या कित्येक लोकांनाहि असें वाटलें कीं, हिलसाहेबांचें व्याख्यान तोंड सांगण्यासारखें नव्हे तर खोड काढण्यासारखें झालें, व अशा समजुतीमुळें हिलसाहेबांच्या खऱ्या मनोभावनेस अन्याय झाला एवढेंच नव्हे तर तो त्यांनीं कारण नसतांना आपल्या हातानें करून घेतला, असेंच म्हणावें लागतें. हिंदी लोकांस सर्वथा प्रिय होतील असे राजकीय विचार खरोखर मनांत वागत असतां, त्यांना अप्रिय होतील—निदान त्यांचा गैरसमज होईल—असेच विचार त्यांच्या भाषणांत येणें हें उभयपक्षींहि दुर्दैव नाहीं काय ?

ना. गव्हर्नरसाहेब यांच्याहि भाषणाची तीच गत ! मुसलमान लोकांस उद्दे-

शून बोलतांना, पुढें मागें एकंदर हिंदुस्थानाला हल्लींहून अधिक प्रजास्वातंत्र्य मिळेल अशाविषयीं उमेदीचा एक शब्दहि न बोलतां, केवळ "प्रजासत्ताक राज्यपद्धतींत अल्पसंख्याक लोकांचा चुराडा होतो, त्यांचें हित बरोबर पाहिलें जात नाहीं," असल्या किरकोळ मुद्यांवरच जोर देऊन, मुसलमानांना स्वराज्याच्या कल्पनेपासून परावृत्त करण्याचा प्रयत्न त्यांजकडून झाला हीहि गोष्ट दुर्दैवाचीच समजली पाहिजे. "हिंदु लोक बहुसंख्याक व तुम्ही मुसलमान लोक अल्पसंख्याक म्हणून स्वराज्यांत तुमचें नुकसान होईल." हा युक्तिवाद बरोबर असला तरी, केवळ बुद्धिभेद करण्याच्या हेतूनें तो केला गेला असें विनाकारण रूप येतें. कां कीं, मुसलमान लोक अल्पसंख्याक म्हणून त्यांच्या फायद्याकरितांच त्यांनीं स्वराज्याच्या भानगडींत पडूं नये हें सांगणें ठीक झालें. पण हें निषेधक विधान करितांना स्वराज्याचा मोबदला म्हणून काय मिळेल म्हणून मुसलमानांनीं अपेक्षा करावी ? हा प्रश्न अगदीं सहज येतो. शंभर नंबरी राजनिष्ठेनेंहि असल्या प्रश्नाचें परिहरण होत नाहीं. हें लक्षांत घेऊन, हिंदुस्थानांतील वेडे लोक मागतात त्या स्वराज्याच्या रूपानें नाहीं पण दुसऱ्या अमुक एका रीतीनें महमदी लोकमताला अमुक इतका किमान व अमुक इतका कमाल अधिकार निश्चितपणें देतां येण्यासारखा आहे असेंहि ना. गव्हर्नरसाहेबांस सांगण्यास काय हरकत होती ? ज्या भाषणांत मुसलमानांना ते अल्पसंख्याक आहेत, या दुःखाची आठवण करून दिली त्याच भाषणांत, "हिंदुस्थानांत आम्ही लोकहिताची बारा दारीं वेस मोकळी ठेविली आहे, कोणास कोठेंच प्रतिबंध नाहीं; हवें त्यानें हवें तिकडून येऊन विद्यमान साधनांचा हवा तसा उपयोग करून घ्यावा." असलें तटस्थपणाचें आश्वासन दिल्यानें मुसलमानांचें खरोखरच समाधान होईल कीं काय याचा पूर्ण विचार ना. गव्हर्नरसाहेबांनीं करावयास पाहिजे होता.

प्रजासत्ताक राज्यपद्धति जर खरोखरच वाईट तर या भुताच्या दिवटीमागें धांवत जाऊन खड्ड्यांत कोसळणाऱ्या पाश्चिमात्य लोकांची कींव केलेली नामदारसाहेबांच्या भाषणांत कोठें कां आढळूं नये ? व असें जोंपर्यंत होत नाहीं, तोंपर्यंत एकतर्फी भाषणास स्वार्थसाधकतेचा नुसता दोष चिकटून राहिल्यास किंवा कोणीं दिल्यास, त्याचा राग कां यावा ? विशिष्ट प्रकारची प्रजासत्ताक राज्यपद्धति वाईट असेल; ती 'हिंदी लोकांना पचनीं पडण्यासारखी नसेल;

पण तिच्या मोबदला अखेर कोणती पद्धति आम्हांस सरकार देणार ? ' हिंदी लोकांचा राज्यकारभारांत अधिकाधिक प्रवेश करून देणें, हें हल्लींच्या उदार राज्यकर्त्यांचें धोरण आहे हें उभयपक्षीं मान्य आहे, पण या धोरणाचा कमाल अम्मल कोठवर जाणार ? किंवा कोठें थांबणार ? याचीहि आपली स्वतःची कल्पना ना. गव्हर्नरसाहेबांसारख्या मुत्सद्यांनीं स्पष्टपणें जाहीर कां करूं नये ? त्यांत भीति कसली ? ही त्यांची कल्पना इष्ट असली तर आयता तंटाच मिटला, बरें खरोखर अनिष्ट असली तरी ती उघडपणें सांगून टाकणें बरें व यापुरता लॉर्ड क्र्यू यांचा आम्ही गुणच घेतों! मळमळीत सौभाग्यापेक्षां झळझळीत वैधव्य बरें. 'प्रजा-स्वातंत्र्याची मजल हिंदुस्थानांत अमुक इतक्या मर्यादेपलीकडे जाणार नाहीं' असें साफ म्हणणें, हें ' प्रजासत्ताक पद्धतींत अल्पसंख्याक लोकांचें हित साधावें तितकें साधलें जात नाहीं ' असले रेशमी चिमटे घेण्यापेक्षां पुष्कळ बरें. हिंदुस्थानास स्वराज्य मिळून आपली हानि होऊं नये ही कल्पना मुसलमान लोकांस पटेल, पण ' बहुसंख्याक व अल्पसंख्याक यांच्या विरोधी हितसंबंधाचा मेळ कसा घालावयाचा ? ' असला किरकोळ मुद्दा आड आला म्हणू-नच जणूं काय स्वराज्यदानाचा उमदा घोडा अडला, व त्यानें पेंड खाल्ली, असेंच केवळ नामदारसाहेबांचें भाषण वाचून वाटेल. पण ' अल्पसंख्याक विरुद्ध बहुसंख्याक' हा मुकद्दमा पूर्वेकडील न्यायकोर्टांतच दाखल झाला आहे हें खरें नाहीं.

पाश्चात्य राष्ट्रांतही हा मुकद्दमा प्रत्यक्ष फायलावर निघून सुरू आहे आणि या वादाचें परिमार्जनही तेथें कोठें कोठें झालेलें सांपडतें. ज्यानें रोग उत्पन्न केले त्यानेंच औषधेंही उत्पन्न केलीं; जो सर्पाचें विष उत्पन्न करितो तोच त्याज-वरील उताराही निर्माण करितो. ईश्वराच्या सर्वशक्तिमत्तेचा असाच थोडासा अंश प्रजासत्ताक पद्धतींत आहे व याविषयीं साधक बाधक प्रमाणें काय आहेत हीं आमच्यापेक्षां गव्हर्नरसाहेबांस दसपट ज्ञात असतील. मग त्यांनीं या विरोधी परिमार्जनाचाही विचार आपल्या भाषणांत कां केला नाहीं ? मुसलमान अल्पसंख्याक म्हणून त्यांचें मात्र दुःख त्यांस आठवलें; पण हिंदु व मुसलमान दोघेहि मिळून हिंदुस्थानांत नुसते बहुसंख्याकच नव्हे तर बहु-बहु-संख्याक असतांही त्यांच्या हातीं निर्णायक असा अधिकार कांहीं नाहीं हें त्यांचें दुःख आठवून, त्याच्या परिमार्जनाचा

कांहीं प्रकार नामदारसाहेबांस सुचेल तो त्यांनीं सांगावयास नको होता काय? जबाबदार अधिकाऱ्यांनीं आनिष्ट तेवढें बोलावें व इष्ट मात्र बोलूं नये अशी मुलखाविरुद्ध शिस्त असल्यास ती मात्र आम्हांस माहीत नाहीं. हिंदी प्रजा महत्त्वाकांक्षेनें थोडीबहुत अंध झाली असेल व असल्यास तिच्या मार्गांतील खांचखळगे दाखवून देणें हा परोपकार आहे. पण हा विघातक किंवा घटनापर असा उपकार नाहीं. बंदराच्या तोंडीं खडक आहे असें दर्शविणारा फिरता तांबडा दिवा लावणें हें जसें परोपकाराचें एक अंग, तसेंच खडक चुकवून आंत आलेल्या जहाजास जमिनीवर माल व उतारू उतरण्यास प्रशस्त व सुखकर धक्का बांधून देऊन 'ही तुमची मकाणाची जागा' असें सांगणें हेंही परोपकाराचें दुसरें अंग आहे हें विसरतां कामा नये. अप्रिय बोलणें ठीक आहे. पण त्याजबरोबर प्रियही जितकें बोलतां येईल तितकें कां बोलूं नये? लहान मुलास काढा पाजणें हें त्याच्या हिताचेंच असलें तरी वरती तोंडांत टाकण्यास खडी-साखरेचा खडा देतात. त्याच न्यायानें स्वराज्योन्मुख असलेल्या हिंदी राष्ट्रास स्वराज्याचें दूषण सांगतांना त्याचें भूषणहि कां लक्षांत घेऊं नये? व सर्वांत खेदाची पूर्वीं सांगितल्याप्रमाणें गोष्ट ही कीं, ना. हिल यांजप्रमाणें ना. गव्हर्नरसाहेब यांसही राष्ट्र या नात्यानें हिंदी लोक अत्यंत ऊर्जित दशेस यावे अशी उत्कट इच्छा आहे, असें आह्मांस पूर्ण माहीत आहे. म्हणूनच तर असल्या अर्धवट भाषणाचा आम्हांस विशेष खेद होतो. ना. गव्हर्नरसाहेबांच्या अंतः-करणाच्या कप्यांत लोकांचें तोंड गोड करण्यासारखे खडीसाखरेचे पुष्कळ खडे असतां, औषधाबरोबर ते खडे देण्याचा केवळ विसर पडल्यानें "हा कडू काढा पाजणारा वैद्य" अशी आवाई पडून त्यांनीं स्वतःस अन्याय कां करून घ्यावा हें आम्हांस समजत नाहीं.

असो; स्थूल विधानात्मक असें प्रजापक्षातर्फे जें एक भाषण झालें आहे म्हणून वर सांगितलें तें ना. गोखले यांचें परवां विलायतेंत झालेलें होय. ना. गोखले यांचें भाषण एकंदरींत बरेंच विस्तृत आहे; तथापि प्रस्तुत प्रकरणीं लागू अशीं त्या भाषणांतील कांहीं वाक्यें खालीं दिल्याप्रमाणें आहेतः—"हिंदुस्थानांतील राष्ट्रीय प्रागतिक पक्षाला तीन हेतु साध्य करावयाचे आहेत. पहिला, हिंदी लोकांचा व्यक्तिशः व राष्ट्र या नात्यानें दर्जा वाढविणें. यांत देशांतील उच्च नोकऱ्यांमध्यें प्रवेश होणें, साम्राज्यांतील वाटेल त्या भागांत ब्रिटिश नागरिकाचा

मान मिळविणें, व देशांतील राजकीय संस्थांस उदारमतवादित्वाचें अधिष्ठान मिळवून देणें, अर्थात् हळूहळू स्वराज्यात्मक संस्था मिळविणें हीं येतात. दुसरा हेतु राज्यकारभाराची सुधारणा करविणें, व तिसरा हेतु हिंदुस्थानांतील खालच्या दर्जाच्या असंख्य लोकांची स्थिति सुधारण्याचा उद्योग करणें." पहिल्या मुद्यावर विशेष जोर देतांना ना. गोखले म्हणालेः—"राजकीय सुधारणेच्या बाबतींत आपण स्वावलंबनावरच भिस्त ठेविली पाहिजे. राज्यकर्ते आपणांकरितां जें काय करूं शकतील त्यापेक्षां आपण स्वतः जें काय करूं त्याचाच उपयोग अधिक होईल. आपलें राजकीय उद्दिष्ट हेंच असलें पाहिजे कीं, ब्रिटिश साम्राज्यांतील इतर भागांत इतर लोकांची जी उच्च स्थिति आहे तीच या भागांत म्हणजे हिंदुस्थानांत आम्हांसहि प्राप्त झाली पाहिजे. आम्ही हिंदी लोक केवळ हिंदी म्हणून कोणत्याहि प्रकारचा कमीपणा आमच्या गळ्यांत कोणासहि बांधूं देतां उपयोगी नाहीं. व हा कमीपणा आमच्या गळ्यांत बांधण्याच्या प्रयत्नाचा आम्हीं जर प्रतिकार केला नाहीं तर इतर सुधारलेल्या देशांतील लोक आमची काडीइतकीहि किंमत करणार नाहींत. मला जर कोणीं 'झालें याच्यापुढें काय?' असें विचारलें तर 'प्रांतिक स्वराज्य' या सोप्या सुटसुटीत शब्दांनीं ज्याचा बोध होतो तें आम्हांस पाहिजे असें मी म्हणेन! अगदीं दूरच्या भविष्यकाळीं आह्मांस काय मिळेल याविषयीं भांडत बसण्यांत आज कांहीं फारसा अर्थ नाहीं. भावी ध्येय व धोरण यासंबंधानें हिंदी लोकांस निराशा वाटण्यासारखे उद्गार कित्येक इंग्लिश मुत्सद्दी हल्लीं काढीत आहेत, परंतु मी तुम्हांस निक्षून सांगतों कीं निराश होण्याचें कारण नाहीं, कां कीं, हिंदुस्थानची भावी स्थिति ही दुसऱ्या कोणाच्याहिपेक्षां आमच्या स्वतःच्याच हातांत अधिक आहे एवढेंच नव्हे, तर कितीहि बडा इंग्रज मुत्सद्दी घेतला, फार काय पण सर्व ब्रिटिश मुत्सद्दी एक गठ्ठा झाले तरी त्यांच्याहून अधिक प्रबळ अशा शक्ति व सिद्धि जगांत वावरत असून पूर्वेकडील इतर देशांबरोबर हिंदुस्थानचेंही नशीब या देवतांनीं आपल्या भट्टींत पक्कें भाजावयाला घातलें आहे! आणि आम्ही आत्मविश्वास बाळगून आमच्या तरणोपायाचा इलाज जरूर तितक्या नेटानें करूं, तर मग कोणी केवढाही मुत्सद्दी अगर अधिकारी असो, तो आमचें धोरण अमुक शब्दांचा अर्थ असा आहे असा नाहीं वगैरे काय वाटेल तें म्हणो, सर्वांना बाजूस ठेऊन हिंदुस्थान आपलें नशीब

काढल्याशिवाय कधींही सोडणार नाहीं ! " हिंदुस्थानच्या राजकीय उन्नतीला 'तूं अमूक मर्यादेपाशीं थांब, पुढें जाऊं नको,' असें म्हणण्याचा कोणालाही अधिकार नाहीं; व अशी मर्यादा कोणी घालूं पाहील तर तें आम्ही जुमानणारही नाहीं! अशा आशयाचे विचार ना. गोखले हे पूर्वीपासून प्रगट करीत आलेच आहेत. हिंदुस्थानच्या भावी ध्येयाचा निर्देश इतक्या व्यापक शब्दांनीं केल्यास हिंदुस्थानांतील राजकीय पक्षांच्या आचारविचारांत मतभेद उरण्याचें कारण नाहीं. पण प्रस्तुत सांगण्याचा मुख्य मुद्दा हा कीं, लॉर्ड क्र्यू व ना. सर जॉर्ज क्लार्क यांनीं रेखाटलेलें हिंदुस्थानचें ध्येय व ना. गोखले यांनीं रेखाटलेलें ध्येय यांमध्यें दक्षिणोत्तर ध्रुवांइतकी तफावत आहे; व अशी तफावत राहणें कोणत्याही प्रकारें इष्ट नाहीं. म्हणून अधिकारी वर्गास आमची नम्रपणाची अशी सूचना आहे कीं, त्यांनीं हीं स्थूल विधानें करण्याच्या भानगडींत होतां होईल तों न पडावें तें बरें. क्षितिजापलीकडे असलेल्या व म्हणून न दिसणाऱ्या गोष्टींविषयीं कोणींच बोलूं नये हें इष्ट असल्यास तसें आचरण करण्याचा उभयपक्षीं तह पाहिजे. 'तुम्हांला उच्च सरकारी नोकरीपेक्षां अधिक कांहीं मिळणार नाहीं' असें ध्वनित करण्यास लॉर्ड क्र्यू यांस मात्र मोकळीक असावी, आणि प्रजापक्षातर्फे याच्या अगदीं उलट असें जें कोणाचें काय म्हणण असेल तें बोलण्यास त्याला मात्र जाच व्हावा हें ठीक नव्हे. आतां कायदाच केल्यास असलें एकतर्फी स्वातंत्र्यही राहूं शकेल; पण तो कांहीं न्याय होणार नाहीं !

---

## २०. स्वराज्याची किमया !

( ता. १५ नोव्हेंबर सन १९१० )

ता. ४ नोव्हेंबर रोजीं दक्षिण आफ्रिकेंत स्थापित झालेल्या नव्या स्वराज्यासंबंधाची त्रोटक हकीकत पूर्वी केसरींत आलीच आहे. या नवीन राजकीय रचनेनें दक्षिण आफ्रिकेंतील बोअर व इंग्रज यांच्या मनःस्थितींत कांहीं अपूर्व असा फरक पडलेला असून, जगाच्या या भागांत दहा अकरा वर्षांपूर्वी असलेली स्थिति व आजची स्थिति यांची तुलना केली असतां कोणासहि पराकाष्ठेचें आश्चर्य वाटल्यावांचून राहाणार नाहीं. सन १८९९ सालच्या नोव्हेंबर महिन्याचे केसरीचे अंक जे वाचक काढून पाहतील

त्यांस त्यांत बोअर व इंग्रज यांजमध्यें नुकत्याच सुरू झालेल्या घनघोर रणसंग्रामाची मनोरंजक हकीकत वाचावयास सांपडेल. या सुमारास बोअर लोकांची सरशी असून, दोन तीन इंग्रज सरदार वेढ्यांत सांपडले आहेत, इंग्लंडहून भराभर सैन्याचीं जहाजांवर जहाजें रवाना होत आहेत, इंग्रज लोक युद्धाचा काय परिणाम होणार याविषयीं हवालदिल झाले आहेत, आणि इंग्रज व बोअर यांच्यांतील वैमनस्य किंबहुना हाडवैर–पराकाष्ठेचें विकोपास गेलें आहे, वगैरे गोष्टींची, केसरीचे सदरहू अंक वाचून, वाचकांस आठवण होईल. पण आज पहावें तों हेच लोक हातांत हात घालून जवळ जवळ अनादि बंधुत्वाच्या नात्यानें इंग्रजी साम्राज्य-महोत्सवांत दंग झाले आहेत; इंग्रज राजाच्या प्रतीनिधीस मान लववून सन्मान देत आहेत; त्याच्यावर फुलें उधळीत आहेत; 'स्वातंत्र्यप्रिय' उदार इंग्रज गण्याचे गोडवे गात आहेत; आणि स्वतःस कृतार्थ व धन्य मानून घेत आहेत. निदान देखावा तरी हा असा दिसत आहे यांत शंका नाहीं. मग हा असा फरक कशानें पडला? अशी कोणती यक्ष–तरुणी दक्षिण आफ्रिकेच्या त्या अद्भुत–रम्य भूमीवर आज अवतीर्ण झाली कीं, जिची यष्टि फिरतांच बोअर व इंग्रज यांनीं आपलें सनातन शत्रुत्व विसरून जाऊन फारा दिवसांनीं भेटलेल्या पाठच्या भावाप्रमाणें गळ्यावर गळा घालून आनंदाश्रु ढाळावे! या प्रश्नाचें उत्तर 'स्वराज्य' हें एकच आहे. केवळ स्वराज्याच्या किमयेनेंच दक्षिण आफ्रिकेंतील या विषारी कळकट तांब्याचें सोनें केलें यांत शंका नाहीं.

पण यावर कोणी अर्थातच अशी शंका घेतील कीं, ज्या वेळीं बोअर लोकांचीं स्वतंत्र अशीं लोकसत्तात्मक राज्यें दक्षिण आफ्रिकेंत होतीं त्या वेळीं त्यांना स्वराज्यसुख मिळत नव्हतें कीं काय ? शंका बरोबर आहे, व वरील प्रश्नास 'होय' असेंच उत्तर दिलेंहि पाहिजे; आणि सकृद्दर्शनीं निर्भेळ स्वातंत्र्याच्या त्या स्थितीपेक्षां बोअर लोकांस हल्लीं मिळालेल्या मर्यादित स्वराज्याचा दर्जा राजनीतिशास्त्राच्या तात्त्विक सिद्धांताप्रमाणें पाहतां थोडासा तरी कमी ठरेल यांत शंका नाहीं. परंतु एक वेळ हें निर्भेळ स्वातंत्र्य भोगणारे बोअर लोक दहा वर्षांपूर्वीं माजलेल्या युद्धाच्या शेवटीं जिंकले जाऊन आपल्या स्वातंत्र्यास सर्वस्वीं मुकले होते; व असें असतां अवघ्या दहा वर्षांतच त्यांना जवळ जवळ संपूर्ण व अढळ स्वराज्य फिरून मिळालें, ही गोष्ट लक्षांत आणली– दहा वर्षांपूर्वीं समरांगणावर हातांत बंदूक घेऊन इंग्रजांशीं लढणारे जनरल बोथा हे आज लॉर्ड ग्लॅडस्टन यांच्या गव्हर्नरीच्या अंमलाखालीं प्रधान-

कीचें काम करीत आहेत ही गोष्ट ध्यानांत घेतली म्हणजे आजच्या घटकेस बोअर लोकांस वाटणाऱ्या समाधानाचें मर्म कोणाच्याहि लक्षांत येईल. शिवाय, दुसरी अशीहि एक गोष्ट आहे कीं, पूर्वीचें निर्भेळ स्वराज्य जरी बोअर लोकांस निःसंशय अधिक प्रिय होतें, व तें तसेंच यावच्चंद्रदिवाकरौ टिकावें अशी त्यांस इच्छा असणें जरी स्वाभाविक होतें तरी, तें निर्भेळ स्वातंत्र्य तशाच स्थितींत अबाधित टिकणें शक्य नव्हतें, व आज मिळालेलें मर्यादित स्वातंत्र्य जरी तात्त्विक दृष्ट्या दुसऱ्या दर्जाचें असलें तरी तें अधिक टिकाऊ आहे, आणि या स्वातंत्र्याबरोबरच पूर्वी कधीं न मिळालेले सुधारणेचे फायदे आपणास मिळून सामाजिक दृष्ट्या आपली उन्नति होण्याचा संभव आहे अशी बोअर लोकांची खात्री झालेली दिसते. तात्पर्य, इंग्रजांचें अधिराज्य आजच्या घटकेस जरी अपरिहार्य असलें तरी तें प्रगतीच्या दृष्टीनें फायदेशीरहि आहे असें बोअर पुढाऱ्यांस वाटत असल्यामुळें त्यांच्या तोंडून आज समाधानाचे व धन्यताबुद्धीचे उद्गार निघत आहेत.

पूर्वी बोअर लोकांना भोगण्यास सांपडत असलेलें निर्भेळ स्वराज्य अनंत कालपर्यंत अबाधित टिकण्यासारखें नव्हतें असें जें वर सांगितलें आहे तें वाचकांचे लक्षांत येण्याकरितां त्यांना दक्षिण आफ्रिकेंतील बोअर लोकांचा थोडासा पूर्वेतिहास समजणें जरूर आहे. हा इतिहास सुमारें पाऊणशें वर्षांचा आहे. सन १८२५ च्या सुमारास बोअर लोक हे दक्षिण आफ्रिकेच्या दक्षिण टोंकाकडे रहात असून जंगली पेशानें चरितार्थ चालवीत. शिकार करणें हाच त्यांचा जरी मुख्य व्यवसाय नव्हता तरी ते जंगलाचे मोठे शोकी असत, व निग्रो गुलाम वगैरे बाळगून लागवड करीत. तथापि एकजुटीनें शहरें किंवा मोठमोठ्या वसाहती वसवून राहणें हें त्यांना स्वभावतः आवडत नसे. नेपोलियन बोनापार्टला सेंट हेलिना येथें कैदी बनवून सोडल्यावर इंग्रजांचें लक्ष गुलामगिरी बंद करून गुलामांना बंधमुक्त करण्याकडे वळलें. या बाबतींत बोअर लोकांचें व इंग्रजांचें जुळेना; व त्यांना इंग्रजांपासून जेव्हां प्रत्यक्ष त्रासच पोंचूं लागला, तेव्हां त्यांनीं मनाशीं असा विचार केला कीं, ‘ आपण स्वातंत्र्यसुख भोगण्याकरितां स्वदेशाचा देखील त्याग केला; तेव्हां इंग्रजांची ही भगभग कां सोसा ? वर काय थोडा मुलुख गेला आहे ! ’ असा विचार करून सन १८२५ च्या सुमारास सुमारें सहा हजार स्वातंत्र्यप्रिय बोअर लोक व्हाल नदी ओलांडून अरण्यांत निघून गेले. या अरण्यांत सिंहादिक वन्य पशु, हॉटेंटॉट, काफीर वगैरे क्रूर रानटी तद्देशीय मूळचे

रहिवासी लोक यांचीच काय ती वस्ती असे; परंतु या दोघांशींहि शौर्यानें झगडून आणि क्रूरपणानें या दोघांचाहि संहार करून, त्यांनीं ट्रान्सव्हाल हा देश वसवून तेथें आपलें प्रजासत्ताक राज्य स्थापलें. अशा रीतीनें वसाहत केल्यावर बोअर लोकांनीं संसार थाटण्यास सुरवात केली. आपला व्यापार वाढावा, युरोपाशीं प्रत्यक्ष दळणवळण सुरू व्हावें याकरितां त्यांना दर्याकिनाऱ्यावरील एखादें बंदर आपल्या हातीं यावें अशी इच्छा उत्पन्न झाली. येथून फिरून त्यांच्या व इंग्रजांच्या झगड्यास सुरवात झाली. सन १८४२ मध्यें बोअर लोकांनीं नाताळ प्रांतावर स्वारी केली व त्यांचा हेतु नाताळांतील मुख्य बंदर जें दरबान तें घेण्याचा होता. परंतु नाताळांत इंग्रज वसाहतवाल्यांचा जमाव मोठा असल्यामुळें त्यांना प्रतिबंध झाला. दरबानला सुमारें एक महिना वेढा पडला, परंतु अखेर बोअर लोकांना परत जावें लागलें. १८४४ सालीं फिरून त्यांचें व ऑरेंज रिव्हर प्रांतांतील इंग्रज वसाहतवाल्यांचें युद्ध झालें. अशा वारंवार होणाऱ्या या कटकटी मोडाव्या म्हणून सन १८५२ सालीं, 'सँड रिव्हर कन्व्हेन्शन' नांवाचा तह होऊन बोअर लोक व इंग्रज यांनीं आपआपसांत होईल तितकें करून भांडावयाचें नाहीं, असें ठरलें. १८४४ सालीं ठरलेल्या घटनेबरहुकूम ट्रान्सव्हालचें प्रजासत्ताक राज्य होतें तसेंच तें १८५६ पर्यंत चालू होतें. पण यापुढील वीस वर्षांत तें थोडेसें खालावूं लागलें. उत्तरेकडे बोअर लोक हळू हळू आपल्या राज्याच्या सीमा वाढवूं लागले होते. परंतु अफ्रिकन लोकांना हें न आवडून त्यांचा शूर पुढारी जो सेटेवेयो नामक झुलू वीर त्यानें बोअर लोकांना ट्रान्सव्हालांतून हांकून काढून व्हाल नदीच्या दक्षिणेस आल्या वाटेनें परत पिटाळून लावण्याचा निश्चय केला, व लाखों आफ्रिकन लोकांचें सैन्य जमा केलें. इकडे बोअर लोक कोणतीहि करपट्टी देण्यास स्वभावतः नाखुष असतात, यामुळें ट्रान्सव्हालच्या तिजोरींतील पैसा नाहींसा होऊन जवळ जवळ दिवाळें वाजण्याची पाळी आली होती. याच वेळीं बोअर लोकांचें आपआपसांत जमेनासेंहि झालें.

या सर्व अडचणींचा फायदा घेऊन इंग्रजांनीं आपलें घोडें पुढें ढकललें. दक्षिण आफ्रिकेंत आपण गोरे लोक आपआपसांत भांडलों, तर शूर तद्देशीय मूळचे रहिवासी जे झुलू वगैरे लोक यांच्याशीं आपला निभाव लागणार नाहीं. सेटेवेयोसारखे प्रचंड शत्रू उत्पन्न झाले असतां एकट्या ट्रान्सव्हालच्या हातून त्यांच्याशीं लढून यश मिळणार नाहीं; इंग्रजांची मदत घेतली असतां मात्र हें संकट निभा-

वेळ; पण स्वतंत्रपणाचा तोरा मिरवून वेळीं अवेळीं इंग्रजांशीं लढण्यास तयार असणाऱ्या बोअर प्रजासत्ताक राज्यास इंग्रज काय म्हणून मदत करतील ? अर्थात् इंग्रजांपासून मिळणारें संरक्षण व त्यांची मदत याची जर बोअर लोकांना किंमत वाटत असेल तर त्यांनीं इंग्रजांचें वर्चस्व कबूल करण्यास तयार झालें पाहिजे; अशा तऱ्हेचा युक्तिवाद नाताळचा त्या वेळचा गव्हर्नर सर थिऑफिलस शेपस्टन यानें करण्यास सुरवात केली; व तो ट्रान्सव्हालांतील कित्येक बोअर लोकांसहि पसंत पडूं लागला. अर्थात् बोअर लोकांचें आपआपसांत दुमत होऊन त्यांच्या अंगीं कमकुवतपणा आला, व यामुळें ट्रान्सव्हालचें राज्य इंग्रजी राज्यास जोडण्याचा शेपस्टन याचा येत आयताच साधला. वीस वर्षेंपर्यंत पूर्ण स्वातंत्र्य भोगलेलें हें बोअर प्रजासत्ताक राज्य खालसा करण्याला शेपस्टन यास शेंपन्नास पोलीस शिपाई आणि एक लक्ष रुपये पुरले; कारण ट्रान्सव्हालचा त्या वेळचा प्रेसिडेंट बरगर्स व ट्रान्सव्हाल पार्लमेंटांतील बरेच सभासद यांस शेपस्टन याची सूचना मान्य होती. पुढें प्रसिद्धीस आलेले प्रेसि. क्रूगर यांस मात्र ही सूचना मुळींच मान्य नव्हती. दक्षिण आफ्रिकेंतील सर्व गोरे लोक एकत्र करण्याची कल्पना त्यांस पसंत पडेना, व असें करणें म्हणजे बोअर लोकांनीं स्वतःचें स्वातंत्र्य गमावण्यासारखें होय असें त्यांस वाटे; त्याप्रमाणें, इंग्लंडास डेप्युटेशनें वगैरे पाठवून खटपटहि पुष्कळ झाली, पण तिचा उपयोग झाला नाहीं. परंतु प्रे. क्रूगर यांनीं आपला निश्चय ढळूं दिला नाहीं, आणि १८८० सालीं इंग्लंडांत मि. ग्लॅडस्टन हे लिबरल पक्षासहवर्तमान अधिकारारूढ झाल्याबरोबर त्यांनीं ट्रान्सव्हालचें स्वातंत्र्य मिळविण्याच्या उद्योगास प्रारंभ केला. इकडे या सुमारास सेटेवेयो याचाहि मोड झाल्यामुळें आपल्या स्वतंत्र प्रजासत्ताक संस्थानावर जें मोठें गंडांतर आलें होतें तें नाहींसें झालें असें पाहून ट्रान्सव्हालांतील इतर बोअर लोकांनाहि स्वतंत्र होण्याची इच्छा झाली.

या वेळीं इंग्रजांचें आफ्रिकेंत फारच थोडें सैन्य होतें. यामुळें इंग्रजांना प्रथम सामोपचारानेंच घ्यावें लागलें. बोअर लोकांनीं आतां असा युक्तिवाद करण्यास प्रारंभ केला कीं, जर ट्रान्सव्हाल खालसा करणें हें मूळ बोअर लोकांच्या इच्छेनेंच झालें आहे तर फिरून त्यांस इच्छा झाली असतां त्यांच्या इच्छेप्रमाणें त्यांस स्वातंत्र्यही दिलें पाहिजे. हा युक्तिवाद इंग्रज लोकांस एकदम नाकबूल करितां येईना. पण अखेर सर गार्नेट वूल्स्ले या इंग्रज सरदारानें युक्तिवाद वगैरे बाजूस ठेवून " झालेली गोष्ट रद्द होणार नाहीं; एक वेळ व्हाल नदी समुद्राकडे न वाहतां

उगमाकडे उलटी वाहूं लागेल, पूर्वेचा सूर्य पश्चिमेस उगवेल, परंतु ट्रान्सव्हाल म्हणून फिरून स्वतंत्र होणार नाहीं. " असा खडखडीत जबाब दिला व एक दोन बोअर पुढाऱ्यांस राजद्रोहाच्या आरोपावरून कैद केलें. इकडे सर्व दक्षिण आफ्रिकेस मिळून संयुक्त स्वराज्य द्यावें असाही एक बूट केप कॉलनीच्या पार्लमेंटमध्यें निघाला. पण जोबर्ट व क्रूगर यांनीं स्वतः केपटाऊन येथें जाऊन तो बेत हाणून पाडला. दोन्ही पक्षांनीं लढाईची तयारी केली; व नंतर १८८१ च्या फेब्रुआरी महिन्यांत माजुबा येथील लढाईत बोअर लोकांना जय मिळाल्यावर तह ठरला. त्यांत ट्रान्सव्हालवर इंग्रज सरकारचें अधिराज्य असावें व प्रिटोरिया येथें ब्रिटिश रेसिडेंट रहावा असें बोअर लोकांनीं कबूल केलें, व या अधिराज्याखालीं ट्रान्सव्हालच्या प्रजासत्ताक राज्यानें अगदीं स्वतंत्रपणानें स्वराज्य करावें असें इंग्रजांनीं कबूल केलें. या तहास 'प्रिटोरिया-कन्व्हेन्शन' असें म्हणतात. प्रे. क्रूगर यांस मात्र हा तह कांहीं अंशांनीं मान्य नव्हता. यामुळें नवीन व्यवस्थेंत ते स्वतः प्रेसिडेंट झाल्यावर त्यांनीं जुन्या बाबी वादविवादास काढून इंग्लंडला फिरून डेप्युटेशननें पाठवून आपलें म्हणणें खरें केलें. १८८४ सालीं लॉर्ड डर्बी हे वसाहतीचे प्रधान असतां दुरुस्तीचा तह करण्यांत आला. या तहामध्यें ट्रान्सव्हालचें राज्य 'सर्वस्वीं स्वतंत्र आहे,' असा मुद्दाम उल्लेख करण्यांत आला. इंग्लंडच्या अधिराज्यासंबंधाचे पूर्वीच्या तहांतले शब्द वगळण्यांत आले; वाटेल तेव्हां इंग्रज सैन्य ट्रान्सव्हालांत पाठविण्याचा जो हक्क पूर्वीच्या तहांत मुद्दाम इंग्रजांनीं राखून ठेवला तो वगळण्यांत आला; नेटिव म्हणजे काळे रहिवासी आफ्रिकन यांच्या संबंधानें बोअर लोक वाटेल तसे वागण्यास मुखत्यार आहेत असें नव्यानें ठरलें; मात्र बोअर लोकांनीं परराष्ट्राशीं जे तह करावयाचे ते इंग्रज सरकारास नापसंत असल्यास सहा महिन्यांच्या आंत त्यांनीं ते नापसंत असतां रद्द होतील, एवढीच एक शर्त इंग्रजी अधिराज्याची खूण म्हणून या नव्या तहांत घालण्यांत आली. याच सालीं प्रे. क्रूगर हे युरोपास गेले व त्यांनीं मोठ्या मुत्सद्दीगिरीनें जर्मन बादशहांची ट्रान्सव्हालास सहानुभूति मिळविली.

इतकें झाल्यावर प्रे. क्रूगर हे अंतर्व्यवस्थेकडे वळले, तों इंग्रज व बोअर यांच्यांतील द्वेषवृक्षाचें आणखी एक बीं रुजून वर आलें. सन १८८५ सालीं ट्रान्सव्हालमध्यें सोन्याच्या खाणींचा शोध लागला; व या खाणींतून सोनें काढण्याकरितां हुषार, मेहनती कामकरी, व सट्टेबाज व्यापारी, निरनिराळ्या इंग्रजी वसा-

हतींतून येऊन ट्रान्सव्हालांत राहूं लागले. थोड्याच दिवसांत हजारों इंग्रज लोकांची ट्रान्सव्हालांत गर्दी झाली. प्रे. क्रूगर हे जात्या धूर्त असल्यामुळें या गोष्टीचा परिणाम काय होणार याचें त्यांस अनुमान करतां आलें. तहावरून इंग्रजांस ट्रान्सव्हालांत जाऊन राहाण्यास प्रतिबंध नव्हता. पण बोअर लोकांच्या व त्यांच्या अमलाखालीं स्वराज्याचे हक्क न मागतां राहण्यास इंग्रज कसचे तयार होणार? अशा समजुतीनें क्रूगरनीं वरील कलमास संमति दिली असली पाहिजे. शिवाय अधिराजे जर इंग्रज तर त्यांस ट्रान्सव्हालांत येऊं देण्यास कशी मनाई करितां येणार ? ते काय गरीब बिचारे निराधार हिंदी लोक आहेत म्हणून त्यांच्यावर बहिष्कार घालतां येईल ? पण सोन्याच्या खाणी आपल्या राज्यांत सांपडणार हें स्वप्नच मुळीं त्यांस कसें पडावें ? कसेंही असो; खाणी सांपडल्यामुळें इंग्रज लोक ट्रान्सव्हालांत येऊन राहूं लागले तसतशा क्रूगरसाहेबांच्या अडचणी वाढूं लागून, फिरून प्रजासत्ताक पार्लमेंटांत शिरण्यास व मत देण्यास जो कालावधि पूर्वीं अवश्य ठरला होता तो प्रे. क्रूगर हे हळूहळू वाढवूं लागले. पण बाहेरून येऊन राहिलेले लोक इंग्रज, अमेरिकन, आस्ट्रेलियन—म्हणजे स्वतंत्रतेंत वाढलेले—असल्याकारणानें नागरिकत्वाच्या हक्काशिवाय बोअर अमलाखालीं राहणें त्यांना आवडेना. या सुमारास ट्रान्सव्हालामध्यें मूळचे बोअर फक्त १४ हजार होते. पण बाहेरून येऊन राहिलेले इंग्रज वगैरे त्यांच्या पांचपट म्हणजे सत्तर हजार होते. ट्रान्सव्हालांतील निम्मी अधिक जमीन व सुमारें नऊदशांश संपत्ति इंग्रजी कंपनींचे हातीं होती. असें असतां त्यांस नागरिकत्वाचे हक्क मिळेनात. शिवाय ट्रान्सव्हालची पार्लमेंट सभा प्रे. क्रूगर यांच्या प्रेरणेनें जकाती वाढवूं लागली, रेल्वे बांधूं लागली, किल्ले उभारूं लागली, युरोपांतून हत्यारें व युद्धसामुग्री आणवूं लागली; यामुळें वैमनस्य विकोपास जाऊं लागलें. १८९५ सालीं बंडाचें निशाण उभारून राजकीय चळवळीच्या मार्गांतला हा जो शेवटचा मार्ग व ज्याला पोलॉकसारख्या इंग्रज राजनीतिशास्त्रवेत्त्यांनीं 'बंड करण्याचा हक्क' म्हणून कायदेशीर नांव दिलें आहे, त्याचा उपयोग करण्याचा जोहान्सबर्ग येथील इंग्रजी वसाहतवाल्यांचा विचार झाला; व यास अनुसरून केप कॉलनीचा मुख्य प्रधान सीसिल ऱ्होडस यांच्या संमतीनें सुप्रसिद्ध डॉ. जेम्सन यानें थोडेसे लोक बरोबर घेऊन ट्रान्सव्हालवर स्वारी केली. परंतु बोअर सरदारांच्या चपळाईनें डॉ. जेम्सन याचा पहिल्या प्रसंगांतच पराभव होऊन त्यास शरण यावें लागलें.

अशा रीतीनें सरुद्धर्शनीं इंग्रज वसाहतवाल्यांचा हिरमोड व आशाभंग होऊन प्रे. क्रूगर यांचा वसाहतवाल्यांवरचा ताबा अधिक बळकटच झाला. परंतु हें भांडण येथेंच थांबणें शक्य नव्हतें. ट्रान्सव्हालांतील इंग्रज वसाहतवाल्यांच्या असंतोषास साम्राज्यवादी इंग्रज मुत्सद्दी मि. चेंबरलेन यांच्या कावेबाजपणानें चिथावणी व उत्तेजन मिळालें, व पंचायतीनें तंट्याचा निकाल लावणें वगैरे सर्व सामाचे उपाय खुंटून पुढें चार वर्षांतच युद्धाची तयारी झाली. १८९९ सालच्या ता. ११ आक्टोबर रोजीं पांच वाजतां युद्धास सुरवात झाली. या युद्धांत प्रथम बोअर लोकांनीं कशी सरशी केली, केप कॉलनीवर स्वारी करून त्यांनीं इंग्रजांस रेटीत रेटीत कसें मागें नेलें, इंग्रज सरदारांचा पहिल्या पहिल्या लढायांत कसा पराभव झाला, पण अखेर इंग्रजांचें दोन अडीच लाख सैन्य आफ्रिकेंत गोळा झाल्यावर बोअर लोकांची लाट मागें मागें हटत जाऊन सर्व ट्रान्सव्हालपर्यंत मुलूख इंग्रजी सैन्याच्या ताब्यांत कसा आला, प्रे. क्रूगर हे युरोपास कसे निघून गेले, शेवटीं जनरल बोथा यांच्याकडे बोअर सैन्याचें आधिपत्य असतां १९०२ सालच्या मे महिन्याच्या ३१ व्या तारखेस उभयपक्षांचा तह कसा झाला व फिरून, ट्रान्सव्हालांत शांतता कशी प्रस्थापित झाली हा मनोरंजक कथाभाग केसरीच्या वाचकांस माहीत आहेच. पण या युद्धाच्या कथाभागाहूनही अधिक मनोरंजक असा दुसरा एक कथाभाग आहे व तो कथाभाग म्हटला म्हणजे या तहाचे तारखेपासून परवां संयुक्त आफ्रिकन पार्लमेंट उघडण्याच्या तारखेपर्यंत स्वराज्याची जी शीघ्र प्रगति इंग्रजी साम्राज्याच्या त्या भागांत घडून आली तिजसंबंधाचा होय. इंग्रज वसाहतवाल्यांच्या स्वराज्याचे हक्क मिळविण्याच्या महत्त्वाकांक्षेमुळें बोअर लोकांच्या सोन्यासारख्या स्वतंत्रतेची माती कशी झाली हें आपण येथवर पाहिलेंच. आतां युद्धाच्या अखेर स्वतंत्रता नष्ट झाली असतांहि स्वराज्याचे अधिकार फिरून इतक्या लवकर मिळाल्यामुळें बोअर लोकांच्या जातिद्वेषरूपी मातीचें साम्राज्य-प्रेमरूप सोनें कसें झालें-अर्थात् स्वराज्याच्या किमयेचा हा इतिहास कसा घडून आला हें आपण पुढील अंकांत पाहूं.

## -२-

(ता. २२ माहे नोव्हेंबर सन १९१०)

मागील लेखांत सांगितल्याप्रमाणें सन १९०२ च्या मे महिन्याच्या शेवटच्या दिवशीं इंग्रज व बोअर यांचे दरम्यान तह होऊन लढाई संपली. या तहांतलि एक मुख्य कलम असें होतें कीं, इंग्रजांनीं बोअर लोकांस स्वराज्य शक्य तितक्या लवकर द्यावयाचें, व दरम्यान ट्रान्सव्हाल आणि ऑरेंज रिव्हर कॉलनी यांची व्यवस्था

करण्याकरितां जें राजमंडळ नेमण्यांत येईल त्यांतही बोअर प्रतिनिधींचा समावेश करावयाचा. १९०२ सालच्या अखेर मि. चेंबरलेन हे स्वतः दक्षिण आफ्रिकेंत गेले व त्यांनीं सर्व दक्षिण आफ्रिकेचें मिळून संयुक्त स्वराज्य करण्याची योजना विचाराकरितां बोअर व इंग्रज यांपुढें मांडली. ती त्यांस पसंत पडण्याचा संभव आहे, असें दिसूं लागतांच बोअर लोकांना स्वराज्य देण्यास विलंब करण्यांत अर्थ नाहीं असें पाहून तहापासून बरोबर तीन वर्षांनीं म्हणजे १९०५ च्या मे महिन्याच्या ३१ व्या तारखेस राजाचीं 'लेटर्स पेटंट' प्रसिद्ध होऊन बोअर लोकांस स्वराज्य देण्यांत आलें. पहिला विचार असा होता कीं, बोअर लोकांस फक्त कायदेकानू करण्याचें लोकनियुक्त कौन्सिल द्यावें. व या कौन्सिलांत कसें काय काम चालतें तें प्रथम पाहून, राज्याधिकाराचें मुख्य सूत्र म्हणजे अंमलबजावणी करणाऱ्या अधिकाऱ्यांवरचा ताबा हा मग द्यावा. पण पुढें लवकरच लिबरल पक्ष अधिकारारूढ झाला; व त्यानें ही दुमजली स्वराज्याची योजना नापसंत करून १९०६ सालच्या डिसेंबर महिन्यांत कायदे करण्याच्या अधिकाऱ्यांवर म्हणजे प्रधानमंडळावर ताबा व हुकमत चालविण्याचा असे दोनही अधिकार एकदम देण्याचें ठरविलें. या कायदेकौन्सिलांत सुरवातीस १५ सभासद नेमलेले असावे, पण पुढें ते लोकांनीं निवडून द्यावे, असें ठरलें. या कायदेकौन्सिलाशिवाय एक पार्लमेंटरी सभा ६९ सभासदांची असावी, व या सभेंतील सभासद, ज्यांची ट्रान्सव्हालांत वस्ती सहा महिन्यांहून अधिक झाली आहे, अशा सर्व गोऱ्या (बोअर व इंग्रज) मतदारांनीं निवडून द्यावे असें ठरलें. या पहिल्या योजनेप्रमाणें लुई बोथा हा ट्रान्सव्हालचा मुख्य प्रधान झाला.

बोअर लोकांचें दुसरें म्हणजे ऑरेंज रिव्हर कॉलनीचें प्रजासत्ताक स्वराज्य याचीही हकीकत अशीच आहे. बोअर युद्धांत या स्वतंत्र संस्थानांतील बोअर लोकांनीं प्रे. क्रूगर यांस मिळून बोअर लोकांच्या स्वातंत्र्यार्थ युद्ध मांडलें पण १९०० सालच्या मे महिन्यांत इंग्रजांची सरशी होऊं लागली, व लॉर्ड रॉबर्ट्स यांनीं ता. २८ मे रोजीं हें स्वतंत्र संस्थान खालसा केलें. १९०२ सालीं तहाचे वेळीं ट्रान्सवालप्रमाणें या संस्थानांतील बोअर लोकांस स्वराज्य देण्याचें अभिवचन मिळालें नाहीं, व १९०२ च्या जूनच्या २४ व्या तारखेपासून लॉर्ड मिलनर यांनीं फक्त सरकारनें नेमलेलें कायदेकौन्सिल व अंमलबजावणीचें कौन्सिल यांच्या द्वारें राज्यकारभार चालविला. पण ट्रान्सव्हालांतील बोअर लोकांस स्वराज्य मिळा-

त्याचे त्याच्या पाठोपाठ म्हणजे १९०७ सालच्या जून महिन्यांत त्यांसही स्वराज्य देण्यांत आलें. ऑरेंज रिव्हरच्या स्वराज्यांत ११ सभासदांचें एक कायदेकौन्सिल होतें. त्यांतील सभासद सुरवातीस सरकाराकडून नेमले जात, पण पुढें तें लोकनियुक्त झालें. तसेंच त्यांची पार्लमेंटरी असेंब्ली किंवा सभा आहे, तिजमध्यें ३८ सभासद असतात, व २१ वर्षांवर वय असलेल्या व संस्थानांत सहा महिन्यांवर राहिलेल्या सर्व गोऱ्या ( बोअर व इंग्रज ) लोकांनीं त्यांची निवडणूक करावयाची असते. नव्या निवडणुकी झाल्या त्यांमध्यें बोअर लोकांचेंच बहुमत असून त्यांचे बरेच प्रतिनिधी निवडून आले व युद्धामध्यें गमिनी काव्याची लढाई करून इंग्रजांना ज्यानें बरेच दिवस पाणी पाजलें तो बोअर सरदार ख्रिश्चन डिवेट यांस इंग्रज सरकारनें मुख्य प्रधान नेमलें.

केपकॉलनी व नाताळ या प्रांतांत बोअर लोकांचें वर्चस्व अलीकडे केव्हांच नव्हतें. व तेथील गोऱ्या बोअर इंग्रजांस पूर्वीपासूनच स्वराज्य मिळालेलें होतें. केपकॉलनीच्या स्वराज्याची मूळ रचना सन १८५३ सालीं झाली. या रचनेप्रमाणें केपकॉलनीला लोकनियुक्त कायदेकौन्सिल मिळालें होतें. या कौन्सिलांत १५ सभासद असत; व पार्लमेंटरी असेंब्लीमध्यें ४६ लोकनियुक्त सभासद असत. परंतु मंत्रिमंडळावर हुकूम चालविणें हेंच खऱ्या स्वराज्याचें चिन्ह होय व हें त्यांस पुढें १८७२ सालीं प्राप्त झालें. तेव्हांपासून असेंब्लीमध्यें ज्या पक्षाचें बहुमत असतें त्या पक्षांतून प्रधानमंडळ नेमण्यांत येऊं लागलें. हल्लीं केपकॉलनीच्या कौन्सिलांत २६ सभासद व असेंब्लींत १०७ सभासद होते. नाताळ प्रांत हा १८४८ पर्यंत केप कॉलनीशीं जोडून होता. या सालीं नाताळास स्वतंत्र कायदेकौन्सिल देण्यांत आलें. व स्वतंत्र गव्हर्नर नेमण्यांत आला. १८५६ सालीं नाताळांतील लोकांस स्थानिक स्वराज्याच्या संस्था देण्यांत आल्या. १८४८ त दिलेल्या कौन्सिलांतील सर्व सभासद सरकारानें नेमावयाचे असत. पण १८५६ सालीं या कौंसिलच्या १६ सभासदांपैकीं १२ लोकनियुक्त असावे असें ठरलें; मात्र कौन्सिलानें मंजूर केलेले कायदे दोन वर्षांच्या आंत इंग्लंडनें नामंजूर करण्याचा हक्क राखून ठेवण्यांत आला. १८८३ सालीं कायदेकौन्सिलाच्या सभासदांची संख्या ३० पर्यंत वाढविण्यांत आली; व यांपैकीं २३ सभासद लोकनियुक्त असावे असें ठरलें. परंतु केपकॉलनीप्रमाणें प्रधानमंडळावरचा ताबा नाताळ प्रांतास अद्यापि मिळावयाचा होता व तोही १८९३ सालीं देण्यांत आला. अलीकडे नाताळच्या कायदेकौन्सिलाचे १३ सभासद असत व असेंबलीचे ४३ असत.

वर दिलेल्या हकीकतीवरून हें लक्षांत आलेंच असेल कीं, एका दक्षिण आफ्रिकेंत अशा रीतीनें चार निरनिराळीं स्वराज्यें असून त्यांपैकीं दोघांमध्यें बोअर लोकांचें व दोघांमध्यें इंग्रजी वसाहतवाल्यांचें प्राधान्य आहे. या दोन जातींच्या स्वभावगुणांत कांहीं कांहीं महत्त्वाचे फरक आहेत; व या फरकांमुळेंच आजपर्यंत त्यांच्यांत बेबनाव व युद्धें होत आलीं. बोअर लोक स्वभावतः इंग्रजांइतकेच किंबहुना थोडे अधिकच स्वातंत्र्यप्रिय आहेत. त्यांना सर्व गोष्टींत 'सवता सुभा' फार आवडतो. त्यांच्या कामांत दुसऱ्या कोणीं हात घातलेला त्यांना आवडत नाहीं. पण याच गुणाबरोबर त्यांच्या अंगीं असा एक अवगुण आहे कीं ते प्रगतिशील नाहींत. मोठमोठ्या शेतवाड्या ताब्यांत ठेवून खुषीस येईल तितकी व येईल तशी शेती करणें व गुरांचे कळप पाळून शिकार करणें हेंच बोअर लोकांना मनापासून आवडतें. बायबलावर त्यांचा मोठा विश्वास व स्तोत्रें म्हणण्याची त्यांना मोठी आवड. पण याच्यापलीकडे जाऊन भौतिक सुधारणेच्या म्हणून ज्या कांहीं गोष्टी असतात त्यांत त्यांचें पाऊल इंग्रज वगैरे युरोपियन लोकांइतकें पुढें नाहीं. ललितकला, वाङ्मय वगैरे गोष्टींचें त्यांस फारसें वारें लागलेलें नाहीं. यामुळें शिक्षण, शास्त्रीय प्रगति, वर्तमानपत्रांसारखे धंदे, या बाबतींत दक्षिण आफ्रिकेंत बहुतेक सत्ता इंग्रजांच्या हातींच आहे. राजकारणाचा अनुभव, त्याची संघटना व मुत्सद्देगिरी या बाबतींतहि इंग्रज हे बोअर लोकांच्या पुढें आहेत. १९०० सालीं युद्ध सुरू असतां एडमंड डिमॉलीन या फ्रेंच गृहस्थानें स्वतःच्या माहितीवरून असें भविष्य प्रसिद्ध केलें होतें कीं, जरी बोअर लोक जात्या अत्यंत शूर आहेत तरी, ज्या शौर्याच्या बळावर त्यांनीं आपणापेक्षां दसपट प्रबळ अशा काफिर वगैरे तद्देशिय लोकांस जिंकलें, त्या शौर्याचा उपयोग इंग्रजांविरुद्ध त्यांस अखेर होणार नाहीं; कारण सामाजिकदृष्ट्या ते इंग्रजांपेक्षां मागासलेले आहेत; व हें भविष्य खरेंहि ठरलें.

इंग्रज व बोअर यांच्या या स्वभावभेदामुळें त्यांचें आजपर्यंत कायमचें जातिवैमनस्य होतें. या वैमनस्याला दुसरें एक कारण असें घडलें कीं, बोअर लोकांस नीग्रो लोकांची गुलामगिरी पसंत असून, तद्देशीय लोकांस ते अत्यंत निष्ठुरपणानें वागवीत. इंग्रजांस या दोन्ही गोष्टी मान्य नव्हत्या. बोअर व इंग्रज यांचा दक्षिण आफ्रिकेंत पहिला खटका उडाला तो नीग्रो गुलामांच्या पायीं, हें मागील लेखांत सांगितलेंच आहे. तद्देशीय लोकांना निष्ठुरतेनें वागविल्यामुळें ते लोक

बिथरून जात व सरसकट गोऱ्या लोकांबद्दल त्यांच्या मनांत द्वेषबुद्धि उत्पन्न होऊन इंग्रजांस काळ्या लोकांबरोबर वरचेवर लढाया कराव्या लागत. १८३५ सालीं बोअर लोक व्हाल नदीपलीकडे जाऊन त्यांनीं स्वतंत्र स्वराज्य स्थापिलें, तरी नेटिव लोकांशीं वागण्याच्या धोरणावरून त्यांच्या व इंग्रजांच्या कटकटी होतच. शिवाय ट्रान्सव्हॉल व ऑरेंज रिव्हर हीं दोन प्रजासत्ताक राज्यें बोअर लोकांनीं स्थापलीं तरी पूर्व व दक्षिण दोन्ही दिशांस इंग्रज वसाहती व या वसाहतींपलीकडे दर्याकिनारा असल्यामुळें त्यांचा परस्परांशीं सर्व संबंध सुटणें शक्य नव्हतें; आणि पुढें तर खुद्द ट्रान्सव्हालांत इंग्रजी वसाहतवाल्यांचा शिरकाव झाल्यापासून इंग्रजांशीं कायमचा संबंध तोडणें बोअर लोकांस शक्यच नव्हतें. तात्पर्य, अशारीतीनें दरम्यान पांचपंचवीस वर्षांखेरीज या दोन जातींचा निकट संबंध सर्वकाळ सारखा होता.

हा संबंध कायम व्हावा व या दोन गोऱ्या जातींची मिलाफी व एकजीव होऊन सर्व दक्षिण आफ्रिकेवर ताबा चालवावा, अशी दूरदर्शी स्वार्थी इंग्रजांची बरेच दिवस खटपट होती. परंतु बोअर लोक प्रायः या एकीकरणाच्या योजनेच्या विरुद्ध होते, व इंग्रज लोक आपल्या स्वतःस—वेगळे—स्वतंत्र राहूं देत नाहींत याचें त्यांस फार वैषम्य वाटे. पण वास्तविक पहातां बोअर लोकांस मिलाफ केल्या-शिवाय स्वतंत्र रहाण्याचा हक्कच नाहीं असें इंग्रज म्हणत. हा हक्क दोन तऱ्हांनीं येतो. एक तर बोअर लोकांची दक्षिण आफ्रिका ही अनादिसिद्ध जन्मभूमि तरी असावयाची होती, अथवा इंग्रज वगैरे गोरे प्रतिस्पर्धी किंवा तद्देशीय काफीर वगैरे काळे लोक यांपैकीं एकाला तरी जिंकून कायमचें ताब्यांत ठेवण्याइतकी त्यांची संख्या व संघशक्ति मोठी असावयास पाहिजे होती. पण यांपैकीं बोअर लोकां-च्या बाजूस एकहि गोष्ट पुरी नव्हती. कारण दक्षिण आफ्रिकेची भूमि मूळची कोणाची ? ती इंग्रजांची नाहीं खरी; तरी पण बोअर लोकांचीहि नाहीं. काफीर लोकांच्या आधीं तेथें आणखीहि कोणी लोक रहात असतील हें खरें. तरी पण आज जी माहिती आहे तिजवरून दक्षिण आफ्रिकेच्या भूमीस स्वदेश किंवा मातृभूमि म्हणण्याचा हक्क बोअर लोक किंवा इंग्रज यांपेक्षां काफीर लोकांसच अधिक पोंचतो. ही भूमि पोर्तुगीज प्रवासी बार्थोलोम्यूडायझ यानें शोधून काढिली, अर्थात् त्याच्या वेळेपासून—सन १४८७ पासून—गोऱ्या लोकांना ती माहीत झाली. पोर्तुगीज लोकांनीं हुडकून काढलेल्या या भूमीवर प्रथम वसाहत

अशी हॉलंडच्या डच लोकांनीं केली. पण याच सुमारास म्हणजे सन १६२० सालीं कांहीं इंग्रज दर्यावर्दी व्यापाऱ्यांनीं जेम्स राजाच्या नांवानें दक्षिण आफ्रिकेच्या कांहीं भागाचा ताबा घेऊन निशाण लावलें होतें. इंग्रजांस तेथें त्यावेळीं वसाहत कर्तव्य नव्हती. नेपोलियनाबरोबर जें युद्ध झालें त्यांत इंग्रजांनीं हा प्रांत जिंकून घेतला; व १७९५ सालीं केप कॉलनीचा पहिला इंग्रज गव्हर्नर नेमण्यांत आला. तेव्हांपासून पुढें १८२५ सालीं कटकट होईपर्यंत बोअर लोक इंग्रजांच्या अमलाखालींच होते; व त्यांस स्वराज्याचे कांहींहि हक्क नव्हते.

हे हक्क पाहिजेत म्हणून व होतांहोईतों स्वतंत्र व्हावें या बुद्धीनें कांहीं बोअर लोक मागें सांगितल्याप्रमाणें उत्तरेकडे निघून गेले व तेथें त्यांनीं स्वसत्ताक राज्येंहि स्थापलीं. पण तीं टिकवून, आपल्या काळ्या व गोऱ्या शत्रूंना दूर ठेवण्याइतकी त्यांच्या अंगांत कर्तबगारी नव्हती. त्यांच्या शौर्याबद्दल मुळींच मतभेद नाहीं. परंतु केवळ नुसत्या आंगच्या शौर्यावर राजकीय स्वातंत्र्य टिकत नाहीं; हा अनुभव जगाच्या पाठीवर अनेक देशांत अनेक काळीं आलेला आहे. ट्रान्सव्हालांतील बोअर लोकांनीं १८५२ पासून १८७७ सालपर्यंत स्वतंत्र स्वराज्य कसेंबसें रेटलें खरें. पण काफीर व इंग्रज यांस स्नेहबद्ध करून ठेवण्याइतकें त्यांचे अंगीं सौजन्य नव्हतें, किंवा या दोघांविरुद्ध आपला बचाव करण्याइतकें त्यांच्याजवळ लष्करहि नव्हतें. १८७७ सालीं म्हणजे जेव्हां सर थिओफिलस शेपस्टन—नाताळचा इंग्रज गव्हर्नर—यानें ट्रान्सव्हालचें राज्य खालसा केलें त्या वेळीं बोअर लोकांत मनस्वी दुही माजली होती; आणि स्वराज्याची अंतर्व्यवस्था तर अशी सुरेख होती कीं, तिजोरींत फक्त १२ शिलिंग ६ पेन्स (सुमारें पंधरा रुपये) शिल्लक होते ! अर्थात् अशा स्वराज्यांतले लोक व्यक्तिशः कितीहि शूर व मनानें स्वातंत्र्यप्रिय असले तरी त्यांचा उपयोग काय ? १८७७ नंतर बोअर लोकांनीं फिरून एकवार मर्यादित स्वराज्य मिळविलें. परंतु इंग्रजांचें अधिराज्य त्यांस यापुढें केव्हांहि टाळतां आलें नाहीं. प्रे. क्रूगर हे शूर व स्वातंत्र्यप्रिय होते खरे; परंतु जातीनें त्यांच्या अंगीं दूरदर्शीपणा थोडा कमी होता, व त्यांच्या स्वदेशभक्तींत स्वातंत्र्यप्रेमापेक्षांहि जात्यभिमान व परकीयांचा—काळ्यांचा काय किंवा गोऱ्यांचा काय—द्वेष हा अधिक असे. क्रूगर यांच्यापेक्षां जनरल जोबर्ट, जनरल बोथा हे योद्धे कमी स्वातंत्र्यप्रिय किंवा कमी स्वराज्यप्रिय होते असें नाहीं. पण त्यांच्या मनांत परकीयांचा द्वेष असा कमी असे.

तीच गोष्ट केप कॉलनींतील बोअर लोकांची. केप कॉलनीइतकी बोअर लोकांची संख्या ऑरेंज रिव्हर कॉलनी किंवा ट्रान्सव्हाल यांत नव्हती; व केप कॉलनींतील लोकांस स्वतःचें पार्लमेंट असलें तरी इंग्रजी गव्हर्नराचे कायदेशीर अमलाखालीं राहावें लागत असे. पण अंतर्व्यवस्थेंत पूर्ण स्वातंत्र्य असल्यावर मग आधिराज्य इंग्रजांचें असलें तरी तें चालेल, असें ते मानीत व मानतात. त्यांच्या अंगीं ट्रान्सव्हालांतील बोअर लोकांइतकेंच शौर्य, लढवय्येगिरी व स्वातंत्र्यप्रेम होतें व आहे; आणि हें साहाजिकच आहे. कारण, हे दोन्ही बोअर जातीनें एकच; दोन्हीं मडकीं एकाच मातीचीं केलेलीं आणि एकाच आव्यांत भाजलेलीं; तेव्हां तीं अर्थातच समानगुण होत; पण एकाचे अंगीं परिस्थितिज्ञान व मुत्सद्देगिरी हीं दुसऱ्याहून अधिक होतीं इतकाच फरक. केप कॉलनींतील बोअर लोक स्वराज्याच्या हक्काकरितां ट्रान्सव्हालांतील बोअर लोकांप्रमाणेंच केव्हांहि लढले असते; व दक्षिण आफ्रिकेंत बोअर लोकांचें राजकीय वर्चस्व राहावें, या हेतूनें त्यांनीं १८८२ सालीं आफ्रिकँडर बाँड नांवाची संस्थाहि स्थापन केली. या संस्थेंत प्रथम केप, ऑरेंज कॉलनी व ट्रान्सव्हाल प्रांतांतील बरेच लोक सामील झाले. परंतु पुढें प्रे. क्रूगर यांनीं केवळ निर्भेळ स्वातंत्र्यावरच जेव्हां जास्त जोर देण्यास प्रारंभ केला, आणि यामुळें इंग्रज व बोअर यांच्यांत बेबनाव होण्याचा रंग दिसूं लागला, त्या वेळीं आफ्रिकँडर बाँडच्या लोकांनीं ट्रान्सव्हालच्या बोअर लोकांपासून आपली फारकत करून घेतली. बाँडचे लोक म्हणजे कांहीं इंग्रजांचें भजनपूजन करतात असें नाहीं. १८९५ सालीं डॉ. जेम्सन यांनीं मि. ऱ्होड्स यांच्या मसलतीनें ट्रान्सव्हालावर स्वारी केली तिचा त्यांनीं तीव्र निषेध केला. तसेंच बोअर युद्ध संपल्यावर केप कॉलनींतील जे बोअर लोक इंग्रजांविरुद्ध लढले त्यांना सरसास माफी द्यावी अशीहि त्यांनीं खटपट केली. परंतु निर्भेळ स्वराज्याच्या बाबतींत मात्र त्यांचा व प्रे. क्रूगर यांचा मतभेद होता; व अंतर्व्यवस्थेसंबंधानें स्वतंत्र पार्लमेंट मिळाल्यास मग इंग्रजांचें अधिराज्य चालेल, एवढेंच नव्हे तर तें कांहींकाळ इष्टहि आहे, आणि दक्षिण आफ्रिकेंतील सर्व काळ्यागोऱ्यांनीं मिळून स्वराज्य करावें, आपआपसांत फूट ठेवूं नये, असें त्यांचें मत आहे. जनरल बोथा याच मताचे आहेत व जनरल जोबर्टहि जिवंत असते तर याच मताचे असते.

परंतु ट्रान्सव्हालच्या बोअर लोकांची व इंग्रजांची युद्धापर्यंत मजल येण्याचें कारण असें झालें कीं, बोअर लोक ट्रान्सव्हालकडे जाऊन राहिले व त्यांनीं तुटक

वसाहती केल्या. हें केप कॉलनीच्या इंग्रज सरकारास आवडलें नाहीं. हळूहळू परस्पर द्वेष वाढला. आणि स्वराज्याचे अधिकार व संस्था देण्यासंबंधानें इंग्रज लोक वचनें अघळ पघळ देतात पण पाळीत नाहींत, असा चार दोन वेळां ट्रान्सव्हालच्या बोअर लोकांस अनुभव आल्यामुळें पुढें पुढें ते त्यांचा शब्द मुळींच मानीतनासे झाले. पण सर्व दक्षिण आफ्रिकेस संयुक्त स्वराज्य दिलें गेल्यामुळें एकट्या ट्रान्सव्हालबरोबर वागतांना या बोटावरची थुंकी त्या बोटावर करण्याची इंग्रजी मुत्सद्यांची विद्या पूर्वी जशी साधत असे तशी ती आतां साधणें शक्य नाहीं—अर्थात् हल्लीं मिळालेलें स्वराज्य टिकाऊ झालें आहे, पळपुटें नाहीं; व सर्व बोअर लोकांचा आतां एकजीव झालेला असल्यामुळें या टिकाऊपणाबद्दल जामीन मिळून चुकला आहे, अशी ट्रान्सव्हालांतील बोअर लोकांची खात्री झाली आहे. म्हणूनच पूर्वी रणांगणावर इंग्रजांविरुद्ध लढणारे बोअर सेनापती आज त्यांच्याशीं हातांत हात घालून प्रेमानें वागत आहेत. हीच स्वराज्याची अजब किमया! इंग्रजांना दक्षिण आफ्रिकेप्रमाणें हिंदुस्थानांतहि साम्राज्यप्रेम वृद्धिंगत करावयाचें असेल तर राणीचा जाहीरनामा अक्षरशः व भरपूर पाळणें आणि हिंदी प्रजेस स्वराज्याचे हक्क व संस्था देणें याच किमयेचा उपयोग येथेंहि केल्याशिवाय गत्यंतर नाहीं.

## — ३ —

(तारीख १३ डिसेंबर १९१०)

## कानडा वसाहतीचें उदाहरण.

स्वराज्याच्या किमयेचें वर्णन करितांना पहिल्या दोन लेखांत, दक्षिण आफ्रिकेंतील डच-बोअर लोक इंग्रजांच्या अधिराज्याखालीं राजनिष्ठ होऊन राहण्यास स्वराज्याच्या देणगीमुळें कसे तयार झाले याची हकीकत आम्हीं दिली आहे. हाच अनुभव इतर वसाहतींतहि इंग्रजांस आलेला असल्याचें इतिहास सांगतो. यास्तव या खेपेस कानडाप्रांताच्या वसाहतीचें उदाहरण घेऊन तेंच सत्यप्रमेय सोदाहरण सांगण्याचें आम्हीं योजिलें आहे. ज्याप्रमाणें दक्षिण आफ्रिकेंत एक वळ शत्रुत्वभावानें लेखलेल्या डच-बोअर लोकांशीं इंग्रजांचा संबंध आला, त्याचप्रमाणें कानडा प्रांतांत त्यांचे पिढीजाद हाडवैरी जे फ्रेंच लोक त्यांच्याशीं संबंध आला. इंग्लंडचें फ्रान्सशीं असलेलें वैर सर्व वैरांत जुनें, म्हणजे तेराव्या चौदाव्या शतकापासून या दोन राष्ट्रांत युद्धें झालीं नाहींत असें आजपर्यंत एकहि शतक गेलेलें नाहीं

असें म्हणण्यास हरकत नाहीं. अठराव्या शतकांत व एकोणिसाव्या शतकाचे प्रारंभीं तर इंग्रज व फ्रेंच यांच्यामधून विस्तव जात नव्हता. सतराव्या व अठराव्या शतकांत युरोपियन राष्ट्रांना जगभर वसाहती करण्याची अनावर हौस उत्पन्न झाली होती; व मायदेशांतलें हें भांडण फ्रेंच व इंग्रज लोक आपआपल्या वसाहतींच्या देशांतहि नेऊन सडकून भांडले. या दोन राष्ट्रांतील हीं भांडणें मुख्यतः हिंदुस्थान व कानडा या प्रांतांत खूप तेजाला आलीं. पैकीं हिंदुस्थानांत अठराव्या शतकाच्या अखेर फ्रेंच लोकांचा पुरा मोड होऊन पाँडिचरी व चंद्रनगर या गांवांशिवाय फ्रेंचांच्या हातीं दुसरा कोणताच मुलूख राहिला नाहीं, व या शहरांतहि झालें तरी एखाद्या अधिकाऱ्याखेरीज फ्रेंच माणूस म्हणून उरला नाहीं. हिंदुस्थानच्या सुवर्णभूमीकडे येण्याच्या प्रयत्नांत असतां युरोपियन लोकांना द. आफ्रिका व सर्व अमेरिका या खंडांचा शोध लागला. पैकीं दक्षिण आफ्रिका डच व इंग्रज यांनीं व्यापिली; दक्षिण अमेरिका स्पॅनिश लोकांनीं आपलीशी केली; व उत्तर अमेरिकेंत इंग्रज व फ्रेंच शिरले. कानडा प्रांतांत मूळ वसाहत फ्रेंच लोकांनीं मांडली व सर्व उत्तर अमेरिका जिंकून आपलीशी करावी अशी फ्रान्सच्या बोर्बोन राजांना फार महत्त्वाकांक्षा असे. सन १७५७ सालीं इकडे हिंदुस्थानांत प्लासीची लढाई झाली त्याच सालीं कानडा प्रांतावर प्रसिद्ध मुत्सद्दी व इंग्लंडचा मुख्य प्रधान पिट यानें मोठें सैन्य पाठवून फ्रेंच लोकांस पायबंद लावण्यास सुरुवात केली. अवघ्या दोन वर्षांच्या आंत सर्वच पारडें फिरलें. १७५९ सालीं क्वेबेकच्या लढाईंत फ्रेंचांचा पुरा मोड होऊन पुढें १७६३ त झालेल्या पारिस येथील तहानें अमेरिकेंतल्या फ्रेंच साम्राज्याची इतिश्री झाली.

पण युरोपियन वसाहतवाल्यांना परकी लोकांचें जड जूं आपल्या मानेवर बसलेलें सहसा आवडत नाहीं. एक देश सोडून ते जसे दुसऱ्या देशांत वसाहत करून राहतात तसेंच, स्वातंत्र्याकरितां-अभिमानाखातर-दुसरा देश सोडून तिसऱ्या एखाद्या देशांत जाऊन रहाण्यासहि ते तयार होतात, हें मागें सांगितलेल्या बोअर लोकांच्या उदाहरणावरून कळून येण्यासारखेंच आहे. अर्थात् इंग्रजांनीं कानडाप्रांत जिंकून घेतला खरा; पण तेथली फ्रेंच प्रजा रहाते कीं इंग्रजांचा अंमल चुकविण्याकरितां पुनः देशत्याग करिते याविषयीं इंग्रजांस खात्री नव्हती. म्हणून ज्या फ्रेंच वसाहतवाल्यांस परत जावयाचें असेल त्यांना घरदार विकून त्याचे पैसे करून स्वदेशीं परत जाण्यास अठरा महिन्यांची मुदत देण्यांत आली. पण ही वेळ अशी होती

कीं, फ्रेंचलोकांस स्वदेशापेक्षां सुराज्याची व स्वराज्याच्या हक्कांची आवडच अधिक वाटत होती; फ्रान्समधील राज्यक्रांति अद्यापि घडून यावयाची होती; स्वातंत्र्य-देवीच्या महोदयाचा पूर्वरंग रुसो, व्हॉलटेअर वगैरे प्रतिभासंपन्न लेखकांच्या योगानें रंगला होता, तरी दुष्ट व जुलमी बोर्बोन राजे अद्यापि फ्रान्सच्या गादीवर विराजमान झालेलेच होते; आणि अरुणोदयाच्या पूर्वी थोडा वेळ रात्रीचा अंधकार जसा अत्यंत निबिड असतो, त्याप्रमाणें या वेळीं फ्रान्समध्यें जनतेची स्थिति अत्यंत हीन दीन झालेली होती. अर्थात् फ्रान्स हा स्वदेश झाला तरी तेथें परत जाऊन करावयाचें काय ? असा प्रश्न कानडा येथील फ्रेंचवसाहतवाल्यांच्या डोळ्यांसमोर येऊन उभा राहिला. दुसरेपक्षीं इंग्रज लोक हे त्यांचे वैरी खरे, तरी यापूर्वी त्यांनीं आपली स्वातंत्र्यप्रियता व्यक्त केली होती. १६४९ त त्यांनीं स्वतःच्या चार्लस राजाचा शिर-च्छेद् करून व १६८८ सालीं जेम्स राजास पदच्युत करून या दोन राजक्रांत्यांच्या योगानें राजकीय व धार्मिक स्वातंत्र्याविषयींचें आपलें प्रेम इंग्रजांनीं निर्विवाद रीतीनें व्यक्त केलें होतें. तेव्हां स्वदेशांत पण बोर्बोन राजांच्या जुलमी अमलाखालीं राहिल्यापेक्षां वसाहतीच्या दत्तक स्वदेशांत अशा इंग्रजांच्या अमलाखालीं राहिलेलें अधिक बरें, असा त्यांचा निश्चय झाला असावा. निदान वरील मुदतीच्या अठरा महिन्यांच्या अखेरीस पाहतां फारच थोडे फ्रेंच लोक कानडा सोडून फ्रान्सला परत गेले यांत शंका नाहीं.

उरलेल्या वसाहतवाल्यांस इंग्रजांनीं फार चांगलें वागविलें. त्यांनीं त्यांना रोमन–क्याथोलिक धर्माप्रमाणें चालण्याची व जुन्या फ्रेंच 'फ्यूडल' पद्धतीप्रमाणें जमीन धारण करण्याची पूर्ण परवानगी दिली. सन १७७४ सालीं क्वेबेक ॲक्ट नांवाचा उदारमतवादी कायदा गव्हर्नर मरे यांच्या खटपटीनें ब्रिटिश पार्लमेंटनें पास केला; व त्याला फ्रेंच–कानेडियन लोक अद्यापि आपली सनद्–आपला मॅग्ना-चार्टा–म्हणतात. अशा रीतीनें कानडा प्रांतांत स्थिरस्थावर होतें न होतें तोंच अमे-रिकेंतील तेरा इंग्रज वसाहतींतील लोकांनीं जॉर्ज राजाच्या जुलमाला गांजून हातीं हत्यार घेतलें. या वसाहतवाल्यांची अशी अपेक्षा होती कीं, कानडा प्रांत इंग्रजी राज्याच्या अंमलाखालीं नुकताच गेला असल्यानें तेथील फ्रेंच लोकही बंड करून आपणांस मिळतील; परंतु इंग्रज वसाहतवाले कट्टे प्रॉटेस्टंट, किंबहुना त्यांच्या देश-त्यागाला रोमन कॅथोलिक धर्मपंथाचा द्वेष व प्रॉटेस्टंट धर्मपंथाचें प्रेम हेंच मूळ कारण असल्यामुळें प्रॉटेस्टंट राज्याच्या निरुपद्रवी अमलाखालीं राहण्यापेक्षां या प्रॉटेस्टंट

वसाहतवाल्यांशीं सख्य करून शेजारीं राहाणें हें त्यांस अधिक धोक्याचें वाटलें. फ्रेंच वसाहतवाले सामील होऊन बंड करण्यास कबूल होईनात, तेव्हां अमेरिकन इंग्रजांनीं कानडा प्रांतावर स्वारी केली, पण त्याचा उपयोग झाला नाहीं. फ्रेंच लोकांच्या मदतीनें सन १७७६ सालीं या इंग्रजांनीं स्वातंत्र्य मिळवून संयुक्त स्वराज्य स्थापन केलें; पण या गडबडींत कानडांतले फ्रेंच तटस्थ राहिले; शिवाय खुद्द इंग्रज वसाहतींतले जे इंग्रज जॉर्ज राजाविरुद्ध बंड करण्यास तयार नव्हते तेही कानडा प्रांतांत जाऊन राहिले. पुढें कांहीं दिवसांनीं इंग्लंडांतूनही इंग्रज लोकांनीं तेथें जाऊन वसाहत करण्यास प्रारंभ केला; व अशा रीतीनें कानडा-प्रांतांत इंग्रज व फ्रेंच यांची सरमिसळ लोकसंख्या नांदूं लागली. आज त्या प्रांतांत ३७ लक्ष इंग्रज व १६ लक्ष फ्रेंच आहेत.

कानडा प्रांतांतल्या फ्रेंच इंग्रजांस १७९१ पर्यंत—म्हणजे फ्रान्समधील राज्य-क्रांति होऊन जाईपर्यंत—स्वराज्याचे हक्क नव्हते. सर्व राज्यकारभार इंग्रज गव्हर्नर करी. पण एखादा गव्हर्नर स्वभावतः कितीहि चांगला व उदार असला तरी त्याच्या राज्यकारभारापासून स्वराज्यसंस्थेच्या अंमलाखालीं चालणाऱ्या कारभाराइतकें प्रजेस सुख लागत नाहीं व समाधान वाटत नाहीं. १७९१ च्या कायद्यानें उत्तर व दक्षिण कानडा प्रांतांत प्रत्येकीं एक एक पार्लमेंट देण्यांत आलें. याचा उपयोग असा झाला कीं नेपोलियन बोनापार्टाच्या अमदानींत फ्रान्स व इंग्लंड यांचें पंधरा वीस वर्षेपर्यंत जें तुंबल युद्ध माजलें त्यांत कानडा प्रांतांतले फ्रेंच लोक इंग्रजांकडेच राहिले. एवढेंच नव्हे, तर फ्रेंच लोकांचा कैवार घेऊन अमेरिकेच्या संयुक्त संस्थानांतील इंग्रजांनीं इ. स. १८१३ सालीं कानडा प्रांतावर स्वारी केली तेव्हां ते इंग्लंडच्या बाजूनें फ्रान्सविरुद्ध अमेरिकन—इंग्रजांशीं लढले; व इंग्रज अधिराज्याबद्दलची आपली निष्ठा त्यांनीं व्यक्त केली.

पण हें युद्ध संपतांच फिरून कानेडियन लोक आपल्या स्वराज्याच्या डागडुजीस लागले व या डागडुजींत आपलें स्वराज्य खरोखर कोठें कमकुवत आहे हें त्यांस कळून आलें. १७९१ च्या कायद्यानें कानडांतील प्रजेस 'असेंब्ली' म्हणजे पार्लमेंट देण्यांत आलें होतें खरें; तथापि, गव्हर्नरच्या मदतीस जें कौन्सिल म्हणून होतें त्याजवर या पार्लमेंटची सत्ता चालत नसे. या कौंसिलांत माणसें थोडीं, सरकारानें तहाहयात नेमलेलीं, व त्यांना काढून टाकण्याचा अधिकार फक्त राजाचा; अर्थात् अंमलबजावणी सर्व त्यांच्या हातीं. त्यामुळें पार्लमेंटनें कायदे केले किंवा

न केले, सुधारणा केली किंवा न केली सारखीच. कौंसिलनें कांहींहि केलें तरी त्याचा प्रतिकार करण्याचें कायदेशीर सामर्थ्य पार्लमेंटच्या हातीं नव्हतें; व ही स्थिति फारच वाईट व कोणासहि नापसंत होण्यासारखी असते. हिंदुस्थानचें उदाहरण घेतलें असतां हें कसें तें कळून येईल. इकडे हिंदुस्थानांत आम्हांला कायदेकौंसिलें दिलीं आहेत; पण त्यांना 'सेक्रेटरीएटवर बिलकुल सत्ता नाहीं. सेक्रेटरीएटसचें काय, सेक्रेटरीएटच्या यःकश्चित् कारकुनाचेंही त्यांना कांहीं एक वांकडें करितां येत नाहीं. समजा, उद्यां मुंबईच्या कायदेकौंसिलांतील सर्व बिन-सरकारी सभासदांची अशी खात्री झाली कीं, अमुक एका तालुक्यांतल्या अमुक एका कुळकर्ण्यानें प्रजेवर जुलूम मांडला आहे व त्याला नोकरींतून काढण्यांत यावें, पण हा यःकश्चित् दहापांच रुपयांचा कुळकर्णीही जर अन्य रीतीनें सरकारास आवडता असेल तर कायदेकौंसिलांतील बहुमत आपल्या बाजूस मिळवून त्यांनीं बहुमतानें या कुळकर्ण्यास कामावरून काढणें इष्ट आहे असा 'ठराव' मंजूर केला तरी, सरकारची मर्जी नसेल तर त्या ठरावाचा उपयोग राष्ट्रीयसभेच्या ठरावाइतकाच होणार. सगळें कौंसिल एका बाजूस व सरकारास पसंत असलेला एखादा कुळकर्णी किंवा शिपुर्डा एका बाजूस; अशी केवळ कायद्याच्या दृष्टीनें तरी आज हिंदुस्थानांत वस्तुस्थिति आहे; व ही स्थिति आजकाल 'सुधारलेल्या कायदेकौंसिलाखालींही' कायम आहे, हें विसरतां कामा नये.

असो; कानडांतील पार्लमेंट व कौन्सिल यांच्या दरम्यानचा हा विरोध कालांतरानें चिरडीस गेला. हिंदुस्थानच्या कौन्सिलांस जमाखर्चावर सत्ता बिलकूल नाहीं ती तरी कानडांतील पार्लमेंटास होती व तिचा तिनें सरांस उपयोगहि चालविला. गव्हर्नरानें खर्च मंजूर करावा व पार्लमेंटनें तो नामंजूर करावा, अशा चकमकी सुरू झाल्या. पार्लमेंटच्या कनिष्ठ सभेंतील फ्रेंच लोक व वरिष्ठ सभेंतले इंग्रज लोक यांच्यामधलें जातिवैर बाहेर डोकावूं लागलें. १८३७ सालीं दक्षिण कानडा प्रांतांत फ्रेंच राष्ट्रभक्त लुई जोसेफ पॅपिनो व उत्तर कानडा प्रांतांत वुइलियम लायन मॅकेंझी यांनीं बंडें केलीं. हीं बंडें अर्थातच तुटपुंजीं होतीं व बंडवाल्यांस यथायोग्य शिक्षाहि झाल्या. परंतु पुढें पन्नास वर्षांनीं ग्लॅडस्टनसाहेबांनीं आयर्लंडांतील बंडासंबंधानें म्हटल्याप्रमाणेंच, पॅपिनो व मॅकेंझी यांच्या बंडांनींहि, 'कानडांतील वसाहतवाल्यांच्या तक्रारींत बराच अर्थ आहे व त्यांच्या म्हणण्याप्रमाणें कांहीं तरी केलें पाहिजे,' अशी इंग्रज सरकारची खात्री केली एवढा तरी

त्यांचा उपयोग झाला. कारण पुढील वर्षी (१८३८) अर्ल ऑफ डरहॅम नांवाच्या प्रसिद्ध मुत्सद्यास इंग्रजसरकारनें कानडाप्रांतांतील असंतोषाच्या कारणांची स्थानिक चौकशी करण्यास पाठविलें. त्यानें चौकशी करून सरकारास असें कळविलें कीं, या सर्व असंतोषाचें कारण 'लोकांचा—जनतेचा हात राज्यकारभारांत नाहीं' हेंच होय. पार्लमेंटांत फ्रेंच लोक थोडे होते. पण इंग्रजांच्या दुफळ्यांचा फायदा घेऊन त्यांनीं हळूहळू प्रधानमंडळांत आपला शिरकाव करून घेतला; व १८४५ सालापासून म्हणजे लॉर्ड एलगिन हे कानडाचे गव्हर्नर जनरल झाल्यापासून, इंग्रज व फ्रेंच यांजमधील जातिवैर पुरें मोडलें. कारण यापुढें जातीचा प्रश्न आड न येतां राज्यकारभारांत दोघांचाहि हात सारखाच चालूं लागला; व आजमितीचे कानडाचे मुख्य प्रधान विलफ्रिड लॉरिअर हे जातीनें फ्रेंचच आहेत. असो; ही जातिविषयक आढी निघून गेल्यामुळें व पार्लमेंटची सत्ता प्रधानमंडळावर चालूं लागल्यामुळें, कानडांतील लोकांच्या मनांत इंग्रजी अधिराज्याखालीं असणाऱ्या या स्वराज्याचा अभिमान वाढूं लागला; व निर्भेळ स्वातंत्र्याचा आस्वाद घेणारें 'युनायटेड स्टेट्स' इतकें जवळ असतां, किंबहुना कानडाच्या वसाहतवाल्यांनीं आपणांत येऊन मिळावें अशी अमेरिकन लोकांची इच्छा व खटपट असतांहि, कानडा प्रांत इंग्रजी राजास आजवर स्वामिनिष्ठ राहिला आहे. कालांतरानें उत्तर अमेरिकेंत पसरलेल्या सर्व इंग्रज फ्रेंच वसाहतींच्या एकीकरणाचा प्रश्न लोकांपुढें आला, व ते त्यास अनुकूल झाल्यानें हें एकीकरण घडूनहि आलें. १८९७ सालीं अमेरिकेचा मोह दूर सारून कानडानें इंग्लंडशीं व्यापारी तह करून मायदेश व वसाहत यांच्यांतलीं बंधनें दृढ केलीं; व १८९९ सालीं बोअर युद्धांत कानडानें आपलीं पलटणें इंग्रजांचे मदतीस पाठविलीं हें प्रसिद्धच आहे. सन १८५७ व १८६४ या सालीं कानडा वसाहतीच्या मुख्य प्रधानकीच्या जागीं असणारा फ्रेंच मुत्सद्दी सर एटेनटाशे हा म्हणे कीं, जर कानडा प्रांत इंग्रजांच्या ताब्यांतून जाण्याचा कधींकाळीं प्रसंग आला तर इंग्रज राजाची फ्रेंच प्रजा अखेरपर्यंत लढेल; शेवटचा गोळीबार फ्रेंचांचे हातून होईल.—"If ever the British flag ceases to wave over Canada, the last shot in its defence will be fired by a French-Canadian." इंग्रज व फ्रेंच मूळ हाडवैरी; इंग्रज प्रॉटेस्टंट धर्मी व फ्रेंच क्याथोलिक धर्माचे; फ्रेंच लोकांना स्वतःचा मायदेश, व त्या देशांत स्वतःच्या लोकांनीं चालविलेलें स्वतंत्र प्रजा-

सत्ताक राज्य आहे. असें असतां वरील प्रकारचे उद्गार फ्रेंच प्रजाजनांच्या तोंडून निघण्याचें, व ही अशी सरमिसळ भिन्न धर्मी व भिन्न भाषा बोलणारी फ्रेंचइंग्रज प्रजा कानडासारख्या वसाहतींत इंग्लंडचें अधिराज्य कबूल करून रहात आहे याचें कारण काय? या प्रश्नांचें उत्तर स्वराज्यसुख हेंच दिलें पाहिजे. अमेरिकेंतल्या इंग्रज वसाहतवाल्यांस जॉर्ज राजाच्या नादीं लागून इंग्लंडनें योग्य वेळीं स्वराज्य दिलें नाहीं, व कानडा प्रांतांतल्या फ्रेंच-इंग्रज वसाहतवाल्यांस योग्य वेळीं इंग्लंडनें स्वराज्य दिलें, हेंच पहिली वसाहत बंडखोर होऊन इंग्लंडच्या हातांतून जाण्यास व दुसरी वसाहत इंग्लंडच्या हातीं राजनिष्ठेच्या भावानें रहाण्यास कारण झालें, हें कोणीहि इतिहासज्ञ कबूल करील. स्वराज्याची किमया—अद्भुत परिणाम घडवून आणण्याची शक्ति—म्हणून आम्ही जी म्हणतों ती हीच; व स्वराज्याचा गरम 'लोकरीचा' फरकोट हिंदुस्थानास उपयोगीं नाहीं, असें म्हणणाऱ्या लॉर्ड मोर्लेसाहेबांनीं स्वराज्याच्या किमयेकडे खरोखरच लक्ष दिलें नाहीं, असें कष्टानें म्हणावें लागतें.

---

## २१. कायदेकौन्सिलांतील कामकाज

( ता. ११ जानेवारी सन १९१० )

नवीन कायदेकौन्सिलांच्या रचनेसंबंधानें आणि त्यांत निवडून व नेमून आलेल्या सभासदांसंबंधानें आम्हीं मागील अंकांत विवेचन केलेंच आहे. आतां येथील कामाच्या निरनिराळ्या चार अंगांसंबंधानें विचार करितांना सर्वांस साधारण अशी एक स्थूल गोष्ट प्रथमच ढळढळीत नजरेस येते; व ती ही कीं, या चारहि बाबतींत कौन्सिलच्या सभासदांस अमुक एक गोष्ट आम्ही हमखास करूं अशी आशा बाळगतां येत नाहीं. नवीन नियमांनीं दर पावलागणीक निरनिराळे प्रतिबंध निर्माण केले आहेत ते आहेतच; पण शिवाय, हे सर्व नियम संभाळून व प्रतिबंध टाळूनहि जरी एखादा सभासद पुढें सरसावला तरी; त्यास बिनतोड विरोध करितां येईलच अशी एक अजब सुलतानी शक्ति किंवा अधिकार गव्हर्नरसाहेब अर्थात् कौन्सिलचे अधिपति, यांस या नियमांनीं देऊन ठेविलेला आहे. आणि बाकीचीं शस्त्रें जेथें चालणार नाहींत तेथें हें चालून, सभासदांस त्यांचा पराधीनपणा व सरकारास आपला स्वायत्तपणा अगर सुलतानी अंमल यांचा प्रत्यय प्रसंगविशेषीं आणून घेतां येईल, अशी व्यवस्था नियमांत करण्यांत आलेली

आहे; यामुळें नवीन कौन्सिलांमध्यें माणसें व वटवट हीं दोन्ही पूर्वींहून दुप्पट वाढलीं, परंतु खरी सत्ता अगर अधिकार मात्र पूर्वींपेक्षां दशांशानेंहि वाढला नाहीं, असें यापुढें कौन्सिलांत जाऊन काम करणारांस लवकरच आढळून येईल, अशी आमची पक्की खात्री आहे. आतां हें कळत असूनहि लोकपक्षाच्या प्रतिनिधींनीं कायदेकौन्सिलांत कां शिरावें? असा प्रश्न यावर कित्येकांस स्वाभाविकपणेंच सुचेल. परंतु त्याचें उत्तर आमच्या मतें अगदीं सोपें आहे. वसाहतींच्या नमुन्याच्या स्वराज्यास अवयवीभूत असे जे अनेक अधिकार आहेत, त्यांतील कित्येक जर कायदेकौन्सिलांतच हातीं यावयाचे व त्यांतच जर ते बजावावयाचे आहेत तर त्या कायदेकौन्सिलांची सुधारणा त्यांत शिरूनच करितां येणें शक्य आहे. राष्ट्रीयत्वाच्या इतर अंगांचा परिपोष व विकास होण्यास इतर स्थळें अर्थात् आहेतच. परंतु करपट्टी, जमाखर्च, कायदेकानू, वगैरे बाबींसंबंधानें कायदेकौन्सिलें अवश्य असून, राष्ट्रांतील निदान कांहीं थोड्या तरी बुद्धिमान् कर्तृत्ववान् पुरुषांनीं त्यांत शिरल्याशिवाय निर्वाह नाहीं. कौन्सिलांची सुधारणा सर्वांनींच बाहेर राहिल्यानें होईल, अशा प्रकारची अपेक्षा सयुक्तिक नाहीं. शस्त्रास धार पाजावयाची असल्यास तें जसें सहाणेवर घांसावें लागतें, त्याचप्रमाणें कायदेशीर चळवळ तीक्ष्ण होऊन तिला तेज येण्यास दगडाप्रमाणें कठीण व खरखरीत असें सरकारचें मन, आणि पोलादाप्रमाणें घट्ट व अनेक बाबींत दुर्भेद्य असा जनतेचा हट्ट, निश्चय व करारीपणा याची घासाघीस वारंवार होऊन वादाच्या ठिणग्या पडतात कीं काय असा भास होईपर्यंत मजल येणें जरूर असतें. कायदेकौन्सिलें आजपर्यंत स्वतः जरी फारशीं यशस्वी झालेलीं नसलीं तरी, त्यांतील निराशामय अनुभवानें आपल्या परीनें जनतेस आजपर्यंत बरेंच राजकीय शिक्षण मिळवून दिलें आहे हें नाकबूल करितां येणार नाहीं. उदाहरणार्थ, १९०१ सालचें लँड रेव्हिन्यू बिल आपल्या अंगच्या अवगुणांनींच लोकांस सर्वस्वीं अप्रिय होतें ही गोष्ट अगदीं खरी; तरी पण कौन्सिलांतील सभासदांनीं लोकमत खुद्द गव्हर्नरसाहेबांच्या तोंडावर बोलून दाखवून, शेवटीं ना. मेथाप्रभृति सभासद उठून गेल्यानें सरकारच्या मनावर परिणाम होवो वा न होवो, परंतु लोकांच्या मनावर तरी त्याचा परिणाम होऊन त्या बाबतींत कायदेशीर चळवळींस एरवीं आलें असतें त्याहून अधिक तेज आलें यांत शंका नाहीं. तसेंच लोकांच्या सुखदुःखाच्या एखाद्या बाबीसंबंधानें सभासदानें प्रश्न विचारावा, बिनमुरवतखोर अधिकाऱ्यांनीं त्यास खोडसाळ, धरसोडीचें अगर गुरमीचें उत्तर

द्यावें, व प्रश्न विचारणारा खट्टू व्हावा असें पुष्कळ वेळां घडतें. परंतु हें असें ज्या ज्या वेळीं घडतें त्या त्या वेळीं अधिकारी स्वतःच ज्या अप्रियतेची जोड करून घेऊन राजकीय उन्नतीच्या आशेच्या पायाच्या भरावांत आपल्या हातानेंच एक दगड बसवितात, ती अप्रियता हा प्रश्नोत्तराचा हास्यास्पद प्रकार मुळींच टाळल्यानें सिद्ध होणें शक्य नसतें. दुःखें काय, प्रजा आपले ठिकाणीं बसून सोशीतच असते, व त्यांचा शक्य तो सात्त्विक प्रतिकार करीतच असते. परंतु कौन्सिला-सारख्या सर्व जगास दिसे अशा चव्हाट्याच्या जागेवर त्यांचा गवगवा होऊन, अधिकारी आपल्या अधिकार-मतास बळी पडून जी अप्रियता व अनादर संपा-दितात त्याच्या योगानें, तें दुःख जरी निर्मूळ नच झालें तरी, निदान राष्ट्रकार्यास एका दिशेनें पोषकच होतें ही गोष्ट विसरतां कामा नये. कायदेशीर चळवळीनें सरकारशीं भांडून तींत यशस्वी होणें हें, आपल्या प्रतिस्पर्ध्यानें ' भारलेल्या ' फाशां-नींच खेळून त्याजवर दुरंगी लादणें यासारखें, अगर त्याच्याच संवयीच्या व मांडी-खालच्या घोड्यावर स्वार होऊन त्याजवर शर्यत जिंकणें यासारखेंच कठीण आहे हें खरें. तरी पण हें साधल्यावदर त्या विजयाचें यशहि तितकेंच मोठें आहे. असो; तथापि हा ओघानें प्राप्त झालेला उपप्रश्न बाजूस ठेवून, आपण कौन्सिलां-तील कामकाजाच्या निमयांच्या परीक्षणाकडे वळूं.

महत्त्वाच्या मानानें पाहतां प्रश्नोत्तरांचा हक्क हा सर्वांत कमी दर्जाचा आहे. सन १८९२ पर्यंत कायदेकौन्सिलांत लोकनियुक्त प्रतिनिधी नव्हते; सर्व सभासद सर-कारकडून नेमले जात. या सभासदांस प्रश्न विचारण्याचा अधिकार दिलेला नव्हता, व एका अर्थानें होतें तेंच बरोबर होतें. कारण, सरकारच्या प्रतिनिधींनीं सरकारास प्रश्न अगर जाब विचारणें हें मनुष्यानें आपले आपल्यासच प्रश्न विचा-रून उत्तरें देण्यासारखें झालें असतें. लोकव्यवहारांत फक्त वेडीं मनुष्येंच कायतीं आपल्या मनाशीं अशा उघड रीतीनें प्रश्नोतरें करितात; अथवा लोकांपुढें येऊन आपल्या मनाशीं वादविवाद अगर सवाल—जबाब करणें हें नाटकांतील पात्रांच्या आत्मगत भाषणांतच शोभतें. एक हक्कानें जाब विचारणारा व दुसरा सक्तीनें जाब देणारा असा संबंध, कायदेकौन्सिलांत लोकनियुक्त सभासद निवडून देण्याची व्यवस्था झाल्यापासून, म्हणजे १८९२ पासूनच घडून आला; व जे थोडे लोक-नियुक्त प्रतिनिधी आपल्या वांट्यास आले होते त्यांनीं हा हक्क तेव्हांपासून आजप-र्यंत बऱ्यावाईट रीतीनें उपभोगिलाही. नवीन सुधारणेंत हा हक्क अबाधित राहिला

आहेच; पण शिवाय प्रश्नोत्तरप्रसंगीं, आगाऊ नोटीस न देतां जागच्या जागींच एखादा 'पुरवणी' प्रश्न सभासदांस विचारतां यावा, असा नवीन अधिकारहि देण्यांत आला आहे. व हीच या बाबतींतील सुधारणा. पुरवणी प्रश्नाचें कारण पाहिलें तर उघडच आहे. प्रश्न विचारण्याचा जसा बिनसरकारी सभासदास हक्क असतो तसाच, कोणत्या शब्दांनीं त्याचें उत्तर द्यावयाचें हें ठरविण्याचा अधिकार हे सभासद आजवर अशा बेपर्वाईनें बजावित आले आहेत कीं, त्यांच्या उत्तरांतून प्रायः समाधानकारक माहिती मिळेल तर शपथ! 'अमुक गोष्ट सरकारच्या नजरेस आली आहे काय?' असें विचारलें तर 'होय' किंवा 'नाहीं' या द्व्यक्षरी मंत्रानेंच पृच्छकाची बहुधा संभावना व्हावयाची; व त्यांपैकीं कोणचेंहि उत्तर घेतलें तरी बहुधा एकंदरीनें फलप्राप्ति तितकीच. 'अमुक माहिती सरकार मागवील काय?' असा प्रश्न विचारला तर त्यास केव्हां 'होय' असें उत्तर मिळे, तर पुष्कळ वेळां 'अशाप्रकारची माहिती मागविण्यापासून सार्वजनिक हित साधण्यासारखें झालें असें वाटत नाहीं' असा जबाब मिळे. जणूं काय सार्वजनिक हिताहित समजण्याचा मक्ता येऊन जाऊन काय तो सरकारी अधिकाऱ्यांसच ईश्वरानें दिलेला आहे! पण असलें उत्तर घेऊन तोंडांत मारल्यासारखे होऊन चारचार पांचपांच महिने, पुढील सभेची वाट पहात, सभासदांस आजपर्यंत बसावें लागे. कारण सभासदाचा अधिकार फक्त प्रश्न विचारण्यापुरता! उत्तरावर त्याची सत्ता नाहीं! धनुष्यावरून सोडलेला बाण हातांतून सुटून गेल्यावर मग, तिरंदाज कितीहि बांका असला तरी, त्यास कांहीं करतां येत नाहीं; व कायदेकौन्सिलांतील कित्येक बांक्या तिरंदाजांच्या हातूनच अनेक वेळां याच कारणामुळें 'लक्ष्यवेध' झाला नाहीं. शिवाय, प्रश्नोत्तरांच्या शरसंधानांतील लक्ष्य हवें तसें चालविणें, किंबहुना तें जागेवरून अज्जी पळविणें, व प्रसंगविशेषीं तें चाळवितां नच येईल तर निदान सुलतानी सत्तेची अभेद्य ढाल त्याच्या आड धरणें या सर्व गोष्टी करण्याची मुभा सरकारास असते. अर्थात् पुरवणी प्रश्न विचारण्याच्या हक्कापासून मुख्य उपयोग असा होऊं शकतो कीं, एकाद्याच पण चाणाक्षपणाच्या उप-प्रश्नानें उत्तर देणाऱ्या अधिकाऱ्याची प्रश्न विचारणारास वकिलाप्रमाणें मार्मिक उलटतपासणी करितां येते; अथवा कुशल शस्त्रवैद्याप्रमाणें सफाईच्या एका हाताबरोबर, उत्तराच्या पोटांतील विषयावरील शब्दमय मायापटल छाटून काढतां येतें. पुरवणी प्रश्न विचारणें सर्वांसच चांगलें साधतें असें नाहीं; पण ज्याला साधतें त्याला तें फार चांगलें उपयोगीं पडतें.

ब्रिटिश पार्लमेंटमध्यें पुरवणी प्रश्न विचारण्याचा अधिकार सर्वांस असतो; व तेथें त्याचा परिणाम चांगला होतोहि. हिंदुस्थानांतहि हा अधिकार बजावावयास मिळाल्यानें प्रश्न विचारणाराची सर्व मळमळ जिरली नाहीं तरी, कदाचित् काळाचा थोडाबहुत अपव्यय तरी वांचेल. तथापि, एकंदरीनें हा पुरवणी प्रश्न विचारण्याचा हक्क आम्हांस कितपत लाभेल हें पहाणें आहे. कारण पुरवणी प्रश्न विचारण्याचा अधिकार जरी सभासदांस आहे तरी त्याचें उत्तर दिलेंच पाहिजे अशी जबाबदारी अधिकाऱ्यांवर नाहीं. त्यांनीं वाटेल तर अशा प्रश्नास उत्तर द्यावें अगर न देतां; मुख्य प्रश्नाप्रमाणेंच ठराविक नोटीस दिल्याखेरीज उत्तर देत नाहीं असा जबाब द्यावा! शेवटीं या प्रश्नोत्तर प्रकरणीं एकच गोष्ट सांगावयाची राहिली आहे ती ही कीं, पूर्वीं प्रश्नोत्तरांस फक्त सहा दिवसांची नोटीस पुरे होत असे. हल्लीं सुधारलेल्या नियमांत ही मुदत दहा दिवसांपर्यंत वाढविली आहे.

यानंतर कायदेकानू करण्याची बाब घेऊं. या बाबतींत लोकनियुक्त प्रतिनिधींचे अधिकार पूर्वीं होते तसेच राहिलेले आहेत; त्यांत प्रगति झालेली नाहीं किंवा प्रतिगतिहि झालेली नाहीं. परंतु प्रसंग प्राप्त म्हणून येथें हें सांगणें जरूर आहे कीं, बिनसरकारी सभासदांस एकाद्या विषयासंबंधानें कायद्याचें बिल पुढें आणावयाचें झाल्यास एक तर, तें फक्त कांहीं विवक्षित मर्यादेच्या आंतील विषयासंबंधानेंच आणतां येतें. पुढें आणलेलें बिल पास होण्याची आशा कधींच असत नाहीं व इतक्यांतूनच तें पास झालेंच अशी कल्पना केली तरी; त्यास केवळ संमति न देतां तें रद्द करण्याचा अधिकार गव्हर्नर व गव्हर्नर–जनरल यांस असतो. खालच्या कौन्सिलांतून सर्व हिंदुस्थानसंबंधाच्या कारभाराचे म्हणून कित्येक विषय वगळले जातात; व वरिष्ठ कायदेकौन्सिलांतून धर्म, राष्ट्रीय कर्ज, राष्ट्रीय उत्पन्न ( Public Revenues ), सैन्य व आरमार, परदेश व संस्थानें या विषयांसंबंधीं बिल बिनसरकारी सभासदांस सरकारच्या संमतीवांचून पुढें आणतां येत नाहीं. शिवाय, प्रांतिक किंवा वरिष्ठ कोणच्याही कौन्सिलानें पास केलेला कोणचाही कायदा स्टेट सेक्रेटरी यांस हाणून पाडतां येतो. तात्पर्य, पूर्वींच्या काय किंवा हल्लींच्या काय, कौन्सिलामध्यें सरकारास पाहिजे त्याखेरीज दुसरा कायदा पास होऊं शकत नाहीं, व सरकारास पाहिजे तो मात्र हटकून पास होतो; अशा अन्वयव्यतिरेकानें लोकमत-प्रदर्शन करण्याची मर्यादा सिद्ध होते. परंतु, जी गोष्ट बिलाच्या रूपानें व अप्रत्यक्ष रीतीनें सभासदांस यापुढें कौन्सिलांत आणतां येईल अशी एक

योजना नवीन सुधारणेंत झालेली आहे; व आमच्या मतें लोकांस या नवीन योजनेंत जर कांहीं थोडें खरोखर मिळालें असेल तर तें हेंच होय. कोणच्याही राज्याधिकारांत कायदा व कायद्यांची अंमलबजावणी हेच घटक मुख्य आहेत; व प्रजेच्या दुःखांपैकीं बरींच दुःखें खुद्द कायद्यापेक्षां अंमलबजावणीमुळेंच अधिक उत्पन्न झालेलीं असतात. पहिल्या प्रकारच्या दुःखाचें निवारण करण्यास कायदा दुरुस्त होणें हाच काय तो मार्ग असतो; परंतु दुसऱ्या प्रतीच्या दुःखाचें निवारण कदाचित् लोकमत-प्रदर्शनानें होऊं शकतें. शहाण्यास शब्दाचा मार अशी म्हण आहे; व जर यदाकदाचित् कारभारांतील अमुक एक प्रकार वाईट असें कौन्सिलांत ठराव पास होऊन ठरलें, निदान त्यावरील वादविवादांत बऱ्याच लोकप्रतिनिधींनीं व इतर सभासदांनीं तसें मत व्यक्त केलें तर, तो प्रकार सुधारेल असें मानण्यास साधारणतः जागा असते व जेथें कायदा केल्याशिवाय निभतच नाहीं तेथें असे ठराव हे नवीन होणाऱ्या कायद्याच्या पूर्व तयारीदाखल मानिले जातात. खुद्द ब्रिटिश पार्लमेंटमध्यें, म्हणजे जेथें वाटेल त्या सभासदास वाटेल त्या प्रकारचें बिल पुढें आणण्याचा पूर्ण अखत्यार आहे, तेथेंही ठरावांच्या अरुणोदयाशिवाय कायद्यांचा सूर्योदय सहसा होत नाहीं. फणस पिकला आहे कीं नाहीं हें पहाण्याकरितां जशी टिचकी मारून पहावयाची तसाच, विवक्षित कायदा पास होण्यास लोकमत तयार झालें आहे कीं नाहीं, हें पहाण्याकरितां लोकमताचे पुढारी अगर मुत्सद्दी ' ठराव ' पुढें आणितात; व कित्येक वेळां, प्रत्यक्ष कायद्याचें बिल पुढें आलें असतां जें मंत्रिमंडळ त्याचा अंगिकार करण्यास तयार नसतें, तेंच केवळ त्यांतील तत्त्वाच्या इष्टानिष्टतेबद्दल औपचारिक मत-प्रदर्शन म्हणून असा ठरावाचा अंगिकार करूं शकतें, असें पार्लमेंटच्या इतिहासांत पुष्कळ वेळां घडून आलेलें आहे. ठराव म्हणजे कांहीं कायदा नव्हे; व ठराव अंमलांत आणणें न आणणें हें सर्वांशीं अधिकारारूढ पक्षाच्या हातीं असतें. तथापि, वर सांगितल्याप्रमाणें ठरावांचाहि एक उपयोग असतो; व आजपर्यंत अधिकारयुक्त वाणीनें कौन्सिलांतून लोकमत व्यक्त करण्याचा जो हक्क आम्हांस नव्हता, तो या नवीन योजनेंत मिळाला आहे.

पण आतां हा हक्क बजावण्याच्या मार्गांतल्या मर्यादा काय आहेत त्या पाहूं. एक तर असा ठराव पुढें आणावयाचा झाल्यास सभासदास दहा दिवसांची नोटीस लागते. ठरावाची भाषा सोपी व सौम्य पाहिजे. त्यांत तर्क-कुतर्क, वादविवाद,

दुरान्वय, अन्योक्ति, अतिशयोक्ति, वक्रोक्ति, व्याजोक्ति, निंदा, दोषारोप, व्यक्तिविषयक टीका, वगैरे कांहींएक असतां कामा नये; नुसतें शुद्ध, सोंवळें, सात्विक निर्गुण प्रमेय मोजक्या शब्दांनीं व सरकारास केवळ सूचना किंवा नम्र शिफारस अशा रूपानें गोंवलेलें असलें पाहिजे. परंतु ठरावाची भाषा व रचना अशा नियमानुरूप असूनही काम भागत नाहीं. कारण, शिवाय 'सार्वजनिक हितास विरोधी' असें कांहीं त्या ठरावांत असतां कामा नये, व तसें नाहीं असें पाहून पारखून झाल्यावर मगच त्या ठरावाचा समावेश कार्यक्रम–पत्रकांत करण्यांत येईल. बरें, इतका सर्व विधि पार पडून ठरावाची सूचना कदाचित् कार्यक्रमांत दाखल झालीच तरी, तिजवर वादविवाद होईल किंवा नाहीं हें सांगणें कठीण. कारण, एक तर ठराव वादविवादास निघावयाचे ते, जें कांहीं सरकारी कामकाज त्या बैठकींत व्हावयाचें असेल तें पूर्ण झाल्यावर निघावयाचे; व सरकारी कामकाज संपलें तरी, गव्हर्नरसाहेब एकंदर बैठकीस जो कालावधि नेमून देणार तेवढ्यांत त्या ठरावाची वेळ आली पाहिजे! ही वेळ येऊनहि जर ठराविक मुदतींत भाषणें वगैरे संपून प्रश्नाचा निकाल लागला तर बरी गोष्ट, नाहीं तर तो ठराव परत घेतला असें समजून तो फिरून एक वर्षपर्यंत वादविवादास पुढें आणतां येणार नाहीं, असा निर्बंध नवीन नियमांत केलेला आहे! तात्पर्य, प्रश्न विचारणाऱ्या विशेषतः वादविवादाकरितां ठराव पुढें आणणाऱ्या सभासदांस या निरनिराळ्या बंधनांतून मोठ्या शिताफीनें आपलें अंग काढून घेऊन काम करावें लागणार. ती एक त्यांस कसरतच करणें आहे; किंवा त्यास आट्यापाट्याच्या खेळाप्रमाणें पावलोपावलीं कोंड्याच फोडाव्या लागणार हें उघड आहे. प्रश्न किंवा ठराव यांच्या विषयाची कोंडी, रीतीची कोंडी, अनुक्रमाची कोंडी, वेळाची कोंडी, मिळून पावलोपावलीं कोंडी फोडल्याशिवाय त्यास गत्यंतर नाहीं. वरतीं कौन्सिलचा अध्यक्ष हा, आट्यापाट्यांतील 'मुरदंग्या' प्रमाणें आपल्या लंब्या चवड्या अधिकाराच्या हातानें 'खेळाडु' सभासदांच्या पाठींत धपाटा घालून त्यांस मारण्यास सर्व 'सूर' भर वावरत असणार! तो अयोग्यतेच्या सबबीवर, दीर्घसूत्रीपणाच्या सबबीवर, कालापव्ययाचे सबबीवर, कालातिक्रमाचे सबबीवर, सार्वजनिक हितविरोधाच्या सबबीवर कोणता प्रश्न मार्गे ठेवील, कोणती सूचना नामंजूर करील, अगर कोणा सभासदांस 'गैरशिस्ती' च्या सबबीवर केव्हां खालीं बसवील याचा नेम नाहीं. सभासद मिळणाऱ्या पंधरा वीस मिनिटांचा काय तो मालक. बाकी सर्व गोष्टी

परस्वाधीन. आतां राहतां 'बजेट' च्या महत्त्वाच्या बाबीसंबंधानें विचार करण्याचा राहिला. परंतु या बाबतींत खरी सुधारणा काय झाली, व बिनसरकारी सभासदांना या सुधारणेच्या योजनेप्रमाणें राष्ट्राच्या जमाखर्चावर कितपत अधिकार चालवितां येईल याचा पुढील अंकीं विचार करूं.

---

## २२ पिशवीचें तोंड कोणाच्या हातांत राहणार?

(तारीख १८ जानेवारी सन १९१०)

आजच्या स्थितींत पाहिलें तर हिंदुस्थानमध्यें प्रजेकडून जो कर वसूल केला जातो व इतर रीतींनीं इंग्रज सरकारास जें उत्पन्न होतें, त्या सर्व पैशाच्या पिशवीचें तोंड सर्वस्वीं सरकारच्या हातांत आहे! ही पिशवी कांहीं लहानसान नाहीं. ती एक जंगी पोतडी आहे; तिच्यांत सालाचे कांठीं कांहीं नाहीं म्हटलें तरी सुमारें शंभर कोट रुपये येऊन पडतात, व बहुतेक तितके सर्व सरसालांत खर्चाकरितां बाहेर निघतात. सालअखेर कधीं थोडी शिल्लक रहाते, नाहीं तर एखादे वेळीं सरकारास थोडें कर्जवामहि करावें लागतें. परंतु या इतक्या प्रचंड रकमेचा बोजा डोक्यावर वाहणाऱ्या प्रजेनें आपली 'मान वांकवून हात कितीहि लांब केले, तरी ते कधींहि त्या पोतडींतील पैशास पोंचूं शकत नाहींत. कारण पोतडीच्या दोऱ्या अधिकाऱ्यांच्या हातांत कायद्यानें देऊन ठेवलेल्या आहेत; व त्या केवळ त्यांच्याच इच्छेनें ओढल्या किंवा सोडल्या जावयाच्या असतात. १८९२ पर्यंत प्रजेस आपल्या पैशाचें काय होतें हें कळण्याची मारामार होती म्हटलें तरी चालेल. १८९२ पासून १९०९ चे दरम्यान ही स्थिति थोडीशी सुधारली. कारण या मुदतींत लोकनियुक्त प्रतिनिधी कायदेकौन्सिलांत बसूं लागले; आणि वर्षांतून एक वेळ सरसालाच्या जमाखर्चाचें अंदाजपत्रक कौंसिलापुढें ठेवण्यांत यावें व त्या वेळीं कौंसिलांतील सभासदांस त्यावर टीका करण्याची मोकळीक असावी, असें पार्लमेंटनें ठरविलें. यामुळें हिंदुस्थानसरकारच्या खजीनदाराच्या या पोतडींत कोठून व कशा रकमा येऊन पडतात हें लोकांच्या प्रतिनिधींना कळूं लागलें; हिशेबाचे छापील कागदाची प्रत त्यांच्या हातांत पडूं लागली; व अमुक एका खात्यावर अगर बाबीवर खर्च जास्त होतो तो कमी करावा, अगर कमी होतो तो जास्त होत जावा असें त्यांस हक्कानें 'बोलून' दाखवितां येऊं लागलें. परंतु या अनेक गोष्टींपैकीं एकीस अगर सर्वांस मिळूनहि 'सत्ता' हें नांव देतां

येणें शक्य नव्हतें. सन १८९२ पासून फार झालें तर लोकानियुक्त प्रतिनिधींना या सराफी पोतडींत डोकावून पाहतां येई, व कोणत्या कप्प्यांत काय ठेवलें आहे हें त्यांना दिसे, येवढें म्हणतां येईल. परंतु पैसा नुसता पाहून आजवर कोणाचें कधीं समाधान झाल्याचें ऐकिवांत नाहीं! उलट, कुबेरनगरीला भूषणभूत होण्यासारखें हें शेंकडों कोटी रुपयांचें सरकारी पोतडींतील भांडार एका दृष्टीनें पाहतां आपलें आहे, मात्र त्या भांडारापैकीं एक पैहि खर्च करण्याचा अगर इकडची तिकडे करण्याचा अधिकार आपणांस नाहीं, हें पाहून प्रजेला विषाद वाटूं लागावा हें स्वाभाविकच होतें. शिक्षणासारखीं स्तुत्य व लोकहिताचीं कामें हिंदुस्थानांत पैशाविणें रखडत पडलीं असतां, प्रजेस ज्याचें स्वारस्य कधींहि पटणें शक्य नाहीं अशा लष्करी कामावर परदेशी अधिकाऱ्यांच्या तनख्यावर या भांडारापैकीं फार मोठ्या रकमेचा खर्च परभारें तिऱ्हाइतांकडून होतो हें पाहून 'कवडीची सत्ता नसेल तर लाखाची मत्ता असून नसून सारखीच' ही म्हण हिंदी प्रजेस पटण्यासारखी नव्हती असें कोण म्हणेल? हल्लींच्या सुधारणेंत प्रजेचें एक पाऊल पुढें पडलें आहे हें आम्ही आनंदानें कबूल करितों; कारण बिनसरकारी सभासदांस जमाखर्चावर आजपर्यंत नसती टीका करूनच समाधान मानून गप्प बसावें लागत असे; परंतु नवीन नियम अमलांत आल्यापासून त्यांना, प्रथमतः जमाखर्चाच्या पोटकमिटींत खासगी रीतीनें व नंतर भर कौन्सिलांत उघड रीतीनें टीकाच नव्हे, तर सूचना व उपसूचना करून त्यांवर मतें घेण्यास भाग पाडतां येऊं लागलें आहे आणि प्रसंगविशेषीं, 'बिनसरकारी' सभासदांचें एकमत झाल्यास या सूचनांचें दडपण सरकारावर इतकें पडूं शकेल कीं, त्या सूचनांचा अव्हेर करणें त्यांना जडहि जाईल. परंतु जोंपर्यंत 'लोकनियुक्त' सभासदांचें कौन्सिलांत बहुमत होणार नाहीं तोंपर्यंत वरच्यासारखा प्रसंग म्हणजे कपिलाषष्ठीच्या योगाप्रमाणें केवळ दुर्मिळ, असेंच घेऊन चालण्यास हरकत नाहीं. तात्पर्य, नामदार गव्हर्नरसाहेबांनीं आपल्या भाषणांत सांगितल्याप्रमाणें १८६१ व १८९२ या सालांत झालेल्या प्रगतीपेक्षां, १८९२-१९०९ या सालांच्या दरम्यान अशा रीतीनें थोडी अधिक प्रगति झाली असेल खरी; परंतु मागें सांगितल्याप्रमाणें प्रगतीचें केवळ सापेक्ष प्रमाण पाहून समाधान मानण्यासारखी ही बाब नाहीं.

नवीन सुधारलेल्या कायदेकौंसिलांत लोकनियुक्त प्रतिनिधींस जमाखर्चावर कितपत सत्ता चालवितां येईल हें आपण थोडक्यांत पाहूं. हिंदुस्थानसरकारची

जमा सुमारें शंभर कोट, व मुंबईसरकारची जमा सुमारें पांच कोट आहे. जमा हा शब्द या ठिकाणीं 'ज्या पैशांतून सरकारास खर्च करण्याचा अधिकार आहे असा पैसा' या अर्थानें आम्हीं योजिला आहे. वास्तविक करपट्टी बसविण्याची सत्ता हिंदुस्थानसरकारची; व त्या करपट्टीच्या योगानें हिंदुस्थानांतल्या वाटेल त्या प्रांतांत उत्पन्न होणारा पैसा हाहि सर्व हिंदुस्थानसरकारचा आहे. प्रांतिक सरकार हे हिंदुस्थानसरकारच्या मुख्य पेढीचे मुनीम आहेत; त्यांनीं आपणास वरिष्ठ सरकाराकडून देण्यांत आलेल्या अधिकारान्वयें कर वसूल करावयाचे असतात; या वसूल केलेल्या पैशांतून कांहीं रकमा, ठराव करून, प्रांतिक सरकारच्या म्हणजे या पोट–पेढ्यांच्या खर्चाकरितां तोडून दिलेल्या असतात; व त्यांतून त्यांनीं आपला खर्च चालवावयाचा असतो. आजपर्यंत मुख्य पेढी व या पोटपेढ्या यांच्या दरम्यान पांच–पांच सालींचे करार किंवा मक्ते होत असत; परंतु ही पद्धति मोडून हल्लीं हिंदुस्थानसरकार सालोसाल प्रांतिक सरकारांचा खर्च ठरवून देतें, व कारणपरत्वें नैमित्तिक खर्च भागविण्याकरितां त्यांना स्वतंत्र रकमा देणगीदाखल देण्यांत येतात. मोठ्या पगाराचा कायमचा नोकर एखादा दुसराहि जास्त ठेवावयाचा असला तरी मुंबईसरकारास स्टेट–सेक्रेटरीसाहेबांची मंजुरी मागावी लागते; व ही मंजुरी मिळणें जरी फारसें कठीण नसलें तरी, मंजुरीचा विधि यथासांग व्हावा लागतो. परंतु त्यांचे हे सर्व बंध–प्रतिबंध आपापल्यांतले असून जमाखर्चावरील सत्ता वरिष्ठ व कनिष्ठ सरकारांच्या दरम्यान कमजास्त प्रमाणानें वांटली गेलेली आहे इतकेंच काय तें. ज्या प्रजेपासून करांच्या रूपानें हे शेंकडों कोट रुपये वसूल केले जातात तिला या सर्व व्यवहारांत किती सत्ता आहे, असें विचारलें असतां भोपळ्यायेवढें पूज्य, असेंच उत्तर द्यावें लागेल! १८९२ पर्यंत जमाखर्चांच्या पत्रकावर कौन्सिलांतील सभासदांस नुसती टीकाहि करितां येत नव्हती हें मागें सांगितलेंच आहे. १८९२ पासून पुढें आजपर्यंत सभासदांस या पत्रकांवर फक्त टीकेखेरीज कांहीं करितां येत नव्हतें. यंदाचे सालापासून स्थानिक व वरिष्ठ या दोनही कौन्सिलांत या पत्रकाचा विचार चार पायऱ्यांनीं करण्यांत येणार आहे. पहिली पायरी अशी कीं, सरकारी फडणीस हें पत्रक कौन्सिलापुढें सादर करील व त्याच्या छापील प्रति वांटून सभासदांस तो तें समजावून देईल. अर्थात् या वेळीं त्यावर वादविवाद होणेंच नाहीं. तें वाचून त्याचें मनन करण्यास सभासदांस थोडा बहुत वेळ लागणारच; व हा वेळ दिल्यानंतर दुसऱ्या पायरीस, स्थानिक कौन्सि-

सांतील सहा नेमलेले व सहा निवडलेले अशा बाराजणांच्या पोटकमिटीमध्यें आणि वरिष्ठ कौन्सिलांत सर्व सभासदांपुढें या पत्रकाचा खल व्हावयाचा आहे. स्थानिक कौन्सिलाच्या पोटकमिटीचें काम खाजगी रीतीनें, व वरिष्ठ कौन्सिलाचें काम जाहीर रीतीनें होईल. परंतु दोन्ही ठिकाणीं करपट्टी कमजास्त करण्याबद्दल वगैरेसंबंधानें वाटेल त्या सभासदांस कांहीं विशिष्ट मर्यादित क्षेत्रांत राहून, सूचना–उपसूचना आणितां येतील. तिसऱ्या पायरीचे वेळीं दोन्ही कौन्सिलांत जाहीर रीतीनें या पत्रकाचा विचार होऊन जमाखर्चाचे आंकडे फडणीससाहेब वर्गीकरण करून मांडतील; व त्या प्रत्येक वर्गासंबंधानें जमा व खर्च वाढावा अगर कमी व्हावा याविषयीं सूचना–उपसूचना करितां येतील. चवथ्या पायरीस सर्व पत्रक 'बजेट' या नांवास पात्र होईल; व या बजेटाच्या विचाराचे वेळीं मात्र कोणाही सभासदास सूचना–उपसूचना करण्याची मोकळीक ठेविलेली नाहीं. मात्र या वेळीं वाटेल तर सरकारच्या एकंदर जमाखर्चाच्या पद्धतीवर व धोरणावर सभासदांस टीका करितां येईल. अशा रीतीनें स्थानिक कौन्सिलांतील निदान सहा बिनसरकारी सभासदांस, व वरिष्ठ कौन्सिलांतील प्रत्येक सभासदास, जमाखर्चासंबंधानें सूचना व उपसूचना आणण्याचा हक्क दोन दोन वेळां बजावतां येणार आहे. नवीन योजनेंतील आणखीही एक गुण सांगण्यासारखा आहे व तो हा कीं, आजपर्यंत स्थानिक कायदेकौन्सिलापुढें बजेट वादविवादास फार उशिरानें येत असे. जमाखर्चास प्रत्यक्ष सुरुवात एप्रिलच्या पहिल्या तारखेस व्हावयाची, परंतु त्याची मंजुरी मात्र आगस्टचे सुमारास म्हणजे जवळ जवळ पांच सहा महिन्यांनंतर घेतली जाई. अर्थात् इतक्या उशिरानें होणाऱ्या वादविवादांस 'रोग–चिकित्सा' या नांवापेक्षां 'प्रेत–चिकित्सा' हेंच नांव अधिक शोभे! नवीन व्यवस्थेंत ही मंजुरी एप्रिलचे आधीं म्हणजे नवीन फडणिशी साल सुरू होण्यापूर्वीं घ्यावी असें ठरलें आहे, व तें योग्यच आहे.

नवीन योजनेचे गुण हे असे आहेत. परंतु तिचे दोष काय आहेत हें पाहिलें म्हणजे लोकांस जमाखर्चावर खरी सत्ता कितपत मिळणार आहे हें तेव्हांच कळून येईल ! पहिला दोष असा कीं, वादविवाद अगर सूचना–उपसूचना याचें विषयक्षेत्र फार मर्यादित आहे. वरिष्ठ कौन्सिलांत जमेच्या बाजूस स्टांप, कस्टम ( जकात ), प्राप्तीवरील कर, न्यायकोर्टें, लष्कर, आरमार वगैरे बाबी वर्ज्य ठरविल्या असून, खर्चाचे बाजूस लष्कर, आरमार व त्यासंबंधीं सर्व

कामें, कायद्यानें ठरविलेले खर्च ( उ० सिव्हिल सर्वंटांचे पगार ), सरकारी व लष्करी आगगाड्या, पाट बंधाऱ्याचीं मोठीं कामें, पोलिटिकल व धार्मिक खात्याचा खर्च, वगैरे बाबी वर्ज्य म्हणून वगळल्या आहेत. आतां प्रजेच्या दृष्टीनें पाहतां करपट्टी व सरकारी खर्च होतां होईतों कमी होऊन लोकोपयोगी बाबींवरचा खर्च मात्र होतां होई तों वाढावा यांतच राष्ट्राचें हित आहे. परंतु वर्ज्य मानिलेल्या वरील बाबींची याद लक्षांत घेतली तर प्रजा-प्रतिनिधींस ढवळाढवळ करतां येण्यासारखा जमा व तसा खर्च फारच थोडा शिल्लक राहतो. हिंदुस्थानसरकारच्या शंभर कोट रुपयांपैकीं फार तर दहा पंधरा कोट रुपयेच असे उरतात कीं, त्यासंबंधानें खरी काटकसर सुचविण्याची मोकळीक राहील. प्रांतिक सरकारच्या जमाखर्चांच्या पत्रकांतूनही अशाच रीतीनें ढोबळ बाबी वगळल्या गेल्या आहेत. हातपाय पसरण्याची जागा थोडी असल्यामुळें अशा स्थितींत सभासद तरी काय सुचविणार ? ज्या वेळीं प्रजेचा हात व्यवस्थेंत बिलकुल नव्हता अशा एका शतकांत सरकारानें हवेतसे खेळ-खंडोबे केले, कारखाने उभारले व खर्च चालू केले, ते एकदम थोडेच आवरणार आहेत ! शिवाय काटकसरीकरितां सक्तीचा उपाय कोणी सभासद सुचवूं म्हणेल तर त्याजवर व्यवहारशून्यत्वाचा छाप मारून सरकार त्यास नालायकीच्या कोटींत काढण्यास तयार होणार ! एकट्या लष्करावर वीस पंचवीस कोट रुपये प्रतिवर्षीं खर्च होतात; पण सर्व बिन-सरकारी सभासद एकवटून त्यांनीं त्यांतली एक पै कमी करूं म्हटलें तरी तें हल्लींच्या या सुधारणेंतही अशक्य आहे. उलटपक्षीं लॉर्ड किचनेरसारख्या एका व्यक्तीला बसल्या बैठकीस व अवघ्या दहा पंधरा मिनिटांच्या वादविवादानें, एकदम तीन चार कोट रुपयांची रक्कम हिंदुस्थान-सरकाराकडून मंजूर करून घेतां येते, हें लॉर्ड कर्झन यांनींच मागें एके प्रसंगीं जगास सांगितलें आहे. अशा स्थितींत जमाखर्चांवर वादविवाद व सूचना-उपसूचना करणें हें काम चुनेगच्चीवर नखानें खरडीत बसण्यासारखें कष्टमय होऊन राहिल्यास नवल कोणतें ! बरें इतकें असूनही, या उरलेल्या दहा पंधरा कोटी रुपयांसंबंधानें तरी प्रजेस आपल्या मनास वाटेल तशी व्यवस्था करितां येणें शक्य आहे काय ? मुळींच नाहीं ! एक तर कौन्सिलांतील बहुमत नेहमीं सरकारच्याच बाजूचें राहणार ! व त्यांतूनही कधींकाळीं चुकूनमाकून लोकांच्या बाजूचें बहुमत झालेंच तर, त्या बहुमतानें पास झालेले

ठराव अमलांत आणणें अगर न आणणें हें सरकारनें सर्वस्वीं आपल्याच हातीं ठेवून घेतलें आहे ! आकाशपाताळ एक करून भगिरथ प्रयत्नानें लोकांच्या बाजूचें बहुमत होण्याची पर्वणी अवतरलीच तरी सरकारानें खुशाल आपल्या मनचें तें करावें, व कांहीं तरी ' कारणां ' चीं पानें लोकांच्या तोंडास पुसावीं म्हणजे झालें ! व अशा रीतीनें नवीन योजनेंतही, जमाखर्चांपैकीं एक पैची-देखील खरी वा अबाधित ' सत्ता ' लोकांस मिळालेली नाहीं, हें विधान जें प्रारंभीं आम्हीं केलें तें अक्षरशः खरें आहे हें दिसून येईल. आपण आपल्या घरीं बायकांस ' चोळीबांगडी ' करितां व मुलांस ' खाऊ ' करितां म्हणून एकादा रुपया देतों व त्यावर तरी त्यांची खरी सत्ता चालते. परंतु हिंदुस्थानच्या प्रजेकडून वसूल केलेल्या ७०।७५ कोट रुपयांपैकीं एक छदामही असा नाहीं कीं, सर्व तीस कोटी प्रजेनें मिळून मनांत आणलें असतां ते त्यावर खरी सत्ता चालवूं शकतील. जें काय होईल तें भिडेनें, मोहबतीनें, धर्मानें किंवा भिकेनें !

कायदेकौंसिलांची सुधारणा इष्ट असून ती हल्लीं थोडीबहुत करण्यांत आलेली आहे, ही गोष्ट जरी खरी आहे तरी, कौन्सिलाच्या अधिकारांपैकीं कायदेकानु करण्याच्या अधिकाराहून, जमाखर्चांवर सत्ता चालविण्याचा अधिकार हाच विशेष महत्त्वाचा असतो. किंबहुना परराष्ट्रांच्या इतिहासाकडे नजर दिली असतां हा पैशाचा अधिकार हातीं असल्यामुळेंच हळू हळू इतरही अधिकार प्रजापक्षास आपल्या हातीं आणण्यास मदत झालेली आहे. इंग्रजींत या सत्तेस Power of the Purse असें म्हणतात. व ' दाम करी काम ' ही म्हण सगळ्या देशांत सारखीच खरी ठरते. इंग्लंडमध्यें लोकांना पार्लमेंट सभेंतलें खरें वर्चस्व अलीकडे दीडशें वर्षांपासून मिळालेलें आहे. तथापि, करपट्टी व जमाखर्च यांजवरील त्यांची सत्ता तेराव्या शतकाच्या अखेरपासूनची आहे. यानंतरच्या काळांत मधून मधून प्रजेला प्रसंगविशेषीं दुर्बलता आली असतां राजांनीं ही सत्ता धाब्यावर बसवून आपला हात चालविला व वाटेल तसे कर वसूल केले, आणि पैसे खर्चले; परंतु एकंदरीनें असा काळ थोडा. चौदाव्या शतकापासून लॉर्ड लोकांस वगळून पैशाची सत्ता कॉमन्स सभेनें आपल्या एकटीच्या हातीं घेतली. पहिल्या चार्लस राजास जुलमी कर बसविल्याबद्दल देहांत प्रायश्चित्तच भोगावें लागलें; व अलीकडे दोनशें वर्षें तर कॉमन्स सभेनें

असें बस्तान बसविलें आहे कीं, दरवर्षीं पार्लमेंट भरवून तिजकडून करपट्टी मंजूर करून न घेतली तर सर्व पगार व तनखे थांबून राज्यकारभाराचा गाडा जागच्या जागीं मोडून पडेल. अद्यापि जर्मनी वगैरे राष्ट्रांत तेथील राजे सुलतानी अंमल गाजवितात ! पार्लमेंटनें करपट्टी व खर्च हट्टानें मंजूर करण्याचें नाकारलें तर आपल्या अखत्यारावर कर्जवाम करून राज्यांतले अठरा कारखाने चालू ठेवतात. परंतु त्यांसही लवकरच पार्लमेंटची समजूत कोणीकडून तरी काढावी लागते. नाक दाबलें म्हणजे तोंड उघडतें; व पैशाची सत्ता हातीं असली म्हणजे अधिकाऱ्याच्या नाकास प्रजेला चाप लावितां येतो ! या दृष्टीनें पाहतां आपण खऱ्या सत्तेचा सोपान चढण्यास अजून सुरुवातही केलेली नाहीं; म्हणून कायदेकौंसिलची सुधारणा झाली असतांहि 'पिशवीचें तोंड कोणाच्या हातांत राहणार ?' असा प्रश्न आपल्या डोळ्यांपुढें उभा राहतो; व या प्रश्नाच्या उत्तरावरच आपली भावी प्रगति सर्वस्वीं अवलंबून आहे.

---

## २३ आजचें कौन्सिल, उद्यांचें पार्लमेंट.

( तारीख १५ जानेवारी सन १९१० )

हिंदुस्थानांतील कायदेकौन्सिलें हीं आहेत अशींच आम्हांस पार्लमेंटच्या ठिकाणीं आहेत, असें अधिकाऱ्यांकडून जरी सांगण्यांत आलें नाहीं, तरी कित्येक भोळ्या प्रजाजनांकडून तसें मानण्यांत येतें यांत शंका नाहीं. 'अशा तऱ्हेचा गैरसमज होऊं नये व झाल्यास त्याच्या योगानें आपण बांधले जाणार नाहीं; मीं आपली कल्पनामय दृष्टि हवी तितकी ताणली तरी हिंदी प्रजेच्या पार्लमेंटचा मला कोठेंही मागमूस दिसत नाहीं; हिंदी प्रजा लोकसत्तात्मक राज्यपद्धतीचा आस्वाद घेण्यास स्वाभावतः मुळीं नालायखच आहे !' वगैरे गोष्टी लॉर्ड मोर्ले प्रभृति बडे अधिकारी वेळोवेळीं निक्षून सांगत आले आहेत. तथापि, आम्हांपैकीं कित्येक भाविक लोकांस असेंच वाटतें कीं, आपल्या मुलाची जशी आपण तोंडावर कधीं स्तुति करीत नाहीं, त्याच्या पाठीमागें त्याचे गुण घेतों, व स्तुति कानावर गेल्यानें तो शेफारून जाईल म्हणून तोंडावर होतांहोईतों त्याचा उणेपणाच काढतों; तशांतलाच कांहींसा हा प्रकार असावा ! आम्हीं जर या पद्धतीस नालायखच तर मग आम्हांस थोडा तरी निवडणुकीचा हक्क देण्यांत कां आला ? वरिष्ठ

कायदेकौन्सिलांत इतके तरी लोकनियुक्त प्रतिनिधी कां घेतात? प्रांतिक कौन्सिलांत सर्व बिनसरकारी सभासद एक होण्याचा जरी संभव नाहीं, तरी ते कधीं-काळीं यदृच्छेनें एक झालेच तर अधिकारी सभासदांवर त्यांचें बहुमत व्हावें अशी धोक्याची योजना तरी कां करण्यांत आली ? पैशाच्या पिशवीचें तोंड जर आमच्या हातीं सरकारांस ठेवावयाचें नाहीं तर लोकनियुक्त सभासद ज्यांत हक्कानें बसतात अशा कौन्सिलापुढें तें मंजुरीकरितां आणावेंच अशी सक्ती तरी कशाला ? विलायती पार्लमेंटाची घटना व तिच्या कामकाजाचे नियम यांच्या मंत्रांतील शब्दच जशाचे तसे जरी इकडे वापरलेले नाहींत, तरी त्यांतील अर्थ व उद्देश जमेस धरून त्यांबरहुकूम इकडील कायदेकौन्सिलांचे नियम तयार केलेले आहेत असें जें सूक्ष्म दृष्टीनें पाहाणारांस दिसून येतें असें म्हणतात त्यांतलें इंगित काय ? तात्पर्य, लॉर्ड मोर्ले कांहींही म्हणोत; आमचीं कायदेकौन्सिलें हीं आम्हांला पार्लमेंटादाखलच देण्यांत आलीं असलीं पाहिजेत; गुप्त दान देणारा महात्मा तोंडानें ' मीं तें दिलें नाहीं ' असेंच म्हणत असतो. लॉर्ड मोर्ले हेही महात्मे आहेत, तेव्हां ' तुम्ही आम्हांस पार्लमेंटाचे हक्क देत आहां काय? ' असें कोणीं विचारलें असतां ' कशाचें कशाचें ! ' असलें उत्तर ते मोठ्या लीनतेनें देत असतील झालें, असला युक्तिवाद भाविक जनांकडून होण्याचा संभव आहे. आणि खरा प्रेमळ राजा व खरी प्रेमळ प्रजा यांच्या जोडीस शोभे असा तो आहेही.

अशा प्रकारचे ' अस्तिपक्ष ' व ' नास्तिपक्ष ' असे हे दोन पक्ष या वादांत उपस्थित होतात. परंतु, वस्तुस्थिति पाहतां ती वरील युक्तिवादांतील कोणत्याहि एका पक्षास सर्वस्वीं धरून आहे असें म्हणतां येत नाहीं. दोघांचेंही म्हणणें अंशतः खरें आहे व अंशतः खोटें आहे. आमचीं कायदेकौन्सिलें म्हटलीं तर पार्लमेंटवजा आहेत; म्हटलीं तर नाहींत. तर मग, हें कोडें उकलावयाचें तरी कसें? या प्रश्नाचें उत्तर असें आहे कीं, आजचीं कायदेकौन्सिलें हीं केवळ ' बीज स्थितींतील ' पार्लमेंटें आहेत; ' परिणत ' स्थितींतील पार्लमेंटें नाहींत. मुलाचा जसा लहानपणींहि बापासारखा तोंडवळा दिसतो, परंतु त्याचें पितृसादृश्य या पलीकडे अनुभवास येऊं शकत नाहीं; त्याचप्रमाणें या कौन्सिलांकडे आज पाहणारास पार्लमेंटाचा चांगलाच भास होतो. परंतु त्यांच्या कृतीवरून तो फार वेळ टिकत नाहीं इतकेंच काय तें. प्रातःकाळीं क्षितिजावर उगवलेला रक्तमय गोल आपणांस जरी हवी तितकी ऊब देत नाहीं, तरी त्याला सूर्य असेंच म्हणावें लागतें.

दोन प्रहरचा तेवढा मात्र सूर्य व सकाळचा इतर कोणी असें म्हणतां येत नाहीं. त्याच अर्थानें आजच्या कायदेकौन्सिलांस हिंदी पार्लमेंट सभा हें नांव कोणीं दिलें असतां, तीं सर्वस्वीं दुबळीं आहेत असें धडधडीत दिसत असतांही, हा शब्दप्रयोग अगदींच चुकला असें कोणास म्हणतां येणार नाहीं. दाखले व उपमा यांचे शब्दप्रयोग सर्वस्वीं बोलणाराच्या मानसिक भावनेवरच अवलंबून असतात. जगांतील वस्तुमात्रांचें साधर्म्य व वैधर्म्य पाहणें या दोन्ही क्रिया मन करतें, एवढेंच नव्हे तर निरनिराळ्या परिस्थितींत त्या दोन्हीहि क्रिया एकच मनुष्याचें मन करूं शकतें. आजचीं कौन्सिलें पार्लमेंटप्रमाणें लोकहितवादक व्हावीं व अधिकाऱ्यांवरही त्यांनीं आपला पगडा बसवावा अशी ज्या हिंदी प्रजाजनांना महत्त्वाकांक्षा वाटत असेल, त्यांनीं त्यांना पार्लमेंट हें नांव खुशाल द्यावें! कारण त्या नांवांत जादू भरलेली आहे. तें नांव स्वराज्याचें द्योतक आहे. इंग्रजी पार्लमेंटेंही प्रारंभीं अनेक शतकें अशींच दुबळीं होतीं; परंतु सिंहावलोकन करून पाहणारांस असें दिसेल कीं, इंग्रजी लोकांच्या राष्ट्राचा इतिहास व त्यांच्या पार्लमेंटचा इतिहास हे शब्द जवळ जवळ समानार्थकच आहेत. त्यांची व्याप्ति समान आहे, व आजमित्तीस तर पार्लमेंट हाच इंग्लंडचा खरा राजा आहे. आमच्या कायदेकौन्सिलांचाहि इतिहास कालांतरानें असाच वैभवशाली व भूषणास्पद कां होणार नाहीं? उत्कर्षाचें पहिलें स्वरूप कोठेंहि महत्त्वाकांक्षा हेंच असतें, व ही महत्त्वाकांक्षा ज्याच्या मनांत असेल त्याला वर सांगितलेल्या 'अस्तिपक्षां' तील युक्तिवादाचा अंगीकार करून लॉर्ड मोर्ले यांना कुंठित करितां येईल, असें आम्हांस वाटतें. त्यानें स्टेट सेक्रेटरीसाहेबांस असा प्रश्न खुशाल टाकावा कीं, 'महाराज, आपण एका तोंडानें बीजभूत पार्लमेंटरी अधिकार हिंदी प्रजेस देतां व दुसऱ्या तोंडानें आम्ही हिंदुस्थानास पार्लमेंटरी संस्था देत नाहीं असें म्हणतां हें कसें शोभणार! बीज रोवणें तुमच्या हातीं होतें तें तर तुम्हीं रोवून चुकलां. आतां त्या बीजाच्या वाढीवर व त्यापासून होणाऱ्या वृक्षाच्या स्वरूपावर तुमची सत्ता राहिली नाहीं. माळ्यानें कोय जमिनींत घालणें किंवा न घालणें ही कदाचित् त्याच्या स्वेच्छेची गोष्ट असेल; परंतु ती घातल्यावर पाऊस पडण्यास तो प्रतिबंध करूं शकत नाहीं. वृक्ष उगवून वर आल्यावर त्यास आंब्याचे ऐवजीं जर तो कवंडळ म्हणूं लागेल तर त्यास कोणीहि वेडा म्हणतील; आणि तो वृक्ष आपल्या वयांत आल्यावर त्यास मोहोर येऊं नये, किंवा त्या मोहोराचीं पुढें

फळें होऊं नयेत अशी त्यानें कितीहि इच्छा केली तरी त्याच्या इच्छेस मग कोण विचारणार ! फळें येतील, पिकतील, खाणारा तीं खाऊन जाईल; आणि केवळ दुष्ट वासनेचें पाप मात्र माळ्याच्या पदरांत पडेल !' त्यानें मोर्लेप्रभृतींस आणखी असें विचारावें कीं, "महाराज आपल्याच राष्ट्राच्या इतिहासाकडे आपण थोडेसें मागें वळून पहा. आत्महितबुद्धीचा पडदा आपल्या नजरेसमोर आल्यानें भविष्यकाळीं केव्हांहि हिंदुस्थानास पार्लमेंट मिळेल असें मला दिसत नाहीं, हें म्हणणें शोभलें नाहीं तरी क्षम्य मानिलें जाईल. परंतु भूतकालासंबंधीं विशेषतः आपल्या स्वतःच्या राष्ट्राच्या गतकालीन इतिहासासंबंधीं तरी आपल्या डोळ्यांपुढें पडदा खचित असणार नाहीं. तो इतिहास जसा तुम्हांला तसाच आम्हांलाहि स्पष्ट दिसतो. करपुतळींतील देखाव्याप्रमाणें, इंग्लंडचा पूर्वेतिहास पहावयाला कांहीं दिव्य दृष्टि किंवा ईश्वरी प्रसाद खचित लागत नाहीं. त्या इतिहासाची पोथी तुमच्या सारख्या विद्वान् देशभक्तांनींच लिहिलेली आहे. व ती आमच्या सारखेच आर्त मुमुक्षू वाचतात. तुम्हींचना ती आमच्या हातीं दिलेली आहे ! मग सांगा तर ती ऐतिहासिक पोथी आजच्या तुमच्या पार्लमेंटच्याच आद्य चरित्राविषयीं काय सांगते ती ! महाराज, हजार वर्षांपूर्वी ज्या वेळीं सॅक्सन राजांच्या अंमलांत गांवच्या चावड्यांतून गांवचे चार शाहाणे लोक जमून 'पंचाइती' करीत बसत त्या वेळीं या पंचाइतींनाच पुढें पार्लमेंटचें स्वरूप येणार, असें कोणास स्वप्न तरी पडलें असेल काय ? जॉन राजाकडून त्याच्या सरदार लोकांनीं तरवारीच्या धाकानें स्वातंत्र्याची सनद मिळविली तरी पुढें चाळीस वर्षेपर्यंत पार्लमेंटचे सभासद राजाधिऱ्यांकडूनच 'नेमले' जात. 'निवडणुकीचें तत्त्व अद्यापि जन्मावयाचेंच होतें कीं नाहीं ? कर बसवावयाचे ते प्रजेच्या संमतीनें बसविले पाहिजेत असें तेराव्या शतकाच्या अखेरीस ठरलें असतांहि सतराव्या शतकापर्यंत राजे लोक वस्तुतः आपल्या अधिकारावर कर वसूल करीतच कीं नाहीं ? राजाकडे फक्त नामंजुरीचा तेवढाच हक्क असतांना वस्तुतः हल्लींच्या आमच्या कौन्सिलांतील गव्हर्नरसाहेबांच्या इच्छेप्रमाणें त्या काळच्या पार्लमेंटमध्यें केवळ राजाच्या इच्छेनेंच बहुतेक कायदे पास होत कीं नाहीं ! पार्लमेंट भरविणें व बरखास्त करणें ही राजाच्या अखत्यारींतील गोष्ट आहे, एवढ्या सबबीवर कित्येक वर्षेच्या वर्षें राजानें पार्लमेंट बोलवूं नये, अगर बोलावून लागलीच बरखास्त करावी, व आपला सुलतानी अंमल अबा-

धित चालवावा, असें घडत असें कीं नाहीं ! १८३२ पर्यंत पार्लमेंटची रचना हिंदुस्थानांतील कायदेकौन्सिलांच्या रचनेप्रमाणें सर्वस्वीं दोषास्पद होतीच कीं नाहीं! राजा, त्याचे सरदार व बडे धनिक लोक यांचे हस्तक, बगलबच्चे, स्तुतिपाठक, मिंधे, नोकर, स्नेही, ऋणानुबंधी, सगेसोयरे, यांनीं पार्लमेंटाची जेव्हां खोगीभरती होई, व सर्व जनता सत्ताशून्य असल्यामुळें मनगटें कडाकड चावीत आपल्या ठिकाणीं स्वस्थ बसे—अशा त्या काळीं पार्लमेंटाला पार्लमेंट हें नांव असून नसून फुकटच होतें कीं नाहीं ? प्रजेच्या या पडत्या काळीं पार्लमेंटरी संस्था असून तिची थट्टाच झाली कीं नाहीं ? त्या वेळचे लॉर्ड मोर्ले त्या काळच्या राजांस मंत्री या नात्यानें आजच्या सारखाच सल्ला देत होते, असें इतिहास सांगतो. मोर्लेसाहेबांच्या-प्रमाणेंच त्यांना आपली कल्पनामय दृष्टि ताणूनहि इंग्रज प्रजा पुढें सत्ताधीश होईल असें कधींहि दिसलें नाहीं." 'कानकाप्या' पहिल्या चार्लस राजाचे बकिंगहॅम, स्टॅफर्ड, लॉर्ड वगैरे मंत्र्यांपेक्षां लॉर्ड मोर्ले हे खचित अधिक उदारधी आहेत. परंतु त्यांना हिंदुस्थानच्या क्षितिजावर पार्लमेंट उगवण्याचीं चिन्हें दिसत नाहींत. याचें कारण कदाचित् असेंहि असूं शकेल कीं, नेलसनप्रमाणें आपली दुर्बीण त्यांनीं धडक्या डोळ्याला न लावतां स्वार्थ बुद्धीचा वडस वाढलेल्या आंधळ्या डोळ्याला लावून ते पहात असतील व म्हणून कौन्सिलें तीं कौन्सिलें व पार्लमेंट तें पार्लमेंट, असें त्यांस वाटत असेल ! परंतु वर सांगितल्याप्रमाणें आजच्या सुधारणेच्या कर्मांचे मात्र ते धनी होते; याच कौन्सिलांचीं उद्यां पार्लमेंटें व्हावयाचीं कीं नाहीं, या भावी परिणामाचे ते धनी नाहींत. याचे धनी हिंदी प्रजाजन हेच होत. इंग्लंडांतील प्रजेचें उदाहरण त्यांचे डोळ्यांपुढें आहे व त्यांना स्वराज्याचे हक्क मिळविण्याकरितां कायदेशीर चळवळ करावयाची तितक्या नेटानें केली असतां त्यांना लोकनियुक्त व सर्वसत्तापूर्ण असें पार्लमेंट मिळालेंच पाहिजे. नांवाचा मुद्दा गौण आहे; नांव देणें हें आज तुमच्या हातीं आहे. पार्लमेंटाच्या ठिकाणीं आज तुम्ही कौन्सिलें हा शब्द वापराल, मेंबराच्या जागीं कौन्सिलर म्हणाल, बरोच्या ऐवजीं म्युनिसिपालिट्या, व कौंटी न म्हणतां लोकलबोर्डें म्हणाल. आज नांवाचा वाद माजविणारे मोर्लेंहि निघून जातील व तसेंच राजकारणाचें भांडण भांडणाऱ्या आजच्या आमच्या पिढीसहि या विशिष्ट—स्वराज्य वृक्षाचें फळ चाखावयास मिळणार नाहीं हें आम्हीहि पण जाणून आहों. तथापि लोकसत्तेचा अक्रोडाचा वृक्ष यापूर्वीच रोवला

गेलेला आहे. तो अजून रोंवावयाचा उरलेला नाहीं. लोकसत्ताक पद्धतीचें बीज हिंदभूमीच्या क्षेत्रांत पडून चुकलें आहे. त्याचे गुण तुम्हांस बदलतां येणार नाहींत. बीजापासून सर्व देशांत एकाच स्वरूपाचा वृक्ष उद्भवतो. त्याला एकाच आकाराचीं पानें व एकाच रंगाचीं फुलें येतात, आणि फळाची गोडीहि जिभेला सर्वत्र सारखीच लागते. या लोकसत्तेच्या बीजाची स्वाभाविक वाढ होऊन त्याचा वृक्ष बनण्याचे मार्गांत जो आड येईल त्याला हटकण्याचें व जरूर तर प्रतिबंध करण्याचें काम मात्र हिंदी प्रजेकडे आहे. तिला जर आपला उत्कर्ष व्हावा अशी उमेद असेल, तर तिनें या कामीं अवश्य तो उद्योग व स्वार्थत्याग करण्यास तयार झालें पाहिजे !

राजानें प्रजाजनांला "तुम्ही आतां राज्यकारभाराचा भार वाहण्यास समर्थ झालां आहां, तर मी होऊन हा कारभार तुमच्या हातीं स्वेच्छेनें देतों, घ्या" असें म्हटल्याचें कधीं कोणीं पाहिलें नाहीं अगर ऐकलेंहि नाहीं. भोग नाशवंत असले तरी मनुष्याची भोगेच्छा सदा तरुण असते; तिला सहसा वार्धक्य येत नाहीं; व राज्याधिकाराच्या इच्छेला तर तें येत नाहींच नाहीं. तें येतें तर इतिहासाचें मुख सदा पवित्र व उज्ज्वलच राहिलें असतें, व राजपुत्रांनीं राज्याधिकाराच्या इच्छेनें आपल्या पित्यांचे डोळे केव्हां झांकतील व आपणांस राज्य केव्हां मिळेल असा जप करीत बसण्याची जी परंपरा इतिहासांत दिसून येते ती आली नसती. 'नहि साति कुलधुर्ये सूर्यवंश्य गृहाय' अशा तऱ्हेचें राजांचें सुयश फक्त पुराणांतरींच आढळून येतें. तसेच 'दुरितैरपि कर्तुमात्मसात् प्रयतंते नृपसूनवो हि यत्। तदुपस्थितमग्रहीदजः पितुराज्ञेति न भोगतृष्णया' असें कालिदासानें राजपुत्राचें जें वर्णन केलेलें आहे तेंहि प्रायः काव्यांतच आढळणार. त्यांतूनहि राजसत्ता जेव्हां एकट्या व्यक्तीच्या हातीं असते तेव्हां वृद्धपणीं राजास वैराग्य उत्पन्न होऊन, शांतिमार्ग पूर्ण असा वानप्रस्थाश्रम स्वीकारण्याची इच्छा त्यास पूर्व संचितानुरूप होणें एखादे वेळीं तरी शक्य असतें; परंतु एका राष्ट्रावरील राजसत्ता दुसऱ्या एका राष्ट्राचे हातीं जाते, तेव्हां अशा व्यक्तिविषयक वैराग्याला वाव मिळत नाहीं. अशा स्थितींत राज्यकर्त्यांची जी जी पिढी येणार ती ती तरुणच. हिंदुस्थानांत 'सिव्हिल सर्वंटा' च्या आज दहा बारा तरी पिढ्या झाल्या असतील; परंतु राज्याधिकार गाजविण्याच्या इच्छेच्या दृष्टीनें पाहिलें तर पहिल्या पिढीइतकाच या बाराव्या पिढीचा जोम ताजा आहे. किंबहुना असेंही म्हणतां

येईल, कीं या बाबतींत काळाची गति उलट आहे. राज्यतृष्णेस प्रारंभीं वार्धक्य व अखेरीस तारुण्य येत असतें. प्रारंभीं राज्य मिळवितांना मनाचा अनिश्चितपणा असून या राज्यापासून अमुक अमुकच फायदे मिळतील असा बरोबर अंदाज करितां येत नाहीं. परंतु जसजसें राज्य स्थिर होत जातें तसतसे त्यापासून मिळणारे फायदेहि वाढत जातात. एखादें राज्य मिळतांक्षणींच किंवा मिळाल्यावर लवकरच हातचें गेलें तर त्याचें दुःख तितकें वाटत नाहीं. परंतु स्थिरावलेला राज्याधिकार हातचा जाण्यापासून, हातातोंडाला आलेला मुलगा गेल्याप्रमाणें दुःख होतें. असें होणें स्वाभाविक आहे, व असला स्थिरावलेला राज्याधिकार आपण होऊन दवडण्याइतके परोपकारी लोक किंवा राष्ट्रें जगाच्या पाठीवर थोडींच सांपडणार. परंतु हातचा अधिकार न जावा ही जशी राजांची तशीच युवराजांप्रमाणें त्या अधिकारांत आपण उत्तरोत्तर अधिकाधिक अंशभागी व्हावें ही प्रजेची इच्छाहि स्वाभाविकच आहे; व या इच्छेस अनुसरूनच जगांतील राष्ट्रीय चळवळी व राष्ट्रीय घडामोडी होत असतात. याच इच्छेमुळें इराणांत इराणी प्रजेनें व तुर्कस्थानांत तुर्की लोकांनीं पार्लमेंट मिळविलें. हिंदी प्रजेला हें पार्लमेंट मिळण्यास या दोन राष्ट्रांपेक्षां कदाचित् थोडा अधिक काळ लागणार असेल; परंतु आजच्या स्थितीवरून, व १८६१ पासून १९१० पर्यंत झालेल्या कायदेकौन्सिलांच्या सुधारणेवरून पाहतां मोर्लेसाहेब कांहींहि म्हणोत, हिंदुस्थानासहि पार्लमेंटरी संस्था या नांवानें व या स्वरूपानें मिळालीच पाहिजे, असें जर कोणीं भविष्य केलें तर तें खोटें ठरण्याचा बिलकूल संभव नाहीं !

---

## २४ आमचें स्थानिक स्वराज्य

( ता. ६ माहे फेब्रुवारी सन १९१२ )

हिंदुस्थानांतील स्थानिक स्वराज्य हल्लीं संक्रमणस्थितींत आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. संक्रमणस्थितींत दोन गोष्टी अंतर्भूत असतात. एक अस्तित्व आणि दुसरें सुधारणा. जी संस्था दिवसेंदिवस नामशेष होण्याच्याच मार्गास लागलेली आहे, तिच्या स्थित्यंतरास आपण संक्रमण म्हणत नाहीं. अस्तित्व कायम राहाणें हें संक्रमणाचें पहिलें अंग होय; व दुसरें अंग म्हटलें

म्हणजे परिस्थित्यनुरूप होणारी सुधारणा. हिंदुस्थानांत स्थानिक स्वराज्यास सुरुवात होऊन सुमारें तीस वर्षें झालीं. या काळांत या संस्थेची प्रगति जरी व्हावी तितक्या झपाट्यानें झाली नाहीं, तरी ही संस्था यापुढें अबाधित राहणार याविषयीं आतां शंका वाटत नाहीं. तथापि स्थानिक स्वराज्याच्या इतिहासाचा हल्लीं नुकता कोठें प्रारंभ आहे. ही संस्था बाल्यावस्थेचा पहिला प्रांत ओलांडून दुसऱ्या प्रांतांत शिरली आहे. लॉर्ड रिपन यांच्या कारकीर्दींत १८८२–८३ च्या सालीं ही संस्था जन्मास आली; व रचना आणि अधिकार यांच्या दृष्टीनें पाहतां हल्लीं त्या संस्थेनें एक मजल ओलांडलेली आहे. मुंबई इलाख्यांत १८८४ सालीं स्थानिक स्वराज्याच्या जो कायदा अस्तित्वांत आला त्यापेक्षां म्युनिसिपालिट्यांच्या अधिकाराच्या दृष्टीनें १९०१ चा कायदा पुढें गेला आहे; व रचनेसंबंधानें १९०१ च्या कायद्यांत जरी विशेष प्रगति दिसत नाहीं तरी, ना. सर जॉर्ज क्लार्क यांनीं दोन वर्षांपूर्वीं काढलेल्या वटहुकुमानें ती उणीव भरून निघाली आहे. सरसकट म्युनिसिपालिटींतील ⅔ सभासद लोकनियुक्त असावे व म्युनिसिपालिट्यांचे अध्यक्षहि होतांहोईतों लोकनियुक्तच असावे, असें ठरल्यामुळें म्युनिसिपालिट्यांना हल्लीं थोडेंसें अधिक महत्त्व आलें आहे. तथापि, या सुधारणेनें अधिकार व रचना यांतील स्थानिक स्वराज्याची जरूर ती सर्व सुधारणा झाली असें म्हणतां येत नाहीं. दुसरी सुधारणा म्हणजे कामकाजाची सुधारणा होय. या दोन सुधारणा कशा होतील याविषयीं दोन शब्द लिहिण्याचें आम्हीं योजिलें आहे.

या सुधारणांचा विचार करण्यापूर्वी म्युनिसिपालिट्यांच्या संबंधानें सरकारी अधिकारी व लोक यांच्या मनांत जो एक प्रकारचा गैरसमज दिसून येतो, त्याचें थोडेंसें दिग्दर्शन करणें जरूर आहे. आजच्या घटकेस तरी सरकारी अधिकारी व साधारण लोकसमाज या दोघांनाहि स्थानिक स्वराज्य हें फारसें प्रिय नाहीं, अप्रियच आहे असें म्हटलें तरी चालेल. परंतु या अप्रियतेस दोघांचीं कारणें मात्र निरनिराळ्या प्रकारचीं आहेत. अधिकाऱ्यांना स्थानिक स्वराज्य अप्रिय होऊं लागण्याचें कारण असें दिसतें कीं, दिवसेंदिवस व्यक्तिशः त्यांचा हात त्यांतून निघत चालला आहे. म्युनिसिपालिट्यांचे अध्यक्ष खासगी लोक असावे असा नियम झाल्यामुळें, जिल्ह्याचे गांवीं कलेक्टर व इतर गांवीं अ. किंवा डे. कलेक्टर यांचा अध्यक्षपणा बहुतेक संपला; व मनुष्यस्वभाव असाच कांहीं चमत्कारिक

आहे कीं, ज्या गोष्टींत आपलें अंग नाहीं, अगर जींतून आपलें महत्त्व कमी झालें आहे, ती गोष्ट आपणास तृणप्राय तुच्छ वाटूं लागते. दोन तीन तालुक्यांवर राजाचा अधिकार गाजविणाऱ्या अ० कलेक्टराला एखाद्या यःकश्चित् म्युनिसिपालिटीचा अध्यक्ष होणें यांत कांहीं विशेष मान होता असें नाहीं, परंतु स्वतः अध्यक्षाच्या स्थानापासून भ्रष्ट झाल्यामुळें, या अधिकाऱ्यांना म्युनिसिपालिट्यांचा पूर्वीं जो एक प्रकारचा अभिमान वाटत होता तो वाटेनासा झाला आहे. खासगी अध्यक्ष नेमण्याची चर्चा जेव्हां सुरू झाली तेव्हां ती गोष्ट त्यांपैकीं बहुतेकांना आवडली नाहीं; परंतु नामदार सर जॉर्ज क्लार्क यांच्या नेटामुळें ती गोष्ट होणारच असें जेव्हां निश्चित झालें तेव्हां, त्यांपैकीं पुष्कळांनीं व्यक्तिशः कांहीं अंशीं एक प्रकारच्या दुष्ट बुद्धीनें आपल्या मनाचें समाधान करून घेतलें. त्यांनीं असा विचार केला कीं, सरकारी अधिकाऱ्यांचें नियंत्रित्व नाहींसें झाल्यामुळें लौकरच म्युनिसिपालिट्या या आपला नादानणा व्यक्त करून दाखवितील ! सरकारी अध्यक्षांचें शहाणपण म्युनिसिपालिट्यांच्या सल्लामसलतींतून निघून गेल्यामुळें, उकड हंडींत ज्याप्रमाणें कांदे–बटाटे आपल्या अंगच्या रसाच्या द्रवांत शिजतात, त्याप्रमाणें आपल्या अधिकाराच्या दुरुपयोगांत व अव्यवस्थेंत या कमिट्या शिजून निघतील; आणि अशा रीतीनें लोकनियुक्त अध्यक्ष हवे म्हणणारांचें तोंड आपोआप बंद होईल. हें विधान आम्ही आमच्या मनचें करीत आहों असें नाहीं, कित्येक मोठ्या अधिकाऱ्यांनीं असे उद्गार प्रत्यक्ष तोंडून काढल्याचें आमच्या कानावर आलें आहे. पण प्रत्येकाला माझ्याशिवाय जगाचें अडेल असें वाटत असतां, जगाचें तर खरोखर कोणाशिवायच अडत नाहीं हा अनुभव नित्य येणारा आहे; व तोच अनुभव स्थानिक स्वराज्यासंबंधानेंही लवकरच येईल असा आमचा भरंवसा आहे. मात्र लोकांनीं नविन मिळणाऱ्या या अधिकाराचा अंगीकार करण्यास उत्साहानें व आस्थेनें तयार झालें पाहिजे. तो अधिकार आपल्या हातून कसा निभावेल या भीतीनें, किंवा त्या अधिकारांत काय महत्त्व आहे अशा तुच्छ बुद्धीनें–कोणत्याहि कारणानें–त्यापासून पराङ्मुख होतां कामा नये !

साधारण लोकसमाजास स्थानिक स्वराज्य आज जें अप्रिय वाटतें, त्याला वरींच कारणें आहेत. एक तर कर बसविणें वगैरे अप्रिय गोष्टी म्युनिसिपालिट्यांना स्वतः कराव्या लागतात. म्युनिसिपालिट्या नवीनच असल्यामुळें, व त्यांच्या

कामकाजांत अद्यापि बरीच सुधारणा व्हावयाची असल्यामुळें, त्यांच्या अंगीं स्वाभाविक असेच कांहीं दोष आहेत. परंतु या दोषांकडे क्षमाशील दृष्टीनें पहाण्याची बुद्धि लोकांस कमी असते. म्युनिसिपालिटीचा कारभार ही बारभाईची सेती असल्यामुळें सरकारी कामकाजांत दिसून येणारा एकसूत्रीपणा म्युनिसिपालिट्यांच्या कामकाजांत असत नाहीं. लोकांच्या दृष्टीनें अपवादास्पद दिसणाऱ्या अशा थोड्याबहुत व्यक्तींना म्युनिसिपालिट्यांत शिरण्यास थोडाबहुत वाव मिळतो. सर्वांत मुख्य गोष्ट ही कीं, म्युनिसिपालिट्यांचा सर्वच कारभार अल्पप्रमाण असल्यामुळें, सरकारी राज्यकारभारासंबंधानें लोकांच्या मनावर जो एक अचाटपणाचा व महत्त्वाचा ग्रह झालेला असतो, तो म्युनिसिपालिट्यांसंबंधानें होऊं शकत नाहीं. सरकाराचें कोट्यवधि उत्पन्न, कोट्यावधि खर्च, व प्रचंड कामकाज हीं ज्यांच्या डोळ्यांत भरलेलीं आहेत, त्यांना म्युनिसिपालिट्या भिकार वाटतात. 'नांव मोठें पण दर्शन खोटें,' 'नांव सोनुबाई आणि हातीं कथलाचा वाळा' या सर्व म्हणींचें म्युनिसिपालिट्या हें एक उत्कृष्ट उदाहरण आहे असें लोकांस वाटतें, नांव पाहिलें तर स्वराज्य! पण प्रत्यक्ष पहावें तर त्यांत धड राजा नाहीं, धड प्रजा नाहीं, धड अधिकार नाहीं, धड पैसा नाहीं, धड स्वतंत्रता नाहीं, आणि धड यश नाहीं, असा अर्धवटपणाचा व दरिद्रीपणाचा तो सर्व मामला वाटतो. स्थानिक स्वराज्यांत 'स्वराज्य' आहे, पण तें 'खराट्याचें स्वराज्य,' तें केरपोतेऱ्याचें स्वराज्य, दिवाबत्तीचें स्वराज्य, असेंहि त्यास लोक विनोदानें किंवा तिरस्कारबुद्धीनें म्हणण्यास चुकत नाहींत.

परंतु स्थानिक स्वराज्याचें मर्म अगर रहस्य या दोहीं प्रकारच्या आक्षेपकांस नीट समजलें नाहीं, असें म्हणणें भाग येतें. आपली अध्यक्षाची जागा गेल्यामुळें नाखूष झालेल्या असि० कलेक्टरांनीं हें लक्षांत घेतलें पाहिजे कीं, स्थानिक स्वराज्याची संस्था निर्माण करण्यामध्यें सरकारचा हेतु आपल्या अधिकाऱ्यांसाठीं बहुमानाच्या नव्या जागा उत्पन्न करण्याचा नव्हता; तर राज्यकारभारापैकीं कांहीं थोड्या तरी गोष्टींचा कारभार लोकांना आपला आपण करितां यावा असा होता. जमाखर्चाच्या दृष्टीनें स्थानिक स्वराज्य ही संस्था एकंदर राज्यकारभाराच्या प्रमाणानें खंडीस रती इतकी भरेल. ज्यांना सर्व तालुक्याचें राज्य करितां येतें अशा मामलतदारांना खुद्द तालुक्याच्या गांवची साफसफाई ठेवतां येणार नाहीं, असें थोडेंच आहे. त्या थोरल्या कामांत हें धाकटें काम

सहज होऊन जाण्यासारखें असतें हें उघड आहे. पण म्युनिसिपालिट्यांचें काम अवघड किंवा जोखमीचें म्हणून सरकारानें तें बाजूला काढलें असें नाहीं. तर तें काम लोकांना आपलें आपण करण्यालाच अधिक योग्य आहे, आणि शिवाय मोठ्या कारभाराचें काम शिकण्यास हा छोटा कारभार त्यांना उपयोगीं पडेल या हेतूनें तें काम वेगळें काढण्यांत आलें आहे. सन १८५० सालीं इलाख्यांतून 'लोकलफंड कमिट्यां' ची स्थापना झाली. तेव्हां त्या कमिट्या म्हणजे एक सरकारी खातेंच होतें. परंतु तेव्हांपासून सदर कमिट्यांचें कार्यक्षेत्र, त्यांची रचना व त्यांचे अधिकार या बाबतींत अधिक अधिक फरक पडून सुधारणा होत आहे; आणि सरकाराकडून व लोकांकडून त्यांस मिळणारा मान व त्यांचे हातून होणारें लोकहिताचें काम याच्या दृष्टीनें स्थानिक स्वराज्याच्या संस्थांचें उद्दिष्ट, किती उज्ज्वल होऊं शकतें, हें पश्चिम देशांतील संस्थांवरून कळून येण्यासारखें आहे. आपण हिंदुस्थानांत हल्लीं या दोन उच्च–नीच टोंकांच्या दरम्यान कोठें तरी आहों. १८८२ सालपर्यंत 'सरकारी खात्याची एक शाखा' हें जें स्थानिक कमिट्यांचें एक स्वरूप तें सोडून आपण पुढें आलों आहों; व खऱ्या स्वराज्याचें एक अंग या दृष्टीनें या कमिट्यांचें अंतिम स्वरूप कसें बनवितां येईल हें विलायतेंतील स्थानिक स्वराज्याच्या नमुन्यावरून इकडेहि आम्ही ठरवूं अशी महत्त्वाकांक्षा धरणें हें अगदीं स्वाभाविकच आहे. १८५० सालीं स्थानिक कमिट्या झाल्या तेव्हां त्यांजकडे रस्त्यांची सफाई–सुधराई, दिवाबत्ती व स्वच्छता एवढींच कामें होतीं. सन १८६२ सालीं याच कमिट्यांकडे दवाखाने, शाळा वगैरेंचें काम सोंपविण्यांत आलें. अशा रीतीनें कार्यमर्यादा थोडीशी वाढली तरी, स्थानिक कमिट्यांचें 'सरकारी खात्या' चें स्वरूप बदललें नव्हतें. पण सन १८७० सालीं लॉर्ड मेयो यांनीं अधिकार-विभागणीच्या कामास खरा प्रारंभ केला; व जीं स्थानिक कामें आजपर्यंत सरकारी स्थानिक कमिट्यांकडून होत होतीं तीं लोकांनीं आपलीं आपण करावीं असें ठरवून, १८६३ सालच्या म्युनिसिपल ॲक्टानें, सरकारास वाटेल तर निवडक शहरास या कमिट्यांवर लोकनियुक्त प्रतिनिधि नेमण्याचा अधिकार दिला. परंतु पुढें सुमारें दहा वर्षेपर्यंत निवडणुकीच्या या तत्त्वाचा प्रांतिक सरकाराकडून बिलकूल उपयोग करण्यांत आला नाहीं. लॉर्ड रिपन यांनीं १८८२ सालीं लॉर्ड मेयो यांच्या मार्गानें आणखी एक पाऊल पुढें टाकून प्रांतिक

सरकारांची चरचरीत कानउघाडणी केली ! व इकडे १८८४ च्या म्युसिसि-पल ॲक्टानें स्थानिक कमिट्यांचे अमुक इतके सभासद् तरी लोकनियुक्त असलेच पाहिजेत असें बंधन घातलें. शिवाय लॉर्ड रिपन यांनीं स्थानिक स्वराज्याचें खरें रहस्यहि आपल्या उज्वल ठरावांतून नमूद करून ठेविलें ! हिंदुस्थानांतील लोकांना पुढें कोणत्याहि काळीं कांहीं स्वतंत्र राजकीय अधि-कार म्हणून द्यावयाचा असेल तर त्याचा हा प्रारंभ आहे. ( The small beginning of independent political life). अधिकार व जबाबदारी दोन्ही लोकांच्याच अंगावर सोंपवून मुखत्यारीनें करण्याकरितां म्हणन कांहीं तरी काम त्यांजकडे प्रारंभीं दिल्याशिवाय महत्त्वाचीं अशीं राजकयि कामें त्यांना मुखत्यारीनें करितां कशीं येणार ! जगांत कोठेंहि झालें तरी स्थानिक स्व-राज्याचें मर्म हेंच आहे. हिंदुस्थानांतील स्थानिक स्वराज्याचें कार्यक्षेत्र व महत्त्व अद्यापि असावें तितकें नाहीं तें तसें व्हावें अशी मागणी करणें हा स्थानिकच काय पण राष्ट्रीय चळवळीचाहि विषय होऊं शकतो. पण अशा तऱ्हेची मागणी करण्यास व तशा प्रकारच्या चळवळीस तेज येऊन ती यशस्वी होण्यास स्थानिक स्वराज्य हा सर्वस्वीं लोकांचा विषय आहे, त्यांत आम्ही पडूं, त्यांतील काम यशस्वी करून दाखवूं, व तात्त्विक दृष्ट्या स्वतंत्र राजकीय अधिकाराचा प्रांत म्हणून जो आमच्या स्वाधीन केला जाईल त्यांत आस्थेनें, अक्कलहुषारीनें व प्रामाणिकपणानें काम करून आमच्या कामांत सरकारास बोटही घालण्यास जागा देणार नाहीं, आणि तेवढ्या अधिकार–प्रांतापुरतें तरी, खरोखरच स्वातंत्र्य गाजवूं, अशी ओजस्वी भावना स्थानिक स्वराज्याच्या बाबतींत लोकांची असली पाहिजे. स्थानिक स्वराज्य तर हवें, पण आपण मात्र त्या बारभाईंच्या खेतींत पडणार नाहीं, असें म्हणणाऱ्या अंगचोर लोकांस वरिष्ठ प्रकारचे स्वतंत्र राजकीय अधिकार मिळणार कसे ? व ते मागण्याचा त्यांस हक्क तरी कसा पोंचणार ! राजकीय पटावर सरकारासमोर स्वराज्याचा डाव जिंकण्याच्या ईर्षेनें बसलेल्या प्रजेनें आपल्या मोहोऱ्याच्या माऱ्यानें अधिकाराचीं निरनिराळीं घरें नुसतीं मोकळीं टाकण्यास भाग पाडूं म्हटलें तर चालावयाचें नाहीं. मोह-ऱ्याच्या माऱ्यांत घर मोकळें ठेवण्यापेक्षां त्या घरांत आपलें मोहोरेंच कायम बसविल्यानें हें घर तर हस्तगत होतेंच, पण ज्या त्या मोहोऱ्याच्या मगदुराप्रमाणें त्याच्या आसपास प्रतिपक्षाच्या पटांतील दुसरीं आणखी घरेंहि माऱ्याच्या टापूंत

येतात. कित्येक लोकांच्या मतें सरकारनें स्थानिक स्वराज्य निर्माण केलें तें करपट्टी वसूल करण्याचें काम अप्रिय असल्यामुळें तें लोकांकडूनच परस्पर झालेलें बरें, अशा हेतूनें केलेलें आहे. पण या आक्षेपकांस हें समजत नाहीं कीं कोणताही कर म्हणून वसूल करावयाचें काम अप्रिय असलें तरी, हिंदुस्थान सरकार जें आज शेंकडों कोटी रुपये सालिना प्रत्यक्ष अगर अप्रत्यक्ष कराच्या रूपानें वसूल करून खर्च करितें—अर्थात् एवढी प्रचंड रक्कम वसूल करण्याची अप्रियता सोसतें—त्याला स्थानिक कमिट्यांचे थोडे बहुत लक्ष रुपये कर वसूल करण्याची अप्रियता न सोसावयास काय झालें ? राज्यकारभार म्हणजेच सर्व एकप्रकारें अप्रियतेचा मामला ! असें जर आहे तर स्थानिक करपट्टी लोकांवर सोंपवून सरकारची अप्रियता कितीशी वांचणार ? दुर्यामें खसखस ! तात्पर्य, स्थानिक स्वराज्याचें महत्त्व व अधिकार भरपूर नाहींत ते वाढवा हें म्हणणें निराळें; व स्थानिक स्वराज्य म्हणजे एक कांहीं तरी सोंग किंवा सरकारच्या कपटपटुत्वाचा एक मासला आहे आणि लोकांनीं तें तुच्छच मानलें पाहिजे हें म्हणणें निराळें ! स्थानिक स्वराज्याहून आमच्या राष्ट्राला पुष्कळ उच्चतर महत्त्वाकांक्षा असावी व ती आहेहि. परंतु ही मोठी महत्त्वाकांक्षा बाळगणाऱ्या मनांत स्थानिक स्वराज्याबद्दलच्या प्रेमास व आदरबुद्धीस मुळींच वाव मिळणें शक्य नाहीं ही गोष्ट खोटी. असें म्हणणारे लोक स्वतःचा बुद्धिभ्रम व्यक्त करतातच; परंतु ते दुसऱ्याचाही विनाकारण बुद्धिभ्रम करितात, असें म्हटल्याशिवाय गत्यंतर नाहीं.

— २ —

( तारीख २० फेब्रुआरी सन १९१२ )

एकंदर राज्यकारभाराच्या मानानें स्थानिक स्वराज्याचा कारभार लहान खरा. पण त्याचेंही म्हणून एक प्रकारचें महत्त्व आहे हें विसरतां येत नाहीं. राजकीय सुधारणावाद्यानें आपलें अत्यंत श्रेष्ठ ध्येय मनांत धरून स्वराज्य मागितलें तरी, स्थानिक स्वराज्य हा त्यांतलाच एक भाग असणार यांत शंका नाहीं. स्वराज्याच्या कल्पनेचा किंवा मागणीचा केव्हांही असा अर्थ नाहीं कीं, हिंदी लोकांस स्वराज्य मिळालें म्हणजे त्यांच्या शहरांच्या सफाईचीं सुधराईचीं कामें कोणी परके येऊन करतील. उद्यां तुम्ही संपन्न झालां व स्वराज्याचीं सूत्रें तुमच्या हातीं आलीं म्हणजे, कित्येक श्रीमान् लोक ज्या-

प्रमाणें आपल्या गाड्या हांकण्यास युरोपियन कोचमन ठेवतात त्याप्रमाणें, तुमच्च्या स्थानिक स्वराज्याचीं कामें करण्यास फार तर मोठमोठे युरोपियन नोकर ठेवून त्यांजकडून तुम्हीं तीं कामें घ्याल. परंतु तीं कामें झालीं अगर न झालीं याविषयीं देखरेख करण्याची जबाबदारी सर्व तुमचीच राहील. गरीब मनुष्य आपल्या घरचा केर आपल्या हातानें काढतो; व श्रीमंताच्या घरीं केर काढण्यास नोकर असतात. पण गरीबाप्रमाणें श्रीमंताच्याही घरचा केर 'निघावा' लागतो; व तो निघालेला नसला तर त्याबद्दल लोक नांवें ठेवतील तीं नोकराला न ठेवतां यजमानालाच ठेवतील! स्वतंत्र देशांत झालें तरी स्थानिक स्वराज्याचें काम ज्या त्या गांवचे लोकच करतात, कोणी परके करीत नाहींत; व हिंदुस्थानांत–स्वराज्याचे श्रेष्ठ अधिकार नसणाऱ्या हिंदुस्थानांतही–गांवचीं कामें गांवानेंच केलीं पाहिजेत हें उघड आहे. लोकांनीं हीं कामें अंगाबाहेर टाकलीं तर तीं पडून राहतील असें नाहीं; कारण तीं झालींच पाहिजेत; आणि तुम्हीं न केलीं तर सरकार तीं आपल्या अधिकारी नोकरांकडून, अगर तुमच्च्यांतलेच दुसरे कोणी लोक आपल्या सत्तेनें नेमून त्यांजकडून, आपल्या अधिकाऱ्यांच्या नजरेखालीं करून घेईल. पण मग गांवच्या लोकांस त्यांत भूषण तें काय राहिलें! हल्लीं अहमदाबादच्या लोकांस अपात्र ठरवून सरकारानें अमदाबादचेच कांहीं निवडक गृहस्थ म्युनिसिपालिटीवर नेमिले असून त्यांच्या हातून म्युनिसिपालिटीचें काम होत आहे, व हल्लीं तें बरें होत आहे असें गव्हर्नरसाहेबांनीं परवां बोलूनही दाखविलें. पण अहमदाबाद शहरचा नागरिकांच्या–एकंदर जनतेच्या–दृष्टीनें यांत भूषणास्पद असा कोणता भाग आहे? सरकारनें आमच्च्यांतून निवडून नेमलेल्या माणसांस काम करतां येतें पण तींच आमच्च्यांतलीं माणसें आम्हींच निवडून दिलीं तर त्यांच्या हातून मात्र तें होत नाहीं, यांत स्वाभिमानपोषक असें तत्त्व कोणतें आहे? निवड करणारे लोक तरी आपलें कर्तव्य नीट करीत नाहींत; किंवा लोकप्रतिनिधींना लोकांच्या दाबाखालीं व धाकाखालीं काम करितां येत नसून, वर दाब ठेवणारा व धाक दाखविणारा अधिकारी युरोपियन असेल तर मात्र त्यांच्या हातून काम वठतें, असाच त्याचा अर्थ होत नाहीं काय?

"स्थानिक स्वराज्याचें काम अशा रीतीनें प्राप्त व अनिवार्य आहे; व तें झालेंच पाहिजे. पण आम्ही मागतों तें जोंपर्यंत आम्हांस मिळत नाहीं, तोंपर्यंत

हें तरी करा कशाला ? जोंपर्यंत आम्हांस केवळ ताटाखालच्या मांजराप्रमाणें ठेवून तुपाचे गोळे सरकार व परकी लोक खाणार तोंपर्यंत नुसतीं ताटाखालचीं शितें वेंचून आम्हांस फायदा किंवा भूषण कोणतें ? आम्हीं स्थानिक स्वराज्याचीं शितें सावडण्याच्या भरीस न पडतां जो तुपाचे गोळे खाणार त्यालाच सावडायला तीं कां ठेवूं नये ? त्यांत अप्रियता असेल तर ती सरकारच्या बोडक्यावर बसविणें ही शिक्षा त्यांना योग्य अशीच आहे. बरें, स्थानिक स्वराज्य नीट करून दाखवून लोकप्रियता मिळण्यासारखी असली तरी ती ते खुशाल घेवोत ! सर्व मोठे अधिकार नेहमीं आपल्या हातीं बळकावून बसण्यानें सरकार जी राष्ट्रीय अप्रियता संपादन करितें ती या थोड्याशा लोकप्रियतेस ठीक भंजन आहे. आम्हांस तें कामहि नको, ती प्रियता नको, व ती अप्रियताहि नको. जोंपर्यंत खरे स्वराज्याचे अधिकार मिळत नाहींत तोंपर्यंत स्थानिक स्वराज्याचे अधिकार मिळून काय व न मिळून काय सारखेंच ! बरें, जेव्हां ते अधिकार मिळतील तेव्हां हेहि त्यांजबरोबरच आपोआप येतील; व मग ते जसे नीट करण्यास आम्ही पात्र ठरूं तसे हेहि बजावण्यास आम्ही पात्र ठरूंच ठरूं. तोंपर्यंत आम्हांस त्या कामांत मुळीं पडावयाचेंच नाहीं. सरकार जाणें व तें स्थानिक स्वराज्य जाणें!" अशा तऱ्हेचा युक्तिवादहि दुसऱ्या बाजूनें करतां येण्याजोगा आहे. सरकाराशीं वाद घालीत घालीत जन्मचे जन्म जाऊन फलनिष्पत्ति कांहीं होत नाहीं, पालथ्या घागरीवर पाणी पडल्यासारखेंच तें होतें; व त्यामुळें सरकाराशीं स्थानिक स्वराज्याच्या कामांत जेवढें साहचर्य व सहकारित्व येतें तेवढेंहि दुःसह वाटून मनुष्य निराशेनें वैतागून बोलूं लागला म्हणजे त्याला शोभेल अशाच प्रकारचा हा युक्तिवाद आहे यांत शंका नाहीं. पण अशा युक्तिवादानें स्थानिक स्वराज्याचें काम अंगाबाहेर टाकणारीं माणसें राष्ट्रीय गुणांनींहि तशींच श्रेष्ठ व लोकोत्तर असावीं लागतात हें विसरतां कामा नये. वरील युक्तिवादांतील राग व वैराग्य हीं दोन्हींहि एकदम कबूल करावीं लागतात. पण, ज्यांना श्रेष्ठ व अंतिम राष्ट्रीय प्रश्नाशिवाय कांहीं सुचतच नाहीं, ज्यांचा अहर्निश व्यवसाय अशा प्रश्नासंबंधानेंच चालू आहे, ज्यांना जळीं स्थळीं काष्ठीं पाषाणीं 'राष्ट्र' च दिसतें अशा लोकांनाच कदाचित् वरील युक्तिवादांतील सबबीचा फायदा मिळाला तर मिळेल; व अशांनीं स्थानिक स्वराज्यासारख्या 'क्षुद्र' बाबींत लक्ष न घातलें तर त्यांचें एक वेळ कौतुकहि करावेंसें वाटेल. आकाशांतील तारकांचे

वेध घेणारा मनुष्य त्याचें लक्ष पायाखालच्या डबक्याकडे न गेल्यानें त्यांत पडला तर त्याचेंहि हंसें झाल्याशिवाय राहणार नाहीं. पण डबक्यांत पडल्याबद्दल लोकांनीं न हंसण्याची गय केलीच तर ती कदाचित् अशाच माणसाची एखादे वेळ होईल. कारण तो खगोलस्थ तारकांचे शोध तरी लावतो, व अशा रीतीनें समाजावर खरे उपकार तरी करतो. ज्याला आकाश–समुद्राच्या खोलीचा खरा ठाव लागला, त्यानें हवें तर एखाद्या सरोवराकडे पाहून तुच्छताबुद्धीनें हंसावें; पण ज्यांच्या अंगीं ती योग्यता नाहीं त्यांनीं सरोवरास तुच्छताबुद्धीनें हंसणें, हें सरोवराच्या काल्पनिक तुच्छतेपेक्षां त्यांच्या स्वतःच्या मूर्तिमंत क्षुद्रतेचेंच द्योतक अधिक होय यांत शंका नाहीं. मोठ्या स्वराज्याकरितां जन्म खर्चीं घालणाऱ्यांनीं स्थानिक स्वराज्याकडे पाहून नाक मुरडावें. तें त्यांना शोभेल. पण ज्यांच्या जिव्हेच्या वळवळीपेक्षां अधिक मौल्यवान असें कांहींच स्वराज्याच्या पायीं खर्चीं पडत नाहीं, ज्यांना स्वराज्याच्या कल्पनेइतकाच स्वतःचा देह तुळतुळीत ठेवण्याची हौस असते, त्यांनीं स्थानिक स्वराज्याची अवहेलना करण्यांत सारासार विचारशून्यतेच्या अपकीर्तीपेक्षां कांहींएक अधिक मिळविलें जसें म्हणतां येत नाहीं. मॅझिनी, डॉ. सन्यत्सेन–ज्यांनीं स्वराज्याच्या वेडांत देह किंवा व्यवहार कांहींच मानला नाहीं–अशा लोकांनीं स्थानिक स्वराज्याकडे दुर्लक्ष केल्यास तें त्यांस माफ होईल. पण ज्यांचा सारा जन्म दुसऱ्याची नौकरी करण्यांत, व्याजबट्टा करून पैसे कमाविण्यांत, किंवा वाङ्मयात्मक धंदा करून स्वार्थबुद्धीनें सोन्याच्या नाण्यांच्या चवडी बांधून ठेवण्यांत गेला, त्यांनीं मोठ्या स्वराज्याच्या भल्या मोठ्या गोष्टी सांगून स्थानिक स्वराज्यासारख्या लहान पण उपयुक्त गोष्टींकडे तिरस्कारबुद्धीनें स्वतः पहावें, अगर दुसऱ्यास पहावयास सांगावें हें आश्चर्य नव्हे काय ?

मोठ्या गोष्टी बोलून धाकट्या गोष्टींकडे दुर्लक्ष करण्यास सांगण्यानें ऐकणाराची कांहीं थोडा वेळ चूकभूल होते खरी; परंतु ती फार वेळ टिकूं शकत नाहीं. यास दुहेरी कारणें आहेत. एक असें कीं मोठ्या गोष्टी बोलणाऱ्या लहान मनुष्यास अहर्निश तेंच काम करितां येणें शक्य नसल्यानें व्यवहारांतल्या लहान गोष्टींची त्याची आवडानिवड लोकनिदर्शनास आल्याशिवाय राहत नाहीं. व्याकरण खाऊन पोट भरणें हें खरोखर शक्य असतें तरी, बल्लवाचार्यांनीं वाढलेलें पंचपक्वान्नांचें ताट मागें लोटून पाणिनीची 'अष्टाध्यायी' पुढें ओढणें हें प्रत्येक पंडिताच्या हातून घडलेंच असतें किंवा काय याविषयीं शंका आहे. काव्यरसानें तृषा भागत

नाहीं हें तर खरेंच; परंतु ती भागती तरी देखील शुद्ध गंगेचा तांब्या बाजूस सारून 'रसगंगाधरा' चे प्यालेच प्रत्येक पंडित प्याला असता असें व्यवहारावरून निर्विवादात्मक रीतीनें म्हणतां येत नाहीं. व्यवहारांतल्या लहानसान गोष्टीवर मोठ्या मनुष्याचें मोठेपण, सोनें कसोटीवर घांसावें त्याप्रमाणें, घासलें जातें. व या कसोटींत जें मोठेंपण कसास उतरतें तेंच मोठेपण खरें हें उघड आहे. मनुष्याचे गुण व अवगुण हे कामाच्या लहानमोठेपणावर अवलंबून असत नाहींत, तर मनाच्या लहानमोठेपणावर अवलंबून असतात. काम लहानमोठें असल्यास त्या गुणाचे बाह्य; दृश्य परिणाम लहानमोठे होतील हें सरळ आहे. पण गुणांची जात व किंमत तीच; ती बदलत नाहीं. जळत्या झोंपडींतून मुलास सुरक्षित बाहेर काढण्यासाठीं आंत शिरून आपले प्राण धोक्यांत घालणारा भिकारी, आणि परचक्रापासून प्रजेचा बचाव करण्याकरितां स्वतःचे प्राण व राज्यसुख यांजवर उदक सोडणारा सम्राट, या दोघांच्या कृतीच्या परिणामांत बाह्य, दृश्य व मोजमापतां येण्यासारखें अंतर पुष्कळच आहे. पण 'प्रेम' व 'स्वार्थत्याग' या गुणांच्या दृष्टीनें दोघांची किंमत सारखीच आहे. सराफकट्यावरचा तिमाजी नाईक बाजार उठल्यावर केर गोळा करून फार तर दहापांच कवड्या जुळवील; तेंच समाराधनेच्या उष्ट्या पत्रावळींचा लिलांव करणारा एकादा संस्थानिक आपल्या दक्षतेच्या कृत्यानें सहज शेंपन्नास रुपयेहि मिळवील. परंतु दोघांच्याहि अंगचे दुर्गुण वर्णन करावयाचे तर 'फाजील कृपणपणा' हा एकच शब्द त्यांस लावतां येतो व पुरतो. एखाद्या म्युनिसिपालिटीच्या कारभारांत लक्ष घालून एकादा मनुष्य फार तर हजारपांचशें रुपये वांचवून सार्वजनिक हित साधील; तेंच तो हिंदुस्थानसरकारचा फडणविस असेल तर त्याच दक्षतेनें व मितव्ययबुद्धीनें दहापांच लक्ष रुपयांची बचत करूं शकेल. आतां ज्याला म्युनिसिपल प्रेसिडेंट होतां येतें त्याला हिंदुस्थानचा फडणविस होतां येत नाहीं, हा हल्लींच्या सदोष व अपमानास्पद परिस्थितीचा एक परिणाम असेल. परंतु सार्वजनिक हित साधण्याच्या बुद्धीचा गुण ही तरी सर्वस्वीं स्वाधीनची गोष्ट आहे; व मनुष्याची किंमत होते ती त्याला पराधीन असणाऱ्या गोष्टींवरून लोक करीत नाहींत, तर त्याच्या स्वाधीन असणाऱ्या गोष्टींवरूनच करितात. मोठें स्वराज्य आपणास आज देत नाहींत ही सरकारची चूक असेल. पण लहान स्वराज्य हातीं असलेलें आपण अव्हेरतों ही आपली चूक होय. धाकटें स्वराज्य सोडल्यानें मोठें स्वराज्य मिळण्यासारखें

असेल, तर धाकटें खचित सोडावें. पण सरकारावर रागावून सोडण्यासारख्या इतर गोष्टी किती तरी आहेत! व त्या आपण कितपत सोडतों याचा मात्र मनाशीं प्रथम विचार झाला पाहिजे. बहिष्कार हें एक शस्त्र आहे; कोंडमारा झालेल्या निराश्रित स्थितींतिल मनुष्यास व राष्ट्रास बहिष्कार हें शस्त्र पुष्कळ वेळां चांगलेंच उपयोगी पडतें व त्याचा उपयोग करावाही. पण बहिष्कारशस्त्राचा सुद्धां तीन त्रिकाळ अष्टौप्रहर व बारा मास उपयोग करून चालेल कीं काय हाही एक प्रश्नच आहे. कारण साम-दाम, दंड, भेद हे उपाय सरकाराशीं चालणाऱ्या सनदशीर युद्धांत राष्ट्रानें निरनिराळ्या अनुपानानेंच योजावयाचे असतात; वंगभंग अस्तित्वांत असतां बंगालनें, व त्याच्या समर्थनार्थ इतर प्रांतांनीं, बहिष्कार उचलला होता; व तो कायदेशीर होता असें सर्वपक्षीय अशा कलकत्त्याच्या १९०६ सालच्या राष्ट्रीय सभेनें ठरविलेंहि होतें. तसेंच वंगभंगासारखा तीक्ष्ण राष्ट्रीय चळवळीचा प्रश्न उपस्थित झाला असतां फिरून बहिष्काराच्या कायदेशीर हत्याराचें अवलंबन हिन्दी राष्ट्र पुढें मागें पुन्हा करणार नाहीं हें तरी कोणीं सांगावें? पण आज वंगभंग रद्द झाला असतांहि, स्वराज्याचें आमचें गाऱ्हाणें अद्यापि शिल्लक राहिलें आहे या सबबीवर, राजेसाहेब हिंदुस्थानांत आले त्यांजवर बहिष्कार घालावा असें कोणाच्याही मनांत आलें नाहीं, व तसें कोणींहि प्रतिपादिलें नाहीं. वंगभंगाच्या चळवळीच्या वेळीं बंगालची इकडे जी स्थिति होती, तीच आज आयर्लंडांत होमरूलसंबंधानें आहे. व त्याचमुळें राजेसाहेबांच्या राज्यारोहणाच्या वेळीं आयरिश नॅशनॅलिस्ट लोकांनीं आम्हीं या सुखसोहळ्यांत सामील होऊं शकत नाहीं असा ठराव जाहीर केला होता. पण ७० वर्षांपूर्वीं रोमन क्याथोलिक इमॅन्सिपेशन–बिल नुकतेंच पास झालें त्या वेळीं, होमरूलचें गाऱ्हाणें आजच्या इतकेंच तीक्ष्ण असतां–किंबहुना जुनी पूर्ण सत्ताधारी स्वतंत्र पार्लमेंट मोडून फक्त ३० वर्षें झालीं असल्यानें होमरूलपेक्षांही व्यापक अशा रिपीलच्या चळवळीचा तो काळ असतां–डॅनिएल ओकॉनेल यानें बहिष्काराचा उपदेश केला नव्हता. प्रसंगाच्या तीक्ष्णतेप्रमाणेंच शस्त्रास्त्रांचा उपयोग करावयाचा असतो. पण मोठें स्वराज्य मिळविण्याच्या हट्टानें बहिष्काराचा उपयोग आजहि करावयास पाहिजे असें कोणी म्हणेल तर, त्या बहिष्कारास स्थानिक स्वराज्यापेक्षां अधिक उपयुक्त व योग्य असे इतर अनेक विषय आहेत. त्यांचा नामनिर्देश केलाच पाहिजे असें नाहीं. पण एक गोष्ट निर्विवाद आहे ती ही कीं,

स्थानिक स्वराज्यावर बहिष्कार घालण्यापासून सरकारचें काडीइतकेंहि नुकसान नसून लोकांचें मात्र त्यापासून बरेंच नुकसान आहे.

दुसरें असें कीं, मोठें ध्येय डोळ्यांपुढें ठेवल्यानें तन्मयता पावलेल्या कांहीं थोड्या व्यक्तींना, व्यवहारास आवश्यक असणाऱ्या लहानसान दुय्यम गोष्टींकडे स्वतः लक्ष देण्यास फावत नसलें, तरी म्हणजे त्यांना स्वतः त्यांत पडावयाचें नसलें तरी, परहस्तें त्यांनीं त्यांची योग्य व्यवस्था लावून दिलीच पाहिजे. व्यवहारांत जातीनें पडण्याची त्यांना स्वतःला माफी असली तरी, व्यवहार चांगला न चालला तर त्याच्या दूषणाचें खापर त्यांच्याच डोक्यावर फुटणार हें उघड आहे. अर्थात् स्वतः स्थानिक स्वराज्याच्या खटाटोपांत त्यांस पडावयाचें नसलें, तरी त्यांनीं आपल्याला जबाबदार अशा दुय्यम लोकांचा त्यामध्यें प्रवेश करवून दिला पाहिजे व त्यांच्या कामावर देखरेख ठेवली पाहिजे. पण असें होण्यास झालें तरी स्थानिक स्वराज्याविषयीं त्यांनीं यथाप्रमाण आदरबुद्धि दाखविली पाहिजे. पहिल्या प्रतीचें काम करण्याची ज्याची योग्यता त्यानें पहिल्या प्रतीचेंच काम करावें; कारण तो स्वतः त्याच कामास अधिक लायख आहे. पण दुय्यम प्रतीचें काम अगर तें काम करणारा मनुष्य यासंबंधानें तुच्छबुद्धि दर्शविणें हें गैरमुत्सद्दीपणाचें लक्षण होय. " मी मोठा, मी मोठें काम करीन; तूं धाकटा किंवा हलका, सबब तूं धाकटें किंवा हलकें काम कर " असें म्हणणारांचा किंवा दर्शविणारांचाहि मोठेपणा खोटा आहे असें बेलाशक समजावें. मनुष्याचा दर्जा व कामाचें महत्त्व हें तिऱ्हाईतपणें पहाणाऱ्या जगानें ठरवावयाचें असतें, व जग तें ठरवितेंहि, पण लोकनायक—मग तो कितीहि मोठा असो—त्यानें नेहेमीं असेंच म्हटलें पाहिजे व वर्तनानें दर्शविलें पाहिजे कीं, सार्वजनिक काम करणारे हे सर्व बंधु असून शिवाय त्यांत लहान मोठा हा भेदभाव नाहीं. ते सर्व जुळे भाऊ आहेत. कामाची वांटणी झाली पाहिजे खरी, पण ती लहान—मोठेपणावर नाहीं, तर युक्ता—युक्तता व औचित्य— अनौचित्य याच तत्त्वावर व्हावयाची असते. ज्याला जें काम उत्तम करितां येईल तें त्याकडे द्यावयाचें हाच नियम. प्रत्येक सार्वजनिक काम महत्त्वाचें आहे, व तें काम जो उत्तम करील तोच मनुष्य उत्तम—मग काम लहान असो वा मोठें असो; त्याच्याशीं आपल्यास कांहीं करावयाचें नाहीं. स्थानिक स्वराज्याला ' उकीरडा ' असें एकदां म्हटल्यावर मग त्या कामांत तुम्हीं पडा असें

कोणास म्हणणें म्हणजे ती त्याची स्तुति नसून "तूं हलका व तुझ्याच लायकीचें तें काम" अशी निंदा करण्यासारखेंच आहे. अर्थात् एखाद्या पुढाऱ्यास स्थानिक स्वराज्याचें काम स्वतःस करावयाचें नसलें तरी, त्यानें त्या कामाबद्दल आपणांस तिरस्कार वाटतो असें न दर्शवितां उलट "काम महत्त्वाचें खरें व त्यांत पडण्याची माझी फार इच्छा आहे. पण दुसरें काम आगाऊच हातीं असल्यामुळें या कामांत पडण्यास मला वेळ मिळत नाहीं याबद्दल दिलगिरी वाटते" अशीच खरी भावना दर्शविली पाहिजे; व ती भावना खरी आहे असें त्याच्या वर्तनावरून दिसलेंहि पाहिजे. तरच त्याचे अनुयायी स्वाभिमानबुद्धीनें त्या कामांत पडतील, एरवीं पडणार नाहींत.

---

# २५ जिल्हाधिकारी व लोकमत

( तारीख ५ मार्च सन १९१२ )

गेल्या आठवड्यांत भरलेल्या वरिष्ठ कायदेकौन्सिलाच्या बैठकींत ना. गोखलें यांनीं जिल्हानिहाय सल्लागार कौन्सिलें स्थापण्याच्या इष्टतेसंबंधानें एक ठराव पुढें आणिला होता. परंतु तो १४ विरुद्ध ३२ इतक्या बहुमतानें नामंजूर करण्यांत आला. सरकारी सभासद् तर त्या ठरावास प्रतिकूल होतेच, पण बिनसरकारी सभासदांपैकींहि बरेच सभासद् विरुद्ध गेले. यामुळें ठराव जशाचा तसा मंजूर व्हावयाचें लांबच, पण कांहीं तडजोडहि निघाली नाहीं. दोन वर्षांपूर्वीं कौन्सिलांपुढें ठराव आणण्याचा हक्क मिळाल्यावर नाताळांतील मजुरांसंबंधानें ना. गोखले यांनीं पुढें आणलेला ठराव सर्वानुमतें मंजूर होऊन सरकारानें तो मान्य केला; व अशा रीतीनें ठरावांच्या हक्कांच्या बाबतींतल्या यशाचा पहिला वांटा ना. गोखले यांच्या पदरांत पडला. परंतु नाताळांतील मजुरांसंबंधानें सरकाराचें धोरण पूर्वींच ठरून गेलेलें असल्यामुळें, सरकारानें गोखल्यांचा ठराव मान्य करून लोकमतास मान दिला असें म्हणण्यापेक्षां वास्तविक सरकारच्या ठरून गेलेल्या धोरणाच्या प्रगटीभवनास कांहीं उद्दीपनमिश्र निमित्त कारण पाहिजे होतें. तें देऊन, गोखले यांनींच सरकारावर एक प्रकारचा उपकार केला असें म्हणण्यास हरकत नाहीं. पण ज्या बाबतींत सरकारचें धोरण गोखल्यांच्या मताशीं जुळत नाहीं त्या बाबतींत गोखले यांनीं आणलेल्या ठरावाची संभावना इतरांच्या ठरावाप्रमाणेंच होते! ना. गोखले हे सारासार विचारपूर्वक व कोण-

त्याहि मताचा अतिरेक किंवा अतिशयोक्ति होऊं न देतां आपलें काम करतात, ही गोष्ट खुद्द सरकारास कबूल आहे. त्यांच्या या मुत्सद्दी-गिरीच्या धोरणाबद्दल व व्यवहारचातुर्याबद्दल व्यक्तिशः अनेक प्रमुख सरकारी अधिकाऱ्यांनीं वेळोवेळीं त्यांची तारीफ केलेली आहे. भरून फुटूं लागण्याच्या बेतास आलेल्या सरकारी धोरणाच्या पाण्याच्या पुराला प्रत्यक्ष वाहूं लागण्यास मार्ग खोदून देण्याचें गोखले यांचें काम यशस्वी होतें, पण अशा वेळीं केवळ सरकाराचें मत गोखल्यांच्या मताशीं प्रायः तंतोतंत जुळतें म्हणून हा चमत्कार घडून येतो हें कोणी फारसें लक्षांत घेत नाहीं. उलट उभयतांच्या मतांत जेव्हां जेव्हां दिसण्यासारखा विरोध असतो तेव्हां तेव्हां गोखल्यांच्या ठरावास सरकारकडून व्हावा तसा कसून विरोधच होतो ही गोष्ट लक्षांत ठेवण्यासारखी आहे. शेरिडनच्या एका प्रसिद्ध प्रहसनांतील हेकेखोर व मानभावी चुलत्या-प्रमाणें आमच्या सरकारचा स्वभाव आहे. "माझ्या मताशीं जेव्हां तुझें मत सोळा आणे जुळतें असेल तेव्हां तूं मला आस्वलाप्रमाणें नाक धरून हवा तसा खुशाल वाटेल तिकडे ने—मी तुझ्या मागोमाग येईन" अशी या चुलत्यानें आपल्या आवडत्या पुतण्यास सदर परवानगी देऊन ठेवली होती. पण चुल-त्याच्या मताच्या कक्षेबाहेर पुतण्या यत्किंचित् गेला कीं, 'तुझें निसंतान होऊं दे' म्हणून शाप ठेवलेला!

जिल्हा—कौन्सिलासंबंधानें ना. गोखले यांनीं आणलेला ठराव वास्तविक अग-दींच अश्रुतपूर्व नव्हता. मोर्लेसाहेबांच्या सुधारणांसंबंधाच्या पहिल्या खलित्यांत या विवक्षित सुधारणेच्या कल्पनेची गर्भधारणा झाली होती, व अधिकारविभा-गणी—कमिशनच्या रिपोर्टांत या सुधारणेचा उल्लेख आहे. पण कायदेकौन्सिलें वाढ-वून जेऊं घातलेलें पक्वान्न व वगभंग रद्द करून त्यावर दिलेली 'मुखशुद्धि' हेंच खाद्य इतकें जड आहे कीं, त्यावर सुधारणेच्या अन्नांशाचा एक कणहि प्रजेच्या पोटांत अधिक गेल्यास तिला खास अजीर्ण होईल अशी सरकारानें आपल्या मनाशीं गांठ मारून ठेवलेली दिसते! "विक्रीते करिणि किमंकुशे विवादः"! हा प्रश्न विचारण्यास सोपा दिसतो. पण हत्ती देऊन टाकला तरी अंकुशाबद्दल खळ-खळ करून सवदा मोडण्यापर्यंत मजल आणणारीं माणसें जगांत नसतात असें नाहीं. प्रांतिक व वरिष्ठ कायदेकौन्सिलांत आम्हांस मिळालेला अधिकार हत्तीच्या देणगीइतका मौल्यवान् नाहीं हें आम्हीं जाणून आहों. पण जिल्हाकौन्सिलांची

देणगी मात्र अंकुशाच्या देणगीइतकी क्षुल्लक आहे; असें असतां ती देण्यास सरकार तयार नाहीं याचें मात्र आश्चर्य वाटतें! कारण कायदेकौन्सिलांत आम्हांस जो अधिकार मिळाला आहे त्याच्याच पोटांत जिल्हाकौन्सिलांत लोक जो अधिकार बजावूं शकतील त्याचा पूर्णपणें समावेश होतो. कायदेकौंसिलांत लोकपक्षाचें बहुमत नसलें तरी स्वरूपतः कांहीं तीं निव्वळ सल्लागार मंडळें नाहींत. पण जिल्हाकौन्सिलें प्रारंभीं निव्वळ 'सल्लागार' अशा स्वरूपाचीं असलीं तरी चालतील असें ना. गोखलें यांचें म्हणणें होतें. अर्थात् ना. गोखले यांनीं सुचविलेल्या सुधारणेंत अधिकाराची मजल किंवा मर्यादा पुढें जात होती असें नाहीं. पण जिल्हा-कौन्सिलांच्या योगानें, जिल्हाधिकारी व लोक यांच्या दरम्यान उभय पक्षांच्या विश्वासास पात्र व उभय पक्षांस सल्ला देणारें असें एक मंडळ तयार होऊन अधिकारी व प्रजा यांचे परस्परसंबंध अधिक निकट होतील, व्यर्थ होणारे गैरसमज टळतील आणि प्रजेला व अधिकाऱ्यांना सुख होईल हेंच गोखले यांचें म्हणणें होतें. हें सरकारास पटलें नाहीं ही दुर्दैवाची गोष्ट आहे!

कायदा व अम्मलबजावणी या दोन स्वतंत्र गोष्टी आहेत. म्हटलें तर कायदेकौन्सिलें जो कायदा करतील त्याचाच केवळ अम्मल जिल्हा-अधिकारी करणार. पण पुष्कळ कायद्यांची अशी रीत असते कीं, "विवक्षित गोष्टी सरकारानें करणें हें कायदेशीर आहे" एवढेंच ते ठरवितात; व त्या गोष्टी कशा कराव्या याविषयींचें तारतम्य सर्वस्वीं सरकारावर सोंपवून, त्याजविषयीं नियम करणें जरूर असलेंच तर ते करण्याची परवानगी सदर कायद्यानें सरकारास दिलेली असते. अर्थात्, कायद्यानें सरकाराकडे सोंपविलेलें तारतम्य सरकार जिल्हाधिकाऱ्यांकडे सोंपवितें. अधिकारविभागणी होण्याच्या पूर्वीं सरकारानें बजावण्याचे पुष्कळसे अधिकार अशा रीतीनें जिल्हाधिकाऱ्यांकडे आलेलेच होते; व अधिकार-विभागणीचा नवीन कायदा अमलांत आल्यावर उरले-सुरलेले इतर अधिकारहि जिल्हाधिकाऱ्यांच्या हातीं येतील. पण अशा रीतीनें जिल्हाधिकाऱ्यांची सत्ता वाढल्यानंतर त्यांच्यावर लोकमताचा दाब कसा रहावा हाहि प्रश्न सहजच उपस्थित होतो; व ना. गोखले यांनीं पुढें आणिलेला ठराव याच दृष्टीनें फार महत्त्वाचा आहे. त्यांच्या ठरावांत व भाषणांत 'लोकमताचा दाब' असेच शब्द जरी वापरण्यांत आलेले नाहींत तरी कांहीं अंशीं लोकनियुक्त सल्लागार मंडळी जिल्हानिहाय नेमण्यांत यावी या त्यांच्या मागणीचा अर्थ तोच

आहे. गव्हर्नर व गव्हर्नर जनरल यांच्या कारभारावर लोकमताचा दाब असणें या गोष्टीचा सरकारास कमीपणा वाटत नसावा; व म्हणूनच त्यांनीं कायद्याच्या अधिकारानें अनियंत्रित अशीं कायदेकौन्सिलें निर्माण केलीं व बिनसरकारी सभासदांच्या हक्काच्या व्याप्तीपुरते आपले हातपाय बांधून घेतले असें म्हणण्यास फारशी हरकत नाहीं. चिनांतील मांचू राजांनीं 'जनतेची जी इच्छा तीच ईश्वराची इच्छा' असे उद्गार परवां काढले, आणि युरोपांत प्रचलित व सर्वमान्य असलेल्या 'Vox populi Vox dei' या राजनीतिच्या सिद्धांतास स्वतंत्र प्रत्यंतर आणून दिलें. तशी स्थिति अजून हिंदुस्थानांत आली नाहीं ही गोष्ट खरी. हिंदुस्थानांतील जनसमाज हा प्रत्यक्ष महादेव म्हणजे परमेश्वर या अर्थानें त्याची पूजाअर्चा अद्यापि होऊं लागली नाहीं. तरी शेंदूर लावलेला दगड कां होईना परंतु कधींकाळीं स्वप्नांत येऊन भिवविणारा म्हसोबा म्हणून तरी त्याला चार फुलें वहावीं; किंवा मधून मधून बाधा करणारा तो पीर आहे म्हणून त्याला चार रेवड्या हाव्या येथपर्यंत तरी मजल आलेली आहे!

हिंदुस्थानांतील लोकमतास आज थोडेंसें तरी महत्त्व मिळालेलें आहे. त्याच्या अंगांतील दैविक कलेचा स्वल्पांश कां होईना सरकारानें कबूल केला आहे. ही सर्व चळवळरूपी कुचेष्टेनें वाढलेली प्रतिष्ठा असो अथवा सरकार नेहमीं ओरडून व बजावून सांगत असतें त्याप्रमाणें हा चळवळीचा मुळींच परिणाम नसून त्यांच्या मनांत स्वतंत्र रीतीनें उदय पावलेल्या राजकीय सद्भावनांचें तें फळ असो. लोकमताच्या दाबाला कशा तरी टांचा भुईला टेंकून उभें राहण्यास राज्यकारभाराच्या पद्धतींत हल्लीं स्थळ मिळालें आहे ही गोष्ट निर्विवाद होय. यामुळें प्रश्न इतकाच उरतो कीं, वरिष्ठ अधिकाऱ्यांच्या कारभारावरहि जर हा दाब हवा तर जिल्हाधिकाऱ्यांच्या काराभारावर तो कां असूं नये ? जिल्हानिहाय सल्लागार मंडळें नेमण्यांत आलीं तर तीं प्रथम सल्ला म्हणूनच देतील, हुकमत म्हणून चालवूं शकत नाहींत ही गोष्ट खरी. तथापि, सल्लागार मंडळाचें मत अमुक एक प्रकारचें असतां, त्याच्याविरुद्ध कारभार करितांना जिल्हाधिकाऱ्यांनाहि नीट विचार करावा लागेल. साधक-बाधक प्रमाणें अधिक तावूनसुलाखून घ्यावीं लागतील; व जें आपण करितों त्याचा जाब थोडा तरी द्यावा लागेल अशी जिल्हाधिकाऱ्यांच्या मनांत बुद्धि उत्पन्न होईल हा एक प्रकारचा फायदाच आहे. लोकमतानें दिलेला निर्णय बाजूस

ढकलून देऊन आपलीच स्वैर इच्छा चालविणें हें जबरदस्त काम जिल्हाधिकाऱ्यांना, सल्लागारमंडळें स्थापित झाल्यावरहि मोठेंसें कठिण आहे असें नाहीं. परंतु लोकमताचा धिःकार करणें हा एक अपराध आहे अशी जाणीव त्यांच्या मनांत उत्पन्न झाल्याशिवाय राहणें शक्य नाहीं; व असले एक दोन किंवा दहा पांच अपराध करणें जरी त्यांच्या खिसगणतींत नसलें तरी, निदान आपल्या शंभर अपराधांचा रांजण भरूं नये एवढी निदान खबरदारी बाळगण्याची सुबुद्धि त्यांस होईल यांत शंका नाहीं. कोणत्याहि बाबतींत सरकारचें व्यापक धोरण हुजूरहून ठरून येत असलें तरी, तें धोरण यशस्वी करणें अगर तें सदोष ठरविणें हें पुष्कळसें जिल्हाधिकाऱ्यांच्याच हातीं असतें. शिवाय जीं चांगलीं किंवा वाईट धोरणें हुजूरच्या डोक्यांत आलेलीं नसतात, तीं त्यांच्या डोक्यांत भरविणें हेंहि जिल्हाधिकाऱ्यांना बरेंच साध्य असतें. जिल्हाधिकारी हाच रयतेचा खरा राजा. गव्हर्नर काळा कीं गोरा हें फारच थोड्या लोकांस पहावयास सांपडतें. तो चांगला असल्यास फार तर सद्भावनेची जपमाळ ओढीत व मनानें प्रजेचें कल्याण चिंतीत 'गव्हर्नमेंट हौस' मध्यें बसेल. पण रयतेस सुख लागणें अगर पीडा होणें हें खरें जिल्हाधिकाऱ्यांच्याच हातीं आहे. अर्थात् जे चांगले असतील त्यांना रयतेस सुख देण्याच्या कामीं सल्लागार मंडळाचें सहाय्यच होईल, व जे कोत्या किंवा दुष्ट मनाचे असतील त्याजपासून रयतेस होणाऱ्या पीडेला थोडाबहुत अडथळा होणें हा अप्रत्यक्ष तरी फायदा होईल!

एक जिल्हा झाला तरी कांहीं लहानसान गोष्ट नव्हे. कारण, एक जिल्हा म्हणजे सरासरीनें दहा हजार चौरस मैल इतक्या विस्ताराचा प्रांत, दहा पंधरा लक्ष लोकसंख्या व पांचपंचवीस लक्ष रुपयांचा वसूल. यूरोप खंडांतील कित्येक 'स्वतंत्र राष्ट्रें' हिंदुस्थानांतील दोन चार जिल्ह्यांइतकींहि भरणार नाहींत! असा हा जिल्ह्यांचा सर्व बाजूंनीं विस्तार असतां एकटा एक कलेक्टर केवळ आपल्या मनानें राज्यकारभार करूं म्हणेल तर तो त्यास साधणार नाहीं व साधण्याइतका त्याचा आंवाका असला तरी त्यास लोकांच्या तर्फे अगदींच कोणी विचारता पुसता नाहीं अशी स्थिति असणें हें इष्ट नाहीं. जिल्ह्यांतील कांहीं किरकोळ कामें जिल्हाबोर्डें व म्युनिसिपालट्या यांजकडे सोंपवून दिलेलीं असतात. पण म्युनिसिपालिट्याचें काम कांहीं थोड्या गांवांपुरतें व केवळ स्थानिक हितसंबंधाचें असतें. जिल्हा-बोर्डास फारसें स्वातंत्र्य नाहीं हें तर झालेंच. शिक्षण,

आरोग्य, रस्त्यांची डागडुजी व धर्मशाळा वगैरे पुरताच त्यांचा कारभार मर्यादित असतो. पण सार्वजनिक हिताच्या व लाखों निरक्षर निःशब्द प्रजाजनांच्या सुखदुःखाच्या गोष्टी दुसऱ्या पुष्कळच आहेत. या रयतेस बिन-अधिकारी असा वाली कोणीच नाहीं ! जें काय कलेक्टर करील ती पूर्व दिशा अशी स्थिति हल्लीं आहे. शिवाय एखादा कलेक्टर सद्भावनाप्रेरित असला तरी त्याला प्रजेचें म्हणणें काय आहे हें बरोबर कळणें शक्य नसतें. जिल्हाधिकारी आठ महिने आपल्या राज्यांत दौरा करितात खरा, परंतु प्रत्यक्ष रयतेशीं बोलण्याचालण्यांत त्यांचा किती वेळ जात असेल कोणास ठाऊक ! त्यांना जिल्ह्यांतील देशी भाषा मुळींच येत नसते असें नाहीं. पण रयतेचें व त्यांचें त्या भाषेत अस्खलित संभाषण व्हावें इतका त्या भाषेचा त्यांना सराव असतो असें कोणासही म्हणतां यावयाचें नाहीं. फुरसत व भाषेचें ज्ञान हीं असलीं तरी, रयतेशीं मिळूनमिसळून बोलण्याची सर्वांसच सारखी हौस नसते. साहेबांना ही हौस असली तरी, ते आल्याचें टिपण ठेवून त्यांजकडे वर्दी पोहोंचवून ते प्रसन्नमुख असतील तेव्हां त्यांची गांठ घेणें, व गांठ पडली तरी रयतेस आपलें मनोगत त्यांना समजेल अशा सुबुद्ध रीतीनें समजावून देतां येणें—या सर्व गोष्टींचा मेळ पडणें म्हणजे तो एक कपिला षष्ठीचा योगच म्हणावयाचा ! एखाद्या बाबतींत रयतेनें जिल्हाधिकाऱ्याकडे दाद मागावयास जाणें म्हणजे कनिष्ठ अधिकाऱ्यांच्या कारभाराची कागाळी करण्याचें स्वरूप त्यांस आल्यावांचून सहसा रहात नाहीं ! अर्थात् कलेक्टरसाहेबांची गांठ वर्षांतून एक दिवस पडणार, तर कनिष्ठ अधिकाऱ्यांची गांठ बाकी तीनशें चौसष्ट दिवस ! तीनशें चौसष्ट दिवसांचें उट्टें एक दिवसांत काढून घेऊं म्हणणारा रयत धीट व धाडसी तर असलाच पाहिजे, पण धैर्याबरोबर सुदैवहि पदराच्या गांठीस बांधून त्यानें नेलें पाहिजे तरच तो त्याचा उद्योग साधणार. नाहीं तर त्याच्या धिटाईच्या प्रमाणानेंच त्याला वर्षभर हाल सोसण्याची पाळी येणार !

बरें, समाजांतील जाणत्या माणसाकडून रयतेनें आपली दाद जिल्हाधिकाऱ्याकडे नेऊन लावावी म्हटलें तर जाणता असून अधिकाऱ्यांस प्रिय असा मनुष्य त्यांना सहसा कसा मिळणार ? जो जाणता असतो तो प्रायः प्रिय नसतो. जो प्रिय असतो तो धीट असतोच असें नाहीं. धीट असला तरी क्वचित् स्वार्थ त्याच्या आड येणार. तात्पर्य, जाणता, धीट, निस्पृह असून शिवाय अधिकाऱ्यांस

प्रिय अशीं मनुष्यें दर जिल्ह्यांत किती निघतील ! अधिकारी लोकांकडे जाऊन भेटणें हें एक मोठें दिव्यच आहे असें पुष्कळांस वाटतें ! त्यांतून कोणी जाऊन भेटला तरी, सुशिक्षण हें त्याच्या आडवें येतें व त्याची गणना 'स्वाभाविक' पुढाऱ्यांत होत नाहीं. तो वकील असेल तर अधिकाऱ्यांच्या कपाळास हटकून आंठ्या पडावयाच्या ! आतां जिल्ह्याधिकाऱ्यांकडे कोणी भेटावयास जात नाहीं असें नाहीं. त्यांच्या उंबरठ्याचें साल निघावयाचें तें निघतेंच. परंतु त्यापासून सार्वजनिक हित मात्र थोडें होतें. कारण अधिकाऱ्यांकडे शिष्टसंभावितपणानें जाणाऱ्या पुष्कळ लोकांच्या बगलेंत स्वार्थाचें लहान मोठें पिल्लूं दडवून नेलेलें असतें; व तें तेथें ओरडून किंवा घाण करून त्यांना राग किंवा विषाद उत्पन्न केल्यावांचून रहात नाहीं ! कोणी अपत्यवत्सल बाप आपल्या मुलास नोकरी मागतो तर, कोणाची आत्मप्रीतिच पुत्रवत्सलतेहून अधिक प्रभावी असल्यामुळें तो स्वतःलाच एखादी पदवी किंवा बहुमानाची जागा मागतो ! अगदीं गेला बाजार सर्टिफिकेट किंवा शिफारसीचें पत्र तरी तो मागणारच. या कारणांमुळें स्पष्ट व सरळ बोलण्याचें धैर्य त्याला फारसें राहात नाहीं. अशा लोकांची खेप सर्वस्वीं फुकट जाऊं देण्याइतके मात्र अधिकारी वेडे नसतात, व त्यांना स्वतःस प्रत्यक्ष न मिळणारी अशी अनेकविध माहिती ते या लोकांकडून संभाषणांत काढून घेतात. हें संभाषण पुष्कळ वेळां एकतर्फीच असतें. कारण, अधिकारी या नात्यानें आपण वाटेल तितकेंच सांगावें व वाटेल तितकें सांगूं नये अशी मुभा त्यांना असते. पण खासगी लोकांनीं मात्र एखादी गोष्ट मागें ठेवणें किंवा अर्धवट बोलणें हें खऱ्या सार्वजनिक 'हितबुद्धीस' विसंगत आहे असें मानण्याचा प्रघात पडल्यामुळें, भेटीस जाणाऱ्या लोकांची स्थिति मात्र अडचणीची होते. अधिकाऱ्यांच्या तोंडून शब्द चुकून गेला तर त्यापासून अनिष्ट परिणाम होण्याची भीति नसते. पण भेटीस जाणाऱ्या मनुष्याच्या जिभेस हाड नसेल किंवा तिजवरील लगाम चुकून थोडा ढिला होईल तर त्याचा स्वतःचा किंवा हजर नसलेल्या दुसऱ्या कोणाचा तरी अधःपात प्रायः ठेवलेला ! आतां प्रेमळ व प्रांजळ अधिकारीच नाहीं व जाणता निस्पृह असा भेटीस जाणाराच नाहीं अशा एकांतिक प्रतिज्ञेचें हें विधान नव्हे. पण अधिकाऱ्यांना जाऊन भेटणाऱ्या शेंकडा नव्वद लोकांस तरी वरील वर्णन लागू पडेल अशी आमची प्रामाणिक-

पणाची समजूत आहे, व ही समजूत खरी अगर खोटी याचा अधिकाऱ्यांनींहि आपल्या मनाशीं प्रामाणिकपणेंच विचार करावा.

वर वर्णिलेल्या परिस्थितीमुळें रयतेचें गाऱ्हाणें व लोकांचें म्हणणें अधिकाऱ्यांपुढें मांडणें ही फार मुष्किलीची गोष्ट होते; पण सल्लागार मंडळासारखी संस्था निर्माण झाल्यास या सर्व अडचणी दूर होतील. अधिकारी व लोकनायक यांचा स्नेही असणें इष्ट नाहीं म्हणून ही योजना अमलांत यावयास पाहिजे असें नाहीं. तो स्नेह हवाच. किंबहुना हल्लीं आहे याहूनहि तो वाढता असावा असेंच आमचें म्हणणें आहे. परंतु राज्यकारभाराच्या कामीं योग्य सल्ला देणें घेणें ही गोष्ट खासगी स्नेहानें थोडीबहुत पार पडत असली तरी, त्या स्नेहास अधिकाराचें पाठबळहि हवें; तें असल्याशिवाय मात्र चालावयाचें नाहीं. चांगल्या माणसांत कर्तव्याची स्फूर्ति व जागृति या गोष्टी खाजगी स्नेहाला हार न जाणाऱ्या अशा असल्यामुळें, त्यांच्या हातून कार्यसिद्धीहि अधिक होते. स्नेहांत प्रेमळपणा जसा जास्त तशी भीडहि जास्त असूं शकते. पण अधिकाराच्या उघड्या मैदानांत सगळ्या जगाच्या नजरेखालीं परस्पर कर्तव्यबुद्धीची जी कुस्ती होते तिनें लढणारांस जबाबदारीचें ज्ञान व सर्व जनतेस राजकीय शिक्षण मिळतें हा विशेष फायदा आहे. ना. गोखले यांनीं सुचविलेल्या योजनेंत सल्लागारांची संख्या भरपूर, त्यांत लोकप्रतिनिधींचा शिरकाव, सल्लागारांचें काम व कामाची रीत यांचे नियम ठरलेले अशा गोष्टी असल्यामुळें, आज कायदेकौन्सिलांतून एकंदर प्रांत व एकंदर देश यांचीं कामें जशीं चालतात तशींच जिल्ह्यांचीं कामें चालूं लागतील व रयतेचें गाऱ्हाणें जगापुढें येण्यास रुंद मळलेला एक नवीन राजमार्ग निर्माण होईल, केवळ तात्त्विक दृष्टीनें पाहतां जिल्हाधिकाऱ्यांच्या कृत्यांवर सरकारकडे अपील संभवतें. पण त्याचा खरा उपयोग असा फार थोडा होतो. तात्पर्य, जिल्हानिहाय सल्लागार मंडळें स्थापित करणें हा खुद्द सरकारनें कबूल केलेल्या अधिकारविभागणीच्या तत्त्वाचाच फक्त दुतर्फी अंमल आहे, याहून जास्त कांहीं नाहीं; व यंदा जरी हा ठराव बहुमतानें फेंटाळण्यांत आला तरी तो आज फक्त जन्मास आला व त्याचें चरित्र अद्यापि दिसावयाचेंच आहे अशी आशा करणें वावगें होणार नाहीं.

---

## २६. निमसरकारी वर्तमानपत्रें.

( तारीख ९ मे सन १९११. )

निमसरकारी वर्तमानपत्रांसंबंधानें खुद्द वरिष्ठ कायदेकौन्सिलांतहि वादविवाद होऊन सरकारचें धोरण आतां ठरल्यासारखें झालें आहे, व थोड्याच दिवसांत दरप्रांतानिहाय निमसरकारी असें एक वर्तमानपत्र चालू होईल असें दिसतें. कृत्रिम राजनिष्ठा बनविण्याच्या जंगी अजबखान्यांत एवढ्याच चिजेची काय ती वाण होती. पण सुदैवानें मुंबईचे मि. गॉर्डन, कलकत्त्याचे रायबहादूर नरेंद्रनाथ सेन प्रभृति गृहस्थांनीं ती वाण भरून काढली आहे. कदाचित् मि. गॉर्डन व सेनबहादूर वगैरेंचा निमसरकारी वर्तमानपत्रें काढण्याचा हेतु एकच नसेल. उदाहरणार्थ, मि. गॉर्डन हे एक महत्त्वाकांक्षी व वाकबगार वर्तमानपत्रकर्ते आहेत. वर्तमानपत्रें चालविणें हा इतर धंद्यांप्रमाणें केवळ एक धंदा आहे; त्यांत मिळकतीला खरा मान—मतांना विशेष नाहीं—हें जें विलायती तत्त्व त्याचा पुरा अभ्यास करून ते हिंदुस्थानांत आले. टाइम्स ऑफ इंडिया पत्राच्या ऑफिसांतील रिपोर्टरीनें गॉर्डनसाहेबांच्या ऐहिक आत्म्याचें समाधान न झाल्यानें त्यांनीं सवती सुभेदारी स्थापण्याचा विचार केला. ॲडव्होकेट ऑफ इंडिया हें जें मूळचें एतद्देशीय लोकांच्या तर्फेनें चालणारें पत्र तें त्यांनीं विकत घेतलें; आपली संपादकी 'पगडी' फिरवून टाइम्स–गॅझेट वगैरे अँग्लो–इंडियन पत्रांशीं नेटिव्हांच्या बाजूनें वावदूकी करून साधतें का पाहिलें; पण आमच्या इकडील लोक पडले मठ्ठ डोक्याचे. लेखणीचा टांक वाटेल तसा उलटा सुलटा चालविणारा फर्डा इंग्रज लेखक आपल्या बाजूनें लिहिण्यास सुदैवानें लाभला असतां त्याला उदार आश्रयाचा मलिदा चारून कायमचा अंकित करण्याची अक्कल मुंबईच्या मुत्सद्दी मंडळींतील पुढाऱ्यांपैकीं एकाच्या तरी अंगीं असेल अशी साहेबमजकुरांस आशा होती. पण व्यर्थ. गार्डनसाहेब तरी किती वाट पहाणार ! झालें शेवटीं ते आपल्या स्वाभाविक वळणावर गेले व ॲडव्होकेट ऑफ इंडियाच्या नांवाप्रमाणें हिंदी लोकांची तरफदारी करण्याचें सोडून त्यांजवर आग पाखडण्यास त्यांनीं सुरुवात केली. ॲडव्होकेट ऑफ इंडिया पत्राला ही आग कशी काय पाखडतां येते याचा मासला त्यांनीं जॅक्सनसाहेबांच्या खुनानंतर दाखविला तो प्रसिद्धच आहे ! असो. टाइम्स ऑफ इंडिया झाला, लोकांच्या आश्रयाचीहि भावभगत झाली, तेव्हां या कल्पक व महत्त्वा-

कांक्षी कलमबहाद्दरानें आपली परोपकारी ढालतलवार सरकारच्या चरणीं वाहून त्यांच्या आश्रयानें 'जगद्वृत्त' पत्र काढलें. हें पत्र काढण्यांत आपण केलेल्या लोकोत्तर स्वार्थत्यागाच्या गुप्त दानांचा आण्यापैचा हिशेब त्यांनीं थोडेच दिवसांपूर्वीं जाहीर केला होता, त्यावरून साहेबमजकुरांच्या मताप्रमाणें सरकारानें त्यांचें किती ऋणी असावें हें कळून आलेंच आहे. पण कसेंही असो; सरकारची बाजू वेळीं अवेळीं उचलून धरणारे मुत्सद्दी मुंबईस डझनांनीं मोजतां येण्यासारखे असतां सरकारच्या हेतूंचें यथार्थ दिग्दर्शन लोकसमाजापुढें करण्यास अखेर गॉर्डनसाहेबच सरकारच्या उपयोगी पडले! बंगालचे सेनबहादूर यांचें तसें नाहीं. त्यांनीं चालविलेलें निमसरकारी पत्र पैशाकरितां नाहीं, तर केवळ सरकारच्या सेवेकरितां आहे, किंबहुना सरकारी वर्तमानपत्र चालविण्याचा मान उलट पैसे देऊन विकत मिळण्यासारखा असतां तरीही त्यांनीं तो दवडला नसता. कारण, सरकारच्या करण्यांत वाईट असें कांहीं त्यांस दिसत नाहीं. लोकच काय ते मठ्ठ डोक्याचे असून सरकारचे खरे हेतु आकलन करण्याचेंहि ज्ञान त्यांना नाहीं. तेव्हां तें येन केन प्रकारेण त्यांस 'सुलभ' करून द्यावें असा ज्यांना रात्रंदिवस निदिध्यास लागलेला आहे, अशा परोपकारी महात्म्यांपैकीं सेनबाबू हे एक आहेत. पण कोणाचा हेतु कसाही असो–कोणी आपल्या महत्त्वाकांक्षेनें तर कोणी परोपकारबुद्धीनें निमसरकारी वर्तमानपत्रें काढण्यास तयार होवो–सरकारचें आपलें काम आयतेंच बिनबोभाट झालें. निमसरकारी पत्राचें नवें युग राजरोस सुरू होऊन राजमंडळाच्या बिरुदावळींत तूर्त तरी एका नूतन भूषणाची भर पडली आहे यांत शंका नाहीं.

पण या निमसरकारी वर्तमानपत्रांचा सरकारास किंवा लोकांस उपयोग तरी कोणता होणार? सरकारचें सरकारास इतर रीतींनीं साधतां न येईल असें कोणतें काम हीं पत्रें बजावणार? अथवा खरा लोकोपयोग असा तरी यांच्या हातून कोणता होणार? आम्हांस तर असें वाटतें कीं, या दोन्ही कामांस निमसरकारी वर्तमानपत्रें अगदीं नालायख आहेत. सरकारचे हेतु व त्यांचा कारभार यांजविषयींची चांगली बाजू लोकांपुढें मांडावयाची हा हेतु घेऊन चाललें तर असें दिसून येईल कीं, एक तर राज्यकारभाराच्या निरनिराळ्या खात्यांत काम करून मुरलेल्या अनुभवी नोकराप्रमाणें निमसरकारी पत्राच्या भाडोत्री व उसनवार संपादकांस सरकारची तरफदारी करणें हें साधणें शक्यच नाहीं. मनुष्यास कळकळीचें

किंवा आवेशाचें सोंग एक वेळ आणतां येईल, पण ज्ञानाचें सोंग आणतां येत नाहीं; व राज्यकारभाराचें अंतस्थ ज्ञान नसल्यामुळें निमसरकारी वर्तमानपत्रांचे लेख केवळ वर उथळ विचार करून लिहिलेलेच असणार! फार काय, पण अव्यापारेषु व्यापार करणाऱ्या या सरकारी भाटांच्या हातून एखादे वेळीं खुद्द सरकारासही संमत नाहीं अशा तऱ्हेचे विचार प्रगट होऊन, ही नसती ब्याद कोठून मागें लावून घेतली असेंहि त्यांना वाटण्याचा संभव आहे. ‘ जेनू काम तेनू थाय बिजा करसो गोता खाय ’ ही म्हण अक्षरशः खरी आहे. सरकारचे हेतु प्रसिद्ध करणें, लपवून ठेवणें किंवा अन्यथा भासविणें हें काम स्वतः सरकारच करूं जाणें. दुसऱ्यास तें साधणें कठिण! अशा कामास नुसता वाटेल तो सिव्हिलियन देखील चालत नाहीं. कारण, सरकारी सेक्रेटरीएट हें अस्सल मुत्सद्दोगिरीचें आगर असावें लागतें; एरवीं काम भागत नाहीं. ह्या ठिकाणीं ज्याप्रमाणें डोक्याचें धड त्याचप्रमाणें जिभेनें धड व टांकानें धड माणसें असावीं लागतात. सेक्रेटरीएटमधल्या मनुष्यास कारभाराच्या अनेक बाबींचें ज्ञान तर उत्कृष्ट असावें लागतेंच; पण तसेंच पौर्वात्य किंवा पाश्चात्य ‘ नीति ’ग्रंथांचें ज्ञान न शिकतां ज्यांचे अंगीं आलेलें आहे असेच जन्मसिद्ध हुषार लोक लागतात. शुक्र, कणिक, शकुनि, मॅकिव्हेल, वॉलपोल, रिचलिओ, बिस्मार्क वगैरे सर्व प्रकारच्या कुशल राजनीतिज्ञांचें सेक्रेटरीएट हें एक मूर्तिमंत भांडागार असावें लागतें; व याकरितां एवंगुणविशिष्ट असेंच सिव्हिलियन सेक्रेटरीएटमध्यें पसंत करून घेतले जातात. सरकारच्या दोषांवर पांघरूण घालणें व गुणांची अतिशयोक्ति करणें आणि इतकेंहि करून प्रांजलपणा, सहजसहानुभूति, दूरदर्शीपणा, अस्खलनशीलता, वगैरेंची ढब बरोबर वठविणें हें काम सरकारचे रिपोर्ट लिहिणारे, ठरावांची भाषा सजविणारे, व गव्हर्नरसाहेबांस भाषणाकरितां कामांची सुनावणी करून देणारे सेक्रेटरीच करूं जाणेत! ‘येथें पाहिजे जातीचें एर गबाळाचें काम नाहीं. ’ पण सरकारचे गुप्त हेतु प्रकट करणें व आधींच प्रगट असलेल्या हेतूंस उजळा व तकाकी देणें, हें काम रिपोर्ट, ठराव, भाषणें, प्रेसनोटा वगैरेंच्या योगानें होतच आहे. सरकारास हवें तर त्याच मार्गानें त्याच कामाचा फैलाव अधिक करितां येणार नाहीं काय? त्यास निमसरकारी पत्राचे संपादक कितपत उपयोगी पडणार? फार काय, पण सरकारी कारभाराचीं बिंगें पुरीं माहीत नसल्यानें त्यांच्या समर्थनांत जांवई शोध पडून, Save me from my

friends या इंग्रजी म्हणीप्रमाणें सरकारास 'हें समर्थन आतां बस्स झालें' असें वाटण्याचा फार संभव आहे.

दुसरी गोष्ट अशी कीं, सरकारची तरफदारी व लोकपक्षाची नालस्ती करतांना खुद्द सरकारच्या भाषेंत निदान जो गंभीरपणा किंवा भारदस्तपणा त्यांच्या प्रतिष्ठितपणामुळें राहतो तोहि निमसरकारी पत्रांच्या भाषेंत राहीलच असें नाहीं. युद्धप्रसंगीं लष्कराच्या सरदाराची हुकमत हातीं वागविणाऱ्याच्या अंगीं जो थोरपणा, जी दिलदारी, असते ती लष्कराच्या भाकरी भाजणाऱ्या बाजारबुणग्याच्या अंगीं असत नाहीं. एका कवीनें म्हटलें आहे:—" रविरपि न दहति तादृक् यादृगयं दहति वालुकानिकरः । अन्यस्मात् लब्धपदो नीचः प्रायेण दुःसहो भवति " खुद्द सूर्यहि आपल्या किरणांनीं ताप देत नाहीं असा ताप सूर्यकिरणापासून उष्णता उसनी घेणारे वाळूचे कण देतात; स्वतः नीच असतां केवळ दुसऱ्याच्या योगानें जो प्रतिष्ठा पावतो तोच अधिक दुःसह होतो. सरकार कितीही टाकून बोलूं लागलें तरी त्याच्या मनावर जनलज्जेचें व स्वाभाविक मोठेपणाचें जें दडपण असतें तें, सरकारच्या तोंडाकडे डोळे लावून लोकांच्या अंगावर भुंकणाऱ्या समर्थांच्याहि श्वानांच्या अंगीं असत नाहीं. परवांचेंच उदाहरण घ्याना! सरकारचें मत चित्पावन ब्राह्मणाविषयीं कसें काय आहे हें सर्वांस महशूरच आहे. तथापि, या बाबतींत 'जगद्वृत्ता'मध्यें जी हलकट भाषा वापरण्यांत आली होती तशी भाषा एखाद्या सरकारी ठरावांत किंवा प्रेसनोटमध्यें येणें शक्यच नाहीं. खुद्द सरकारासहि लाज वाटली पाहिजे अशी ती भाषा होती; व आपल्या पैशावर पोसलेल्या या पत्रांत अशी भाषा आल्याबद्दल जर उद्यां कौन्सिलांत कोणीं प्रश्न विचारला, तर त्याचें समर्थन वर सांगितल्या प्रकारचा सेक्रेटरीएटमधला एखादा कुशाग्र बुद्धीचा मुत्सद्दीच करूं शकला तर कोणास ठाऊक। पण इतर साध्या बाबतींतहि अशीच स्थिति होणार. कलकत्त्यास निघणाऱ्या सेनबहादुरांच्या 'सुलभ समाचारा' नें तागाच्या व्यापारासंबंधानें सरकारास केव्हांहि समर्थन करतां येणार नाहीं अशी टीका नुकतीच केली होती अशी खुद्द 'पायोनिअर' पत्राची तक्रार आहे. हें एकच काय पण हजारों बाबींत असेंच होणार. बरें, हीं निमसरकारीं पत्रें कधींकाळीं लोकमताला पाठिंबा देतील म्हणावें तरी तीहि आशा व्यर्थ होय. खुद्द भीष्मासारख्या निःस्पृह विभूतीस अन्नाच्या मिंधेपणामुळें द्रौपदीवस्त्रहरणप्रसंगींहि कौरव राजाचा उघड निषेध करितां आला नाहीं; तर

मग निमसरकारी वर्तमानपत्रांनीं आणीबाणीच्या वेळीं मूग गिळले किंवा वाव-दुकी केली तर त्यांत कोणतें आश्चर्य ! निमसरकारी पत्रें, ' आम्ही काय कुणाचें खातों ! श्रीराम आम्हांला देतो ! ' असा आविर्भाव आणून निःस्पृहतेची बढाई मारोत. ' आम्हीं सरकारी मदत घेतली म्हणून आम्हीं आपलीं मतें कांहीं सरकारास विकलीं नाहींत ' हें म्हणणें सोपें आहे; पण त्याप्रमाणें कृति करून दाखविणें मात्र फार कठीण आहे !

तात्पर्य, अशा रीतीनें निमसरकारी वर्तमानपत्रांचा स्वतः सरकारास किंवा लोकांस कोणासच खरा उपयोग नसून दोन्ही पक्षांस त्यांचा अडथळा मात्र होणार आहे. या पत्रांच्या लेखांत खुद्द सरकारनें केलेल्या मतप्रतिपादनाचे कांहीं एक गुण नसून त्याचे सर्व दोष मात्र असतात; व अशा पत्रांवर होणारा हजारों रुपयांचा खर्च निव्वळ पाण्यांत गेला, असें अखेर खुद्द सरकारच्याहि नजरेस येईल असें आम्हांस वाटतें. आतां सकृद्दर्शनीं कित्येक अदूरदर्शी सरकारी अधिकाऱ्यांस निमसरकारी वर्तमानपत्रें हें आपल्या हातीं भलें एक शस्त्र मिळालें असें वाटण्याचा संभव आहे. कारण, लोकांतलींच माणसें उठून लोकांविरुद्ध बोलूं लागलीं म्हणजे सरकारचें आयतें परस्पर काम झालें असें दिसतें. दुसऱ्या कित्येकांस आपलीं मतें व आपल्या मनचीं भाषा परस्पर बिनसरकारी पत्रांकडून प्रगट झालेली पाहून, पाहुण्याच्या मुठीनें विंचू मारूं पाहणाऱ्या घरधन्याप्रमाणें किंवा आपलीं अंडीं दुसऱ्या पक्षाकडून उबविणाऱ्या कोकिळेप्रमाणें स्वतःच्या चतुराईची धन्यता वाटण्याचाहि संभव आहे. इतर कित्येक अधिकाऱ्यांना बिनसरकारी पत्रांचा उपयोग पदरीं पोसलेल्या कज्जे-दलाल हिरवट लाठियाळ पुरभय्या मारेकऱ्याप्रमाणें करितां येईल हेंहि आम्हांस उघड दिसतें. तथापि, हे सर्व फायदे क्षणिक असून केवळ विकारवश अशा मनुष्यासच त्यांचा मोह पडेल; पण सरकारानें अशा व्यक्तिविषयक विकारांस बळी पडणें योग्य नाहीं.

निमसरकारी वर्तमानपत्रांची युक्ति हल्लींच्या इंग्रजी मुत्सद्यांच्याच डोक्यांतून निघाली आहे असें नाहीं. दुसऱ्याच्या हातून गांवगुंडी करवून आपण प्रति-ष्ठितपणें तटस्थ बसण्याचा हा प्रयोग यापूर्वीं अनेक वेळां करून पाहण्यांत आला होता. पण तितक्या वेळीं तो फसला ही गोष्ट दप्तरीं दाखले हुड-कण्यांत पटाईत असलेल्या सरकारी अधिकाऱ्यांस माहीत नसेल असें नाहीं.

परंतु दर एक पिढीस आपलें शहाणपण स्वतःच्या अनुभवानेंच मिळविण्याची सरकारची इच्छा दिसते. असो, पण लोकांच्या माहितीकरितां तरी हे पूर्वीचे दाखले थोडेबहुत प्रसिद्ध करणें आम्हांस जरूर वाटतें. निमसरकारी वर्तमानपत्रांचा हा प्रयोग पूर्वी अनेक वेळां करून पाहण्यांत आला होता. इंग्रजी राज्य सुरू झाल्यानंतर पहिलीं कांहीं वर्षें हिंदुस्थानांतील वर्तमानपत्रें मिशनरी अगर इतर अँग्लो–इंडियन यांच्याच हातीं होतीं. ही संपादक मंडळी कांहीं निर्भेळ स्वतंत्रवादी नव्हती, तथापि, अशा वर्तमानपत्रांमधूनहि जी टिका येत असे, तीं देखील सरकारास सोसत नसे, आणि मतस्वातंत्र्याचा वृक्ष पोखरून त्याचा नाश करण्याकरितां, त्यांतल्या त्यांत लोभी व नरम असे संपादक हेरून त्यांच्या हस्तें सरकारी मदतीच्या भुंग्यांचा प्रवेश सरकार या वृक्षाच्या मुळांत करून देत असे. बंगाल्यांतलें ‘ श्रीरामपूर दर्पण ’ ‘ बंगाल ग्याझेट, ’ ‘ एज्युकेशनल ग्याझेट ’ मद्रासेकडील ‘ दिनवर्तमानी ’ वगैरे वर्तमानपत्रें निमसरकारी असून, सरकारचे प्रगट अगर गुप्त सद्धेतु चव्हाट्यावर आणण्याचें काम त्यांचे संपादक योग्य वेतन घेऊन करीत. परंतु ज्या ज्या वेळीं म्हणून स्वतंत्र लोकमत प्रतिपादन करणाऱ्या वर्तमानपत्रांचा व निमसरकारी वर्तमानपत्रांचा सामना झाला त्या त्या वेळीं या अर्धबाडग्या वर्तमानपत्रांस माघारच घ्यावी लागली. बरें सरकारी सद्धेतूंच्या प्रतिपादनाचा मंगलपाठ नित्य अहर्निश जपल्यानें सरकारचा कांहीं टिकाऊ फायदा झाला असें म्हणावें, तरी तेंही घडलें नाहीं. पण घडणार तरी कसें? कोठल्याहि देशांत सरकारची खरी अब्रू त्यांच्या कृत्यांवर अवलंबून असणार, स्तुतिपाठकांच्या स्तुतिपाठावर अवलंबून असत नाहीं. हिंदुस्थानांतहि लोक इंग्रज सरकारचे जे विशेष गुण चाहतात ते झाले तरी त्यांच्या अनेक कृत्यांवरून—मिशनरी किंवा अँग्लो-इंडियनी परपुष्ट भाटांच्या शांतिपाठावरून नव्हे. मानसशास्त्राची कसोटी लावून कोणाच्या कृत्यांत कोणचा हेतु कसा आहे हें ठरविण्याचें कान बिकट आहे. तथापि, साधारण प्रौढ, अनुभवी व सुशिक्षित मनुष्यास सरकारच्या कृत्यांचे हेतु काय आहेत, हें ठरविणें कठीण जात नाहीं. आणि तें काम जर खरोखरच इतकें कठीण असलें तर हें गूढ उकलण्यास केवळ थोडाबहुत सरकारी पैसा संपादकी गंगाजळींत येऊन पडल्यानें काय मदत होणार! सरकारी मदतीनें संपादकाला कदाचित् पोटभर भाकरी मिळेल; पण तो खरा मनकवडा कसा बनणार?

तात्पर्य, सरकारचे हेतु समजावून सांगणें हें सब झूट आहे, व एकतर्फी

स्तुतिपाठकाचा मिथ्याभियोग उघडकीस येण्यास केव्हांही फारसा वेळ लागत नाहीं. हिंदुस्थानांत सरकारच्या राजनीतीचा पाया जोंपर्यंत प्रगतिप्रिय अशा न्यायबुद्धीवरून खरोखर ढासळलेला नाहीं, तोंपर्यंत असद्बुद्धीच्या आरोपांनीं ज्याप्रमाणें त्यांच्या अढळपदावर आघात होणार नाहीं, त्याप्रमाणें पैसे देऊन करविलेल्या स्तुतीच्या तकलुपी बेगडीनें त्यांच्या साम्राज्यरूप प्रचंड इमारतीस शोभाहि येणार नाहीं. सरकार व लोक यांचें खरें कल्याण जर व्हावयाचें असेल तर तें इंग्रजी राज्यकारभाराच्या कक्षेंत हिंदी लोकमतास स्वतंत्र रीतीनें वावरण्यास वाव दिल्यानेंच होणार आहे. इंग्लंडांत पूर्वी असेंच झालें आणि हिंदुस्थानांतहि असेंच होईल. या देशांत झालें तरी सरकारचा अभिमान बाळगणारीं व योग्य तऱ्हेनें त्यांच्या कृत्यांचें समर्थन करणारीं वर्तमानपत्रें मुळींच नसावींत, असें कोणीही म्हणत नाहीं. किंबहुना इंग्रज सरकारावर सकृद्दर्शनीं प्रायः विरुद्ध टीका करणारीं पत्रेंहि सरकारचे गुण केव्हांच घेत नाहींत असें होत नाहीं. स्वतंत्र विचारांच्या प्रजाजनांचे गुण उघड रीतीनें सरकार जितके घेतें त्याहून लोकपक्षाचीं स्वतंत्र वर्तमानपत्रें सरकारचे गुण अधिक घेतात हें सहज सिद्ध करून देतां येईल. आपापल्या रीतीनें पाहतां सरकारच्या योग्य कृत्याचें समर्थन करीत नाहीं असें वर्तमानपत्र कोणचें आहे ? उलटपक्षीं सरकारची अप्रत्यक्ष मदत घेत नाहीं असें वर्तमानपत्र तरी कोठें आहे ? वर्तमानपत्रांस पोस्ट खातें सवलतीचे दर देतें ही त्यास मदतच आहे. वर्तमानपत्रांतून आपल्या जाहिराती प्रसिद्ध करून त्याकरितां वर्तमानपत्रांस बाजारनिरखाप्रमाणें पैसे देणें ही एक प्रकारची मदतच आहे. फार काय, पण कित्येक महत्त्वाच्या बाबतींत मतविरोध उघड दिसत असतां आणि वर्तमानपत्रांच्या कायद्यासारख्या सुलभ शस्त्राचा लहरी व खुनशी उपयोग करण्यास कशाचीही आडकाठी नसतां, तसा उपयोग न करणें व प्रतिपक्षाच्या काळजाला उघड व प्रत्यक्ष हात न घालणें हीहि वर्तमानपत्रांस सरकारची एक मदत-त्यांजवर एक प्रकारचा उपकारच आहे—असें आम्ही समजतों. पण ज्यांचे अंगीं असा उपकार करण्याचा मोठेपणा असतो त्यांच्या ठिकाणीं, उपकृत जनांनीं केवळ आपली स्तुति करून प्रत्युपकार करावा अशी अपेक्षा करण्याइतकी अधम वाणिग्वृत्ति नसतें हेंही आम्हास माहीत आहे. 'प्रतिपक्ष ही जगांत एक अत्यंत उपयुक्त अशी संस्थाच आहे, असें सर्व समंजस लोक मानतात. कानडाच्या वसाहतींत तर अधिका-

रारूढ पक्षाला पार्लमेंटमध्यें नित्य विरोध करण्याचें ज्याचें काम असतें, त्याला प्रधानमंडळांतील लोकांप्रमाणेंच तनखा ठरवून दिलेला असतो. हिंदुस्थानांतहि सरकारनें जर कोणास मदत द्यावयाची झाली तर ती विवेकी व थोर मनाचे असे जे आपले प्रतिपक्षी असतील त्यांनाच द्यावी ! प्रतिपक्षाचे गुण घेण्यास व त्याला त्याच्या योग्यतेप्रमाणें वागविण्यास मनुष्यामध्यें एक प्रकारची दिलदारी एक प्रकारचें औदार्य लागतें. व असल्या औदार्यानें कमकुवतपणा न येतां तें भूषणच होतें. पण प्रत्यक्ष पैशाच्या मदतीचा संबंध मात्र देणारास व घेणारास कमीपणा आणणारा आहे. डाक हा जसा सोन्याला खातो त्याचप्रमाणें आपली स्तुति करावी म्हणून निमसरकारी पत्रांस पैशाची मदत देणें हें सरकारच्या कीर्तीला कमीपणा आणणारें आहे. शिवाय चिखलाचे कुल्ले चिकटविले तरी ते टिकणार कसे ! अंगीं प्रगतिशील मुत्सद्दीगिरी, पाठीस सर्व इंग्रजी साम्राज्याचा आश्रय, आणि हाताखालीं हिंदी प्रजेसारखी सात्विक प्रजा इतकी सामुग्री सिद्ध असतां केवळ आपले स्तुतिपाठ गाण्याकरितां—मतस्वातंत्र्याच्या वृक्षावर निमसरकारी वर्तमानपत्रांचीं घातक बांडगुळें वाढविण्याकरितां—हजारों रुपये खर्चण्याची बुद्धि सरकारास व्हावी, हें त्यांच्या धीरोदात्त स्वभावाची कळा खाणारें दुश्चिन्ह आहे असें कोण म्हणणार नाहीं ?

---

## २७ सरकारच्या टीकाकारांची अडचण.

( तारीख १४ नोव्हेंबर सन १९११ )

हिंदुस्थानांतील ब्रिटिश सरकारच्या राज्यव्यवस्थेसंबंधानें, साधारण प्रजाजनांस ज्या खात्याशीं त्यांचा स्वतः प्रत्यक्ष संबंध येतो त्याखेरीज अवांतर माहिती फार थोडी असते. ही गोष्ट केवळ अशिक्षित रयतेचीच नव्हे तर सुशिक्षित लोकांचीहि आहे, असें म्हणण्यास फारशी हरकत नाहीं. किंबहुना शहरांत राहणाऱ्या सुशिक्षितांपैकीं तालुक्यांतील रयत लोकांचा एकंदरीनें कित्येक खात्यांशीं अधिक संबंध येतो. शहरांत राहणाऱ्या सुखवस्तु मनुष्यावर 'इन्कमटॅक्स'ची आकारणी झाली नसेल तर सरकारास अमुक एक कर प्रत्यक्ष दिल्याखेरीज त्याचा जन्मचा जन्म जाण्याचा संभव असतो. तो भाड्यानें दुसऱ्याच्या घरांत राहत असल्यास म्युनिसिपालिटीच्या कारभाराचा व त्याचा संबंध यावयाचा त्याचेंहि कारण राहत नाहीं. शिक्षण होण्यास फी द्यावी लागते; पण राज्यकारभाराचें शिक्षण मिळ-

ण्यासारखी ती बाब नव्हे. घरचा व्यापारटापार विशेष असेल तरच कोर्टाची पायरी चढण्याचा प्रसंग येणार. पोलिस वगैरेचा संबंध शहरांतून प्रत्यक्ष क्वचितच येतो. तालुक्यांतून कांहीं कांहीं बाबतींत राज्यकारभाराचा संबंध प्रजेशीं याहूनही अधिक येतो. परंतु शहरगांव काय अगर खेडेगांव काय, कोठेंहि सरासरीच्या मानानें पाहिलें तर, विशेष प्रसंगीं एखाद्दुसऱ्या राज्यकारभाराच्या खात्याशीं संबंध येऊन कारणपरत्वें कोणास काय थोडीबहुत माहिती होत असेल तेवढीच. परंतु एरवीं जन्मच्या जन्म अशा माहितीशिवाय जाणें शक्य आहे. ज्यांचा संबंध येतो त्यास माहिती होते, ती झाली तरी तेवढ्यापुरतीच.आतां कोठेंहि झालें तरी अठरा धंदे करणारे अष्टपैलू, चाणाक्ष गावगुंड, सर्वगामी असे लोक थोडेसे असावयाचेच, व अशा लोकांना पुस्तकी विद्या फारशी येत नसली तरी किरकोळ सार्वजनिक माहिती बरीच असते, परंतु असे लोक फार थोडे. सुशिक्षित लोकांमध्यें राज्यकारभाराच्या चौकशीची हौस विशेष असते असें नाहीं. दोन वर्षांपूर्वी खानदेशांत कायदेकौन्सिलांतील मध्यप्रांताच्या म्युनिसिपालिट्यांकडून निवडणूक झाली त्यावेळीं अपयश आलेल्या एका उमेदवारानें खानदेशांतील एका वर्तमानपत्रावर बेअब्रुचा खटला केला होता. सदर खटल्याचे कामीं या उमेदवाराची उलटतपासणी प्रतिपक्षाच्या वकिलांनीं घेतली, तींत राज्यकारभारासंबंधीं बरेच प्रश्न विचारून त्यास फजीत करण्यांत आलें, ही गोष्ट त्यावेळीं प्रसिद्ध झालीच होती. परंतु प्रस्तुत ती सांगण्याचा मुद्दा इतकाच कीं, सदर उमेदवारानें राज्यकारभारासंबंधीं प्रश्नांचीं उत्तरें देण्याचा प्रसंग मुद्दाम स्वतःवर ओढून आणिला होता, म्हणून त्याचें अज्ञान प्रगट झालें; पण ज्यांच्या सार्वजनिक माहितीची मूठ केवळ मिटलेली असल्यामुळें सव्वा लाखाची भरते, असे लोक सुशिक्षित वर्गांमध्येंहि कांहीं थोडे नाहींत. याच्याहि पुढचें बोलणें कदाचित् धाडसाचें दिसेल. परंतु खुद्द कायदेकौंसिलांत हल्लीं बसणाऱ्या अगर पूर्वीं बसून गेलेल्या कित्येक नामदारांचीहि राज्यकारभाराच्या हरएक बाबीसंबंधानें परीक्षाच घेण्याची वेळ आली तर तींतून किती लोक चांगल्या तऱ्हेनें उत्तीर्ण होतील, ही विचार करण्यासारखीच गोष्ट आहे! एकीकडे कायदेकौन्सिलांतून निभावून गेल्यांचीहि ही स्थिति असतां, दुसरीकडे ज्यांचें वास्तविक काम हायस्कुलांत केवळ पोरें शिकविण्याचें असतां, निरनिराळ्या खात्यांत मुरलेल्या तज्ज्ञ अधिकाऱ्यांसहि प्रसंगविशेषीं गोंधळून सोडण्या-

सारखी ज्यांस सार्वजनिक माहती आहे असा कै. ना. रा. ब. जोशी यांसारखा एखादा गृहस्थ आमच्यांत निपजतो; नाहीं असें नाहीं. पण असे गृहस्थ केवळ अपवादात्मक होत.

अशी स्थिति असण्यास एक दोन मुख्य कारणें आहेत. एक कारण असें कीं, आमच्यामध्यें साधारणतः चिकित्सकबुद्धि व सार्वजनिक माहिती मिळविण्याची इच्छाच कमी आहे. राजकारणासंबंधानें ढोबळ तत्त्वांची चर्चा समाजांत खूपच कसून होते यांत शंका नाहीं, परंतु अशा चर्चेस खरें पाठबळ—किंबहुना अशा चर्चेचें खरें पोषक द्रव्य—म्हटलें म्हणजे राज्यकारभारासंबंधीं आंकडेबंद तपशीलवार माहिति हेंच होय. उदाहरणार्थ, रा. ब. जोशी यांच्या सार्वजनिक टीकेचा एक विशेष गुण असा असे कीं, त्यांच्या लेखांत अगर भाषणांत ज्यास कोणाला नांव ठेवितां येईल असा एकहि शब्द नसे! परंतु ते जी माहिती व जे आंकडे देत तेच इतके भरपूर व समर्पक असत कीं, सरकारच्या एखाद्या बाबतींतल्या दूषणास्पद गोष्टीचा निषेध करणें झाल्यास, वेगळा टीकात्मक असा एक शब्दहि न बोलतां, केवळ त्या आंकड्यांवरून व माहितीवरून अगदीं सर्वसाधारण मनुष्यासहि जीं अनुमानें हातोहात व उघडाउघडीं काढतां येतील त्यांवरून अशा धोरणाचा निषेध आपोआप झाल्याशिवाय रहावयाचाच नाहीं! परवां मि. दिनशा एदलजी वाच्छा यांच्या ' लष्करी खर्चा ' वरील व्याख्यानाचा सारांश केसरींत देण्यांत आला होता. त्यांतहि झालें तरी, निव्वळ टीकेपेक्षां त्यांनीं दिलेल्या आंकड्यांमध्येंच ' न बोलका निषेध ' अतिशय ठेंचून भरलेला होता. किंबहुना त्यांचें टीकेचें खरें सामर्थ्य त्यांच्या स्वतःच्या निषेधक बुद्धीपेक्षां त्यांच्या आंकड्यांमध्येंच अधिक होतें. हिंदुस्थानांत इंग्रजी राज्यामध्यें लष्कराचा बडेजाव फार वाढला आहे व त्यावर सरकाराकडून पाण्यासारखा पैसा ओतला जातो, असें आपणां सर्वांस मोघम माहीत असतें व या कामीं आपली समजूत अगदीं बरोबर असतेहि. पण आपलें ज्ञान निर्विकल्प असतें म्हणून खरें खोटें करण्याचा प्रसंग आला तर आपणांस थोडेंसें जड जातें; व टीका करण्यास सरसावून पुढें टाकलेलें पाऊल तेवढ्यापुरतें तरी किंचित् मागें घेऊन आपल्या ' समजुती 'च्या रक्षणाचा आश्रय करावा लागतो. परंतु रा. ब. जोशी अगर मि. वाच्छा यांच्याप्रमाणें ज्यांची तयारी पुराव्याचें माप भरून प्रतिपक्षाच्या पदरांत ओततां येण्यासारखी असते त्यांना टीका करण्यास पुढें

सरसावून टाकलेलें पाऊल पडेल त्या ठिकाणीं कायम रोवितां येतें. हा फायदा कांहीं लहान नाहीं.

समाजांत राज्यकारभाराचें ज्ञान कमी आहे याचें दुसरें एक कारण असें कीं, राज्यकारभाराशीं आमचा प्रत्यक्ष संबंधच सरकारनें जाणूनबुजून इतका थोडा ठेविला आहे कीं, तेवढ्या संबंधापासून प्रजाजनांमध्यें सार्वजनिक राज्यकारभाराची मुद्देसूद माहिती जितकी फैलावणें इष्ट आहे तितकी फैलावूंच शकत नाहीं. व्यापारी भाषेनें बोलावयाचें तर राज्यकारभाराच्या व्यवहारांत जेवढा म्हणून 'घाऊक' व्यापार तितका सर्व इंग्रज अधिकाऱ्यांचे हातीं आहे; व जो कांहीं 'किरकोळ' चिल्लर म्हणून व्यापार आहे तो तेवढा नेटिवांचे हातीं! कोणतेंही काम झालें तर तें हातून केल्याशिवाय त्याची माहिती होणें शक्य नाहीं; व राज्यकारभारांत पहावें तर कनिष्ठ दर्जाचें कच्चें किरकोळ काम तेवढें नेटिव लोकांचे हातीं असतें. कोणत्याही खात्याचा मुख्य ऑफिसर होण्याचा प्रसंग नेटिवास क्वचितच येतो; यामुळें सरकारी नोकरींत असलेल्या नेटिवास कोणत्याही खात्याचें समग्र, संपूर्ण, पूर्वापर असें ज्ञान असत नाहीं. राज्यकारभाराच्या खात्यांत परस्पर संबंध कसा आहे, कोणत्याही खात्यांतील मुख्य धोरण काय, वगैरेंचें ज्ञान त्यांस होत नाहीं. शिवाय 'कॉन्फिडेन्शिअल' किंवा गुप्त म्हणून प्रत्येक खात्यांत ज्या थोड्याबहुत बाबी असतात त्या तर कनिष्ठ जागेच्या दर्जावर असणाऱ्या नेटिवांना मुळींच माहीत होत नाहींत. एरवीं काम करण्याची संधि मिळाली असतां नेटिव लोक काम शिकत नाहींत अथवा त्यांस माहिती करून घेतां येत नाहीं, असें मुळींच नाहीं. प्रत्येक हपिसांतला मुख्य साहेब व त्याचा नेटिव शिरस्तेदार यांच्या ज्ञानाची परीक्षा पाहण्याकरितां त्यांच्यामध्यें वादाची कुस्ती लागली अशी जर आपण कल्पना केली तर शेंकडा ऐशीं तरी शिरस्तेदार या कुस्तींत माहितीच्या बळानें व युक्तीच्या पेंचानें आपल्या वरिष्ठ साहेबांस लोळवतील, अशी आमची खातरी आहे. पाटील कुलकर्ण्यांपासून स्टेट सेक्रेटरीच्या कौन्सिलांतील सभासदांपर्यंत ज्या ज्या जागांवर आजपर्यंत नेटिवांना नेमण्यांत आलें आहे त्या त्या जागांचें काम त्यांनीं योग्य रीतीनें केल्यापासून सरकारास ज्याप्रमाणें फायदा झाला त्याचप्रमाणें त्यांच्या ज्ञानाचा फायदा समाजासही झाला. वास्तविक सरकारी नोकरींत असेपर्यंत सरकारी कामगारांचे तोंडास कुलूपच असतें; व पेन्शन घेऊन हें कुलूप निघाल्यावरही कित्येक लोक आळसानें, कित्येक पूर्व-

संस्कारानें, व कित्येक भीतीनें आपल्या राज्यकारभाराच्या ज्ञानाचा फायदा समाजास करूं देत नाहींत. तरी पण सरकारी नोकर किंवा पेन्शनर किती झालें तरी समाजांतच अहर्निश राहत असल्यामुळें, सरकाराचा विश्वासघात न करितां व सरकाराशीं केलेली इमानाची शपथ राखूनही, स्थूल व चालचलाऊ गोष्टींची माहिती त्यांजकडून समाजास सहजच होण्याचा संभव असतो. यास्तव वरिष्ठ प्रतीच्या जागेवर जितके अधिक हिंदी लोक नेमण्यांत येतील तितकी समाजाच्या सार्वजनिक ज्ञानाची मर्यादा वाढेल हें उघड आहे. नेटिव लोकांच्या ठिकाणीं राज्यकारभाराचें अज्ञान बरेंच आहे असें जेव्हां अधिकाऱ्यांकडून आक्षेपाच्या किंवा दूषणाच्या दृष्टीनें म्हणण्यांत येतें तेव्हां त्यांनीं ही गोष्ट विशेष लक्षांत ठेवणें जरूर आहे.

कारणाशिवाय कोणास कोणत्याच गोष्टीचें ज्ञान होत नाहीं. एवढेंच नव्हे तर, कारण असूनही ज्ञान असत नाहीं असे दाखले कांहीं थोडे सांपडत नाहींत. आपण पार्लमेंटचेंच उदाहरण घेऊं. हिंदुस्थानच्या राज्यकारभाराच्या दोऱ्यांचीं टोंकें पार्लमेंटच्या हातीं आहेत ही गोष्ट उघड आहे. असें असतां साधारण मानानें पार्लमेंटच्या सभासदांना हिंदुस्थानच्या राज्यकारभाराचें कितीसें ज्ञान असतें ? इकडील कायदेकौन्सिलांतील अज्ञानी सभासदांच्या दसपट पार्लमेंटच्या सभासदांचें अज्ञान गाढ असतें असें म्हणण्यास हरकत नाहीं. हिंदुस्थानपुरता तरी पार्लमेंट हा एक अज्ञानांधकारमय कूप आहे, असें खुशाल म्हणावें; क्वचित् प्रसंगीं या अज्ञानाच्या खंदकांत एखादा सूर्यकिरण पडला असतां तेथील अज्ञानाचे मासले चांगलेच नजरेस पडतात, हें आपण नित्य पहातोंच. हिंदुस्थानांत जे युरोपियन लोक खासगी पेषांत असतात त्यांनाहि हिंदुस्थानच्या राज्यकारभाराचें ज्ञान यथायथाच असतें. जें थोडेंबहुत असतें त्याचें कारण झालें तरी प्रत्यक्ष राज्यकारभार चालविणाऱ्या अधिकाऱ्यांशीं त्यांचा निकट संबंध असतो, हेंच होय. हिंदुस्थानांत ज्यांना राज्यकारभाराचें कच्चें व पक्कें ज्ञान असतें असे लोक म्हटले म्हणजे युरोपियन अधिकारीच काय ते. पण प्रत्यक्ष राज्यकारभारच ते चालवितात, तेव्हां अनुषंगानें तें त्यांस प्राप्त होतें इतकेंच काय तें ! तीस तीस वर्षें राज्यकारभाराशिवाय हिंदुस्थानांत ज्यांनीं दुसरें कांहींच केलें नाहीं अशा लोकांस राज्यकारभाराच्या ज्ञानाच्या बाबतींत नेटिव लोकांस मागें टाकतां आलें तर त्यांत नवल कसचें ? नेटिव मनुष्य सरकारी नोकरींत असला तरी त्याच्या माहि-

तीचा टापूच मुळीं लहान असतो. सिव्हिलियन लोकांची गोष्ट वेगळी आहे. तो सुबुद्ध असला निर्बुद्ध असला तरी कोणत्याही खात्याचा मुख्य अधिकारी निदान जिल्हाधिकारी होण्यास लायख मानिला जातोच. शिवाय आज या खात्यांत उद्यां त्या खात्यांत, आज या जागीं उद्यां त्या जागीं, असा चेंडूसारखा त्यास फेंकण्यांत आल्यामुळें त्याचा अनुभव व त्याची माहिती हीं सहजच वाढतात. आळशी व मिजाशी सिव्हिलियन असला तरी—आणि अशीं उदाहरणें खुद्द आमच्या डोळ्यांपुढे अनेक आहेत—जबाबदारी म्हणून केवळ परेच्छेनें राज्यकारभाराची माहिती त्यास होऊन जावेच. सरकारचें सरकार या नात्यानें रात्रंदिवस राज्यकारभाराचेंच काम चालतें; व राज्यकारभारांत मुरलेले केवळ किडेच असे लोक त्यांच्या पदरीं असल्यामुळें पुष्कळ वेळां वादविवादांत सरकारास जय मिळतो.

याच्या उलट खासगी नेटिवांकडे पाहिलें तर त्यांच्या अडचणी केवळ डोंगरासारख्या भासतात. खाजगी मनुष्य खाजगी रीतीनें राज्यकारभाराचें ज्ञान कसें मिळविणार ? व कितपत मिळविणार ? सरकार बोलून दाखवील तेवढीच सरकारी धोरणाची माहिती त्याला असणार. राज्यकारभाराचे खातेवार रिपोर्ट प्रसिद्ध होतात त्यांत आंकडे वगैरे थोडीबहुत कच्ची माहिती असते खरी. परंतु ते प्रत्येक खात्यानें अगदीं एकतर्फी आणि केवळ आपल्या खात्याचे गुण तेवढे दिसावे, दोष दिसूं नयेत, अशा दृष्टीनेंच बनविलेले असतात. कोणतें बोलावें कोणतें बोलूं नये, कोणती गोष्ट प्रगट करावी कोणती गुप्त ठेवावी, याचा निर्णय करण्याचा अधिकार सर्वस्वीं रिपोर्ट लिहिणाराकडेच असतो. अर्थात् अशा रिपोर्टावरून कोणत्याहि खात्यासंबंधानें अधिकाऱ्यांकडून माहिती मिळवावयाची म्हटलें तर ती त्यांस खासगी विचारणें व त्यांनीं खासगी सांगणें, अर्थातच गैरशिस्त आहे. सरकारी रीतीनेंच मागावयाची म्हटलें तर ती प्रायः मुख्य अधिकाऱ्याच्या द्वारें अगर त्याच्या मुखानेंच मिळणार ! अशा मुख्य अधिकाऱ्यांस तुम्हाला एखाद्या विद्यार्थ्याप्रमाणें पढविण्यास वेळ कमी असतोच; परंतु खात्याच्या हितसंबंधाची ही आडकाठी त्यांस येऊं शकते. कायदेकौन्सिलांत पहावें तरी बिनसरकारी मनुष्य एकच असा तेथें फार दिवस टिकत नाहीं. टिकला तरी प्रश्नोत्तरांच्या रूपानें माहिती मिळावयाची तर सरसालांत फार तर कायदेकौन्सिलाच्या चार पांच बैठकी होणार ! प्रत्येक बैठकीस प्रश्न विचारावयाचे म्हटलें तरी किती विचारणार ? बरें, विचारलेल्या सर्व प्रश्नांचीं तरी समर्पक उत्तरें मिळतातच असेंही नाहीं

"तुम्ही विचारलेली माहिती काढणें ही गोष्ट फार वेळेची व श्रमाची आहे" अथवा "विचारलेली माहिती दिल्यापासून विशेष सार्वजानिक हित साधण्यासारखें आहे असें नाहीं," अशा उत्तरांनीं संभावना झालेले प्रश्न कितीतरी काढून दाखवितां येतील. नाहीं म्हणावयास ना.सर जॉर्ज क्लार्क यांनीं हल्लीं मुंबई सेक्रेटरीएटमध्यें कायदेकौन्सिलाच्या सभासदांकरितां मुद्दाम एका लायब्ररीची योजना केली आहे. शिवाय एखाद्या कौन्सिलदारानें पत्रव्यवहार करून अगर समक्ष थोडीबहुत माहिती मागितल्यास तीही देण्यांत येणार नाहीं असें नाहीं. परंतु या दोन्ही सवलतींचा फायदा मिळण्यास बऱ्याच मर्यादा आहेत. या सर्व गोष्टींचा विचार करितां कायदेकौन्सिलांत अगर इतरत्र राजकारणी वादविवादामध्यें एका बाजूस सरकारी अधिकारी व दुसऱ्या बाजूस खासगी लोक असतां, जें बलाबल, जी सरसनिरसता दिसून येते ती अगदीं स्वाभाविक आहे. पूर्वीं इंग्रजांनीं हिंदुस्थानांत राज्य मिळविण्याच्या वेळीं एका बाजूस पल्लेदार बंदुका व कवाईत शिकलेले लष्करी कंपू आणि दुसरे बाजूस मोडकीं तोडकीं जुनींपानीं हत्यारें घेऊन लढणारे पंक्ति—बारगीर ही जशी तफावत दिसून येत असेल, तशीच तफावत आज कायदेकौन्सिलांत एका बाजूस तीस तीस वर्षांचे अनुभवी सरकारी कामगार व दुसऱ्या बाजूस सार्वजनिक व्यवहारांत नवशिके किंवा फार तर थोडाबहुत अनुभव असलेले, परंतु प्रत्यक्ष राज्यकारभाराचे-कामीं मुळींच अनुभव नसलेले, लोकप्रतिनिधी यांच्यामधील तफावत दिसून आल्यास त्यांत सरकारास भूषण काय किंवा लोकांस तरी दूषण काय! राजकीय शिक्षण झालें तरी इतर शिक्षणासारखेंच सरकारनें स्वतः होऊन लोकांस दिलें पाहिजे; व जेथें समाजांतच तें स्वतः सिद्ध किंवा स्वयंभू दिसून येईल, तेथें. त्यास विशेष उत्तेजन दिलें पाहिजे.

---

## २८. मुद्रण—स्वातंत्र्याची समाप्ति

( ता. फेब्रुवारी सन १९१० )

गेल्या शुक्रवारीं वरिष्ठ कायदेकौन्सिलांत वर्तमानपत्रांच्या मुस्कटदाबीचें जें बिल वाचून नमूद करण्यांत आलें तें इतकें भयंकर आहे कीं, तें आहे असेंच पास झाल्यास त्याच्या योगानें हिंदुस्थानांतील मुद्रण—स्वातंत्र्य व मतस्वातंत्र्य यांचा सर्वस्वीं निःपात होणार यांत शंका नाहीं! अशा प्रकारचें बिल येणार येणार

म्हणून बरेच दिवस आडून गाजत होतें, व हिंदी वर्तमानपत्रकारांस पडलेलें दुष्ट स्वप्न शेवटीं गेल्या शुक्रवारीं खरें झालें. कायदेकौन्सिलांपुढें कोणतेंहि नवीन बिल जेव्हां येतें तेव्हां त्याच्या पहिल्या वाचनाचे वेळींच त्याच्या अंतर्गत तत्त्वांवर वादविवाद करण्याची चाल आहे. दुसऱ्या वाचनाचे वेळीं, हीं तत्त्वें मान्य झालीं असें समजून, फक्त बिलाची भाषा व त्याच्या कलमांची रचना व मांडणी यांचा विचार होतो. तिसरें वाचन केवळ औपचारिकच असतें. हल्लीं पुढें आलेल्या बिलाचें पहिलें वाचन गेल्या शुक्रवारीं वादविवादाशिवाय पार पडून तें 'सिलेक्ट कमिटी'कडे सोंपविण्यांतहि आलें. नंतरच्या चार दिवसांत कमिटीच्या एखाद्या बैठकींत त्याचा विचार झाला असेल; व आज दोन प्रहरीं मुद्दाम भरणाऱ्या कौन्सिलाच्या सभेंत त्याचें दुसरें व तिसरें वाचन होऊन उद्यां दोन प्रहरपासून नवीन कायद्याचा अंमल सर्व हिंदुस्थानभर सुरूहि होईल! खरोखर इंग्रजसरकारचें 'पाताळ यंत्र' मोठें कटीण आहे! कोणत्याहि बाबतींत त्यांना वेळ लागतो तो फक्त विचार करण्यासच लागतो; विचार कायम झाल्यावर मग त्यांच्या कृतीस वेळ मुळींच लागत नाहीं; व कायदेकौन्सिलाच्या टांकसाळींतून कायद्याचीं नाणीं बिनबोभाट बाहेर पाडणें हा त्यांच्या तळहातचा मळ आहे! सन १८७८ सालीं लॉर्ड लिटनसाहेबांनीं जेव्हां देशी भाषांतील वर्तमानपत्रांचा कायदा पास करवून घेतला, तेव्हां स्टेट सेक्रेटरीसाहेबांची संमति मिळविणें, बिल पुढें आणणें, तें प्रसिद्ध करणें, तीन वेळां वाचून पास करणें व पास झालेल्या कायद्यास गव्हर्नर जनरल साहेबांनीं संमति देणें—हे सर्व विधी एखाद्या चटश्राद्धाप्रमाणें अवघ्या २४ तासांत उरकण्यांत आले! येऊन जाऊन बोभाट करणार कोण तर कौन्सिलांतील एखाद-दुसरा लोकनियुक्त सभासद. परंतु बहुमताच्या अमोघ शक्तीपुढें त्या विचाऱ्याच्या विरळ वाग्जाळाचा निभाव कितीसा लागणार? लोकनियुक्त सभासदांस वाटत असेल कीं आपल्या हातीं बोलण्याचा अधिकार आहे; परंतु सरकारासहि माहित असतें कीं, प्रसंगविशेषीं कौन्सिलाच्या नित्यक्रमाचे नियम बाजूस सारून बोलण्याचा हा अधिकारहि आपणास रद्द करितां येतो. गेल्या शुक्रवारीं अशाच रीतीनें सर्व नियम बाजूस सारून नवीन बिल सिलेक्ट कमिटीकडे देण्यांत आलें, व आज रोजीं होणाऱ्या सभाप्रसंगांतहि नित्य नियम बाजूस सारून नैमित्तिक अधिकाराचाच उपयोग करण्यांत येईल असा अंदाज आहे. अशा रीतीनें ता. ४ रोजीं कौन्सिलापुढें प्रथम आलेल्या या अपूर्व महत्त्वाच्या बिलाचा अंमल

कायद्याच्या नात्यानें ता. ९ पासून सुरू होणार। आणि इतक्या तांतडीनें व लोकमत बिलकूल न घेतां अशा महत्त्वाचें बिल पास करणें ही कायदेकौन्सिलाची निवळ थट्टा आहे असें जर कोणीं म्हटलें तर ती स्वतः सरकारची थट्टा ठरून त्यांचा अपमान केल्याबद्दल त्याजवर कदाचित् राजद्रोहाचा खटलाहि होणार!

या नवीन बिलाच्या मुख्य कलमांचा सारांश दुसरे बाजूस दिला आहे. त्यावरून कोणालाहि असें दिसून येईल कीं, यापुढें वर्तमानपत्रें अगर छापखाने चालविण्याचें काम अत्यंत धोक्याचें झालें आहे. आजपर्यंत या धंद्यांत धोका मुळींच नव्हता असें नाहीं; कारण राजद्रोहाची व्याख्या अत्यंत व्यापक असल्यानें कोणा वर्तमानपत्रकारावर अगर कोणा छापखानेवाल्यावर खटल्याचा प्रसंग केव्हां येईल याचा नियम नव्हता. कांहीं थोडे दिवसांपूर्वीं नागपूरच्या एका वर्तमानपत्रकारावर केवळ पदवीदानाविषयीं टीका केल्याबद्दल जेव्हां खटला झाला तेव्हां तर, राजद्रोहाचा खटला करून वाटेल त्या वर्तमानपत्रकारांस वाटेल तेव्हां शिक्षा करविणें हें सरकारास इच्छामात्रेंकरून केवळ लीलेनें करितां येण्यासारखें आहे असें सिद्धच झालें. हे राजद्रोहाचे खटले दरमहा पांच पंचवीस तरी कां होत नाहींत याचें कारण 'व्याघ्रे च महदालस्यं सर्पे चैव महद्भयं। पिशुने चैव दारिद्र्यं तेन जीवंति मानवाः' असें जें एका सुभाषितकारानें म्हटलें आहे तेंच होय, असें वाटूं लागलें. व्याघ्रसिंहादि हिंस्र पशु, सर्प, व दुष्टबुद्धि लोक यांपैकीं प्रत्येकानें मनावरच घेतलें तर जगांतले निम्मे शिम्मे लोक नाहींसे करतां येण्याइतकें सामर्थ्य त्यांचे अंगीं आहे. परंतु वाघ हा आळशी, सर्प हा भित्रा, व दुष्ट बुद्धि मनुष्य प्रायः निर्धन असतो; व म्हणूनच हें जग चाललें आहे, म्हणूनच जगाचे पाठीवर थोडीबहुत तरी मनुष्यवस्ती टिकणें शक्य असतें, असा या सुभाषिताचा भावार्थ आहे. त्याच न्यायानें पाहतां व हिंदुस्थानांतील राजद्रोहाचा कायदा व न्यायकोर्टें यांचें स्वरूप लक्षांत घेतलें असतां, होतात याहून आणखीहि अधिक राजद्रोहाचे खटले कां होत नाहींत याला कारण म्हटलें म्हणजे सरकारची खुषी—आणखीहि खटले करण्यास त्यांची तब्येत लागत नाहीं, त्या गोष्टीचा त्यांना कंटाळा येतो—हेंच, याहून दुसरें कांहीं नाहीं, असें प्रांजलपणानें कबूल करावें लागतें. खटला केला असतां तो सफळ होण्याबद्दल सरकारास केव्हांहि काळजी वाटत नव्हती. कारण परवां ना. रिसले यांनीं सांगितल्याप्रमाणें सन १८७० पासून १९०७पर्यंत हिंदुस्थानांत राजद्रोहाचे १६खटले

करण्यांत आले, त्यांपैकीं एकाहि खटल्यांतील आरोपी निर्दोषी ठरला नाहीं. १९०७ सालापासून सरकारानें आपला अंगावरचा आळस झाडला, व राजकीय जठरांत बराच क्षुद्बोध झाल्यामुळें त्यांनीं शिकार करण्याचें मनावर घेतलें. त्याचा परिणाम असा झाला कीं, सन १९०७ते १९०९ या दोन सालांत राजद्रोहाचे ४७ खटले करण्यांत आले; व चमत्कार असा कीं, या ४७ खटल्यांत एकहि आरोपी निर्दोषी ठरून सुटला असें नाहीं ! जिवाला भिऊन माफी वगैरे मागून कोणी सुटले असतील तेवढेच काय ते बचावले. अशी अचुक तिरंदाजी पौराणिक काळाच्याहि कोणा वीरानें केली असें आढळत नाहीं. पण तें कसेंहि असो; वर्तमानपत्रकर्त्यांची ही अशी स्थिति होती खरी.

आजवर वर्तमानपत्र लिहितांना हातांत कलम घेण्याचे वेळीं एक पाय खोड्यांत जाण्यास तयार करावा लागत असे. परंतु नवीन कायद्यानें उत्पन्न होणारी स्थिति याहूनहि बिकट आहे यांत संशय नाहीं. कारण एक तर राजद्रोहाच्या खटल्यानें खुद्द वर्तमानपत्राचे अस्तित्वावर गदा येण्यासारखी नव्हती. एकादा संपादक तुरुंगांत गेला असतां त्याचें काम बरें वाईट कसें तरी करून पूर्वीचा संपादक सुटून परत येईपर्यंत वर्तमानपत्र जिवंत ठेवण्यास दुसरा संपादक मिळे, व संस्था कसी तरी चाले. परंतु विशेष लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट ही कीं, राजद्रोहाचें प्रायश्चित्त प्रायः संपादकासच भोगावें लागे. छापखानेवाला हा दुय्यम प्रतीचा गुन्हेगार मानला जाई व त्यास फारसा धक्का पोंचत नसे. परंतु नवीन कायद्यानें ही सर्व स्थिति पार बदलून टाकली आहे. हा फेरबदल प्रत्यक्ष राजद्रोहाचा कायदा बदलून अगर न्यायमनसुब्याची रीत वेगळी करून झालेला नाहीं. हा तर इष्टार्थ अप्रत्यक्ष रीतीनें पण अधिक खात्रीपूर्वक असा घडवून आणलेला आहे. प्रथम प्रथम सरकारास असें वाटत असे कीं, देहदंड सोसावा लागल्यानें छापखानेवाले व वर्तमानपत्रकार हे आपलें मतस्वातंत्र्य गमावण्यास तयार होतील. परंतु इंग्रजी राज्यांतही, प्रजाजनांची सत्ता इतर कशावर नसली तरी, त्यांच्या देहांवर निदान ती अबाधित चालते, व देशसेवेचें पवित्र कर्तव्य करण्यास जर थोडा बहुत देहदंड सोसावा लागला तर तो सोसण्यास ते तयार होतात, असें जेव्हां सरकारनें पाहिलें तेव्हां त्यांना निराळ्याच मार्गाचें अवलंबन करावेंसें वाटलें. सरकारनें असें पाहिलें कीं, लक्ष्मी व सरस्वती यांचा जो त्रिकालाबाधित विरोध सर्व जगांत आहे, तो आज हिंदु-

स्थानांतहि आहे. कोणाचें मरण यांत तर कोणाचें त्यांत असनें; सुशिक्षित वर्ग देहदंड सोसावयास तयार झाला आहे खरा, परंतु तो वर्ग निर्धन आहे; द्रव्यरेषेच्या मर्मस्थानावर घाव घातला असतां त्यानें हे चळवळे लोक लोळलेच पाहिजेत. हीच मुख्य गोष्ट लक्षांत धरून नवीन बिलाची रचना झालेली आहे. बाकी वाटेल त्याचें सोंग आणतां येतें, पण पैशाचें सोंग आणतां येत नाहीं ही म्हण प्रसिद्धच आहे; आणि तीस अनुलक्षून छापखानेवाले व वर्तमानपत्रकर्ते यांजकडून यापुढें पहिल्या खेपेस पांचशेंपासून पांच हजार रुपयांची व दुसऱ्या खेपेस दहा हजार रुपयांपर्यंतची जामीनकी मागावी, व तिसऱ्या खेपेस या जामिनकीच्या रकमेसकट तो छापखाना, तें वर्तमानपत्र, वगैरे सर्व जप्त व सरकारजमा करण्यांत यावें असें नवीन कायद्यानें ठरविलें आहे!

शिवाय ही जामिनकीहि कांहीं विशेष प्रचंड गुन्ह्याकरितांच मागतां येते असेंही नाहीं. कारण नवीन कायद्यांतील कलमें लागू करण्यास जीं कारणें दिलेलीं आहेत त्यांत, राजद्रोहाच्या कायद्यांतून चुकल्या सवरलेल्या किरकोळ–चिरकोळ सर्व बाबींची झडती घेऊन त्यांचाहि समावेश करण्यांत आलेला आहे. अत्याचाराच्या गुन्ह्यास उत्तेजन देण्यासारखी भाषा वापरणें हें तर या कारणांत येतेंच, व तें येणें हें बरोबरही आहे; परंतु साधारणतः रागानें केलेली टका देखील नवीन कायद्याप्रमाणें जामिनकी मागण्यास पुरेशी होईल अशा तऱ्हेची भाषा वापरण्यांत आलेली आहे. राजद्रोह म्हणजे आजपर्यंत ‘ मुख्य व समष्टिस्वरूप राजसत्तेचा द्रोह ’ अशी समजूत असे. परंतु प्रस्तुतच्या कायद्यानें ही टीकाविषयता सरकार, सरकारचे दोस्त, आप्तइष्ट, चावडविरील तराळापर्यंतचे त्यांचे अधिकारी, इतकेंच नव्हे, तर त्या अधिकाऱ्यांच्या कुटुंबाबाहेरचीं ऋणानुबंधीं प्रेमपात्रें इतक्या लांबीवर नेऊन भिडविली आहे! आजपर्यंत राजद्रोहमीमांसेंत ‘नाविष्णुः पृथिवीपतिः ’ या वचनानें फक्त समाष्टिरूप राजसत्तेस ईश्वरांशित्व दिलें जात असे. परंतु यापुढें सरकाररूपी विराट पुरुषाच्या देहाचीं मुख्य अंगें व अवयव हेचसे काय, परंतु त्या अंगाचीं उपांगें व अवयवांचे उप–अवयव, किंबहुना या देहावरील प्रत्येक रोम म्हणजे केश व प्रत्येक रोमरंध्र यांना ‘ विष्णु ’–त्वाचा बहुमान देण्यांत आलेला आहे. वर्तमानपत्रकर्ते व छापखानेवाले यांनीं यापुढें या सर्व ‘ रोम–देवता ’ शिरसावंदनीय मानल्या पाहिजेत; व या केसांच्या केसांनाही टीकेनें धक्का लागल्यास आपलें वर्तमानपत्र व छापखाना खर्ची घालून हिरण्य–

श्राद्ध करण्यास तयार असलें पाहिजे. राजद्रोहाची ही अतिव्याप्ति, जामिनकीच्या या प्रचंड रकमा, व प्रत्यहीं अनुभवास येणारा सरकाराचा संशयी स्वभाव, या गोष्टी लक्षांत घेतल्या असतां नवीन कायद्याची अंमलबजावणी कशी काय होईल, व त्यापासून काय भयंकर परिणाम होईल याविषयीं निराळा खुलासा करण्याचें कारण रहात नाहीं. पांच हजारांपर्यंतचा पहिला जामिन व दहा हजारांचा दुसरा जामिन म्हणजे सुमारें १५ हजार रोख रक्कम सरकाराकडे अडकवून धंदा करूं शकणारे छापखानेवाले व वर्तमानपत्रकर्ते हिंदुस्थानांत किती आहेत हें दिसतच आहे. त्यांतूनही दहा पांच हजार रुपये 'भांडवल' म्हणून घालणें वेगळें व तेंच जामिनकींत घालणें हें वेगळें. पहिल्या प्रकारांत रक्कम खेळती राहते, दुसऱ्यांत ती गुंतून पडते; व शिवाय ती रक्कम एखादे वेळीं जप्त होण्याची भीति डोळ्यांपुढें नेहमीं उभीं असणार हें वेगळेंच. तात्पर्य, छापखान्याच्या अगर वर्तमानपत्राच्या धंद्यास यापुढें अशा रीतीनें तिहेरी व तिप्पट भांडवल लागणार व तें नसल्यामुळें वर्तमानपत्रांचा व छापखान्यांचा धंदा बसणार हें उघड आहे. मुद्रण-स्वातंत्र्यावर अशा रीतीनें घाला घालण्यापासून खुद्द सरकारास तरी अखेर व एकंदरीनें फायदा होईल किंवा त्यापासून त्यांची हानि होईल हा प्रश्न अलाहिदा आहे. परंतु तूर्त घटकेस तरी रागाच्या व अविचाराच्या भरांत आज बरेच दिवस मनांत असलेली खवखव त्यांनीं काढून टाकली, व 'लोकांच्या तोंडाचा तोफखाना बंद झाला, आतां आपल्या राज्यसत्तेभोंवतालचा कोट अभेद्य आहे' असें त्यांस वाटत असेल एवढें मात्र खरें!

अशा प्रकारचें बिल पुढें आणण्यास आज नवीन कारण तरी कोणतें झालें? या प्रश्नाचें उत्तर सर हर्बर्ट रिसले यांनीं आपल्या भाषणांत दिलेलें आहे, परंतु तें समर्पक अगर सयुक्तिक आहे असें आम्हांस तरी वाटत नाहीं. प्रथमतः हिंदुस्थानांतील मुद्रणस्वातंत्र्याचा थोडासा इतिहास देऊन रिसलेसाहेब म्हणाले,— "आज सुमारें पंचाहत्तर वर्षांचा इतिहास पाहतां या स्वातंत्र्याचा उपयोग लोकांनीं करावा तसा केला नाहीं. बंगाल प्रांतामध्यें तर या स्वातंत्र्याचें अतिक्रमण होत आहे व राजद्रोहकारक भाषा वर्तमानपत्रें वापरीत आहेत, ही गोष्ट तीस पसतीस वर्षांपूर्वींच अधिकाऱ्यांच्या नजरेस आली, आणि ती न थांबल्यामुळेंच १८७८ सालीं लॉर्ड लिटन यांचे कारकीर्दींत वर्तमानपत्रांचा कायदा करावा लागला. १८८१ पासून आतां-

पर्यंत वर्तमानपत्रांचा असा स्वतंत्र कायदा नव्हता. सरकारनें पीनलकोडावरच तें काम भागवून घेतलें. आम्हीं अलीकडे ताकिदी देऊन पाहिल्या, पांच पन्नास खटलेही केले तरी आम्हांला व्यर्थ शीण मात्र झाला. राजद्रोहाचा खटला केला आणि तो हुकला असें कधींच झालें नाहीं, परंतु आम्हांस ज्या गोष्टी थांबवावयास हव्या त्या थांबवितां आल्या नाहींत. कारण अजून पहावें तों वर्तमानपत्रांतून लोक आपली रडकथा लिहितातच. कोणी म्हणतो, इंग्रज परके व आपमतलबी आहेत; कोणी म्हणतो, इंग्रजी राज्यांतच दुष्काळ पडले व पडतात; कोणी म्हणतो, आगगाडीनें प्लेगचा फैलावा होतो व पाटबंधाऱ्यांनीं दलदल वाढून हिंवताप पसरतो; कोणी म्हणतो, सरकारानें रयतेकडून जमिनीची मालकीच काढून घेतली व देशांतील उद्योगधंदे बुडविण्यास सरकार कारणीभूत झालें; कोणी म्हणतो, इंग्रजी शिक्षणापासून धर्माचा ऱ्हास झाला; कोणी म्हणतो साखर व मीठ मुद्दाम दूषित केलें जातें; कोणी म्हणतो, आफ्रिकेंत हिंदी लोकांचा छळ झालेला सरकारास पाहावतो; कोणी म्हणतो, कराचें ओझें फार जड झालें आहे; कोणी म्हणतो, कराचा पुष्कळसा पैसा लष्करावरच खर्च होतो; कोणी म्हणतो, मोठ्या पगाराच्या जागा युरोपियनांना, थोड्या पगाराच्या जागा तेवढ्या नेटिवांना देतात; तात्पर्य आपआपल्यापरी कोणी कांहीं–कोणी कांहीं म्हणून सरकारला भंडावून व गांजून सोडतात. एवढेंच नव्हे तर ही स्थिति बदलायला स्वार्थत्याग केला पाहिजे, शौर्य व धैर्य दाखविलें पाहिजे असेंहि म्हणतात ! अशा उपदेशाला धर्माची मदत घेतात; परदेशाचे इतिहास, त्यांतील रम्य प्रसंग व विभूतींचीं चरित्रें वर्णन करून सांगतात; खेड्यापाड्यानें सुद्धां वर्तमानपत्रें वाचून दाखवून राजकीय शिक्षणाचा प्रसार करतात; बायकांनींसुद्धां आपलें शील सोडलें व पड्यांतून राजकारणाच्या गोष्टी बोलण्यास त्यांनीं सुरुवात केली आहे— आणि हें सर्व झाल्यामुळें खून व अत्याचार होऊं लागले. अर्थात् ह्या सर्वांस मूळ कारण वर्तमानपत्रें होत. त्याचा प्रतिकार करण्याकरितां सरकाराजवळ स्वतःचीं वर्तमानपत्रें नाहींत कांहीं नाहीं. त्यांनीं तरी काय करावं ? वर्तमानपत्रांचें स्वातंत्र्य हिरावून घेण्यासारखा नवीन कायदा आम्हांला करावा लागला, व म्हणून तो आतां आम्हीं केला. तरी पण जो केला तो १८७८ च्या कायद्यापेक्षां पुष्कळच चांगला केला. कारण त्या कायद्याप्रमाणें हल्लीं वर्तमानपत्रांचा मजकूर 'आगाऊ वाचून मंजूर करण्यास' अधिकारी नेमला नाहीं, तसेंच

पूर्वीप्रमाणें सर्व अधिकार निवळ सरकारच्या हातीं ठेवलेला नसून हायकोर्टाकडे अपील ठेवलें आहे. अशा या कायद्यानें मुद्रणस्वातंत्र्यास मुळींच धक्का येणार नाहीं. अजूनही मनाला वाटेल तें लिहितां येईल; मागितल्यास फक्त जामीन द्यावा आणि मग खुशाल मजेंत वर्तमानपत्रें चालवावीं; राष्ट्रोन्नति झाली तर अशाच कायद्याचे मदतीनें होईल. असला कायदा आस्ट्रिया देशांत आहेहि यास्तव प्रत्येक राष्ट्रभक्तानें या कायद्यास आपली संमति व आपलें पाठबळ देणेंच जरूर आहे."

रिसलेसाहेबांचा हा युक्तिवाद पाहून कोणासहि हंसूं आल्यावांचून राहणार नाहीं, अशी आमची खात्री आहे त्यांनीं कार्यकारणभावांची नुसती खिचडी करण्याचा व वडाची साल काढून पिंपळास डकविण्याचा प्रयत्न केला आहे. परंतु तो कसा साधणार ! या सर्व अनुमानपरंपरेंतील निरनिराळे भाग काढून त्यांच्या मुळाशीं असलेला भ्रम व वितंडवाद त्यांचे गळ्यांत बांधण्यास आज जागा नाहीं. परंतु त्यांतील मुख्य आक्षेपार्ह भाग कोणता हें तेव्हांच दाखवितां येईल. वर्तमानपत्रांतून 'सरकारास राजद्रोहात्मक वाटण्यासारखे' लेख येतात ही गोष्ट कांहीं आजची नाहीं. रिसलेसाहेबांची स्वतःचीच अशी कबुली आहे कीं हा प्रकार आज पसतीस वर्षें चालला आहे. आजच्या स्थितींत त्यांना नवें म्हणतां येण्यासारखें असें कांहीं असेल तर अलीकडे दोन वर्षांत झालेले दहापांच खून. परंतु या खुनांचा व सरसकट वर्तमानपत्रांतील लेखांचा बादरायण संबंध जोडणें हें सर्वस्वी गैर होय. खुनांसारख्या गोष्टींचा उल्लेख करून युक्तिवादाचें तोंड बदलणें किंवा बंद पाडणें ही गोष्ट अधिकारी लोकांस उत्तम तऱ्हेनें साधलेली आहे खरी. परंतु त्यांचें हें म्हणणें खरें आहे असें घेऊन क्षणभर चाललें तरी आम्ही असें विचारतों कीं, खुनास उत्तेजन देणाऱ्या व्यक्तीस व वर्तमानपत्रांस न्यायकोर्टांत ओढून शिक्षा देण्यास तुमच्याजवळ कायदा व कोर्टें आहेत कीं नाहींत ? मग वर्तमानपत्रांच्या कायद्याचेंच प्रयोजन काय ? एखादा लेख चिथावणी करणारा आहे किंवा नाहीं, या दोहोंपैकीं कोणचा तरी एक प्रकार असला पाहिजे. असेल तर त्यास शिक्षा करणारे इतर कायदे आहेत म्हणून मुद्रण-स्वातंत्र्याला आळा घालणाऱ्या निराळ्या कायद्याचें कारण नाहीं; बरें तो तसा नसेल तर हें प्रयोजन नाहींच नाहीं. तात्पर्य, खून वगैरे हें सर्व थोतांड आहे; म्हणजे खून झाले हें खरें आहे, परंतु आधीं ते वर्तमानपत्रांतील लेखांमुळेंच

पर्यंत वर्तमानपत्रांचा असा स्वतंत्र कायदा नव्हता. सरकारनें पीनलकोडावरच तें काम भागवून घेतलें. आम्हीं अलीकडे ताकिदी देऊन पाहिल्या, पांच पन्नास खटलेही केले तरी आम्हांला व्यर्थ शीण मात्र झाला. राजद्रोहाचा खटला केला आणि तो हुकला असें कधींच झालें नाहीं, परंतु आम्हांस ज्या गोष्टी थांबवावयास हव्या त्या थांबवितां आल्या नाहींत. कारण अजून पहावें तों वर्तमानपत्रांतून लोक आपली रडकथा लिहितातच. कोणी म्हणतो, इंग्रज परके व आपमतलबी आहेत; कोणी म्हणतो, इंग्रजी राज्यांतच दुष्काळ पडले व पडतात; कोणी म्हणतो, आगगाडीनें प्लेगचा फैलावा होतो व पाटबंधाऱ्यांनीं दलदल वाढून हिंवताप पसरतो; कोणी म्हणतो, सरकारानें रयतेकडून जमिनीची मालकीच काढून घेतली व देशांतील उद्योगधंदे बुडविण्यास सरकार कारणीभूत झालें; कोणी म्हणतो, इंग्रजी शिक्षणापासून धर्माचा ऱ्हास झाला; कोणी म्हणतो साखर व मीठ मुद्दाम दूषित केलें जातें; कोणी म्हणतो, आफ्रिकेंत हिंदी लोकांचा छळ झालेला सरकारास पाहावतो; कोणी म्हणतो, कराचें ओझें फार जड झालें आहे; कोणी म्हणतो, कराचा पुष्कळसा पैसा लष्करावरच खर्च होतो; कोणी म्हणतो, मोठ्या पगाराच्या जागा युरोपियनांना, थोड्या पगाराच्या जागा तेवढ्या नेटिवांना देतात; तात्पर्य आपआपल्यापरी कोणी कांहीं–कोणी कांहीं म्हणून सरकारला भंडावून व गांजून सोडतात. एवढेंच नव्हे तर ही स्थिति बदलायला स्वार्थत्याग केला पाहिजे, शौर्य व धैर्य दाखविलें पाहिजे असेंहि म्हणतात! अशा उपदेशाला धर्माची मदत घेतात; परदेशाचे इतिहास, त्यांतील रम्य प्रसंग व विभूतींचीं चरित्रें वर्णन करून सांगतात; खेड्यापाड्यानें सुद्धां वर्तमानपत्रें वाचून दाखवून राजकीय शिक्षणाचा प्रसार करतात; बायकांनींसुद्धां आपलें शील सोडलें व पड्यांतून राजकारणाच्या गोष्टी बोलण्यास त्यांनीं सुरुवात केली आहे—आणि हें सर्व झाल्यामुळें खून व अत्याचार होऊं लागले. अर्थात् ह्या सर्वांस मूळ कारण वर्तमानपत्रें होत. त्याचा प्रतिकार करण्याकरितां सरकाराजवळ स्वतःचीं वर्तमानपत्रें नाहींत कांहीं नाहीं. त्यांनीं तरी काय करावें? वर्तमानपत्रांचें स्वातंत्र्य हिरावून घेण्यासारखा नवीन कायदा आम्हांला करावा लागला, व म्हणून तो आतां आम्हीं केला. तरी पण जो केला तो १८७८ च्या कायद्यापेक्षां पुष्कळच चांगला केला. कारण त्या कायद्याप्रमाणें हल्लीं वर्तमानपत्रांचा मजकूर 'आगाऊ वाचून मंजूर करण्यास' अधिकारी नेमला नाहीं, तसेंच

पूर्वीप्रमाणें सर्व अधिकार निवळ सरकारच्या हातीं ठेवलेला नसून हायकोर्टाकडे अपील ठेवलें आहे. अशा या कायद्यानें मुद्रणस्वातंत्र्यास मुळींच धक्का येणार नाहीं. अजूनही मनाला वाटेल तें लिहितां येईल; मागितल्यास फक्त जामीन द्यावा आणि मग खुशाल मजेंत वर्तमानपत्रें चालवावीं; राष्ट्रोन्नति झाली तर अशाच कायद्याचे मदतीनें होईल. असला कायदा आस्ट्रिया देशांत आहेहि यास्तव प्रत्येक राष्ट्रभक्तानें या कायद्यास आपली संमति व आपलें पाठबळ देणेंच जरूर आहे."

रिसलेसाहेबांचा हा युक्तिवाद पाहून कोणासहि हंसूं आल्यावांचून राहणार नाहीं, अशी आमची खात्री आहे त्यांनीं कार्यकारणभावांची नुसती खिचडी करण्याचा व वडाची साल काढून पिंपळास डकविण्याचा प्रयत्न केला आहे. परंतु तो कसा साधणार ! या सर्व अनुमानपरंपरेंतील निरनिराळे भाग काढून त्यांच्या मुळाशीं असलेला भ्रम व वितंडवाद त्यांचे गळ्यांत बांधण्यास आज जागा नाहीं. परंतु त्यांतील मुख्य आक्षेपार्ह भाग कोणता हें तेव्हांच दाखवितां येईल. वर्तमानपत्रांतून 'सरकारास राजद्रोहात्मक वाटण्यासारखे' लेख येतात ही गोष्ट कांहीं आजची नाहीं. रिसलेसाहेबांची स्वतःचीच अशी कबुली आहे कीं हा प्रकार आज पसतीस वर्षें चालला आहे. आजच्या स्थितींत त्यांना नवें म्हणतां येण्यासारखें असें कांहीं असेल तर अलीकडे दोन वर्षांत झालेले दहापांच खून. परंतु या खुनांचा व सरसकट वर्तमानपत्रांतील लेखांचा बादरायण संबंध जोडणें हें सर्वस्वी गैर होय. खुनांसारख्या गोष्टींचा उल्लेख करून युक्तिवादाचें तोंड बदलणें किंवा बंद पाडणें ही गोष्ट अधिकारी लोकांस उत्तम तऱ्हेनें साधलेली आहे खरी. परंतु त्यांचें हें म्हणणें खरें आहे असें घेऊन क्षणभर चाललें तरी आम्ही असें विचारतों कीं, खुनास उत्तेजन देणाऱ्या व्यक्तीस व वर्तमानपत्रांस न्यायकोर्टांत ओढून शिक्षा देण्यास तुमच्याजवळ कायदा व कोर्टें आहेत कीं नाहींत ? मग वर्तमानपत्रांच्या कायद्याचेंच प्रयोजन काय ? एखादा लेख चिथावणी करणारा आहे किंवा नाहीं, या दोहोंपैकीं कोणचा तरी एक प्रकार असला पाहिजे. असेल तर त्यास शिक्षा करणारे इतर कायदे आहेत म्हणून मुद्रण-स्वातंत्र्याला आळा घालणाऱ्या निराळ्या कायद्याचें कारण नाहीं; बरें तो तसा नसेल तर हें प्रयोजन नाहींच नाहीं. तात्पर्य, खून वगैरे हें सर्व थोतांड आहे; म्हणजे खून झाले हें खरें आहे, परंतु आधीं ते वर्तमानपत्रांतील लेखांमुळेंच

होतात हें खरें नाहीं व त्याकरितां मुद्रणस्वातंत्र्यावर घाला घातलाच पाहिजे, हें तर खरें नाहींच नाहीं. कारण सरकार सर्व बाजूंनीं आजकाल सायुध व सशक्तिक आहे. आज हिंदुस्थानांत राजा व प्रजा यांचा, एका बाजूस पंचहत्यारी घोडेस्वार व दुसरे बाजूस निःशस्त्र पदाती असा विपरीत संबंध आहे. वर्तमानपत्रांत लेख आल्याबरोबर त्याचें भाषांतर करण्यास नोकर आहेत, त्याचें स्वारस्य सांगण्यास स्नेही व हिताचिंतक आहेत, त्यांवर फिर्याद करण्याची परवानगी मागण्यास व फिर्यादीचें काम चालविण्यास पगारी नोकर आहेत, न्यायमनसुबा करण्यास कोर्टें आहेत, नेहमींच्या कोर्टाला वेळ नसेल तर स्वतंत्र कोर्टें नेमण्यास व झटपट तडकाफडकी न्याय करविण्यास अधिकार व असामी आहेत, गुप्त पोलिसांचे तांडे व उघड पोलिसांचे कंपू, सैन्य, आरमार, टपाल, आगगाड्या, तारायंत्रें,—तात्पर्य सर्व सामुग्री सरकारची घरची असून सदा तत्पर व अनुकूल आहे. बरें, गेल्या दोन सालांत कायदे करून स्वतःस स्वतंत्र अधिकारहि सरकारांनीं थोडे घेतले आहेत असें नाहीं. आजच्या घटनेस पीनल कोड व पोलिस ॲक्ट यांखेरीज सभाबंदीचा कायदा, स्फोटक द्रव्याचा कायदा, अत्याचारांस उत्तेजन देणाऱ्या वर्तमानपत्रांस रसातळास नेऊन पोंचविण्याचा कायदा अशीं निवडक व राजकारणाच्या लढाईच्या प्रत्येक अंगास लागणारीं शेंकडों हत्यारें सरकाराजवळ पाजळलेलीं सज्ज आहेत. असें असतां आणखी नवीन हत्यारांचें कारण काय ?

तात्पर्य, खून होतात ही सबब खरी नाहीं. खरी सबब अशी आहे कीं, ज्या राजकीय गाऱ्हाण्यांचा तीव्र निषेध वर्तमानपत्रांतून होतो तीं गाऱ्हाणीं खरीं असून सरकारास त्यांचें समर्थन करणें शक्य नाहीं, व त्यांचा पुनः पुनः उच्चार झालेला ऐकून सरकारचें चित्तस्वास्थ्य नाहींसें होतें. वर्तमानपत्रांच्या मुस्कटदाबीचा कायदा हा, अत्याचाररूपी ज्वर न यावा म्हणून तो थांबविण्यास आगाऊ दिलेलें औषध नसून—प्रजेनें केलेलीं केविलवाणी खरीं गाऱ्हाणीं ऐकून खुद्द सरकारासच जी मळमळ उत्पन्न होते तिजवर प्रतिबंधक औषध म्हणून या नव्या कायद्याची योजना आहे. गुन्हा घडून आल्यावर मग गुन्हेगारास शिक्षा करण्यापेक्षां तो घडून न येईल अशीच योजना केलेली बरी, हें म्हणणें सयुक्तिक दिसतें खरें. परंतु मनुष्याच्या हातून पुढें गुन्हा होऊं नये म्हणून आगाऊच त्याचे हातपाय तोडण्यासारखा हल्लींचा कायदा आहे. अशा तऱ्हेची प्रति-

बंधक औषधें इतर फारच थोड्या देशांत देण्यांत येत असतील ! रिसलेसाहेबांनीं आस्ट्रियाचें उदाहरण दिलें; परंतु वर्तमानपत्रांच्या उपदेशानें व चळवळीनें आम्ही हिंदुस्थानांत जें मिळण्याची महत्त्वाकांक्षा धरीत आहों तें आस्ट्रियन लोकांस पूर्वीच मिळालेलें आहे. आस्ट्रियामध्यें पार्लमेंट असून तेथें लोकांच्या सुखदुःखांचा अधिकारयुक्त वाणीनें खल करण्यास आस्ट्रियन लोकांस सवड सांपडते. आस्ट्रियांतील विष हिंदुस्थानांत घेण्यास रिसलेसाहेब तयार आहेत; परंतु त्याचबरोबर त्या विषाचा तोडगा किंवा उतारा इकडे आणूं देण्यास ते तयार आहेतसे दिसत नाहीं. परंतु आधीं इंग्रजांच्या अमलाखालीं असणाऱ्या हिंदुस्थानानें आस्ट्रियाकडे काय म्हणून पहावें ? आपला मुलगा आपल्याबरोबरीनें सुग्रास अन्न खाण्याकरितां भांडतो व हट्ट करतो असें पाहून, एखाद्या धनिक पण कंजूष बापानें जर शेजारच्या भिकाऱ्याकडे बोट दाखवून त्याचें समाधान करण्याचा प्रयत्न केला तर तो साधेल काय ? हिंदुस्थानांतले तीस कोट रुपये सालिना इंग्लंडास जातात, आस्ट्रियाकडे जात नाहींत; आम्ही हिंदी लोक आज ब्रिटिश सार्वभौमाची प्रजा आहों, आस्ट्रियन बादशहाची नव्हे; हिंदुस्थानांतील राज्य हें इंग्रज बादशहाच्या मुकुटाला हिऱ्याप्रमाणें शोभा देतें, त्याचा एक किरणही आस्ट्रियन बादशहाचे तोंडावर पडत नाहीं. असें असतां खुद्द इंग्लंडचा ढळढळीत डोळ्यापुढचा दाखला सोडून आस्ट्रियाचा कां ? इंग्लंडच्या लगामाला जर आम्हीं तोंड पुढें केलें पाहिजे तर इंग्रजी नागरिकत्वाचे हक्कांचा तोबराही आम्ही कां मागूं नये ? इंग्लंडांत अशा तऱ्हेचा वर्तमानपत्रांचा कायदा आहे काय ? इंग्लंडांतही क्वचित् अत्याचार होतात कीं नाहीं ? इंग्लंडांतील वर्तमानपत्रांचे संपादक सर्वच सात्त्विक साधु आहेत काय ? त्यांच्या हातून टीकेच्या मर्यादेचें अतिक्रमण प्रसंगीं होतें कीं नाहीं ? असें असतां इंग्लंडांत विचार-स्वातंत्र्य व हिंदुस्थानांत मात्र आस्ट्रियाकडे हवाला, असा पंक्तिप्रपंच कां ? इंग्रजी राज्यापासून होणारे तोटे जर आम्हांस भोगले पाहिजेत, तर नफे आम्हीं कां मागूं नयेत ? रिसलेसाहेबांनीं उपलक्षणादाखल उदाहरणें देतांना ज्या विषयांचा उल्लेख केला ते विषय इंग्लंडांतील वर्तमानपत्रांना केव्हांहि वर्ज्य ठरविले गेलेले नव्हते; व आजवर हिंदुस्थानांतही त्यांची चर्चा करितां येत असे. परंतु यापुढें जर ते विषय वर्ज्य मानावयाचे, तर मग वर्तमानपत्रांनीं लिहावयाचें तरी काय ? याचीं उदाहरणेंही रिसलेसाहेबांनीं सांगितलीं असतीं तर बरें झालें असतें. देश सधन

आहे कीं निर्धन आहे, कर भारी आहेत किंवा हलके आहेत, त्यांचा खर्च नीट होतो कीं गैर होतो, हे विषय लिहावयाचे नाहींत. अगर ते लिहितांना कोण-त्याही अधिकाऱ्यावर चुकून देखील कसलाही आरोप करावयाचा नाहीं, थट्टेखोर-पणानें किंवा व्याजोक्तीनें अगर वक्रोक्तीनें लिहावयाचें नाहीं—आणि हीं सर्व बंधनें पाळील तोच तेवढा प्रामाणिक टीकाकार, इतर सर्व अप्रामाणिक व जामीन मागण्यास पात्र असेंच व्हावयाचें असेल, तर मग प्रामाणिकपणा व मतस्वातंत्र्य या दोनही शब्दांचा अर्थच इंग्रजी राज्याच्या आजच्या मनूंत पार बदलून गेला आहे, असेंच म्हणणें भाग येतें, हा नवीन कायदा इंग्रजी राष्ट्राच्या पूर्व परंपरेस सर्वस्वीं सोडून व हिंदी लोकांच्या मनःसंस्कृतीस अपमानास्पद असा आहे, असें म्हटल्याशिवाय गत्यंतर नाहीं. अशा कायद्याचे भावी परिणाम काय होतील हें आजच जरी सांगणें कठीण असलें तरी, लॉर्ड मोर्ले यांनीं १९०८ सालीं डिसेंबर महिन्याच्या १७ तारखेस लॉर्ड सभेंत सुधारणांच्या विषयांवर बोलतांना म्हटल्याप्रमाणें ‘ मुद्रणस्वातंत्र्यावर घाला घातल्यानें अधिकाऱ्यांस आपण एक नवीन ‘ धोरण ’ ( Policy ) चालू केल्याचें समाधान कदाचित् मिळेल, परंतु राष्ट्रावर त्याचा परिणाम वाईट होईल. लोक बोलणार नाहींत, परंतु मनां-तून अस्वस्थ व असंतुष्ट राहतील, व इंग्रज बादशहाच्या मुकुटांतील देदीप्यमान अशा हिऱ्याचें तेज नष्ट होईल ! ”

---

## २९. तख्त, तागडी व तरवार.

( तारीख २६ जानेवारी सन १९०९. )

शिरोभागीं निर्दिष्ट केलेल्या तीन शब्दांचा अनुक्रम केवळ भाषासौकर्याकरितां वरीलप्रमाणें आम्हीं लाविला आहे. परंतु त्यांचा खरा अनुक्रम वेगळाच आहे. म्हणजे प्रथम तागडी, नंतर तरवार व नंतर तख्त. या तीन पदार्थांचें महत्त्व किती आहे याची कल्पना आमच्या वाचकांस थोडीबहुत असेलच. तागडी हा सर्व ऐहिक व्यवहाराचा पायाच आहे असें म्हटलें तरी चालेल. ग्रीक तत्त्व-वेत्ता प्लेटो यानें केवळ कल्पनेनें बनविलेल्या ‘ सुवर्ण–युगांत ’ तागडीशिवाय कदाचित् भागण्यासारखें असेल; अथवा दिव्य अमृत एकदांच कायमचें पिऊन टाकून अंगाची सांवलीहि न पडेल अशा विरळ व पारदर्शक शरीरानें संचार

करणाऱ्या देवांच्या स्वर्गलोकांतहि तागडीचें काम नसेल. पण पृथ्वीवरील या संसारयात्रेंत तागडीशिवाय एक दिवसही चालणार नाहीं. जेथें 'गुप्त-दान' हे निवळ शब्द आहेत; जेथें 'देवाण व घेवाण' हीं एकमेकांविरुद्ध तोलून, कांटा थोडाबहुत झुकला तर तो आपणांकडेच झुकावा अशा बुद्धीनें मनुष्य पदोपदीं वागत असतो; व जेथें मानमरातब, अब्रू अगर सद्भावना अशांनाहि 'मोबदल्या' च्या संकटांतून सोडविणें हें साध्य असलेंच तर निदान कष्टसाध्य असतें, अशा या जगाच्या द्वारावर कोणीं मार्मिक कारागिरानें तराजूचें चित्र, आंतील निरंतरच्या घडामोडीचें दर्शक म्हणून, काढलें तर ती दुष्टबुद्धीनें केलेली केवळ थट्टाच आहे असें म्हणतां येणार नाहीं. तरवारीसंबंधानें पाहिलें तर असें दिसून येईल कीं, तिचें प्रत्यक्ष दर्शन जरी पावलोपावलीं घडत नसलें, तरी निदान तिची दहशत, कोठें, केव्हां कोणत्याना कोणच्या रूपानें नसतें असें होणारच नाहीं. समाजाचा कोणचाहि व्यवहार कायद्याशिवाय चालत नाहीं; व कोणत्याहि कायद्याचे अंगीं चैतन्याचा संचार होण्यास त्याच्या मागोमाग भिंतीला तरवार लटकवून ठेवलेलीच आहे असें सर्वांस दिसावें लागतें. तख्त हें तागडी व तरवार या दोहोंच्याहि मागें फार लांब असून दोहोंहून तें अधिक सुगूढ आहे. किंबहुना तागडी व तरवार हीं दरवाजावर जयविजयाप्रमाणें द्वारपालाचें काम करीत असून, इमारतीच्या आंतल्या गाभाऱ्यांत तख्त हें अर्धें दृश्य, अर्धें आच्छादलेलें, अर्धें जागृत, अर्धें निद्रिस्त असें नित्य नांदणारें दैवत आहे, अशीहि कल्पना शोभेल. तागडी, तरवार व तख्त या तीनहि वस्तु स्वतः निर्जीव आहेत. तागडींतून औषध, विष किंवा साखर कांहींहि तोलून दिलें, अथवा वजन खरें किंवा खोटें घातलें तरी त्या बाबतींत ती एक ब्रहि काढीत नाहीं. तरवारीचेंहि असेंच आहे. तिच्या स्वतःच्या ठिकाणीं पक्षपात असा नाहीं. खुनी, दरोडेखोर किंवा स्वदेशास स्वातंत्र्य मिळवून देणारे योद्धे या दोहोंनाहि ती सारखीच मदत करते. तागडीला जसें गोड कडू हें कळत नाहीं, तसेंच तरवारीला शत्रू व मित्र यांच्या रक्ताची रुचि वेगवेगळी लागत नाहीं. तख्ताचेंहि तसेंच आहे. घोड्याला आपल्या पाठीवर कोण स्वार झाला हें कळतें; पण तख्ताला आपणावर कोण राजा आरूढ झाला आहे याचें ज्ञान नसतें. अशा स्वरूपाच्या या तीन पदार्थांचा संबंध महत्त्वाकांक्षी मनुष्यामुळें मात्र एकत्र येतो. चंचीला जसे कप्पे किंवा कपाटाला जसे खण, तशीं जगां-

तील राजकारणाला तख्त, तागडी व तरवार हीं तीन तोंडें आहेत; व या दृष्टीनेंच त्यांचा आज आम्हांस विचार कर्तव्य आहे.

युरोपियन लोक हिंदुस्थानांत आले ते प्रथम हातीं निवळ तागडी घेऊन आले, ही गोष्ट जगप्रसिद्ध असून खुद्द इंग्रजांनाहि ती कबूल आहे. परंतु व्यापाऱ्यांच्या पेशानें या देशांत आल्यावर त्यांच्या हातची तागडी जाऊन तेथें हळू हळू तलवार कशी चमकूं लागली; व अखेर तागडी व तरवार या दोहोंच्या जोरावर त्यांना हिंदुस्थानांत आपलें तख्त कसें स्थापित करितां आलें, या मनोरंजक व हितबोधकारक स्थित्यंतराचा इतिहास रा. सरदेसाई यांच्या या प्रस्तुतच्या पुस्तकांत दिलेला आहे. हिंदुस्थानामध्यें जो सोन्याचा धूर निघत होता तो पाहून पाश्चिमात्यांच्या तोंडांस पाणी कसें सुटलें, पूर्वेकडील व्यापारी जिनसांचा प्रवेश पश्चिमेंत झाल्यावर त्यांच्या वासानें माग काढीत काढीत हे 'सुवर्णमृगाची' पारध करणारे शिकारी पूर्वेंत कसे घुसले, 'ओसरी'-चा आसरा मिळाल्याबरोबर हातपाय पसरण्यास सुरुवात करून अखेरीस आपल्या महत्त्वाकांक्षेनें त्यांनीं सर्व घर कसें हस्तगत केलें; हा सर्व प्रकार इतिहासांत प्रत्यक्ष-घडून आला नसता तर केवळ अद्भुत पुराणांतला काल्पनिक कथाभाग असाच वाटला असता. ज्यांना फक्त वरवर पाहून अनुमानें काढण्याची संवय आहे, ज्यांना आजच्या युरोपियन राज्यकारभारांत केवळ साम्राज्याचा दर्प, अधिकाराची हाव, व लष्करी शिस्त एवढ्याच गोष्टी प्रमुखत्वानें नजरेस येतात व सहा हजार मैलांपलीकडील एका लहानशा बेटांत हिंदुस्थानांतील व्यापाराच्या सर्व दोऱ्या किती कुशलतेनें हालविल्या जात आहेत याची कल्पना होत नाहीं, त्यांचें लक्ष इंग्रजी राजसत्तेचें मूळ हुडकून काढण्याकडे कधींहि वेधणें शक्य नाहीं. परंतु या सत्तेचा सर्व प्राण व्यापारावर अवलंबून आहे, व त्यांच्या तख्ताकरितां तागडी व तरवार हीं नसून, तागडीकरितां तख्त व तरवार हीं आहेत ही गोष्ट प्रत्येक सत्यान्वेषणप्रिय मनुष्यानें समजून घेणें जरूर आहे, व हीच रा. सरदेसाई यांचा इतिहास वाचल्यानें मनावर चांगली ठसते यांत शंका नाहीं. इतर अनेक पाश्चिमात्य राष्ट्रांप्रमाणें इंग्रजांची सधनता व्यापारावर अवलंबून असून त्यांची राजसत्ता त्यांच्या सधनतेवर अवलंबून आहे. व यामुळें त्यांच्या व्यापारास जगाचे पाठीवर कोठेंहि धक्का बसला कीं, त्यांस आपल्या अंगाचें रक्त निघाल्याप्रमाणें दुःख होतें व राग येतो. 'युरोपियनांच्या काळजाला जाऊन

भिडण्याचा मार्ग त्यांच्या शरीरांतून नसतो तर त्यांच्या खिशांतून असतो' अशी एक म्हण रूढ झालेली असून तिच्या यथार्थतेची खूण जगांत कोठेंहि मिळेल. इंग्रजांच्या आधीं यहुदी, मिसरी, इराणी, ग्रीक, रोमन, अरब, वगैरे लोकांच्या हातीं पूर्वेकडील गिऱ्हाइकी जिनसांचा व्यापार कांहीं काळपर्यंत होता. परंतु त्यांपैकीं कोणींहि हिंदुस्थानांत येऊन व्यापारी वसाहती केल्या नाहींत. सुप्रसिद्ध शिकंदर बादशहा दिग्विजय करीत करीत हिंदुस्थानांत बराच अलीकडेपर्यंत घुसला होता. परंतु त्याची स्वारी एखाद्या गुलहौशी प्रवाशाच्या सफरीसारखीच झाली. त्याची पाठ फिरल्याबरोबर त्याचा लोकांस विसरहि पडला.

हिंदुस्थानांत येऊन प्रथम वसाहत केली अशी पोर्तुगीज लोकांनीं. पंधराव्या शतकांत युरोपखंडामध्यें परदेशगमन व परदेशसंशोधन यांची लाट सर्वत्र पसरली होती; व कोलंबसानें अमेरिका खंड शोधून काढिल्यामुळें स्पॅनिश लोकांवर शेंदीडशें वर्षेपर्यंत सुवर्णकणांचा जो नुसता पाऊस पडला तो पाहून ज्याला पूर्वेकडे सफर करून द्रव्याच्या राशी घरीं आणण्याचें वेड लागलें, या लोकांपैकीं पोर्तुगीज खलाशी वास्कोडिगामा याच्या प्रयत्नास यश येऊन, १४९८ सालीं मे महिन्याच्या २२ वे तारखेस मलबार किनाऱ्यावरील कालिकत बंदरांत पाश्चिमात्यांचा प्रथम प्रवेश झाला. या साहसाचें सुफळ त्याचे राष्ट्रास पुढें शंभर वर्षेपर्यंत मिळालें. अन्यायानें मिळविलेला मुलूख अगर संपत्ति पवित्र करण्यास त्याकाळीं धर्मगुरूचा नुसता आशीर्वाद पुरे होत असे. व रोम येथील पोपच्या हुकुमाप्रमाणें जगाची वांटणी व्हावयाची म्हटली तर हिंदुस्थानदेश पोर्तुगालच्या वांटणसि निरंतर जावयास पाहिजे होता! परंतु हलवायांच्या घरावरचें ब्रह्मार्पण कोण किती वेळ मानणार? पोर्तुगालनें हिंदुस्थानच्या व्यापाराची लूट मिळविण्यांत आघाडी मारली तरी त्यास या व्यापाराचा कायमचा मक्ता मिळणें शक्य नव्हतें. वास्कोडिगामानें पहिल्यानें हिंदुस्थानचा नवीन जलमार्ग शोधून काढला खरा; परंतु समुद्रावरच्या अफाट व असंख्य वाटांना त्यास कुलूप घालतां येणें शक्य नव्हतें; आणि पुढें डच व इंग्रज व्यापाऱ्यांनीं तो मार्ग खूप मळवला, एवढेंच नव्हे तर हळूहळू पोर्तुगिज व्यापाऱ्यांना हिंदुस्थानांतून काढूनहि लावलें. "भुकेलेल्या लांडग्यांचे कळप उत्कृष्ट मेंढरांच्या कळपावर जाऊन पडावे" तसे हे पाश्चिमात्य व्यापारी हिंदुस्थानावर जाऊन पडले, असें

एका युरोपियन ग्रंथकारानेंच वर्णन केलेलें आहे. सर्व हिंदुस्थानास एक असा कोणी मेंढपाळ त्यावेळीं नव्हता; व हजारों मैलांवरून टीचभर होडग्यांत बसून येणाऱ्या लोकांनीं संपत्ति कितीहि हरण करून नेली तरी हत्तीच्या अंगावरचा मळ गेल्याहून अधिक हानी होणार नाहीं, अशा घमेंडीनें समुद्रकिनाऱ्यावरील देशी राजांनीं त्यांस प्रतिबंध केला नाहीं. शिवाय व्यापारी वर्गाच्या तोंडीं जी गोड व मनोहर भाषा असते ती पोर्तुगीज व्यापाऱ्यांस चांगली बोलतां येत असल्यामुळें हे राजे भुलूनहि गेले. कपटाचीहि भर त्यांतच पडली. "तुम्ही हिंदुस्थानांत कशाला आलां ?" असें कालिकतच्या झामोरिनानें पोर्तुगीज व्यापाऱ्यांस विचारतां, वास्कोडिगामानें अशी थाप दिली कीं, "आमच्याबरोबर सफरीस निघालेल्या गलबतांची व आमची चुकामूक झाली आहे, व तीं शोधण्यास आम्ही आलों आहों; हिंदुस्थानकडे येण्याचा आमचा मनोदय नव्हता."

सन १६०० सालीं ईस्ट इंडिया कंपनीची स्थापना झाल्यावर, हिंदुस्थानांत येणाऱ्या व्यापाऱ्यांस इकडील राजांना दाखविण्याकरितां जें स्वदस्तुरचें पत्र इंग्लंडच्या राणीनें दिलें होतें, त्यांतहि खालील गोडगोड विधानें केलेलीं आढळतात. प्रथम 'अनियंत्रित व्यापारा'ची थोरवी किती आहे, व परमेश्वरास झालें तरी अनियंत्रित व्यापारच मंजूर आहे अशाविषयीं प्रौढ शब्दांनीं कथन करून पुढें असें लिहिलेलें आहे:—"महाराज! वर सांगितलेल्या हेतूशिवाय आणखी आम्हांस असें समजलें आहे कीं, कोणीहि परराष्ट्राचे लोक व्यापाराचा उद्देश मनांत धरून स्नेहभावानें व सौम्य वृत्तीनें आपल्या देशांत गेले असतां आपण त्यांचा उत्तम प्रकारें आदर करीत असतां, ह्यावरून आमच्या कित्येक व्यापाऱ्यांस आपल्या देशांत जाण्याची परवानगी देण्यास आम्हांस उमेद आली आहे. आपल्या देशांत व्यापारी मालाचा सौदा फार उत्तम होतो; असें इकडे खात्रीलायक कळल्यावरून जलमार्गाचीं अनेक दुर्धर संकटें सहन करूनहि हे व्यापारी तिकडे जात आहेत. तेथें आपल्या लोकांशीं व्यापारी धोरणानें सौदा करावा, म्हणजे इकडचे जिन्नस त्यांस विकून तिकडचे इकडे विकत आणावे, असा त्यांचा उद्देश आहे. एवढीं संकटें सोसून आपल्या देशांत प्रवेश करण्याची ज्या अर्थी त्यांस स्फूर्ति झाली आहे त्या अर्थी आपणहि त्यांचा योग्य परामर्ष घेतला असतां बोलण्याचालण्यांत व व्यवहारांत ते चोख व सभ्य आहेत, असें आपणांस दिसून येईल व ते आपल्या देशांत आल्याबद्दल आपणांस वाईट

वाटण्याचें कारण रहाणार नाहीं. तसेंच त्यांनीं आपल्या गलबतांतून नेलेला इकडचा माल आपणांस देण्यांत व आपल्याकडचा माल इकडे आणण्यांत एकमेकांचा निकट सहवास व व्यवहार घडल्यावर त्यांनीं पुनरपि असाच माल घेऊन आपल्या देशांत यावें, असें आपणास वाटेल." इतकें लिहून एलिझाबेथ राणीनें पुढील वाक्यें लिहिलीं आहेत, तीं मात्र विशेष लक्षांत ठेवण्यासारखीं आहेतः—"आजपर्यंत फक्त स्पॅनिश व पोर्तुगीज व्यापारीच कायते इकडचा माल आपल्या देशांत नेत होते. पण ते लोक व्यापाराच्या कामांत आमच्या व्यापाऱ्यांस व इतर लोकांस नाहक जाच करितात. वास्तविक पाहिलें तर ते आपल्या देशांत व्यापाराच्या उद्देशानें गेले आहेत असें नाहीं. तिकडच्या सर्व देशांचे मालक व बादशाह आपणच आहों, असें ते लोक समजतात; व तिकडचे सर्व लोक आपल्या केवळ प्रजा आहेत असें ते इकडे लोकांस सांगत सुटले आहेत; व लिहिण्यांतहि ते तसाच व्यवहार उघडपणें करीत आहेत...आपली आज्ञा असेल तर आमचे कांहीं व्यापारी इकडे परत येऊन पुन्हा इकडचा माल भरून तिकडे नेत तोंपर्यंत बाकीची मंडळी आपल्या कृपाछत्राखालीं तेथेंच राहून तेथची भाषा वगैरे शिकतील—कीं जेणेंकरून एकमेकांचे विचार व रीतरिवाज एकमेकांस कळल्यानें स्नेह वृद्धिंगत होऊन उभयतांचा उद्देश पार पडेल. आपला आमचा स्नेह वृद्धिंगत होऊन दळणवळण वाढावें यासाठीं उभयतांमध्यें कांहीं ठराव किंवा करार होण्याची जरूरी आहे. त्यासाठीं हें पत्र आपणाकडे घेऊन जाणाऱ्या इसमांस आमच्यातर्फे बोलणें व ठराव करण्यास आम्हीं संपूर्ण अधिकार दिला आहे. ते गृहस्थ आपल्याशीं जे ठराव करतील ते आम्ही इमानानें पाळूं व आपण आमच्या ह्या लोकांवर जी मेहेरबानी किंवा उपकार कराल त्याची फेड आम्ही मोठ्या आनंदानें करूं. अखेरीस आमचें एवढेंच मागणें आहे कीं, आमचा हा उद्देश आपणास पसंत पडल्याचें निदर्शक म्हणून आपण या पत्राचा जबाब गेलेल्या मंडळीजवळ द्यावा. आपण जबाब पाठविल्यानें आपली मोठी मेहेरबानी होईल व आम्हांस अतिशय संतोष वाटेल."

इंग्रजी व्यापाऱ्यांचा हिंदुस्थानांत पाय रुजल्यावर थोड्याच दिवसांनीं त्यांस राज्यस्थापनेची इच्छा झाली; व अवरंगजेब बादशहाचे मृत्यूचे सुमारास मोंगलाईची इमारत ढांसळूं लागलेली पाहून, दाक्षिणेंत जशी शिवाजीमहाराजांनीं स्वराज्य

स्थापनेची सिद्धता केली, त्याचप्रमाणें प्रथम बंगाल्यांत मोंगलांचे कर वसूल करण्याची सनद घेऊन, नंतर देशी राजांच्या भांडणांमध्यें आळीपाळीनें सर्वांस मदत करून, व साधेल तेथें स्वतःची तरवार चालवून इंग्रजांनीं राज्य स्थापिलें. हें महाकर्म साधणारे लोक जरी द्रव्यलोभी होते तरी आपल्या राष्ट्राचे ते खरे भक्त होते; आणि आपल्या राजाच्या नांवाचा आश्रय केल्यानें, व हिंदुस्थानांत मिळालेल्या सुग्रास अन्नाचा नैवेद्य त्यास समर्पण केल्यानें, आपली फारशी हानि नसतां आपल्या राष्ट्राचा मात्र मोठा नफा असून, उलट वेळवखत आला असतां आपल्यास राजाकडून मदत मिळण्याचा संभव आहे, हें समजण्याइतकी त्यांस दूरदृष्टि होती. इंग्रजांचे आधीं किंवा त्यांचे बरोबर हिंदुस्थानांत आलेल्या पोर्तुगीज, डच, फ्रेंच या सर्व जातींच्या युरोपियन व्यापाऱ्यांचा मोड कसा झाला व इंग्रजांचा तेवढा जय कसा झाला, हा कथाभाग फारच मनोरंजक आहे. येथें त्याविषयीं लिहिण्यास पुरेशी जागा नाहीं. परंतु सर्व प्रकारचीं भांडणें भांडून, सर्व युरोपियन व्यापाऱ्यांना मागें टाकून, शेवटीं एलिझाबेथ राणीच्या पत्रांतले उद्देशाबाहेर करामत करून, स्वदेशभक्त अशा इंग्रज तागडीबहाद्दरांनीं आपलें राज्य कसें स्थापलें; आणि प्रथम तागडी व नंतर तरवार यांचा उपयोग करून शेवटीं तख्त कसें स्थापन केलें. याचा सविस्तर व सुसंबद्ध वृत्तांत मराठींत कोणास वाचावयाचा झाल्यास त्यानें रा. सरदेसाई यांच्या सुमारें ८०० पृष्ठांच्या पुस्तकांत अवश्य वाचावा अशी मी शिफारस करतों.

---

## ३०. ‘ कुळकर्णीलीलामृत ! ’

(ता. ३० सप्टेंबर सन १९१३)

हा विचित्र मथळा पाहून आमचे पुष्कळसे वाचक बुचकळ्यांत पडतील. नांवाच्या ढबीवरून ‘ कुळकर्णीलीलामृत ’ हें ‘ शिवलीलामृत ’ किंवा ‘ संतलीलामृत ’ या काव्यग्रंथाचें एक आधुनिक भावंड असावें अशी कोणाचीहि कल्पना होईल, व ती अगदींच निराधार ठरेल असेंहि नाहीं. कारण अवतरणभूत पदार्थ हा एक ग्रंथ आहे; तो काव्यग्रंथहि आहे, व त्यांत वरील दोन ग्रंथांप्रमाणें लीलावर्णन देखील आहे. पण एवढें सांगून देखील कित्येकांची समजूत पुरी पडणार नाहीं. कारण ‘ कुळकर्णी ’ या नांवाचा एखादा ईश्वराचा अवतार किंवा विभूतिमान् संत-साधू आपल्या या महाराष्ट्रांत होऊन गेल्याचें कोणीं पाहिलें

किंवा ऐकिलेंहि नाहीं. यामुळें कुळकर्णी हा प्राणी तरी कोण, त्याच्या लीला कोणत्या आणि हें लीलामृत मरूं घातलेल्या अशा कोणा अभाग्याच्या आत्म्याचें संजीवन करणार, हा प्रश्न रहातोच! म्हणून आम्ही हें शुभवर्तमान जाहीर करितों कीं, सदर ग्रंथांत महाराष्ट्रांतील वतनदार गांवकामगार कुळकर्ण्यांच्या नालस्तीचें, त्यांच्या अंगच्या खऱ्या व काल्पनिक अवगुणांचें व त्यांच्या हातून होणाऱ्या किंवा न होणाऱ्याहि दुष्कृत्यांचें दहा अध्यायांत ओंवीवृत्तांत रसाळ वर्णन केलें आहे. हा ग्रंथ लिहिण्याची स्फूर्ति मुकुंद गणेश पाटील नांवाच्या मराठा कवीस झाली; तो प्रथम हप्त्याहप्त्यांनीं 'दीनमित्र' नामक पत्रांत प्रसिद्ध झाला; तो विठ्ठल भिराजी डोणे यांनीं पुस्तकरूपानें फिरून प्रसिद्ध केला; रा. भास्करराव जाधव यांनीं त्यास प्रस्तावना लिहिली; रा. ब. सबनीस, कोल्हापूर संस्थानचे दिवाण व त्याच संस्थानांतील एक नूतन वतनदार पाटील यांस तो अर्पण झाला आहे; व ग्रंथ प्रसिद्धीचें हें काम "ईश्वरकृपेनें परमदयाळू व प्रजावत्सल श्रीशाहूमहाराज (करवीरकर) यांच्या औदार्यानें सफल झालें!" इतकें सांगितलें म्हणजे ग्रंथाचा हेतु व परिणाम यांविषयीं निराळें कांहींच सांगावयाला नको. कारण हें अमृतरूपी विष कांहीं तरी सैतानी विध्वंसपर कृत्य करण्यास अवतरलें आहे, अशी कोणाचीहि तेव्हांच खात्री होईल. 'सत्यशोधक समाजा'च्या 'डिस्टिलरींत' (दारूघरांत) बनलेली ही गोड व मसालेदार ब्रह्मद्वेषाची दारू श्रीशाहूमहाराजांच्या विशेष कृपेनें अवघ्या तीन आण्यांस एक बाटली या स्वस्त दरानें विकत मिळते; व इतकेहि पैसे कोणाजवळ नसल्यास छत्रपतींच्या महनीय आश्रयाच्या पाणपोईंत त्याला ती बहुधा फुकटहि मिळेल! तरी वाटेल त्या मराठ्यानें—विशेषतः वतनदार पाटलानें—ती पिण्यास कमी करूं नये. विकाऊ मालाची अशी ही फुकट जाहिरात आणि तीहि अग्रलेखांत आम्ही सहसा देत नसतों. पण वतनदार कुणकर्णीरूपी दैत्यकुळानें गांजलेल्या या महाराष्ट्रभूमीचें संरक्षण करण्याकरितां 'कुळकर्णीलीलामृत' या ग्रंथाचा अवतार असल्यामुळें, या अवताराच्या स्वागताची पूर्वतयारी प्रत्येकानें करणें अवश्य आहे! आणि मुकुंदराव पाटलापासून छत्रपति शाहूमहाराजांपर्यंत लहानथोर लोकांनीं या अवताराचा पूर्वरंग सिद्ध करण्याकरितां कंबरा कसल्या, त्याअर्थीं 'फूल नाहीं फुलाची पाकळी' या न्यायानें या पवित्र कार्यास मदत करणें हें आमचेंहि कर्तव्य आहे. ग्रंथ—प्रस्तावनेंत ग्रंथहेतु रा. सा. जाधव यांनीं इतक्या खुलासेवार रीतीनें वर्णन केला आहे कीं, ती

वाचणारास त्याविषयीं निराळें असें कांहींच सांगावें लागत नाहीं. कुळकर्णी हा सर्व गुन्ह्यांचा गड्डा आहे, तो ग्रामसंस्थेच्या हृदयांत सलणारा मुख्य कांटा आहे. तो काढून टाकल्याशिवाय ग्रामसंस्थेची सुधारणा होणार नाहीं, असें या ग्रंथाचें मुख्य तात्पर्य आहे, हें रा. सा. जाधव यांनीं प्रस्तावनेंत अगदीं मोकळ्या मनानें कबूल केलें आहे ! पण प्रस्तावनेंत नसलेली एकच गोष्ट सांगणें जरूर आहे ती ही कीं, हल्लीं वतनदार कुळकर्णी लोकांचीं वतनें नष्ट करण्याची कारवाई सुरू आहे, व त्याच वेळीं ‘ कुळकर्णीलीलामृत ’ ग्रंथ प्रसिद्ध होत आहे, हा योगायोग विशेष लक्षांत ठेवण्यासारखा होय. महाराष्ट्रांतील वतनदारीच्या वृक्षाची कुळकर्णे-पणाची डहाळी किडून जाऊन आपल्या आपणच तोडून पडावयास तयार झाली असेल हें खरें; तरी पण करवीरकर छत्रपतींच्या भरीव मदतीनें बूड जड झालेल्या ‘ सत्यशोधक समाजा ’ चा कावळा त्या डहाळीवर अखेर बसला होता, इतकें तरी इतिहासांत नमूद होऊन राहीलच राहील.

खुद्द ग्रंथाकडे केवळ वाङ्मयाच्या दृष्टीनें पाहतां आम्हांस हें कबूल करावें लागतें कीं सदरहु ग्रंथ हें एक सरस विनोदी काव्य झालें आहे. त्यांतील कल्प-नांचा ओघ, प्रसादयुक्त वाणी, व शुद्ध भाषा यांचें खरोखरच कौतुक करावेंसें वाटतें. श्रीधर कवीच्या काव्यग्रंथाचें विकृतानुकरण ( Parody ) या नात्यानें हा ग्रंथ चांगलाच साधला आहे. ओवीवृत्त, जुन्या पद्धतीची शब्दरचना, खोटा भाविकपणा, वगैरे गोष्टींनीं या लीलामृतास इतकें चांगलें बाळसें आलेलें आहे कीं, एखाद्या अचिकित्सक मराठी वाचकाची–विशेषतः धाडसी अशा परदेशीय संशोधकाची–क्षणभर तरी फसगम्मत ही पोथी हटकून करील ! अध्यायांचे आदि-अंत सफाईदार असून वर्णनविषयभूत कुळकर्णी–देवतेला आळविण्याकरितां योजलेलीं साभिप्राय गुणविशेषणें रचण्यांत तर ग्रंथकारानें फारच चांगलें कौशल्य दाखविलें आहे. अशा तऱ्हेचा सुबक वाङ्मयसुवर्णाचा अलंकार निर्माण केल्या-बद्दल मुकुंदराव पाटील यांचें आम्ही अभिनंदनच करितों. पण दुर्दैवानें अशा ग्रंथाकडे केवळ वाङ्मयाच्या निर्विकार दृष्टीनें पाहूनच स्तब्ध बसतां येत नाहीं. त्याचा हेतु व त्याचा परिणाम यांजकडेहि लौकिक दृष्टीनें पाहिलें पाहिजे. एखादा विंचू नांगीचा आंकडा पाठीवर वळवून तरतर धांवत आहे. हा देखावा चित्रक-लेच्या दृष्टीनें चांगला दिसेल. पण तो घरांत निघाला असतां, कोणताहि मार्मिक चितारी हातांतील रंगशलाका टाकून देऊन पादत्राण घेतल्याशिवाय गप्प बसणार

नाहीं. तीच गोष्ट सदर ग्रंथाची. भक्तिरसात्मक काव्यग्रंथाच्या मेंढीचें गोजिरवाणें कातडें पांघरून महाराष्ट्रग्रंथसमूहाच्या कळपांत शिरूं पहाणाऱ्या या दुष्ट लांडग्याचें स्वरूप, तें आवरण दूर करून, जगास दाखविलेंच पाहिजे. जिच्यावर खुद्द दवाखान्याचें लेबल डकविलें आहे, भाग पाडलेली चिठी लावलेली आहे, आणि औषधाचें नांव लिहिलेलें आहे, अशाहि कुपींत जर खरोखर वीष आहे असें कळलें, तर केवळ या वरील देखाव्याचा सन्मान करण्याकरितां कोणीहि तें रोग्यास ओतून पिण्यास देणार नाहीं, तर मोरींतच फेंकून देईल. अडणीवर ठेवलेल्या, सोन्याचीं तोंडें केलेल्या, व आंतील तुळशीपत्रें वर दिसून येणाऱ्या अशा सुलक्षण शंखांतहि जर खरोखर मद्य किंवा तेजाप भरलें असेल तर, तें पवित्र तीर्थ म्हणून कोणीहि प्रोक्षणास घेणार नाहीं. तोच न्याय सदर ग्रंथासहि लागू पडेल असें वाटतें.

कारण प्रेम जसें मनुष्याच्या तोंडून काव्य वदावितें तसेंच द्वेष हाहि एखादे वेळीं वदवूं शकेल; म्हणून द्वेषनिर्मित काव्याला कोणीहि प्रेमनिर्मित किंवा भक्तिनिर्मित काव्याची योग्यता देणार नाहीं. अशा तऱ्हेचीं गौण काव्यें इतर भाषेंतहि आढळतात, नाहीं असें नाहीं; पण त्यांनाहि कोणी बरें म्हणत नाहीं. पोपचें 'डनशियड' हें काव्य असेंच चटकदार आहे. पण तें एक निवळ अपशब्दांचें विचित्र भांडार किंवा शब्दविषाचा मूर्तिमंत रांजण इतकीच त्यास मान्यता आहे. बटलरचें 'ह्युडिब्रास' हेंहि काव्य असेंच आहे. ख्रिस्ती भटाभिक्षुकांची व वैद्यगणकांचीं संभावित पण कुत्सित अशा शब्दांनीं टर उडविलेली ज्यांना पहावयाची असेल त्यांनीं हा ग्रंथ वाचावा. मिल्टनचें 'पॅराडाइज लॉस्ट' हें सुद्धां एका अर्थानें द्वेषमूलक व निंदात्मक असेंच काव्य आहे. पण मिल्टन हा स्वभावतःच थोर मनुष्य व महानुभाव कवि असल्यामुळें, वास्तविक सैतानाची निंदा करावयास प्रवृत्त झाला असतां त्याच्या हातून सैतानाचें चित्त रंगविलें न जातां एका उदात्त नायकाचेंच रंगविलें गेलें; व अशा रीतीनें कांहींसें अनिच्छेनें सुंदर काव्य निर्माण झालें. द्वेषमूलकच, पण तीन निरनिराळ्या मनोरचनेनें जन्मलेल्या, या इंग्लिश काव्यग्रंथांचीं जीं हीं वर्णनें आम्हीं दिलीं त्यांवरून निंदात्मक सरस काव्यांतहि क्षम्य व अक्षम्य असा भेद कसा होऊं शकतो हें दिसून येईल. 'डन्शियड' किंवा 'ह्युडिब्रास' या गौण व अधम काव्याप्रमाणें 'कुळकर्णीलीलामृत' हें वाङ्मयदृष्ट्या कालांतरानें एखाद्यास वाचावेंसें वाटेल; तरी पण त्याची इतर दृष्टीनें जी संभावना आजच्या घटकेस करावयास पाहिजे, ती कोणीहि करीलच.

खुद्द-पाटीलकुळकर्ण्यांच्या दृष्टीनें या ग्रंथाकडे प्रथम पाहूं. ग्रंथकाराचा हेतु कुळकर्ण्यांची अयथार्थ व द्वेषमूलक निंदा करण्याचा आहे; यामुळें लोकसमाजास हें काव्य निंदास्पद वाटेल यांत शंकाच नाहीं. पण ज्यांच्या तर्फेनें हें काव्य लिहिलें गेलें त्या पाटलांनाहि हें काव्य रुचेल असें आम्हांस वाटत नाहीं; व अशा रीतीनें ग्रंथकाराचा हेतु बहुधा फसला असेंच आम्हांस तरी वाटतें. कारण पाटलांचें सर्वस्वीं समर्थन करून व त्यांचे गुण दाखवून जर त्याच्याच बरोबर कुळकर्ण्यांची निंदा ग्रंथकारास करितां आली असती तर त्याचा हेतु साधला असता. पण जी कुळकर्ण्यांची एका अर्थानें निंदा तीच पाटलाचीहि दुसऱ्या अर्थानें निंदा झाल्यामुळें, या द्वेषरसायनाची कुपिस्थ भट्टी फुकट गेली असेंच म्हणावें लागतें. कां कीं, 'कुळकर्णीलीलामृतां'त कुळकर्णी वर्गाच्या धूर्तपणाच्या वर्णनाइतकेंच पाटलांच्या मूर्खपणाचें वर्णन आहे! वंचकवंचनाविलास हा केवळ दूर राहून तटस्थ वृत्तीनें पाहणारास चित्ताकर्षक होतो खरा. पण वंचकविलासवर्णन हें एक दुधारी शस्त्र आहे, आणि ग्रंथकर्त्या पाटीलबुवांनीं हें शस्त्र हातीं घेऊन एका धारेनें कुलकर्णीवर्गाची मान कापण्याचा प्रयत्न करितांना, दुसऱ्या धारेनें नकळत त्यांचीं स्वतःचीं बोटेंहि कापून रक्तबंबाळ झालीं आहेत. फार काय पण कित्येक कुळकर्ण्यांना हें लीलावर्णन वाचून कदाचित् अभिमानहि वाटेल. बुद्धिमान् असून सद्गुणी अशा काल्पनिक व्यक्तीच्या तुलनेनें पहातां या ग्रंथांतील नायक व उपनायक, म्हणजे कुळकर्णी व पाटील, दोघेहि वाईटच ठरतील. पण फक्त कुळकर्णी आणि पाटील या दोघांच्या दरम्यान पहातां एकाला हटकून भूषण वाटेल असलें कांहीं दुसऱ्याचें अमिश्र दूषणवर्णन या ग्रंथांत नाहीं, हें खास.

किंबहुना कोणी असेंहि म्हणेल कीं, धन्य ते कुळकर्णी आप्पा! कीं, ज्यांची बुद्धिमत्ता अशा अजागळ पाटलाच्या तोंडून वर्णन पावून त्यांची कीर्ति एका वाङ्मय-खंडानें अमर होत आहे! मिल्टनच्या सैतानाला लोकांनीं सैतान म्हटलें तरी त्याला स्वतःस, शिळपट देवदूतांपेक्षां आपण श्रेष्ठ आहोंत अशीच जाणीव होती. राजाचा चाकर झाल्यापेक्षां चाकरांचा राजा होण्याची बाणेदार महत्त्वाकांक्षा कोणीं धरली, तर ती अगदींच टाकाऊ म्हणतां येणार नाहीं. व अशा प्रकारची विचारसरणी पत्करली तर या लीलामृतग्रंथानें आपल्या बुद्धिमत्तेची आणि कर्तृत्वाची साक्षच जगास पटविली, या गोष्टीचा कुलकर्णी वर्गास कदाचित् अभिमानहि वाटण्या-

सारखा आहे ! जगांत मूर्ख व धूर्त यांची जोडी अमर आहे. मूर्खांमुळेंच धूर्तांचें पोट भरतें; आणि केवळ दुसऱ्यावर निमित्त ठेवण्याला धूर्त हा मूर्खांला उपयोगी पडला तरी, मूर्खांचा अक्कलशून्यपणा हा हास्यास्पद झाल्याशिवाय रहात नाहीं. कुलकर्णी हे पाटलांना फसवितात असें धरून चाललें, तरी पाटील फसतात यांत त्यांना तरी काय भूषण ? एकाचा दोष फाजील अकलेचा असला तर दुसऱ्याचा दोष अकलेच्या उणेपणाचा, इतकाच फरक. एकाचें अकलेचें भांडें वाहून जात आहे असें दाखवितां आलें, तरी दुसऱ्याचें अकलेचें भांडें मूळचेंच कोरडें ठणठणीत असलें तर त्याची भरती कशी होणार ? अकलेचा झाला तरी कोरड्या दुष्काळांपेक्षां ओला दुष्काळच कोणीहि पत्करील. धूर्त म्हटल्यानें निंदा होत असली तरी मूर्ख म्हटल्यानें कांहीं कोणाची स्तुति होत नाहीं, ही गोष्ट सदर ग्रंथकार अगदींच विसरला ! परनिंदेला हात घालण्याच्या भरांत स्वतःच्या बुडाखालचें योग्य अभिमानाचें अधिष्ठान ढांसळलें याची दखलगिरी आमच्या मुकुंदराव पाटलांना राहिली नाहींसें दिसतें. कुलकर्णी हे धूर्त दरवेशी असले तरी ते दोन पायांवर चालतात; पण एकंदर पाटलांवर नाकांत वेसन घालून घेऊन चार पायांवर चालणारें अस्वल होण्याचा प्रसंग ग्रंथकार पाटीलबुवांनीं आणला, यांत त्यांनीं काय साधलें ? आम्ही म्हणतों कीं, होय, कुलकर्णी हे उडाणटप्पू गोंधळी असून ते गांवांत पिकेल त्या मूर्खपणाच्या शेतावर स्वारी करून फुकाचा हुरडा खातात. पण पाठीवर झूल घालून घेऊन या हुरडेफुक्यांच्या शब्दागणित मान हलवीत ' धन्याला औक्ष ' चिंतणारे नंदीबैल, हें वर्णन पाटलांनों तुम्हांला खरोखर पसंत किंवा मान्य आहे काय ? ' असा सरळ सवाल आम्ही महाराष्ट्रांतील सर्व पाटलांपुढें टाकतों, त्याचें त्यांनीं उत्तर द्यावें. खरोखर पाटलांला ग्रंथकारानें या ग्रंथांत जें काय म्हणूं नये तें म्हटलें आहे. उद्देश त्यांचा स्वाभिमान जागृत करण्याचा असेल; पण एका सबंध वर्गाची निंदा या दृष्टीनें ठिकठिकाणीं केलेलें पाटलांचें वर्णन सर्वस्वीं आक्षेपार्ह आहे. पाटलास कुळकर्ण्यांचा ' महार ' म्हटलें आहे ! ' कुळकर्णी बैसे घोड्यावरी । घेई पाटील दप्तर शिरीं । धावे मागें शिंगरापरी । गांठी कचेरी सत्वरीं ॥ ' या] वर्णनांत असत्य आणि अप्रियता हे दोन्ही दोष मिसळले आहेत. तसेंच पाटलास ' खर ' म्हणजे गाढव, ' श्वान ' म्हणजे कुत्रा वगैरे बहुमानाचीं उपपदें मधून मधून लावलींच आहेत ! अध्याय पांचमध्यें पाटलाच्या धिःकाराच्या सुमारें चवदा ओंव्या आहेत.

त्यांत कुळकर्ण्यांविषयींच्या द्वेषबुद्धीची कमाल तर दिसून येतेच, पण पाटलांना चेव आणण्याकरितां, बैलाची शेपटी पिरगळावी त्याप्रमाणें, त्यांना ज्या शिव्या मोजल्या आहेत त्याहि वाचण्यासारख्या असल्यामुळें तो उतारा आम्ही खालीं देतों:—

" ज्याशीं नाहीं आत्मविचार । परविचारी ज्याचा आचार । तो एक पाटील खर । धिक् त्याची पाटीलकी ॥ आपला अधिकार काय किती । ठावे नसे जया प्रती । तो एक पाटील मूढमती । धिक् त्याची पाटीलकी ॥ आप्तजनांशीं काळ केवळ । कुळकर्ण्याचें वाही गबाळ । तो एक पाटील नंदीबैल । धिक् त्याची पाटीलकी ॥ गृहिं हांकी अकलेचा गाडा । कुळकर्ण्यापुढें दीन चापुडा । तो एक पाटील शुद्ध रेडा । धिक् त्याची पाटीलकी ॥ ग्रामजना मारुनि धडका । संतुष्ट ठेवा कुलकर्णी- देवका । तो एक पाटील शुद्ध एडका। धिक् त्याची पाटीलकी ॥ घरीं दारीं अति बोलका । स्तब्ध सोशी कुलकर्णी—धाका । तो एक पाटील शुद्ध मुका । धिक् त्याची पाटीलकी ॥ गांवगुंड—खेळाचा फार चाळा। कुलकर्ण्यापुढें होई बावळा । तो एक पाटील शुद्ध लुळा । धिक् त्याची पाटीलकी ॥ विशाळ नेत्र मिशांस पिळा । ज्यासी न दिसे कुलकर्णी—लीला । तो एक पाटील होय आंधळा । धिक् त्याची पाटीलकी ॥

दुसऱ्याला एक गाढव म्हणण्याची हौस पुरावी म्हणून स्वतःला सात गाढव म्हणवून घेणें, हें शुद्ध आततायीपणाचें लक्षण होय ! असो; सदर ग्रंथाचें एका अंगानें येथवर वर्णन झालें, आतां इतर गोष्टींसंबंधानें दोन शब्द लिहावयाचे आहेत, ते लिहून हा विषय आम्ही पुरा करणार आहों.

— २ —

( ता. ७ आक्टोबर सन १९१३ )

' कुळकर्णीलीलामृत ! ' ग्रंथांत कुळकर्णी लोकांच्या निंदेबरोबरच पाटील लोकांचीहि निंदा कशी घडून आली आहे, हें मागील लेखांत सांगितलेंच. खरें पाहूं गेलें तर सदर ग्रंथांत ध्वनित केल्याप्रमाणें सर्वच पाटील लोक सोळा आणे सालस असतात असें नाहीं. गांवकुटाळकींत पाटील-कुळकर्णी या दोघांचाहि भाग बहुधा सारखाच असतो. त्यांतल्यात्यांत कुलकर्णी हा लिहिणारा, वाचणारा व पाटील हा बहुधा निरक्षर असतो, एवढ्या-मुळेंच त्या दोघांच्या गांवगुंडपणाच्या पद्धतींत काय फरक पडेल तेवढा पडेल. रा. सा. जाधव यांनीं प्रस्तावनेंत लिहिल्याप्रमाणें पाटील हा राजा व कुलकर्णी हा प्रधान मानला तर, कुळकर्ण्याचा तेवढा बदलौकिक कां होतो व पाटिलाचीं

पापें असलीं तरी तीं कशीं छपून जाऊं शकतात, हें समजून येईल. 'The king can do no wrong' म्हणजे राजा हा वाइटाचा तेवढा धनी नाहीं, चांगल्याचा मात्र धनी आहे, ही राजनीतिविषयक म्हण पाटलाचे मित्र व कुळकर्ण्यांचे शत्रु त्यांना अक्षरशः लावूं पहतात. पण तिचा खरा अर्थ तसा नाहीं; कारण राजकीय दुष्कृत्यांबद्दल प्रत्यक्ष प्रधानावर जरी दोषारोप (Impeachment) करण्याची रीत आहे तरी खरोखर राजा हा दुष्कृत्यांपासून अलिप्तच असतो असें सहसा मानलें जात नाहीं. सोईकरितां शिक्षा वाटेल तर प्रधानास द्यावी, पण नैतिक दृष्ट्या तरी जबाबदारीची वांटणी बरोबर झाली पाहिजे. कुळकर्णी लबाड असतील, पण पाटीलहि कांहीं कमी लबाड नसतात ही गोष्ट महाराष्ट्रांतील सर्व मामलेदारांना विचारली तर त्यांच्या बहुमतानें सिद्ध होईल असें आम्हांस वाटतें. घातक अशा ग्रामकंटकपणाबद्दल कोर्टांतून इनसाफ होऊन शिक्षा झाल्या अशीं पाटलांचीं उदाहरणें कांहीं थोडीं थोडकीं सांपडणार नाहींत. पण पाटील-कुळकर्णी यांची अशी तुलना करीत बसण्यांत फारसा अर्थच नाहीं, कारण 'लीलामृतकर्त्यां'चा कुळकर्ण्यांवर खरा कटाक्ष ते कुलकर्णी आहेत म्हणून नव्हे, तर ते ब्राह्मण आहेत म्हणून आहे! पण सुदैव कुळकर्ण्यांचें कीं, त्यांतले फारच थोडे चित्पावन ब्राह्मण असतात; किंबहुना मुळींच नसतात, म्हटलें तरी चालेल. ते कुळकर्णी असून शिवाय चित्पावन ब्राह्मणहि असते तर, कुळकर्णी-लीलावर्णन-कर्त्यांच्या रसिकता-समुद्रास याहून अधिक भरती उचंबळून आली असती!

पद्य ग्रंथाच्या प्रस्तावनेंत रा. सा. जाधव यांनीं संभावितपणाचें गद्य लिहून या कुचाळखोर काव्यग्रंथांतील प्रमेयाचें समर्थन करण्याचा प्रयत्न केला आहे. पण तोहि वर सांगितलेल्या दुधारी शस्त्राच्या लपेटीसारखाच झाला आहे. ग्रामसंस्था या आधुनिक काळच्या लोकस्थितींत अननुरूप ठरल्यामुळें वतनदारी पद्धतिच जर समूळ नाहींशी करणें अवश्य आहे तर कुळकर्ण्यांची तेवढी वतनदारी कां जावी व पाटीलांची तेवढी कां रहावी, हें समजत नाहीं. प्रस्तावनेंतील पृष्ठ ८ वरील शब्द वतनदार कुळकर्ण्यांस तेवढे लागतात व वतनदार पाटलांस लागत नाहींत असें थोडेंच आहे! "जात्यभिमानाच्या योगानें राष्ट्राभिमान नाहींसा झाला.... प्रत्येक गांव अगदीं तुटक व स्वतंत्र असल्यानें बहुजनसमाजाचा विरोध परकी सत्तेस झाला नाहीं. राजा कोणीहि येवो त्यानें गांवचीं

वतनें चालविलीं म्हणजे त्याला मान्य करण्यास ग्रामाधिकारी तयार असत. शत्रु प्रबळ आहेसें दिसल्यास वतनरक्षणाच्या हेतूनें त्याला हे घरभेदे सहज मिळत. अशा आणीबाणीच्या प्रसंगीं वतनदारांचें वर्तन घातकी असतें. " या वर्णनांतून वतनदार पाटील कसे सुटतात, हें रा. सा. जाधव सांगतील काय ? आपलें वतन चाललें म्हणजे झालें, मग परकी सत्तेस प्रतिबंध करावयाचा नाहीं या दोषारोपांस आजकालचे काय किंवा पूर्वकाळचे काय ब्राह्मण तेवढे पात्र होते आणि मराठे नव्हते, असें इतिहास सांगत नाहीं. महाराष्ट्रापुरतें तरी इतिहास असें सांगतो कीं, श्रीशिवाजीमहाराजांनीं ज्या वेळीं विजापूरच्या बादशाही सत्तेस आळा घालण्याचा प्रयत्न केला, त्या वेळीं वतनदार मराठ्यांचीं घराणीं त्यांना कांहीं थोडीं-थोडकीं आड आलीं नाहींत. कै. न्या. रानडे यांनीं मराठ्यांच्या इतिहासावरील आपल्या ग्रंथाच्या चवथ्या भागांत असें स्पष्ट म्हटलें आहे कीं, ' विजापूर व अहमदनगर या पातशाहींतील ठळक व पुढारी अशा मराठे वतनदार घराण्यांनीं शिवाजीच्या चळवळीला मदत केली नाहीं, इतकेंच नव्हे तर तिला अगदीं कसून व जीव तोडून प्रतिरोध केला. मात्र शिवाजीच्या चळवळीला चांगलें यश व नांवरूप आलें तेव्हां मग ही मंडळी त्याला मदत करण्याकरितां, म्हणजे एका अर्थानें आपलें वतन सांभाळण्याकरितांच, पुढें आली ( पान ६८-६९ पहा. ) अर्थात् वतनदारी हीच प्रगतीला अडथळा करीत असते असें मानलें तर वतनदार पाटिलक्याहि त्यांतून सुटणार नाहींत. वतनदारी हीच प्रगतीला आडवी येते म्हणून कापून काढावयाची तर ती ब्राह्मणांचीच तेवढी कापली जाईल असें नाहीं; आणि पाटिलकीचीं वतनेंसुद्धां जर या संहारांत नष्ट होण्यालायक असलीं तर कुळकर्ण्यांचें लीलाचरित्र वर्णन करावयालाच कशाला हवें ? आणि करावयाचें तर तें एकट्या कुळकर्ण्यांचेंच काय म्हणून ?

सुधारणेच्या कामीं कुळकर्ण्यांची फार मोठी हरकत असते, असें रा. सा. जाधव म्हणतात. पण आज अशा कोणत्या सुधारणा व्हावयाच्या आहेत कीं त्यांस पाटील मात्र अनुकूल आहेत आणि येऊन जाऊन कुळकर्ण्यांच्या मात्र प्रातिकूल्यानें त्या थांबवल्या आहेत ? कुळकर्ण्यांस पाटील-राजाच्या पेशव्यांची उपमा देणाऱ्या जाधवांच्या मनाला कुळकर्णी वतनें नष्ट होण्याचा आलेला सुमार पाहून गुदगुदल्या होत असतील, हें ठीकच आहे. कारण पेशव्यांनीं साताऱ्याच्या राजांना निर्माल्यवत् केलें हा पेशव्यांवरचा आक्षेप प्रसिद्ध आहे. या गुन्ह्याचें प्रायश्चित्त

पेशव्यांना मिळणें जरूर होतें. दुर्दैवानें रा. सा. जाधवांचा आत्मा हल्लींच्या स्वरूपानें एकोणिसाव्या शतकाच्या प्रारंभीं हजर नसल्यामुळें, पेशवाईच्या विनाशाचें अस्सल दृष्टिसुख त्यांना पहावयास सांपडलें नाहीं, यामुळें तळमळ लागून राहिलेल्या त्यांच्या आत्म्याला आपल्या डोळ्यादेखत विसाव्या शतकाचे प्रारंभीं कुळकर्णीवतनें ठार बुडाल्याचें पाहून तरी बरें वाटो ! त्यांनीं कुळकर्ण्यांस पेशव्याची दिलेली उपमा साभिप्राय असून, उपमानभूत अस्सल पेशव्यांची कां नसेना पण या उपमेयभूत नकली पेशव्यांची तरी पेशवाई नष्ट झाल्याचें पहावयास मिळाल्यानें, त्याला त्यांच्या आत्म्याला जी काय बरी वाईट गति मिळावयाची असेल तिच्या मार्गानें जाण्यास मोकळीक खास होईल; व पेशवाईचा नाश पहाण्याची वासना शिल्लक राहिल्यानें तो घुटमळणार तरी नाहीं ! शिवाय कुलकर्णीवतनांच्या नाशाचा भिकारी तोडगा पाहूनहि खऱ्याखुऱ्या पेशवाईच्या विनाशदर्शनानें होणारें सुख मानून घेण्यास त्यांची तयारी आहे, या त्यांच्या मनाच्या मोठेपणाचें तरी वर्णन किती करावें ! पण या सर्व प्रकरणांत दुर्दैवानें एकच चूक आहे. ती अशी कीं, पेशवाईचा नाश झाल्यानें सातारची गादी अजरामर होऊन रहाती तरी बरें होतें; पण तसें तरी कोठें झालें? आणि तसें होणेंहि नाहीं ! वाऱ्यानें आलेली पेशवाई वावटळीनें गेली तर त्यांत दुःख तरी काय मानावयाचें ! पण ज्या मराठेशाहीच्या वृक्षाची मुळी शेषाचें मस्तक फोडून आंत शिरलेली होती, त्या वृक्षाचीं पेशव्यांनीं फळें तोडून खाल्लीं असलीं, तरी त्याची रसरशीत थंडगार पालवी तरी त्यांनीं कायम ठेविली होती. पण चमत्कार हा कीं, पेशवाई नष्ट झाल्यावर निर्भेळ मराठा मंडळाच्या प्रयत्नानें त्या वृक्षावर फिरून फळभार धरावा, तसें न होतां पेशव्यांनीं राखून ठेवलेल्या नांवासकट व वैभवासकट तो वृक्ष पेशवाईनंतर थोड्याच काळांत उमळून पडला !

ती स्थिति आजहि आहे. कुलकर्णीवतनाचा बळी देऊन पाटिलकी वतनें तरी इंग्रजी राज्याच्या अखेरपर्यंत शाबूत राहतील, असा एखादा ताम्रपट रा. सा. जाधव यांनीं मिळविला असल्यास किंवा त्यांना मिळत असल्यास मग आमची हरकत नाहीं ! व तसें नसेल तर सुपांतल्यांनीं जात्यांतल्यांना हसण्यांत किंवा त्यांचेवर शेखी मिरविण्यांत काय अर्थ ? पण रा. सा. जाधवचसे काय ! असला हा ताम्रपट 'कुलकर्णीलीलामृता' चे आश्रयदाते खुद्द प्रतापवंत शाहुछत्रपति महाराज यांनीं आपली सर्व पुण्याई खर्च करून मिळविला तरी पुरे ! महाराज

सर्व राजसत्ताधीश असल्यामुळें एखादा नवा पाटील त्यांना लीलेनें निर्माण करितां येईल, पंतोजीचा दिवाण व दिवाणाचा पाटील अशा चढत्या उतरत्या भांजणीचीं उदाहरणें करणें हें महाराजांसारख्यांना काय अवघड ? पण आपल्या राज्यांत त्यांनीं एक नवीन पाटील निर्माण केला. एवढ्यामुळें ब्रिटिश अमलांतील पाटीलकीचीं वतनें आज जशीं कुलकर्णी वतनें अयोग्य ठरलीं तशीं उद्यां हीं अयोग्य ठरल्यास तीं वांचविण्याची मात्र महाराजसरकारामध्यें ताकद आहे असें आम्हांस वाटत नाहीं. आग लावणें फार सोपें असतें; ती काय एखादें बिनलंगोटीचें डामरट पोरहि लावूं शकेल. आमचें इलाखा सरकार कुळकर्णी वतनावर तिलांजलि देण्याला सिद्ध झालेंच आहे. तेव्हां त्यांच्या हाताला हात लावण्याचा आनंद कित्येक मंडळींना आज पोटांत मावेनासा झालेला दिसतो. पण हें टीचभर पुस्तक छापून निघण्यास लागणारे शेंदोनशें रुपये दिल्यामुळें महाराज सरकारांना जसें सरस्वतीमंदिराच्या सभामंडपाचे आधारस्तंभ म्हणतां येत नाहीं, त्याचप्रमाणें महाराष्ट्रांतील सबंध कुळकर्णीवतनाची होळी होऊं घातली असतां, या पुस्तकास आश्रय देण्याच्या रूपानें हास्य-विनोद करणाऱ्यांना मोठे मुत्सद्दी म्हणतां येईल असेंहि आम्हांस म्हणवत नाहीं. पण ब्रह्मद्वेषानें अंध झालेल्या लोकांना इतकी दूरदृष्टि कोठून रहाणार !

'सत्यशोधक' समाज आज पुष्कळ वर्षें गुप्त झाला होता. तो फिरून ब्रह्मद्वेषाच्या अघोरी पंथाच्या मुख्य क्षेत्रांत चालू सालीं पुनः अवतरला आहे, असें दिसतें. कै. जोतिराव फुल्यांचें सत्यशोधक समाजाचें फुलझाड आज बहुत वर्षें वठून गेलें होतें. तें फिरून पालवून कुलकर्णीलीलामृत हें त्याच्या नव्या बहाराचें पहिलें फूल असावें. कोल्हापुरास स्थापित झालेल्या सत्यशोधक समाजाचे अध्यक्ष रा. सा. जाधव, उपाध्यक्ष प्रो. लठ्ठे व मुख्याधिकारी प्रो. डोंगरे अशी प्रचंड मंडळी समाजाची कार्यकर्ती असल्यामुळें, समाजाच्या हातून कशा प्रकारचें कार्य होणार हें उघडच दिसत आहे. वास्तविक सत्यशोधन हें अनादिकर्म आहे. येशू ख्रिस्ताला फांशीची शिक्षा देणाऱ्या पायलेट न्यायाधिशानें सत्य म्हणजे काय हाच प्रश्न केला होता. व कुलकर्णीवतनें नष्ट व्हावीं अशी सदिच्छा बाळगणारा कोल्हापूरचा सत्यशोधक समाजहि त्याच प्रश्नाचा खल करीत आहे. पण या समाजाला सत्य म्हणजे काय तर ब्राह्मणांनीं ब्राह्मणेतरांवर लादलेली गुलामगिरी याहून दुसरें एखादें उत्तर आजवर सुचल्याचें आम्हांला

माहीत नाहीं. सत्यशोधक समाजाच्या दृष्टीनें ब्राह्मणांनीं ब्राह्मणेतरांस विद्याविन्मुख ठेविलें हा त्यांचा अक्षम्य-अपराध-हा आरोपापूर्वी कधीं खरा असेल तेव्हां असो अगर नसो. हल्लीं तरी अशा आरोपांत कांहींच स्वारस्य राहिलें नाहीं. कोणच्याही रितीनें कां होईना पण आज विद्यादेवीच्या मंदिराचे सर्व दरवाजे सर्वांना सारखे खुले झाले आहेत. ब्रह्मविद्या पूर्वी कधींकाळीं गूढ असली तरी निदान आज ती चवाट्यावर पूर्णपणें आली असून तिची लाज राखणें न राखणें ही गोष्ट तिजकडे पहाणाऱ्याच्या इच्छेवर व मोठेपणावर सर्वस्वीं अवलंबून राहिली आहे. स्मृतिश्रुतिपुराणें वगैरे बहुतेक सर्व धर्मग्रंथांचीं मराठी भाषेंत भाषांतरें होऊन तीं अग्निहोत्र्यांपासून अंत्यजापर्यंत वाटेल त्याच्या हातांत पडण्यास हरकत राहिलेली नाहीं. कर्म करण्याच्या अधिकाराचा वाद कोणी कसाहि घालीत असला तरी, धर्मग्रंथासंबंधानें तरी आतां कोणाकडे मक्ता उरलेला नाहीं. ज्ञानाची पाणपोई आतां सर्व जातीच्या लोकांना मुक्तद्वार झालेली आहे. अशा स्थितींत ब्राह्मणांच्या नांवानें खडे फोडीत बसण्याचें कोणास कारण नाहीं. ब्राह्मणांच्या बुद्धिमत्तेचा पाडाव करून त्यांना स्वतःचे दास बनवितां येतें तरीहि गोष्ट वेगळी. पण ब्राह्मण पुढें गेला, त्याला मागें ओढतां येणें कठीण आहे. ब्राह्मणेतरांस फार तर स्वतः पुढें सरसावणें शक्य आहे व तें त्यांनीं खुशाल वाटेल तसें करावें, पण त्याला ब्राह्मणांस शिव्या देण्याचें कारण नाहीं. उलट त्यांची मदत घेतली तरच इष्ट कार्यभाग लवकर घडून येईल.

पेशवाईचा वादग्रस्त काळ आपण सोडून देऊं. तथापि, तत्पूर्वीच्या काळासंबंधानें पाहतां आपणांस काय दिसून येतें? हेंच कीं, ब्राह्मण व ब्राह्मणेतर यांनीं परस्परांचा द्वेष व हेवादावा न करितां एकजुटीनें कार्य केलें तर त्यांना काय वाटेल तें साध्य करितां येईल. प्रत्यक्ष श्रीशिवाजीमहाराजांच्या काळीं जर ब्राह्मणांचा मराठे द्वेष करीत नसत तर आज तरी त्यांनीं तो कां करावा? न्या. रानडे यांनीं आपल्या इतिहासांत ब्राह्मण-ब्राह्मणेतरांच्या परस्परसहायकारितेचा एक हिशोब केला आहे. शिवाजीच्या राष्ट्रीय चळवळीच्या वेळीं किती ब्राह्मण व परभु, आणि किती मराठे पुढारी उदयास आले यांचा ग्रँडडफच्या इतिहासावरून अंदाज करून रानड्यांनीं असें दाखविलें आहे कीं, ब्राह्मण व परभु मिळून २४ आणि मावळे व मराठे यांचीं २० अशीं प्रमुख नांवें शिवाजीकडे आढळतात, बखरींतून ग्रँटडफपेक्षां अधिक नांवें दिलेलीं आहेत.

म्हणजे ब्राह्मण परभू मिळून ५० व मावळे मराठे मिळून ४०. तात्पर्य, शिवाजीच्या वेळीं सुमारें शंभर एक व्यक्ति व घराणीं राष्ट्रकार्यांत पुढें आलीं, आणि त्यांत ब्राह्मण व मराठे हे बहुधा समसमान होते. यावरून या उभयतां जातींत द्वेषापेक्षां प्रेमच अधिक होतें हें दिसून येईल. किंबहुना असेंहि म्हणतां येईल कीं, शिवाजीला जितक्या ब्राह्मणांकडून मदत झाली त्याहून अधिक मराठ्यांकडून त्याला प्रतिरोध झाला. एक जातीचे लोक झाले म्हणून त्यांच्यांत वैमनस्य असत नाहीं किंवा राजकीय व सामाजिक प्रगतीविषयींचे त्यांचे विचार अगदीं एकमतानें मिळते असतात असें होत नाहीं; म्हणून आधींच मानुषतासहज स्वार्थबुद्धीनें मोठ्या कार्यांत पडणाऱ्या फुटीला जातिविद्वेषाची भर पाडण्यांत कोणता शहाणपणा ? कुळकर्ण्यांचीं वतनें बुडविलीं म्हणजे मराठे लोकांची सर्वार्थसिद्धि झाली असें थोडेंच आहे ! असें असतां केवळ जातिद्वेषाला बळी पडून, आधींच बुडूं घातलेल्या कुळकर्णीवतनांना मींहि एक गटंगळी देऊन घेतलीच कीं नाहीं ! असल्या सूड घेण्याच्या अधमबुद्धीचें प्रदर्शन पाटील व त्यांचे साथीदार यांनीं कां करावें ?

'कुळकर्णीलीलामृता' ला प्रस्तावना लिहितांना रा. सा. जाधव यांनीं एक विलक्षण युक्तिवाद केला आहे. ते लिहितात "इंग्रजी राज्यांतहि कुळकर्ण्यांचें वजन इतकें राहाण्याचें मुख्य कारण मामलेदार, मुनसफ, कलेक्टर, जज्ज, कमिशनर वगैरे मोठमोठ्या कामगारांच्या कचेऱ्या कुळकर्ण्यांच्या जातभाईंनीं भरलेल्या आहेत, हें आहे. यांच्या आश्रयामुळें व मदतीमुळें कुळकर्ण्यांच्या पुष्कळशा लबाड्या बाहेर येऊं शकत नाहींत. व ज्या थोड्यांचा बोभाटा होतो त्यांवर झांकण घातलें जातें. यासाठीं ब्राह्मणेतरांचा भरणा कारकून मंडळींत विशेष झाल्याशिवाय कुळकर्ण्यांचें वजन कमी होणार नाहीं. त्याचप्रमाणें मामलेदार, मुनसफ वगैरे महत्त्वाच्या जागांवर, आणि विशेषतः कलेक्टरच्या चिटणिसाच्या जागीं, मागासलेल्या वर्गांपैकींच इसम असणें जरूर आहे." याचें तात्पर्य असें कीं, कुळकर्णी तर गेलाच पाहिजे, पण तेवढ्यानेंहि रा. सा. जाधव यांचें समाधान होणें शक्य नाहीं. तर कुळकर्ण्यांबरोबर इतर सर्व दर्जाच्या नोकरींतूनहि ब्राह्मण नाहींसे झाले पाहिजेत ! आम्ही म्हणतों ठीक आहे, ब्राह्मणांना सरकारी नोकरी जितकी बंद होईल तितकी बरीच ! रा. सा. जाधव

च्यांची सूचना व्यवहार्य असेल तर सरकारनें ती खुशाल अमलांत आणावी; आमची त्यास बिलकुल हरकत नाहीं. एवढेंच नव्हे तर अशिक्षित लोकांचे प्रतिनिधिच काय, पण खुद्द निरक्षर लोक मोठमोठ्या हुद्यावर ते केवळ मराठे म्हणून सरकार नेमावयास तयार असेल तर खुशाल नेमो; त्यांत आम्हांला संतोषच आहे. उद्यां एखाद्या नांगऱ्या पाटलाला गव्हर्नर नेमून त्याला गणेशखिंडींतल्या सरकारी बंगल्यांतल्या सिंहासनावर बसविलें, तरी आम्हांला त्यांत आनंदच आहे. पण कोणत्याहि जातीच्या उत्कर्षांचा खरा पाया केवळ दुसऱ्या जातीच्या द्वेषावर भरल्यानें त्यावरील इमारत टिकेल काय !

मराठे मंडळींनीं, ब्रह्मद्वेष सोडून इतर कामांत सार्वजनिक हितबुद्धि, स्वार्थत्याग, पराक्रम, काय दाखविला आहे याचा त्यांनीं आपल्या ठिकाणीं नीट विचार करावा. ज्यांत 'भट पडला नाहीं,' अशा कामांत तरी त्यांनीं कितीसा एकोपा, जूट, सहविचारशलिता, मानसिक औदार्य, दाखविलें आहे, हें त्यांच्या शिक्षणपरिषदेच्या अल्प इतिहासावरून दिसून आलेंच आहे. 'लीलामृत' ग्रंथांत रा. पाटील यांनीं 'राष्ट्रमुख लोकाग्रणीचे' मर्मभेदक वर्णन दिलें आहे. पण मराठे लोकांत तरी खऱ्या कळकळीचे, केवळ परोपकारास वाहिलेले व स्वार्थमंदिरावर तुळशीपत्र ठेवून बाहेर पडलेले असे कितीसे धर्मात्मे निघाले हें रा. पाटील सांगतील काय ! सांगण्याचें तात्पर्य इतकेंच कीं, आज जर आमच्यांत सार्वजनिक हितबुद्धि कमी असली, तर ती सर्वंच समाजांत कमी आहे मग त्यांत ब्राह्मणाचेंच उणें काढण्यांत काय अर्थ ! 'दीनबंधू' सारखें मराठा समाजाचें हित पाहणारें पत्र, पण तें आश्रयाच्या अभावामुळें बंद पडतें, ही मराठे लोकांतील सार्वजनिक हितबुद्धि ! पाटिलांच्या दुष्कृत्यांस कुळकर्ण्यांची चिथावणी असेल. पण दीनमित्र पत्राला आश्रय देऊं नका, असें घरोघर सांगत कोणी ब्राह्मण फिरल्याचें आमचे तरी ऐकिवांत नाहीं ! तात्पर्य, आपल्या पायाखालीं काय जळतें हें न पहातां वेळीं अवेळीं व खऱ्या खोट्या कारणानें ब्राह्मण लोकांची नालस्ती करण्याच्या प्रवृत्तीचें हा ग्रंथ एक उत्तम उदाहरण आहे. त्यांतील निंदा इतकी उघड व बेलगामी आहे कीं जातिजातींत वैमनस्य उत्पन्न करणें हा परिणाम या पुस्तकापासून होण्यासारखा असल्यामुळें, 'आंग्लनृपकृपेंकरून निर्विघ्न श्रवण घडो' असा जरी आशीर्वाद सदर ग्रंथाला ग्रंथकर्त्यानें सरकारा-

कडून मागितला आहे, तरी सरकारच्या नजरेंतून असलें हें जातिद्वेषकारक खोडसाळ पुस्तक कितपत सुटेल, याबद्दल शंकाच वाटते. वाङ्मयांतील एक नमुनेदार मासला या दृष्टीनें ही पोथी नाश पावूं नये, अशी आमची स्वतःची इच्छा आहे; कारण तिनें गुन्हा केला असेल तर तो समाजाचा, भाषेचा नव्हे. आणि मराठे व ब्राह्मण यांच्यामधील आजचें भांडण विसरून जाण्याची वेळ येईल तेव्हां मराठी वाचक ही पोथी खचित गमतीनें वाचतील. वास्तविक कोणत्याहि ग्रंथासंबंधानें सरकारनें अशी उदार दृष्टि ठेवावयास पाहिजे. पण एकानें गाय मारली म्हणून दुसऱ्यानें वासरूं मारावें असें नाहीं, यामुळें हें लीलामृत १५३ अ–खालीं किंबहुना नव्या प्रेसआक्टाखालीं येण्यासारखें निःसंशय आहे तरी तें प्रत्यक्ष जप्त होऊं नये; मात्र असल्या पुस्तकास आश्रय देऊन जातिद्वेषाचें कोलित नाचविण्याचा नाद अनुचित आहे, अशी सूचना मात्र मुंबईसरकारांनीं करवीरकर छत्रपतींस करावी, असें आमचें आग्रहाचें व अगत्याचें म्हणणें आहे, येवढें सांगून या ‘ पाटिलीकाव्या ’ ची आम्ही रजा घेतों.

---

## ३१. चिरोलभाष्य–भाषांतर.

( ता. ३० आक्टोबर सन १९११. )

‘ हिंदुस्थानची अस्वस्थता, ’–ऊर्फ व्हॅलेंटाइन चिरोलकृत पुस्तकाचें डोंगरेकृत भाषांतर आमच्या हातीं पडल्यास बरेच दिवस झाले. आमच्याकडे आलेली पुस्तकाची ही प्रत बहुधा ‘ अभिप्रायार्थ नजर ’ आली असावी. असल्या पुस्तकावर अभिप्राय लिहिणें म्हणजे फांसेपारध्यांनीं वेढलेल्या-गुप्त जाळीं व सांपळे पसरलेल्या–रानांत संचार करण्यासारखें घातक असल्यामुळें, पुस्तक वाचतांच उत्पन्न झालेला कड निवेपर्यंत फिरून पुस्तकास हात न लावण्याच्या निश्चयानें आम्हीं तें इतकें दिवस मागें टाकलें होतें. परंतु मौनधारणानें गर्भित संमति गृहीत धरण्याचा एक इंग्रजी नियम आहे, आणि त्यास अनुसरून चिरोलभाष्य आणि त्यावरील डोंगरेकृत वार्तिक यांतील विलक्षण सिद्धांत व प्रमेयें आमच्यापुढें पेरलीं गेलीं तीं आम्हांस मान्य आहेत–त्यांच्याविरुद्ध बोलण्यासारखें कांहीं नाहीं–असा भलता समज उत्पन्न होण्याचा संभव असल्यामुळें,

आज त्यांचा थोडक्यांत परामर्ष घेण्याचा आमचा विचार आहे. चिरोलसाहेबां-सारख्या कसलेल्या लेखकानें हे लेख बनविले; लंडन टाइम्सपत्रांत ते छापले, पुस्तकरूपानें ते पुढें आणतांना सर आलफ्रेड लायल यांनीं त्यांना प्रस्तावना लिहिली, लॉर्ड मोर्ले यांना ते समर्पण करण्यांत आले. मोर्लेसाहेबांनीं आपल्या हातानें त्यावर परीक्षणात्मक लेख लिहिले; छत्रपति सरकार करवीर यांनीं त्यांच्या भाषांतरास व प्रसिद्धीस मदत दिली; आणि प्रो. डोंगऱ्यांसारख्या 'राजकारणपटु' लेखकानें प्रस्तावना लिहून त्यांचें भाषांतर प्रसिद्ध केलें. कोण ही महत्त्वपरंपरा ! अर्थात् अशा ग्रंथाचा परामर्ष अग्रलेखांत न घेणें म्हणजे या सर्व व्यक्तींचा अपमान करण्यासारखें होईल अशा समजुतीनें, केसरीची एक दोन रकान्यांची जागा व्यर्थ खर्ची पडली तरी आज ती खर्ची घालण्याचा आमचा विचार आहे.

लंडनच्या टाइम्सपत्रानें दोन वर्षांपूर्वी मि. व्हॅलेंटाईन चिरोल नामक एक अनुभविक बुद्धे कलमबहादूर हिंदुस्थानांतील अस्वस्थतेचा विशेष तपास कर-ण्याकरितां इकडे पाठविले होते हें सर्वांस माहीत आहेच. हिंदुस्थानांतील अस्व-स्थता ही चीज अलीकडे कांहीं दिवस वांदराच्या जखमेप्रमाणें होऊन बसली आहे. वाटेल त्या दुसऱ्या वांदरानें येऊन ती डिवचावी. या अस्वस्थतेची मीमांसा आजपर्यंत अनेकांनीं अनेक प्रकारांनीं केली आहे; पण रोगाचें खरें निदान असें कोणासच झालें नाहीं, असें म्हणणें भाग येतें. कारण खरें निदान झालें असतें तर औषधोपचाराची कांहीं तरी निश्चित योजना झाली असती. लंडन टाइम्स-सारख्या पत्रांचें ब्रीदच हें आहे कीं, जगाच्या पाठीवर कोठेंहि लोकचित्ताकर्षक असा प्रकार घडत असला म्हणजे आपला खास बातमीदार तेथें पाठवून त्याज-कडून माहिती आणवून छापावयाची. टाइम्सपत्र वजनदार होऊन त्याला 'मेघनाद' ही जी संज्ञा मिळालेली आहे त्यास हें एक कारण आहे. टाइम्सचा अगदीं खास खास बातमीदार झाला म्हणून त्याला हिंदुस्थानांतील अस्वस्थते-सारख्या प्रचंड व बिकट प्रश्नाचा सांगोपांग छडा एखाद दुसऱ्या फेरींत यथार्थ लावतां येईल असें थोडेंच आहे. पण टाइम्सपत्रकर्त्यांनें असला विचार कधीं केला नाहीं. किंवा त्याच्या प्रेषितानें अशा विचारानें आपली उमेद खर्चू दिली नाहीं. चिरोलसाहेबांनीं आपल्या बुद्धीप्रमाणें व फुरसतीप्रमाणें हिंदुस्थानांतील अस्वस्थतारूप नदीच्या मुखापासून उगमापर्यंत प्रवास केला. तीरावर तटस्थ-

वृत्तीनें राहणाऱ्या लोकांपासून त्यांनीं जातां जातां या नदीच्या शाखा व उपशाखा यांजविषयीं माहिती विचारली. खुद्द सरकारच्या दप्तरीं असणारे नकाशे व बखरी यांचें आलोडन केलें, पराक्रमी सहस्रार्जुनाप्रमाणें अस्वस्थतारूप नदीस बांध घालणाऱ्या साहसी व हिंमतवान् अधिकाऱ्यांशीं गुप्त कानगोष्टी करून अंतस्थ अशी खबर मिळविली. थोड्याच अवकाशांत जुळविलेली ही माहिती त्यांनीं सुमारें पंचवीस लेखांत इतक्या उत्कृष्ट तऱ्हेनें जगापुढें मांडली कीं, पुष्कळ लोक आश्चर्यानें थक्क झाले. मि. चिरोल यांनीं आपली तुतारी मेघनाद्-कारक अशा टाइम्सच्या कर्ण्यांतून फुंकल्यामुळें त्यांच्या गर्जनेपासून प्रत्यक्ष मेघनादाचा थोडा वेळ भासहि झाला. व कित्येकांस तर हा कोणी स्वर्गांतील देवदूतच भरतखंडांत येऊन मूर्तिमंत सत्य तेवढें उचलून घेऊन भरारी मारून निघून गेला कीं काय, असेंहि वाटलें असें दिसतें.

पण टाइम्सपत्र व चिरोलसाहेबांचें लेख हे पडले इंग्रजींत; त्यांचा फायदा फक्त इंग्रजी जाणणारे लोकांना; निवळ मराठी वाचकांस तो कसा मिळणार ? अर्थात् तो त्यांना मिळावा या उदार बुद्धीनें छत्रपति श्रीशाहूमहाराज यांनीं चिरोलसाहेबांच्या पत्रांचें मराठींत भाषांतर करवून छापविण्यासाठीं लागणारी रक्कम मंजूर केली; व मराठी वाचकवर्गास ज्ञानामृत पाजण्याच्या या पाणपोई-वर प्रो. डोंगरे यांची योजना केली. तथापि चिरोलसाहेबांच्या ग्रंथाशीं प्रो. डोंगरे यांचा संबंध भाषांतरापुरताच आहे असें मात्र नाहीं. कारण स्वतः भाषांतरकर्त्यां-नींच प्रस्तावनेंत सांगितलें आहे कीं, चिरोलसाहेब कोल्हापुरास गेले त्यावेळीं "भाषांतरकर्त्यांस साहेबबहाद्दुरांच्या परिचयाचा लाभ होऊन नानाप्रकारच्या विषयांवरील आपली माहिती त्यांना देण्याची संधि मिळाली होती" "पुणें आणि कोल्हापूर" या मथळ्याखालीं चिरोलसाहेबांनीं एक स्वतंत्र भागच लिहिलेला आहे. त्यावरून व इतर कित्येक गोष्टींवरून प्रो. डोंगरे यांनीं चिरोलसाहेबांस कोणकोणत्या बाबतींत कसकशी माहिती दिली असेल याचें अनुमान होण्यासारखें आहे. चिरोलसाहेबांच्या नांवावर मेघनाद् पत्रांत प्रसिद्ध झालेल्या लेखांमध्यें आपल्या स्वतःच्या मतांचा व विचारांचा ध्वनि उमटलेला पाहून भाषांतरकर्त्यास धन्यता वाटणें साहजिकच आहे. व हें सांगण्याचा हेतु हाच कीं, भाषांतरकर्त्यांनीं भाषांतराचें काम केवळ महाराज सरकारचा हुकूम म्हणून अथवा भाडोत्री लेखक म्हणून केलेलें नाहीं. त्यांचा अहंकार व चिरोल-

साहेबांचा अहंकार यांचें कांहीं अंशीं तादात्म्यच असल्यासारखें आहे. ही गोष्ट भाषांतरकर्त्यांच्या प्रस्तावनेवरूनहि दिसून येण्यासारखी आहे. चिरोलसाहेबांच्या हातास केवळ हात लावून होणारें गुप्तदान भाषांतरकर्त्यांस न खपूनच कीं काय, त्यांनीं पुस्तकांतील प्रमेयांचा व सिद्धांतांचा स्वतंत्र रीतीनें आपल्या जबाबदारीवर प्रस्तावनेंत उल्लेख केला आहे; हें पाहून ग्रंथकार व भाषांतरकार हे परस्परांस सोळा आणे अनुरूप असेच मिळाले याबद्दल कौतुक वाटतें. चिरोलसाहेब उत्तम लेखक झाले तरी ते परके. त्यांनीं केलेल्या स्तुतिनिंदेची किंमत पाव आणा तरी कमी ठरणार ! पण ही उणवि राहूं नये म्हणून भाषांतरकर्त्यांनीं हें स्तुतिनिंदेचें काम प्रस्तावनेंत स्वतःच्या हातानें थोडक्यांत पण घसघशीत करून घेतलें आहे. पेशवाई व ब्राह्मण जाति यांस नीच ठरवून; टिळक वगैरे गृहस्थांची मनसोक्त निंदा करून, आणि चार दोन म्युनिसिपालिट्यांच्या उदाहरणांवरून सर्व हिंदुस्थानाला स्वराज्यास नालायक ठरवून आपला देशाभिमान व्यक्त केला आहे. टिळकांचा कोठेंहि उल्लेख आला तरी त्यांचा एकेरी नामनिर्देश करून आणि स्वतःचा 'भाषांतरकर्ते' असा बहुमानार्थी शब्द वापरून त्यांनीं आपणा दोघांमधील अंतर जगाच्या निदर्शनास आणलें आहे !

टिळकांचें शत्रुत्व करणारे मराठी लेखक आजवर कांहीं थोडे झाले नाहींत. पण आजवर टिळकांचा एकेरी नामनिर्देश करणारे असे डोंगरे हेच आमच्या तरी पाहण्यांत पहिले आले. इंग्रजींत वाटेल त्या पूज्य व्यक्तीचाहि उल्लेख असला तरी तो एकवचनी असतो ही सबब डोंगरे यांस पुढें आणतां येणार नाहीं. मुळीं इंग्रजी व्याकरणांतच आदरार्थी बहुवचन नाहीं. पण मराठींत भाषांतर करतांना इंग्रजी एक वचनाचें अनेक वचन होतें, आणि हें याच पुस्तकांतील इतर लोकांच्या भाषांतरित उल्लेखावरून उघड होत आहे. 'भोज-प्रबंधां' त एके ठिकाणीं एकवचनाचा उपयोग कोठें क्षम्य आहे हें सांगितलें आहे. कवि म्हणतो:—

बाल्ये सुतानां सुरतेऽगनानां ।
स्तुतौ कवीनां समरे भटानाम् ॥
त्वंकारयुक्ता हि गिरः प्रशस्तः ।
कस्ते प्रभो मोहतमः स्मर त्वं ॥

रा. डोंगरे हे कांहीं नेणतेपणानें शेण खाणारें व बोबडें बोलणारें पोर, अथवा सुरत रसांत रंगलेली नवयुवती नाहींत; किंवा चिरोलभाष्याचें भाषांतर हा कांहीं ‘ टिळकराजस्तुती ’ चा काव्यग्रंथहि नाहीं. अर्थात् डोंगरे यांनीं टिळकांसंबंधाचा केलेला एकेरी उल्लेख ‘ प्रशस्त ’ मानावयाचा तर तो एका योद्धयानें समरभूमीवर दुसऱ्या योद्धयास लाविलेला अशा स्वरूपाचाच असला पाहिजे. पण इकडे टिळक तुरुंगांत बंदिवान होऊन पडले असतां त्यांच्या पश्चात् एखाद्या ग्रंथांत कोणी मोठ्या दिमाखानें एकेरी शब्द वापरणें हें धर्मयुद्धास अनुसरून तर नाहींच, पण ग्रंथकारवर्गाच्या सामान्य शिष्टाचारासहि सोडून आहे. आम्हांस तर रा. डोंगरे यांनीं टिळकांचा केलेला असा हा उपमर्द हें डोंगऱ्यांच्या उथळ मनाचें व हलकटपणाचें निंद्य प्रदर्शन असेंच वाटतें. टिळकांचीं राजकीय मतें डोंगरे यांस सर्वस्वीं अमान्य असतील; पण विद्वत्ता, बुद्धिमत्ता व स्वार्थत्याग या गुणांच्या दृष्टीनें पाहतां, डोंगरे हे टिळकांच्या पासंगास तरी पुरतील कीं नाहीं, याची आम्हांस शंका वाटते. आणि टिळक ‘ राजद्रोही ’ म्हणून डोंगऱ्यांच्या मनांतून ते कितीहि उतरले असले तरी, वरील अमोल्य गुणांकरितां तरी ते खुद्द डोंगरे यांस पूज्य असल्याची साक्ष त्यांची मनोदेवता देतहि असेल. वास्तव आपल्या ग्रंथांत त्यांनीं, अगदीं यःकश्चित् मनुष्यासहि देण्यासारखा—आदरार्थी नव्हे तर केवळ शिष्टाचारार्थी जो बहुवचनप्रयोग तो टिळकांच्या नांवास न लावणें हें टिळकांचा अपमान करण्याच्या बुद्धीचा उल्लूपणा व्यक्त करण्यासारखें आहे. पण ही गोष्ट डोंगरे यांस उन्मदातिरेकांत कशी सुचावी ? वर्तमानपत्रांच्या कायद्यानें वर्तमानपत्रकर्त्यांच्या भात्यांत शिरून त्यांच्या बाणांचीं टोकें आज मोडून टाकिलीं आहेत. तेव्हां डोंगऱ्यांसारख्या ग्रंथकारांनीं नेसावयाचें सोडून डोक्यास गुंडाळून धांवूं लागल्यास नवल काय ! शिवाय कोल्हापूरचे छत्रपति शाहूमहाराज हे कांहीं झालें तरी आम्हांस वंदनीय असेच असल्यानें, त्यांच्या आश्रयानें खेळ करणाऱ्या चिरोलभाष्य—भाषांतरकारांची, शिवाच्या पिंडीवर चढलेल्या विंचवाप्रमाणें, उपेक्षा करणें आम्हांस प्राप्तच आहे.

रा. डोंगरे यांनीं आपल्या प्रस्तावनेंत स्वतःचीं म्हणून जीं मतें दिलीं आहेत त्यांत, त्यांच्या ठिकाणीं असलेला जातिद्वेष व राजकारणासंबंधींचे त्यांचे कोते ग्रह, हे कोणासहि तेव्हांच दिसून येतात. हिंदु लोकांच्या एकंदर धर्म-

चळवळीस त्यांनीं प्रच्छन्न राजकीय चळवळ असेंच गणिलेलें दिसतें, आणि स्वः-तच्या हिंदी विश्वबंधुत्वाचा आव घालून हिंदूंवर आरोपित झालेल्या जाति-मत्सराचा त्यांनीं निषेध केला आहे. पण लगेच त्यांनीं आपल्या वळणावर येऊन महाराष्ट्रीयांची मात्र स्तुति केली आहे. डोंगरे म्हणतातः—"आज-पर्यंतचा जो कांहीं अनुभव आहे त्यावरून कोणतेंहि राष्ट्रीय काम हातीं घेण्यास महाराष्ट्राची जशी पत्रता आहे तशी इतर कोणत्याही प्रांताची नाहीं, हें मोठ्या अभिमानानें आम्ही येथें सांगतों. कारणें कांहींहि असोत; पण महाराष्ट्रीयांच्य अंगीं कांहीं खरे खरे राष्ट्रीय गुण आहेत तसे इतर प्रांतांतील लोकांच्या ठिकाणीं क्वचितच असतील." हिंदूंनीं हिंदुत्वाचा अभिमान धरणें हें जर राष्ट्रहितविघातक आहे तर महाराष्ट्रीयांनीं तरी, "आम्ही महाराष्ट्रीय तेवढे इतर सर्व लोकांहून अधिक गुणवान् व राजकारणपटु" अशी उघड बढाई मारणें हेंहि तितकेंच राष्ट्रहितविघातक नाहीं काय? बरें हिंदु लोक मात्र चळवळ करितात. पण मुसलमान काय करितात? हिंदु लोक उच्चनीच भाव मानतात. पण अशा नाहीं तशा प्रकारचा उच्चनीच भाव मानण्याच्या प्रवृत्तीचे लोक हिंदुस्थानांत दुसरे आहेत कीं नाहींत. मग डोंगऱ्यांनीं त्यांचाहि तीव्र निषेध केलेला कां आढळूं नये. पण डोंगरे तो कसा करणार? त्यांना हिंदुस्थानांत आजच्या घटकेस ब्राह्मणांच्या ब्राह्मण्याशिवाय देश-स्थितीस दुसरें कांहींएक कारण असेल असें दिसतच नाहीं. त्याला त्यांनीं तरी काय करावें?

खुद्द भाषांतरकारासंबंधाचें एवढें परीक्षण पुरें आहे. चिरोलसाहेबांच्या ग्रंथांचेंहि परीक्षण थोडेंबहुत करण्यासारखें आहे. परंतु त्या बाबतींत आम्ही पडूं इच्छित नाहीं. जेथें स्पष्ट बोलण्यास न्यायाची सवलत मिळण्यासारखी नाहीं, त्या बाबतींत अबोला धरणेंच बरें. चिरोलसाहेबांच्या पुस्तकाचा पहिला भाग हें सद्यःस्थिती-विषयीं अधिकाऱ्यांचें जें म्हणणें आहे त्याचाच केवळ अनुवाद आहे. असं-तोषाच्या केवळ बाह्य चिन्हांचें वर्णन चिरोलसाहेबांनीं केलें आहे. तथापि, अंतः-करणांची मीमांसा करणें अथवा उपाय सुचविणें, या बाबतींत साहेबमजकूर फारसे पडले नाहींत; व जेथें ते या भानगडींत पडले तेथें त्यांनीं घबाड चुकाच केल्या, हें डोंगरे यांनींच आपल्या प्रस्तावनेंत एका उदाहरणानें सिद्ध केलें आहे. 'हिंदु-स्थानांतील अस्पृश्य लोकांचें काय होणार किंवा काय करावें,' असा प्रश्न उप-

स्थित झाला असतां सरकारानें त्यांस ख्रिस्ती करून सोडावें असा पक्के सल्ला देऊन चिरोलसाहेबांनीं या प्रश्नाचा चुटकीसारखा निकाल लाविला आहे! पण म्हशीचीं शिंगें अरुंद अशा दारांत अडकलीं असतां म्हशीचें डोकें कापून व घर पाडून शिंगांची सुटका करण्याचा सल्ला देणारा उंटावरचा शाहाणा तरी याहून अधिक मूर्खपणाचा सल्ला तो कोणता देणार! हिंदुस्थानांतील शंभर चळवळींस व शंभर व्यक्तींस नांवें ठेवून, केवळ आपल्या मतलबास सर्वांत जवळजवळ वाटणाऱ्या एकाद्दुसऱ्या संस्थेचे किंवा व्यक्तीचे गुण घेतलेसे दाखवून, निःपक्षपाती व नीरक्षीरविवेकी हंसाचें अनुकरण करण्याचा बहाणा कोणासहि साधणें फारसें कठीण नाहीं. हिंदुस्थानांतील अस्वस्थतेचीं सर्व खरीं कारणें स्पष्टपणें बोलून दाखविणें हें कांहीं अंशीं हिंदी लोकांच्या राजभक्तीमुळें, व कांहीं अंशीं कायद्याच्या आजच्या जाचामुळें शक्य नाहीं. अशा स्थितींत चिरोलसाहेबांसारखा तरतरीत व बारीक नजरेचा अनुभविक लेखक हिंदुस्थानांत वस्तुस्थिति पाहण्यास आला, तो तरी सरकारास नीट समजावून सांगेल अशी आम्हांस आशा वाटत होती. पण चिरोलसाहेबांच्या पुस्तकावरून आमची निराशा झाली. डोंगरे यांनीं चिरोलसाहेबांस भीष्माचार्यांची उपमा दिली आहे! भीष्माचार्य जसे धनुर्विद्येंत तसेच चिरोलसाहेब लेखनविद्येंत निष्णात आहेत, ही गोष्ट आम्हांसहि मान्य आहे. पण खुद्द भीष्माचार्यांनीं 'अर्थस्य पुरुषो दासः' हें जसें तोंडानें कबूल केलें व कृतीनें सिद्ध केलें तसें चिरोलसाहेबांनीं तोंडानें मात्र न सांगतां हातानें सिद्ध केलें! ते 'टाइम्स' पत्राचे प्रेषित, तेव्हां टाइम्सच्याच दृष्टीनें हिंदुस्थानांतील अस्वस्थतेचें त्यांनीं निरीक्षण केल्यास नवल नाहीं. चिरोलसाहेबांनीं हिंदुस्थानांतील अस्वस्थतेचा डोंगर पोखरून उंदीर काढला तो काढला; पण या डोंगराच्या पोटच्या या पोराचें इतकें कौतुक करण्यांत आमच्या डोंगऱ्यांना काय लाभ होणार होता, हें त्यांचें तेच जाणोत!

---

## ३२. कौन्सिलांतील शकुंतलाख्यान

(तारीख २२ फेब्रुवारी सन १९१०)

परवां बड्या कायदे-कौन्सिलामध्यें वर्तमानपत्राच्या बिलावरील वादविवादांत 'शकुंतला' आली होती! म्हणजे काय, तर तेथें तिचें स्मरण करण्यांत आलें होतें. विषय असा निघाला होता कीं, दडपशाहीच्या या नवीन बिलाचें प्रयोजन

काय ? व या प्रश्नाचें उत्तर देतांना ना. सर हर्बर्ट रिस्ले यांनीं असें सांगितलें कीं, अलीकडे हिंदुस्थानांत बेसुमार राजकीय चळवळ सुरू झालेली असून या देशांतल्या कुलस्त्रियाहि पडद्यामागें राजकारणाच्या गोष्टी बोलूं लागल्या आहेत. रिस्लेसाहेब म्हणाले, "सर्वांत वाईट गोष्ट ती ही आहे कीं, जनान्यामध्यें सरकारच्या बदनामीचा फैलावा होत असून स्त्रियांनाहि राजद्रोही चळवळींत सामील करून घेण्याचे प्रयत्न सुरू आहेत. इंग्रजसरकारांनीं प्लेग आणला ही खोटी बातमी म्हणे जनानखान्यांत फार पिकते. नवीन शिक्षणाच्या योगानें स्त्रीजातीच्या मनाचा विकास होत असतां व स्त्रीजात उद्योन्मुख असतां सुरुवातीसच असलें अरिष्ट त्यांजवर यावें हें फार वाईट आहे. रोमन व सॅबीयन लोकांपासून सर्व काळीं स्त्रियांकडे मुख्य काम म्हटलें म्हणजे पुरुषांपुरुषांत दिलजमाई करून शांतता राखण्याचें होतें. गैरभावाच्या तीक्ष्ण शस्त्रानें झालेल्या जखमांस प्रेमाचें मलम लावून त्यांनीं त्या आजपावेतों बुजविल्याच आहेत. त्यांच्या योगानें वैर कमी झालें, वाढलें नाहीं. असें असतां हिंदुस्थानांत मात्र भावी युगामध्यें निर्माण होणाऱ्या शकुंतलांनीं राजद्रोहाच्या वातावरणांत राहून व तत्सम होऊन खुनाचे कट करावे, किंवा बाँबचे लाडू वळावे हें शोभतें काय ? व असें जर होणारच असेल तर मग त्या शकुंतलांना शकुंतला तरी कोण म्हणेल ? कवीनें वर्णन केलेली शकुंतला कोणीकडे व ही शकुंतला कोणीकडे ?" रिस्लेसाहेबांचे हे शब्द वाचून आम्हांस सखेदाश्चर्य वाटतें. आश्चर्य अशाकरितां वाटतें कीं जी गोष्ट मुळांत साफ खोटी व जी आजपर्यंत हिंदी लोकांच्या कानांवर कधींहि आलेली नाहीं ती गोष्ट रिस्लेसाहेबांपर्यंत जाते कशी ? व खेद अशा करितां वाटतो कीं, असल्या गोष्टींवर ते भरंवसा ठेवतात कसा ? आणि त्यावर ते भरकौन्सिलांत गंभीरपणानें पांडित्य करितात तरी कसें ?

दुर्दैवानें आमचा स्त्रीवर्ग अद्यापि इतका अशिक्षित आहे कीं त्यांपैकीं हजारांत एकीस तरी राजकारण कशाशीं खातात हें माहीत असेल किंवा नाहीं याची शंकाच आहे. जेथें साधारण इतिहास–भूगोलाचेंहि वावडें, तेथें गहन राजकारणाचा प्रवेश कसा होणार ? संसारांतील सुखदुःखें व राजकारण यांचा मार्मिक कार्यकारणभाव जेथें अद्यापि पुरुषांसहि धड कळूं लागला नाहीं, तेथें तो स्त्रियांस कळणें व त्या ज्ञानाच्या योगानें त्यांच्या मनोविकारांवर परिणाम घडणें, ही गोष्ट केवळ दुरापास्त होय. ज्यांना दंतकथेशिवाय

राष्ट्राचा पूर्वेतिहास लक्षांत येण्यास दुसरा मार्गच नाहीं, त्यांना मागच्या पुढच्या-फार तर एक दोन- पिढ्यांपुरती सुस्थिति अगर दुःस्थिति ही सापेक्ष कळणार! संसार सुखाचा झाला व अंगावर चार दागदागिने असले म्हणजे शेंकडा नव्वद स्त्रियांचें स्वराज्य त्यांतच आलें. 'यदि रामा यदि च रमा यदि तनयो विनय-धीगुणोपेतः। तनये तनयोत्पत्तिः सुरवरनगरे किमाधिक्यं?॥' हें वचन फक्त एका शब्दाच्या फरकानें आजकालच्या बहुतेक स्त्री-पुरुषांस सारखेंच लागूं पडण्यासारखें आहे. आपल्या घरीं पूर्वीं रुप्याचीं भांडीं नव्हतीं तीं झालीं, हातांत सोन्याच्या पुरणपाटल्या होत्या त्या जाऊन मोत्याच्या आल्या, किंवा जेथें पूर्वीं चंद्रमौळी घर होतें तेथें सात मजली हवेली उठली, या गोष्टीनें आपल्या घरीं श्रीमंती आली हें समजण्याऐवजी देशच सधन होत आहे हें जसें अज्ञ स्त्रिया मानणार; त्याचप्रमाणें जेथें फुलें वेंचलीं तेथें गोवऱ्या वेंचावयास लागल्या तर फक्त आपल्या घराण्यावर लक्ष्मीनें पाठ फिरविली असें न मानतां सर्व देश भिकारी झाला असेंच त्या म्हणणार. उलटपक्षीं याच अज्ञानाच्या अनुषंगानें असेंहि होणार कीं, घरीं मुलांना हवें तितकें दूध प्यायला देतां येत नाहीं याबद्दल, वास्तविक जंगल राखून गुरें व चारा महाग केल्याबद्दल सरकारावर रागवावयाचें तें न रागावतां दूध महाग केल्याबद्दल सोमा गवळ्यालाच त्या शिव्या देतील. सुंदर केरवे व राजवर्खी बांगड्या इंग्रजी राज्यामुळें इकडे आल्या एवढ्याच गोष्टीवरून त्यांनीं इंग्रजी राज्याचें कौतुक करून त्यास चिरकालित्वाचा दुवा द्यावा हें जसें संभवतें, त्याचप्रमाणें अलीकडे घरीं भांडी घांसायला गडी व बाया मिळत नाहींशा झाल्या हें पाहून कारखाने व गिरण्या याबद्दल आनंद मानण्याचें त्यांच्या लक्षांत न येऊन त्याबद्दल इंग्रजी राज्यासच त्यांनीं वाईट म्हणावें हेंहि तितकेंच संभवतें! परंतु खरें पाहिलें तर विलायती बांगड्या आल्यानें तितक्यापुरती देशी कारागिरी बुडाली म्हणून त्या वाईट; किंवा गिरण्या व कारखाने वाढून गरीब लोकांस रोजमुरा अधिक मिळूं लागला याकरितां गडीमाणूस घरकामास मिळत नाहींसें झालें आणि आपल्यास भांडीं घांसावीं लागलीं तरी देशांतील उद्योगधंदा वाढला तेव्हां झालें तें एकंदरीनें चांगलेंच झालें—असले कार्यकारणभावाचे सूक्ष्म अन्वय कळण्यास चांगलेंच शिक्षण अंगीं असावें लागतें. परंतु हल्लीं हिंदुस्थानांत साधारण र ट फ करणाऱ्या स्त्रियांची संख्या हजारीं ४० इतकी भरत नाहीं.

तसेंच अज्ञान आणि भ्रम व भोळेपणा यांची संगति प्रसिद्धच आहे. यामुळें कित्येक बाबतींत स्त्रियांच्या डोक्यांत भलत्यासलत्या समजुतीहि खिळलेल्या राहतात. परंतु त्यांचा धर्मांशीं व सामाजिक आचारांशींच विशेष संबंध असतो; राजकारणाशीं मुळींच नसतो. इंग्रजी राज्यानें प्लेग आणला असें हिंदी स्त्रियांना शिकवितात व तें त्यांना खरें वाटतें, असें रिस्लेसाहेब म्हणतात. आम्हांस तर हें खरेंच वाटत नाहीं; भक्कम पुराव्याशिवाय उगीच विधानें ठोकून देण्याची संवय अधिकाऱ्यांना अलीकडे विशेष लागलेली आहे व त्यांतलेंच हेंहि एक विधान असावें. तथापि, हें खरें आहे असें मानलें तरी, 'इंग्रजांनीं आगगाडी आणली व आगगाडीनें प्लेग फैलावला म्हणून इंग्रजांनीं प्लेग आणला' असें कोणी म्हणत असल्यास नकळे! पण वर सांगितल्याप्रमाणें हा सर्व केवळ अज्ञानाचा परिणाम; दुष्ट बुद्धीचा मात्र नव्हे. बरें, स्त्रियांच्या अज्ञानाला तरी सर्वस्वीं नांवें कशीं ठेवावीं? कारण आपल्यास अमुक एक जागा अगर बढती मिळणार किंवा नाहीं हें मनाशीं ठरवावयास 'सिव्हिल लिस्ट' न पाहतां ज्योतिषाकडे धांव घेणारे युरोपियन व नेटिव अधिकारी, व पुत्रप्राप्तीकरितां चोरून पिंपळास प्रदक्षिणा घालणारे सुशिक्षित पुरुष जर आपल्यामध्यें आजच्या घटकेलाहि आढळतात, तर आगगाडीच्या प्रथम दर्शनाचे वेळीं तिच्यापुढें पैसा सुपारी ठेवून नमस्कार करणाऱ्या व 'सरकारनें प्लेग आणला' असें मानणाऱ्या स्त्रिया आढळतात तरी त्यांत काय नवल! यास भोळेपणा हेंच नांव योग्य, राजद्रोह हें नव्हे; आणि भोळेपणा जाण्यास शिक्षण व मुद्रणस्वातंत्र्य हीं वाढूं दिलीं पाहिजेत, कमी करितां कामा नये. पण रिस्लेसाहेबांनीं राजद्रोहाच्याहि पुढें मजल मारली आहे. हिंदी स्त्रिया नुसता सरकारचा द्रोह मनांत करून थांबणार नाहींत, तर त्या खुनाचे कट करतील व बाँबचे गोळे वळूं लागण्यास आपल्या बापांभावांस मदत करतील असेंहि त्यांनीं ध्वनित केलें आहे. परंतु ही निव्वळ बदनामी आहे व रिस्लेसाहेबांनीं ती दुष्टबुद्धीनें केली नसली, केवळ भीतीनें ते बोलले असले तरीहि ती बदनामीच होय.

हिंदुस्थानांतील स्त्रियांसारख्या सात्त्विक स्त्रिया इतरत्र फार थोड्या सांपडतील व त्यांच्या या पवित्र शीलावर नुसता शिंतोडाहि टाकण्यास आजच्या वस्तुस्थितीचा कोणता पुरावा, व भावी स्थितीबद्दल कोणतीं अनुमानचिन्हें आपल्या संग्रहीं आहेत, हें रिस्लेसाहेबांनीं स्पष्ट करून सांगावयास पाहिजे होतें. कौन्सि-

लांतील सभासद् झाले म्हणून काय झालें ? असलीं धाडसी विधानें करणें हें त्यांस मुळींच शोभत नाहीं. आज विलायतेंतील स्त्रियांमध्यें शिक्षण हा गुण, आणि निरंकुशत्व, दारूबाजी वगैरे दोष हिंदुस्थानांतील स्त्रियांपेक्षां किती तरी पट अधिक आहेत. राजकीय हक्कांकरितां त्यांनीं किती तरी थैमान व अकांडतांडव चालविलें असून या कामीं त्यांनीं अत्याचारहि किती केले आहेत हें जगप्रसिद्ध आहे. असें असतां जी गोष्ट इंग्रजी स्त्रियांसंबंधानें बोलणें हें सुद्धां दोषास्पद झालें असतें ती गोष्ट गरीब बापड्या हिंदी स्त्रियांसंबंधानें बोलणें हें सर्वस्वीं अन्यायाचें होय. रिस्लेसाहेबांस इंग्रजी राज्याची काळजी असेल; पण आम्हांस इंग्रजी राज्याबरोबरच आमच्या देशाची, व आमच्या देशभगिनींच्या लौकिकाचीहि काळजी आहे. मुद्रणस्वातंत्र्यासंबंधीं आणखी दसपट कडक कायदे झाले, तरी ह्या लौकिकाविरुद्ध कोणीहि ब्र काढल्यास हिंदी पत्रें त्याचा तीव्र निषेध केल्याशिवाय कधींहि राहणार नाहींत. रिस्लेसाहेबांचा बोलण्याचा रोख 'हिंदी स्त्रिया खुनी व अत्याचारी होतीलच' असें विधान करण्यापेक्षां 'होऊं नयेत' अशी आशा प्रकट करण्याकडेच अधिक आहे, हें आम्हांस कबूल आहे. परंतु कोणचीहि आशा व्यक्त करण्याच्या मुळाशीं एक प्रकारचा संशय तरी असतो व प्रस्तुत बाबींत या संशयाचीहि आम्हांस तितकीच चीड वाटते.

कित्येक गोष्टींचें नुसतें शाब्दिक साहचर्यहि मनुष्यास सोसवत नाहीं. समजा कीं, आपले गव्हर्नरसाहेब हे प्रजापालनदक्ष आहेत अशी समजूत असणाऱ्या एखाद्या म्युनिसिपल प्रेसिडेंटनें उद्यां एखाद्या मानपत्रांत अत्यंत सद्बुद्धीनें, "सरकार प्रजेला एखाद्या व्याघ्राप्रमाणें भक्षणार नाहीं अगर खाटिकाप्रमाणें कापणार नाहीं अशी आम्हांस आशा आहे," असें जर म्हटलें तर त्याला काय म्हणतील ? एखाद्या भल्या गृहस्थास रस्त्यांत नमस्कार करून, 'आपण कधींहि चौर्यकर्मास प्रवृत्त होणार नाहीं अशी मला फार आशा आहे' असें कोणी बोलेल, अथवा एखाद्या कुलस्त्रीस 'अष्टपुत्रा सौभाग्यवती भव' असा आशीर्वाद न देतां 'मुली तूं विधवा होणार नाहींस, तुझें निसंतान होणार नाहीं, अशी माझी ईश्वराजवळ प्रार्थना आहे' असा जर आशीर्वाद कोणी देईल, तर त्याच्या सद्धेतूबद्दल बरें वाटेल कीं अप्रयोजकपणाबद्दल राग व तिरस्कार वाटेल ? हरिदासी गोष्टींत 'लग्नमंडपाचे वेळू कापून तयार आहेत' असें म्हणण्याऐवजीं 'नाऱ्यानें' 'वंश-च्छेद झाला' असें म्हटलें यांत

तरी त्याची बुद्धि वाईट कुठें होती? शब्दहि फर्मासीचे संस्कृत होते! पण त्याचा जर राग मानावयाचा, तर "तुमची भावी शकुंतला ही गळेकापू, बदमाष, खुनी व अत्याचारी निघूं नये" असें म्हणणाऱ्याच्या सद्‌बुद्धीचा जरी कडेलोट झाला असला, किंबहुना असें म्हणतांना त्याच्या डोळ्याला पाण्याचा पूर आला असला, तरी तसें म्हणणें निंद्यच होय असें आम्हांस वाटतें. रिस्ले-साहेबांचा कटाक्ष कशावर आहे हें आम्ही जाणून आहों. तथापि त्यांस आम्ही हें स्पष्ट सांगतों कीं, आमच्या भावी शकुंतला अत्याचारी होणार नाहींतच, परंतु रिस्लेसाहेबांस हव्या अशा त्या राष्ट्रहित-मूढ मात्र राहणार नाहीं. हिंदी स्त्रियांना हळूहळू शिक्षण मिळत आहे; व देशाची सद्यःस्थिति वर्तमानपत्रांवरून, आणि प्राचीन स्थिति इतिहास व पुराणें यांजवरून त्यांस कळूं लागलेली आहे. या ज्ञानाचा योग्य परिणाम त्यांचे मनावर झाल्याशिवाय राहाणार नाहीं, व नैसर्गिक मर्यादा संभाळून, धार्मिक व सामाजिक कार्याप्रमाणेंच राजकीय कार्यांतहि त्या पुरुषांचें सहाय्य पुढेंमागें करणार यांत शंका नाहीं; मग अधिकाऱ्यांना त्याबद्दल कितीहि विषाद वाटो. या मर्यादा योग्य रीतीनें पाळल्या जाव्या, पण त्या तशा पाळल्या जातात कीं नाहीं हें पाहण्याची जबाबदारी व काळजी सरकारापेक्षां आम्हांस अधिक आहे. व कायद्याच्या दृष्टीनें स्त्रियांत व पुरुषांत भेद नसेल; परंतु समाजाच्या दृष्टीनें पुष्कळ आहे; व त्यांजकडून मर्यादेचें उल्लंघन होत आहे, ही गोष्ट आम्हांस सरकारापेक्षां आधीं कळणार व आम्हीच त्याचा सरकारच्या आधीं बंदोबस्त करणार! परंतु स्त्रियांस राजकाज समजूं नये अगर त्यांनीं त्यांत मुळींच लक्ष घालूं नये अशी जर सरकारची अपेक्षा असेल तर मात्र ती व्यर्थ आहे.

स्त्रिया या पुरुषांच्या सहधर्मचारिणी आहेत; यामुळें राजधर्माच्या बाबतींतहि त्यांनीं मन घालण्याचा त्यांस अधिकार पोंचतो. तसेंच संसारांत त्या पुरुषांच्या भागीदार आहेत; आणि कोणाहि खऱ्या नागरिकाचा संसार म्हणजे आपल्या बायकापोरांपुरताच असतो असें म्हणतां येत नाहीं. घरच्या संसाराप्रमाणेंच राष्ट्राचाहि संसार स्त्रीपुरुषांस पाहिला पाहिजे; घरच्या संसाराप्रमाणेंच राष्ट्रीय संसारांतल्या सुखदुःखाबद्दल त्यांनीं काळजी केली पाहिजे; घरच्या संसारा-प्रमाणेंच राष्ट्रीय संसाराच्या घडामोडींतील गोष्टींबद्दलहि त्यांनीं मान व अपमान, प्रेम व द्वेष, हर्ष व शोक, भूषण व दूषण मानलीं पाहिजेत. एरवीं तो समाज, तें राष्ट्र, पक्षघात झाल्याप्रमाणें विकलांग राहील. सर्वगुणसंपन्न अशा स्त्रीजातीचें

उपलक्षण म्हणून रिस्लेसाहेबांनीं शकुंतलेचेंच उदाहरण कां दिलें ? कदाचित् यांत कांहीं विशिष्ट हेतु नसेल, व कदाचित् पाश्चात्य पंडितांना इतर कोणत्याहि सुप्रसिद्ध कुलस्त्रीपेक्षां शकुंतलेचें नांव अधिक परिचित असण्याचा संभव आहे. सन १७८० चे सुमारास सर विलियम जोन्स यांनीं इंग्रज लोकांना कालिदास कवीच्या शाकुंतल नाटकाची ओळख प्रथम करून दिली, तेव्हांपासून शकुंतलेचें नांव हिंदुस्थानांतील लोकांप्रमाणेंच विद्याप्रिय इंग्रजांच्या जिव्हाग्रावर नाचत आहे, हें आम्हांस माहीत आहे. परंतु शकुंतलेप्रमाणेंच इतर सुप्रसिद्ध स्त्रियांचीं नांवें रिस्लेसाहेबांसारख्या विद्वान् गृहस्थास माहीत नसतील असें मात्र नाहीं. परंतु तीं माहीत नसलीं तर माहीत करून देणें हें आमचें काम आहे. कारण कालिदासाची शकुंतला ही फक्त मुग्धनायिकेचें एक उत्कृष्ट उदाहरण आहे इतकेंच काय तें; परंतु राष्ट्रीय चरित्रासंबंधानें बोलावयाचें तर शृंगारपूर्ण नाटकांतील नुसत्या मुग्धनायिकेचीं उदाहरणें घेऊन भागावयाचें नाहीं.

पण खुद्द शकुंतलेचाहि स्वभाव सांगोपांग कळल्यास रिस्लेसाहेबांस ती तरी यापुढें आवडेल कीं नाहीं कोण जाणे ! रिस्लेसाहेबांच्या परिचयाची शकुंतला ही एक प्रेमळ व अत्यंत भिडस्त अशी अज्ञान मुलगी आहे. परंतु शकुंतलेलाहि खारट तुरट चांगलेंच कळत होतें ! तिनें गांधर्वविवाह लावावयाच्या आधीं आपल्या मुलास राज्यपद मागून घेतलें होतें हें साहेबांना माहीत नाहीं असें दिसतें. दुष्यंत राजानें गोड बोलून फसविलेली शकुंतला साहेबांस माहीत आहे; परंतु तिच्या समजुतीप्रमाणें राजाचें कपट उघडकीस आल्यानंतर भिडस्तपणा चटसारा टाकून देऊन भर राजसभेमध्यें त्याची चांगली खरडपट्टी काढणारी शकुंतला त्यांस माहीत नाहीं असें वाटतें. शाकुंतलाच्या तिसऱ्या अंकांत "न माननीयेषु आत्मानं अपराधयिष्यामि"—ज्यांना मान द्यावयाचा त्यांना तो न दिला तर मी फार अपराधी होईन असें म्हणणारी शकुंतला खरी, पण पांचव्या अंकांत राजानें तिला अनादर दाखवून कांगावा करण्यास प्रारंभ केला तेव्हां तिनें प्रथम राजास नम्र विनंति करून पाहिली, व त्यानें दिलेल्या वचनाची त्यास आठवण करून दिली, तेव्हां 'आर्यपुत्र' या प्रेमाच्या शब्दावरून 'पौरव' या परकेपणाच्या पण संभावित शब्दावर तिची मजल आली; आणि तेवढ्यानेंहि जेव्हां भागेना तेव्हां तिनें सर्व सौजन्य बाजूस सारलें. राजानें जेव्हां वचनच नाकबूल केलें तेव्हां तिचा राग अनावर झाला. आणि 'हे अनार्या' या शब्दानें त्यास संबोधून 'धर्माचें पांघरूण

घेणारा पापी' 'तोंडावर गवत पसरलेला घातकी खंदक' 'तोंडात मध पण हृद्यांत कालकूट विष बाळगणारा भोंदू' अशीं शेलकीं विशेषणें लावून तिनें त्याचा धिक्कार केला ! पण कालिदासाच्या नाटकी शकुंतलेपेक्षांहि भारतांतली मूळची शकुंतला अधिक तेजस्वी आहे. कारण तिच्या रागाची मजल याहीपुढें गेलेली आहे. "सरंभामर्षताम्राक्षी स्फुरमाणोष्ठसंपुटा ! कटाक्षैः निर्दहंतीव तिर्यक् राजानमैक्षत ॥" असें तिचें वर्णन आहे, व तिचे शब्द तर खालीलप्रमाणें आहेत.

'योन्यथा संतमात्मनमन्यथा प्रतिपद्यते ।
'तेन किं न कृतं पापं चौरेणात्मापहारिणा ॥
'यदि मे याचमानाया वचनं न करिष्यसि ।
'दुष्यंत शतधा मूर्धा ततस्तेद्य स्फुटिष्यति ॥

शकुंतलेचा आपल्या व्यक्तीच्या हिताहितापुरताच संबंध आलेला होता; पण प्रत्यक्ष राजकारणांत पडणाऱ्या अशा इतर स्त्रियाहि आम्हांत होऊन गेल्या. भारतांतील मुख्य नायिका द्रौपदी ही होय. तिच्यासारखी उदात्त, प्रौढ विचाराची, मानी स्त्री इतरत्र क्वचितच सांपडेल. द्रौपदी ही आहे याहून निराळी असती तर भारतांतील कथाभाग कांहीं वेगळाच झाला असता; व या महाकाव्याचें निम्मेंशिम्में स्वारस्य नाहींसें झालें असतें, असें आम्हांस वाटतें. द्रौपदी ही अत्याचारी नव्हती. कौरवांनीं अनेक अपराध व पांडवाचे खून करण्याचे प्रयत्न केले असतां तिनें एकाहि कौरवाच्या खुनाचा कट केल्याचें आम्हांस माहीत नाहीं; व ती रणांगणांत तर कधीं गेली नव्हती. तात्पर्य, स्त्रीजातीच्या गोड शालिनतेस दूषणास्पद असें तिच्या हातून कांहींच घडलें नव्हतें. तथापि, रिस्लेसाहेब समजत असतील त्याप्रमाणें ती गोगलगाय किंवा निवळ शांतिब्रह्म मात्र नव्हती. तिच्या पतींच्या म्हणजे पांडव वीरांच्या धैर्याची ती एक कसोटी होती; व तिनेंच त्यांना सदैव प्रवृत्तिपर ठेवून उत्तेजन दिलें. महाभारत, वेणीसंहार नाटक, किंवा भारवीचें किरातार्जुनीय महाकाव्य, हीं वाचणारांस द्रौपदी ही कशी होती हें खरें कळून येईल. भारतीय युद्धाच्या प्रारंभीं भीम तिला भेटण्यास गेला असतां एखाद्या प्राकृत स्त्रीप्रमाणें ती मुळुमुळू रडली नाहीं, तर 'असुरसमराभिमुखस्य हरेरिव मंगलं युष्माकं भवतु' ( वेणीसंहार अंक १ ) असा तिनें त्यास दणदणीत आशीर्वाद दिला. भारवीनें तर अत्यंत गहन असें राजकारण द्रौपदीच्या तोंडीं घातलें आहे व अर्थात् तें ती राजकारणी, प्रौढ-

विचारी, पाणीदार स्त्री होती अशी सर्व लोकांची समजूत असल्याकारणानेंच! धर्मराजास अनेक रीतींनीं उपदेश व राग आणण्याचा प्रयत्न करून, शेवटीं:—

अथ क्षमामेव निरस्तविक्रम-
श्चिराय पर्येषि सुखस्य साधनं ।
विहाय लक्ष्मीपतिलक्ष्म कार्मुकं
जटाधरः संजुहुधीह पावकं ॥
( किरात ०-१-४४. )

म्हणजे ‘ इतक्याहि उपर पराक्रमाची कायमची फारकत करून घेऊन, क्षमा व शांति हींच काय तीं सुखाचीं मुख्य साधनें आहेत असें मानण्याचेंच जर आपल्या मनानें घेतलें असेल तर मग राजचिन्हांकित असें हें हातांतलें धनुष्य टाकून द्या, जटा वाढवा, आणि अग्निहोत्र घेऊन, समिध शेकीत व पळीपंचपात्री वाजवीत बसा जा ! ’ असा खडखडीत जबाब तिनें आपल्या नवऱ्यास दिला ! उद्योगपर्वाच्या ८२ व्या अध्यायामध्यें द्रौपदी व श्रीकृष्ण यांचें संभाषण आहे तेंहि प्रस्तुत विषयीं रिस्लेसाहेबांनीं वाचावयास पाहिजे होतें. धृतराष्ट्रानें द्रौपदीस वर माग म्हणून सांगितलें तेव्हां तिनें स्वतःकरितां दागदागिने मागितले नाहींत, तर ‘ माझ्या पतींना दास्य नसावें, आणि त्यांचे रथ आयुधें त्यांजपाशीं असावीं ’ असाच वर मागून घेतला. भारतांत तेजस्वी अशा इतर स्त्रियाहि आढळून येतात. उद्योगपर्वांतच, श्रीकृष्ण जेव्हां पांडवमातेचा म्हणजे कुंतीचा निरोप घेण्यास गेले तेव्हां, तिनें केलेलें भाषणहि वाचण्यासारखें आहे. कुंती कांहीं अत्याचारी नव्हती; तिच्या सात्विकपणाला तिच्याच सात्विकपणाची उपमा ! असें असतां कृष्णाला प्रवृत्तिपर करण्याकरितां ‘ आयतें दान न घेणाऱ्या ’ मुचकुंदाची कथा, ‘ क्षात्रधर्मरहस्य ’ ‘ विदुलेचा इतिहास ’ वगैरे गोष्टी तिनें त्यास सांगितल्या. विदुलेची गोष्ट तर प्रसिद्धच आहे. मग ती खरी असो–अगर कुंतीनें ती दाखल्याकरितां मुद्दाम रचून सांगितली असो–कसेंहि असलें तरी विदुलेच्या मुलानें आपल्या आईस ‘ वीरप्रज्ञा ’ हें जें विशेषण दिलें तेंच सात्विक कुंतीसहि लागू पडतें. आणि या दृष्टीनें पाहतां केवळ लिवलिवीत अशा शकुंतलेपेक्षां निराळ्या प्रकारच्या पण सात्विक अशा कुलस्त्रिया आर्य लोकांत पूर्वी होऊन गेल्या आहेत, अशीच रिस्लेसाहेबांची खात्री होईल.

पौराणिक स्त्रियांची परंपरा ऐतिहासिक स्त्रियांमध्येंहि चाललेली आढळून येते.

अहिल्याबाईनें राघोबादादाला युद्धास बोलाविलें परंतु ती कांहीं अत्याचारी खास नव्हती. पेशव्यांच्या स्त्रिया राजकारणांत मन घालीत असत. त्यांच्यापैकीं एकट्या आनंदीबाईला मात्र रिस्लेसाहेबांचीं विशेषणें लागतात; परंतु तेवढ्यानें बाकीच्यांची योग्यता कमी होत नाहीं. मुसलमानी स्त्रियांमध्येंहि नूरजहान सारख्या विलासी स्त्रिया जशा निर्माण झाल्या तशाच चांदबिबीसारख्या मातबर लढाऊ व उमद्या राजकारस्थानीहि स्त्रिया झाल्या. पण रिस्लेसाहेबांस हिंदुस्थानचेच कशाला, तर खुद्द युरोपियन देशांतील स्त्रियांचेहि दाखले देण्यास आमच्यापाशीं आहेत. रिस्लेसाहेबांनीं सॅबिन स्त्रियांचें उदाहरण दिलें. सॅबिन स्त्रियांनीं रोमन व सॅबिन लोकांतील वाद मिटविला हें खरें आहे. परंतु तो कोणत्या अटीवर हें मात्र साहेब विसरलेले दिसतात. पण ते विसरले म्हणून काय झालें ? आम्ही सांगतों. रोमन लोकांचा मूळ पुरुष रॅम्यूलस यानें रोम वसविलें तेव्हां वसाहत वाढण्यास रोमन लोकांना लग्न करून घरेंदारें थाटण्याची गरज भासूं लागली. तेव्हां एका धार्मिक उत्सवाचे प्रसंगीं रोमन लोकांनीं सॅबिन लोकांस बोलावून आणून कपटानें त्यांच्या कुमारिका मुली पळवून नेल्या व त्यांजबरोबर लग्नें लावलीं. यामुळें अर्थातच या दोन लोकांत युद्धें सुरू झालीं. सॅबिन स्त्रियांना आतां इकडे आड व इकडे विहिर असें झालें. सासऱ्याजांवयांचीं युद्धें होऊं लागलीं तेव्हां त्या स्वाभाविक रीतीनेंच मध्यें पडल्या. पण ही मध्यस्थी यशस्वी होण्यास रोमन लोकांना व सॅबिन लोकांना अर्धें अर्धें राज्य कबूल करावें लागलें व तह झाल्यावर सासऱ्याजांवयांनीं मिळून राज्यकारभार चालविला.

"The Sabine women threw themselves between the combatants who agreed that henceforth the Sovereignty should be divided between the Romans and Sabines" (Neibuhr's Lectures on Roman History p. 80)

रिस्लेसाहेबांनीं सॅबिन स्त्रियांचें उदाहरण दिलें खरें, पण तें फक्त एकांगी दिलें. पण स्वतः आपल्या मुलींबाळींस राष्ट्रीय चरित्रांतील नमुनेदार उदाहरण म्हणून जर सांगावयाचें झालें तर ते शकुंतलेचें देतील किंवा बोएडिशिया, जोन ऑफ आर्क, एलिजाबेथ, यांचें देतील ! बोएडिशिया व जोन ऑफ आर्क यांनीं राजकारणांत मन घातलें व लढाया केल्या; एलिजाबेथ हिनें बुद्धीनेंच राजकारण लढविलें. तथापि, त्यांपैकीं कोणीही अत्याचारी नव्हत्या. तात्पर्य, हिंदी

स्त्रिया राजकारणांत क्वचित् मन घालूं लागल्या आहेत या गोष्टीनें रिस्लेसाहेबांस जो राग आलेला दिसतो तो सर्वथा अयोग्य आहे. स्त्रियांना राजकीय सभा करण्याचें कारण नाहीं; त्या राजकीय वर्तमानपत्रेंहि चालवीत नाहींत. स्वदेशी धंदे काढण्याचें अगर व्यापाराचें काम त्यांजकडे येऊं शकत नाहीं; लष्करांत नोकरीची महत्त्वाकांक्षा तर त्यांस अर्थातच धरतां येत नाहीं; आणि कोणत्याही सार्वजनिक वादांत व मारामारींत स्त्रिया पडल्याचें उदाहरण आजपर्यंत एकहि नमूद झालेलें नाहीं; मुलांचें फक्त नैतिक व घरगुती शिक्षण एवढेंच काय तें त्यांचे हातीं असतें. असें असतां इतक्यांतच त्यांच्या नांवानें हाकाटी करीत उठण्यास व बाँबगोळ्यांचें शाब्दिक साहचर्य त्यांना आणून भिडविण्यास रिस्लेसाहेबांस काय कारण झालें असेल तें परमेश्वरास ठाऊक ! अज्ञान व दारिद्र्य या जोडीमुळें 'To marry, to bear children, and to weep' 'लग्न, बाळंतपण व रड' या सनातन त्रयींच्या पलीकडे अद्यापि आमच्यांतील बहुतेक स्त्रियांच्या कर्तव्याची व्याप्ति गेलेली नाहीं; ज्या थोड्यांना शिक्षण, गृहसौख्य व संपन्नता लाभते त्यांच्यापैकीं फार तर शेंकडा पांच दहा स्त्रियांचें लक्ष राजकारणाकडे जात असेल कीं नाहीं याची शंकाच आहे. बाकीच्या नव्वद पंचावण्णवांचेंहि लक्ष राजकारणाकडे लागलें तरी हवें आहे; पण तें नाहीं ही वस्तुस्थिति आहे खरी.

असें असतां त्यांच्या नांवानें रड कां ? व त्या 'अत्याचारी न निपजोत' असा अभयसूचक आशीर्वाद कां ?' रिस्लेबुवांनीं शकुंतलेचें आख्यान लावलें खरें, पण तें त्यांस साधलें नाहीं. त्यांना अत्याचारी नसणाऱ्या साध्वीचें जर उदाहरण द्यावयाचें होतें, तर शकुंतलेचेंच कां ? द्रौपदीचें कां नाहीं ? आणि अशा प्रकारचा अप्रयोजकपणा दाखवून दिला तर आम्ही भारताचा विपरीत अर्थ करून सांगतों म्हणून आमच्यावर हत्यार उपसणार ? साधारण अडाणी जातींतल्या अज्ञ स्त्रियांनाहि आपल्या नवऱ्याला, मुलाला, बापाला, भावाला व जातीला नांव ठेवलेलें किंवा त्यांचा अपमान झालेला खपत नाहीं. तितक्यापुरती त्यांची दृष्टि सार्वजनिक झालेली असते. मग रिस्लेसाहेब स्वतःच जो हिंदी स्त्रीवर्ग शिक्षणाच्या मार्गास लागून उद्योन्मुख झालेला आहे अशी कबुली देतात; त्यांपैकीं कित्येक व्यक्तींची नजर परिस्थितीचें मार्मिक निरीक्षण करण्याकडे गेली, आणि आपलें चरित्र व आपलें स्त्रीजातीचें शील न मळवितां त्यांनीं राष्ट्रकार्यांत जर मन घातलें, तर त्यांच्या

डोळ्यापुढें एकदम अत्याचाराचा ब्रह्मराक्षस उभा करून, किंबहुना त्याची बाधा त्यास आधीं किंचित् झालीच आहे असें दर्शवून त्यांना भेवडावण्याचा प्रयत्न रिस्लेसाहेबांनीं कां करावा? कदाचित् रिस्लेसाहेबांस असेंहि वाटत असेल कीं, राजकारणाच्या वादामध्यें कायद्याच्या पाशांत एखादा देशभक्त सांपडला तर अधिकारीवर्गाप्रमाणेंच आमच्या स्त्रीवर्गानेंहि त्यास बहिष्कृत मानावें. परंतु तसें असेल तर साहेबमजकुरांस मनुष्यस्वभाव माहीत नाहीं असें म्हणावें लागेल. आपला भाऊ किंवा नवरा हायकोर्ट जज्ज झाला असें पाहून जर एखाद्या स्त्रीला इंग्रजीराज्याबद्दल बरें वाटावें, तर उलट पक्षीं तो राजकारणप्रसंगीं तुरुंगांत गेला असें पाहून त्या स्त्रीला त्या सरकारचा राग यावा हें उघड आहे! सुशिक्षित स्त्रियांचींही राजकीय मतें जर आपल्या घरच्या पुरुषांप्रमाणें बनतात, तर अशिक्षित स्त्रियांना हिंदुस्थानच्या स्थितीबद्दल काय वाटावें हें अर्थातच हिंदुस्थानांतल्या पुरुषांस त्याबद्दल काय वाटतें यावरच अवलंबून राहणार यांत काय शंका?

स्त्रियांनीं सार्वजनिक कामांत किती पडावें याला उघड मर्यादा आहेत. पण सार्वजनिक कामांत पडणाऱ्या आपल्या बापभावांच्या उद्योगाचें स्थूल स्वरूप कळण्यास व त्यांचें कौतुक करून आपली सहानुभूति देण्यास जें शिक्षण आमच्या भगिनीवर्गास समर्थ करणार नाहीं त्या शिक्षणास व त्या उदयास (Renaisance) धिक्कार असो! पण हें आम्हीच म्हणतों असें नाहीं. सुधारलेल्या सर्व देशांत हेंच मत प्रचलित आहे. प्रसिद्ध अमेरिकन देशभक्त जॉन क्विन्सी ॲडम्स याचे शब्द जसे अमेरिकेस तसेच हिंदुस्थानासहि लागू आहेत. तो म्हणतोः—

"Women are not only justified but exhibit the most exalted virtue when they do depart from the domestic circle and enter on the concerns of their country, of humanity and their God!"

'राष्ट्रीय संसारांत मन घालून स्वदेश, मानवजाति व ईश्वर अशा विषयांत प्रवेश करणें हें स्त्रियांस अयोग्य नाहीं, इतकेंच नव्हे तर असें करणें हेंच स्त्री-सद्गुणांचें अत्यंत उज्वल स्वरूप होय!!'

———

# ३३ हिंदी मुसलमान तुर्कांचे कोण ?

( तारीख ३१ आक्टोबर १९११ )

तुर्क व इटालियन यांजमधील युद्धानें इतिहासांत एक अपूर्व प्रसंग उद्भवला आहे. हें युद्ध एकतर्फी असून ' बळी तो कान पिळी ' या तत्त्वावर सुरू झालें. व निःशस्त्र व सशस्त्र अशा योद्ध्यांच्या द्वंद्वाप्रमाणें केवळ तुर्कांस घातक अशा रीतीनें तें चालू आहे. इटालीच्या बाजूस भरपूर आरमार, तुर्कांच्या बाजूस आरमाराच्या नांवानें भोपळ्याएवढें पूज्य ! इटालीच्या संग्रहीं विमानासुद्धां कडकोट लष्करी सरंजाम, तुर्कांच्या तोफा जुन्या नसल्या तरी कमी दर्जाच्या. इटालीच्या सैन्यास ट्रिपोलींत शिरण्यास उघड्या दर्यावरचा सोपा जवळचा खुला मार्ग आणि निम्म्या वाटेवर इंग्रजांच्या माल्टा बेटाचा आश्रय. ट्रिपोलींत सैन्य पाठविण्याचा तुर्कांचा समुद्राचा मार्ग आरमार नसल्यामुळें निरुपयोगी, आणि इजिप्तमधून सैन्य पाठवावें तर मार्ग दूरचा ! शिवाय इजिप्तवर नांवाचें आधिराज्य तुर्कांचें असलें तरी इजिप्तचा लगाम परक्यांच्या हातीं. इटालीला सर्व युरोपियन राष्ट्रांची सहानुभूति, तुर्कांस या कोरड्या समाधानाचेंहि सुख नाहीं. तुर्कांची अशी ही स्थिति पाहिली म्हणजे कोणासहि कींव येईल.

नाहीं म्हणावयास तुर्क मानतील तर त्यांस समाधानाची अशी एकच जागा आहे. ती सर्व महंमदी राष्ट्रांची सहानुभूति ही होय. विशेषतः हिंदुस्थानांतील मुसलमानांनीं या कामीं पुष्कळच अवसान आणिलें आहे. मॉस्लेम–लीगच्या विलायतेंतल्या व इकडल्या शाखांनीं सभा भरविल्या, ठराव केले, व थोड्याबहुत वर्गण्याहि जुळविल्या. पण खरें पाहिलें असतां या सर्व खटपटींनीं मुसलमानी लोकांच्या मनास पीळ पडेल तो पडेल, परंतु प्रस्तुतचे संकटांत तुर्कांना त्यांचा कांहीं उपयोग होईल असें मात्र नाहीं. मॉस्लेम–लीगच्या ठरावांत आणि तत्समर्थनार्थ झालेल्या भाषणांत मुसलमानांनीं दम तर खूप दिला आहे. इटालीच्या मालावर बहिष्कार घालूं; इंग्रज सरकार जर या बाबतींत मध्यस्थी न करील तर क्रांतिकारक पक्षास मिळण्याची आणि हिंदुस्थानांतील इंग्रजी राज्य कमकुवत करण्याची प्रवृत्ति मुसलमानांस होईल, पूर्वी जरुसलेम–ख्रिस्त्यांची मक्का–या शहराच्या पायीं धर्मवैर माजून युद्धें झालीं त्याचप्रमाणें आजहि स्थिति होईल, अशा अनेक धमक्या घालण्यांत आल्या आहेत, पण हें सर्व परिमाणीं पोकळ आहे. तुर्क व हिंदी मुसलमान यांजमध्यें धर्म–सामान्यत्व असलें तरी

तुर्कांकरितां ते काय करणार ! तुर्कांच्या मदतीला हिंदुस्थानांतून लाख दोन लाख मुसलमान फौजबंद होऊन जाण्यास निघते तर या सर्व दमबाजीला कांहीं तरी अर्थ असता. पण हिंदी मुसलमानांच्या मनांतहि असली गोष्ट कधीं आलेली नसेल. शिवाय आली तरी तिचा उपयोग काय ? या सैन्यास हत्यांर मिळणार कशीं व तें ट्रिपोलींत जाणार कसें ? कारण एवढी मुसलमानी फौज सशस्त्र झाली तर ती ट्रिपोलीस जाण्याचे ऐवजीं धर्मवेडाची राख डोक्यांत घालून इकडेच धामधूम करून सत्तावन सालासारख्या बंडाची पुनरुक्ति करण्याचाच संभव अधिक, हें मुसलमान लोक बोलत नसले तरी इंग्रज पुरें ओळखून आहेत. बरें, नुसत्या फौजेच्या मदतीनें तुर्कांची आजची अडचण निभावेल असेंहि नाहीं. सर्व तुर्की फौज एकत्र केली तर ती इटालीच्या फौजेहून पुष्कळ अधिक भरेल; पण तुर्कांचें अडलें आहे तें फौजेविणें नाहीं, आणि त्यांचें ज्याविणें अडलें आहे तें हिंदी मुसलमानांस त्यांना देतां येण्यासारखें नाहीं. इटालीच्या युद्धाच्या जाहीरनाम्याला उत्तर म्हणून खुद्द तुर्की राष्ट्र इतर युरोपियन राष्ट्रांना विनंतिपत्रकें पाठवितें ! इटालीच्या गोळीबाराला खुद्द तुर्कांजवळ बहिष्कार व निःशस्त्रप्रतिकार यांच्या धमकीशिवाय दुसरें घातक अस्त्र आज नाहीं. त्या अर्थी हिंदुस्थानांतले मुसलमान तुर्कांस मदत करण्यास करणार काय ! आणि सहानुभूति दाखवून लंगड्या तुर्की राउतास घोड्यावर घालून काय उपयोग होणार !

पण सर्वांत सांगण्यासारखी गोष्ट राहिलीच आहे. मुसलमान म्हणजे इंग्रजांचा उजवा हात. त्यांची राजनिष्ठा शंभर नंबरी. इंग्रजांनाहि ही गोष्ट कबूल असल्यामुळेंच फुल्लरसारख्यांनीं मुसलमानांस इंग्रजांची 'लाडकी राणी' हें प्रेमाचें नांव दिलें. असें असतां, इटालीनें तुर्कांस लाथ मारली या सबबीवर ब्रिटिश राज्यांतील मुसलमानांनीं दहाव्या अकराव्या शतकांतील जातिवैराची व धर्मवेडाची आठवण इंग्रजांस द्यावी; आणि हिंदुस्थानांतील इंग्रजी राज्याचा पाया पोखरूं पहाणाऱ्या लोकांस मिळण्याची प्रवृत्ति मुसलमानांत होईल अशी धमकी घालावी, याचा काय संबंध ? तुर्की राष्ट्रांतील मुसलमानांनीं हिंदी मुसलमानांशीं इतका ऋणानुबंध दाखविला तरी कधीं होता ? 'सर्व जगांतले मुसलमान मिळून एक, मक्का हें त्यांचें क्षेत्र, कुराण हें त्यांचें पुस्तक, आणि तुर्की सुलतान हा त्यांचा खलिफा—या तीन दगडांच्या पायावर महमदी राष्ट्राची इमारत उभी आहे, आणि आज जरी या इमारतींत पडझड झाली असली तरी

तिची डागडुजी होऊन स्वतंत्र मुसलमानी स्वराज्याचा कळस त्याजवर पुढें मागें बसला जाणार,' अशी खूणगांठ हिंदी मुसलमानांनीं आपल्या मनाशीं बांधून ठेविली आहे, असा पुष्कळांचा समज आहे. या अमूर्त कल्पनेस Pan-Islamism असें इंग्रजी नांव आहे. इजिप्त देशांत इंग्रजांच्या अप्रत्यक्ष अमलाखालीं असणारे मुसलमान या गोष्टी उघड बोलतात. हिंदुस्थानांत इंग्रजांच्या प्रत्यक्ष अंमलाखालीं असणारे मुसलमान या गोष्टी उघड बोलत नाहींत, पण अशा तऱ्हेची गुप्त भावना त्यांच्या मनांत असल्याचा ध्वनि त्यांच्या लेखांतून व भाषणांतून केव्हां केव्हां निघतो, तो त्यांस लपवितां येत नाहीं. हिंदुस्थानसरकारपाशीं फाजील राजकीय हक्कांची मागणी करतांना, "मुसलमानांचें राजकीय महत्त्व" या शब्दाची जी टिमकी वाजविण्यांत येते तिला कारण झालें तरी हीच भावना होय, हें कोणाहि सुज्ञ मनुष्यास स्पष्ट करून सांगण्याचें कारण नाहीं. इंग्रजविषयक स्वामिभक्ति बोलून दाखविण्याचा प्रसंग आला असतां, आजपर्यंत कोणत्याहि धर्माच्या पौराणिक कहाण्यांत न सांपडणाऱ्या अशा लोकोत्तर साध्वीसच शोभेल अशा कडकडीत पातिव्रत्याचा बढ़ाणा करावयाचा; आणि इकडे पहावें तों लंडन–मॉस्लेमलीगच्या ठरावांत व्यक्त झालेले परपुरुषविषयक चाळे मनांतून चालवावयाचे. या दोहोंची मिळवणी इंग्रजांची ही 'लाडकी राणी' कशी घालीत असेल ती घालो.

पण मौजेची अथवा दैवदुर्विलासाची गोष्ट हीच कीं, इंग्रजांच्या 'लाडक्या राणी' च्या मनाच्या एका सांधीकोंपऱ्यांत जी परपुरुषमूर्ति सांठविली आहे तिचें लक्ष मात्र या हिंदुस्थानी स्त्रीवर असावें तसें नाहीं! Pan–Islamism ची कल्पना हिंदी मुसलमानांस प्रिय आहे. पण गम्मत ही कीं, खुद्द तुर्की राष्ट्राच्या नव्या चालकांस ती वाटते इतकी मान्य नाहीं! दोन वर्षांपूर्वीं घडून आलेल्या तुर्की राज्यक्रांतीचा इतिहास लिहिणारा इंग्रज ग्रंथकार मि. ई. एफ. नाइट यानें असें म्हटलें आहे कीं, तुर्की राष्ट्राचे हे चालक–ज्यांना 'यंग टर्क्स'–तरुण तुर्क अशी संज्ञा देण्यांत येते, त्यांची राष्ट्रीयत्वाची कल्पना तुर्कस्थानाच्या बाहेर जात नाहीं! ते आपलपोटे म्हणून म्हणा, अथवा त्यांचे अंगीं खरें राजकीय शहाणपण आहे म्हणून म्हणा, कांहींहि म्हटलें तरी सर्व जगांतील मुसलमानांचें मिळून एक राष्ट्र आहे असें म्हणून नसता घोंटाळा माजविण्याची त्यांना इच्छा नाहीं. तरुण तुर्कांनीं पदच्युत केलेला तुर्की सुलतान अबदुल हमीद याच्या मनांस मात्र Pan-Islamism

ची संयुक्त मुसलमानी राष्ट्राची कल्पना प्रिय होती. पण ती झाली तरी हिंदी मुसलमानांविषयीं सुलतानाला विशेष जिव्हाळा होता म्हणून नव्हे; तर एकतंत्रीपणा व अधिकाराचा बडेजाव यांची त्यास मनापासून आवड होती म्हणून शेंकडो स्त्रियांचा जनानखाना पदरीं बाळगणाऱ्या मुसलमानाचें अंतःपुरांतील प्रत्येक स्त्रीवर व्यक्तिशः प्रेम असतें असें नव्हे; तर नवरेपणाचा अधिकार त्यास प्रिय असतो, आणि ह्या अधिकारमर्यादेचें क्षेत्र जितकें विस्तृत असेल तितकें तें अधिक भूषण असें त्यास वाटतें, म्हणून तो आपला जनानखाना समृद्ध करितो. सुलतान अबदुल हमीद याला एकतंत्री सुलतानी अधिकार हवा होता. खलिपा–म्हणजे महंमद पैगंबराचा प्रतिनिधि–या दृष्टीनें खलिपा हें पद त्यास आवडत होतें असें नाहीं; तर खलिपाचा शब्द झेलणारीं धर्मवेडीं माणसें पुष्कळ असतात म्हणून आपण खलिपा असें तो म्हणवून घेई. अर्थात् सुलतानाच्या जुलमी अमलाखालीं खुद्द तुर्कस्थानांत लाखों लोक–नाखुषीनें कां होईना–पण होते, त्यांच्याच दावणीला हिंदी मुसलमानांसारखे धर्मभोळे दुसरे लाखों लोक आपखुषीनें Pan-Islamism च्या जादूनें भारले जाऊन गळ्यास नसलें तरी मनास दावें लावून घेण्याला तयार असते, तर सुलतानसाहेबांस तें इष्टच होतें. पण तरुण तुर्कांची मनःस्थिति तशी नाहीं. मुसलमानी धर्माप्रमाणें बहुपत्नीकत्व हें त्यांस माफ असतांहि सामाजिक व्यवस्थेंत या तरुण तुर्कांना एकपत्नीकत्वच प्रायः आवडतें. त्याचप्रमाणें राजकारणांतहि अडदापगड जातींच्या व असाधारण राजकीय बंधनांनीं जखडलेल्या मुसलमानांचा नसता गोतवळा जमवून Pan-Islamism च्या नांवानें गोंधळ घालणें त्यांस आवडत नाहीं.

राज्यकारभारांतला जुलूम व अव्यवस्थितपणा हेंच सुलतानाशीं जो त्यांचा झगडा झाला त्याचें कारण होतें. गेल्या दोन वर्षांत त्यांच्या हातीं राज्यकारभार आल्यापासून स्वदेशांत सुव्यवस्था व परदेशांत अब्रू राखणें हें कर्म किती अवघड आहे हें त्यांस कळून चुकलें आहे. यामुळें Pan-Islamism चा घोटाळा ते माजवूं इच्छित नाहींत. घरची एकटी स्त्री कजाग अगर बंडखोर असल्यास तिला कह्यांत ठेवणें हें काम जसें पुरुषाच्या हिमतीस पुरून उरण्यासारखें आहे, त्याचप्रमाणें घरची एकटी स्त्री प्रेमळ व नवऱ्याशीं एकजीव होऊन वागणारी असली तर तिचें प्रेमहि त्याच्या मनांतील सांसारिक सुखाच्या आकांक्षेस पुरून उरूं शकतें. याच न्यायानें तरुण तुर्की लोकांना असें वाटतें कीं

आहे एवढ्याच राज्यांत जुलूम व फंदफितूर मोडून राज्य सुव्यवस्थित चालेल तर सर्व शक्ति एकवटलेलें तुर्कस्थान वाटेल त्या युरोपियन राष्ट्राशीं झगडण्यास समर्थ होईल. अर्थात् त्यांना Pan-Islamism च्या कल्पनेचें पाठबळ किंवा इंग्रजी राज्याखालीं असणाऱ्या मुसलमान लोकांनीं केलेली अयोग्य मदत नको आहे. व धर्म व समाजरचना या दृष्टीनेंहि तरुण तुर्क लोक उदारमतवादी आहेत. त्यांच्या मनांत कट्ट्या सुनीपंथाचें धर्मवेड नाहीं. यामुळें तुर्कस्थानांतील परधर्मीय लोकांस आपापल्या धर्माचें आचरण करूं देणें ही गोष्ट न्यायाची आहे असें त्यांस वाटतें. म्हणून सुलतानी अमलांत ज्याप्रमाणें ख्रिस्ती लोकांच्या कत्तली झाल्या त्याप्रमाणें, तरुण तुर्कांच्या हातीं राज्यधोरण राहिल्यास तशा कत्तली होणार नाहींत. अर्थात् या उदारमतवादित्वामुळें तुर्कस्थानांतले ख्रिस्ती वगैरे लोकहि राष्ट्रीयदृष्ट्या त्यांस जसे जवळ वाटतात तसेच हिंदुस्थानांतले मुसलमान लोक वास्तविक स्वधर्मी असतांहि राष्ट्रीयदृष्ट्या त्यांस तितके लांब वाटावे हें ठीकच आहे. हिंदी मुसलमान लोक मात्र हा युक्तिप्रपंच नीट लक्षांत न आणितां Pan-Islamism च्या कल्पनेनें हुरळून गेल्यासारखें करितात; आणि श्रीमंत मनुष्याशीं नसतें किंवा लांबचें नातें लावून त्याच्या पदरास आपल्या पदराची गांठ तो झिडकारीत असतां घालणाऱ्या आगंतुकाप्रमाणें, स्वतःस हास्यास्पद मात्र करून घेतात, असें म्हटल्यावांचून आमच्यानें राहवत नाहीं. हिंदुस्थानांतले बरेच मुसलमान मूळचे हिंदूच आहेत. शिवाय हिंदुस्थानांतील मुसलमानी राज्यास ७००-८०० वर्षें होऊन गेल्यामुळें त्यांचीं मुळें पूर्वीं एक वेळ हिंदुस्थानच्या भूमींत रुजलीं जाऊन इकडे त्यांचें कलम बनून गेलें; आणि मूळ महमदी राष्ट्ररूपी वृक्षाच्या बुंध्याशीं त्याचा असलेला संबंध केव्हांच तुटून गेला आहे. अशा स्थितींत या देशांत हिंदु लोकांनीं राजकीय चळवळींचें जें उदाहरण घालून दिलें त्यास नांवें ठेवून व विरोध करून, दोन हजार कोसांवर असणाऱ्या तुर्कस्थानच्या सुखदुःखाची जिव्हाळी मात्र आपल्याला लागूं शकते असें म्हणणारे, Pan-Islamism च्या कल्पनेचा पगडा ज्यांच्या मनावर नाहीं अशा एकनिष्ठ व अंतर्दृष्टि आजच्या तुर्की राष्ट्राला नुसत्या जळजळीत शब्दांच्या ठरावांचा पाठिंबा देऊं पहाणारे, आणि हें करितांना इंग्रज सरकाराविषयींची आपली राजनिष्ठा खरोखर किती तकलुपी आहे हें जगाला उघड करून दाखविणारे, मुसलमानबंधु केवळ शहाणपणाचीच गोष्ट करीत आहेत असें आम्हांस वाटत नाहीं. तुर्की मुसलमानांनीं जुन्या अकरा-

व्या शतकाच्या गोष्टी सांगितल्या व 'क्रुसेड' च्या धर्मयुद्धांची आठवण करून दिली तर तें त्यांस शोभण्यासारखें तरी आहे; कारण पश्चिमेकडे महमदी राष्ट्रानें जें यश पूर्वी मिळविलें तें खरोखरच नांवाजण्यासारखें होतें; व आज तुर्की लोक खालावले असले तरी, त्यांचें-मोडकें तोडकें कां होईना-स्वराज्य आहे. हिंदी मुसलमानांनीं नसत्या गोष्टी बोलून तोंडाची वाफ कां दवडावी ?

---

## ३४ मुसलमानी महत्त्वाची मीमांसा

( तारीख २१ फेब्रुवारी १९११ )

राजकीय महत्त्वाचा विचार दोन तीन दृष्टींनीं करितां येतो. पहिला मुद्दा लोकसंख्येसंबंधानें. हिंदुस्थानांतल्या हिंदुस्थानांत पाहिलें तर मुसलमानांची लोकसंख्या हिंदु लोकसंख्येच्या एकतृतीयांशाहून अधिक नाहीं. अर्थात् हिंदुस्थानापुरतें बोलावयाचें झालें तर एकपट मुसलमानांनीं तिप्पट हिंदूंवर आपला राजकीय महत्त्वाचा हक्क सांगूं पहाणें हें हास्यास्पद नव्हे काय ? त्यांतूनही हिंदुस्थानांत आज जी हिंदु लोकसंख्या आहे ती जर रानटी अडाणी अशा प्रकारची असती, आणि दुसऱ्या पक्षीं मुसलमान लोकसंख्या जर विशेष सुशिक्षित व हरत-हेच्या कामकाजांत धुरीणत्व पतकरणारी असती तर ती गोष्ट वेगळी होती. निव्वळ लोकसंख्येच्या प्रमाणानेंच समाजाचें राजकीय महत्त्व कोणी ठरवूं गेल्यास त्याच्या नियमास अपवाद दाखवितां येतील. उदाहरणार्थ, उत्तर अमेरिकेंत व आफ्रिकेंत युरोपियन वसाहतवाले सतराव्या अठराव्या शतकांत गेले ते मूठभरच होते. असें असतां त्यांनीं तद्देशीयांवर नुसतें राजकीय वर्चस्व मिळविलें एवढेंच नव्हे, तर चोपून राज्यहि स्थापिलें; व आजमित्तीस तेथील काळ्यागोऱ्या लोकसंख्येमध्यें बरीच तफावत असतांहि या काळ्या लोकांस राजकीय महत्त्वाचें हें पारडें कित्येक शतकेंपर्यंत उलटण्याची आशा नाहीं. पण हा दाखला हिंदुस्थानास क्षणभर तरी लावतां येईल काय ? अहंकारानें फुगलेल्या अगर बेफाम झालेल्या महत्त्वाकांक्षी मुसलमानांस हा दाखला इकडे लावण्याचें धाडस क्षणभरहि करवणार नाहीं, अशी आमची पक्की खात्री आहे. हिंदुस्थानांतील हिंदु लोक संख्येनें तर मुसलमानांपेक्षां पुष्कळच अधिक आहेत; एवढेंच नव्हे तर शिक्षण, संस्कृति, समाजव्यवस्था, राजनीति, कर्तृत्व, शौर्य या दृष्टींनीं हिंदु लोकांची परंपरा कशी काय आहे-या परंपरेबद्दल इतिहास काय

साक्ष देतो—याची माहिती कोणाहि शेफारलेल्या मुसलमानानें एखाद्या पक्षपाती अशाहि युरोपियन गृहस्थास विचारून पहावी म्हणजे तोच त्याचें परस्पर उत्तर देईल, व राजकीय महत्त्वाच्या भ्रमाचा हा भोपळा तेव्हांच फुटेल.

हिंदुस्थानांतील हिंदुमुसलमानांच्या लोकसंख्येचें प्रमाण व त्यापासून मिळणारा बोध हीं ज्यांच्या डोक्यांत शिरत नाहींत असे मुसलमान असले तरी थोडेच असतील. परंतु दुसरा एक जो वर्ग आहे तो महत्त्वाकांक्षी असला तरी अधिक विचारी असल्यामुळें, मुसलमानांच्या राजकीय महत्त्वाची इमारत हिंदुस्थानांतील लोकसंख्येच्या पायावर तो रचित नाहीं. तो परदेशाकडे तोंड फिरवितो; आणि चीनच्या पश्चिमसरहद्दीपासून तुर्कस्थानपर्यंत बोट दाखवून, या एवढ्या समग्र प्रांतांत नांदणारी मुसलमान लोकसंख्याहि जमेस धरली पाहिजे असें तो म्हणतो. या सर्व प्रांतांतली मुसलमान लोकसंख्या जमेस धरिली असतां ती एकंदर २० कोटी इतकी भरते. अर्थात् हे वीस कोटी आणि हिंदुस्थानांतले ६। कोटी अशा रीतीनें एकंदर मुसलमानांची लोकसंख्या हिंदूंच्या लोकसंख्येहून अधिक भरते. या युक्तिवादांत थोडासा मुद्दा आहे, नाहीं असें नाहीं. कारण हिंदुस्थानाबाहेर हिंदु लोकांची वस्ती नसल्यानें, देशमर्यादा सोडून केवळ एकंदर लोकसंख्येच्या दृष्टीनें पहतां मुसलमान लोकसमाज हा हिंदूंच्या लोकसमाजाहून बराच मोठा आहे असें दाखविणें हें या मुद्याचें मर्म आहे. पण या युक्तिवादाला समर्पक उत्तर फार थोडक्यांत आहे. एकंदर जगांतील मुसलमानी लोकसंख्या एकंदर हिंदू लोकसंख्येपेक्षां फार कमी आहे, असें हिंदू लोकांचें मुळीं केव्हांच म्हणणें नव्हतें. त्यांचें म्हणणें इतकेंच आहे कीं, ज्या वेळीं हिंदुस्थानांतील प्रातिनिधिक संस्थांमध्यें प्रतिनिधी निवडून देण्याचा प्रश्न आपणांपुढें आहे, त्या वेळीं अर्थात् हिंदूंच्या लोकसंख्येच्या प्रमाणानें हिंदूंना आणि मुसलमानांच्या लोकसंख्येच्या प्रमाणानें मुसलमानांना प्रतिनिधी निवडून देतां यावे; व या वादांत देशाबाहेरची लोकसंख्या गणनेंत घेणें केव्हांही न्याय्य होणार नाहीं. राजकीय हक्कांची वांटणी ही बऱ्याच अंशीं कुटुंबांतील मिळकतीच्या वांटणीसारखीच आहे. आणि ही वांटणी धर्मशास्त्रांत सांगितलेल्या दायविभागपद्धतीप्रमाणेंच झाली पाहिजे. हिंदुधर्मशास्त्र व मुसलमानी धर्मशास्त्र यांजमधील दायविभागाच्या नियमांत थोडाबहुत फरक आहे ही गोष्ट आम्हांस माहीत आहे; आणि राजकीय हक्काच्या वांटणीस या दोहोंपैकीं वाटेल त्या धर्मशास्त्राचे नियम लावून आमच्या

मुसलमानबंधूंनीं आपली वांटणी मागावी अगर उचलावी, त्या गोष्टीस आम्ही तयार आहों. परंतु भावाभावांत वांटणी करितांना कुटुंबांतले मेले गेलेले किंवा कुटुंबाबाहेरचे किंवा कुटुंबांत अद्यापि जन्म न घेतलेले असे नसते दायाद उभे करून त्यांनाहि आपल्या पोटांत हिस्सा मिळावा व अशा रीतीनें दुसऱ्याचें नुकसान होऊन आपल्या ताक्षिमेची तेवढी धन व्हावी, असें जर एखादा भाऊ वांटणीच्या वेळीं म्हणूं लागेल तर त्याला पागल ठरवून कदाचित् मुळींच वांटणी न देतां वेड्याच्या इस्पितळांत पाठवावा लागेल! कित्येक आशावादी तत्त्ववेत्ते भविष्यकाळीं जें सुवर्णयुग अवतरणार म्हणून सांगतात तें आजच अवतरलें असें ठरवून सर्व जगांत मिळून एक अखंड प्रजासत्ताक राज्य स्थापण्याची वेळ आली असती, आणि मग चीनपासून तुर्कस्थानपर्यंतच्या प्रदेशांतील सर्व मुसलमान मिळून एक हिस्सेदार आणि सर्व हिंदुसमाज मिळून एक हिस्सेदार, अशी राजकीय हक्कांची वांटणी करावयाची असती तर गोष्ट वेगळी होती. पण केवळ धर्माखेरीज हिंदुस्थानांतील व हिंदुस्थानच्या बाहेरील मुसलमान यांच्यामध्यें दुसरें समानाधिकारण्य असें काय आहे?

धर्मदृष्ट्या तुर्की मुसलमान हा हिंदुस्थानांतील मुसलमानांस खलीपाचा वंशज व धर्मगुरु असें वाटत असल्यास त्यांनीं तसें खुशाल मानावें, आमची त्यास मुळींच हरकत नाहीं. परंतु या धर्मगुरुत्वाचा राजकीय बाबीशीं संबंध पोंहचूं शकत नाहीं. तुर्कस्थानांत मुसलमान आहेत; पण तुर्की मुसलमानांचें राज्य वेगळें स्वतंत्र आहे. ईजिप्तमध्येंहि मुसलमान आहेत; पण ते सुलतान व खेदिव यांपैकीं कोणाच्याहि अंमलाखालीं आहेत असें मानिलें तरी इंग्रजी राज्याचा व त्यांचा अर्थाअर्थी कांहीं संबंध नाहीं. तीच गोष्ट काबूल, इराण, चीन, या देशांतील मुसलमानांचीहि आहे. पार्लमेंटांत जर तुर्की मुसलमानांस हिंदुस्थानांतील आपल्या जातभाईच्या संख्येच्या बळावर राजकीय हक्क मिळत नाहींत, तर हिंदुस्थानांतील मुसलमानांसहि, केवळ तुर्कस्थानांतहि मुसलमान आहेत म्हणून, व तेथील जातभाईच्या संख्येच्या बळावर हिंदुस्थानांत अधिक राजकीय हक्क कां मिळावे? अर्थात् राजकीयदृष्ट्या हिंदुस्थानांतील मुसलमान व बाहेरचे मुसलमान यांचा संबंध "युष्माकं बदरीचक्रं अस्माकं बदरीतरुः" या श्लोकांत वर्णन केल्याप्रमाणें केवळ बादरायण म्हणण्यासच योग्य आहे. आपल्या जातभाईचें स्वतंत्र स्वराज्य हिंदुस्थानाबाहेर आहे, या गोष्टीचें भूषण

हिंदुस्थानांतील ज्या मुसलमानांस वाटत असेल त्यांनीं वाटेल तर खुशाल तुर्कस्थान, इराण वगैरे देशांत जाऊन रहावें व तें ऐश्वर्य भोगावें. त्यांस नको कोणीं म्हटलें आहे ! हिंदुस्थानांत राहून हिंदु लोकांच्या पोटावर पाय देऊन हिस्सेरशीनें मिळणाऱ्या राजकीय हक्काच्या चतकोर भाकरीवर 'माझ्या मानाचा आणखी एक तुकडा द्या,' अशी मागणी करून त्यांस कोणता पुरुषार्थ लाभणार ! मानाचा म्हणून एक तुकडा अधिक मिळविला तरी तेवढ्यानें आमच्या मुसलमान बंधूंच्या खऱ्या महत्त्वाकांक्षेचें समाधान होतें काय ! हें त्यांनीं प्रांजलपणानें सांगावें. मानाचा हा तुकडा-ही सळईपंचोत्री-मिळाल्यानें मुसलमान व हिंदु यांच्या दरम्यान असलेला बंधुभाव मात्र आपल्या अन्यायबुद्धीचें प्रदर्शन करून ते नष्ट करणार ! व इतकेंहि करून त्यांचें खरें समाधान नाहीं तें नाहींच !

पण समाधान तरी कसें व्हावें ! कारण आपल्याच धर्माचे, आपल्याच परंपरेचे व आपल्याच इतके सुसंस्कृत असलेले तुर्कस्थानचे व इराणचे मुसलमान स्वतंत्र अशा पार्लमेंटांत बसून स्वराज्य हांकीत आहेत असें पहात असतां, हिंदुस्थानांत मात्र सल्लागिरीच्या पाळण्यांतून ज्यांचे पाय अद्यापि बाहेर पडत नाहींत अशा कायदेकौन्सिलांपर्यंतच आपल्या स्वराज्याची मजल गेलेली पाहून हिंदुस्थानांतील मुसलमानांस कसेसेंच वाटणें स्वाभाविक आहे. पण याला फक्त दोन उपाय आहेत. एक तर वर सांगितल्याप्रमाणें खऱ्या स्वराज्यसुखाची ज्यांना खरीच आकांक्षा असेल त्यांनीं हिंदुस्थानांत राहून राजकीय महत्त्वाचें तुणतुणें वाजवीत बसण्यापेक्षां इराणांत अगर तुर्कस्थानांत जाऊन अनुभवपूर्वक तेथील स्वराज्याच्या जयघोषांत उघड सामील व्हावें; त्यांस कोणीं आडकाठी केलेली नाहीं. इंग्रजसरकार व सुलतानसाहेब हे परस्परांचे दोस्त आहेत. आणि हिंदुस्थानांत खुद्द इंग्रजांची महत्त्वाकांक्षा सर्वांहून श्रेष्ठ असली, व येथें मुसलमानांस कांहीं विविक्षित मर्यादेपलीकडे जाऊन राजकीय हक्क देण्यास ते तयार नसले तरी हिंदुस्थानांतील मुसलमानांनीं तुर्कस्थानांत किंवा इराणांत जाऊन तेथें मिळणारे नागरिकत्वाचे वरिष्ठ हक्क संपादन करण्यास इंग्रजसरकारनें कायदेशीर प्रतिबंध केलेला नाहीं. दुसरा उपाय असा कीं, हें जर होत नाहीं व मुसलमानांचा हिंदुस्थानांतून पाय निघत नाहीं, तर तेथल्या तेथेंच राहून इतर प्रजाजनांशीं बंधुत्वाच्या नात्यानें वागून त्यांचें व आपलें मिळून एक राष्ट्र करणें व तें उदयास आणणें हाच शहाणपणाचा मार्ग होय. पण

पाय हिंदुस्थानांत आणि मन तुर्कस्थानांत या दोन गोष्टींचा मेळा कसा बसणार! "मिजास बाद्शहाची पण नांदणूक कैकाड्याची" अशी स्थिति हिंदुस्थानांतील मुसलमान आपली करूं पाहताहेत. पण त्याच्या योगानें सर्वांसच असमाधान. इकडे हक्क थोडे म्हणून मुसलमान असंतुष्ट, राजकीय महत्त्वाच्या भ्रामक कल्पनेच्या नादीं लागून मुसलमान बंधुत्वाचें नातें विसरले व अन्यायाची मागणी करूं लागले म्हणून हिंदु असंतुष्ट; आणि प्रजाजनांत संतोष ठेवावा हें जें आपलें कर्तव्य तें या बखेड्यामुळें साधत नाहीं म्हणून खुद्द सरकार असंतुष्ट. तात्पर्य, आमच्या मुसलमान बंधूंनीं वाजवीहून अधिक व विशिष्ट प्रकारचे हक्क मागण्यास सुरुवात केल्यामुळें आज हिंदुस्थानांत "खुदा बी रंजीस और मशीद बी रंजीस" या मुसलमानी म्हणीचा प्रत्यय येऊं लागला आहे.

राजकीय महत्त्वाचा मुद्दा पुढें काढून स्पेशल हक्क मागणारा आणखी एक तिसरा वर्ग आहे व या वर्गाचा कटाक्ष हिंदुस्थानाबाहेरील मुसलमान लोकसंख्येवर नाहीं; तर त्यांच्या दृष्टीनें मुसलमानांचें हिंदूंवरील राजकीय वर्चस्व हेंच कीं, त्यांनीं हिंदुस्थानांत हिंदूंवर एक वेळ राज्य केलें. 'इंग्रज येण्यापूर्वीं हिंदुस्थानांत आम्हीच बाद्शहा होतों. अर्थात् इंग्रजांच्या खालोखाल आम्हांसच सर्व प्रजाजनांहून अधिक राजकीय महत्त्व आहे; यास्तव आम्हीं मुसलमानांनीं जर विशेष हक्क मागितले व सरकारनें ते आम्हांस दिले, तर त्यांत अन्याय किंवा पक्षपात कांहीं नाहीं, तर तें योग्यच आहे,' असा या वर्गाचा युक्तिवाद आहे. आमच्या समजुतीप्रमाणें हाही युक्तिवाद पोकळ आहे, आणि या मुद्याचें उत्तर पूर्वीच्या एका लेखांत आम्हीं साधार दिलेलेंच आहे.

---

## ३५ एकी कीं बेकी ?

(तारीख १० जानेवारी १९११)

बोरघाटांत आगगाडी 'रिव्हरसिंग' स्टेशन सोडून पुढें चालली म्हणजे आंत बसणारास ती मागें चालली आहे असाच प्रथम भास होतो; व खिडकीवाटें तोंड बाहेर काढून, चहूंकडचे पदार्थ पाहून, एकंदर दिशेचें धोरण मनांत आणीपर्यंत आपण जायचें तिकडेच जात आहों—उलट जात नाहीं—अशी कल्पना त्याच्या मनांत पुनः प्रस्थापित होण्यास फार मुष्कील पडते. अलीकडे राष्ट्रीय दृष्टीनें हिंदुस्थानांतील चालू इतिहासाकडे पाहाणारास आपण पुढें जात आहों किंवा

आपली पिच्छेहाट होत आहे, याविषयीं भ्रम उत्पन्न होऊं लागला आहे. प्रतिक्षणीं काळ हा पुढेंच जात असतो यांत वाद नाहीं. काळाचें तोंड मागें म्हणून कधींहि फिरत नाहीं. कालगतीची पोलादी कमान दैवी शक्तीनें एकदांच खेचून ठेवलेली असून, ती अनादिकालापासून जशी हळूहळू सुटत आली आहे त्याप्रमाणेंच पुढें अनंत काळपर्यंत ती सुटत राहील, व त्यायोगानें मानवी समाजास निरंतर पुढचीच गति मिळेल असें आपलें स्वाभाविक अनुमान होतें; व तें एकंदरीनें खरेंहि असतें. परंतु यांतहि थोडासा सूक्ष्म विचार म्हणून आहे, व तो ध्यानांत न ठेविला तर कित्येक वेळां मन गोंधळून जाण्याचा संभव असतो. हा सूक्ष्म विचार असा कीं, समाजाचें किंवा राष्ट्राचें पाऊल एकंदरीनें जरी पुढें पडत असलें, तरी दरम्यानची मजल सर्वच सरळ रेषेनें आक्रमिली जात नाहीं, तर चक्राकार गतीनें आक्रमिली जाते. पृथ्वी ही ३६५ दिवसांत सूर्याभोंवतालच्या आपल्या कक्षेची केवढी तरी प्रचंड मजल मारिते. परंतु सूर्योदय, मध्यान्ह, सूर्यास्त व फिरून सूर्योदय अशा चार गोष्टींनीं बनलेलें चक्राकार परिभ्रमण तिला दर चोवीस तासांत एकएकदां पूर्ण करावें लागतें. चंद्र पृथ्वीभोंवती फिरतो तोहि अशाच चक्राकार गतीनें फिरतो. खुद्द कालदर्शक निर्जीव घड्याळाची गोष्ट घेतली तरी त्याच्याहि मागें ही चक्राकार गतिच लागलेली आहे. एकपासून बारा आंकड्यांचें वर्तुळ कांट्यांना वरचेवर पूर्ण करावें लागतें. राष्ट्राच्या इतिहासाची मजलहि अशाच अनेक वर्तुळाकार युगांतरांनीं पूर्ण होते. काळाची कमान जरी एकदांच खेंचून ठेवलेली आहे—तिला वरचेवर कोणीं किल्ली द्यावी लागत नाहीं-तरी तबकडीच्या मागील मनुष्यस्वभावरूपी चक्रांची अशीच कांहीं रचना करण्यांत आलेली आहे कीं, इतिहासांतील प्रत्येक युगांत ठराविक चमत्कार ठराविक अनुक्रमानेंच पुनः पुनः पाहण्यास सांपडतात.

वरील ठोकळ सिद्धांत खरा करून दाखविण्यासारखीच हिन्दी राष्ट्रावर हल्लीं कांहींशी परिस्थिति आली आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. इंग्रजी राज्य होण्यापूर्वी हिंदुस्थानांत जातीजातींचे तंटे असून या तंट्यांचें चित्रच काय तें हिंदुस्थानच्या चित्रपटावर रंगलेलें तिन्हाइतास दिसे असें आम्हांस वारंवार सांगण्यांत येतें. १८८५ सालीं राष्ट्रीय सभा स्थापन झाल्यानंतर राष्ट्रामध्यें तिनें घातलेल्या नवीन उत्साहामुळें, व कांहीं अंशीं तिच्या अनुकरणानें, इतर अनेक प्रकारच्या सभा हळूहळू निर्माण झाल्या. त्यांपैकीं

औद्योगिक परिषद्, मद्यपाननिषेधपरिषद्, थॉइस्टिक कॉन्फरन्स म्हणजे आस्तिकवादी परिषद्, वगैरे कित्येक सभा जरी सर्व राष्ट्राकरितां म्हणून निर्माण झाल्या तरी दुसऱ्या कित्येक फक्त एका किंवा दुसऱ्या समाजाकरितां, व कित्येक तर एकाच समाजांतील अनेक विवक्षित वर्गांकरितांच निर्माण झाल्या. केळीला जशीं मुळांत पिलें फुटून हळूहळू त्यांचें एक बेटच बनतें तसें राष्ट्रीय सभेच्या मुळांत सभा परिषदा वगैरेंचें एक बेटच माजून राहिलें आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. उदाहरणार्थ, सर्व हिंदूंकरितां मिळून हिंदुसभा किंवा भारतधर्म–महामंडळ किंवा सामाजिक परिषद् असली तरी, त्यांतल्या त्यांत सारस्वत ब्राह्मण, कायस्थ, क्षत्रिय, वैश्य, मराठे, माळी, नामदेव शिंपी वगैरे अनेक पोटशाखांनीं आपआपल्याकरितां एकएक सभा निर्माण केली आहे. दक्षिणेस 'शैवसभा' नामक शैवांची व उत्तर हिंदुस्थानांत 'वैष्णवसभा' नामक 'वैष्णवांची,अशा विशिष्ट धर्मपंथाच्या सभाहि बनल्या आहेत. मद्रासेकडे 'नायर' लोकांची सभा गुदस्ता भरविण्यांत आलीच होती. पंजाबांत सनातन धर्मवादी व आर्य समाजिस्ट असे दोन मूळ भेद असून शिवाय आर्यसमाजामध्येंहि मांसाहार व मांसनिषेध या दोन तत्त्वांवर निरनिराळ्या समाजघटना बनल्या आहेत. याशिवाय पंजाबांत नानकपंथी शीखांपैकीं कित्येक आपणांस हिंदूंपासून अलग मानण्याचा प्रघात पाडीत असून, त्यांनीं तसें करूं नये अशी इतर शीखांची खटपट सुरू आहे. संयुक्त प्रांतांत व बंगाल्यांतील कायस्थ लोकांना आपल्या अंगीं कांहीं विशिष्ट गुण आहेत असें वाटत असून, कायस्थ या नांवानें आपण आपली स्वतंत्र घटना करावी असें ते चाहत असल्याचें दिसतें. हिंदू समाजापासून जैन हे धर्मदृष्ट्या वेगळे आहेतच; परंतु जैनांतहि श्वेतांबरी व दिगंबरी यांच्या सभा निरनिराळ्या भरत असतात, व दिगंबरी जैनांतहि चतुर्थ व पंचम असले सूक्ष्म भेद वर डोकें काढून पाहूं लागले आहेत. लिंगायत हे वास्तविक हिंदु समाजांतर्गतच होत. तथापि आडवी पालखी, व्यासंतोळ, धर्मगुरूची पदवी, त्यांच्या चिरुदावळी, अशा किरकोळ गोष्टींना महत्त्व येऊन व त्यांपैकीं कित्येकांना विनाकारण विरोध होऊन लिंगायत–हिंदु व लिंगायतेतर–हिंदु यांचें भांडण विकोपास जाऊं पहात आहे.

अशा रीतीचा हा गोंधळ व बखेडा पाहिला म्हणजे सकृद्दर्शनीं असा प्रश्न मनांत उद्भवतो कीं, "हा काय राष्ट्राचा एकीकरणाचा पुरावा आहे किंवा पृथ-

करणाचा ? राष्ट्रीयसभेमुळेंच जर ही शिकवण निरानिराळ्या समाजांना मिळाली हें खरें असेल तर राष्ट्रीय सभेनें देशाचें हें हित केलें कीं अहित केलें ? व त्याहूनही महत्त्वाचा प्रश्न म्हणजे असा कीं, इंग्रजी राज्यसत्ता हिंदुस्थानांत स्थापित झाल्यामुळें शांततेचें साम्राज्य झालें, व एक-राष्ट्रीयत्वाची भावना उदित झाली असा जो हक्क सांगण्यांत येतो त्यांत तरी तथ्यांश काय राहिला ? सरकारानें देशभर आगगाड्यांचें जाळें पसरून प्रांतांप्रांतांतील पूर्वीचें जें प्रचंड अंतर तें नाहींसें करून टाकिलें, या फुशारकींत काय अर्थ उरला ? सर्व हिंदुस्थानच्या कमरेभोंवतीं किंवा गळ्याभोंवतीं तारायंत्राचें जानवें घालून हिंदुस्थानची मुंज करण्यांत आली खरी; पण ही मुंज करून हिंदुस्थानानें असलें फुटाफूट करणारें ज्ञानच मिळविलें व द्वैतवादाचें अध्ययन केलें असें कोणीहि म्हणणार नाहीं काय ? तात्पर्य, ब्रिटिश राज्याचा शें-दीडशें वर्षांचा हिंदुस्थानांतील हा खटाटोप राष्ट्रीयत्वाच्या दृष्टीनें साधला कीं फुकट गेला ? होय, शें. दीडशें वर्षांपूर्वीं आम्हीं हिंदुस्थानांतील लोक परस्परांत भांडत होतों; पण आज काय करीत आहों ? तेव्हांचीं भांडणें वरिष्ठ राजसत्ता कोणाचे हातीं रहावी, गादीवर कोण बसावा, तख्तावर कोणीं चढावें, व चवऱ्यामोर्चेलें कोणावर वारलीं जावीं यासंबंधानें तरी असे. पण आज पाहावें तो ज्या कायदेकौन्सिलांत खरी सत्ता, खरा अधिकार असा प्रजेच्या वांट्यास रतिभरहि येत नाहीं, अशांमध्यें कोणकोणाचे किती व कसकसे प्रतिनिधि जावे एवढ्याकरतांच आम्ही भांडत आहों. फार काय पण, हें भांडण स्थानिक म्युनिसिपालिट्या व लोकलबोर्डें—म्हणजे स्थानिक स्वराज्याचे शत्रु त्यास हिणवितांना वापरतात त्या भाषेनें बोलावयाचें तर—खराटे, केरसुण्या हींच जेथील राजचिन्हें; शहरसफाई ठेवणारे मुकद्दम हाच काय तो जेथील लष्करी सैनिकगण; मिणमिणीत सांजवात हीच जेथें आतषबाजीची परमावधि; खतांचे ढिग व फार झालें तर मोडकें तोडकें लांकडी सामान हीच जेथील मालमत्ता; देशी तिसरें चौथें पुस्तक मुलांस शिकविणें हाच काय तो जेथें प्रजावात्सल्याचा मुख्य विषय; आणि जंतांच्या पुड्या देणें किंवा गमप्लास्टरच्या पट्या मारणें हाच जेथील परोपकाराचा मुख्य प्रकार—अशा स्थानिक स्वराज्याच्या किरकोळ सभांतून प्रतिनिधी निवडून देण्याच्या प्रसंगींहि आमच्या राष्ट्राचें संचित पाप म्हणजे जातींचें भांडण-दत्त म्हणून पुढें उभें राहातेंच. आज आम्ही खरे भांडत नाहीं म्हणजे काय ? मनानें व शब्दांनीं तर भांडतोंच, परंतु हत्यारांनीं मात्र भांडत नाहीं—पण तेंही

हातांत हत्यारें नाहींत म्हणून. अर्थात् ही स्थिति पूर्वीच्या स्थितीहून काय चांगली आहे ? तसेंच पाहूं गेलें तर ब्रिटिश अमलापेक्षां हैद्राबादसारख्या संस्थानांतील स्थिति एका दृष्टीनें अधिक बरी नव्हे काय ? कारण निजामशाहींत राजा जरी मुसलमान आहे तरी आजच्या घटकेस मुख्य प्रधान हिंदु आहे. दरबारच्या अमीर-उमरावांत हिंदु औषधासहि नाहीं अशी स्थिति नाहीं; सरकारांतून हिंदू देवस्थानांस व साधुसंतांस पूर्वीप्रमाणें वर्षासनें चालू आहेत आणि हातांत हत्यारें बाळगण्याची परवानगी असतांहि हिंदुमुसलमानांचें भांडण सहसा कधीं कानावर येत नाहीं ! मग ही स्थिति बरी कीं दुसरी बरी ! ”

तात्पर्य, सद्यःस्थितीस धरून अशा प्रकारचा जर कोणी वाद उपस्थित करील तर त्यास रोख ठोक उत्तर देणें हें एकदम कोणासहि जडच जाईल. तथापि, आम्हीं प्रारंभीं म्हटल्याप्रमाणें राष्ट्राच्या चरित्रांतील प्रत्येक भाग हा एकेक स्वतंत्र युगरूपी असून त्यांत कांहीं कांहीं गोष्टी अवस्थात्रयींच्या नियमानुसार उत्पन्न होऊन, पूर्णत्वास येऊन, नाश पावून जातात; व यामुळें सकृद्दर्शनीं राष्ट्राची प्रगति न होतां तें फिरून पूर्वपदावर आल्यासारखें दिसतें; पण प्रारंभींच बोरघाटांतील रिव्हरसिंग स्टेशन ओलांडल्यावर मनास एकदम होणाऱ्या भावनेचा दाखला विसरतां कामा नये. भरती येण्याच्या वेळीं समुद्राच्या कांठीं आपण उभे असतां एकंदरीनें पाणी जरी वाढत असलें तरी पुढें येणारी प्रत्येक लाट फुटून तेवढें पाणी मागें जातेंच जातें. अशाच रीतीनें राष्ट्राच्या आयुष्यांतील भरती किंवा ओहटी एकंदरीनें फुगणाऱ्या किंवा हटणाऱ्या पाण्यावरून ओळखावयाची असते, व्यक्तिशः लाटेवरून ती ओळखतां येत नाहीं, व हें उदाहरण लक्षांत घेणारास हिंदुस्थानांतील राष्ट्राच्या आजच्या स्थितीचें अनुमान करतां येण्यासारखें आहे.

---

## ३६ राष्ट्रतेज व क्षात्रतेज.

( तारीख ७ एप्रिल सन १९१४. )

आयरिश होमरूलच्या वादांत लिबरल व युनियानिस्ट या उभयतांचाहि सत्याग्रह कोठवर गेला आहे हें आतांपर्यंत घडून आलेल्या हकिकतीवरून दिसून येतच आहे. वास्तविक सत्य हें कोणतें तरी एक असणार, मग तें या दोनहि पक्षांच्या मागून एकाच वेळीं कसें धांवत जाऊं शकेल ? असा प्रश्न सकृद्दर्शनीं सुचतो.

पण ‘इष्टान्वित सत्य’ हें द्विविधच काय पण नानाविधहि असूं शकेल. लिबरल लोकांचें म्हणणें असें कीं, होमरूलचा कायदा पार्लमेंट बिलाप्रमाणें त्रिवार पास झाला म्हणजे त्याचा अम्मल जरूर तर सक्तीच्या लष्करी उपायांनींहि करावा हेंच सत्य. यावर युनियनिस्ट पक्षाचें म्हणणें असें कीं, होमरूल–बिल त्रिवार किंवा शंभरवार पास झालें म्हणून काय झालें! सर्व राष्ट्राची त्याला संमति नाहीं. निदान ज्या अल्स्टरवाल्यांवर त्याचा अंमल होणार, त्यांना तरी तें सर्वस्वीं अप्रिय असल्यामुळें त्यांनीं वाटेल तर हातांत हत्यार घेऊनहि त्या बिलाच्या अंमलाला प्रतिबंध करावा हेंच सत्य! याच युनियनिस्ट पक्षाच्या बगलेंतून नुकतेंच तिसरेंहि एक सत्य अलीकडे बाहेर पडलें आहे. लष्करी शिपाई व लष्करी अधिकारी यांना पार्लमेंट सभेंत प्रत्यक्ष मत देण्याचा अधिकार नाहीं; पण सार्वजनिक प्रश्नांवर त्यांना स्वतःचें म्हणून कांहीं मत आहे; व हें मत प्रायः होमरूलच्या विरुद्ध असल्यामुळें ते म्हणतात कीं, आम्हांला अल्स्टरवर पाठविण्यांत आल्यास आम्ही आपल्या जातभांईवर हत्यार धरणार नाहीं; लष्करी अधिकाराच्या जागांचे राजीनामे द्यावे लागले तरी बेहेत्तर, पण सामान्य नागरिक या नात्यानें होमरूल हरप्रयत्नानें बुडविणें आमचें कर्तव्य आहे, हेंच सत्य! अशा रीतीनें इष्टान्वित सत्यप्रतिपादनाची परंपरा कशी फैलाऊं शकते व कोठवर जाते, हा विषय अर्थात् मनोरंजक असून मननीय आहे. पण प्रेयस् व श्रेयस् यांची अदलाबदल–निदान त्यांचा बेमालूम घोंटाळा–स्वार्थसाधु मनुष्य वावदूकतेच्या जोरावर कसा करूं शकतो या प्रश्नापेक्षां आज इंग्लंडांत मुलकी राजसत्ता आणि सैन्य यांच्यामध्यें बेबनाव होण्याचा रंग असून लष्करी सत्ता सरड्याप्रमाणें हळूच वर मान काढून पाहूं लागली आहे, ही गोष्ट आमच्या मतें अधिक मनोरंजक व मननीय होय.

लष्करी अधिकाऱ्यांनीं आज राजीनाम्यांच्या धमकीपलीकडे विशेष मजल नेलेली नाहीं हें खरें; पण शितावरून भाताची परीक्षा होते त्याप्रमाणें, वेळवखत पडला असतां बोदिल झालेले हे लष्करी अधिकारी डाव्या हातानें राजीनाम्याची सुरळी स्टेट सेक्रेटरीच्या स्वाधीन करीत असतां इकडे उजव्या हातानें कंबरेची तरवार उपसण्यास कमी करणार नाहींत, अशी अटकळ कोणीं केल्यास ती वावगी होणार नाहीं. मुलकी राजाधिकाऱ्यांच्या तेजस्वितेच्या किंवा पाणीदारपणाच्या परीक्षेची हीच वेळ होय; आणि युद्धमंत्री कर्नल सीलि, सेनापति फील्ड मार्शल फ्रेंच अशांचे राजीनामे धडाधड येऊं लागले असतां, मुख्य प्रधान मि. आस्किथ

यांनीं "ठीक आहे, त्यालाहि माझी हरकत नाहीं; कोणी अनुभविक लष्करी अधिकारी या वेळीं युद्धमंत्र्याचें काम करण्यास तयार नसला तरी हा पहा स्वतः मीच युद्धमंत्री बनतों!" असें म्हणून मगरूर लष्कराला चोख उत्तर दिलें यांत शंका नाहीं. असो; राजज्ञा घेऊन मि. आस्क्विथ हे तावडतोव युद्धमंत्रि बनलेच; पण पार्लमेंटच्या नियमाप्रमाणें, एखाद्या प्रधानासहि नवीन मंत्रिपद घ्यावयाचें तर पार्लमेंटांतील सभेच्या जागेचा राजीनामा देऊन मतदारांकडून फिरून निवडून यावें लागतें; म्हणजे राजाप्रमाणें त्यानें जनतेकडूनहि नवीन मंत्रिपद घेण्यास संमति मिळविणें जरूर असतें. यामुळें मि. आस्क्विथ हे गेल्या आठवड्यांत पार्लमेंट सोडून गेले, व सुमारें दोन आठवड्यांतच आपल्या गांवच्या मतदारांकडून पोट-निवडणुकींत निवडले जाऊन मुख्य प्रधान व युद्धमंत्रि अशा सजोड अधिकारानें ते पार्लमेंटमध्यें पुनः प्रवेश करतील.

उत्तर-रामचरित्रांतील सूत्रधार पहिली भूमिका टाकून नवीन घ्यावयाची असतां जागच्या जागेवर उभा राहून "एषोस्मि कार्यवशादिदानीं आयोध्यिकस्तदानींतनश्च संवृत्तः" असें जितक्या सहज लीलेनें म्हणूं शकतो, तितक्याच सहज लीलेनें मुख्य प्रधान मि. आस्क्विथ हे निवडणुकीच्या जवनिकेंत क्षणभर अंतर्धान पावून युद्धमंत्रि मि. आस्क्विथ म्हणून पार्लमेंटच्या सभागृहांत येणार हा चमत्कार इंग्लंडच्याहि इतिहासांत अलौकिक असाच गणला जाईल यांत शंका नाहीं! ६२ वर्षांचें वय; डोक्याचे सगळे केंस पिकलेले; बरेंच आयुष्य प्रथम कोर्टांत वकिली करण्यांत व नंतर पार्लमेंटमध्यें भाषणें करण्यांत गेलेलें; लष्करी शिक्षणाचें वारें डोक्यास कधीं लागलें नाहीं; किंवा बंदुक, तरवार अशा शस्त्रांना राजस अभिनिवेशानें कधींहि हस्तस्पर्श केलेला नाहीं; असें असतां आणीबाणीचा प्रसंग येऊन पडतांच, वेषहि न पालटतां, युद्धमंत्रिरूपी चाबुकस्वार बनून, अधिकाराचा चाबूक हातांत घेऊन, लष्कररूपी बिथरलेल्या बेफाम बिनलगामी घोड्याच्या नुसत्या आयाळीस हात घालून त्याच्यावर स्वार होणारे मि. आस्क्विथ यांचें चित्र कल्पनादृष्टीला किती तरी उदात्त दिसतें! खरोखर आस्क्विथसाहेब युद्धमंत्रि होणार ही बातमी वाचतांच "अग्रतश्चतुरो वेदाः पृष्ठतः सशरं धनुः। इदं ब्राह्ममिदं क्षात्रं शापादपि शरादपि" असें म्हणणाऱ्या पौराणिक ब्राह्मण योध्याची निदान आम्हांला तरी आठवण झाली.

मि. आस्क्विथ हे हिंदी ब्राह्मण नव्हेत व इंग्लंडांत हिंदी पद्धतीची वर्णव्यवस्थाहि

नाहीं. तथापि विद्वान्, विद्याव्यासंगी व शांतदांत अशा आस्किथसाहेबांना इंग्रजांतले ब्राह्मणच म्हणण्यास फारशी हरकत नाहीं. हिंदुस्थानच्या इतिहासांत ब्राह्मण लोक सहसा क्षात्रधर्म स्वीकारीत नाहींत, पण वेळ पडल्यास तो स्वीकारण्यास ते मागेंहि घेत नाहींत असें आढळून येतें; तीच गोष्ट मि. आस्किथ यांची या प्रसंगीं आहे. दोनही उदाहरणांतील मूलतत्त्व एकच आहे; व तें हेंच कीं ब्रह्मतेज व क्षात्रतेज या दोहोंमध्यें आपआपल्यापरीनें गुण व दोहोंचाहि आपापले परीनें उपयोग आहे, तरी क्षात्रेतजाचा दर्जा ब्राह्मतेजाहून कमी; क्षात्रतेजानें ब्राह्मतेजाला नमूनच असलें पाहिजे; पण तें तसें नमून न राहतां वरचढ होऊं पाहील तर ब्राह्मतेजानें क्षात्रवृत्ति तात्पुरती पत्करून क्षात्रतेजाला फिरून सुविनीत करावें. जगांत कोठेंहि गेलें तरी ब्राह्मतेज व क्षात्रतेज यांचा परस्पर संबंध असाच आढळून येईल; व इंग्लंडांत उपस्थित झालेल्या या महत्प्रसंगानें झालें तरी हेंच तत्त्व फिरून एक वेळ लोकनिदर्शनास आणलेलें आहे.

'ब्राह्मतेज' हा शब्द अशासंबंधांत जरासा कानाला चमत्कारिक लागतो. पण क्षात्रतेजाशीं विरोधी असा तोच अर्थ दर्शविणारा दुसरा शब्द म्हणजे फार तर 'राष्ट्रतेज' हाच देतां येईल. यालाच इंग्रजींत Civil Power हा प्रतिशब्द होय. 'सिव्हिल' आणि 'मिलिटरी' हीं एकाच राजसत्तेचीं दोन अंगें आहेत. शांततेच्या प्रसंगीं ज्या सत्तेच्या जोरावर राज्यकारभार चालतो ती राष्ट्रसत्ता आणि युद्धप्रसंगीं ज्या सत्तेच्या जोरावर जय मिळतो किंवा मिळविण्याची अपेक्षा असते ती क्षात्रसत्ता. या दोनहि सत्ता राजाच्या अंगभूतच आहेत खऱ्या, तथापि सापेक्षदृष्टीनें पाहतां राष्ट्रसत्ता ही श्रेष्ठ असून क्षात्रसत्ता कनिष्ठ आहे. क्षात्रसत्तेशिवाय राष्ट्रसत्तेचें रक्षण निरंतर होऊं शकणार नाहीं हें खरें. तथापि साधकाच्या अपेक्षेनें साधन हें केव्हांहि कमी प्रतीचेंच ठरणार! राजदंड हा त्याच्या उग्रतेमुळें राजचिन्ह म्हणून मनावर अधिक ठसतो हें खरें; आणि दरबारांत झालें तरी मुख्य प्रधानापेक्षां सेनापतीच्या पोषाखाकडे व तरवारीकडेच ग्राम्य दरबारी लोक अधिक निरखून पहातील. पण खरा अधिकार व महत्त्व राजप्रतिनिधीचेंच असतें. "राजवृक्षस्य नृपतिर्मूलं स्कंदाश्च मंत्रिणः। शाखाः सेनाधिपाः सेनाः पल्लवाः कुसुमानि च" असें वचन शुक्रनीतींतहि आढळतें. आपल्या इकडे राजा व क्षत्रिय या कल्पनांची बहुधा समव्याप्तिच आढळते. परंतु राजवाचक कोणताही शब्द घेतला तरी त्यांतून क्षात्र ( Military ) गुणापेक्षां राष्ट्र ( Civil ) गुणाचा

ध्वानिच अधिक निघतो असें दिसून येईल. राजसंस्थेच्या इतिहासांत प्रारंभीं या दोन सत्तांची सरमिसळ झालेली दिसून येते. पण गेल्या दोन शतकांत त्यांची फारकतच झालेली नसली तरी त्यांचा पृथक्पणा अधिकाधिक नजरेस येऊं लागला आहे.

युरोपांत फ्रेंच राजा चवदावा लुई याच्या काळापर्यंत राजा हा ईश्वराचा अंश मानला गेल्यामुळें राजाव्यतिरिक्त दुसरी कोणतीच सत्ता राज्यांत मानली जात नसे आणि राजाच्या अंगभूत सत्तेपैकीं राष्ट्रसत्ता अधिक महत्त्वाची किंवा क्षात्रसत्ता अधिक महत्त्वाची याविषयीं लोकांस उमज पडत नसे. पण फ्रान्समध्यें १७८९ सालीं व इंग्लंडांत १६४२ व १६८८ सालीं झालेल्या राज्यक्रांतीमुळें राजसत्ता नियमित झाली इतकेंच नव्हे, तर निदान इंग्लंडांत तरी वरील भांडणांत राष्ट्रसत्ता हीच क्षात्र सत्तेपेक्षां अधिक श्रेष्ठ असेंहि ठरलें. इंग्लंडांत चार्लस राजाच्या कारकीर्दींत झालेल्या यादवी युद्धानंतर क्रॉमवेलच्या पराक्रमामुळें व अरेरावीमुळें राष्ट्रसत्तेवर क्षात्रसत्तेनें मात केली, असें कांहीं वेळ दिसलें खरें; पण तो निवळ आभास होता. कारण आधीं एक तर घर राखण्याकरितां ठेवलेल्या भय्यानें एखादे वेळीं बिथरून जाऊन घरधन्यावर लाठीचा प्रयोग केला तरी तेवढ्यानें भय्या हा कांहीं घरधनी ठरत नाहीं. सुमेरसिंगानें नारायणरावाचा खून केला म्हणून गारदी हे कांहीं पेशव्याचे धनी म्हणतां येत नाहींत. तीच गोष्ट क्रॉमवेलच्या शिपायांची होय. क्रॉमवेलनें जसा चार्लस राजाचा शिरच्छेद करविला तसेंच त्यानें पार्लमेंटच्या सभागृहांत जाऊन, स्पीकरच्या टेबलावरची अधिकारदर्शक गदा किंवा चोपदारी काठी उचलून फेंकून देऊन, मेंबर लोकांना हांकून दिलें; व सभागृहाला कुलूप लावून खिशांत किल्ली घालून तो चालता झाला हें खरें. तरी पण खुद्द क्रॉमवेल हाहि अस्सल राष्ट्रसत्तावादीच होता. आपल्याकडे सैन्याचें आधिपत्य आहे, तें तत्त्वतः पार्लमेंटच्या हुकमानेंच आहे अशी त्याची समजूत होती. तो स्वतःला पार्लमेंटचा नोकर मानीत होता व पार्लमेंट सभा त्यानें जबरदस्तीनें जी मोडली ती तरी नव्या तत्त्वावर आणि राष्ट्रसत्तेची वृद्धि होईल अशी तिची पुनर्घटना व्हावी म्हणून! तथापि, क्रॉमवेलच्या नंतरहि सैन्यावर राजाचें अनियंत्रित स्वामित्व कांहीं दिवस राहिल्यामुळें, खुद्द आपल्या बापाचें डोकें मारल्याचा विसर पडून अवघ्या चाळीस वर्षांच्या आंत दुसऱ्या जेम्स राजानें फिरून उचल केली. तेव्हां लष्करावरून राजाचा ताबा अजीबात नाहींसा करण्याची कल्पना सुचून

ती पार्लमेंटनें इतक्या विकोपास नेली की राज्यांत मुळीं कायमचें असें सैन्यच असूं नये असें ठरविलें गेलें.

सांगायला व ऐकायला चमत्कारिक वाटतें, पण वस्तुस्थिति अशी आहे कीं दर फडणिसी वर्षांच्या अखेर इंग्लंडच्या सर्व सैन्याचा कौल संपतो; व पार्लमेंटनें प्रति-वर्षाच्या प्रारंभीं जेव्हां लष्करची संख्या व त्याचा खर्च ठरवून स्पष्ट नवी मंजुरी द्यावी तेव्हांच नवा कौल सुरू होतो, असें मानलें जातें. बोरघाटांतील रिव्हर्सिंग स्टेशनच्या बोगद्याच्या तोंडाशीं प्रत्येक आगगाडीनें 'एकदम सबूर' झालें पाहिजे तेव्हांच तिला पुढची 'सिग्नल' मिळते. कां कीं आपल्या पूर्वपरंपरेच्या जोरावर गाडी जाईल तर अनावर होऊन एखादे वेळीं कड्याखालीं पडावयाची ! त्याप्रमाणें इंग्लंडच्या लढाऊ लष्करावर आपला ताबा रहावा म्हणून पार्लमेंटही दर वर्षाअखेर लष्करचे प्राण अधिकारमंत्रानें क्षणभर आकर्षण करण्याचा हक्क बजावून मग फिरून त्यास सजीव करते. वास्तविक हा आतां केवळ एक औपचारिक संकेत म्हणून उरला आहे. खुद्द लष्करला आपला कौल फक्त एकच वर्षापुरता आहे व प्रतिवर्षी तो नवा करावा लागतो अशी जाणीव नाहीं, किंवा पार्लमेंटलाहि असें वाटत नाहीं. पण केवळ कायद्याच्या दृष्टीनें पाहिलें तर फडणिशी वर्ष संपल्यावर जर नवी कौलाची मंजुरी मिळाली नाहीं तर दुसरे दिवशीं सर्व शिपाई व लष्करी अधिकारी यांनीं आपापल्या घराची वाटच धरली पाहिजे ! इंग्लंडची खडी फौज एक वर्षापुरतीच 'खडी' असते ! ही गोष्ट ध्यानांत धरली म्हणजे इंग्लंडचा मुख्य सेनापति हा पार्लमेंटचा निव्वळ नोकर आहे, आणि एरवीं लष्करी अधिकाऱ्याचा कोणीं कितीहि बडेजाव माजविला तरी, हल्लींप्रमाणें परीक्षेची वेळ येतांच नोकर तो नोकर व धनी तो धनी हा फरक उघड झाल्याशिवाय राहात नाहीं. मुख्य सेनापति हा लष्करी प्रधानाचा अंकित; लष्करी प्रधान हा कॅबिनेट ऊर्फ मंत्रिमंडळां-तील अनेक सभासदांपैकीं एक सभासद, सर्व कारभार चालावयाचा तो मंत्रिमं-डळाच्या मर्जीप्रमाणें; व मंत्रिमंडळाचा अधिपति कोण तर मुख्य प्रधान, अशा परंपरेनें सर्व लष्करची शेंडी मुख्य प्रधानाच्या हातीं जाते. पण इंग्लंडच्या राज्य-घटनेची गंमत ही कीं, स्वतः मुख्य प्रधान हाहि राजानें नेमावयाचा असतो, तथापि राजानें कितीहि लांब हात केला तरी सैन्याची शेंडी म्हणून त्याचे हाताला सांपडतच नाहीं. कारण मुख्य प्रधानाची नेमणूक जरी राजा करतो तरी तो जबाबदार असतो पार्लमेंटला. हा सर्व संबंध लक्षांत घेतला असतां मि. आस्क्विथ यांना

युद्धमंत्र्याचें पद कसें घेतां आलें व तें त्यांनीं कां घेतलें, या दोनहि गोष्टी कळून येतील.

" अल्स्टरवर होमरूल लादण्याकरितां जरूर तर रक्तपातहि करावयाचा कीं नाहीं हें आम्ही मुलकी अधिकारी ठरवूं. त्यांत तुम्हांला बोलण्याचा अधिकार नाहीं. आम्ही सांगूं तेथें व त्या वेळीं तुम्हास गेलें पाहिजे व सांगूं ती कामगिरी बजावली पाहिजे. या कामगिरींत तुम्हाला आपल्या भाईबंदांवरहि कदाचित् गोळ्या झाडाव्या लागतील. पण कर्तव्यनिष्ठुरतेची मजल इतक्या थरास पोंचवावयाची कीं नाहीं हें आमचें आम्ही ठरवूं. पार्लमेंटनें पास केलेल्या होमरूल बिलाविरुद्ध शिळोप्याच्या वेळीं तुम्ही चार गोष्टी बोलाल तर त्या पचतील; पण ' अल्स्टरवर चालून जा ' असा हुकूम एकदां सुटला, म्हणजे तो धनुष्यावरून सुटलेल्या एखाद्या बाणाप्रमाणें परत येणें नाहीं." इतक्या जरबीच्या गुप्त उद्गारांचे बोल युद्धमंत्रिपद आपणाकडे घेणाऱ्या मि. आस्किथ यांच्या कृत्यांतून स्पष्ट निघत आहेत. कोणत्याहि देशांत राष्ट्रसत्तेचा अभिमानी असा कोणीहि पाणीदार मुत्सद्दी असेंच करील; कारण सेना ही त्याच्या खिजगणतींतच नसते, व ही गोष्ट नुसत्या तोंडानेंच नव्हे तर हातानेंहि तो करून दाखवितो. " सर्व सैन्य तुला सोडून गेलें आहे " असें चाणक्याला जेव्हां त्याच्या दूतांनीं सांगितलें तेव्हां तो म्हणाला " एका केवलमेव साधनविधौ सेनाशतेभ्योधिका । नंदोन्मूलनदृष्टवीर्यमहिमा बुद्धिस्तु मागान्मम " ॥ शंभर सैन्यें जावोत अगर फितूर होवोत. फक्त माझी एकटी बुद्धि शाबूत राहो म्हणजे मग मी कोणालाहि भीक घालीत नाहीं. आर्य चाणक्य हा जुन्या काळचा आस्किथ व आस्किथ हा हल्लींच्या काळचा चाणक्य, अशी कल्पनेनें अदलाबदल केली तरी त्यांत विपरीत वाटण्यासारखें कांहीं नाहीं. कारण क्षात्र-तेजाला आपला शिष्य किंवा गुलाम करून आपल्या पायांशीं लोळविणाऱ्या 'सिव्हि-लियन ' मुत्सद्याचें अस्सल ब्राह्मतेज किंवा राष्ट्रतेज हें या दोघांहीमध्यें सारखेंच दिसून येतें.

---

## ३७ आमच्या स्वदेशी पेढ्या.

( तारीख २० मे सन १९१३. )

### १ पेढ्यांची उत्पत्ति.

हिंदुस्थानांत कांहीं थोड्या वर्षांपासून स्वदेशीचा जो उद्भव झाला त्याचीं फळें

अनेक बाजूंनीं दिसूं लागलीं आहेत. पैकीं उद्योगधंद्याची वाढ आणि व्यापाराची चलती हीं त्याचीं दोन फळें होत. देशांत नवीन नवीन पदार्थ निर्माण होणें, परदेशी पदार्थांची नक्कल होऊन त्यांनीं अस्सल पदार्थांची जागा पटकाविणें या गोष्टी जशा साध्य होऊं लागल्या आहेत, त्याचप्रमाणें आमच्या वाढत्या व्यापारास लागणारा पैसा आमच्याच खिशांतून किंवा पेटींतून अधिकाधिक मिळूं लागला आहे. परदेशी भांडवलावर, आणि आमचाच पैसा ठेवून घेऊन तो उलट आम्हांसच हवा तेव्हां पुरवून त्यावर नफा मिळविणाऱ्या परकीय लोकांवर जे आम्ही पूर्वी सर्वस्वीं अवलंबून रहात होतों, ते न रहाण्याचें एक साधन स्वदेशीनें आम्हांस हळू हळू मिळवून देण्यास प्रारंभ केला आहे. हें साधन म्हणजे बँका अथवा पेढ्या होत. या पेढ्यांची वाढ गेल्या पांच सात वर्षांपासून झपाट्यानें सुरू झाली असून, कोणत्याहि नवीन गोष्टीप्रमाणें त्यांचा उपयोग व दुरुपयोग हे दोनहि आमच्या प्रत्ययास येऊं लागले आहेत. अर्थात् अशा वेळींच त्यांच्यासंबंधीं थोडीशी साधक बाधक चर्चा झालेली बरी अशा समजुतीनें त्याविषयीं दोन शब्द लिहिण्याचें आज आम्हीं योजिलें आहे. इंग्रजींत ज्याला बँक असें म्हणतात त्यालाच समानार्थक असा आमच्या इकडील शब्द म्हटला म्हणजे पेढी हा होय. पण वास्तविक पहातां अगदीं आधुनिक व सुधारलेल्या पद्धतीची बँक आणि पेढी यांच्या रूढार्थांत बराच फरक आहे. हा फरक त्या दोहोंच्या स्वरूपामुळें व त्यांच्या द्वारें होणाऱ्या कार्यामुळें उत्पन्न होतो, व तो कसा हें पुढें सांगण्याचा प्रसंग येणारच आहे. परंतु हा फरक तूर्त वगळून आणि दोनहि शब्द समानार्थकच आहेत असें घेऊन चालून, बँक किंवा पेढी ही संस्था मुळीं अस्तित्वांत कशी येते याचा प्रथम थोडक्यांत विचार करूं.

कोणत्याहि देशांतले किंवा समाजस्थितींतले लोक घेतले तरी त्यांच्यांतील प्रत्येक व्यक्तीची दररोजची मिळकत आणि दररोजचा खर्च हीं अगदीं बरोबर तंतोतंत मिळतात असें कधींच होऊं शकत नाहीं. उत्पन्नाच्या मुख्य बाबी म्हटल्या म्हणजे शेतकी, व्यापार व नोकरी. पैकीं शेतीचें उत्पन्न वर्षांतून एक वेळ किंवा फार तर दोन वेळ मिळून यावयाचें. सकाळीं पेरावें, दोनप्रहरीं कापावें, व संध्याकाळीं खावें अशी स्थिति सृष्टिदेवतेच्या प्रसादावर अवलंबून राहणाराची नसते. व्यापारांत पडलेल्या दुकानदाराच्या पेटीचें तोंड रोज झाकतें उघडतें. तथापि, त्याची झाली तरी सकाळीं खरेदी केलेल्या मालाची विक्री संध्याकाळीं होते असें थोडेंच

आहे. दुकानांत घातलेलें भांडवल वर्षांतून एक दोन वेळ परतलें म्हणजे पुष्कळ झालें. सरकारी प्रॉमिसरी नोटा, ठेवींचें व्याज वगैरे हमखास व बिनबूड होणारें उत्पन्नहि सहा सहा महिन्यांशिवाय हातीं येत नाहीं. कंत्राटें व सट्टे यांत पेरलेले पैसे जमिनींत पेरलेल्या धान्याप्रमाणें वर्ष सहा महिन्यांतून एक–दोनदांच उगवावयाचे. सरकारी व खाजगी बड्या नोकरांची झाली तरी चांद्रात दरमहिन्यांतून एकदांच झडते; पण पहिली तारीख केव्हां उजाडते इकडे डोळे लागून राहणारे नोकरच पुष्कळ. मोलमजुरी करणारांचें काय तें रोजचें उत्पन्न. असो; याच्या उलट खर्चाच्या दृष्टीनें पाहिलें तरी असेंच आहे. लग्नकार्य वगैरे करणें, घरठिकाण वगैरे बांधणें, असले नैमित्तिक खर्च साऱ्या जन्मांत थोडे वेळांच व्हावयाचे ! तरी पण ते एकदां झाले म्हणजे अनेक वर्षे सांचलेलें द्रव्य एकदम घेऊन जाऊन जमीन साफ करितात, किंवा कर्जवाम वगैरे उत्पन्न करून पुढें अनेक वर्षांत पडणारी शिल्लक गडप करण्यासारखा एखादा मोठा खळगा आधींच करून ठेवितात. नित्यखर्चाच्या पदार्थांची गोष्ट घेतली तरी, त्यांची म्हणून थोडीबहुत आगाऊ बेगमी करावीच लागते. दोनप्रहरीं शिजवावयाचे तांदूळ रोज सकाळीं विकत आणणें या व्यापापासून साधारण दरिद्री मनुष्यसुद्धां मुक्त असतो. तात्पर्य, असा कोणताहि मनुष्य सहसा असत नाहीं कीं, ज्याच्या जमेची व खर्चाची उपज व तोंडमिळवणी अगदीं बरोबर रोजच्या रोज होते.

अशी स्थिति असल्यामुळें कोणत्याहि क्षणीं मनुष्याला थोडेसें तरी देणें अगर त्याचें दुसऱ्याजवळ थोडेसें तरी येणें किंवा स्वतःची स्वतःजवळ थोडीबहुत शिल्लक असतेच. पहिल्या प्रकारचे लोकच दुसऱ्यांपेक्षां जगांत एकंदरीनें अधिक. तथापि, त्यांचें देणें–घेणें, कर्ज व शिल्लक हीं सर्वच किरकोळ स्वरूपाचीं असल्यामुळें त्यांचा हा सर्व व्यवहार व्यक्तीव्यक्तीशीं चालतो, व व्यक्तिव्यक्तींतच संपून जातो. दुसऱ्या प्रकारचे लोक समाजांत संख्येनें जरी थोडे तरी, त्यांची शिल्लक ही समाजाच्या पुष्कळशा व्यवहाराला भांडवल पुरवूं शकते, आणि त्यांच्याचमुळें समाजाला श्रीमंत किंवा सुखवस्तु हें नांव प्राप्त होतें. मुंबई शहरांतील लोकसंख्येइतकी लोकसंख्या असणारे जिल्हे मुंबई इलाख्यांत किती तरी आहेत ! पण इलाख्यांतील सर्व जिल्हे मिळून जितका प्राप्तीवरील कर सरकारास देतात त्याहून अधिक कर एकट्या मुंबई शहरांत वसूल होतो. सांगण्याचा मुख्य मुद्दा हा कीं, या दुसऱ्या वर्गातल्या लोकांची मिळकत त्यांच्या खर्चाहून पुष्कळच अधिक असते;

म्हणजे त्यांच्याजवळ नित्य थोडीबहुत शिल्लक राहते. ही शिल्लक प्रत्येकजण आपली आपल्याजवळ ठेवूं लागला तर समाजांत हातोहात पैसा खेळता रहाणार नाहीं व संपत्तीची वांटणी होणार नाहीं. निरुद्योगी धनिक मनुष्याजवळच तेवढी शिल्लक असते असें नाहीं; तर जवळचा पैसा उद्योगधंद्यांत किंवा व्यापारांत घालणाऱ्या मनुष्याचीहि शिल्लक पडते; कारण एका धंद्यांतून मोकळे झालेले पैसे दुसऱ्या धंद्यांत गुंतण्याच्या दरम्यान थोडाबहुत वेळ जातोच. उद्योगधंदे कांहीं आगगाडीच्या रुळांसारखे एकमेकांस चिटकून राहिलेले नसतात कीं, त्यांवरून किफायतशीर व्यवहार आगगाडीच्या एंजिनाप्रमाणें न अडखळतां व न थांबतां एकसारखे एकापुढें एक चालत रहातील! म्हणजे काय कीं, आळशी अशा धनिक मनुष्याची शिल्लक आणि उद्योगी अशा धनिक मनुष्याची शिल्लक कांहीं थोड्याबहुत मुदतीपर्यंत रिकामी पडतेच. ही शिल्लक ज्यानें त्यानें आपली आपल्याजवळच ठेविली तर समाजांत व्यापारधंदा चालून परस्पर उपयोग होणार नाहीं हें तर झालेंच. पण मनुष्यमात्र इतक्या निरपेक्ष किंवा परोपकारबुद्धीनें थोडेंच पहातो! समाजाला फायदा असो वा नसो; आपली शिल्लक आपल्याजवळ न ठेवितां दुसऱ्याजवळ ठेवावयास दिली तर दुसऱ्यास असलेल्या गरजेमुळें याला त्या पैशावर व्याज मिळून फायदा होतो या स्वार्थी अनुभवावरून तरी त्याची शिल्लक पाऱ्याप्रमाणें चंचलवृत्ति स्वीकारून उड्या मारूं लागते! व यामुळेंच बँका किंवा पेढ्या अस्तित्वांत येतात.

आतां कोणाची केवढीहि शिल्लक झाली तरी तिच्यावर केव्हांहि काणत्याहि प्रकारची मागणी येणार नाहीं किंवा ती कधींहि मुळींच उपसावी लागणार नाहीं असें सहसा होऊं शकत नाहीं. पण याच्या उलट असेंहि सहसा होत नाहीं कीं, मनुष्याची शिल्लक असते पण ती चार दिवससुद्धां बिनखर्ची व तगाद्याशिवाय राहूं शकत नाहीं. अशी स्थिति नसती तर शिल्लक असून काय व नसून काय सारखेंच. तरी पण प्रत्येकाच्या शिलकेवर केव्हांना केव्हां तरी मागणीची धाड येऊन पडावयाची असली तरी, सर्वांच्या शिलकेवर एकदम व एकाच क्षणीं भरपूर मागणीची धाड येऊन पडेल असें तरी सहसा खास होत नाहीं. याचा अर्थ असा कीं, एकाला गरज आहे त्या वेळीं दुसऱ्याला नाहीं व दुसऱ्याला आहे तेव्हां तिसऱ्याला नाहीं असा सोयीचा मेळ पडून एकाच्या शिलकेचा उपयोग दुसऱ्याला होण्याचा संभव सिद्ध होतो. सृष्टींतील नेहमींच्या अनुभवाचा दाखला घ्यावयाचा

तर तो असा देतां येईल कीं, पावसाळ्यांत पाऊस पडून पाणीच पाणी होतें तें शेवटीं पुढील पावसाळ्यापर्यंत समुद्राला तरी वाहून जाऊन मिळणार किंवा वाफेच्या रूपानें परत आभाळांत जाणार ही तर ठरलेलीच गोष्ट. पण पावसाचा थेंब जेथें पडला तेथेंच तो रहावा, प्रत्येक आंगुळभर जमिनीनें आपल्या हातीं आलेल्या जलसंपत्तीची शिल्लक आपल्याजवळ ठेवावी, अशीच जर सृष्टीची योजना असती तर त्या पाण्याचा हल्लींहून एकसहस्रांश तरी उपयोग झाला असता कीं नाहीं शंकाच आहे. तसें होतें तर नद्या वहात्या ना, कालवे भरतेना, व शेतमळे पिकतेना. या सालच्या पावसाळ्यांत पडलेल्या प्रत्येक थेंबावर, अखेर वाफ होऊन आकाशांत जाण्याची मागणी कायमची आहे हें तर ठरलेलेंच. पण या दोन कालसीमांच्या दरम्यान आटतां आटतांच व संपतां संपतांच जेवढें पाणी—जेवढी जलसंपत्ति शिल्लक रहाते, तेवढ्यानें सर्व प्रकारच्या शेतकीची, बागाइतीची व सजीव सृष्टीची तहान भागविण्याचा व्यापार आयता होऊन जातो. या जलसंपत्तीच्या शिलकेची मुदत फार थोडी म्हणजे सात आठ महिनेच असते. पण तेवढ्या मुदतींत या शिलकेचा सुव्यवस्थित उपयोग करितां येत असल्यामुळें सालोसालचें काम भागतें. याच रीतीनें समाजांतील कमी अधिक सुखवस्तु लोकांजवळची शिल्लक गटागटांनीं ठिकठिकाणीं एकवटतां आली तर त्या सर्व लोकांच्या अनेक पण निरानिराळ्या वेळीं उत्पन्न होणाऱ्या गरजा भागून केव्हां वाण पडली असें कोणास भासणार नाहीं. हें मर्म जाणून त्याचा उपयोग प्रत्यक्ष व्यवहारांत जो करून घेतो तोच पेढीवाला किंवा बँकर.

आपल्याजवळच्या शिलकेचा मनुष्याला इतर कोणत्याहि शक्तीप्रमाणें चांगला व वाईट असा कोणताहि उपयोग करितां येईल. शिलकी उरलेले रुपये मडक्यांत भरून जमिनींत पुरून ठेवणें हा सर्वांत अत्यंत असमंजसपणाचा उपयोग होय; व या उपयोगाचा दुरुपयोग होण्यास वेळ लागत नाहीं. जमिनींत पुरलेल्या द्रव्यावर पुष्कळ वेळां मालकापेक्षां चोराचीच दृष्टि अधिक असते. 'भूमींत द्रव्य पुरून ठेवणाराला भूमि हंसते' असें एक सुभाषित वचन आहे. भूमि हंसते तें ती द्रव्य आपणाला खावयाला मिळेल अशा आनंदानें नव्हे; तर कोणी तरी चोर येऊन तें उकरून घेऊन जाणार हा दैवलीलेचा चमत्कार तिला नित्य पहावयास मिळतो म्हणून ! दागिने वगैरे करून शिल्लक गुंतवून ठेवणें हाही दुरुपयोगाचाच एक प्रकार होय. जमिनींत द्रव्य पुरण्याइतका तो असमर्थनीय नाहीं तरी पण तो

द्रव्याचा निरुत्पादक वांझोटा प्रकार होय, हा आक्षेप तरी त्याजवर लागू होतोच. शिलकेचा सर्वांत उत्तम उपयोग म्हटला म्हणजे तिजपासून पुनः द्रव्योत्पादन करविणें हा होय. जें द्रव्य फिरून द्रव्याला प्रसवतें तेंच सजीव द्रव्य; व इतर द्रव्य निर्जीव होय. आणि ज्या राष्ट्रांतील लोकसंख्येची वाढ खुंटली त्याची जशी अखेर धडगत नाहीं, तशीच ज्या समाजांतील संपत्ति—अर्थात् शिलकी पैसा—देशांतील व्यापाराला व उद्योगधंद्याला जीवन देत नाहीं व अशा रीतीनें फिरून नवीन द्रव्य उत्पन्न होण्यास मदत करीत नाहीं, त्या देशाचाहि परिणाम ठीक नाहीं असेंच म्हणावें लागेल. ज्या वेळीं देशांत उद्योगधंदा वाढण्याचीं साधनें व तो वाढविण्याच्या लायकीचीं मनुष्यें आहेत, पण केवळ भांडवल नसल्यामुळें त्यांचें काम अडून राहिलें आहे, अशी स्थिति खरोखर असेल त्या वेळींच अर्थात् हें वरील विधान लागू पडेल हें उघड आहे. तरी पण नवीन उद्योगधंदा सुचत नाहीं किंवा तो करण्यास साधन नाहीं पण देशांत पैसा मात्र पुष्कळ आहे अशी विपरीत स्थिति क्वचितच आढळत असल्यानें वरील विधान सार्वत्रिक आहे असेंच घेऊन चालण्यास फारशी हरकत नाहीं.

शिलकी द्रव्य दागिन्यांत गुंतवून ठेवावयाचें नाहीं व जमिनींत पुरूनहि ठेवावयाचें नाहीं, कारण या दोहों प्रकारांत धोका असतो—तें निरंतर सुरक्षित संभाळतां येईल अशी खात्री नसते—यामुळें कोणी तें संभाळण्यास समर्थ, व हवें तेव्हां परत देईल असा विश्वास ठेवण्यालायक, मनुष्य असल्यास त्याजवळ ठेवीदाखल ठेवणें हें मनुष्यास सहजच सुचतें. पहिल्यानें, रक्षण व बंदोबस्त कमी आणि व्यापारहि कमी अशी स्थिति असेल त्या वेळीं हल्लींप्रमाणें ठेवी ठेवून घेणारे लोक ठेवींची फारशी अपेक्षा करीत नसतील. यामुळें हल्लींप्रमाणें ठेवी ठेवणारास व्याज न मिळतां उलट ठेव ठेवणाराकडूनच भाडें किंवा मुशाहिरा घेतला जात असेल! अजून देखील पेढ्यांवर दागदागिने किंवा भारी किंमतीचे कागदपत्र सुरक्षित ठेवीदाखल ठेवण्यास भाडें पडतें हें प्रसिद्धच आहे. ठेवीला व्याज नाहीं व ठेवीला भाडेंहि नाहीं अशा प्रकारचा संधिकाल असल्यास तो फारच थोडा असेल. पण जेव्हांपासून व्यापाराची चलती झाली—विशेषतः राष्ट्रांराष्ट्रांतला व्यापार वाढला—तेव्हांपासून ठेव संभाळण्याकरितां भाडें घेण्याचा प्रघात संपून ठेवलेल्या ठेवीस व्याज देण्याचाच प्रघात चालू झालेला आढळतो. हिंदुस्थानांत गेल्या शतकापूर्वीपर्यंत ठेवी ठेवणारांना व्याज फारसें मिळत नसे. ठेव वाटेल तेव्हां सुरक्षित

परत मिळाली म्हणजे पेढीवाल्यानें फार मोठें काम केलें असें मानलें जात असे. पूर्वी पेढ्या थोड्या असत तरी अशा प्रकारचें इमान फार असे; व अशा इसमाला अब्रूहि फार होती. तेंच हल्लीं परराष्ट्रांशीं हिंदुस्थानचा व्यापार सुरू झाल्यामुळें व देशांतल्या देशांतहि व्यापार वाढल्यामुळें, ठेवी ठेवणारांना बँका व पेढ्या यांजकडून मंदीच्याहि दिवसांत चार पांच टक्के व्याज मिळतें; व तेजीच्या दिवसांत तर हा भाव बारा टक्क्यांपर्यंतहि जाऊं शकतो ही अनुभवसिद्ध गोष्ट आहे. असो; बँका किंवा पेढ्या यांच्या उत्पत्तीच्या मीमांसेची स्थूल कल्पना ही वर सांगितल्याप्रमाणें आहे. तथापि, पेढ्यांची वाढ कोणत्या रीतीनें झाली; निरनिराळ्या देशांतील निरनिराळ्या परिस्थितीमुळें पेढ्यांच्या हातून होणाऱ्या कामांचे प्रकार कसे वाढले; आणि हल्लीं सुधारलेल्या देशांत पेढ्यांच्या उपयुक्ततेची मजल कोठवर गेली आहे याचा पुढील लेखांत विचार करूं.

—२—

## पेढ्यांचा उपयोग व कर्तव्य.

(ता. २७ मे सन १९१३.)

बँका किंवा पेढ्या यांचा उपयोग समाजाच्या लक्षांत येण्यास फार वेळ लागला नसावा. कारण बेइमानानें दिवाळें निघणें एवढी एकच आपत्ति व तिजमुळें एकाच वेळीं अनेकांचें होणारें पुष्कळसें नुकसान हें अपवादात्मक मानून क्षणभर बाजूस ठेविलें, तर बाकी पेढ्यांपासून आहे तो सर्व उपयोगच आहे हें तेव्हांच सिद्ध करून देतां येईल. ठेव ठेवून घेणारा व ठेव ठेवणारा या दोघांचा तर प्रत्यक्ष फायदा असतोच, परंतु सर्व समाजालाहि त्यापासून अप्रत्यक्ष फायदाच होतो. शंभर मनुष्यांनीं आपापली शिल्लक एके ठिकाणीं ठेवीदाखल ठेविली असतां, त्या सर्वहि शंभर मनुष्यांस आपापल्या शिलकेच्या सर्व रकमेची गरज एकाच क्षणीं लागली असें कधींहि होणें शक्य नाहीं. अर्थात् या शिलकांपैकीं बराचसा भाग निरुपयोगी होऊन लोळत पडलेला असतो. ठेवीवाल्यांत सामील नसलेल्या अशा लोकांस गरज असल्यास व तो पैसा देऊं केला असतां, "मी अ चा पैसा—मला ब ला देऊं नका," असें तो म्हणत नाहीं; आणि दिला असतां बच्या जरूरीच्या मानाप्रमाणें उलट कमी जास्ती व्याजहि मिळतें; व हें व्याज ठेवी ठेवणारा व ठेवी ठेवून घेणारा दोघेहि वांटून घेतात. म्हणजे शिल्लक तीच, पण ती निरनिराळ्या व्यक्तींच्या खिशांत किंवा पेटींत वांटून जाऊन पडून राहिली असतां तिचा वर सांगितल्याप्रमाणें उपयोग होणें अशक्य झालें

असतें. आपल्या पेटींतल्या शिलकेवर व्याजबट्टा करणाऱ्या व्यक्ती असत नाहींत असें नाहीं. बँकेच्या ऑफिसांत ज्या प्रकारच्या व्याजबट्टयाचा व्यवहार चालतो त्या प्रकारचा व्यवहार व्यक्तिशः सावकाराच्या घरींहि चालतो. म्हणजे व्यवहाराच्या स्वरूपांत फारसा फरक पडत नाहीं, पण फरक पडतो तो अशा व्यवहारांत एक रकमेनें गुंतल्या जाणाऱ्या भांडवलांत. संघशक्ति ही सर्वच कामांत उपयोगी पडते; व पैशाच्या व्यवहारांतहि ती दिसून आल्यास नवल नाहीं.

ठेव ठेवणारा आपला पैसा सुरक्षित राहून वरती थोडेसें व्याजहि मिळणार म्हणून खूष. गरजू व्यापाऱ्यांस, दहावीस सावकार गांठून—म्हणजे दहावीस ठिकाणीं हात पुढें करून—निरनिराळे व्यवहार करण्याचा त्रास सोसून—जें काम व्हावयाचें तें एकाच व्यवहारांत होऊन व्यापारास अडचणीच्या वेळीं भरपूर रक्कम मिळाली म्हणून तो खूष. पेढीवाल्याला स्वतःचें भांडवल नसतां किंवा उपसावें न लागतां तिऱ्हाइतांनीं ठेवलेल्या भांडवलाचा, केवळ आगगाडीच्या सांधेवाल्याप्रमाणें जोड घालून उपयोग करून दिल्यामुळें दलालीकरितां फायदा मिळाला म्हणून तो खूष! आणि एकंदर समाजाचाहि त्यांत फायदा झाला तो असा कीं, धनोत्पादक व म्हणून लायक अशा लोकांच्या हातीं भांडवलाच्या रूपानें शिलकी पैसा जातो आणि त्याचा उपयोग होतो. तसेंच सोनें, रुपें वगैरे मौल्यवान् जिनसा उगाच देशांतल्या देशांत शिल्लक न पडतां परदेशाशीं देण्याघेण्याच्या कामीं—अर्थात् व्यापार करण्याच्या कामीं—उपयोगीं पडतात. पेढीवाल्याला झालें तरी आपल्या जवळच्या ठेवीचा सर्वच पैसा अशा रीतीनें गुंतवितां येतो असें नाहीं; कारण ठेव ठेवणारांपैकीं कोणाला किती रकमेची गरज लागेल हें निश्चित नसल्यानें अंदाजी कांहीं रक्कम त्याला रोकड म्हणून निरंतर जवळ बाळगावी लागते; एवढेंच नव्हे तर दुसऱ्यास वापरावयास दिलेल्या रकमेपैकीं बरीचशी वाटेल तेव्हां थोड्या मुदतींत हातीं परत येईल, किंवा ठोकर लागून कायमची बुडणार तरी नाहीं, अशी स्थिति पारखूनच द्यावी लागते. पण वर सांगितल्याप्रमाणें जरूरीनें रकमा परत मागविण्याचे प्रसंग व्यवहारांत क्वचित् येणारे असल्यामुळें ठेवीपैकीं बराचसा भाग उत्पादक रीतीनें व्यापारांत गुंतवितां येतो.

पेढ्यांचे उपयोग असे असल्यामुळें फार प्राचीनकाळापासून त्या अस्तित्वांत असल्याचे उल्लेख सांपडतात. युरोपांतील निरनिराळ्या देशांत निरनिराळ्या कारणांनीं पेढ्या अस्तित्वांत आल्या. जुन्या काळीं इटाली देशाच्या द्वारानें पूर्व

व पश्चिम गोलार्ध यांच्या दरम्यान व्यापार चालत असल्यामुळें व्हेनीस, जिनोवा, फ्लॉरेन्स येथें पेढ्या होत्या. एकट्या फ्लॉरेन्स शहरीं एकेवेळीं सुमारें ऐंशीं पेढ्या असल्याचा उल्लेख आहे. इटालींतील या पेढ्या मुख्यत्वेंकरून कर्ज देण्याचा धंदा करीत. हें कर्ज त्या स्वतःचें देत, किंवा दलालाप्रमाणें दुसऱ्याकडून तिसऱ्यास देववीत; व यांचे ऋणको मुख्यतः त्या त्या शहरांतील अधिकारी म्हणजे सरकार हे असत. या कर्ज देण्याच्या अनुषंगानें नाण्यांची किंमत ठरवून त्यांची अदलाबदल करणें, ठिकठिकाणीं व्यापाऱ्यांना पैसे पोंचते करणें, कर्जफेडीकरितां विवक्षित कर ताब्यांत घेऊन त्यांचा पैसा वसूल करणें, हीं कामें या पेढ्या करित. ॲमस्टर्डम येथें जी पहिली मोठी पेढी निघाली ती सर्व प्रकारचीं नाणीं त्यांच्या खऱ्या किंमतीस विकत घेणें आणि ज्यांपासून तीं घेतलीं त्यांना पेढीच्या नांवच्या तितक्या रकमेच्या नोटा देणें हीं कामें करी. इंग्लंडमध्यें स्टुअर्ट राजांनीं सरकारी तिजोरींतील रकमांची बळजबरीनें अफरातफर केल्यापासून खासगी पेढीवाल्याकडे आपली शिल्लक ठेवीदाखल ठेवण्याचा लोकांचा प्रघात वाढला. इंग्लंडचा राजा तिसरा वुइल्यम याच्या कारकीर्दींत निघालेली 'बँक ऑफ इंग्लंड' ही पेढी राजाला लागणारें कर्ज पुरविण्याकरितां अस्तित्वांत आली, व तेव्हांपासून पुढें या पेढीची भरभराट होऊन स्वतःच्या नांवाच्या चलनी नोटा काढण्याइतकी तिची कर्तव्यमर्यादा वाढली. उत्तरअमेरिकेंतील 'रॉबर्ट–मॉरिस–बँक' ही सरकारला कर्ज पुरविण्याकरितां जन्मास आली. १८६१ ते १८६५ सालांत उत्तर व दक्षिण अमेरिकेंतील संस्थानिकांना आपसांतील यादवीचीं भांडणें भांडण्यास लागणारें कर्ज त्या त्या संस्थानांतील पेढ्यांनीं पुरविलेलें होतें, व हल्लींहि अमेरिकेंतील बऱ्याचशा नवीन पेढ्यांचा मुख्य धंदा म्हटला म्हणजे सरकारास लागणारें कर्ज पुरविण्याचा असतो. कर्ज पुरविणें याचेहि दोन प्रकार आहेत. एक प्रकार असा कीं, पुढें हातीं घेतल्या जाणाऱ्या उद्योगास खर्चाकरितां लागणारें कर्ज देणें किंवा पूर्वीं केलेल्या कर्जाच्या फेडीकरितां लागणारें कर्ज देणें. पहिल्या प्रकारचें कर्ज देण्याचें काम पेढ्या करूं लागल्यावर दुसऱ्या प्रकारच्या कर्ज देण्याच्या व्यवहाराचें काम त्यांच्याकडे ओघानेंच आलें. 'क्लिअरिंग हाऊस' या नांवाचा पेढ्यांचा जो एक प्रकार आहे, तो कर्ज देणें व कर्जाची फेड करणें हीं दोनहि कामें करणाऱ्या अनेक पेढ्या निघाल्या म्हणजे त्यांचेमधील व्यवहार, मध्यस्थीनें करण्याकरितां उत्पन्न होतो. लंडनमधील किंवा न्यूयॉर्कमधील अशा एखाद्या पेढीवर सालिना

सात आठ हजार कोट रुपयांचा व्यवहार सरसालांत होऊं शकतो. देशांतल्या देशांतील कुळांच्या परस्पर कर्जफेडीचें जें काम तेंच परदेशाशीं व्यापार वाढला म्हणजे निरनिराळ्या राष्ट्रांच्या दरम्यान करावें लागतें. उदाहरणार्थ, इंग्लंड आणि हिंदुस्थान यांच्या दरम्यान आयात व निर्गत मालासंबंधीं जें देणेंघेणें उत्पन्न होतें त्याचा निकाल अशा पेढ्यांच्या द्वारेंच लागतो; व हें काम या पेढ्या हुंड्या देऊन व घेऊन करितात. प्रत्यक्ष नाणें न वापरतां आपल्या पतीवर कागदी नोटा काढून, त्यांच्या द्वारें व्यवहार करणें हेंहि काम मोठमोठ्या पेढ्या करूं शकतात. पण अशा पेढ्या थोड्या असतात. भरभराटीच्या स्थितींत व चांगल्या सधन असलेल्या सर्वच पेढ्या आपल्या नांवाच्या नोटा काढून व्यवहार करितात असें नाहीं. अमेरिकेंत मात्र हा प्रघात त्यांतल्या त्यांत बराच आहे.

पहिल्या पहिल्या पेढ्या सरकारच्या उपयोगाकरितां आणि म्हणूनच सरकारच्या आश्रयानें अस्तित्वांत आलेल्या होत्या. पण हल्लीं प्रत्येक देशांत खालील चारी प्रकारच्या पेढ्या आढळतात (१) सरकारी; (२) खाजगी पण समाईक भांडवलानें काढलेल्या पेढ्या; (३) निवळ खासगी पेढ्या; (४) दलालीच्या पेढ्या. उदाहरणार्थ, येथील बॉंबे बँक ही एक प्रकारें सरकारी पेढी म्हणतां येईल कारण सरकारचा सर्व वसूल या बँकेंत भरला जातो; आणि सरकारच्या खर्चाकरितां लागणाऱ्या पैशाचा बटवडाहि याच बँकेच्या मार्फत बहुधा होतो. पुण्यांतील डेक्कन बँक, पूना बँक, मरकंटाइल बँक, मुंबईची ' बॉंबे बँकिंग कंपनी ' वगैरे पेढ्या खासगी पण संयुक्त भांडवलाच्या पेढ्यांचीं उदाहरणें होत. पुण्यांतील सखाराम मनसाराम यांची चालू पेढी व हुंडीवाले साठे यांची हल्लीं नामशेष असलेली पेढी हीं निवळ खासगी पेढ्यांचीं उदाहरणें होत; आणि नॅशनल बँक ऑफ इंडिया, चारटर्ड बँक, आस्ट्रेलिया ॲन्ड चायना बँक या चवथ्या प्रकारच्या म्हणजे दलालीच्या पेढ्या होत. या चार प्रकारांपैकीं पहिल्या प्रकारच्या म्हणजे सरकारी पेढ्या या मुख्यतः सरकारच्या उपयोगाच्या असतात; त्या सरकारी सनदेमुळें अस्तित्वांत येतात; त्यांत सरकारी भांडवल बरेंच असतें; आणि त्यांजवरील देखरेख सरकारीच असते. इलाख्यांतील मुख्य शहरीं अशा प्रकारच्या पेढ्या आहेत. पैकीं बँक ऑफ बेंगाल ही पेढी सन १८०९ सालीं सरकारी सनदेनें निर्माण झाली, आणि सन १८६२ सालापर्यंत या बँकेकडे सर्व हिंदुस्थानाकरितां चलनी नोटा काढण्याचें व त्यांचा हिशेब ठेवण्याचें काम होतें.

मुंबई बँक ही १८४० सालीं व मद्रास बँक ही १८४२ सालीं स्थापली गेली. या प्रेसिडेन्सी–पेढ्यांच्या पंधरा पंधरा वीस वीस शाखाहि आहेत. या सर्वांच्याद्वारें सरकारी देवघेवीचा सर्व व्यवहार चालतो. मात्र त्यांना सरकारी चलनी किंवा स्वतःच्या नांवच्या नोटा काढण्याचा अधिकार नाहीं. तसेंच या बँकांनीं कमींत कमी अमुक एक रक्कम नेहमीं रोकड शिल्लक ठेवावी, परदेशी भांडवलांत विनाकारण रक्कम गुंतवूं नये, असे कित्येक निर्बंध त्यांजवर घालण्यांत आलेले आहेत.

हिंदुस्थानांत ब्रिटिश राज्य होण्यापूर्वी खासगी व सरकारी अशा दोनहि प्रकारच्या पेढ्या अस्तित्वांत होत्या; पण समाईक भांडवलाच्या अशा पेढ्या नव्हत्या. पेशवाईतील मोटमोठ्या सावकारांचीं नांवें आपण ऐकतों. पण त्यांतील कांहींचा खुद्द सरकाराशींच विशेष संबंध असे, व कांहींचा व्यवहार हुंड्यांच्या रूपानें सर्व देशभर चाले. प्रत्येक दरबारचा म्हणून एक ठरीव सावकार असेच. पण सर्व देशभर हुंड्या चालणें अगर न चालणें हें सरकारच्या आश्रयापेक्षां खुद्द पेढीवाल्यांच्या अब्रूवर व लौकिकावर अवलंबून राही. मद्रासेकडील ‘ नाट्टकोट्टायचेटी, ’ बडोद्याची ‘ हरिभक्ति ’ व ‘ गोपाळराव मैराळ, ’ तसेंच ‘आत्माराम भुकण’ ‘हुपरीकर’ वगैरे देशी हुंडीवाल्यांचीं नांवें हिंदुस्थानभर प्रसिद्ध असून त्यांच्या हुंड्या काशीपासून रामेश्वरापर्यंत चालत व त्यांच्या तिजोरींत दहा पंधरा कोटी रुपये शिल्लक असे ! चालू शतकांतहि कांहीं कांहीं देशी पेढीवाल्यांच्या दुकानांच्या शाखा सिंगापूर, हाँगकाँग, शांघाय येथपर्यंतहि पसरलेल्या आहेत. पण निवळ खासगी पेढ्यांची मालकी वंशपरंपरेनें चालणारी असल्यामुळें एखादी पेढी एखाद्या पिढींत चांगली भरभराटीला आली असली तरी, पुढेंहि ती निरंतर तशीच चालेल अशी खातरजमा राहूं शकत नाहीं. कर्ता पुरुष मेला म्हणजे त्याची बुद्धि बहुधा त्याच्याबरोबर जातें. पण त्याच्या पश्चात् वांटण्यांबद्दल तंटे होऊन भांडवलहि विसकटलें जातें व कमकुवत होतें. यामुळें समाईक भांडवलाच्या पेढ्यांपेक्षां निव्वळ खासगी स्वरूपाच्या पेढ्या लवकरच मोडण्याचा संभव असतो. संयुक्त भांडवलाच्या पद्धतीवर पेढीची स्थापना झालेली असल्यास तिच्या कामकाजावरील देखरेखींत निरनिराळ्या लोकांची नजर रहाते, संयुक्त भांडवलाच्या पेढ्यांवरहि नेता, कार्यकर्ता, अशी कोणी तरी एकच व्यक्ति असते हें खरें. तथापि अशा व्यक्तीच्या हातूनहि जाणून किंवा न जाणून फसगमतीचे

किंवा धोक्याचे व्यवहार होऊं नयेत, अशी खात्री रहाण्यास कोणताहि व्यवहार चार–चौघां डायरेक्टरांच्या समोर व्हावा लागतो.

संयुक्त भांडवलाच्या पेढ्यांचें अध्यक्षस्थान या देशांत आतां बरेंच दृढ झालेलें आहे. आजमित्तीस या देशांत तीन सरकारी पेढ्या, पंधरा मोठमोठ्या हिंदी भांडवलाच्या पेढ्या, आणि अकरा परदेशी दलाली पेढ्या आहेत. पैकीं सरकारी पेढ्यांच्या भागीदारांनीं रोकड दिलेलें असें भांडवल तीनकोटी आठ लक्ष आहे; आणि सर्व खर्चवेंच, व्याज वगैरे जाऊन त्यांची शिल्लक ( रिझर्व फंड ) तीनकोटी एकवीस लक्ष रुपये आहे. पंधरा हिंदी भांडवलाच्या पेढ्या म्हणून सांगितल्या त्यांच्या भागिदारांनीं दिलेलें रोख भांडवल पावणेतीन कोट रुपये आणि रिझर्व फंड एक कोट आहे. अकरा विदेशी दलाली पेढ्यांचें भांडवल तीस पसतिस कोटींचें असून त्यांचा रिझर्व फंड पावणेएकोणीस कोट रुपये आहे. पण भागीदारांनीं घातलेलें भांडवल हा या पेढ्यांच्या भांडवलांचा फक्त एक भाग झाला. परंतु यांचें मुख्य भांडवल म्हटलें म्हणजे पेढ्यांवर लोकांनीं ठेवलेल्या ठेवी हें होय. सरकारी व देशी पेढ्या मिळून ही ठेवींची रक्कम सुमारें सव्वाबासष्ट कोटी रुपये आणि विदेशी दलाली पेढ्यांवरील ठेवींची रक्कम सुमारें साडेचोविस कोटी रुपये, म्हणजे हिंदुस्थानांतील सर्व प्रकारच्या पेढ्यांवरलि मिळून ठेवींची रक्कम साडेऐंशीं कोट रुपये आहे.

या नवीन युगांत स्थापन झालेल्या समाईक भांडवलांच्या पेढ्यांचा व्यवहार कसा चालतो, त्यांत सुधारणा हवी असल्यास कोणत्या दृष्टीनें हवी, या पेढ्यांचा मुख्य उपयोग देशांतील उद्योगधंद्यास आज कितपत होत आहे, व या दृष्टीनें पेढ्यांची सुधारणा होण्यास अद्याप कितीशी जागा आहे, याचा विचार आतां करूं.

—३—

( तारीख २२ जुलै सन १९१३ )

हिंदुस्थानांत आज पेढ्यांमध्यें–म्हणजे नवीन पद्धतीच्या बँकांमध्यें–किती पैसा गुंतून राहिला आहे याचे आंकडे या विषयावरील मागील लेखांत दिलेच आहेत. पण ते आंकडे मोठे दिसले तरी, आम्ही हिंदी लोकांनीं अभिमान बाळगावा असें त्यांत फार थोडें आहे; कारण या पेढ्यांच्या धंद्यांतील बहुतेक नफा परकीयांच्याच हातीं जातो. इंग्रजांनीं हिंदुस्थान जिंकिलें किंवा मिळविलें तेव्हां त्यांनीं नुसती राजसत्ताच मिळविली असें नाहीं; तर देशांतील व्यापार–उदिमावरहि सत्ता मिळविली. आतां विलायती व हिंदी व्यापारी सत्तेचा हा झगडा कोणास उघड दिसला नाहीं; त्या

झगड्यांतील लढाया शस्त्रास्त्रांनीं झाल्या नाहींत; किंवा त्या लढायांत रक्तपात झाला नाहीं; म्हणून त्यांना लौकिकदृष्टीनें युद्ध असें म्हणतां येत नसेल. पण या झगड्याचे परिणाम व्यापारी सत्तेला कांहीं कमी घातक झाले असें नाहीं. नवीन राजसत्तेबरोबर व्यापार-उदीम करण्याची नवीन पद्धति अमलांत आली, व नवीन हितसंबंध जोडले गेले; त्यामुळें देशी व्यापाराचें तोंडच फिरल्यासारखें झालें. देशांतल्या देशांत धंदा करणाऱ्या पेढ्या पूर्वीं होत्या; पण विलायतेशीं व युरोपशीं व्यापार सुरू झाल्यामुळें, तिकडील वळणाच्या नवीन पेढ्या स्थापणें जरूर झालें; व त्याचप्रमाणें ज्या सरकारी व्यवहारांत उपयोगी पडतील व ज्यांवर सरकारचा ताबा राहील अशा 'प्रेसिडेन्सी बँक्स' ही स्थापण्यांत आल्या. नवीन पेढ्यांच्या या जोडगोळीनें जुन्या देशी पेढ्यांच्या वर्चस्वाला मोठाच धक्का बसला. यानंतर, साठ—पाऊणशें वर्षेपर्यंत आपण सर्वस्वीं परदेशी पेढ्यांच्या ओंजळीनेंच पाणी पीत होतों. परकी पेढ्यांचा उपयोग, व त्याचप्रमाणें त्या चालविणारांची टापटीप, सफाई, प्रामाणिकपणा इत्यादि गुणांनीं आपण लोक गुंग होऊन गेलों होतों. पण सन १८८०–८२ च्या सुमारास सर्व हिंदुस्थानभर स्वदेशीची जी पहिली लाट उठली तिजबरोबर देशी उद्योगधंदे काढण्याच्या कल्पनेबरोबर देशी पेढ्या काढण्याच्या कल्पनेलाहि प्रथमांकुर फुटला.

आमच्या समजुतीप्रमाणें अयोध्या प्रांतांत फैजाबाद येथें सन १८८२ सालीं स्थापन झालेली 'औध–कमर्शियल बँक' हीच हिंदुस्थानांतील पहिली स्वदेशी बँक होय. यानंतर देशी पेढ्या निघण्याची सुरवात पंजाब प्रांतांत झाली, व अद्यापहि देशी पेढ्यांच्या बाबतींत पंजाब प्रांत हाच सर्व हिंदुस्थानांत पुढें आहे असें म्हणावें लागतें. 'पंजाब नॅशनल बँक' ही सन १८९४ सालीं आणि 'पीपल्स बँक ऑफ इंडिया' ही १९०१ सालीं निघाली. या दोन पेढ्यांच्य पुष्कळ शाखा पंजाबांत पसरलेल्या असून नवीन पद्धतीच्या पेढ्यांचें शिक्षण देणारें एक आदिपीठच असें त्या होऊन बसल्या आहेत! पंजाबांतील कोणत्याहि मोठ्या अगर लहान शहरीं कोणत्या ना कोणत्या तरी स्वदेशी अशा बँकेची शाखा आढळतेच. पंजाबानंतर या कामीं मुंबई पुढें आली. पण पुढें येतांच मुंबईनें आपल्या नेहमींच्या लौकिकाप्रमाणें क्रांति केली! कारण मुंबईस गेल्य अवघ्या सहा सात वर्षांत मोठमोठ्या अशा देशी पांच सहा बँका निघाल्या, व त्यांतल्या त्यांत डॉ. चुनीलाल सरया यांच्या उद्योगानें निघालेल्या 'इंडियन

स्पीशी बँके ' एवढी मोठी दुसरी स्वदेशी बँक आज सर्व हिंदुस्थानांत नाहीं, असें म्हटलें तरी चालेल. देशी बँकांच्या बाबतींत मुंबईच्या आधीं पुण्यानें आघाडी मारली होती; व आजमितीस पुण्यास मध्यम प्रतीच्या एक दोन बँका आहेतहि. पण या कामीं मुंबईची एकदां जागृति झाल्यावर तिची भरारी, पुणेंच काय, पण इतर सर्व इलाख्यांचे पुढें जावी हे सहजच आहे. कारण मुंबईस व्यापारी लोक, व्यापारी बुद्धि व व्यापारास लागणारें भांडवल हें सर्व मुबलक वाटेल तेवढें आहे. स्वदेशी बँका काढण्याच्या बाबतींत बंगाल व मद्रास मुंबईच्या मागून जात आहेत. बंगाल्यांतील मोठी देशी बँक म्हटली म्हणजे ' बंगाल नॅशनल बँक ' व मद्रासेंतील ' इंडियन बँक ' याच काय त्या होत. आजमितीस हिंदुस्थानाच्या निरनिराळ्या प्रांतांत बँका किती व प्रत्येकीं शाखा किती आहेत याची थोडीशी माहिती खालीं दिली आहे.

**पंजाब**—पीपल्स बँक ऑफ इंडिया; शाखा संख्या ( ६५ ), पंजाब नॅशनल बँक शाखा संख्या ( ११ ) अमृतसर बँक शा. सं. (११) लाहोर बँक, पंजाब बँकिंग कंपनी शा. सं. ( १५ ), दुआब बँक, अलायन्स बँक ऑफ सिमला, मारवाड बँक, पंजाब आणि सिंध बँक शा. सं. ( ५ ), बँक ऑफ मुलतान, बँक ऑफ राजपुताना व पंजाब शा. सं. ( ७ ), काश्मीर बँक, पंजाब को-ऑपरेटिव्ह बँक, यूनियन बँक ऑफ इंडिया, ब्रिटिश इंडिया बँक शा. सं. ( २ ), **संयुक्तप्रांत**—अलाहाबाद बँक शा. सं. ( ९ ), औध कमर्शियल बँक शा. सं. ( ३ ), गोरखपूर बँक, कायस्थ ट्रेडिंग अँड बँकिंग कॉरपोरेशन, बँक ऑफ अप्पर इंडिया शा. सं. ( ११ ), बनारस बँक शा. सं. ( ३ ), भार्गव कमर्शियल बँक, कानपूर बँक, **मुंबई**—बँक ऑफ इंडिया, इंडियन स्पेसी बँक शा. सं. ( १९ ), बँक ऑफ बडोदा शा. सं. ( ३ ), बॉंबे मर्चंटस बँक शा. सं. ( ३ ), क्रेडिट बँक ऑफ इंडिया शा. सं. ( ७ ), काठेवाड ॲण्ड अहमदाबाद बँकिंग कॉरपोरेशन शा. सं. ( १२ ), नॅशनल फिनॅन्सिंग ॲण्ड कमिशन कॉरपोरेशन, डेक्कन बँक, पूना बँक शा. सं. ( ८ ), बॉंबे बँकिंग कंपनी शा. सं. ( ७ ), गुजराथ बँक, शा. सं. ( २ ), इंडियन पेनिन्शुलर बँक शा. सं. ( ४ ), धारवाड बँक शा. सं. ( २ ), कोल्हापूर ॲण्ड सदर्न मराठा बँक, शा. सं. ( ४ ), सोलापूर बँक शा. सं. ( २ ), यूनियन बँक ऑफ विजापूर शा. सं. ( २ ), डेक्कन हुबळी बँक, अहमदनगर बँक, सेन्ट्रल बँक ऑफ इंडिया, बॉंबे सेन्ट्रल को-ऑपरेटिव्ह बँक, पायोनियर बँक,

स्टँडर्ड बँक, कराची बँक शा. सं. ( ७ ); **मद्रास**—इंडियन बँक शा. सं. ( ३ ); **बंगाल**—बंगाल नॅशनल बँक शा. सं. ( २ ); भवानीपूर बँक.

हिंदुस्थानांत देशी बँका निघण्यास तरत्या युरोपियन बँकांचें अनुकरण हें तर एक कारण आहेच; पण युरोपियन बँका बुडून त्यांचें दिवाळें निघणें हें दुसरेंहि आपल्या परीनें एक कारण आहे. युरोपियन पेढीवाल्यांच्या धंद्याच्या सफाई-प्रमाणें त्यांच्या प्रामाणिकपणानेंहि पांच पन्नास वर्षें आमचे डोळे दिपून गेले असल्यामुळें युरोपियन पेढ्या हें आमच्या लोकांचें एक मोठें विश्वासस्थान होऊन राहिलें होतें. पण व्यापारधंद्यांतील अप्रामाणिकपणा असला तर तो आम्हा देशी लोकांतच आहे असें नाहीं, तर युरोपियन पेढ्यांनाहि त्या दोषाचा विटाळ कारणपरत्वें होऊं शकतो ही गोष्ट लक्षांत आल्यापासून, केवळ युरोपियन पेढ्यांकडे धांव घ्यावयाची अशी जी आमची प्रवृत्ति पूर्वीं होती ती सहजच कमी होऊं लागली. दिवाळें निघून बूड आलेल्या युरोपियन बँकांचीं उदाहरणें खालील देतां येतील. ( १ ) युनायटेड बँक ऑफ सिमला, ( २ ) पंजाब बँक, ( ३ ) हिमालय बँक, ( ४ ) लॉइडस बँक, ( ५ ) आग्रा बँक, ( ६ ) ओरिएंटल बँक, ( ७ ) कमर्शिअल बँक, ( ८ ) बँक ऑफ कलकत्ता, ( ९ ) बँक ऑफ बर्मा, (१०) वॉटसन ॲण्ड को. ( ११ ) अर्बथनॉट ॲन्ड को. आतां वरील बँका दिवाळें निघून बुडाल्या एवढ्यावरून युरोपियन लोक पेढ्यांचा धंदा करण्यास योग्य नाहींत असें मुळींच निष्पन्न होत नाहीं. पण विश्वासाच्या दृष्टीनें पहातां युरोपियन बँक म्हणजे कधीं बुडणारच नाहीं ही समजूत तरी व्यर्थ आहे; आणि युरोपियन बँकेलाहि जर बूड येण्याचा संभव असतो तर मग आपले पैसे देशी बँकांतूनच कां ठेविले नाहींत ? व आपल्या ठेवीपासून होणारा फायदा देशी व्यापारासच कां होऊं नये ! असें लोकांस वाटणें अगदीं स्वाभाविक असतें. देशी बँका निघण्यास तिसरें एक कारण, कांहीं थोड्या अंशानें कां होईना पण, असें झालें कीं, युरोपियन लोकांनीं चालविलेल्या पेढ्यांतून देशी लोक बरींच वर्षेंपर्यंत काम शिकून शिकून खालच्या नोकऱ्यां-पासून वर चढले. पण ते नेटिव्ह असल्यामुळें त्यांना बँकेंतील अगदीं वरिष्ठ अशा जागा देण्यांत येईनात. परजातिद्वेषच नसला तरी स्वजातिपक्षपात तरी या कामीं आड येऊं लागला. अर्थात् हें सहन होण्यासारखें नव्हतें; यामुळें अशा लोकांना जेथें स्वतंत्रता मिळेल व वरिष्ठ जागा आंखून टाकून स्वतःची

करामत जेथें दाखावितां येईल, अशा देशी बँका काढण्याची कल्पना त्यांना सुचणें स्वाभाविकच आहे.

देशी बँका आज निघाल्या म्हणजे तेवढ्यानें युरोपियन पेढीवाल्यांपासून आम्ही जें काय शिकावयाचें तें शिकून मोकळे झालों असा मात्र अर्थ नाहीं. आपणांस अद्यापि पुष्कळच शिकावयाचें आहे; कारण दिवाळें निघालेल्या युरोपियन बँकांचीं आम्हीं उदाहरणें दिलीं त्याचप्रमाणें ज्यांचें काम वाखाणण्यासारखें आहे आशाहि किती तरी युरोपियन पेढ्या आज दाखवून देतां येतील. उदाहरणार्थ ( १ ) दी नॅशनल बँक, ( २ ) चार्टर्ड बँक ऑफ इंडिया, ( ३ ) ऑस्ट्रेलिया अँड चायना बँक, ( ४ ) हाँगकाँग ॲण्ड शांघाय बँकिंग कॉरपोरेशन, ( ५ ) दी मर्कंटाइल बँक ऑफ इंडिया, ( ६ ) दी अलाहाबाद बँक, ( ७ ) दी अलायन्स बँक ऑफ सिमला, ( ८ ) दी बँक ऑफ अपर इंडिया, ( ९ ) दि पंजाब बँकिंग कंपनी वगैरे पेढ्यांचें काम इतकें सुव्यवस्थेशीर व फायद्याचें चालतें कीं, त्यांचें उदाहरण केव्हांहि घेण्यासारखेंच आहे. खास आमच्या आम्हीं चालविलेल्या देशी बँका बुडाल्याचीं उदाहरणें अद्यापि फारशीं घडून आलीं नाहींत हें खरें; परंतु आमच्या कर्तबगारीची व प्रामाणिकपणाची परीक्षा पुरी होण्याला आमच्या स्वतःच्या बँका निघून वेळ तरी कितीसा झाला आहे ? उलटपक्षीं, अर्बथनॉट कंपनी बुडाली खरी; तरी पण ती जवळ जवळ शंभर वर्षांची जुनी होती; म्हणजे इतकीं वर्षें तिनें आपलें काम बिनबोभाट रीतीनें केलें होतें ही गोष्टहि जमेस धरली पाहिजे. तात्पर्य, नव्या पद्धतीच्या देशी पेढ्यांना आक्रमावयाचा मार्ग खरा काय तो अजून पुढेंच असून आतां तर त्यास कोठें सुरुवात झालेली आहे. तथापि, हा पुढचा मार्ग कोणच्या रीतीनें आक्रमिला असतां यशस्वी होईल हें युरोपियन पेढ्यांच्या बऱ्या व वाईट दोनहि प्रकारच्या अनुभवावरून स्थूल मानानें सांगतां येण्यासारखें आहे.

सर्वांत पहिली गोष्ट ही कीं, बँकांच्या नव्या पद्धतीशीं लोकांचा परिचय झाल्यापासून वाटेल त्यानें उठून बँक काढावी, व बँक या नांवाचा दुरुपयोग करावा असें हल्लीं झालें आहे ! ‘ कंपनी ’ या नांवाचा जसा दुरुपयोग होतो तसाच बँक या नांवाचाहि होतो. ‘ कंपनी ’ हा शब्द उच्चारला असतां ज्याप्रमाणें अनेक व्यक्तींच्या घटनेची व त्या घटनेपासून निष्पन्न होणाऱ्या सांपत्तिक व इतर विशिष्ट अशा सामर्थ्याची कल्पना मनांत येते, तीच गोष्ट बँक या शब्दासहि

लागूं आहे. अमुक एक इतकें भांडवल व्यवहारांत असलें तरच तिला 'बँक' हें नांव द्यावें एरवीं देऊं नये, असा नियम नाहीं ही गोष्ट खरी; पण या अनियमबद्ध स्थितीचा फायदा धूर्त लोकांकडून घेतला जाऊन केवळ नांवावरून महत्त्वाची कल्पना बांधण्याची ज्यांना संवय असते अशा लोकांची वंचना होण्यास एक साधन निर्माण होतें ही गोष्ट कांहीं खोटी नाहीं. हिंदुस्थानांत निघणाऱ्या बँका व इतर प्रकारच्या जॉईंट स्टॉक कंपन्या यांच्या घटनेसंबंधानें एक गोष्ट स्थूल दृष्टीनें पहाणाराऱ्याहि लक्षांत येईल. ती ही कीं, या संस्थांचें काम बहुधा मॅनेजिंग एजंट्स व सेक्रेटरीज यांच्या द्वारेंच चालतें, परंतु ही पद्धति बरीचशी सदोष आहे. एक तर मॅनेजिंग एजंट्स, सेक्रेटरीज आणि ट्रेझरर्स हे सर्व अधिकार एकाच व्यक्तीकडे असल्यामुळें कंपनीचें नफा–नुकसान करणें सर्वस्वीं एकाच व्यक्तीचे हातीं रहातें. त्यांच्याहून वरिष्ठ अधिकारी जे डायरेक्टर्स त्यांचा हात प्रत्यक्ष व्यवस्थेंत फार थोडा रहातो; व त्यांच्या मनांत विशेष हात घालावा असें आलें तरी अधिकाराची कायदेशीर विभागणी होऊन गेलेली असल्यामुळें त्यांना तींत फारसा हात घालतां येतहि नाहीं. डायरेक्टर झाले तरी भागीदार लोकांच्या बळावरच व्यवस्थेंत लक्ष घालणार. परंतु पुष्कळ वेळां मूळ कंपनी बनवितांना, खुद्द भागीदारांच्याहि हातून त्यांचे अधिकार काढून घेण्यासारखे नियम केले जातात; यामुळें जे अधिकार भागीदारांनाहि नाहींत ते त्यांच्यातर्फे काम करणाऱ्या डायरेक्टरांना कोठून येणार? उदाहरणार्थ, पुष्कळ कंपन्यांतून मॅनेजिंग एजंट्स, सेक्रेटरीज, ट्रेझरर्स या त्रयीचे अधिकार एखाद्या को. (कंपनी) ला–म्हणजे वस्तुतः एखाद्या व्यक्तीलाच–वंशपरंपरा किंवा एक दोन पिढ्या टिकतील इतकीं वर्षेपर्यंत देण्याचा करार आधीं होऊन कंपनीच्या घटनेची ती एक मुख्य अट होऊन बसते; व भागीदारांनीं शेअर मागण्याच्या विनंतिपत्रावर हे अगर इतर पूर्वीं झालेले करार आपणांस मान्य असल्याबद्दलचा गर्भित अगर अप्रत्यक्ष संमतिदर्शक शेरा छापलेलाहि असतो. यामुळें, कोणच्याहि कंपनीचे शेअर घेतांना तिची घटना वगैरेसंबंधाचे नियम वाचून व समजावून घेऊन सही करणारे लोक आधीं विरळाच असतात, तरी पण जे थोडे लोक तसें करितात त्यांच्या लक्षांत व्यवस्थेसंबंधानें दोष दिसून आले तरी त्यांना ते पुढें दुरुस्त करितां येतील अशी स्थितिच उरलेली नसते.

मॅनेजिंग एजंट्स व सेक्रेटरीज हे कंपनीचे बहुधा मालकच बनतात, त्यामुळें

त्यांना काढून टाकणेंच काय, पण त्यांच्यावर नुसती देखरेखीची कदर चालविणेंहि अशक्य होतें. या सर्वांचें एक मुख्य व कांहींसें अपरिहार्य कारण असें आहे कीं, आमच्या इकडे कंपन्या निघतात त्या काढण्याची मूळ कल्पना व त्यासंबंधींचा उद्योग मॅनेजिंग एजंट्सच्या कंपनीपैकीं एखाद–दुसऱ्या व्यक्तीच्या हातूनच झालेला असतो. एक तर कंपनीला डायरेक्टर्स असणें हें अनिवार्य आहे; शिवाय डायरेक्टरांचा नांवलौकिक किंवा त्यांची वजनदारी यांचा भांडवलाच्या भरतीस चांगला उपयोग होतो; अशा दोनहि दृष्टींनीं डायरेक्टर–बोर्डाची योजना करण्यांत येते. परंतु डायरेक्टर लोक अशा हिकमतीनें नेमण्यांत किंवा निवडण्यांत येतात कीं, त्यांना मॅनेजिंग एजंट्स व सेक्रेटरीज यांना कोणत्याहि बाबतींत प्रतिबंध करण्याचें ज्ञान व ताकद असणार नाहीं; व ही असली तरी; स्नेहसंबंध किंवा हिताहितसंबंध यांच्यामुळें प्रतिबंध करण्याची इच्छा राहणार नाहीं. अर्थात् मॅनेजिंग एजंटास सेक्रेटरीज व डायरेक्टर या दोघांचा मिलाफ किंवा एकजिव झाला असतां भागीदार लोकांचें त्यांच्यापुढें कांहीं एक चालत नाहीं. विलायतेंत किंवा इतर पाश्चात्य देशांत याहून प्रायः वेगळी स्थिति असते; म्हणजे एकादी कंपनी अस्तित्वांत आणण्याची स्फूर्ति व त्याचा प्रास्ताविक उद्योग यांचा डायरेक्टर्स लोकांपासूनच उगम असतो. व कंपनी बनविण्यांत येते, तेव्हां बहुतांशीं भागीदार लोकांच्या हिताकडेच लक्ष देऊन तिचे नियम तयार करण्यांत येतात. यामुळें व्यवस्थेचा हक्क इकडे जसा एखाद–दुसऱ्या व्यक्तीकडे तहाह्यात किंवा वंशपरंपरेनें जाऊं शकतो तसा तो तिकडे जाऊं शकत नाहीं. इकडे डायरेक्टर लोक कंपनीच्या व्यवहाराविषयीं अतज्ज्ञच काय पण अज्ञहि असतात. याच्या उलट तिकडील डायरेक्टर कंपनीच्या कामाविषयीं तज्ज्ञ किंवा निष्णात असे असून केवळ स्वतःच्या धमकेवर हाताखालीं पगारदार नोकर ठेवून तें काम पार पाडण्यास व यशस्वी करण्यास लायक असतात. तिकडे डायरेक्टर होणें ही बाब बिनफायद्याची असते असें नाहीं, कारण डायरेक्टर–बोर्डाच्या सभेला हजर रहाण्याबद्दल त्यांना भरभक्कम फी मिळते. परंतु हा फीचा फायदा वेगळा; आणि इकडे म्यानेजिंग एजंट्स कंपनीच्या ऐन नफ्यांत हिस्सेरसी ठेवून, शिवाय चालचलाऊ कामकाज करण्याकरितां पगार घेतात, म्हणजे सब खाऊन घडणावळ मिळवितात, तो नफ्याचा प्रकार वेगळा! ‘सब खाऊन घडणावळ’ हे जे शब्द आम्हीं वापरले ते अतिशयोक्तीचे ठरणार नाहींत, असा अनुभव इकडील पद्धतीनें चालणाऱ्या पुष्कळ कंपन्यांचा लोकांना आलेला आहे.

# ३८ स्वदेशी पेढ्यांची धांदल.

( तारीख १४ आक्टोबर सन १९१३ )

सुमारें तीन महिन्यांपूर्वी ' स्वदेशी पेढ्या ' या विषयावर आम्हीं कांहीं लेख लिहिले त्या वेळीं त्यांमध्यें केलेल्या कित्येक विधानांची सत्यता प्रत्यक्ष अनुभवाला इतक्या लवकर येईल असें आम्हांस वाटलें नव्हतें. पण तो अनुभव गेल्या तीन आठवड्यांत अकल्पित रीतीनें आला. तो तसा आला नसता तर त्यांत आनंदच होता; पण ज्याअर्थी तो आला आहे त्याअर्थी त्याचाहि उपयोग करून घेतला पाहिजे. स्वदेशी पेढ्यांसंबंधानें ता. २२ जुलैला आम्हीं खालील विधान केलें होतें. " देशी बँका आज निघाल्या म्हणजे तेवढ्यानें युरोपियन पेढीवाल्यांपासून आम्हीं जें काय शिकावयाचें तें शिकून मोकळे झालों असा मथितार्थ नाहीं. आपणास अद्याप पुष्कळच शिकावयाचें आहे......खास आमच्या आम्हीं चालविलेल्या देशी बँका बुडाल्याचीं उदाहरणें अद्यापि फारशीं घडून आलीं नाहींत हें खरें. परंतु आमच्या कर्तबगारीची व प्रामाणिकपणाची परीक्षा पुरी होण्याला आमच्या स्वतःच्या बँका निघून वेळ तरी कितीसा झाला आहे? ......नव्या पद्धतीच्या देशी पेढ्यांना आक्रमावयाचा मार्ग खरा काय तो अजून पुढेंच असून आतां तर त्यास कोठें सुरवात झालेली आहे." या उद्गारांची साक्ष पंजाब व मुंबई इलाख्यांतील कांहीं स्वदेशी बँकांनीं नुकतीच पटविली आहे. पीपल्स बँक ऑफ इंडिया, अमृतसर बँक, हिंदुस्थान बँक, क्रेडिट बँक ऑफ इंडिया, बॉंबे बँकिंग कंपनी वगैरे बँकांनीं आपापलीं ऑफिसें बंद करून देण्याघेण्याचा व्यवहार थांबविला, यामुळें लाखों रुपयांच्या ठेवी धोक्यांत येऊन ठेवीवाले व बँकांचे सावकार सहजच हवालदिल झाले आहेत. खरोखर या बँकांपैकीं एकीचेंहि दिवाळें निघालें असें आजच म्हणतां येत नाहीं. कारण प्रत्येक बँकेचें असें म्हणणें आहे कीं, ' आपल्या देण्यापेक्षां आपलें घेणें बरेंच अधिक आहे व देण्याघेण्याची व्यवस्था सोईसोईनें झाल्यास घेणें वसूल करून देणें देऊन टाकण्यास हरकत पडणार नाहीं. आज बँकेचे दरवाजे लावण्याचें कारण इतकेंच कीं, सेव्हिंग बँकखातें अगर चालू खातें यावर असलेली सर्व रक्कम हातांत बिनव्याजी ठेवून चालत नाहीं, ती कोठें तरी गुंतवावी लागतेच, आणि ठेवीवाल्यास ठेव परत मागणें हें जितकें सोपें तितकें ठेवीच्या पैशांतून दिलेलीं

कर्जें तावडतोब वसूल करणें सोपें नसतें. यास्तव एकाच दिवशीं अभावितपणें ठेवीवाल्यांनीं गर्दी व हुल्लड केल्यास त्यांची सर्व मागणी पुरी पाडणें सर्वस्वीं अशक्य. शिवाय एकानें ठेव परत मागितली हें पाहून दुसरा मागणार; व दुसऱ्यानें मागितली हें पाहून तिसरा मागणार! अशा रीतीनें एखाद्या स्पर्शजन्य रोगाप्रमाणें ही मागणी क्षणोक्षणीं वाढतच जाते; व अखेर मागणी इतका पैशाचा पुरवठा होणें शक्य नसल्यामुळें थोड्या बहुत किंवा बऱ्याचशा ठेवी परत दिल्या असतांहि अखेर निरुपायामुळें हार खाऊन बँकेला आपले दरवाजे लावावे लागतात!

बँकवाल्या लोकांचें हें म्हणणें अगदींच अयुक्तिक आहे असें नाहीं. तथापि, ठेवी परत मागण्यास एकदम धांव घेणाऱ्या ठेवीवाल्यांची यांत चूक आहे असें म्हणतां येत नाहीं; व तर—तमभावानें दोघांची वांटणी करावयाचीच तर प्रसंगविशेषीं होणाऱ्या या अनिष्ट प्रकाराची जबाबदारी ठेवीवाल्यापेक्षां बँकांच्या व्यवस्थापकांकडेच अधिक येईल. ठेवींत मुख्य दोन प्रकार असतात. एक मुदतीची ठेव व दुसरी दर्शनी ठेव. पैकीं पहिल्या ठेवीसंबंधानें ठेवीवाल्यांनीं ठराविक मुदतीपर्यंतचा प्रत्यक्ष करार करून दिला असल्यामुळें ते कितीहि संशयी, उतावळे, अधीरी असले तरी त्यांना एक पैदेखील मुदतीच्या आंत मागतां येत नाहीं. व कोणीं ठेवीवाल्यानें मागितली तरी कोणीहि बँकवाला ती देत नाहीं. दिलीच तर खिंडींत गांठल्याप्रमाणें तुटमुदतीचें किंवा सर्वहि व्याज बुडवून नुसत्या मुद्लाची रक्कम हातीं टाकून वरती ठेवीवाल्यावर उपकार केला म्हणण्याची पेढीवाल्याची तयारीच! पेढीवाले ठेवीवाल्यांच्या सोईकडे कधींहि पहावयाचे नाहींत ही ठरलेली गोष्ट. अविचारानें किंवा फसून जाऊन कर्जें दिलेल्या कुळांकडून ते हवे तितके बुडतील; पण ठेवीवाल्यांस त्यांच्याकडून कराराबाहेर एक पैचा कधी फायदा व्हावयाचा नाहीं. त्यांचा सर्व हिशेबीपणा किंवा कांटेकोरपणा येऊन जाऊन बिचाऱ्या ठेवीवाल्यांच्या बोकांडीं बसावयाचा! ठेवीस मुदत असली म्हणून काय झालें? समजा कीं, एखादा ठेवीवाला खरोखर अडचणींत आहे आणि त्याची ठेव सहज परत करतां येण्याइतकी पेढीच्या तिजोरीं रक्कम लोळत पडली आहे. तरी ठेवीवाल्याच्या गरजेकडे पाहून भलेपणानें किंवा माणुसकी ओळखून तुटमुदतीच्या व्याजासह ठेव परत दिली, असें उदाहरण बँकांच्या व्यवहारांत बहुधा सांपडणार नाहीं. उलटपक्षीं वर सांगितल्याप्रमाणें मुदतीच्या

पूर्वी ठेव परत देण्याच्या निमित्तानें व्याज खाऊन जाऊन, विशेषतः ठेवीवाले घाबरले असतां त्याचा फायदा घेऊन, सर्व व्याज बुडवून शिवाय मुदलांतलेहि थोडेबहुत रुपये बुडविणार ! आणि अशा चाणाक्ष रीतीनें बँकांना नफा करणारे पेढीवालेच पुष्कळ !

पण करार म्हणजे करार ही शिस्त पाळणें एकंदरीनें सर्वांनाच सोयीचें असल्यामुळें अशा रीतीनें ठेवीवाल्यांची झालेली गैरसोय किंवा नुकसानी याला कोणी फारसें महत्त्व देत नाहीं. त्याची केवळ सरळ व्यवहारांत गणना होते. पण करार म्हणजे करार हीच शिस्त जर योग्य व श्रेयस्कर मानावयाची, तर सेव्हिंग बँकखातें व चालू खातें या खात्यांवर ठेव ठेवणारांना ती वाटेल तेव्हां परत मागण्याचा हक्क असल्यामुळें, त्यांनाहि या शिस्तीचा फायदा कां मिळूं नये ? मुदतीच्या आधीं एक दिवस देखील ठेव परत न करणाऱ्या पेढीवाल्याच्या करारीपणाचा तुर्रा बिनमुदतीच्या ठेवीवाल्यांची गर्दी झाली म्हणजे कोठें जातो ? कराराची सबब सांगून मुदतीच्या ठेवीवाल्यांना रडविणारे पेढीवाले बिनमुदतीच्या ठेवीवाल्यांनीं एकदम पैसे मागितले असतां 'हें असेंच झालें, तें तसेंच झालें' अशा सबबीचें रडगाणें कां गाऊं लागतात ? सर्व बिनमुदतीच्या ठेवीवाल्यांनीं एकदम पैसे मागणें ही गोष्ट अनपेक्षित खरी. पण कराराप्रमाणें जर हे ठेवीवाले वागतात तर अनपेक्षिततेची सबब सांगण्यास पेढीवाल्यांना काय अधिकार पोंचतो ? सवलत देतांना एक माप व सवलत घेतांना एक माप असें काय म्हणून? ठेवीवाल्यांशीं पेढीवाले जर भलाईनें वागल्याचीं उदाहरणें दिसूं लागतील तर विशेष प्रसंगीं ठेवीवाल्यांनींहि पेढीवाल्यांशीं भलाईनें वागावें अशी अपेक्षा करणें योग्य होईल. पेढीवालेहि क्वचित् सवलत दाखवितातसें दिसतें; पण ती त्यांजपासून कर्जाऊ रक्कम घेऊन पुष्कळसें व्याज देणाऱ्या कुळांना. पण ती सवलतहि निरुपायाची किती असते व प्रामाणिकपणाची किती असते हा प्रश्न रहातोच. मुख्य मुद्दा हा कीं पेढीच्या सर्व व्यवहाराचें मूळ अधिष्ठान जे ठेवीवाले यांच्या पदरांत मात्र सवलतीचा एक कणहि पडत नाहीं. बँकेशीं झालेल्या व्यवहारांत अपघातानें किंवा इतर रीतीनें झालें तर त्यांचें नुकसानच होईल; पण कराराबाहेर विशेष नफा म्हणून कधींहि व्हावयाचा नाहीं. बिनमुदतीचे ठेवीवाले जे एकदम पैसे मागावयास जातात, त्यांत दुष्टपणा सहसा असत नाहीं. फारच तर संशयीपणा किंवा फाजील भित्रेपणा असतो. पण ठेवीवाल्यांचा हा स्वभाव व त्यांच्याशीं

झालेला करार लक्षांत घेऊन अभावितपणेंहि मागणी आली तरी ती पुरी पाडण्याची व्यवस्था पेढीवाल्यांनीं कां करूं नये, हें समजत नाहीं.

ठेवीवाले लोक भेदरलेल्या मेंढराप्रमाणें ठेवी परत घेण्याला एकदम उड्या घालतात हें बँका बंद होण्यास एक कारण आहे खरें, पण तें एकटेंच किंवा मुख्यहि कारण आहे असें म्हणवत नाहीं. ज्या दिवशीं ठेविवाल्यांच्या टोळधाडीची मागणी आली, त्या दिवशींच आपल्यावर येणाऱ्या संकटाची प्रथम कल्पना पेढीवाल्यांना येते असें नाहीं. हल्लीं बंद झालेल्या बँकांचा बंद होण्यापूर्वीचा थोडे दिवसांचा वृत्तांत व व्यवहार पहावयास मिळाला असतां ही गोष्ट सहज सिद्ध करतां येईल. कारण या अवधींत बँकवाल्यांनीं कोणीकडून तरी आपले पैसे वसूल करावयाचे व दुसऱ्याचे देण्याची टंगळमंगळ करावयाची असेंच बहुधा आढळून येईल. लोकांत दिसतांना जरी ठेवीवाल्यांच्या एकदम मागण्या या एखाद्या कटासारख्या किंवा घाल्यासारख्या दिसतात, तरी वास्तविक त्या तशा नसतात, त्यांचा थोडा तरी सुगावा पेढिवाल्यांना आगाऊ लागतो. पण अशी सूचना असतांहि त्यांना ठेवीवाल्यांच्या रकमेची जुळवाजुळव करतां येत नाहीं, याचा अर्थ त्यांच्या स्वतःच्या मिळकतीवर त्यांना बिनमुदतीच्या ठेविइतकेंहि कर्ज कोणाकडून मिळत नाहीं. म्हणजे फिरून याचा अर्थ त्यांच्या मिळकतीची तितकी खरी किंमत नाहीं,अथवा बाजारामध्यें त्यांची पत नाहीं असाच होतो. व असें होण्याचें कारण काय अशी पृच्छा फिरून केली असतां त्याचें उत्तर असें द्यावें लागेल कीं, प्रामाणिकपणानें पण भारी व्याजावर नजर देऊन किंवा बोलूनचालून अप्रामाणिकपणानें ठेवींचे पैसे पेढीवाल्यांनीं कमजास्त नादान अशा कुळामध्यें पेरलेले असतात. गंगाजळींतल्या नगद रकमेपेक्षां कर्जाऊ दिलेल्या रकमा हातीं येण्याला अधिक वेळ लागणें स्वाभाविक आहे; कारण जवळ जवळ गंगाजळींतल्या नगदी नाण्याइतकी ज्याची बाजारांत किंमत असें हुकमी तारण ज्याचे हातीं आहे तो सहसा मोठेसें कर्ज काढणार नाहीं किंवा काढलें तरी फार व्याज देणार नाहीं. अर्थात् बँकांचीं पुष्कळशीं कर्जें गुंतागुंतीच्या व बिनहुकमी तारणांवर दिलेलीं असतात व त्याचा हेतुहि भारी व्याज मिळविण्याचा असतो. पण व्याज जितकें भारी तितकें तारण निरुपयोगी हा सामान्य नियम असल्यामुळें ठेवीवाल्यांची मागणी आली असतां पेढिवाल्यांचें तारण हुकमी जाब देऊं शकत नाहीं. या सर्वांवरून एकच निष्कर्ष निघतो कीं, पेढी-

वाले भारी व्याजाच्या मोहांत पडतात व हें भारी व्याज कशाकरतां वसूल करा-वयाचें तर सकृद्दर्शनीं भागीदारांना पण खराखर पेढीच्या व्यवस्थापकांना अधिक फायदा मिळावा म्हणून. पण भागीदारांच्या नफ्याकरतां असलें कृत्य केलें असेल तर त्याला हलवायाच्या घरावर ब्रह्मार्पण, आणि केवळ व्यवस्थापकांच्या फाय-द्याकरतां केलें नसेल तर तो अप्रामाणिकपणा व विश्वासघात, असेंच म्हणावें लागेल. लाहोर येथील आर्यपत्रिकेनें 'पीपल्स बँक ऑफ इंडिया' ह्या पेढीच्या कर्जांची जी माहिती प्रसिद्ध केली आहे तीवरून या पेढीपुरता तरी पहिल्यापेक्षां दुसरा प्रकारच अधिक संभवनीय दिसतो. हल्लीं बंद झालेल्या इतर बँकांच्या व्यवहाराची अशी माहिती प्रसिद्ध झाली नसल्यामुळें त्यांच्यासंबंधानें असलें विधान करतां येईल कीं नाहीं तें सांगवत नाहीं.

तथापि हें सामान्य विवेचन झालें. पेढीवाल्यांच्या वर्तनासंबंधानें आम्हांस जें काय म्हणावयाचें हें तर म्हटलेंच आहे. पण ठेवीवाले व भागीदार यांचेसंबंधानेंहि एक दोन शब्द लिहिणें जरूर आहे. आपला पैसा बुडणार अशी शंका आली असतां कोणीहि ठेवीवाला पेढीवर धांवत जाऊन गिल्ला करून ठेवीचे पैसे परत मागेल हें स्वाभाविकच आहे. पण लागूं नयेत ते पेढीचे दरवाजे लागले, असें झाल्यानंतर ठेवीवाल्यांनीं विचारानें व दूरदर्शीपणानेंच वागलें पाहिजे. व तें असें कीं, शक्य असेल तर त्यांनीं पेढी लिक्विडेशनमध्यें काढण्याचा हट्ट अगर आग्रह न धरतां, पेढीची अब्रू बचावण्याचें काम पेढी-वाल्यांना गर्दींत एकदम करतां आलें नाहीं तें त्यांना मुदत देऊन करतां येत असेल तर तशी मुदत द्यावी. नाहीं तर सक्तीनें लिक्विडेशन केल्यास त्यांत सर्वांचाच तोटा होत असतो. जळत्या घराचा पडता वांसा मिळेल तो ओढून घेणें हें ठीक आहे. पण आपल्यापुरता जळका वांसा ओढतांना सर्व घरच्या घर खालीं बसून त्यांत आग विझवणारीं माणसेंहि दगावतील अशी तरी अविचारी-पणाच्या स्वार्थसाधकपणाची गोष्ट ठेवीवाल्यांनीं करूं नये. पण ठेवीवाल्यांनीं असें आत्मसंयमन दाखविण्यास झालें तरी पेढीच्या पुढारी डायरेक्टरांनीं ठेवीवाल्यांची हमी घेतल्यासारखें आश्वासन ठेवीवाल्यांना जाहीर रीतीनें दिलें पाहिजे. नाहीं तर पेढी लिक्विडेशनमध्यें न काढणें याचा अर्थ कदाचित् अप्रामाणिक किंवा नादान व्यवस्थापकांना पूर्वीं झालेला अर्धवट नाश पुरा करण्याची संधि देणें असाच होईल ! डायरेक्टर लोकांवर ठेवीवाल्यांनीं विश्वास टाकून जें भूषण

मिळवून दिलें, त्याचा मोबदला एरवींच्या वेळीं नाहीं तरी अशा विशेष प्रसंगीं डायरेक्टर लोकांनीं त्यांना द्यावयास पाहिजे. चूक किंवा फसगत होणें ही गोष्ट स्वाभाविक असली तरी ती दुरुस्त करण्याची संधि मागतांना पूर्वी शिलकी पडलेली आपली पत व अब्रू डायरेक्टर लोकांनीं ठेवीवाल्यांस जामिनकीदाखल दिली पाहिजे.

भागीदारांसंबंधानें एकच गोष्ट सांगावयाची, ती ही कीं, पेढीच्या नेहमींच्या व्यवहारांत ते जरी ब्रह्माप्रमाणें साक्षिभूत व अलिप्त राहतात, तरी अशा विशेष प्रसंगीं त्यांनीं आपणांमध्यें असलेलें शहाणपण व तेज दाखविण्यास पुढें आलें पाहिजे. पेढी बुडाली असतां ठेवीवाल्यांचें नुसतें पैशाचेंच नुकसान होतें; पण त्यांस लोकसमाजाची सहानुभूति तरी मिळते. पण भागीदारांचा पैशापरी पैसा व अब्रूपरी अब्रू जाते. भागीदारसंघ हा पेढीचा धनी व व्यवस्थापक मंडळ हें त्याच्या मुनिमासारखें आहे. मुनिमावर सामान्यतः विश्वास टाकून चालणें हें केव्हां केव्हां धन्याच्या आळशीपणाचें तर केव्हां केव्हां त्याच्या मानसिक औदार्याचेंहि लक्षण गणलें जाण्याचा संभव आहे; पण मुनिमानें पेढी गोत्यांत आणली असतां त्याची बदली करून दुसरा मुनिम नेमणें किंवा त्याच मुनिमावर विशेष दक्षता व डोळा ठेऊन त्याचे हातून बिघडलेली घडी सुधारणें हेंच भागीदाराचें धनी या नात्यानें कर्तव्य आहे. कांहीं थोडे भागीदार पेढीच्या सुरवातीच्या वेळीं आत्मनियुक्त व्यवस्थापक किंवा मुनिम बनवून भागीदारांचा घोळका जमवितात हें खरें; तथापि या घोळक्यांतील सर्वच व्यक्ती नादान असतील हें शक्य नाहीं. पेढीचे भाग खरेदी करतांना ते डोळे मिटून सह्या करतात असें घेऊन चाललें तरी, प्रसंगविशेषीं डोळे उघडून त्यांनीं पाहिलें असतां व आपापसांत जूट केली असतां कंपनीच्या नियमांतच त्यांना असें एकादें शस्त्र सांपडेल की, त्याच्या योगानें त्यांना व्यवस्थापक मंडळींना वठणीवर आणतां येईल. बखेडा होऊं नये तो झाल्यावर देखील जरी भागीदारांनीं पेढीच्या व्यवहारांत लक्ष घातलें, तरी त्यांचा थोडाबहुत शक चालल्याशिवाय राहणार नाहीं, आणि अशा स्थितींत न्यायकोर्ट व कायदेशीर अधिकारी यांजकडून व्यवस्थापकापेक्षां भागीदारांस अधिक सहाय्य मिळेल यांत शंका नाहीं.

पण बिकट प्रसंगीं देखील जर त्यांना जागृति न येण्याइतके सर्वच भागीदार मठ्ठ असले तर त्यांचा पैसा व त्यांची अब्रू दोनहि जाणें हें ठीकच आहे, असें

म्हणावें लागेल. इंग्रज लोकांकडून समाईक भांडवलाच्या कंपन्यांचे नमुने घेऊन आम्हीं गिरविले खरे; पण इंग्रज भागीदारांच्या अंगची दक्षता व उद्योगप्रियता आम्ही अजून शिकलों नाहीं असें म्हणण्याचा जो आज प्रसंग आला आहे, तो हल्लींच्या टक्याटोणप्यांनीं पुढें जरी टळला तरी वाईटांतून चांगलें निघालें असेंच आम्ही म्हणूं. हल्लींच्या प्रसंगाच्या कित्येक टीकाकारांनीं कार्यकारणमीमांसा करतांना कंपन्यां-संबंधाचा कायदा दुरुस्त व्हावा व बँकांच्या व्यवस्थेंत सरकारचा हल्लींहून अधिक हात शिरावा अशा सूचना केल्या आहेत. आमच्या मतें नुकताच पास झालेला कंपन्यांचा कायदा पाहतां, बँकांची स्थिति सुधारण्यास कायद्याची आणखी दुरुस्ती करण्याचें फारसें कारण आहे असें वाटत नाहीं. आहे तोच कायदा घेऊन त्याप्रमाणें व्यवस्थापकांवर करडा अंमल करून भागीदार लोक बँकांचीं कामें चाल-वितील तर हल्लींसारखे घोटाळे होणार नाहींत; पण भागीदारांनींच मुळीं कंपनीच्या व्यववहारांत लक्ष घालावयाचें नाहीं असलें व्रत पुढें चालविलें तर कायदा दुरुस्त करून तरी काय होणार ? अगदीं आधुनिक सहाबारी पिस्तुल किंवा दमास्क-सची पोलादी गुप्ती उशाखालीं असली, पण या हत्यारांचा उपयोग करण्यास लागणारी चपळता किंवा इच्छाशक्ति मनुष्याजवळ नसेल तर अशा हत्यारांचा झाला तरी दग्याच्या वेळीं त्याला काय उपयोग ? सरकारी कायदाकानूची भागीदारांस मदत लागेल ती मिळेल. पण हल्लींच्या कायद्याअन्वयें त्यांना जे अधिकार बजावतां येण्यासारखे आहेत ते बजावून जेव्हां ते भागतील किंवा कुंठित होतील, तेव्हां मग कायदा दुरुस्त होण्याची मागणी शोभेल. तोंपर्यंत अशा प्रकारची मागणी हें आमच्या अंगीं खिळलेल्या व मुरलेल्या स्वावलंबन शून्यतेचें आणखी एक निदर्शक होईल इतकेंच काय तें !

---

## ३९ कै० शेट चुनीलाल सरैय्या

( तारीख २ दिसेंबर सन १९१३. )

सुमारें दोन महिन्यांपूर्वी लाहोर येथें ' पिपल्स बँक ऑफ इंडिया ' या पेढीचें दिवाळें निघालें त्यामुळें लोकांचें लाखों रुपयांचें नुकसान झालें. पुढें दिवाळखो-रीची ही लाट लवकरच मुंबई इलाख्याला येऊन पोंचली, व तिनें आजवर पांच-सात बँका व पेढ्या बुडविल्याहि ! या आकस्मिक उत्पातानें अगदीं थोड्याशा अव-धींत मुंबईस जी खळबळ करून सोडली तिचें वर्णन करितां येणें कठीण आहे.

चंचल स्वभावाची देवी लक्ष्मी जणूं काय विशेष लीलाप्रिय झाल्यामुळें मुंबईस प्रत्यहीं नवी नवी उलथापालथ व दाणादाण होत आहे. ‘ यद्दृष्टं तन्नष्टं ’ हा जो वेदांती सिद्धांत त्याची सत्य–प्रतीति कित्येक लाखोंपतींना क्षणार्धांत भिकारी बनवून तिनें आणून दिली आहे ! जें स्थळ दिसावें तें जळ असावें व जें जळ दिसावें तें स्थळ असावें हा काल्पनिक चमत्कार बाजारपेठेच्या ‘ मयसभें ’ त खरा करून दाखविला. पत आणि नापत यांच्या दरम्यानची ठळक रेघ केवळ लीलेनें पुसून नापत्ता केली. कित्येक सद्‌गृहस्थांच्या अंगावरील माशीच्या पंखाइतकी पातळ अशी निःस्पृहतेच्या अब्रूची तुकतुकीत जिल्हई वाफेच्या तोंडच्या त्यांच्याच स्पर्शानें घांसून काढून त्यांच्या मानसिक संपत्तीचें कळकट स्वरूप व्यक्त केलें. मुंबईच्या ताज्या अनुभवानें जगास असेंहि दिसून आलें कीं, दुनिया ही एक झुलती परी आहे, तिला झुलविणारा मात्र कल्पक हवा; पेढीचें नांव घेणाऱ्या सोनेरी टोळीला दरोडा घालण्यास ढळढळीत दिवस हाच आंधेऱ्या रात्रीप्रमाणें उपयोगी पडतो; ( कारण बँकेचें काम ११ वाजल्यापासून ४ वाजेपर्यंत चालावें, व फुरसें चावलेल्या माणसाप्रमाणें बँकेंतील तिजोरीला दिव्याचा उजेडहि दाखवूं नये असा एक शिष्टसांप्रदाय आहे ! ); या दरोडेखोरांना पितळेचें काउन्टर, हिशेबाच्या छापील लठ्ठ वह्या व सुंदर वेलबुट्टीदार चर्मपत्रावर लिहिलेले शेअरचे मायने, एवढ्या हत्यारांच्या सहाय्यानें स्वतःच्या घरीं बसून दुसऱ्याच्या घरावर दरोडा घालतां येतो; शिवाय विशेष हा कीं, मालकाचे पैसे त्याच्याच पदरांत बांधून आपल्या तिजोरींत आणून टाकितां येतात; आणि अखेर चुकून कोतवालाची घस्त झालीच तर दिवाळखोरीच्या कायद्याचा तांबडा चोरकंदील राजरोस दाखवून आपल्या बहुतेक लुटीसह सुरक्षितपणें पळूनहि जातां येतें. तसेंच दिवाळखोरीची आग पेटली असतां परोपकारी महात्मे व अट्टल उचले यांची सरमिसळ कशी होऊन जाते; बाजारपेठच्या नदीला पूर येऊन पाणी गढूळ झालें असतां मासे पकडण्याची हीच वेळ असें जाणून स्वार्थी धीवर आपलीं जाळीं पसरून गांगरलेले मासे पकडण्यास कसा तयार होतो; अथवा कोर्ट–फीचें खाद्य देऊन न्यायसभेच्या वाहनाचा आश्रय करणारी संक्रांत एका दिशेकडे जावयाचें असतां दुसऱ्या दिशेकडे नजर ठेवून आपला कार्यभाग कसा साधते–हे व इतर अनेक चमत्कार गेल्या थोड्या दिवसांत मुंबईचें चरित्र पाहणारास व वाचणारास प्रत्यक्ष अनुभवावयास सांपडलेच. पण मुंबईची सर्वांत प्रमुख स्वदेशी पेढी ‘ इंडियन स्पीशी बँक ’ व तिचे मुख्य चालक यांचीं लागोपाठ जीं

स्थित्यंतरें झालीं तीं इतकीं अभावित होतीं कीं, त्यांची कल्पना एखाद्या प्रतिभासंपन्न मनुष्यासहि करितां आली नसती.

दिवाळीं निघण्याचा हा रोग स्पर्शजन्य असेल, किंवा सर्वच स्वदेशी पेढ्यांमधून एकच आत्मा अनुस्यूत असेल–कसेंहि असो, पण लाहोरच्या प्रमुख स्वदेशी पेढीला दिवाळखोरीच्या विजेचा धक्का बसल्याबरोबर सर्वच स्वदेशी पेढ्यांना किंबहुना सगळ्या बाजाराच्या शरीगला मुंग्या येऊन चुणचुणल्याचा भास झाला खरा! हा धक्का म्हणजे ती एक परीक्षेची वेळच होती, व त्याला बळी पडणें किंवा त्यांतून निभावणें यावरून कोण्या पेढीची शरीरप्रकृति किती सुदृढ व कोणाचें काळीज किती खंबीर याचा निकाल लागणार, हें बहुधा ठरल्यासारखेंच झालें होतें. यामुळें "या पेढीचें दिवाळें तर निघालें, आतां पुढची पाळी कोणाची!" असे तोंडाचे नसले तरी मनाचे उद्गार ठिकठिकाणीं एकसारखे निघत होते. अशा गर्दींत मुंबईच्या क्रेडिट बँकेचें दिवाळें वाजून तिच्या कारभारासंबंधानें मुंबई–हायकोर्टांत चवकशी सुरू झाली असतां, इंडियन स्पीशी बँक, विशेषतः चुनीलाल सरैय्या, यांचें नांव पुढें आलें. या कामीं चुनीलाल यांची हायकोर्टांत कसून साक्ष झाली असतांहि ते खडखडीत उत्तरें देऊन तेथून निभावले; व या साक्षींत उघडकीस आलेल्या कित्येक गोष्टींवरून लोकांचें असेंच मत झालें कीं, चुनीलाल ही कांहीं लेचींपेची असामी नव्हे–त्यांचें धाडस व त्यांचें प्रसंगावधान हीं त्यांच्या शहाणपणाच्या तोडीचींच आहेत. इकडे इतर पेढ्यांप्रमाणें स्पीशी बँकेवर ठेवीवाल्यांचा हळू हळू मारा सुरू झाला होता; तथापि, 'थोड्या अवधींत मीं ठेवीवाल्यांचे ९० लाख रुपये परत केले; एकाहि ठेवीवाल्याला मीं विन्मुख दवडलें नाहीं, किंवा तुझी ठेव पुढें चालू कर अशी त्याची याचनाहि केली नाहीं,' असें त्यांनीं कोर्टांत शपथेवर सांगितल्यामुळें ठेवीवाल्यांची भीति अर्थातच कमी झाली, व ठेवीचा ओघ बँकेकडे फिरून परतला. पण दिवाळीं निघण्याची ही सांथ येण्यापूर्वीं पुष्कळ दिवसपर्यंत मत्सररूपी श्वानविष मुंबईच्या अनेक व्यक्तींच्या पोटांत अनेक कारणांनीं व अनेक द्वारांनीं जाऊन भिनलें असल्यामुळें, सराफ्याच्या डोक्यावर काळे ढग आलेले पाहतांच तें विष वर उमळून येऊं लागलें. लाखों रुपयांचे ठेवीदार व लाखों रुपयांचे भागीदार अशांच्या मनांत स्पीशी बँकेविषयीं जी भीति उमटली नाहीं, ती यःकश्चित् ५०० रुपड्यांचे भाग घेतलेल्या अशा एकट्या एका व्यक्तीच्या मनांत उमटली, व तिनें स्पीशी बँक निकालांत काढावी असा हायकोर्टांत अर्ज दिला. या अर्जाच्या चौक-

र्शाची हकीकत ज्यांनीं वाचली असेल त्यांना स्पीशी बँकेस डगण्याचें फारसें कारण नाहीं असेंच वाटलें. चुनीलाल यांना व स्पीशी बँकेला संपत्तिमान्, समयज्ञ व मर्मज्ञ अशा व्यक्तींचा चांगलाच पाठिंबा होता. आणि दुष्ट बुद्धीनें बँकेस अपाय करण्याचा उपद्व्याप कोणीं केला, व त्याला कोणाचें अंतस्थ कितीहि सहाय्य असलें तरी स्पीशी बँक आपलें डोकें वर काढल्याशिवाय राहणार नाहीं असेंच लोकांना वाटलें. शेवटीं हा अर्ज निकालांत निघाला, बँकेची छाप लोकांवर बसली, तिचें काम पूर्ववत् चालू झालें, तिच्या चालकांच्या शहाणपणाचा व कर्तव्यदक्षतेचा विजय झाला, ही बँक यापुढें पूर्वी आपल्या हातून झाली तिच्याहून अधिक कामगिरी करून दाखवील, अपकीर्तीचा हा अपमृत्यु टळल्यामुळें तिच्या आयुष्यांत भरच पडेल, आणि सर्व गोष्टींतली गोष्ट म्हणजे ज्या थोर व उत्साहजनक अशा हेतूनें चुनीलाल यांनीं ही बँक काढली तो सफळ होऊन स्वदेशी पेढ्यांना आपल्या पायाखालीं किंचित् दिसूं लागलेला कर्तृत्वाचा मार्ग दिवसेंदिवस अधिक विस्तार पावेल व त्यांची पुढें मजल जाईल अशी सहजच आशा होती. पण काय ? या सर्व आशेचें अधिष्ठान जे चुनीलाल सरैया त्यांच्याच जीवितावर एकाएकीं आकाशांतील कुऱ्हाड पडल्यामुळें क्षणार्धांत सगळाच देखावा बदलून गेला! रंगभूमीवर पुष्कळ वेळा एका शिटीच्या आवाजानें अगर पिस्तुलाच्या बारासरशी स्वर्गाचें पाताळ व पाताळाचा स्वर्ग, पर्वताची दरी व दरीचा पर्वत अशी उलटापालट करून दाखवितात, तसाच प्रकार येथेंहि झाला. कारण केसरीच्या गेल्याच अंकांत स्पीशी बँकेवरील वादळ शांत पडून बँक पूर्ववत् चालू झाली असें चुनिलाल यांचें यशोवर्णन आम्हीं केलें काय ! व आजच्या अंकांत त्याच चुनिलालांची मृत्युवार्ता वाचकांस कळवून अखेर स्पीशी बँक मोडण्याकरतां सरकारी लिक्विडेटरची नेमणूक झाल्याची वार्ता सांगतों काय, हें आमचें आम्हांसच कळत नाहीं !

तरी पण झाली ती वार्ता सांगितलीच पाहिजे, व ती अशी कीं, गेल्या शनिवारीं वांद्रा येथें शेट चुनिलाल हे आपल्या घरीं सकाळीं ७॥ वाजतां नित्याप्रमाणें शौचमुखमार्जन करून चहा घेऊन लिहीत बसले असतां एकदम त्यांच्या काळजाची क्रिया बंद पडली व त्यांस मृत्यु आला! शेजारीं असलेल्या डॉक्टर लोकांना तावडतोब बोलाविण्यांत आलें; परंतु छातींत प्रथम कळ निघाल्यापासून अवघ्या दहा मिनिटांत त्यांचें प्राणोत्क्रमण झालें ! हा मृत्यु आकस्मिक असल्यामुळें अर्थातच पोलिसांना वर्दी देणें जरूर होतें. त्याप्रमाणें पोलिस अधिकारी

आले, त्यांनीं घरांत सर्वत्र झडती घेतली, संशयास्पद असें कांहीं घडलें कीं काय याचा पुरा तपास केला, वांद्रे येथील तीन डॉक्टर व पांच पंच बोलावून चुनिलाल यांच्या शरीराची तपासणी केली, व अखेर काळजाच्याच विकारानें मृत्यु आला असा सर्व डॉक्टरांचा व पंचांचा अभिप्राय पडल्यावर यथाविधि प्रेतसंस्कार करण्यास परवानगी देण्यांत आली. लवकरच ही बातमी मुंबई शहरांत सर्वत्र पसरली. तेव्हां बँकेचे डायरेक्टर एकत्र होऊन त्यांनीं पुढील योजनेबद्दल विचार चालविला, आणि अखेर बँकेचें काम बंद करावें व हायकोर्टाच्या अधिकाऱ्यांच्या हातीं बँक देऊन ती लिक्विडेशन मध्यें काढावी असें ठरलें ! बँकेविरुद्ध नुकत्याच झालेल्या अर्जाच्या सुनावणीच्या कामीं बँकेची स्थिति उत्तम आहे, तिला बूड नाहीं असें सांगण्यांत आलें होतें; व यानंतर बँकेचा व्यवहार जवळ जवळ एक आठवडाभर सुरळीत चाललाहि होता. असें असतां केवळ चुनीलाल हे एकाएकीं मरण पावले एवढ्याच कारणावरून बँक मोडण्याची इतर डायरेक्टरांस अवश्यकता कां भासली असावी याविषयीं तूर्त कांहींच तर्क चालवितां येणार नाहीं. रुप्याच्या सट्यांत तोटा आलेला असून डायरेक्टर लोकांना याविषयीं कांहीं बातमी नव्हती ती चुनीलाल यांच्या मृत्यूनंतर प्रथमच त्यांस मिळाली, अशी एक बातमी आहे. दुसरी अशीहि एक बातमी आहे कीं, चुनीलाल यांच्या मृत्यूच्या आदल्या दिवशीं म्हणजे शुक्रवारीं डायरेक्टर लोकांच्या सभेंत चुनीलाल यांनीं असें सांगितलें कीं, ' उद्यां सुमारें दीड लाख रुपये ठेवीदारांना परत द्यावे लागतील व ते बँकेंत शिल्लक आहेत; निदान तितके रुपये देऊन टाकण्याची तजवीज मला सहज करितां येईल; ' असें असतां त्यांच्या मृत्यूनंतर डायरेक्टरांना बँकेंत फक्त साठ हजार रुपये शिल्लक आहेत, असें कळलें. कसेंहि असलें तरी इतकी गोष्ट खरी कीं, त्याच दिवशीं दोन प्रहरीं हायकोर्टात न्या. दावर यांजपुढें डायरेक्टरमार्फत बँकेचें काम तूर्त बंद करण्याविषयीं अर्ज करण्यांत आला, व ॲडव्होकेट-जनरल मि. स्ट्रँगमन यांनीं कोर्टास असें कळविलें कीं, चुनीलाल यांनीं आत्महत्या केली असावी असें डायरेक्टर यांस वाटतें, व बँकेचा व्यवहार गुंडाळण्याकरितां तात्पुरता ' लिक्विडेटर ' नेमण्यांत यावा. वांद्रे येथील डॉक्टर, पंच व पोलिस या सर्वांच्या मतें शेट चुनीलाल यांना काळजाच्या विकारानें मृत्यु आला असें ठरलें असतां डायरेक्टर लोकांना त्यांनीं आत्महत्या केल्याचा संशय कां यावा हें कळत नाहीं. मुंबईच्या अनेक वर्तमानपत्रांच्या बातमीदारांनीं आत्महत्येची बातमी ऐकल्याचें लिहिलेलें नाहीं; व

मि. स्ट्रँगमन यांनींहि डायरेक्टर लोकांच्या संशयाचा उल्लेख करून पुढें असें सांगितलें कीं, चुनीलाल यांचे आज दोन महिने अतिशय काळजींत गेल्यामुळें त्यांचा काळजाचा विकारच घातक झाला असावा. आणि सर्व गोष्टींचा विचार करतां आम्हांलाहि तसेंच वाटतें.

पण मनुष्य एकदां मेल्यावर त्याच्या मृत्यूच्या कारणांची मीमांसा करीत बसण्यांत तरी अर्थ काय ? मुख्य मुद्दा इतकाच कीं, शेट चुनीलाल हे स्पीशी बँकेचे आधारस्तंभ होते; त्यांचा लोकांवर व लोकांचा त्यांचेवर विशेष भरवंसा होता; त्यांचा एकट्याचा बँकेला जो नेट मिळत होता तो इतर सर्व डायरेक्टर मिळूनहि त्यांना तिला देतां आला नाहीं; व अखेर जी गोष्ट घडून येऊं नये म्हणून चुनीलाल यांनीं आपल्या हयातींत भगीरथ प्रयत्न करून त्यांत यश मिळविलें तीच गोष्ट त्यांच्या मृत्यूनंतर अवघ्या पांच तासांत व केवळ त्यांच्या मृत्यूमुळें घडून आली ! अर्थात् या योगाला भवितव्यताच प्रमाण याहून दुसरें कांहीं म्हणतां येत नाहीं. पूर्वीच्या अर्जाची सुनावणी चालली असतां तात्पुरत्या ‘ लिक्विडेटर ’ चें काम पत्करण्यास आपण तयार नाहीं, असें मि. सेटना यांनीं न्या. दावर यांस कळविलें होतें; पण त्यांचाहि योग असाच कीं, जें फायद्याचें काम नको म्हणून त्यांनीं पूर्वी कळविलें होतें तेंच मारमारून त्यांच्या बोकांडीं येऊन बसलें ! तात्पुरत्या लिक्विडेटरच्या नेमणुकीबरोबर कोर्टाकडून सरकारी हिशेबनीसही नेमण्यांत आले, व त्यांना कालच्या शनिवारपासून पंधरा दिवसांच्या आंत बँकेच्या सर्व कारभारासंबंधानें रिपोर्ट करण्याचा हुकूम झाला असून ॲडव्होकेट–जनरलमार्फत बँकेचे डायरेक्टर यांनीं केलेल्या अर्जाचा निकाल–निदान सुनावणीस तरी प्रारंभ–ता. १६ डिसेंबरपासून होईल. या एका बाबतींत मात्र पूर्वीच्या अपेक्षेप्रमाणेंच गोष्ट घडली. कारण पूर्वीचा अर्ज काढून टाकला तेव्हां झालें तरी चुनिलाल व बँकेचे इतर डायरेक्टर यांनीं बँकेचे हिशेब वाटेल त्याजकडून तपासण्यांत यावेत अशीच इच्छा प्रदर्शित केली होती. तात्पर्य, हिशेब–तपासणी झाली तरी आतां बहुधा बँक मोडल्याशिवाय राहील असें दिसत नाहीं. मग ठेवीदारांचें नुकसान फार होवो अगर थोडें होवो. तथापि आम्हांस असा भरवंसा वाटतो कीं, बँक मोडण्यांत आली तरी हिच्या ठेवीवाल्यांचें इतर कित्येक बँकांतील ठेवीदारांइतकें नुकसान सहसा होऊं नये. पण ठेवीवाल्यांचें नुकसान होवो वा न होवो; मुंबई इलाख्यांतील आज सर्वांहून पहिल्या प्रतीची स्वदेशी बँक मोडणार यांत शंका नाहीं. व याच गोष्टीविषयीं कोणासहि अधिक वाईट वाटेल यांतहि शंका नाहीं !

शेट चुनीलाल यांच्या चरित्राची ओळख केसरीच्या वाचकांस यापूर्वीच झाले-ली आहे. कारण फिनॅन्स कमिशनपुढें साक्ष देण्याकरितां दोन महिन्यांपूर्वी ते विलायतेस जाणार होते; व केसरीच्या एका हितचिंतकानें परिश्रमपूर्वक लिहिलेलें त्यांचें चरित्र आम्हीं त्या महत्त्वाच्या प्रसंगास उद्देशून मुद्दाम प्रसिद्ध केलें होतें. त्या विस्तृत लेखांत शेट चुनीलाल यांच्या कर्तृत्वाचें जें वर्णन आलें आहे तें सर्व यथार्थ असून त्यावरून त्यांच्या मृत्यूमुळें समाजाची केवढी हानि झाली हें सहज दिसून येणार आहे. चुनीलाल यांची गणना कोणासहि असामान्य कोटींतच करावी लागणार. कारण त्यांच्या मूळ शिक्षणाच्या दिशेनें पाहतां आज त्यांनीं भुलेश्वरास किंवा फारच झालें तर कोटांत दवाखाना घालून विलायती औषधें खपवीत बसावें! युनिव्हर्सिटीच्या वैद्यकपरीक्षेंत त्यांचा पहिल्या क्लासांत पहिला नंबर आला होता; आणि गोड बोलणाऱ्या पण कर्तृत्वहीन अशा दाक्षिणी डॉक्टरांचाहि बोलबाला जर गुजराथी समाजांत होत असल्याचें दिसून येतें, तर गोड भाषेच्या जोडीला खरी बुद्धिमत्ता असलेल्या या खुद्द गुजराथी डॉक्टरला महिन्याचे कांठीं हजार पंधराशें रु. वैद्यकीच्या धंद्यांत मिळण्यास मुळींच पंचाईत पडली नसती. पण शिक्षणापेक्षां स्वभाव हाच अधिक बलवत्तर असतो. त्या स्वभावाच्या जोरामुळेंच शेट चुनी-लाल यांनीं मुंबईत बँकेंत नोकरी धरली, व बँकेंतील मुख्य देशी अधिकाऱ्याच्या जागेपर्यंत आपली बढती करून घेतली. पण केवळ महिना हजार पंधराशें रुपये मिळविणें एवढीच त्यांची महत्त्वाकांक्षा असती तर जसे ते डॉक्टरी सोडून मुंबई बँकेंत शिरले नसते तसेंच बँकेंत शिरल्यावरहि समाधान मानून तेथेंच राहिले असते, तेथून बाहेर पडले नसते. पण व्यापार व पैशाची उलाढाल हें उत्कर्षेच्छु राष्ट्राचें एक प्रमुख अंग असल्यामुळें तें स्वकीयांच्या हातीं यावें, आणि या बाबतींत नेहमीं दुसऱ्याच्या ओंजळीनें पाणी पिण्यावर आपण समाधान मानून स्वस्थ बसूं नये अशी तळमळ त्यांच्या मनास लागलेली असल्यामुळें, त्यांनीं मुंबई बँक सोडून प्रथम इंडिया बँक काढली, व तेथेंहि आपल्या कर्तृत्वाला पूर्ण मुभा मिळणार नाहीं असें पाहतांच स्पीसी ब्यांक उभारली. या नव्या बँकेला थोडयाच वेळांत कित-पत यश आलें हें तिच्या प्रचंड व्यवहारावरून प्रसिद्धच आहे. पण मनुष्याचें कर्तृत्व कित्येक वेळां त्याच्या शत्रूच्या महत्त्वावरून अजमावतां येतें, व या दृष्टीनें पाहतांहि शेट चुनीलाल यांच्या कर्तबगारीची साक्ष पटण्यास नड नाहीं.

शेट चुनीलाल यांचें महत्त्व आम्हांस वाटतें तें मुख्यतः त्यांच्या अंगच्या हुषारी-

पेक्षां त्यांनीं हिंदी लोकांना बँका काढण्याविषयीं जें नवीन उदाहरण घालून दिलें, नवीन धोरण दाखवून दिलें, त्यामुळेंच होय. त्यांचे निंदक कांहींहि म्हणोत, पण त्यांच्या उद्योगापासून व्यक्तिशः त्यांना जितका फायदा झाला त्यापेक्षां त्यांच्या समाजाला अधिक फायदा झाला यांत शंका नाहीं. व कोणत्याहि मनुष्याची किंमत करितांना याच विचारसरणीनें केली पाहिजे. द्रव्यांत जो रात्रंदिवस खेळणारा त्याला स्वतः श्रीमंत होण्याची आकांक्षा असली, किंवा एखाद दुसरा व्यापारी खेळ खेळावासा वाटला, तर त्यांत कांहीं विशेष नाहीं. नित्य पैशानें हात काळे होत असल्यास तोच हात एखादे वेळीं नकळत तोंडाला पुसला जाऊन गालबोट लागल्यास व्यापारी पेशाच्या मनुष्याला तें मोठेंसें लांछन आहे असें कोणीहि व्यवहारज्ञ म्हणणार नाहीं. फार काय, पण चुनीलाल हे द्रव्यलोभ-पराङ्मुख असे एखादे साधु होते, किंवा पैशाच्या व्यावहारानें हातास यत्किंचित् काळें लागलें तर तें अग्निहोत्राच्या राखेनें धुवून टाकल्याशिवाय त्यांना चैन पडत नसे असें कांहीं म्हणण्यास आम्ही तयार नाहीं. पण पैसा मिळविण्यामिळविण्यांतहि फेर आहे. शांतिपाठाचें अभिश्रवण करविणारा दक्षिणा घेतो व अंत्येष्टीचे मंत्र म्हणणाराहि दक्षिणाच घेतो! हाच दाखला घेऊन आम्ही असें म्हणतों कीं, शेट चुनीलाल यांनीं अगदीं लखलखीत सट्टेबाजी केली असेंहि घेऊन चाललें तरी ती देशी व्यापाऱ्यांना उदाहरण घालून देण्यासारखी होती. सट्टेबाजी तीच, पण शर्यतीच्या मैदानावर ‘ माझ्या घोड्याच्या कानाचा केंस पुढें ? कीं तुझ्या घोड्याच्या कानाचा केंस पुढें ? ’ या चढाओढींत लाखों रुपये गारद करणारापेक्षां शेट चुनीलाल यांनीं विलायतच्या मॉन्टेग कंपनीला हात दाखवून हिंदुस्थानांतहि एखादा भक्कम गडी व्यापाराच्या दोऱ्या आपल्या हातीं खेंचून धरूं शकतो, व युरोपियन व्यापाऱ्यांकडूनहि ‘ सिल्व्हर किंग ’ अशी पदवी मिळवूं शकतो हें सिद्ध करण्याकरितां जर थोडीबहुत बूड आली असली तरी ती क्षम्यच होय. तात्पर्य, चुनीलाल यांचे गुण किंवा त्यांचे अवगुण या दोहोंनाहि वैयक्तिकापेक्षां सामाजिक स्वरूपच अधिक होतें, व यामुळें स्वदेशी पेढ्यांच्या उत्कर्षाविषयींच्या महत्त्वाकांक्षारूप क्षितिजावर असा कर्तृत्ववान् पुरुष नुकता कोठें चमकूं लागतो न लागतो तोंच त्याला ग्रहण—आणि तेंहि कायमचेंच ग्रहण—लागावें व फिरून तो दृष्टीस पडण्याची आशाहि उरूं नये ही दुर्दैवाची केवळ परम सीमाच होय !

स्पीसी बँकेचा उत्पादक नाहींसा झाला, तो आतां कायमचाच नाहींसा झाला;

पुनः तो परत येऊं शकत नाहीं. पण बँकरूपी त्याचें अपत्य अद्यापि नाकाला सूत धरून कां होईना पण जिवंत आहे. पितृव्यभूत इतर डायरेक्टरांनीं चुनीलाल यांचें प्रेत पाहिल्याशिवायहि कोर्टांत कारण नसतां व डॉक्टर लोकांच्या अभिप्राया-विरुद्ध आत्मघाताचा आरोप करण्यास मागें घेतलें नाहीं. त्यांनीं तें प्रेत घरांतून बाहेर पडण्यापूर्वींच बँक मोडण्याचा अर्ज कोर्टाकडे द्यावा यांत आश्चर्य नाहीं. तथापि, आम्हांस अजूनहि आशा वाटते कीं, हिशेब–तपासणींत थोडाबहुत तोटा निघाला तरी बँकेच्या ताब्यांतील मोतीं, रुपें वगैरेच्या सहाय्यानें बँक चालू राहिली असतां तो पुढें मागें भरून निघण्याचा संभव नाहींच असें नाहीं. प्रस्तुतच्या डायरेक्टरांची निराशा झाली हें तर दिसतच आहे; पण हिशेब तपासणींत जर तोट्याचें स्वरूप भासतें इतकें भयंकर न आढळलें तर न्यायमूर्तींनीं आपल्या अधिकारांत भागीदारांची सभा बोलावून त्यांपैकीं कोणाचीहि इच्छा ती चालविण्याची नाहीं असें असेल तरच बँक कायमची मोडण्याचा हुकूम करावा. कारण स्पीशी बँक मोडणें हें दुर्भाग्य तर खरेंच; पण त्याहूनहि एकंदर स्वदेशीच्या कार्याला शरमेचें काजळ फांसणारी ती गोष्ट होय यांत शंका नाहीं.

---

## ४० दिवाळखोरीची खोटी व खरी मीमांसा.

(तारीख २० जानेवारी सन १९१४.)

गेल्या तीन चार महिन्यांत अनेक स्वदेशी बँकांचीं दिवाळीं निघाल्यामुळें पत आणि विश्वास हीं दोन्हीं धडाधड ढांसळलीं आणि हजारों लोक त्याखालीं सांपडून त्यांतील कित्येक तर सर्वस्वीं चेंगरून गेले यांत शंका नाहीं. एका मोठ्या स्वदेशी धंद्याची बेअब्रू झाली; लाखों रुपयांचें नुकसान होऊन धनिकवर्गाची कंबर मोडली; आणि बँकांच्या जिवावर चालणारे अनेक किरकोळ धंदे ठार बुडून, प्रामाणिकपणानें पोटास मिळविणाऱ्या उद्योगी लोकांच्या ताटांतली भाकरी गेली. हा सर्व प्रकार अत्यंत दुःखद असून ज्यांच्यामुळें तो घडून आला त्यांच्याविषयीं मनांत पराकाष्ठेचा राग व चीड उत्पन्न झालीच पाहिजे यांत शंका नाहीं. आणि आज तीन चार महिने कोठेंहि जा, चार चौघांच्या तोंडीं हाच प्रवाद ऐकूं येतो. शिवाय, हें लाखों रुपयांचें झालेलें नुकसान भरून येण्याची फारशी आशाहि नाहीं. बँकांचें दिवाळें निघणें आणि तेलातुपाचें भांडें रस्त्यावर पडणें हीं दोन्हीं सारखींच; तीं

परत भरूं म्हटलें तर भरणें शक्य नाहीं. तथापि, भांड्यांत उरलेल्याची सावरासावर व रस्त्यावर सांडलेल्याची सावरासावर जितकी करितां येईल तितकी करण्याचा प्रयत्न सुरू असून, अपराधी लोकांकडून जितकें नुकसान भरून मिळणें शक्य असेल तितकें कोर्टाकडून मिळेल असा भरंवसा बाळगण्यास हरकत नाहीं. या सावरासावरीनंतर, किंवा आधींहि, न्यायकोर्टाकडून या अपराधी लोकांना इतर रीतीनें जें शासन होणें वाजवी असेल तेंहि बहुधा होईलच. याच्यानंतर कदाचित् एखादें कमिशन बसून झालेल्या सर्व प्रकारांची चौकशी होईल; आणि वाईटांतून चांगलें काढावयाचें म्हणजे या कमिशनच्या सूचना, किंवा त्यापूर्वींच अनेक व्यापारी संघ व संस्था यांनीं सरकाराकडे पाठविलेल्या सूचना, यांचा फायदा घेऊन बँकांच्या कामकाजासंबंधानें सरकार कायद्यांत जरूर ती दुरुस्ती करील; आणि जुन्या पिढीच्या कडु अनुभवाचें पौष्टिक खत मुळांतच पडलेल्या स्वदेशी बँकांच्या वृक्षाला येणारें गोड फळ पुढील पिढीस कदाचित् खावयालाहि मिळेल.

देशी बँकांच्या दिवाळखोरीचा हा कदाचित् अगदींच सामान्य धिमा किंवा उत्तान असा विचार झाला असें कित्येकांस वाटेल. कारण गाडी चालू आहे तोंपर्यंत खुशाल घोरत झोंप घ्यावयाची, आणि गाडीला अपघात झाला म्हणजे खडबडून जागें झाल्याबरोबर ड्रायव्हर व गार्ड यांजवर दांतओंठ खाऊन त्यांना शिव्याशापांची लाखोली वहावयाची असा सार्वजनिक बाबतींत पुष्कळांचा स्वभाव असतो. परंतु ड्रायव्हर व गार्ड यांजवर दोषारोप कां होईना—आपल्यावर यत्किंचितहि दोष न घेतां सर्व दोष दुसऱ्याच्या माथ्यावर लादण्याच्या बुद्धीनें कां होईना—पण शासनरूप प्रतिकाराची निकरानें कड पोंचविण्याइतका करारीपणा त्यांचे अंगीं असत नाहीं. दुसरे कित्येक अशुभवादी तत्त्वज्ञानी असतात, तेहि अशा वेळीं पुढें येतात, व नाकास बोट लावून 'पहा, असें होणार हें मीं भविष्य केलेंच होतें' किंवा 'तसें केलें म्हणजे असेंच व्हावयाचें' असे उद्गार, एखाद्या भविष्यवाद्याचा आव घालून, काढीत सुटतात! कित्येकांची मजल याही पुढें जाते. त्यांना समाजविषयक व्यापक नैतिक सिद्धांत हरएक प्रसंगीं मांडण्याची इच्छा अनिवार असते. लागू काय व गैरलागू काय, किंवा कार्यकारणभाव कशाशीं खातात याची त्यांना कल्पना नसल्यामुळें, कोणाच्या तरी चुलीवर कोणाची तरी भाकरी भाजण्यास ते तयार असतात! या सर्वांना आपण मोठे अलौकिक विचार जगापुढें मांडीत आहों असेंच बहुधा वाटत असावें; पण ते विचार खरोखरच

'अलौकिक' म्हणजे जगाच्या व्यवहारास बिलकूल उपयोगी न पडणारे असे असतात. झालेली चूक सुधारण्यास किंवा मार्गे रेळलेलें चाक पुढें ढकलून कोणत्याहि उद्योगाचें थांबलेलें गाडें फिरून चालूं करण्यास अशा विचारांनीं मदत होत नाहीं; मात्र खेदकारक विचारांनीं ताणलेल्या व शिणलेल्या मनाला हंसूं येऊन थोडी करमणूक होते इतकाच त्यांचा उपयोग निःसंशय खरा! पण असले अलौकिक विचार कोणीं जमेंत धरण्याचें कारण नाहीं. 'कित्येक बँकांचीं दिवाळीं निघालीं यावरून स्वदेशी ठार बुडाली; आजपर्यंत स्वदेशीच्या धुळपाटीवर जितकें कांहीं म्हणून लिहिलें गेलें तितकें सर्व एका हातासरशीं पुसलें गेल्यामुळें आणखी पन्नास वर्षेपर्यंत बँक म्हणून निघण्याचें नांव नको, किंवा जोंपर्यंत हिंदु समाजांत जातिभेद राहील अथवा स्त्रिया तोंडापुढचा पडदा फाडून टाकून पुरुषांच्या बरोबरीनें चवाठ्यावर येऊं लागणार नाहींत तोंपर्यंत स्वदेशीचें नांवहि घेऊं नका' असले उद्गार गेल्या दोनतीन महिन्यांत आम्हीं खूप ऐकिले तथापि असले अलौकिक उद्गार काढण्याचें श्रेय त्यांची आवड असणाऱ्या लोकांवरच सोंपवून, प्रस्तुत प्रकरणीं लौकिकदृष्टीनेंच थोडासा विचार करण्याचें आम्हीं योजलें आहे.

आम्हांस तर असें वाटतें कीं, अनेक स्वदेशी बँका बुडून पुष्कळ लोकांचें पुष्कळ प्रकारें नुकसान झालें आहे हें जरी खरें, तरी फिरून स्वदेशी बँक निघण्यास शेंपन्नास वर्षांचा जो वायदा कित्येक भविष्यवादी देतात तो खोटा; आम्हांस तो पटत नाहीं. शेंपन्नास वर्षे थांबावयास न लागतां त्याच्या बऱ्याच आधीं फिरून स्वदेशी बँका निघतील, व ज्या कित्येक हल्लींच्या पुरांत न बुडतां तगून राहिल्या आहेत त्या सुधारून सुदृढ होतील असा आम्हांस भरंवसा वाटतो. कारण एक तर हल्लीं चोहोंकडे जरी सर्व–नाशामुळें वैराग्य पसरलेलें दिसतें तरी लवकरच तें स्मशानवैराग्य ठरेल. मृत्यूमुळें घरचें किंवा शेजारचें जेवणखाण थांबल तरी, तें प्रेताची व्यवस्था लागेपर्यंतच थांबतें! पुढेंमागें उंदीर घुशी बिळें पाडतील या भीतीनें कोणीहि नवीन घर बांधावयाचा थांबत नाहीं इतकेंच नव्हे, तर उंदीरघुशींनीं धडधडीत बिळें पाडलेलीं दिसत आहेत अशीं जुनींहि घरें विकत घेऊन लोक त्यांत जाऊन खुशाल रहातात असेंच आपण पहात नाहीं काय? बँकेचा धंदा काय किंवा इतर धंदा काय, त्याची विद्या पोंहण्याच्या विद्येसारखी आहे. मनुष्य ती कधीं विसरूं शकत नाहीं; आणि चुकून एखादी गटंकळी बसलीच तर पूर्वीच्या ज्ञानांत धैर्याची भरच पडते! दुसरें असें कीं, आजच्या ठेवीदार लोकांच्या ठेवी बडाल्या खऱ्या; पण त्यांचेबरोबर कांहीं समाज

लयाला गेला नाहीं. त्यांचेच धंदे करून, त्यांच्यासारखा पैसा सांठवून, त्यांच्या जागीं उद्यां येणाऱ्या पुढच्या पिढीच्या द्रव्यसंचयाची वाट काय होणार ? यापूर्वी काय झालें असेल तें असेल; पण यापुढें तरी लोक आपल्या शिलकेच्या पुरचुंड्या गाडग्या मडक्यांत घालून वळचणींत, भिंतींत किंवा जमिनींत गाडून ठेवतील असें आम्हांस तरी वाटत नाहीं. पण पुढची पिढी कशाला ? हल्लीं संकटांत सांपडलेल्या ठेवीदारांचे पैसे रुपयांत आठ–दहा आणे किंवा चार दोन आणे काय यावयाचे ते 'लिक्विडेटर' कडून येऊं द्या; कीं तेच उद्यां त्याच ठेवीदारांच्या डोक्याशीं भुतें जशीं स्मशानांत 'भूक भूक' म्हणून ओरडतात तसें 'व्याज व्याज' म्हणून पेटींत ओरडूं लागतील. आपल्या हातानें कोठें तरी नेऊन फिरून गुंतवीपर्यंत आंथरुणांतील पिसवांप्रमाणें ते त्यांना चट्चट् चावतील व झोंप घेऊं देणार नाहींत! ठोकर खाल्लेले हे ठेवीदार फार तर यापुढें बँकेची निवड करितांना पूर्वीपेक्षां जरा अधिक खबरदारी घेतील व तशी घेतली तर पाहिजे ! पण आज कांहीं स्वदेशी बँका बुडाल्या म्हणून यापुढें मुळीं स्वदेशी बँकाच निघणार नाहींत, व निघाल्या तर त्या सर्व अशाच बुडतील ही गोष्ट मुळीं संभवनीय नाहीं. अर्थात् जर कांहीं विचार म्हणून करावयाचा असेल तर तो इतकाच कीं, जुन्या बँकांतील दोष नव्या बँकेंतून कसे निघून जातील ?

यापुढें बँकांत ठेवण्याइतकी कोणाजवळ शिल्लकच न राहली तर गोष्ट वेगळी; पण जर शिल्लक राहील तर बँकांचे दरवाजे धुंडाळीत जाईल. मग हिंदी समाजांतील स्त्रिया पडद्याच्या आंत बसोत, किंवा मुसलमानी स्त्रिया तोंडावर बुरखा घेवोत, अथवा हिंदु समाजांत जेथें आज शंभर जाती आहेत, तेथें एकशेंएक होवोत ! बँका आणि गोषा यांचा सर नारायणराव चंदावरकर यांनीं मनांतून कसा काय संबंध लावला असेल तो असो ! 'बँका आणि 'बायका' या दोन शब्दांच्या ध्वनिसादृश्याचा परिणाम तर त्यांच्या स्फुरणशील प्रतिभेवर झाला नसेल ? किंवा कौन्टरच्या कमानीपलीकडून अर्धे दृश्य व अर्धे अदृश्य असे बँकांचे कामगार, बाहेर भर उजेडांत उभे असणाऱ्या परक्या अनोळखी लोकांशीं विशेष न बोलतां चालतां फक्त जरूरीचा तेवढा व्यवहार करितात यावरून, गोषांत राहून डोळ्यापुरत्या राखलेल्या झरुक्यांतून परपुरुषांकडे पाहणाऱ्या स्त्रियांची कल्पना सर नारायणराव यांस आली असल्यास नकळे ! किंवा एखादे वेळीं ते बँकेंत गेले असतां जिकडे तिकडे होणाऱ्या नाण्याच्या ध्वनीवरून कांकणांच्या ध्वनीची त्यांना आठवण झाली असावी व मानसशास्त्राच्या नियमाप्रमाणें केवळ यदृच्छासाहचर्यानें या दोन विलग विसंगत

कल्पनाची संगति त्यांच्या मनांत दृढ होऊन बसलेली असावी असाहि संभव आहे. यान्याहि पलीकडे जाऊन, अगदीं निर्वाणीची मीमांसा म्हणून, आम्ही असेंहि समजूं कीं, बायका जशा दिवाळींत खर्च करून बुडवितात तशाच बँकाहि दिवाळीं काढून बुडवितात ! असला दुपदरी श्लेषहि न जाणों कदाचित् सर चंदावरकर यांच्या तर्करुक्ष डोक्यांत सेंट पॉल व न्यूमन अशांच्या चौक्या चुकवून शिरला असावा ! पण कितीहि दांडगी कल्पना केली किंवा प्रतिभेची वावडी उंच आकाशांत उडविली, तरी हिंदी स्त्रियांचा गोषा हें कारण आणि बँकांचीं दिवाळीं हें कार्य यांची उपपत्ति आम्हांस लागतच नाहीं. परवां क्रेडिट बँकेची कोर्टांत चौकशी झाली तेव्हां न्यायमूर्ति व ॲडव्होकेट–जनरल यांनीं बँकेचे सेक्रेटरी, मॅनेजर, डायरेक्टर, हिशेबनीस वगैरेंच्या कृत्यांवरचा बुरखा अगदीं बिनमुरवतखोरपणानें ओढून काढला. पण तेव्हांहि स्त्रियांची पडदपोशी या दिवाळखोरीच्या एकाद्या कृत्यास कारणभूत झाली असें कोठेंच आढळून आलें नाहीं.

तीच गोष्ट जातिभेदासंबंधाची. दुर्दैव म्हणा कीं सुदैव म्हणा, जातिवैमनस्यामुळें यांपैकीं एखादी बँक बुडाली असें मुळींच म्हणतां येणार नाहीं. उलट बँकांचें जें कांहीं बरें वाईट काम त्यांत हिंदुस्थानांतील सर्व जातींचा हात, कोणास न कळून, कोणाचा लबाडीनें तर कोणाचा विश्वासानें व भोळेपणानें अर्थात्–अशा अकल्पित मिलाफानें–गुंतलेला आढळून येईल. क्रेडिट बँकेचें उदाहरण घेतलें तर असें दिसून येईल कीं, मॅनेजर मुसलमान, डायरेक्टरबोर्डाचे चेअरमन ब्राह्मण, ऑडिटर पार्शी आणि अकाउन्टंट ख्रिस्ती अशी तेथें पंचमेळ खिचडी होती. पण या पांच जाति तेथें भांडल्या किंवा परस्पर मत्सर, स्पर्धा, हेवा–देवा त्यांनीं दाखविला म्हणून बँक बुडाली असें सर नारायणराव यांनाहि म्हणतां येणार नाहीं. बरें, याच्या उलट बँकेंतील सर्व लोक एकाच जातीचे असतील तर बँक बुडण्याचा संभव नाहीं असें म्हणावें तर बॉंबे बँकिंग कंपनीमध्यें सर्व ब्राह्मणच होते. तेथें औषधालाहि कोणी परका नव्हता ! तात्पर्य, सर नारायणराव यांची जातिभेदविषयक उपपत्ति निखालस टाकाऊ ठरते. तरी त्यांतल्या त्यांत दैवाची मेहरबानगी ही कीं, इतर कोणतीहि बँक न बुडतां फक्त बॉम्बे बँकिंग कंपनीच बुडती तर दिवाळखोरीच्या सामाजिक उपपत्तीचें त्यांचें चक्र कदाचित् आणखी एखाद्या निराळ्या दिशेनेंच फिरावयास लागलें असतें ! पण ईश्वराला काळजी म्हणून त्यानें या दिवाळखोरींत बहुतेक सर्व जाति ओढल्या; कोणती फारशी वगळली नाहीं. पंजाबी, गुजराथी, ब्राह्मण,

मुसलमान व पार्शी सर्वच जाति या बाबतींत एकाच नावेंत बसलेल्या असल्यामुळें ती बुडविण्याचा कोणी प्रयत्न करीत नाहीं. नाहीं तर एका विशिष्ट जातीवर शेलक्या अपशब्दांनीं आग पाखडण्यास तिच्या शत्रूंनीं कधींहि कमी केलें नसतें. पण सर नारायणराव यांनीं या बाबतींत विशेष खोल विचारच केलेला नाहीं ! सामाजिक परिषदेच्या प्लॅटफॉर्मवरून बोलावयाचें म्हणून त्यांनीं बँका बुडण्याची कांहीं तरी एक सामाजिक उपपत्ति रचून सांगितली झालें ! मग ती जुळो वा न जुळो. पण वास्तविक सर नारायणरावांसारख्या बहुश्रुत विद्वानास हें कळावयास पाहिजे होतें कीं, फाजील द्रव्यतृष्णा, फसवेगिरी, दिवाळखोरी हे मनुष्यस्वभावाचेच रोग असून ते बहुतेक सर्व देशांत एकाच स्वरूपांत दृष्टीस पडतात. त्यांचीहि एक प्रकारची सांथ असते; व युगांच्या उपपत्तींप्रमाणें—पण चिमुकल्या प्रमाणावर ही सांथ प्रत्येक देशांत बहुधा नियमित कालांतरानें समाजास बाधा करिते. फसविणार आणि फसणार, धूर्त व भोळसर अशा लोकांच्या जोड्या सर्वत्र असतातच आणि—म्हणतांना थोडेसें वाईट लागेल खरें पण—जगांतील पुष्कळशी द्रव्याची उलथापालथ या दोन प्रकारच्या लोकांमुळेंच घडून येत असते ! इतर देशांविषयीं आम्हांस फारशी माहिती नाहीं. पण या बाबतींत खुद्द इंग्लंडांत घडून आलेल्या हकीकती इंग्रज लोकांनीं लिहिलेल्या पुस्तकांच्या आधारानेंच आम्हांस पुष्कळशा सांगतां येतील. त्या सांगण्यांत आम्हाला भूषण किंवा दुसऱ्याला दूषण देण्याचाहि हेतु नाहीं. पण लौकिक संकटाच्या काळीं लौकिक उपपत्तिच लावणें बरोबर, अद्भुत किंवा अलौकिक उपपत्तीच्या मार्गे लागून आडरानांत शिरण्याचें कारण नाहीं इतकाच या हकीकतींचा उल्लेख करण्यांत आमचा उद्देश आहे. तथापि, हा प्रास्ताविक लेख लांबल्यामुळें आम्हांस ज्या हकीकती सांगावयाच्या त्या व त्यांवरून निघणारीं अनुमानें यांचा पुढील एक दोन लेखांत थोडक्यांत विचार करूं.

---

## ४१ विलायती दिवाळखोरीचे मासले.

( तारीख ३ फेब्रुआरी सन १९१४. )

दुसऱ्याचे अवगुण काढल्यानें आपल्या अवगुणांचें समर्थन होत नाहीं हें सर्वस्वीं खरें; तथापि आपले अवगुण व दुसऱ्याचे अवगुण या दोहोंचेंहि जर एकच कारण

असेल, आणि दुसऱ्याच्या अवगुणांचें उदाहरण भरीस घेतल्यानें एकंदरीनें सोपपत्तिक अवगुणमीमांसेला मदत होत असेल तर तें घेण्यास हरकत नाहीं. केवळ हीच सत्यशोधनाची दृष्टि मनांत ठेवून हिंदी लोकांखेरीज इतर लोकांच्या हातून बँकांची व कंपन्यांची बुडवणूक झाल्याचीं कांहीं उदाहरणें आम्ही आज देणार आहों; व तीं दिलीं म्हणून कोणीं आपला गैरसमज करून घेण्याचें कारण नाहीं.

अर्बथनॉट, वॉटसन, बर्मा वगैरे युरोपियनांनीं चालविलेल्या बँका बुडाल्याचीं उदाहरणें अगदीं ताजीं असून लोकांच्या माहितींतलीं आहेत; म्हणून तीं आम्ही देत बसत नाहीं. जीं उदाहरणें फारशीं माहीत नाहींत अशींच देतों. इंग्रजी राज्य सुरू झाल्यावर हिंदुस्थानांत युरोपियन लोकांनीं ज्या बँका काढल्या, त्यांपैकीं आजवर बऱ्याच बँका अव्यवस्थित रीतीनें चालविल्या जाऊन बुडाल्या. या बाबतींत मि. कुक या नांवाच्या एका ग्रंथकर्त्यानें ‘ बँकिंग इन इंडिया ’ या नांवाच्या पुस्तकांत बरीच उपयुक्त माहिती दिली आहे. तो म्हणतो कीं, १८१३ सालीं कायदा पास होऊन युरोपियन लोकांना हिंदुस्थानांत वसाहत करून राहण्याविषयींचा प्रतिबंध कमी झाल्यानंतर पुष्कळ युरोपियन व्यापाऱ्यांनीं इकडे बँका काढण्यांत सुरुवात केली. पण पुढें १८२९ ते ३२ या सालांत अलेक्झांडर कंपनी, कॉलिन कंपनी, फर्ग्युसन कंपनी, मॅकिन्टॉश कंपनी, पामर कंपनी, क्रूटेनडेन कंपनी वगैरे अनेक बँका एकट्या कलकत्त्यांत बुडाल्या. अलेक्झांडर कंपनी ही सन १७७० सालींच स्थापन झाली होती; व तिला आपल्या नांवाच्या नोटा काढण्याचीही परवानगी असे. १८४० सालीं ‘ युनिअन ’ नांवाची कलकत्त्यास आणखी एक मोठी बँक बुडाली. या बँकेंतील मि. सिन या नांवाच्या अकौन्टन्टनें हरतऱ्हेच्या लबाड्या करून चार वर्षांत ६४ हजार रुपये गिळंकृत केले ! बँकेच्या पैशांतून एका युरोपियन कंपनीला २४ लाख व दुसऱ्या एका युरोपियन कंपनीला १६ लाख अशा रकमा कर्जाऊ देऊन त्यांतून बँकेच्या डायरेक्टरांनीं पैसे खाल्ले होते ! मि. कुक लिहितो:–‘ No Bank has probably ever failed under circumstances so discreditable and so humiliating. ’ १८४९ सालीं ‘ बनारस बँक ’ कर्नल प्यू नांवाच्या गृहस्थाच्या हातून बुडाली. हिच्या कित्येक डायरेक्टर व शेअरहोल्डर लोकांनीं बँकेकडूनच कर्ज काढून आपले शेअर भरले होते ! बँकेचे बहुतेक डायरेक्टर लष्करी खात्यांतले होते; व १८५० सालीं कॅप्टन फेगन व कॅप्टन बटलर यांच्यावर कोर्टमार्शल होऊन त्यांना सरकारी नोकरींतून काढून टाकण्यांत आलें.

मुंबई इलाख्यांतील जुन्या मुंबई बँकेचें उदाहरण प्रसिद्धच आहे. ही बँक निमसरकारी होती. तिच्यांत नऊ डायरेक्टरांपैकीं तीन डायरेक्टर नेहमीं सरकारानें नेमावे अशी व्यवस्था होती; व एकदां नेमलेले डायरेक्टर वाटेल तेव्हां काढून त्यांचे जागीं दुसरे डायरेक्टर नेमण्याचा अधिकारहि सरकारास होता. या बँकेच्या भांडवलाचे तीनशें भाग मुंबईसरकारानें खरेदी केलेले होते. बँकेसंबंधीं हवी ती माहिती व हवे ते कागदपत्र वाटेल तेव्हां मागविण्याचा अधिकार सरकारास होता. बँकेचे ताळेबंद वर्षांतून दोन वेळ सरकाराकडे पाठवावे लागत. असें असतांहि सट्टेबाजी करणाऱ्या कुळांना पैसे दिल्यानें बँक बुडाली. एवढेंच नव्हे तर बँकेचे युरोपियन अधिकारी या सट्टेबाजीनें आपला फायदा करून घेत होते! मि. बर्च या नांवाचा अकाउंटंट जनरल बँकेचा प्रेसिडेंट होता. त्यानें १८६३ च्या आगस्टापासून १८६५ च्या फेब्रुवारीपर्यंत तीन चार लाख रुपये मिळविले! व दुसरा एक डायरेक्टर मि. रॉबर्टसन यानें अडीच लक्ष रुपये मिळविले! अखेर या बँकेस बूड इतकी आली कीं, तिच्या दोन कोटी नऊ लक्ष भांडवलापैकीं अजमासें दोन कोटी भांडवल नाहींसें झालें. शिवाय, मुंबईंत त्या वेळीं बुडबुड्याप्रमाणें चोहोंकडे निघालेल्या कंपन्यांचे भाग मुंबई बँकेनें खरेदी केले होते त्याबद्दल पैसे भरावे लागले ते वेगळेच. अशा रीतीनें सदर बँकेंत मुंबईसरकारचा प्रत्यक्ष संबंध असतां बँक बुडाली म्हणून, 'लोकांचें नुकसान सरकारानें भरून द्यावें' असे अर्ज खुद्द स्टेट सेक्रेटरीपर्यंत झाले होते. पुढें बँकेच्या दिवाळखोरीची चौकशी झाली त्यांत इतर कारणांबरोबर बँकेनें सोन्यारुप्याचा व्यवहार केला होता असाहि आरोप कमिशननें पुराव्यानिशीं सिद्ध झाला असें मत दिलें होतें!

इकडील उदाहरणें इतकीं पुरें झालीं. आतां विलायतेंतील कांहीं उदाहरणें देऊं. इंग्लंडांतील बँकांच्या इतिहासांत असें आढळतें कीं, हल्लीं ज्या रीतीनें आपल्याकडील कांहीं स्वदेशी बँका बुडाल्या त्या रीतीनें तिकडच्याहि अनेक बुडाल्या; व त्याचीं कारणेंहि पुष्कळशीं इकडल्यासारखींच होतीं. अठराव्या शतकाच्या प्रारंभीं 'साउथ सी-कंपनी' नांवाच्या कपटी व्यापारी खेळाचा स्फोट होऊन त्याबरोबर हजारों लोक कसे बुडाले, कोट्यवधि रुपयांचें नुकसान कसें झालें, व्यापाराचें हें खूळ पिकावयास मूळ इंग्लंडांतील सरकारच कांहीं अंशीं कारणभूत कसें झालें, व पैसे मिळविण्याच्या हांवेनें शहाणेसुरते लोकहि कानांत वारें शिरलेल्या

वासराप्रमाणें चौखूर उड्या मारून बालिश चेष्टा करीत कसे सुटले, हें अद्भुत कथानक वाचकांच्या केवळ करमणुकीकरितां आम्ही पुढें सांगणारच आहों. पण तत्पूर्वी इतर थोडी माहिती देतों. इंग्लंडांतील पुष्कळ बँकांच्या दिवाळखोरीचें मुख्य कारण आपल्या नांवानें नोटा काढण्याची त्यांना दिलेली परवानगी हें होय. सन १७४२ च्या एका कायद्यामुळें इंग्लंडमध्यें बँकांचा अतिशय सुळसुळाट सुरू झाला. त्या वेळीं अमलांत असलेल्या कायद्याप्रमाणें नोटा काढण्याचा मुख्य मक्ता 'बँक ऑफ इंग्लंड' हिला होता; तथापि सहांहून कमी भागीदारांची पेढी असल्यास तिला हा मक्ता बाधक होऊं नये अशी कायद्यांत बोट शिरण्यास एक जागा होती. त्याचा फायदा घेऊन वाटेल तो मनुष्य बँक काढूं लागला. वाणसवदा, किराणा, औषधें वगैरेचे दुकानदार, शिंपी, रोटीवाले–वाटेल त्यानें उठावें आणि बँक उघडावी असें झालें. सन १७५० सालीं, लंडन हें राजधानीचें शहर वगळलें असतां बाकी सर्व इंग्लंड देशांत मिळून अवघ्या बारा बँका होत्या त्यांची संख्या सन १७९३ सालीं चारशेंवर गेली! म्हणजे दरवर्षी दहा नवीन बँका निघण्याचा क्रम सुमारें चाळीस वर्षेपर्यंत अव्याहत चालू होता! संपत्तीच्या पाण्यांत उठलेले हे असले बुडबुडे फुटण्यालाहि फार वेळ लागत नाहीं. इंग्लंडांतील ह्या बँकांचेंहि तसेंच झालें. सन १७७२, १७९३, १७९७, १८१०, १८१२, १८१६, १८१८, १८२५, १८३२, १८३६, १८४४, १८४७, १८५७, १८६६, १८९० हीं सालें इंग्लंडांतील बँकांच्या घोटाळ्यांचीं म्हणून प्रसिद्ध आहेत. यांपैकीं प्रत्येक सालांतील दिवाळखोरीचे व बुडीचे आंकडे मिळत नाहींत, पण कांहीं कांहीं मिळतात. प्रसिद्ध ग्रंथकर्ता मॅकलाउड यानें असा अंदाज केला आहे कीं, १८१४ ते १८१६ या तीन सालांत लंडन सोडून इंग्लंडांतील बँकांसंबंधानें ९१ दिवाळखोऱ्यांचीं कमिशनें निघालीं. १७९१-१८१८ या अठ्ठावीस सालांत २७३ कमिशनें निघालीं. एका कमिशनास सुमारें चार दिवाळखोऱ्या असा हिशोब धरला तर या २८ वर्षांत सुमारें एक हजार पेढ्या बुडाल्या. १८१४ व १८१६ या सालांच्या दरम्यान २४० कंट्री बँकांनीं आपले दरवाजे लावले असाहि एक उल्लेख सांपडतो. १८१४ आणि १५ या सालांत ८९ पेढ्या बुडाल्या. १८३६–३९ या सालांत ६३ कंट्री बँकांना देवघेवीचा व्यवहार थांबवावा लागला. १८३९ ते १८४३ या सालांत ८२ बँका बुडाल्या; यांपैकीं ज्यांच्या नांवाच्या नोटाहि चालत अशा २९ होत्या, व या २९ पैकीं १७

इतक्या कांहीं वाईट स्थितींत होत्या कीं, त्यांना भागीदारांना कधींच व्याज देतां आलें नाहीं. १८६६ च्या धामधुमींत बँक ऑफ हिंदुस्थान, एशिॲटिक बँक वगैरे प्रसिद्ध बँका बुडून पांच कोटि पौंड रकमेची (त्या वेळच्या पौंडाच्या भावाप्रमाणें पन्नास कोटि रुपये) बँकांचीं दिवाळीं निघालीं !

वरील आंकडे बरेच बोधप्रद होतील असा भरंवसा आहे. पण वरील माहिती देण्यांत इंग्लंडांत अमुक एक इतक्या बँका बुडाल्या असें सांगण्यापेक्षां बँका बुडणें हा मनुष्यस्वभावांतील द्रव्यलोभाचा एक परिणाम आहे; आणि इंग्लंदांत काय व हिंदुस्थानांत काय मनुष्यस्वभाव येथून तेथून एकच हें सांगण्याचाच आमचा मुख्य हेतु आहे. इंग्लंडांत हिंदुस्थानाप्रमाणें स्त्रिया पडद्यांत किंवा बुरख्यांत रहात नाहींत, अथवा इंग्लंडमध्यें हिंदुस्थानाप्रमाणें जातिभेदहि नाहीं, म्हणून इंग्लंडांत झालें तरी बँका बुडत नाहींत असें नाहीं. थोड्या काळांत खूप श्रीमंत होण्याची मनुष्याची बुद्धि हिंदुस्थानाप्रमाणें इंग्लंडांतहि दारुण–परिणामीं झाल्याशिवाय रहात नाहीं !

'साऊथ-सी–कंपनी'चा उल्लेख आम्हीं वर केलाच आहे. तिची खालीं दिलेली हकीकत लक्षांत घेतली म्हणजे वरील सिद्धांताची सत्यता चांगली पटेल. ही कंपनी सन १७११ सालीं लॉर्ड ऑक्सफर्ड नांवाच्या उमरावानें काढली. तिचा हेतु सरकारला कार्यविशेषीं खर्चास पैसे पुरविणें व दक्षिणेकडे पॅसिफिक महासागरांतून दक्षिण–अमेरिकेशीं व्यापार करणें हा होता. कंपनीला सुरुवातीस सरकारी खजिन्यांतूनच थोडेंसें भांडवलहि मिळालें होतें. सुमारें नऊ वर्षें या कंपनीनें सीधा धंदा केला. पण दुर्दैवानें १७२० सालीं सर्व इंग्लंडभर धाडसी व सट्टेबाजी व्यापार करण्याचें खूळ पिकलें. व भराभर कंपन्या निघूं लागल्या. त्याच वेडाच्या लहरींत सर जॉन ब्लाऊंट नांवाच्या एका धाडसी जुगाऱ्यानें इंग्लंडचा 'चॅन्सेलर ऑफ दि एक्सचेकर' आणि स्टेट सेक्रेटरी यांना लांच देऊन आपल्या कटांत ओढलें, आणि सदर कंपनीचें त्या वेळीं इंग्लंडास असलेलें सुमारें ३०–३१ कोट रुपयांचें कर्ज आपल्या अंगावर घेऊन फेडावें असा घाट घातला; व या व्यवहारांत पुष्कळ नफा मिळवावा असा कट केला. हा हक्क मिळण्यासाठीं कंपनीनें सरकारास ३॥ कोट रुपये देऊं केले. हा सर्व सट्टा आहे असें उघड उघड स्पष्ट दिसत असतां इंग्लंडच्या बँकेलाहि मोह पडून हा मौल्यवान् हक्क साऊथ–सी कंपनीस न मिळतां आपणांस मिळावा म्हणून तिनें

सरकारास ५ कोटी रुपये देऊं केले. उलट बँकेचा पाडाव करण्याकरितां कंपनीनें ही रक्कम ७½ कोटींपर्यंतहि वाढविली, व अखेर पार्लमेंटमध्यें वादविवाद होऊन तो हक्क साउथ–सी–कंपनीलाच मिळाला. कंपनीला कोणत्या व्यापारांत इतके पैसे मिळणार? सर्व राष्ट्राचें कर्ज ती कसें फेडणार? आणि भागीदारांना व्याज कसें मिळणार? याचा कोणीं एकानेंहि विचार केला नाहीं, व जो तो कंपनीचे शेअर खरेदी करण्यास धांवूं लागला. १७१९ सालीं कंपनीच्या शंभर पौंडांच्या भागाची किंमत एकशें सव्वीस होती ती ३००, ५००, ८०० अशा उड्या मारीत २००० वर गेली! भागीदार लोकांना भरंवसा येण्याकरितां "पॅसिफिक महासागराकडे सोन्याच्या प्रचंड खाणी सांपडल्या, तेव्हां आतां दर भागावर शेंकडा पन्नासप्रमाणें नफा होण्यास हरकत नाहीं" अशा कंड्या डायरेक्टर लोक उठवूं लागले! असल्या कंड्या पिकवून नफा मिळविण्याचा रोजगार रस्त्यांतल्या भिकाऱ्यापासून राजमंडळांतील अगदीं वरिष्ठ स्त्रीपुरुषांपर्यंत सर्व लोक करूं लागले. प्रसिद्ध इंग्रज कवि पोप याच्या याविषयींच्या कांहीं कविता येथें आमच्यानें दिल्याशिवाय रहावत नाहीं. इंग्रजी जाणणाऱ्या वाचकांस त्यांचें मर्म चांगलेंच कळून येईल.

At length corruption, like a general flood
Did deluge all, and avarice creeping on
Spread like a low-born mist and hid the sun.
Statesmen and patriots plied alike the stocks
Peeress and butler shared alike the box;
And mighty Dukes packed cards for half-a-crown
Britain was sunk in lucre's sordid charms.

व्याजोक्तिरूप लेखांत अत्यंत निष्णात असलेला असा प्रसिद्ध आयरिश ग्रंथकार स्विफ्ट यानेंहि या काळच्या दिवाळखोरीला अनुलक्षून आपल्या लेखांतून खूपच कोरडे ओढले आहेत.

साऊथ–सी–कंपनीच्या नांवाशिवाय कोणताहि व्यवहार करावयाचा नाहीं, अशी इंग्लंडच्या समाजांत त्यावेळीं एक 'फॅशनच' पडून गेली होती. अंगांतील कोट, गळपट्टे, दागिने, फार काय पण नोकरांनाहि साऊथ–सी–कंपनीवरून आवडतीं टोपण नांवें ठेवण्यांत येऊं लागलीं! कंपनीच्या खरेदी केलेल्या भागां-

वर व्याज घेण्याकरितां शिवलेल्या चिंचेच्या पानाच्या पिशव्या अद्याप भराव-याच्या होत्या; पण त्याच्या आधींच म्हणजे द्रव्यरूपी ही वारुणी घशांत जाण्या-पूर्वींच, त्यांना विलक्षण मद चढला होता. भावी लाभाच्या आशेनें भागीदार लोक गाड्या–घोडीं ठेवूं लागले, पक्वान्नें खाऊं लागले आणि उंची दारू झोकूं लागले. फार काय, पण त्यांच्या भाषणांत व वागणुकींतहि उन्मत्तपणा दिसून येऊं लागला ! साऊथ–सी–कंपनीच्या कारकून मंडळीची मात्र खरी चैन होती. कंपनीचे शेअर खरेदी करण्याची लोकांची कोण धांदल ! एखादा दिवस उशीर झाला कीं, शेअरची किंमत कदाचित् शंभर पौंडांनीं वाढावयाची ! अर्थात् एक दिवसहि न गमावावा, पैशांची पावती होऊन शेअर आपल्या नांवावर चढावा, म्हणून कंपनीच्या कारकुनाला कोणीहि पंधरा वीस पौंडांची नोट लांचादाखल सहज देऊन ‘ एकंदरीनें आज सौदा झाला, ’ असें स्वाभिनंदन करी ! अशा रीतीनें या कारकून लोकांना कमिशनरूपानें मिळालेला अपरंपार पैसा जरीचे कपडे व सोनेरी सांखळ्या यांच्या द्वारानें अंगावर फुटून आला !

असो; द्रव्यलोभ हा दिवाळखोरीप्रमाणें स्पर्शजन्य रोग आहे. साउथ–सी–कंपनी एकानें काढली, पण इतर दहांना आणखी दहा कल्पना सुचूं लागल्या. एकानें अखंडगति ( Perpetual motion ) निर्माण कर-ण्याची कंपनी काढली ! देशादेशांतील गाढवांची खरेदीविक्री करण्याची कंपनी दुसऱ्यानें काढली. शिशापासून रुपये करण्याची कंपनी तिसऱ्यानें काढली ! कोणा बहाद्दरानें समुद्राचें पाणी गोडें करण्याची कंपनी काढिली ! यांपैकीं कित्येक कंपन्यांच्या भागाची आजची किंमत एक शिलिंग असून लवक-रच त्यावर शंभर पौंड नफा मिळेल अशी जाहीर खबर देण्यांत आली होती. एका लबाडानें तर सर्वांवर ताण केली. त्यानें प्रॉस्पेक्टसमध्यें फक्त इतकेंच लिहिलें कीं, “कंपनीचें नांव किंवा धंदा हें मी आज कांहींच सांगणार नाहीं; शेअर घेऊं इच्छि-णारानें आजच्या दिवसांत केव्हां तरी फक्त दोन गिनी आणून भराव्या; व त्याच्या मोबदला लवकरच शंभर गिनींचा एक शेअर, त्याबरोबरच कंपनीचें नांव व तिनें योजलेला धंदा यांच्या माहितीचें मोहरबंद पाकीट मिळेल !” झालें, अवघ्या पांच तासांत एक हजार भागीदारांच्या दोन हजार गिनी त्याजकडे येऊन पडल्या व तो भला माणूस त्या घेऊन मुकाट्यानें पळून गेला ! कंपनीचा भाग पुष्कळ किंमतीचा, म्हणजे उदाहरणार्थ, शंभर रुपयांचा असतां त्यांतील आज फक्त पंचवीस किंवा

पन्नास रुपयेच घेतले जातील अशी मायावी सवलत देणें ही कंपनी काढणारांची नेहमींचीच युक्ति असते. पण इंग्लंडांत निघालेल्या कित्येक कंपन्यांनीं, आज शेंकडा एकच रुपया घेतला जाईल अशा दिलेल्या आश्वासनाला अनेक वेडेपीर भाळून जाऊन त्यांना बाकी उरलेल्या नव्याण्णव रुपयांचें काय करावें याचीच चिंता वाटूं लागली ! ड्यूक, लॉर्ड, प्रधान, उपप्रधान अशी बडी मंडळीहि या खुळांत सामील झाली ! त्या वेळच्या एका शाहिरानें एका फटक्यांत खालील ओळी लिहिल्या आहेत.

A wise man laughed to see an ass
Eat thistles and neglect good grass
He might have seen worse asses here
Give solid gold for empty air.

प्रसिद्ध मुत्सद्दी वॉलपोल यानें मोठ्या धूर्तपणानें पुढें साउथ–सी–कंपनीविरुद्ध ओरड केली; पण इकडे तो स्वतः या सट्टेबाजींत गुप्तपणें होता व शेअरच्या देवघेवींत त्यानेंहि चाळीस हजार पौंड मिळविले असें म्हणतात. या ज्या शेंकडों व हजारों कंपन्या निघाल्या त्यांत एकंदर तीनशें कोटी पौंड भांडवल गुंतलें असावें असा एका हिशोबी ग्रंथकारानें अंदाज केला आहे. साउथ–सी–कंपनीला सट्टेबाजीचें उदाहरण घालून देतांना बरें वाटलें; पण बाजारबुणगे किंवा पेंढारी हेच जसे एखादे वेळीं सैन्याचा नाश करितात तीच गोष्ट याहि कंपनीची झाली.

एखाद्या सैन्याचा नाश कित्येक वेळां शत्रूपेक्षां त्याच्या मागून चालणाऱ्या बाजारबुणग्यांकडूनच अधिक होतो. व तीच गोष्ट ‘साउथ–सी–कंपनी’ ची झाली असें आम्हीं मागील लेखांत म्हटलें आहे. त्याचा प्रकार असा कीं, साउथ–सी–कंपनी हें एक कपटी व्यवहाराचें जाळें आहे, असा तिजवर आरोप ठेवून तिच्या कोणा शत्रूनें तिचा नाश केला असें नाहीं, तर साउथ–सी–कंपनीचें उदाहरण पाहून ऐशीं नव्वद इतर कंपन्या उभारण्यांत आल्या; त्यांतल्या बहुतेक किती पोकळ होत्या याचें दिग्दर्शन पूर्वीं झालेंच आहे; अर्थात् अशा कंपन्या टिकणें फार दिवस शक्य नव्हतें व त्यांचीं दिवाळीं निघालीं यांत आश्चर्य नाहींच; पण कंपनी म्हटली कीं, ती दिवाळखोर असणारच अशा समजुतीची जी वावटळ या कंपन्यांच्या नाशामुळें उठली तीच साउथ–सी–कंपनीला बाधक झाली.

आपलें घातक मर्मस्थान स्वतःच्या शरीरापेक्षां दुसऱ्याच्या शरीरांतच अधिक आहे असें ओळखून, साउथ-सी-कंपनीनें या दुसऱ्या तकलुपी कंपन्या कायद्याच्या सक्तीनें मोडल्या जाव्या असा कोर्टास अर्ज केला व तो मान्यहि झाला. पण या गोष्टीचा उपयोग तिला स्वतःला फारसा झाला नाहीं. लवकरच कंपनीच्या भागाची किंमत पूर्वी उड्या मारीत चढली तशीच उड्या मारीत खालीं आली. अवघ्या दोन महिन्यांत भागाची किंमत ८५० पौंडांवरून १७५पौंडांवर आली. कंपनीच्या डायरेक्टरांनीं दर भागावर शेंकडा तीस टक्के व्याज पडेल असें सांगितलें, व त्यानेंहि काम भागेना तेव्हां शेंकडा ५०टक्यांची आम्ही हमी घेतों, असेंहि प्रसिद्ध केलें. परंतु कंपनीचा अधःपात कशानेंहि थांबेना. पार्लमेन्टमध्यें उघड वादविवाद सुरू झाला, व 'या लुच्या लबाड लोकांची सर्व मिळकत जप्त करावी; एवढेंच नव्हे तर, त्यांना नेऊन टेम्स नदींत बुडवावें' असें लॉर्ड मोलस्वर्थ यानें पार्लमेन्टांत प्रतिपादिलें. कंपनीची चौकशी करण्यासाठीं कामिटी नेमण्यांत आली. तिचे डायरेक्टर व कामगार या सर्वांना देश सोडून न जाण्याबद्दल हुकूम झाला. जे डायरेक्टर पार्लमेन्टचे सभासद होते त्यांच्या जागा काढून घेण्यांत आल्या. सरकारी नोकर होते, त्यांना सरसकट बडतर्फ करण्यांत आलें. चौकशींत असें आढळून आलें कीं, सुमारें ५७॥ लक्ष रुपयांचे शेअर्स जे विकले असें दाखविलें होतें, ते वास्तविक प्रधानमंडळ व राजमंडळ यांतील कित्येक व्यक्तींना बाक्षिसादाखल दिलेले होते. खुद्द 'चॅन्सेलर ऑफ दि एक्सचेकर' यानें कंपनीचें भांडवल वाढविण्याची परवानगी दिल्याबद्दल त्यालाहि कांहीं शेअर बाक्षिस दिले होते, हें सिद्ध झाल्यामुळें त्याची पार्लमेंटांतून हाकालपट्टी होऊन त्यास कैदेंत टाकण्यांत आलें, व त्याची सर्व मालमिळकत जप्त करण्यांत आली! वास्तविक साउथ-सी-कंपनीचे सर्वच डायरेक्टर या सट्टेबाजींत श्रीमंत झाले होते असें नाहीं; त्यांतील कित्येकांचें नुकसानहि झालें होतें. तथापि त्यांनाहि शिक्षा देण्यांत आल्या, व दंडांतून तर कोणीच वांचला नाहीं. सुमारें दोन कोटी रुपयांची मिळकत खासगी लोकांचे हातून जप्त करून काढून घेण्यांत आली. अर्थात् या सर्व सत्रांत जो झाला तो सर्व न्यायच असें जरी नाहीं, तरी लोकमताचें वादळ एकदां उठलें म्हणजे तें कोणती दिशा घेईल याचा नेम लागत नाहीं याचें तें एक उत्कृष्ट उदाहरण होतें. ज्याप्रमाणें दोन हातांशिवाय टाळी वाजत नाहीं त्याप्रमाणें असलीं प्रचंड कपटकारस्थानें सिद्धीस जाण्यालाहि

दोन बाजू लागतात हें खरें आहे—एक फसविणारा आणि दुसरा फसणारा. फसण्यासारखा कोणीच न भेटल्यास फसविणारा झाला तरी तो कोणास फसविणार ? दुनिया झुकविणाराप्रमाणें झुकणाऱ्या दुनियेकडेहि दोष असतोच. पण धांदलीच्या वेळीं हें लक्षांत कोण घेणार ?

असो; वर सांगितल्याप्रमाणें साऊथ–सी–कंपनीच्या व्यवहारांत सरकारी अधिकाऱ्यांचें अंग असल्यामुळें सरकारासहि दंडादाखल बूड निमूटपणें सोसावी लागली. कंपनीकडे सरकारचें देणें निघत असलेल्या रकमेपैकीं प्रथम पांच कोटि, व नंतर लोकांनीं गिल्ला केल्यावर फिरून अडीच कोटि, मिळून सर्व साडेसात कोटींच्या देण्याची सरकारनें कंपनीस सूट घातली व यामुळें भागीदारांना अखेर शेंकडा चाळीस टक्के इतकी रक्कम देतां आली. या सर्व प्रकारासंबंधानें तपासाच्या कमिटीवर नेमलेला एक सभासद जनरल रॉस यानें काढलेले उद्गार नमूद केले, म्हणजे त्याशिवाय एक शब्दहि अधिक लिहिण्याचें कारण उरत नाहीं. तो म्हणतोः— " The Committee had discovered a train of the deepest villainy and fraud that had ever contrived to ruin a nation." " इंग्लंडच्या मुख्य बँकेलाहि या सट्टेबाजींत पुरा गोता बसण्याची वेळ आली होती, पण सुदैवानें ती थोडक्यांत वांचली. तथापि, याचें श्रेय बँकेच्या शहाणपणास नसून वेडेपणासच दिलें पाहिजे," असे विरोधात्मक उद्गार कित्येक लेखकांनीं काढले आहेत ! साऊथ-सी–कंपनीऐवजीं स्वतःस परवाना मिळविण्याकरितां पांच कोटि रुपये सरकारास स्वामित्वादाखल देण्यास सदर बँक तयार झाली होती हें मागील लेखांत सांगितलेंच आहे, व अशा रीतीनें बँक आपला पाय खोड्यांत घालून चुकलीच होती. पण बँकेवर ताण करण्याकरितां स्वतः साऊथ–सी–कंपनीनें ही स्वामित्वाची रक्कम ७॥ कोटींपर्यंत नेल्यामुळें बँकेच्या पायांत खोडा बसला नाहीं इतकेंच ! तथापि, बँकेची इतर रीतीनें तारांबळ झाल्याशिवाय राहिली नाहीं. बँकेचें दिवाळें निघण्याचीच वेळ, पण मोठ्या युक्तीनें बचावली. या युक्तीचें वर्णन मॅकलाऊड नामक ग्रंथकारानें केलें आहे तें असें. " लोकांच्या मागणीइतका पैसा तिजोरींत नाहीं असें दिसून येतांच पैशाची देवघेव बँकेनें होईल तितक्या हलक्या नाण्यानें सुरू केली. कोणी आपली रक्कम परत मागितली कीं, ती देतों म्हणावें व सोन्याचें नाणें देण्याऐवजीं शिलिंग व पेन्स यांच्या पिशव्या आणून पुढें ठेवाव्या. अर्थात् हा खुर्दा मोजून घेतां घेतां पुरेवाट होई !

नाणें वजनानें दिल्याघेतल्यास जेथें पांच मिनिटें लागावयाचीं तेथें नाणें मोजून देण्याघेण्यास एकेक तास लागूं लागला. शिवाय बँकेच्या अधिकाऱ्यांनीं असेंहि करावें कीं, आपल्या ठराविक स्नेह्यांची ऑफिसांत गर्दी करून ठेवावी आणि होतां होईतों त्यांच्याशींच व्यवहार करावा; व या मित्रांनींहि एका दरवाज्यांतून आपल्या ठेवींचे म्हणून पैसे काढून न्यावेत व लगेच दुसऱ्या दारानें आंत शिरून फिरून तेच पैसे आपली ठेव म्हणून जमा करवावे ! अशा रीतीनें शेंकडों दुहेरी व्यवहार व्यर्थ होत. पण त्यांमुळें पुष्कळ वेळ मिळे. आणि बँक देणें येणें करीत नाहीं असा प्रत्यक्ष बोभाटा न होतां खरी देवघेव मात्र फारच थोडी होत असे. ''

साऊथ–सी कंपनीच्या दिवाळखोरीची उपमा तिचीच तिला देतां येईल. तथापि, विलायती दिवाळखोरीचा तो प्रसंग शेवटचाच होता असें नाहीं. यापुढेंहि अनेक वेळां दिवाळखोरीनें विलायती समाजास धक्के बसले. त्यांचें वर्णन वाचूं लागलें म्हणजे तें फारच अद्भुत वाटतें. या सर्व प्रकाराचें मूळ कारण पाहूं गेलें असतां मात्र एकच आढळतें; व त्याचा संबंध मनुष्यस्वभावाशीं असमुळें विलायतेंत काय, हिंदुस्थानांत काय किंवा जगाच्या पाठीवर दुसरीकडे कोठेंहि काय, तींच कारणें प्रभावी होऊन त्यापासून तेच परिणाम घडून यावेत यांत आश्चर्य नाहीं. खुद्द विलायतेंत १८२५, १८३६, १८४७, १८५७ व १८६६ असे अवघ्या चाळीस वर्षांत दिवाळखोरीचे मोठे पांच धक्के तेथल्या समाजाला बसले; आणि तसें पहावयास गेलें तर, प्रत्येकाचें निमित्त कारण दिसावयाला वेगळें होतें. १८२५ सालीं परदेशांतील खाणीतून निघणाऱ्या सोन्यारुप्यामुळें आपणांस फार मोठा नफा होईल अशा आशेनें कंपन्या बुडाल्या. १८३६ सालची बूड, संयुक्त भांडवलाच्या कंपन्या एकदम खूप खेळावल्या, पण त्या चालण्यासारख्या मुळीं नव्हत्याच यामुळें आली. १८४७ सालीं जो उठला सुटला तो रेल्वेच्या कंपन्याच काढूं लागला म्हणून लोक बुडाले. १८५७ सालीं व्यापार करण्याचेंच वेड विलायती लोकांना बेसुमार लागलें, पण समाजाच्या गरजांपेक्षां व्यापाराची वाढ कृत्रिम उपायांनीं अधिक केली तर व्यापार आंतबट्ट्याचाच होतो तसा तेव्हां झाला. १८६६ सालीं पेढ्या मर्यादित जबाबदारीच्या तत्त्वावर प्रथमच निघूं लागल्यामुळें व लोकांना त्यांविषयीं कांहींच्या कांहींच कल्पना झाल्यामुळें पेढ्या भराभर बुडाल्या, व जितका नफा होईल असें वाटलें होतें, तितका तोटाच

झाला. पण हीं सर्व निमित्तकारणें वेगवेगळीं भासलीं तरी मुळाशीं त्यांचें स्वरूप एकच आहे; व तें हेंच कीं, ज्या मनुष्याला कांहीं फायदेशीर कामधंदा करितां येतो, त्याला तोच धंदा अवाढव्य प्रमाणावर करून एकदम श्रीमंत होण्याची इच्छा होते. श्रीमंतच व्हावयाचें पण तें सुद्धां पायरीपायरीनें होण्याचें त्याला खपत नाहीं. एका इंग्रज ग्रंथकारानें म्हटल्याप्रमाणें 'श्रीमंतीच्या मनोरथाचा प्रवास आगगाडीच्या प्रवासाप्रमाणें फार जलद झाल्याशिवाय सुख वाटत नाहीं.' पण आगगाडीच्या रुळाइतका श्रीमंतीच्या मनोरथाचा मार्ग सरळ, साफ व गुळगुळीत नसतो. जें आगगाडीचें एंजिन रुळावरून तासीं साठ मैल जाऊं शकतें तेंच जमिनीवर चालविलें तर कदाचित् चालावयाचेंहि नाहीं. श्रीमंतीच्या मनोरथाच्या चाकांना खांचखळग्यांतून मार्ग काढावा लागतो, येवढेंच नव्हे तर आपल्याप्रमाणें इतरांच्या मनांत जागृत असलेल्या स्वार्थबुद्धीचा प्रतिरोध या रथाला पावलोपावलीं होत असतो. ही गोष्ट लक्षांत न घेतां मनोरथाला जे एकदम वेग देतात त्यांचा रथ लवकरच मोडून त्याचे तुकडे होतात यांत आश्चर्य नाहीं. सांगण्याचा मुख्य मुद्दा हाच कीं, दिवाळखोरीला अमुक एकच देश, जात किंवा काळ मानवतो असें नाहीं. तर जेथें जेथें असला मनुष्यस्वभाव आहे तेथें तेथें दिवाळखोरी ही आहेच. असें असतां आपल्या इकडे नुकत्याच घडून आलेल्या दिवाळखोरीची मीमांसा करितांना जातिभेद व पडदापद्धति हीं दिवाळखोरीचीं कारणें म्हणून सर नारायण चंदावरकर यांनीं दिलीं, त्या अर्थीं सुशिक्षितांच्या ग्राम्यपणाचा तो एक नमुना आहे इतकें म्हटलें म्हणजे बस्स होईल!

पण विलायती लोकांचे अवगुण कांहीं विशिष्ट कारणाकरितां घेऊन त्यांचें वर्णन करावयाचें तें केल्यावर, त्या लोकांसंबंधानें दुसरीहि जी एक गोष्ट नमूद करण्यासारखी आहे ती नमूद न करणें मात्र रास्त होणार नाहीं. ती गोष्ट ही कीं, विलायतेंत जसे दिवाळखोरीचे नमुने आढळून येतात तसेंच बूड न येतां, व बूड आली तरी ती निभाऊन नेऊन एकंदरीनें धंदा यशस्वी करणाऱ्या बँकांचे उत्कृष्ट नमुनेहि आढळतात; व आपणांस प्रस्तुत जें काय ग्राह्य तें हेंच होय. हिंदी लोकच तेवढे अप्रामाणिक व दिवाळखोर असें एकांतिक विधान करणाराला मोडून काढून समर्पक उत्तर देण्याला विलायती दिवाळखोरीच्या वर्णनाचा उपयोग होईल खरा; पण मनुष्यस्वभावाच्या नादानपणापुरता विलायती लोकांच्या दिवाळखोरीचा दाखला घेऊन जर आम्ही समाधान मानूं किंवा स्वस्थ बसूं तर, तें

अधम वृत्तीचें लक्षण होईल. आधुनिक पद्धतीच्या बँकेचा धंदा आपणांस शिकावयाचा तर बँक ऑफ इंग्लंडसारख्या संस्थेचे नमुने आपणांस अहर्निश डोळ्यांपुढें ठेविले पाहिजेत, कारण या बँकेवर जरी अनेक बरेवाईट प्रसंग आले तरी ही बँक सन १६९४ च्या जुलै महिन्याच्या २७ तारखेस जी एकदां स्थापन झाली, ती न बुडतां किंवा नांवहि न बदलतां आज तारखेपर्यंत म्हणजे सुमारें सव्वा-दोनशें वर्षांपर्यंत अबाधित चालू आहे. या प्रचंड अवधींत जगांतील किती तरी जुनीं राष्ट्रें मोडलीं व किती तरी नवीन राष्ट्रें जन्मास आलीं. खुद्द इंग्लंडची राज्यपद्धति इतकी उत्कृष्ट आहे कीं, धांवतांनाहि तिच्या पोटांतील पाणी कधीं हालत नाहीं असें म्हणतां येईल ! पण इतक्या संथ व धिम्या राज्यपद्धतींतहि एकदोन क्रांत्या होऊन हल्लीं तिसरी क्रांति होणाच्या बेतांत आली आहे; तरी बँक ऑफ इंग्लंड ही संस्था टेम्स नदीच्या प्रवाहाप्रमाणें अखंड चालूच आहे. इकडे शिवाजीमहा-राजांच्या मृत्यूनंतर अवघ्या चवदा वर्षांनीं स्थापित झालेल्या व तेव्हांपासून आजपर्यंत चालू असलेल्या या संस्थेसारखी अबाधित संस्था महाराष्ट्रांत आपण कोणती दाखवूं शकूं ! महाराष्ट्रांत या कालावधींत पेशवाई जन्मास येऊन नाहींशी होऊन वरतीं शंभर वर्षें होण्याची वेळ झाली ! नाहीं म्हणावयाला १६८४ सालीं महाराष्ट्रांत असलेले आमचे डोंगरी किल्ले मात्र आपल्या पडलेल्या झडलेल्या तटबंदीसह अजून उभे आहेत ! पण बँकेसारखी चिच्छक्तिविशिष्ट अशी मानवी संस्था इतकीं वर्षें अबाधित चाललेली अशी आम्ही कोणती दाखवूं शकूं ? विलायतेंतील मोडक्या तोडक्या अमीरउमरावांच्या घराच्यासारखीं खान-दानीचीं घराणीं आमचे इकडे कांहीं कांहीं सांपडतील. तशींच जुनीं देवस्था-नेंहि तेव्हांचीं अजून चाललेलीं कांहीं आढळतील. पण १६९४ मध्यें हयात असलेली एकहि महाराष्ट्रीय व्यापारी पेढी आज आपणांमध्यें नाहीं. जी गोष्ट महाराष्ट्राची तीच इतर हिंदुस्थानचीहि म्हणण्यास हरकत नाहीं. आमच्या इकडे दोन चार पिढ्या एकसारखी चाललेली पेढी किंवा दुकान क्वचितच पहावयास मिळतें. अगदीं खासगी व्यक्तींची विलायतेंतहि अशीच गोष्ट आहे; पण त्यांच्या कडे व्यापारी संस्था चालविण्याचें जें कांहीं विशेष प्रकारचें वळण व शिक्षण आहे त्यामुळें एकाच नांवानें शेंपन्नास किंवा त्याहून अधिक वर्षें चालणाऱ्या संस्था, दुकानें व पेढ्या विलायतेस पहावयास मिळतात. बँक ऑफ इंग्लंड या संस्थेचें अस्तित्व तर वर सांगितल्याप्रमाणें जवळ जवळ सव्वादोनशें वर्षांचें;

आहे. सर्व जगांत याहून अधिक दिवसांची अशी व्यापारी पेढी दुसरी नाहीं. युरोपांतील इतर कांहीं थोड्या बँका बँक ऑफ इंग्लंडपेक्षांहि कांहीं कांहीं बाबतींत श्रेष्ठ ठरतील. उदाहरणार्थ, 'बँक ऑफ फ्रान्स' ही अधिक श्रीमंत व व जर्मनींतिल 'राइक्स बँक' ही अधिक उपयुक्त असेल; खुद्द विलायतेंतल्याच एक दोन बँकांत ठेवींची रक्कम बँक ऑफ इंग्लंडपेक्षां अधिक भरेल. पण परंपरा अखंड व अबाधित राहणें यांत जर कांहीं विशेष गुण असेल तर तो बँक ऑफ इंग्लंडइतका दुसरा कोठेंहि पहावयास सांपडणार नाहीं. बँक ऑफ इंग्लंडच्या व्यवहाराची खालील आंकड्यांवरून थोडीशी कल्पना येईल. स्वतःच्या नांवानें चलनी नोटा काढण्याचा तिला हक्क असून तिच्या नांवाच्या पावणेसहा कोटी पौंडांच्या नोटा आज बाजारांत खेळत आहेत. तिचें स्वतःचें भांडवल एक कोटी पंचेचाळीस लक्ष पौंड असून जवळ जवळ सव्वापांच कोटी पौंडांइतक्या तिचेजवळ ठेवी आहेत, व तिचा एकंदर आढावा सात कोटी पौंडांचा आहे. असो; बँक ऑफ इंग्लंडशिवाय इंग्लंडमध्यें मोठमोठ्या अशा अनेक बँका आहेत. पण त्यांसंबंधानें वर्णन देऊं लागलों असतां फार विस्तार होईल. आम्हांस सांगावयाचा मुख्य मुद्दा हाच कीं, वाइटाच्या बाजूनें पाहतां आमच्याप्रमाणें विलायतेंतहि या बाबतींत पुष्कळच घाण पूर्वीं होती व हल्लींहि असेल. तथापि, चांगल्याच दृष्टीनें पाहतां आम्ही बँकांच्या बाबतींत विलायती लोकांपेक्षां पुष्कळच मागें आहोंत व शिकण्याची बुद्धि आपण मनांत बाळगली तर त्यांपासून शिकण्यासारखें किती तरी आहे! तें शिकतां कसें येईल हें दाखविणारी जी मीमांसा तीच खरी मीमांसा होय.

---

## ४२ 'कॉपीराइट'चा कायदा

### लेखांक १ ला

(ता. १२ मे १९१४)

हिंदुस्थानांतील लोकांस एकंदरींनेंच कायद्याचें ज्ञान कमी. त्यांतल्यात्यांत कित्येक कायदेहि असें असतात कीं, त्यांत वादग्रस्ततेचें बीज फारसें नसतें, व कायदे कौन्सिलांत होणाऱ्या चर्चेमुळें जी माहिती वर्तमानपत्रद्वारां त्यांच्या कानावर सहज जावयाची तीहि जात नाहीं. यामुळें पुष्कळशा कायद्यांचें ज्ञान स्वतः व्यक्तीवर जेव्हां एखादा प्रसंग यावा तेव्हांच त्यांस प्रथम होतें. प्रसंग येऊन ठेपला असतां मग एखाद्या विषयासंबंधाचा कायदा काय आहे, हें पाहूं

लागणें हें केवळ तहान लागल्यानंतर आड खणूं लागण्याइतकें सुदैवानें हास्यास्पद नसतें हें खरें, तरी पण खड्ड्यांत पाय पडून दुखावल्यावर मग होणारें वाटेंतल्या खड्याचें ज्ञान जसें पुष्कळ वेळां निरर्थक वाटतें, त्याचप्रमाणें एखाद्या कायद्याचा वाईट अनुभव आल्यानंतर त्या कायद्याचें झालेलें ज्ञान जरासें उशीराच झालें असें म्हटलें पाहिजे. आज ज्या एका नवीन कायद्याची माहिती आम्ही केसरीच्या वाचकांस करून देणार आहों तो कायदा अशांपैकींच एक आहे. राज्यकारभाराच्या कामास त्या कायद्याचा कोणत्याही तऱ्हेनें कधीं उपयोग होण्याचा संभव नाहीं. त्याचा विषय सर्वस्वीं खाजगी व्यक्तीचा विवक्षित हक्कसंबंध हाच आहे. आतां या कायद्याचें ज्ञान न होतांहि गतानुगतिकत्वानें लोकव्यवहार पूर्वींसारखा चालण्यास फारशी हरकत पडणार नाहीं. तथापि त्याची माहिती नसल्यामुळें व्यक्तिमात्राची नफानुकसानी आकस्मिक रीतीनें घडून आली असतां मग मात्र 'हा कायदा आधीं माहीत असता तर बरें झालें असतें.' अशी हळहळ वाटविण्याइतकें तरी महत्त्व त्या कायद्याचें खास आहे. शिवाय, या विषयावर लिहिण्यास प्रवृत्ति होण्याचें कारण असेंहि आहे कीं, ज्या प्रमाणानें दिवसेंदिवस शिक्षणवृद्धि व वाङ्मयवृद्धि होत जाईल त्याप्रमाणानें या कायद्याचा उपयोगहि अधिकाधिक होऊं लागेल. अर्थात् ज्ञानवृद्धीच्या परिस्थितीचें तें एक अंग असल्यामुळें त्याविषयीं लोकांस अगाऊच माहिती असलेली बरी असें कोणासहि वाटेल.

असो; वर दर्शविलेला कायदा म्हणजे दिल्ली येथील कायदे कौन्सिलांत थोडे दिवसांपूर्वीं मंजूर झालेला, 'कॉपीराइट ॲक्ट' हा होय. कॉपीराइट हा शब्द सामान्यतः वाङ्मयविषयक ग्रंथासंबंधानेंच लावण्यांत व समजण्यांत येतो, परंतु प्रस्तुतच्या कायद्यांत केवळ वाङ्मयच नव्हे तर बुद्धिकौशल्यानें किंवा स्वतंत्र मेहनतीनें तयार केलेल्या कोणत्याहि कामाचा समावेश केलेला असून सर्व ललितकलांचा त्यांत संबंध येतो. आणि चित्ताकर्षक व उपयुक्त अशा कोणत्याहि कारागिरीस तो लागूं शकतो. प्रस्तुतचा कायदा सन १९११ सालींच इंग्लंडच्या पार्लमेंटमध्यें मंजूर झाला असून केवळ हिंदुस्थानविषयक असे किरकोळ फेरफार करून तो दिल्ली कौन्सिलच्या गेल्या बैठकींत हिंदुस्थानास शब्दशः जशाचा तसाच लावण्यांत आला आहे. अर्थात् यापुढें हरतऱ्हेचे गद्यपद्यात्मक वाङ्मय ग्रंथ, काव्यें, नाटकें, कादंबऱ्या, चरित्रें, निबंध, कोश, इतर रीतीनें

माहिती देणारीं पुस्तकें, नकाशे, चित्रपट, कोरीव लेख, गाण्याचीं पर्दे, चिजा, ग्रॅमोफोनच्या तबकड्या, हालत्या चित्रांचे देखावे, तात्पर्य वर सांगितल्याप्रमाणें ज्या ज्या गोष्टीला म्हणून निर्माण करण्याला थोडीबहुत बुद्धि अगर स्वतंत्र मेहेनत लागते, जिचा लोकांस थोडाबहुत उपयोग असल्यामुळें किंमत येते व जिचा व्यापारधंदा केल्यापासून थोडाबहुत नफा होऊं शकतो, असली कोणतीही वस्तु निर्माण करणाऱ्याचा, कांहीं मर्यादेपुरता, तिजवर हक्क रहावा व दुसऱ्या कोणीही त्या हक्काचें उल्लंघन केल्यास त्याजवर कोर्टात काम चालवितां येऊन नुकसानीही मिळवितां यावी अशी—किंबहुना त्याजवर फौजदारी खटला होऊन त्यास दंड व्हावा अशी—योजना या कायद्यानें केली आहे.

हिंदुस्थानामध्यें इतक्या व्यापक रीतीनें अमलांत येणारा असा हा जरी पहिलाच कायदा आहे तरी इंग्लंडांत मात्र अशा प्रकारचा हा पहिलाच कायदा नव्हे. वर सांगितल्यापैकीं निरनिराळ्या बाबींवर इंग्लंडांत निरनिराळ्या वेळीं निरनिराळे कायदे झाले. उदाहरणार्थ, इंग्लंडांतील पहिला कॉपीराइटचा कायदा सन १७०९ सालीं ॲन राणीच्या कारकीर्दींत झाला व तो वाङ्मयविषयक ग्रंथासंबंधीं होता; खोदीव कामासंबंधीं कॉपीराइटचा कायदा प्रथम सन १७३४ सालीं झाला; व पुढें सन १७६६, १७७६ व १८३६ या सालीं त्याची दुरुस्ती झाली. शिल्प कामासंबंधींचा कायदा सन १७९८ सालीं झाला, व १८१३ मध्यें त्याची दुरुस्ती झाली. नाट्य प्रयोगासंबंधीं कॉपीराइटचा कायदा १८३३ सालीं झाला, व १८४२ च्या कायद्यानें नाट्यप्रयोगाच्या हक्काची व्याप्ति पर्दे वगैरे संगीत भागावर करण्यांत आली. व्याख्यात्यांनीं दिलेल्या व्याख्यानासंबंधींचा कॉपीराइटचा हक्क १८३५ सालीं मिळाला. चित्रें, नकाशे, फोटोग्राफ वगैरे संबंधाचा कायदा १८४४ सालीं झाला. शिवाय १८४४, १८४७, १८८३, १८८७, १८९८ या सालीं, इंग्लंडच्या वसाहती व परराष्ट्रें यांजमध्यें होणाऱ्या कॉपीराइटच्या हक्काची बजावणी व यांच्या द्वारें होणाऱ्या कॉपीराइटच्या हक्काच्या उल्लंघनास प्रतिबंध वगैरे बाबींविषयीं इंग्लंडांत पार्लमेंटनें व युरोपांतील राष्ट्राराष्ट्रांनीं मिळून अनेक कायदे करण्यांत आले आहेत. हे सर्व निरनिराळे कायदे इंग्लिश पार्लमेंटच्या १९११ च्या कायद्यानें एका जागीं केलेले असून वर सांगितल्याप्रमाणें फार थोड्या फरकानें तो कायदा हिंदुस्थानांत हल्लीं अमलांत आलेला आहे. हिंदुस्थानांत या बाबतींत प्रथम १८४७ सालीं 'इंडियन कॉपीराइट ॲक्ट' नांवाचा

कायदा झाला व तो आजवर अमलांत होता; पण यंदा झालेल्या नवीन व्यापक कायद्यामुळें यापुढें तो सर्वस्वीं रद्द झालेला आहे.

इंग्लंड व हिंदुस्थान यांच्यामध्यें या कायद्याच्या बाबतींत ध्यानांत धरण्याजोगा असा एक फरक आहे, तो हा कीं, वरील निरनिराळे कायदे इंग्लंडांत झाले त्या त्या प्रत्येक कायद्याच्या पूर्वीं एक एक चळवळ झाली होती; व कॉपिराइटच्या कायद्यांत ज्या लोकांच्या परस्परविरोधी हक्काचा संबंध येतो त्या लोकांनीं आपले हक्क राखण्यासाठीं पार्लमेंटमध्यें व न्यायकोर्टांतून भांडणें भांडून आपापल्या हितरक्षणाची पराकाष्ठा केली होती. पण हिंदुस्थानाकडे पहावें तो ग्रंथकार, ग्रंथप्रकाशक, वाचक व प्रेक्षकसमाज यांना फारशी जाणीवही नसतां व कायदेकौन्सिलांत कोणत्याही प्रकारें वादविवाद न होतां बहुधा सरकारच्याच मूल प्रवृत्तीनें हल्लींचा हा कायदा हिंदुस्थानास मिळत आहे. वरील इतिहास लक्षांत घेतला असतां सन १९११ चा इंग्लंडचा कायदा हा जरी एखाद्या परिणत मनुष्याप्रमाणें पूर्ण वाढ पावलेला व सर्वांगसंपन्न असा दिसतो तरी तो तत्पूर्वींच्या स्तन्य, शिशु, बालक, बाल, युवा, तरुण व प्रौढ अशा सर्व स्वाभाविक स्थित्यंतरांतून परंपरेनें गेलेला आहे. आमच्या हिंदुस्थानचा कायदा मात्र कौसल्येच्या पोटीं जन्म घेतांच तिच्या पुढें सायुध व सशक्तिक अशा उभा राहिलेल्या १६ वर्षांच्या रामचंद्राप्रमाणें किंवा जन्माबरोबर आईबापांस एखाद्या पोक्त मुत्सद्याप्रमाणें सल्लामसलत देऊन आपलें स्वतःचें रक्षण व आईबापांचें मनोगत साधण्यास मदत करणाऱ्या श्रीकृष्णासारखा वाटतो. हिंदुस्थानावर ब्रिटिश राज्य झाल्यापासून झालेले अनेक कायदे हे ब्रिटिश राज्याचे फायदे म्हणून हातावर बोटें घालून मोजण्याचा ज्यांना छंद आहे अशांना प्रस्तुतच्या कायद्याच्या लाभाची गणना त्यांतच करावीशी वाटेल यांत शंका नाहीं! तें कसेंही असो, पण इंग्लंडांत तयार झालेला कॉपीराइटचा कायदा हिंदुस्थानास एकदम आयता मिळाला एवढें खरें.

या कायद्यांतील मुख्य भाग म्हटला म्हणजे संक्षेपानें खालीं दिल्याप्रमाणें आहेः--स्वतःच्या मेहेनतीनें अगर बुद्धीनें जो कोणी एखादा ग्रंथ ( हा शब्द अर्थात् फारच सामान्य रीतीनें योजण्यांत आला आहे ) किंवा उपयुक्त अशा अथवा कलाकौशल्याचें काम निर्माण करील अगर प्रथम प्रसिद्धीस आणील, तो ग्रंथ किंवा तें काम ही त्याची स्वतःची खाजगत मालमिळकत अशी समजली

जाईल; व दुसऱ्या कोणालाही कांहीं ठराव मुदतीपर्यंत तो ग्रंथ प्रसिद्ध करण्याची किंवा त्या कामाची नक्कल किंवा प्रसिद्धी करण्याची मनाई आहे असें समजलें जाईल. मात्र ही मुदत सामान्यतः स्वतः ग्रंथकाराचें जीवमान व त्याच्या मरणोत्तर ५० वर्षेपर्यंत राहील. ग्रंथकाराच्या मरणोत्तर २५ वर्षांनंतरहि इतर कोणाला तो ग्रंथ प्रसिद्ध करून विकतां येईल; मात्र त्यानें तसें करण्यापूर्वी ग्रंथकर्त्याच्या कायदेशीर वारसदारास रीतसर लेखी नोटीस दिली पाहिजे, आणि सरकारी नियमान्वयें ठरेल त्या रीतीनें सदर वारसास विकाऊ पुस्तकाच्या सर्व प्रतींवर शेंकडा १० टक्के स्वामित्व म्हणून दिलें पाहिजे. तसेंच या २५ वर्षे मुदतीच्या आंत देखील एखाद्या ग्रंथकाराचा वारस तो ग्रंथ ( विशेषतः वाङ्मय, नाट्य, संगीत ) स्वतः छापण्याचें मुद्दाम नाकारीत आहे अगर दुसऱ्यास तो छापण्याची परवानगी देत नाहीं अथवा त्याचा प्रयोग होऊं देत नाहीं, व यामुळें समाज त्याच्या फायद्यास मुकतो असें कोणी दाखवून देईल, तर योग्य शर्तींवर इतर कोणासही तो ग्रंथ प्रसिद्ध करण्याचा परवाना सरकारास देतां येईल. कोणत्याही ग्रंथावरील हक्क ही एक मिळकत आहे, व मालकास इतर मिळकतीप्रमाणें ती दुसऱ्यास देतां येईल. लेख करून दिल्याशिवाय हा हक्क एकापासून दुसऱ्यास मिळूं शकत नाहीं. मात्र ज्या ठिकाणीं स्वतः ग्रंथकार हाच आपल्या ग्रंथाचा प्रकाशक व त्यामुळें ग्रंथाचा हक्कदार असेल त्या ठिकाणीं त्यानें लेख करून दिलेलाहि हक्क (हा लेख मृत्युपत्रच नसेल तर ) २५ वर्षांपलीकडे कोणास मिळणार नाहीं. भाषांतरासंबंधानें असा विशेष नियम करण्यांत आला आहे कीं, ब्रिटिश हिंदुस्थानांतच प्रथम प्रसिद्ध झालेल्या अशा ग्रंथाचें भाषांतर कोणास करावयाचें असल्यास त्यास ग्रंथकर्त्याच्या मरणोत्तर ५० वर्षे थांबण्याचें कारण नाहीं; तर ही मुदत फक्त १० वर्षांचीच ठेविली आहे. पण या मुदतीच्या आंत जर स्वतः ग्रंथकार अगर त्याजकडून लेखी परवानगी मिळालेला दुसरा कोणी गृहस्थ एखाद्या ग्रंथाचें एखाद्या भाषेंत भाषांतर करील तर त्या भाषांतररूप ग्रंथावरील हक्क स्वतंत्र ग्रंथाप्रमाणेंच ग्रंथकाराच्या मरणोत्तर ५० वर्षे टिकेल. एखादा ग्रंथ एकाहून अधिक ग्रंथकारांनीं केला असेल तर ५० वर्षे मोजावयाचीं तीं त्यांपैकीं सर्वांत आधीं जो ग्रंथकार मरेल त्याच्यापासून पुढें मोजावयाचीं. अथवा एखादे वेळीं असेंही होऊं शकेल कीं अनेक समाईक ग्रंथकारांपैकीं शेवटचा ग्रंथकारच इतके

दिवस जगेल की प्रथम मरणाऱ्या व शेवटीं मरणाऱ्या ग्रंथकारांच्या मृत्यूमध्यें ५० वर्षांहूनहि अधिक काळ लोटेल. असें झालें असतां प्रथम मरणाऱ्या ग्रंथकाराच्या मृत्यूपासून ५० वर्षें अगर शेवटीं मरणाऱ्या ग्रंथकाराच्या मृत्यूपर्यंतचा काळ या दोहोंपैकीं जी मुदत अधिक भरेल ती हक्काची मुदत असें मानलें जाईल. कॉपीराइटचा हक्क इतर लोकांप्रमाणेंच सरकारासही आहे. सरकारनें कोणताही ग्रंथ प्रसिद्ध करवून जर त्याजवर कायदेशीर हक्क मिळविला असेल तर—सरकार कधींही मरत नसल्यामुळें ग्रंथाच्या प्रकाशनापासून पुढें ५० वर्षेपर्यंत ग्रंथावरील हक्क सरकारास राहील. एकानें मिळविलेल्या हक्काचें उल्लंघन दुसऱ्यानें करूं नये व केल्यास उल्लंघनापासून ३ वर्षांच्या आंत फिर्याद केली पाहिजे.

अशा रीतीचीं नवीन कायद्यांतील मुख्य मुख्य कलमें आहेत. या कायद्यांतील ग्रंथ, ग्रंथकार वगैरे संबंधाच्या व्याख्या बऱ्याचशा सूक्ष्म असून, ग्रंथाच्या नांवाखालीं पडणाऱ्या व सदर कायद्यामुळें कॉपीराइटच्या हक्काचे विषय होणाऱ्या अनेक गोष्टींचा समावेश त्यांत होत असून, कोणती गोष्ट केली असतां हक्काचें उल्लंघन होतें, अथवा काय काय केलें तरी तें होत नाहीं, हक्कांच्या उल्लंघनाला कोणत्या उपायांनीं प्रतिबंध केला जातो, नुकसान कसें आकारावें, नोटीस कशी द्यावी वगैरे अनेक पोटबाबींचा उल्लेख मुख्य कलमांच्या अनुषंगानें सदर कायद्यांत आहे. पण त्या सर्व बाबी सांगत बसण्याचें प्रयोजन नाहीं. ज्याला कारण पडेल तो अर्थातच मूळ कायदा पाहील, अगर त्याविषयीं कायदेशीर सल्ला घेईल पण कॉपीराइटचा हक्क म्हणजे काय, त्याचीं मुख्य तत्त्वें कोणतीं ही गोष्ट हल्लीं झालेल्या नवीन कायद्यामुळें लोकांच्या विशेष नजरेस यावी एवढ्याच हेतूनें आम्हीं हा विषय घेतला आहे. नवीन कायद्यांतील मुख्य मुख्य बाबी आम्हीं वर दिल्याच आहेत. तथापि, तदंतर्गत तत्त्वांविषयींहि थोडीशी साधक बाधक चर्चा करणें जरूर आहे ती पुढील लेखांत करूं.

## लेखांक २ रा

(ता. १९ मे १९१४)

ग्रंथकर्तृत्वाच्या हक्कासंबंधानें सकृद्दर्शनीं कोणासही असें वाटण्यासारखें आहे कीं, ग्रंथकाराचा आपल्या ग्रंथावरील हक्क ही अर्थात् एक मिळकत होय; व या मिळकतीचा भोगवटा, तिची देवघेव, कायदेशीर वारसदारास तिजमुळें येणारा हक्क व त्याचा भोगवटा वगैरे इतर कोणच्याही मिळकतीप्रमाणेंच असणार. मग

या हक्कासंबंधीं एखादा विशिष्ट कायदाच करण्याचें कारण काय ? घरदार, वतनवाडी, पैसाअडका, स्थावरजंगम मिळकतीच्या अनुषंगानें मिळणारे इतर हक्क आणि स्वतःचें शरीर, मन व अब्रू यांच्यासंबंधानें मिळकतवजा असणारे जन्मसिद्ध हक्क जसे मनुष्यास असतात तसाच ग्रंथकर्तृत्व अथवा ग्रंथप्रकाशन यामुळें उत्पन्न होणारहि हक्क आहे. मग इतर हक्कांच्या व्यवस्थेंत व या हक्काच्या व्यवस्थेंत फरक कां पडावा ? इतर हक्क जसे एकदां मिळविले म्हणजे देऊन टाकीपर्यंत वंशपरंपरा अबाधित टिकतात तसाच ग्रंथकाराचाहि ( यापुढें ग्रंथकार हा एकच शब्द व्यापक रीतीनें आम्ही वापरणार आहों ) हक्क वंशपरंपरा अबाधित कां चालूं नये ! त्याला मागील लेखांत सांगितल्याप्रमाणें विवक्षित मुदतच कां असावी ? श्रमानें पैसे जुळवून बांधलेलें घर आणि श्रमानें मजकूर जुळवून लिहिलेला ग्रंथ यांच्यांत वास्तविक फरक कोणता ? किंबहुना हरदासी कोटी करावयाची तर असेंहि म्हणतां येईल कीं घर व ग्रंथ यांत अर्थविषयच गुंतलेला असतो. अर्थात् घर हें मिळकतीचें एक उपलक्षण होय. व अशाच विचारसरणीनें ग्रंथाचें इतर कोणत्याही मिळकतीशीं साधर्म्य दाखवितां येईल.

पण ग्रंथरूपी मिळकतीच्या भोगवट्याला मुदतबंदी ठेवण्याचें मुख्य कारण असें आहे कीं, ग्रंथ हा मुख्यतः ग्रंथकर्त्यास जरी मिळकतीसारखा फायदेशीर असला तरी त्याचा ज्ञानाच्या दृष्टीनें मिळणारा फायदा सर्व समाजास होणें जरूर असतें व याकरितांच ग्रंथावर समाजाचाही हक्क पोहोंचतो. किंबहुना ग्रंथरूपी मिळकतीचे ग्रंथकार व समाज हे उभयतां समाईक मालक म्हटले तरी चालेल; आणि या समाईक मालकांमध्यें भांडण होऊं नये व त्यांच्या परस्पर भोगवट्याच्या मर्यादा आंखल्या जाव्या एवढीच व्यवस्था काय ती कायद्यानें करावयाची. व्यक्तिहितानें समाजहितापुढें किती नमलें पाहिजे याविषयीं सर्वसाधारण असा नियम मांडतां येणार नाहीं, तथापि व्यक्तीनें निर्माण किंवा प्रसिद्ध केलेल्या ग्रंथाचा फायदा घेण्याचा समाजासहि हक्क आहे ही गोष्ट आतां ठरून गेली आहे यांत शंका नाहीं. ग्रंथकाराच्या हक्कास मुदतबंदी लागते व त्यास आपला ग्रंथ प्रसिद्ध करण्याची इच्छा नसेल तरीहि समाजाचें त्यांत हित आहे, असें सरकारास वाटेल तर, कांहीं शर्तींवर ( म्हणजे द्रव्यदृष्ट्या त्याचा सर्वस्वीं तोटा न होईल अशा रीतीनें ) दुसऱ्या कोणास, तो प्रसिद्ध करण्यास परवानगी देतां येते, या ज्या कॉपीराइटच्या कायद्यांतील मुख्य दोन बाबी त्यांवरून व्यक्ति-

हितास–निदान व्यक्तिस्वातंत्र्यास तरी–समाजाचे इच्छेपुढें कायद्यानें नमावयास लावलें हेंच दिसून येतें.

तथापि हा कायदा म्हणजे सर्वस्वीं समाजाचें हित साधण्याकरतांच केलेला आहे. व ग्रंथकाराचें हित त्यांत मुळींच पाहिलेलें नाहीं, असें मात्र नाहीं. किंबहुना ग्रंथकार व समाज या दोहोंच्या हिताचा मेळ होईल तितक्या न्यायबुद्धीनें घालण्याच्या कसोशीचें फळ म्हणजेच हा कायदा होय असेंहि म्हणण्यास हरकत नाहीं. पूर्वी सांगितल्याप्रमाणें, हिंदुस्थानला हा कायदा जन्मतांच सोळा वर्षांच्या मुलासारखा लाभल्यामुळें, या कसोशीचा अनुभव आम्हांस इकडे नाहीं. पण या कायद्याचा इंग्लंडांतील इतिहास पाहिला म्हणजे त्या कसोशीचें स्वरूप चांगलें कळतें. ग्रंथकारास ग्रंथप्रसिद्धीचा हक्क मुळींच नसणें आणि उलट ग्रंथकारास व त्याच्या वंशजास तो हक्क अबाधित जन्मोजन्मीं राहणें, अशा दोन्ही प्रकारच्या मतांमधून इंग्लंडचे लोक गेले आहेत. यामुळें ग्रंथकाराचा हक्क तर मान्य करावा पण त्यास मुदतबंदी लावावी हा एकंदरीनें या दोन अंतिम स्थितींचा मध्य व दोन विरोधी हक्कांचा मेळ कसा होऊं शकतो, हें त्या लोकांस चांगलें कळतें. आमच्या इकडे ग्रंथकर्तृत्वाच्या बाबतींत सर्वच स्थिति वेगळी होती. एका वेळीं ग्रंथकर्तृत्वास निव्वळ धार्मिक स्वरूप असल्यामुळें 'कॉपीराइटचा' हक्क हा शब्दच कोणास कळण्यासारखा नव्हता. पण त्याच्या उलट अलिकडे हिंदुस्थानांत कॉपीराइटचा हक्क इंग्रजी राज्यांत सन १८४७ पासून उपयोगांत आला, तो सुरुवातीसच मुदतबंदीनें आला. इंग्लंडांतही एक वेळ कॉपीराइटचा हक्क माहीत नव्हता, पण त्याचें कारण आमच्या इकडल्या ग्रंथासारखी धार्मिक समजूत नव्हे. तर राजे लोकांच्या सर्वव्यापी हक्काचा जुलूम हें होय. आमच्या इकडे ग्रंथ ही धार्मिक बाब मानली जात असे म्हणून हक्काची आकांक्षाच नव्हती. तिकडे हक्काची आकांक्षा असली तरी धार्मिक मतांचा प्रसार न होऊं देण्याकरतां राजे लोकांनीं धर्मग्रंथाच्या प्रचारासंबंधानें जो कुलमक्त्याचा हक्क आपणाकडे घेतला तोच त्यांनीं सर्व प्रकारच्या ऐहिक विषयक ग्रंथालाही लागूं केला!

इंग्लंडांत आठव्या हेनरीच्या कार्यकिर्दीपासून पुढें १६४० पर्यंत ग्रंथप्रकाशनाच्या बाबतींत सर्व अखत्यारी राजाची असे. ग्रंथकारास म्हणून कांहीं हक्क नसे; पण आठव्या हेनरीनें 'स्टेशनर्स' कंपनी नामक ग्रंथ नोंदविण्याचें खातें काढलें

त्याजकडे ग्रंथ नोंदविण्याचा प्रघात पडला व पुढें त्यांतूनच कॉपीराइटचा हक्क निर्माण झाला. ग्रंथाची नोंद कायम राहिली. पण राजे लोकांचे अधिकार जसजसे हळूहळू कमी झाले तसतसा ग्रंथप्रसिद्धीचा राजकीय मक्ता नाहींसा होऊन ग्रंथ नोंदविणें हें जें सक्तीचें कर्तव्य होतें, तें त्याचें रूप जाऊन ग्रंथ नोंदविणें म्हणजे कॉपीराइटची सनद घेणें असाच अर्थ झाला. ही सनद म्हणजे अबाधित हक्काची सनद असेंच वाटूं लागलें. सन १७०९ साली ॲन राणीच्या कारकीर्दींत कॉपीराइटच्या हक्कास मुदत–बंदी घालण्याचा कायदा झाला व ही पहिली मुदत कमींत कमी १४ वर्षें व ग्रंथकार जगल्यास त्याहून अधिक अशी ठरली. फिरून सन १८१४ सालीं, तिसऱ्या जार्ज राजाच्या कारकिर्दींत ही मुदत ग्रंथकाराच्या जीवमानापर्यंत, व केव्हांहि पुरीं २८ वर्षें ठरविण्यांत आली. पण दरम्यान ‘कॉपिराइटचा’ हक्क हा मुदतबंदीला पात्रच नाहीं, कामन-लॉ ऊर्फ सनातन कायद्याप्रमाणें इतर मिळकतीसारखा ग्रंथप्रकाशनाचा हक्क वंशपरंपरा अबाधित चालला पाहिजे असा मुद्दा उपस्थित करून इंग्लंडच्या बुकसेलर लोकांनीं हें भांडण पांचपन्नास वर्षेंपर्यंत चालविलें. पण अखेर मुदत-बंदीच्याच पक्षाची सरशी होऊन पूर्वीं सांगितल्याप्रमाणें सन १८१४ चा कायदा झाला. तथापि दिवसेंदिवस ही मुदतही कमी आहे असें वाटूं लागलें; यामुळें पार्लमेंटमध्यें निरनिराळीं बिलें येऊन अखेर सन १८४२ सालीं ग्रंथकारांच्या हक्काची मुदत कमींत कमी ४२ वर्षें किंवा ग्रंथकाराच्या मरणोत्तर ७ वर्षें अशी ठरली. मात्र हक्क सुरू होण्यापूर्वीं ग्रंथ सरकाराकडे नोंदविलाच पाहिजे अशी कायद्यांतली शर्त जाऊन हक्काचें उल्लंघन केल्याबद्दल फिर्याद करण्याचाच प्रसंग आला तर फिर्यादीचे वेळीं ग्रंथ नोंदविला तरी पुरें असें ठरविण्यांत आलें. हा १८४२ चा कायदा हिंदुस्थानांत १८४७ सालीं लावण्यांत आला. १८४२ सालचा कायदा इंग्लंडांत पास होण्याचे वेळीं मेकॉले यानें आपल्या भाषणांनीं बरीच चळवळ करून दिली होती; व कॉपीराइटच्या हक्काला मुदत कां व किती असावी याविषयींचें त्याचें विवेचन फारच समर्पक होतें. पण पूर्वींची ४२ वर्षांची मुदत अपुरी वाटल्यामुळें १९११ सालीं ती इंग्लंडांत ग्रंथकाराच्या मृत्यू-पासून पुढें ५० वर्षें अशी ठरविण्यांत आली असल्याचें व तीच हिंदुस्थानासही लागू केल्याचें मागील लेखांत सांगितलेंच आहे. यावरून कॉपीराइटच्या हक्काची मर्यादा योग्य कोणती याविषयींच्या कल्पना वेळोवेळीं बदलत जाऊन, (१)

तो हक्क मुळींच नसावा, ( २ ) तो हक्क वंशपरंपरा अबाधित असावा व ( ३ ) त्याची मुदत १४, २८, ४२, ५० अशी असावी वगैरे सर्व प्रकारच्या मतांतरांतून हा हक्क कसा गेला आहे हें दिसून येईल.

वरील विवेचनांत आलेल्या निरनिराळ्या मतांचें समर्थन कसें होऊं शकतें याचा विचार करणारास कांहीं कांहीं मूलतत्त्वें नजरेस येतील. नवीन ग्रंथ निर्माण करणारास इतर मिळकतीसारखा त्याचा फायदा मिळावा हें कोणीही समंजस मनुष्य कबूल करील. इंग्लंडांतील जुन्या काळचे राजे हा हक्क कबूल करीत नव्हते. पण अधिकाराच्या दर्पांत त्यांना समंजसपणाचा वासही येत नव्हता. आज प्रेस ॲक्टामुळें हिंदुस्थानांतहि, सरकारानें आक्षेपार्ह म्हणून ठरविलेल्या पुस्तकावरील ग्रंथकाराचा हक्क नष्ट होतो; व तो ग्रंथ सरकारची मिळकत होते. आतां हिंदुस्थानांत सरकारास अशा रीतीनें मिळालेल्या ग्रंथांच्या मालकीचा उपयोग द्रव्यप्राप्तीकडे करावयाचा नसतो; या ग्रंथांचा नाश करणें हीच गोष्ट काय ती त्यांना इष्ट असते हें खरें. तथापि, नुकतेंच कलकत्ता-हायकोर्टमध्यें प्रेस ॲक्टाचें जें आविष्करण झालें त्यावरून पाहतां, कांहीं विवक्षित बाबींपुरता तरी, इंग्लंडच्या जुन्या राजांच्या व हिंदुस्थानच्या नव्या राजांच्या कायद्याचा असमंजसपणा सारखाच भरेल. असो; ही अपवादविषयक बाब सोडली तर ज्यानें जो ग्रंथ निर्माण केला त्याचा त्यावर हक्क असावा हें कोणीही समंजस मनुष्य कबूल करील. कारण ग्रंथ करण्यास मेहनत, बुद्धि व वेळ हीं खर्च होतात, आणि एकानें प्रसिद्ध केलेला ग्रंथ जर दुसऱ्यास खुशाल घेतां आला तर चोरीच्या शिक्षेचीं कलमें कायद्यांतून काढिलीं असतां लोकांची जी स्थिति होईल तीच ग्रंथकारांची होणार हें उघड आहे. व असें झालें असतां कोणीही ग्रंथ लिहिण्याच्या उद्योगांत फारसा पडणार नाहीं. सर्वच ग्रंथकार म्हणजे केवळ पैशाच्या दृष्टीनें ग्रंथ लिहितात, किंवा पैशाच्या दृष्टीनें त्यांनीं ते लिहिले तरी सद्यःफलदायी होतात असें नाहीं. तरी पण ग्रंथकर्तृत्वास यशाप्रमाणें द्रव्यप्राप्ति हाहि हेतु नसतोच असें नाहीं. शिवाय खुद्द ग्रंथकारास जरी द्रव्याची किंमत कीर्तीपुढें वाटली नाहीं तरी त्याच्या वंशजांची तीच दृष्टि राहील असें नाहीं. बरें, समजा कीं, ग्रंथकार किंवा त्यांचे वारस यांची हलाखी असली तर, पैसे देऊं शकेल अशा एखाद्या ग्रंथाचा त्यांनीं द्रव्यदृष्ट्या फायदा करून घेण्याचें मनांत आणल्यास त्यांत वावगें तें काय ! त्याचे ग्रंथ दुसऱ्यांनीं प्रसिद्ध करून

पैसे मिळवून चैन चालवावी; आणि त्यांनीं मात्र हालांत दिवस काढावेत ते काय म्हणून ?

याच्या उलट, ग्रंथकारानें ग्रंथ निर्माण केला एवढ्यामुळेंच त्याचा किंवा वारसांचा त्यावर अबाधित हक्क वंशपरंपरा चालूं शकेल तर त्याचेही दुष्परिणाम होऊन समाजाचें नुकसान होईल. कारण ग्रंथ लोकांस उपयोगी आहे अगर आवडतो असें पाहून जर ग्रंथकार अतिलोभानें हवी ती किंमत ग्रंथांस ठेवील तर ग्रंथ वाचावयास दुर्मिळ होईल. तसेंच स्वतः ग्रंथकारांना अगर त्यांचे वारसांना एखाद्या ग्रंथाची किंमत वाटत नसली, किंवा त्यावर लोकांच्या उड्या असूनहि तो स्वतः त्यांस अप्रिय असला, तर तो ग्रंथ ते मुळींच छापणार नाहींत आणि अशाहि रीतीनें ग्रंथ दुर्मिळ होऊं शकेल. पण ग्रंथकाराचा अतिलोभ किंवा अतिविरक्तता या दोहोंपासूनहि कायदा समाजाचें रक्षण करूं इच्छितो. यामुळें, ग्रंथकाराचा हक्क दुसऱ्या कोणीं लुटूं नये, असें जरी कायदा ठरवितो तरी ग्रंथ दुर्मिळ होऊं नये अशी तो खबरदारी घेतो. आणि हीच सजोड योजना न्यायाची आहे यांत शंका नाहीं. याच कायद्याचें दुसरेंही एक तत्त्व लक्षांत घेण्यासारखें आहे; तें हें कीं, अमुक एक मुदतीपर्यंत कॉपीराइटचा हक्क भोगला म्हणजे त्यानंतर तो आपोआप नष्ट झालाच पाहिजे; व मग सर्व समाजाचा त्या ग्रंथावर कायदेशीर हक्क उत्पन्न होतो. ही योजना नसेल तर गीता–बायबल–महाभारत यांसारखे ग्रंथही; ते प्रथम प्रसिद्ध करणाऱ्यांच्या कायमच्या मालकीचे होऊन राहतील; व त्यांजकडे त्यांचा मक्ता राहिल्यामुळें लोकांना ते विकत घेण्यास जबर किंमत पडेल. पण कालांतरानें हा हक्क नष्ट झाला म्हणजे हे ग्रंथ वाटेल त्यानें प्रसिद्ध करण्यास हरकत उरत नाहीं; विशेषतः मक्ता जाऊन त्या ठिकाणीं स्पर्धा आल्यामुळें जो हे ग्रंथ सर्वांस कमी किंमतीस देईल त्याच्यापासूनच लोक ते घेतील, व ग्रंथप्रकाशकास मिळण्याचा तो योग्य मोबदला मिळून लोकांचेंही त्यांतल्या त्यांत काम होईल. ग्रंथकाराच्या मरणोत्तर ५०–६० वर्षांनीं कॉपीराइटचा हक्क नष्ट झाल्यास त्याच्या वारसांस फारशी तक्रार करण्यास जागा नाहीं. कारण दोन पिढ्यांपर्यंत त्यांनीं त्या ग्रंथापासून होणाऱ्या द्रव्यप्राप्तीचा भरपूर फायदा घेतलेलाच असतो. बरें, ग्रंथ सामान्य अगर टाकाऊ असेल तर त्याची इतक्या वर्षांनीं लोकांस जरूरच राहणार नाहीं म्हणजे हक्क असून नसून सारखाच. बरें, जो

ग्रंथ इतक्या वर्षांनंतरही लोकादरास पात्र राहील त्याचें महत्त्वही असेंच लोकोत्तर मानलें पाहिजे, कीं ग्रंथकाराच्या वारसांच्या हातून त्याची सोडवणूक होऊन तो समाजास अर्पण व्हावा; म्हणजे समाजगंगेंतून बाहेर निघालेल्या बुद्धीचें अर्घ्यप्रदान फिरून त्याच गंगेंत व्हावें हेंही रीतीचेंच आहे.

---

## ४२. साम्राज्याच्या अब्रूचें वस्त्रहरण !

( ता. ७ जुलै सन १९१४ )

प्रत्येक गोष्टीची परीक्षा म्हणून व्हावी लागते, व त्याप्रमाणें ब्रिटिश साम्राज्य आणि हिंदुस्थान यांच्या परस्पर–संबंधाची खरी परीक्षा होण्याची वेळ हल्लीं आली आहे. आजपर्यंत सर्वच कांहीं मोघम चाललें होतें. इंग्रजांनीं हिंदुस्थान जिंकलें, पण इंग्रजांनीं हिंदुस्थानावर मिळविलेला विजय हा कांहीं असा तसा नव्हे. ज्या मानानें जेत्यांची सुधारणा श्रेष्ठ व त्यांचें राजनीतीचें धोरण उदार त्या मानानें जित लोकांचे हक्क वरच्या दर्जाचे असतात. अशी विचारसरणी इंग्रज मुत्सद्यांनीं प्रथम प्रथम लेखांत व भाषणांत योजिली होती; आणि रोमन लोकांनीं जिंकलेल्या युरोपियन लोकांपेक्षां आम्हीं जिंकलेल्या हिंदी लोकांची स्थिति कायदेशीर हक्कांच्या दृष्टीनें अधिक चांगली आहे, असें स्वतःस व इतरांस भासविलें होतें. विशेषतः हिंदी लोकांना तर 'ब्रिटिश साम्राज्याचे नागरिक' या नांवाचा विशेष अभिमान वाटत होता. वास्तविक नागरिकत्वांत नक्की कोणत्या गोष्टींचा समावेश होतो व कोणत्या गोष्टींचा होत नाहीं, याचा प्रत्यक्ष अनुभव पहाण्याची वेळ आलेली नव्हती; यामुळें त्या नांवांतच कांहीं विशेष जादू आहे, व कारण पडेल तेव्हां त्या जादूचा प्रभाव व्यक्त होईलच, अशा समजुतीनें हिंदी लोक मनांत आनंद मानीत होते. दंडांत बांधिलेल्या ताइतांत काय आहे हें उघडून न पहातां त्याच्या गुणावर भोळा मनुष्य प्रथम विश्वास ठेवितो. पण हातांत ताईत असतांहि गुप्त पिशाच्चानें अंगावर बिबव्याच्या फुल्या घातल्या म्हणजे मग हा ताईत वाटला होता तसा गुणकारक नाहीं असें तो ओळखतो; व मग तो सोडून आंत महामंत्राचा कागद खरोखर आहे कीं नाहीं हें तपासून पहाण्याची त्यास बुद्धि होऊं लागते. तशीच कांहीं अंशीं स्थिति ब्रिटिश साम्राज्याचे नागरिक या नांवाच्या नुसत्या गोड आवाजावर आजवर झुलत राहिलेल्या हिंदी

लोकांची झालेली आहे! यापूर्वी म्हणजे नागरिकत्वाच्या फायद्याचें फळ त्यांस सर्व बाजूंनीं प्रत्यक्ष चाखावयास मिळालें होतें असें नाहीं, पण जातिवंत आंबा घरच्या आढीला लाविलेला आहे; तो आज नाहीं उद्यां तरी पिकेल; व मग तो आपण खाऊंच खाऊं अशी भावी आशा तरी त्याला वाटत होती.

एखादा हिंदी मनुष्य आजच इंग्लंडचा मुख्य प्रधान होतो असें नाहीं. पण समजा कीं, पार्लमेंटमध्यें शिरला तर तो कदाचित् प्रधानमंडळांत जाऊं शकेल, व प्रधानमंडळांतहि त्याचें तेज पडेल तर तो मुख्य प्रधानहि होऊं शकेल. कारण पार्लमेंटचा अथवा प्रधानमंडळाचा सभासद होण्याला ज्या 'कायदेशीर' अडचणी आहेत त्यांत 'काळा आदमी' असणें ही कांहीं अडचण नाहीं; यामुळें हिंदुस्थानांत राहून येथील लोकांकडून पार्लमेंटमध्यें सभासद निवडला जाण्याची जरी कोणाहि हिंदी मनुष्यास आशा नाहीं तरी विलायतेंत आपण गेलों असतां पार्लमेंटचा सभासद होण्यास आपणास कायद्याची आडकाठी नाहीं, अशी मनाची खात्री असते; प्रत्यक्ष निवडणुकींत कोणी निवडून न दिलें तरी त्यामुळें आपल्या साम्राज्याच्या नागरिकत्वावर हरताळ फासला गेला असें कोणास वाटत नाहीं. दादाभाई नवरोजी व भावनगरी हे हिंदी असतांहि इंग्रज मतदारांकडून पार्लमेंटचे सभासद निवडले गेलेच कीं नाहीं व इतर शंभर हिंदी उमेदवार अशा निवडणुकींत पराभव पावले तरी या वरील दोन उदाहरणांनीं एवढें खास सिद्ध होतें कीं, जातीनें हिंदी म्हणून कोणासहि कायद्यानें पार्लमेंटचा सभासद होण्यास हरकत नाहीं. आतां विलायतेस हिंदी लोकांचीं जहाजेंच्या जहाजें जाऊन उतरूं लागतील, सर्व मुलूखभर हिंदी लोकांच्या वसाहती होऊं लागतील आणि जेथें तेथें निवडणुकींत हिंदी उमेदवारांचा सुळसुळाट होऊं लागेल. तेव्हां खुद्द इंग्लंडांत म्हणजे साम्राज्याच्या केंद्रस्थानांतहि हिंदी लोकांविरुद्ध कायदे होतील किंवा नाहीं, हें न सांगतांहि समजण्यासारखें आहे. पण आज तरी एवढें खास म्हणतां येतें कीं, हिंदी मनुष्यास साम्राज्याचा मुख्य प्रधान होतां येईल. अथवा ही अतिशयोक्ति सोडून दिली असतां निदान हिंदुस्थानांतल्या हिंदुस्थानांत तरी प्रधानमंडळामध्यें हिंदी लोकांचा समावेश आज झाला आहे, व पुढें तो असाच टिकेल यांत शंका नाहीं. प्रांतिक गव्हर्नरच्या कौन्सिलापासून तों स्टेट सेक्रेटरीच्या कौन्सिलापर्यंत हिंदी लोकांचा प्रवेश होऊन राहिला आहे. आणि या दृष्टीनें पहातां आम्ही हिंदी लोक ब्रिटिश नागरीक आहों अशी प्रौढी आपणांस मिरवितां येण्यासारखी आहे.

पण दुसऱ्या एका बाजूनें पाहतां ब्रिटिश साम्राज्याचा नागरिक हे शब्द हिंदी लोकांस फोल व पोकळ किंबहुना लज्जास्पद वाटतात. आणि दक्षिण आफ्रिका, कॅनडा वगैरे ठिकाणीं तर या ब्रिटिश नागरिकाच्या डोळ्यांत चांगलेंच झणझणीत अंजन पडलेलें आहे. एखाद्या सुप्रसिद्ध दानशूर अशा यजमानाच्या घराहून मोठ्या आशेनें गुप्त दानाचा भोपळा आणावा, पण घरीं फोडून पाहतां त्यांत बियांशिवाय दुसरें कांहीं सांपडूं नये; असें झालें असतां त्याला दात्याच्या दातृत्वाची जी कल्पना होईल तीच हिंदी लोकांना वसाहतींत झालेली आपली संभावना अनुभवून होईल! गेल्या आठवड्यांत दक्षिण आफ्रिकन पार्लमेंटमध्यें जो कायदा पास झाला त्याच्या योगानें हिंदी लोकांसंबंधाचा एक मोठा प्रश्न सुटला असें मानण्यांत येतें. पण खरें पाहूं गेलें असतां बोअर लोकांना जिंकल्यानंतर स्वतः इंग्रजांनीं आपण होऊन ज्या नव्या अडचणी व जीं नवीन दुःखें तेथील हिंदी रहिवाशांकरितां निर्माण केलीं होतीं त्यांचा तेवढा या कायद्यानें निरास झाला. हिंदुस्थानांतून दक्षिण आफ्रिकेंत नवीन जाणारासंबंधानें पूर्वीं जी स्थिति आहे, तीच बहुतांशीं आजहि कायम आहे. गांधी यांनीं आरंभिलेली निःशस्त्र प्रतिकाराची चळवळ दक्षिण आफ्रिकेंत इंग्रजांचा हात शिरल्यावर मग सुरू झाली. गांधी यांची चळवळ बोलून चालून मुख्यतः आफ्रिकेंत पूर्वीं जाऊन राहिलेल्या लोकांपुरतीच होती. आंत सांपडलेल्या लोकांचा प्रश्न त्यांना कसा तरी सोडवावयाचा होता; तो त्यांनीं त्यांच्या पुरता आपल्या सोईप्रमाणें व शक्तीप्रमाणें सोडविला याबद्दल त्यांना कित्येकांकडून निष्कारण नांवेंहि ठेवण्यांत आलीं. पण प्रस्तुत मुद्दा इतकाच कीं, गांधी यांची जी चळवळ यशस्वी झाली असें आपण म्हणतों ती चळवळ ब्रिटिश नागरिकत्वाचे संपूर्ण हक्क रक्षण करण्याकरितां झालेली नसून फक्त एकांगी होती. सुदैवानें किंवा दुर्दैवानें गांधी यांस नांवें ठेवणाऱ्या लोकांकरितां नागरिकत्वाच्या हक्काचा याहून मोठा प्रश्न कानडा प्रांतांतील वसाहतवाल्यांच्या कृपेनें आज उत्पन्न झाला आहे; व तो इतक्या उत्कट स्थितीलाहि पोंचलेला आहे कीं, त्याच्या योगानें नागरिकत्वाच्या भ्रमाचा भोपळा पुरा फुटण्याचा संभव असून, "हिन्दी लोकांना आपल्या हक्करक्षणाकरितां जी काय चळवळीची शिकस्त करावयाची असेल ती त्यांनीं करून पहावी, आम्ही वसाहतवाले तीस दाद देणार नाहीं" असें जोराचें व उघड आव्हानहि झालेलें आहे. गांधींनीं जर खरोखरच आपल्या पायापुरतें पाहिलें असेल तर कदाचित्

ती त्यांची चूक असेल. पण त्यांची चूक काढणारावर हिन्दी प्रजाजनांचें हक्क-संरक्षण करण्याकरितां अंगांत काय असेल तो उद्योग करून दाखविण्याची वेळ आतां आलेली आहे. कारण वसाहतवाल्यांचा असा उघड उघड कृतनिश्चय झालेला दिसतो कीं, एशिॲटिक किंवा काळ्या मनुष्यास आपल्या प्रांतांत येऊंच द्यावयाचें नाहीं. कॅनडा प्रांतांत काय स्थिति आहे हें कोमागाता मारू या जहाजाची म्हणजे त्यांतील हिंदी उतारूंची, जी हकीकत आम्हीं वेळोवेळीं दिलेली आहे तीजवरून कळून येईलच. कोमागाता मारूचा तंटा सुरू असतां गेल्या शुक्रवारीं मि. फिशर यांनीं एशिआटिक लोकांविरुद्ध एक नवीन बिल हाऊस ऑफ रेप्रेझेंटेटिव्हमध्यें आणल्याचें प्रसिद्ध झालें आहे. हा कायदा असा विलक्षण आहे कीं, त्याच्या योगानें कोणत्याही एशिॲटिक मनुष्यास या वसाहतींत यापुढें जाणें शक्य नाहीं. कारण कोणच्याहि बंदरावर प्रथम त्याची लेखी–तोंडी परीक्षा घेतली जाणार व त्यास अधिकारी पसंत करतील त्या कोणत्याहि युरोपियन भाषेंत लिहितां वाचतां येत असेल तरच त्याची परीक्षा पास होणार ! अर्थात् कितीहि सुशिक्षित असा एशिॲटिक घेतला तरी त्यास युरोपांत प्रचलित असलेल्या एकूण एक भाषा अवगत असणें शक्यच नाहीं. पण हें लक्षांत घेऊनच कायद्यांत हा प्रतिबंध घालण्यांत आलेला आहे ! पण आम्हांस एवढेंच विचारावयाचें आहे कीं, एशिॲटिक लोकांस तुम्हाला मज्जाव करावयाचा तर, असल्या थोतांडांत तरी कां शिरतां ? या पोरकट युक्त्यांनीं तुम्ही कोणाची वंचना करूं पाहतां ? कारण कायद्याचा हेतु स्पष्ट असून केवळ शब्दांच्या लपंडावानें साम्राज्याची बेअब्रू वांचणें अशक्य आहे.

आजपर्यंतची दक्षिण आफ्रिकेची व हल्लीं चालू असलेली आस्ट्रेलिया, न्यूझीलंड, कॅनडा इत्यादि देशांची हिंदी लोकांशीं वागणूक पाहिली म्हणजे ‘ हिंदी प्रजा ’ ही ब्रिटिश नागरिक नव्हे कीं काय अशी शंका येऊं लागते. ब्रिटिश साम्राज्याच्या मोठेपणाला व भरभराटीला हिंदुस्थान देश किती प्रकारानें साधनीभूत झाला आहे व होत आहे हें लक्षांत घेतल्यास हिंदी लोक ब्रिटिश नागरिक नाहींत असें म्हणण्याची कोणाचीच छाती नाहीं. परंतु ते जर ब्रिटिश नागरिक आहेत तर त्यांस इतर ब्रिटिश नागरिकांप्रमाणें ब्रिटिश साम्राज्यांत वाटेल त्या ठिकाणीं जाऊन राहण्याची मुभा कां असूं नये ह्याचें सयुक्तिक कारण

सांगणें मुष्किलीचें आहे. अशा अडचणींतून कांहीं तरी मार्ग काढण्याच्या हेतूनें लंडन टाइम्सनें जें तर्कट लढविलें आहे तें मात्र अपूर्व आहे. हिंदी लोक ब्रिटिश नागरिक आहेत हें राणीच्या १८५८ च्या जाहिरनाम्यानेंच सिद्ध झालें आहे. पण त्याचा स्पष्ट खुलासाच पाहिजे असल्यास नुकताच कॉमन्स लोकांच्या सभेंत ब्रिटिश नागरिकत्वासंबंधीं जो ठराव पास झाला त्यांत हिंदुस्थानचा उल्लेख असून हिंदी लोकांसही Magna Charta ( महत्तम ताम्रपट ), Habeas Corpus Act ( कोर्टापुढें माणूस हजर करविण्याचा कायदा, ) इत्यादि हक्क मिळालेलेच आहेत असें स्पष्टपणें प्रतिपादण्यांत आलें. असें असतां कॅनडा, न्यूझीलंड वगैरे वसाहती हिंदी लोकांस मज्जाव करीत आहेत, येवढेंच नव्हे तर गलबतावरच अटकाव देखील करीत आहेत तें कोणत्या कायद्यानें ? टाईम्सकार म्हणतात कीं, प्रत्येक स्वतंत्र राष्ट्राला आपल्या हद्दींत कोणते लोक यावेत व कोणते येऊं नयेत तें ठरविण्याचा हक्क आहे. पण हें कबूल केल्यास हिंदी राष्ट्रालाहि तोच हक्क नको काय ? किंवा हिंदी लोक स्वतंत्र नसून ते गुलाम आहेत असें तरी म्हणा, आणि गुलामगिरीचीं पाळेंमुळें खणून काढल्याची शेखी तरी मिरवूं नका !

कॅनडा, ऑस्ट्रेलिया व न्यूझीलंड ह्यांना जर हिंदी गृहस्थांना आंत घेण्यास प्रतिबंध करण्याचा हक्क आहे, तर हिंदी राष्ट्रास देखील तो कां असूं नये ? आणि हिंदी राष्ट्रास जर तो असेल तर हिंदुस्थानसरकारनें तो कां बजावूं नये ? 'जशास तसें' च्या जालीम मात्रेशिवाय असले रोग हटत नसतात. कोमागातावरील उतारूंस जर जुलुमानें परत फिरविलें आणि हिंदुस्थानांत परत आणून सोडलें तर हिंदुस्थानांत असलेल्या ३१३ कॅनेडियन गोऱ्यांनाहि पकडून हार्डिंज बोटीवर घालून कॅनडाचा किनारा कां दाखवूं नये ? आतां असें केल्यानें कॅनडांत यापूर्वींच वस्ती करून राहिलेल्या तीनचार हजार हिंदूंनाहि ते परत पाठवितील. पण मग त्याबद्दल आम्हांस यत्किंचितहि वाईट वाटणार नाहीं. कारण एकदां एक तत्त्व उभयतांस लागूं केल्यावर मग कोणासच तक्रार करण्यास जागा राहणार नाहीं. शिवाय संख्येच्या दृष्टीनें कॅनडांत जें नुकसान होईल तें ऑस्ट्रेलिया व न्यूझीलंडमधून अंशतः तरी भरून निघेल. कारण आजमित्तीला ऑस्ट्रेलियांतील ८८२ आणि न्यूझीलंडांतील १४४ असे १०२६ इसम ( स्त्रीपुरुष मिळून )

हिंदुस्थानांत आहेत, आणि त्यांचे मोबदल्यांत हिंदी गृहस्थ ऑस्ट्रेलियांत शून्य आणि न्यूझीलंडांत अवघे १५ आहेत. ह्याशिवाय आणखी अमेरिकेंतून आलेले असे १७५० इसम ह्या देशांत आहेत; परंतु ते कॅनडांतीलच आहेत का अमेरिकेच्या इतर भागांतून आले आहेत त्याचा पत्ता लागलेला नाहीं. पण त्यांतले कांहीं इसम तरी कॅनडांतील असतीलच. अर्थात् ह्या सर्वांस आपापल्या देशास पाठवून त्यांच्या देशांतून हिंदी लोकांस परत आणविलें तरी कांहीं नुकसान होणार नाहीं. कारण तीन चार हजार हिंदी लोक कॅनडांत जाऊन राहिल्यानें सांपत्तिक दृष्ट्या ह्या देशाचें जितकें हित होत असेल त्यापेक्षां ३१३ किंवा त्याहून बरेचसे अधिक कॅनेडियन लोक येथें राहिल्यानें आपलें सांपत्तिक दृष्ट्या नुकसान अधिक होत असलें पाहिजे. ह्या कॅनेडियन गृहस्थांचा भरणा मध्यहिंदुस्थानांतील संस्थानें, संयुक्तप्रांत, पंजाब, बंगाल, मद्रास वगैरे प्रांतांत विशेष आहे. ऑस्ट्रेलियनांचा भरणा बंगाल, ब्रह्मदेश, मुंबई, मध्यप्रांत इकडे बराच असून, न्यूझीलंडवाल्यांनीं बंगाल, मुंबई व पंजाब प्रांतांतच मुख्यत्वेंकरून तळ दिला आहे. ह्या तिन्ही शिरजोर देशांतील रहिवाशांस दिल्लीसरकारनें स्पष्टपणें असें निक्षून सांगितलें पाहिजे कीं, हिंदी लोकांना तुमच्या देशांत शिरकाव होण्याला जे प्रतिबंध तुम्ही घालाल तेच प्रतिबंध आम्ही तुमच्या देशबांधवांस येथें लागू करूं; आणि जर तुम्ही हिंदी उतारूंस अटकाव करून जुलमानें परत पाठवाल तर आम्हीहि तुमच्या लोकांस तशाच रीतीनें तुमच्याकडे रवाना करून देऊं.

सर हॅरी जॉनस्टन यांनीं हिंदी लोकांच्या बाबतींत असा एक कोटिक्रम पुढें आणिला आहे कीं, हिंदुस्थानांत अद्यापि बरीचशी मोकळी जागा असल्यामुळें, एखाद्या प्रांताची गर्दी मोडावयाची किंवा रिकाम्या मजुरांना कामधंदा द्यावयाचें म्हटलें तरी हिंदुस्थानांतल्या हिंदुस्थानांत जागा आहे. असें असतां या लोकांना इतके लांब कॅनडामध्यें येण्याचें कारण काय ? यावर उत्तर फार सोपें आहे. हिंदुस्थानांतल्या लोकांचा हिंदुस्थानांतच समावेश होण्यासारखा कदाचित् असेलहि. कारण अजून दऱ्या–खोरीं, डोंगराचे खडकाळ माथे, व वन्य श्वापदांनीं सोडून दिलेल्या गुहा मनुष्यांशिवाय मोकळ्या आहेत खऱ्या. पण कॅनडा प्रांत तरी कोठें भरून गेला आहे ? हिंदुस्थानचें क्षेत्रफळ व लोकसंख्या आणि कॅनडा प्रांताचें क्षेत्रफळ व लोकसंख्या यांच्या परस्पर प्रमाणांची तुलना केली म्हणजे

हिंदुस्थानांत एक तरी कॅनेडियन कां यावा हें समजत नाहीं. कारण ब्रिटिश हिंदुस्थानांत आज दरमैलीं सुमारें २२३ इतकी लोकवस्ती आहे. पण एकंदर कॅनडा प्रांत घेतला तर त्यांत दरमैलास सुमारें दोन इतकी लोकवस्ती पडते; व ब्रिटिश कोलंबियांत, म्हणजे कॅनडाच्या ज्या पोटभागांत हिंदी लोकांस उतरण्यास मज्जाव होत आहे त्यांत, तर एका मैलांत सरासरीनें एक मनुष्य रहातो. म्हणजे कॅनडांतील लोकसंख्या यापुढें खूप झपाट्यानें वाढली असें घेऊन चाललें तरी, हिंदुस्थानाइतकी तेथें गर्दी होण्याला कित्येक शतकें लागतील! हिंदुस्थानांतील रिकाम्या चिरटोळ्या व कानेकोंपरे जॉनस्टनसाहेबांस दिसतात; पण कॅनडांतील हजारों लाखों मैलांचीं ओसाड मैदानें मात्र यांस दिसत नाहींत! जॉनस्टन साहेबांच्या या युक्तिवादास उत्तर देण्याचें कारण इतकेंच कीं, 'जर कदाचित् हिंदुस्थानांत रिकामी जागा मुळींच शिल्लक नसती तर गोऱ्या वसाहतींच्या मुलखांत हिंदी लोकांना आम्हीं घेतलें असतें' असें लिहिण्याचा त्यांचा झोंक आहे. पण या झोंकांत कांहीं अर्थ नाहीं, एवढेंच आम्हांस दाखवावयाचें आहे. वसाहतवाल्यांची मुळीं प्रतिज्ञाच अशी आहे कीं, आमच्या मुलखांत दरमाणशीं एक मैल नाहीं चार मैल इतकी ऐसपैस जागा असली तरी ती आम्हांला हवीच. आमच्या अंगास अंग भिडवून राहोच, पण एक मैलाच्या अंतरावर राहिलेल्याहि हिंदी मनुष्याचा वारा आम्हांस खपणार नाहीं! अशा उघड उघड कल्पना जोंपर्यंत साम्राज्यांत नांदत आहेत व साम्राज्याच्या मुख्य स्थानीं त्यांचा तीव्र निषेध होत नाहीं, तोंपर्यंत हिंदुस्थानानें साम्राज्याचा अभिमान धरावा असें सांगणारास शरमच वाटली पाहिजे! ब्रिटिश साम्राज्याची अब्रू ही एक महानुभाव पवित्र व राजवैभवशाली अशी स्त्री आहे अशी कल्पना केल्यास वसाहतवाल्यांकडून म्हणजे प्रत्यक्ष तिच्या मुलांकडूनच तिचें वस्त्रहरण होण्याची वेळ आली आहे हें उघड दिसतें. तर यावेळीं खरा साम्राज्यवादी असा जो कोणी तिचा पाठीराखा असेल त्यानें धांवून येऊन तिची लाज राखली पाहिजे!

---

# ४४ एका सिव्हिल सर्व्हंटाचा पुरावा.

— १ —

( ता. १० माहे नोव्हेंबर सन १९१४ )

आपल्या स्वतःच्या धंद्याविरुद्ध भाषण करणें हें पाप मानलें जातें. लौकिक-दृष्टया त्याला 'चहाडी' असेंहि नांव कदाचित् एका अर्थानें देतां येईल. शिवाय जी गोष्ट आपण स्वतः केली अगर करीत आहों ती वाईट वाटली, तर हातांत चुकून निखारा किंवा विंचू पडल्याप्रमाणें ती तत्काळ दूर फेंकून देणें हाच सरळ मार्ग. असें असतां स्वतः तर ती गोष्ट सोडावयाची नाहीं पण प्रसंग येईल तेव्हां तिची निंदा मात्र करावयाची, ही माणुसकी नव्हे किंवा मर्दपणा नव्हे असाहि आक्षेप घेण्यासारखा आहे. या दृष्टीनें पहातां जे थोडे सिव्हिलियन लोक हिंदुस्थानांतील हल्लींच्या राज्यकारभाराच्या पद्धतीविरुद्ध बोलतात त्यांच्यावर वरील सर्व निंदापवाद येण्याचा संभव असतो. अशा अपवादांना न भितां ते आपलीं मतें व्यक्त करीतच असतात, माघार घेत नाहींत; हें तर झालेंच. पण त्यांचें थोडेंबहुत समर्थनहि करितां येण्यासारखें आहे. कारण एक तर हे सिव्हिलियन लोक नोकरींत असतां आपलें तोंड उघडीत नाहींत; सेवाधर्माची जबाबदारी ते पूर्णपणें जाणतात. ते जें काय करतात तें हेंच कीं, नोकरी संपल्यानंतरहि आपण नोकरच आहों अशी आपली खोटी समजूत करून घेत नाहींत. अर्थात् सेवाधर्माच्या जबाबदारीला ते नसती व्याप्ति देत नाहींत, इतकेंच काय तें! शिवाय ते जें बोलतात त्यांत तरी नोकरींत केवळ त्यांनींच गुप्तपणानें कळलेली अशी एखादी गोष्ट ते चवाठ्यावर आणतात असें नाहीं. ते वरिष्ठव्यक्तिनिंदाहि करीत नाहींत. येऊन जाऊन हिंदुस्थानांतील सर्वसामान्य राज्यपद्धति कशी काय आहे, तिचे दोष कोणते, तिचे गुण कोणते, तिच्यांत सुधारणा काय व्हावयास पाहिजेत व एकंदरीनें तिचें ध्येय काय असलें पाहिजे हेंच ते बोलतात. ते नोकरींत असतां हीं त्यांचीं मतें नव्हतीं, अगर योग्य प्रसंगीं त्यांनीं तीं आपल्या वरिष्ठ अधिकाऱ्याजवळ बोलून दाखविलीं नसतील असें नाहीं. त्या मतांचा अंमलही त्यांनीं, स्वतःस आपल्या अखत्यारींत करितां येण्यासारखा असेल तितका, केला असेल. हा सर्व त्यांच्या दंडेलीचाच पुरावा, व कनिष्ठ अधिकाऱ्यांनीं केलेली दंडेली जेव्हां शिक्षा करितां येण्यासारखी घोर नसते तेव्हां प्रायः छपविलीच

जाते. कनिष्ठ अधिकाऱ्यांनीं राज्यपद्धतीवर केलेली टीका हा या पद्धतीचें समर्थन करणाऱ्या सरकारचा एक प्रकारचा क्षम्य असा अपमानच होय; आणि मान सांगावा जनांत अपमान सांगावा मनांत हें तत्त्व स्वतः सरकारानेंहि स्वतःस लाविलें, तर त्यांत अस्वाभाविक असें कांहीं नाहीं. तात्पर्य, सिव्हिलियन लोक जेव्हां नोकरी संपल्यानंतर राज्यपद्धतीवर टीका करितात, तेव्हां त्यांचा तो चहाडखोरपणा किंवा नामर्दपणा म्हणतां येणार नाहीं.

हिंदी प्रजेशीं सहानुभूति असल्यामुळें त्यांचे तर्फे बोलणारे सर हेनरी कॉटन, सर वुइल्यम वेडर्बर्न इत्यादि जे थोडे सिव्हिलियन लोक झाले व आहेत, त्यांत अलीकडे आणखी एका सिव्हिलियनाची भर पडलेली आहे. हे गृहस्थ मि. बर्नार्ड हॉटन हे होत. हे ब्रह्मदेशांत पूर्वी नोकरीवर असून हल्लीं त्यांनीं पेन्शन घेतलें असावें असें वाटतें. त्यांच्या पूर्वचरित्राची आम्हांस कांहीं माहिती नाहीं. ‘ब्यूरोक्रॅटिक गव्हर्नमेंट’ या नांवाचें त्यांनीं कांहीं दिवसांपूर्वीं प्रसिद्ध केलेलें जें पुस्तक आमचे वाचण्यांत आलें त्यावरून ते उदारमतवादी दिसतात, वास्तविक सिव्हिल सर्व्हंट म्हटला म्हणजे हिंदुस्थानाशीं त्याचें सोयरसुतक पेन्शन घेतांच संपावें. सरकारानें नियमच असा घालून ठेवलेला आहे कीं, विलायतेस जाणाऱ्या बोटीवर सिव्हिलियनाचें पाऊल पडेपर्यंत त्याचें पेन्शन सुरू होत नाहीं. वास्तविक असा कडक नियम कां असावा? पुष्कळ दिवसांच्या सहवासानें प्रिय झालेल्या या देशांत सिव्हिलियन जर पुढील आयुष्य क्रमण्याचा विचार करील तर त्यांत वावगें तें काय आहे? हें आम्हांस तरी समजत नाहीं. एवढेंच नव्हे तर पगारी नोकरी करीपर्यंत रात्रंदिवस ज्या लोकांचें कल्याण करण्याचा परोपकारी छंद सिव्हिलियन लोकांस लागलेला असल्याचे उद्गार त्यांच्या भाषणांतून वरचेवर येत असतात, त्या लोकांचें कायमचें विस्मरण पेन्शनच्या अर्जावर सही करतांच त्यांना कसें होतें हा मानसशास्त्रांतील एक मोठा चमत्कारच वाटण्याजोगा आहे. कसेंहि असो; हिंदुस्थानचें सुखदुःख येथल्या येथेंच ठेवून सिव्हिलियन लोक पेन्शन घेतांच विलायतेस जातात, व इंडिया ऑफिस किंवा प्रिव्हि कौन्सिल अशा ठिकाणीं त्यांना फिरून जागा न मिळाली तर, त्या सुखदुःखाची त्यांना बहुतेक विस्मृति पडते ही गोष्ट मात्र खरी. स्मृति राहिलीच तर सर हेनरी रीस, मि. क्रॉफर्ड, सर बँफील्ड फुलर यांप्रमाणें हिंदुस्थानचें वैर साधण्यापुरतीच राहते. कॉटन, वेडरबर्न यासारखीं

पेन्शन घेतल्यावरहि हिंदुस्थानचें खरें हित चिंतणारीं माणसें थोडीं; म्हणूनच त्यांना किंमत फार. आणि म्हणूनच बर्नार्ड हौटनसारख्या आणखी एकाची त्यांच्यांत भर पडली याबद्दल हिंदुस्थाननें अभिनंदन करणेंहि जरूर आहे.

हौटनसारख्या लेखकांच्या लेखांचा एक मुख्य गुण असा असतो कीं, त्यांच्या वर स्वार्थपरायणतेचा आक्षेप आणितां येत नाहीं. हिंदी लोकांनीं आपणाला प्रातिनिधिक राज्यसंस्था मिळाव्या अशी कितीहि उत्कट इच्छा धरली व त्या संस्था मिळण्याची आपली पात्रता आहे हें कितीहि जोरानें प्रतिपादिलें तरी, तें त्यांचें मत स्वार्थबुद्धीनें दूषित मानलें जाणार व तें खरोखर तसें दूषित नाहीं असें तरी कसें म्हणावें! बरें, याच्या अगदीं उलट जेव्हां अधिकारी लोकमत सांगतात तेव्हां तें मतहि स्वार्थबुद्धीच्याच दोषानें दूषित असण्याचा तितकाच संभव आहे. खरें, निःपक्षतपाती व सत्याला जवळ जवळ येणारें मत असें म्हटलें तर जें मत निःस्वार्थी किंबहुना स्वार्थविरोधी तेंच तसें असण्याचा संभव असतो. पुराव्याच्या कायद्यांत स्वार्थविरुद्ध दिलेली कबुली केव्हांहि सर्वथा ग्राह्यच मानतात; आणि शपथेवर अगदीं धादांत खोटें बोलणारा साक्षीदार अगर पक्षकार स्वार्थाविरुद्ध जी कबुली देतो ती मात्र सत्यस्वरूपी अशी मानली जाते. याचेंहि कारण झालें तरी वर सांगितलेला मनुष्यस्वभावाचा प्रकारच होय. हौटनसाहेबांनीं ब्युरोक्रसीविरुद्ध जें आपल्या पुस्तकांत लिहिलें आहे तें मूर्तिमंत सत्य असें मानण्यास कोणी तयार असो अगर नसो; राज्यपद्धतीच्या चालू वादांत हिंदी लोकपक्षातर्फेचा योग्य पुरावा म्हणून तरी आम्हांस तो जमेस धरण्यास कांहीं हरकत नाहीं.

असो; मि. हौटन यांनीं 'ब्यूरोटिव्ह गव्हर्नमेंट' नामक दोनशें पानांच्या आपल्या पुस्तकांत जें काय सांगितलें आहे, त्याचा सारांश द्यावयाचा तर असा देतां येईल. ते म्हणतातः—इंग्रज लोक हिंदुस्थानांत आले व पुढें त्यांनीं राज्य संपादिलें, अर्थात् जेते या नात्यानें त्यांनीं राज्यक्रांति केली; पण ती राज्यक्रांति प्रारंभीं तरी जुन्या राज्यपद्धतींत सुधारणा अशा स्वरूपाची नव्हती, किंबहुना राज्यसत्ताक्रांतींत एकदम राज्यपद्धतीची क्रांति घडवून आणणें कठीण किंवा धोक्याचेंहि झालें असतें. यामुळें झालें काय कीं, एका अधिकाऱ्याच्या जागीं दुसरा अधिकारी आला, पण अधिकाराचा एकतंत्रीपणा कायमच राहिला; यामुळें अव्वल अमदानींत इंग्रजी राज्यकारभार हा जुन्या एकतंत्री अंमलाची

फक्त नवी आवृत्ति झाली. नवीन अंगरखा शिवावयाचा म्हणून मोजमाप द्याव-याकरितां शिंप्याकडे जुना अंगरखा दिला. पण त्यानें जुन्या अंगरख्याची इतकी हुबेहूब नक्कल केली कीं, जुन्याला पडलेलीं भोकें व त्याला लाविलेलीं ठिगळें हीं देखील त्यानें नव्यांत अगदीं हुबेहूब वठवून दिलीं! मोंगल व हिंदु अमदानींत कनिष्ठ अधिकारी फारच स्वतंत्र व अधिकारसंपन्न असत. तसेंच इंग्रजी अधिकारीहि पहिल्या पहिल्या दिवसांत होते. जुना सुभेदार किंवा इंग्रजी डिस्ट्रिक्ट ऑफिसर म्हटला म्हणजे डोळ्यापुढें असें चित्र उभें राहतें कीं, तो एक आनंदी, ऐटबाज, कुर्रेबाज, मिजासी, चंडोल असून सुभ्याचा किंवा जिल्ह्याचा तो राजाच आहे. तो वाटेल तसा फिरतीवर जातो किंवा जात नाहीं. प्रजेचीं गाऱ्हाणीं ऐकतो पण झटपट रंगारी पद्धतीनें न्यायमनसुबा करून बहाली, बडतर्फी, शिक्षा वगैरे जें काय करावयाचें मनास येईल तें ताबडतोब उरकून टाकतो. त्या वेळीं त्याच्या मार्गांत कोणी येत नाहीं व नंतरहि त्याच्या निकालांत कोणी ढवळाढवळ करीत नाहीं. जुन्या काळची सर्व परिस्थितिच अशी होती कीं, वरिष्ठ अधिकाऱ्यांकडे दाद मागावयास जाणें फार अवघड असून ती मागितल्यामुळें होणारा कनिष्ठ अधिकाऱ्यांचा जुलूम बिनतोड व दुःसह असे; पण वाईट करण्याप्रमाणें चांगलें करण्याचें मनांत आलें तरीहि तें कनिष्ठ अधिकारी तडीस नेऊं शकत असे. अर्थात् भूक व अन्न, रोग व औषध, इच्छा व समाधान हीं जेथल्या तेथेंच पैदा होणारीं असल्यामुळें प्रजेलाहि ती स्थिति एकंदरीनें बरी वाटे.

पण पुढें पक्का रस्ता, आगगाडी, तारायंत्र इत्यादिकांनीं ही सर्व स्थिति बदलून टाकिली. टपालाची वक्तशीर ने–आण करतां येऊं लागली म्हणून वरचेवर रिपोर्ट मागणें व पाठविणें सुचूं लागलें. तारायंत्रानें शेंकडों मैलांवरच्या वरिष्ठ अधिकाऱ्यांच्या तोंडाशीं कनिष्ठ अधिकाऱ्याचा कान खेंचून आणला; व आगगाडीनें जिल्ह्याच्या टोंकाशीं आज झालेल्या कागाळीची फिर्याद उद्यां कचेरीच्या वेळीं कलेक्टरसाहेबांपुढें मांडतां येऊं लागली! वरिष्ठांचें दर्शन घडूं लागल्यामुळें कनिष्ठ अधिकाऱ्याचा बाऊ सहजच वाटत नाहींसा झाला. याच्या उलट कनिष्ठ अधिकाऱ्यांचाहि आपल्या ताब्यांतील प्रजेविषयीं आस्थेवाईक-पणा व प्रेम कमी झालें. इकडे कालांतरानें कायदे फैलावले, पोटनियम बनले, दाखले ठरून गेले व राज्यकारभाराचे कोरीव छाप तयार होऊन सगळें

कामकाज त्यांतून बाहेर पडूं लागलें. वरिष्ठ अधिकाऱ्यांच्या हातीं सारख्या सारख्या लांबीजाडीचे दोरे येऊं लागल्यामुळें तो त्याला गांठी देऊं लागला. अशा रीतीनें पायरीपायरीनें पुष्कळ कनिष्ठांवर एक वरिष्ठ व त्या वरिष्ठांवर आणखी एक वरिष्ठ अशी परंपरा बनून या दोन्यांचीं जुडगीं एकत्र गांठतां गांठतां तीं सेक्रेटरीएटमधील सेक्रेटरींच्या हातीं जाऊन पडलीं; आणि पूर्वीं जसा देशी एकतंत्री अधिकाऱ्याच्या जागीं इंग्रज एकतंत्री अधिकारी आला, तसा या दुसऱ्या स्थित्यंतरांत अखेरीस एकतंत्री अधिकार जरी कायम राहिला, तरी अधिकाऱ्यांचें व्यक्तित्व नष्ट होऊन त्याच्या जागीं राज्यकारभाराचें एक निर्जीव पण मोठें भक्कम व प्रबळ असें यंत्र येऊन बसलें. पूर्वींची एकाधीन सत्ता नष्ट झाली खरी; पण तिच्या जागीं यंत्राधीन सत्ता येऊन बसली. यामुळें प्रजेस अधिकाराचा तर लाभ झाला नाहींच; पण तिचा त्राता, शास्ता व नियंता हा पूर्वीं जो सचेतन, सगुण व सविकार असा मनुष्यप्राणी होता, तो जाऊन त्याच्या जागीं निर्जीव, कडक, ठणठणीत असें यंत्र येऊन बसलें ! नवीन व्यवस्थेंत निग्रहानुग्रह सर्वस्वीं लोपला असें नाहीं, पण तो कळसूत्रानें होऊं लागला. तोंडांत एक ढबू पैसा टाकला कीं, अर्धा डझन सिगारेट किंवा एक डझन रेवड्या मोजक्या हातांत टाकणारीं यंत्रें विलायतेंत असतात ! दुसरींहि कित्येक अशीं असतात कीं, त्यांच्या तोंडांत एक पेनी टाकून गाल पुढें केला असतां नेमक्या अर्धा डझन थोबाड्या देतील ! वरील उदाहरणांत निग्रह व अनुग्रह दोनही आहेत; पण तें केवळ यांत्रिक असून त्यांत उचितानुचित विवेकानें फारसा फेर-बदल होऊं शकत नाहीं. सिगारेट देणारें यंत्र अर्भकालाहि त्या देईल आणि थोबा-डींत मारून थट्टा करणारें यंत्र एखाद्या म्हाताऱ्याच्याहि तोंडांत देईल ! आधिकार यंत्राधीन झाल्यामुळें अधिकारी व प्रजा यांचा संबंध सुटूं लागतो ! अधिकाऱ्याला डोळ्यास झापड घातलेल्या व तोंडांत लगाम दिलेल्या घोड्याप्रमाणें केवळ लगा-माच्या इशारतीनें चालावें लागतें. प्रजेचा संबंध सुटल्यामुळें तिच्या टीका किंवा सूचना परक्याच्या निंदेप्रमाणें वाटूं लागतात. अधिकारी हे स्वतः एकांतिक आज्ञाधारकपणा शिकल्यामुळें प्रजाजनांतहि आज्ञाधारकपणा हाच त्यांना सद्गुण वाटूं लागतो, मतवैचित्र्य कानाला बेसुरेल भासतें, आणि मतविरोध हा तर हाडवै-ऱ्याच्या शत्रुत्वासारखा खुपूं लागतो ! सूक्ष्मदर्शक यंत्रांत राज्याधिकार घालून पहाण्याची संवय लागल्यामुळें जें क्षुद्र तें मोठें दिसूं लागतें व जें खरोखर मोठें

ते समग्र पाहण्याची पात्रताच नाहींशी होते. किरकोळ व किचकट कारभार करितां करितां तळहातावरील रेषा मोजण्यांतच ब्यूरोक्रसीचा सर्व काळ गेल्यामुळें दूर आकाशांत अंधुक लिकलिकणाऱ्या प्रजासुखरूपी ध्रुवाच्या तारकेकडे तिची नजर जात नाहीं व गेली तरी ती तारका दिसली न दिसली असा भ्रम पडतो. राजनिष्ठा व राजद्रोह हीं नांवें भलत्याच गोष्टींना लावण्यांत घेतात.

( Those worthy people confuse manly independence with disloyalty, they cannot conceive of natives except either as rebels or as timid sheep. Page 44. )

यंत्राधीन सत्तापद्धतीचे जे अवगुण अधिकाऱ्यांस जडतात तेच प्रजाजनांनाहि उलट रीतीनें जडल्यास त्यांत नवल नाहीं. गोड बोलणाऱ्या अधिकाऱ्याचा कावा किंवा शिव्या देणाऱ्या अधिकाऱ्याचा सद्हेतु त्यांना कळेनासा होतो. प्रजा अधिकाऱ्यांना अनुसरते, पण त्या अनुसरणांत जिवंत प्रेम रहात नाहीं. रेल्वे टाइम-टेबलालाहि आपण अनुसरतों; पण रेल्वे टाइमटेबलविषयीं आपणांस कधींहि प्रेमोत्साह येत नाहीं! प्रेमोत्साह येण्यास सरकार हें एखाद्या यंत्राप्रमाणें निर्जीव आहे असें प्रजेस वाटतां कामा नये; तर मनुष्यत्वचेप्रमाणें आकुंचनशील, प्रसरणशील व बाह्यस्पर्शाला उचित असा अंतःसंवेदनेचा जबाब देणारें असावें लागेल.

इतकें सांगितल्यावर मि. हौटन यांनीं ब्युरोक्रसीच्या राज्यकारभाराचीं कांहीं उदाहरणें दिलीं आहेत; पण तीं सर्व येथें देत बसण्याचें प्रयोजन नाहीं. सक्तीचें शिक्षण देण्याच्या बाबतींत अधिकारी माघार कां घेतात, शिक्षणाला पैसे नसल्याची सबब अधिकारी सांगत असतां दुसरीकडे हवा तसा पैसा खर्च करण्यास त्यांना कसा मिळतो, शिक्षण दिलें कीं प्रजाजनांचा सालस आज्ञाधारकपणा नाहींसा होण्याची त्यांना भीति कशी वाटते, प्रत्यक्ष रशियाच्या स्वारीपेक्षां रशियाच्या स्वारीच्या निवळ भीतीनेंच हिंदुस्थानचा तोटा अधिक कसा झाला वगैरे गोष्टी जुन्या असल्या तरी मि. हौटन यांनीं त्या नव्याप्रमाणें चित्ताकर्षक करून मांडल्या आहेत. ब्युरोक्रसीचा म्हणजे यंत्राधीन राज्यपद्धतीचा मुगट मि. हौटन यांनीं लॉर्ड कर्झन यांच्या डोक्यावर घातला आहे. एकीकडे तोंडानें कारभाराची ही यंत्राधीनता घालविण्याविषयीं लॉर्ड कर्झन मोठमोठ्यानें बोलत असतां दुसरीकडे हातून मात्र त्या यंत्राचे स्क्रू पिळून बळकट करण्याचीच त्यांची कृति

चालली होती, हें ग्रंथकारानें चांगलें दाखविलें आहे. हिंदुस्थानचा विषय निघाला कीं, पार्लमेंटांत " आतां आपण पक्षभेद सोडून वागलें पाहिजे " असें दोनही बाजूचे सभासद बोलत सुटतात याचें खरें इंगित काय ? हें मि. हौटन यांनीं मार्मिकपणें सागितलें आहे. तात्पर्य, ब्युरोक्रसी पद्धतीच्या अगदीं अंतरंगांत ज्याला खेळावयास मिळालें अशा चौकस व मार्मिक अधिकाऱ्यानें तिचे दोष जसे सांगावे तसे मि. हौटन ह्यांनीं सांगितले आहेत. पण या दोषदर्शनापेक्षांहि ब्युरोक्रसीच्या ठिकाणीं डिमॉक्रसी येणें जरूर कां आहे—राजसत्तेचें यंत्राधीनत्व जाऊन ती हळूहळू लोकाधीनच कां व कशी झाली पाहिजे, याचें वर्णन मि. हौटन यांनीं विशेष मनोरंजक रीतीनें केलेलें आहे. परंतु तो भाग पुढील लेखांकावर टाकणें आहे.

## लेखांक २

(ता. १७ नोव्हेंबर १९१४)

यंत्राधीन राज्यपद्धति वाईट हें तर ठरलेंच; पण केव्हां ? तर ती केवळ साधन या नात्याचें आपलें स्थान सोडून साध्याचेंच स्थान पटकाविण्याच्या बेतांत असते तेव्हां. यंत्र हें चांगलें खरें; पण तें जोंपर्यंत आपणाला गुलामाप्रमाणें—निदान चाकराप्रमाणें—वागवितां येतें तोंपर्यंत. ही पायरी सोडून यंत्र हेंच जेव्हां धनी होऊन आपणास गुलाम करूं पाहील, तेव्हां त्या यंत्राचें आपण कौतुक करणार नाहीं हें उघड आहे. त्याचप्रमाणें राज्यकारभार हा एखाद्या यंत्राप्रमाणें बिनबोभाट, सुरळीत व पद्धतशीर चालणें हें इष्ट आहे; पण ती पद्धतच जर इतकी शिरजोर होईल कीं, जनता किंवा प्रजा यांच्या मानापेक्षां पद्धतीचाच मान वरचढ होऊं पाहील, तर ती पद्धति अनिष्टच मानावी लागेल. ब्युरॉक्रसी ( यंत्राधीन राज्यपद्धति ) ही ऑटॉक्रसी ( एकतंत्री राज्यपद्धति ) पेक्षां कांहीं कांहीं बाबतींत पुष्कळ चांगली हें निर्विवाद आहे; किंबहुना कोणत्याहि सुधारलेल्या राज्यकर्त्यांची अमदानी शांततासुखांत पुष्कळ दिवस नांदूं लागली म्हणजे त्यांच्या राज्यकारभाराला यंत्राधीनतेचें स्वरूप येणें अपरिहार्यच आहे. पण राजकीय सुधारणेचा प्रवास तेथेंच संपूं शकत नाहीं. सुधारलेल्या राज्यकारभाराचें अंतिम ध्येय म्हणजे राजसत्ता लोकांच्याच हातीं जाणें. राजकीय शहाणपणा आणि सदिच्छा हीं दोघे हें अखेरचें मकाण गांठण्यास निघालीं असतां ब्युरॉक्रसीची पद्धति ही त्यांना निम्म्या वाटेवर मुक्काम करण्याची धर्मशाळा किंवा रहदारी बंगला म्हणून उपयोगीं पडण्यासारखी असते. पण रहदारी बंगल्यां-

तला बागबगीचा किंवा मोकळें हवापाणी मनाला सोईचें किंवा सुखकर वाटलें म्हणून घरच्या मकाणाला जाण्यास निघालेला मनुष्य तो बेत सोडून रहदारी बंगल्यांतच कायमचें बिऱ्हाड करीत नाहीं. तसेंच ब्युरॉक्रसी ही वाटेच्या कामापुरतीच चांगली, पण तिला कांहीं घराची किंमत येऊं शकत नाहीं.

असो; मि. हौटन म्हणतातः—" इंग्रज सरकारच्या राज्यांत अधिकारी लोक पूर्वींच्या अमदानींपेक्षां पुष्कळ न्यायी आहेत ही गोष्ट कांहीं खोटी नाहीं. पण अधिकारी न्यायी असला म्हणून सर्व सत्ता त्याचेच हातीं असावी, लोकांचे हातीं सत्ता असण्याचें कारण नाहीं, अशी कोणीही कबुली देणार नाहीं.केवळ अधिकारी वर्ग न्यायी आहे एवढ्यानें प्रजेच्या सर्व आकांक्षांची परिसमाप्ति कशी होणार "! नाठाळ यंत्रापेक्षां सुरळीत चालणारें यंत्र अधिक चांगलें हें खरें; पण हा तर–तम भाव दोन यंत्रांतच तुलना करावयाची असेल तेव्हां! ज्यांना स्वराज्याचीच आकांक्षा आहे त्यांना जुन्या एकतंत्री अधिकाऱ्यांपेक्षां नवे एकतंत्री अधिकारी अधिक न्यायी असतात असें सांगून त्यांचें कसें समाधान होणार ? पण ही गोष्ट स्वतः ब्युरॉक्रसीला अद्याप नीट समजत नाहीं. मि. हौटन निराशेनें विचारतात,

" Will a bureaucracy ever learn that mechanical accuracy like that of a drilled automaton, is no substitute for the life or spirit of living organism "

सदर ग्रंथकाराच्या मतें ब्युरॉक्रसी पद्धतीचे हे दोष सरकारच्या व लोकांच्या जितके लवकर लक्षांत येतील तितकें बरें; नाहीं तर ब्युरॉक्रसीनें बंद केलेल्या लोकसत्तेच्या द्वाराच्या बिजागऱ्या कालांतरानें गंजून जातील व मग तें दार कोणीहि उघडूं शकणार नाहीं. कारण कोणतीहि सुधारणा पुढें आली म्हणजे तिच्यासंबंधीं पहिला प्रश्न येऊं लागेल तो हा कीं, या सुधारणेनें अधिकाऱ्यांच्या अधिकारास कमीपणा किती येईल ? त्या सुधारणेपासून प्रजेचें हित किती होईल हा प्रश्न सहसा सुचणार नाहीं, व सुचला तरी तो मागें पडेल. मि. हौटन म्हणतातः–" प्रजाजनांना नेहमींच जर लहान मुलांसारखें वागविलें आणि त्यांची व जबाबदारीच्या कामांची फारकत केली तर, त्यांच्यामध्यें कर्तृत्व येणार कसें ! " लॉर्ड कर्झन यांनीं एका वेळीं अशी विनोदानें तक्रार केली कीं, 'पेशावरच्या कोंपऱ्यांत झाडावर बसलेल्या चिमणीनें जरी आपले पंख फडफडावले

तरी, तिच्या पोटांतलें कळसूत्र कलकत्त्याहून गव्हर्नर-जनरलानेंच हलविलें अशीहि शंका घेण्यास लोक मागें पुढें पहात नाहींत.' पण आम्ही म्हणतों यांत लोकांचा तरी काय दोष? गव्हर्नर-जनरलानें पेशावरच्या चिमणीचेंहि बस्तान संभाळलें पाहिजे, अशी जर राज्यपद्धतीची नियतच ठरून गेली आहे तर, गव्हर्नर-जनरलाचा श्वासोच्छ्वास व पेशावरच्या चिमणीची हालचाल यांचा कार्यकारणभाव लोकांनीं तरी कां लावूं नये? लॉर्ड मिंटो यांनींहि एक वेळ असें बोलून दाखविलें कीं, एखाद्या 'अधिकाऱ्याकरितां बांधण्यांत येणाऱ्या नवीन बंगल्यांत न्हाणी घर आहे कीं नाहीं याचीहि चौकशी करण्याचा मला एखाद् वेळ प्रसंग येतो.' बरोबरच आहे; कां न येईल? कारण ब्युरोक्रॅटिक राज्यपद्धतींत अधिकारसूत्रांचें एकीकरण करण्याची संवयच इतकी माजलेली आहे कीं, जें होतें तें तसेंच व्हावयाचें! लोकांना करावयालाच जर तुम्हीं कांहीं ठेवलें नाहीं तर त्यांना येणार तरी काय? अर्थातच पौरुषात्मक असे सर्व सद्गुण कुजून जाऊन निरुपयोगी सालसपणा व आज्ञाधारकपणा हेच शिल्लक उरतील. पूर्वी चिनांत खुज्या मनुष्यप्राण्यांचें मोठें कौतुक असे व बाजारांत त्यांना फार किंमत येई म्हणून पुष्कळ लोक खुजीं मनुष्यें बनविण्याचा धंदाच करीत. त्यांनीं तान्हीं मुलें चोरून न्यावीं आणि रांजणांत घालून त्यांच्या वाढीचे दिवस संपून जातपर्यंत त्यांना तशींच रांजणांत ठेवावीं. अर्थात् रांजणांत वाढलेलीं मनुष्यें शरीरानें व मनानें खुजींच निपजावयाचीं!

आतां ब्युरॉक्रसीच्या अंगीं कांहीं कांहीं गुण फार उत्कृष्ट आहेत. विशेषतः ब्युरॉक्रसीचे घटकावयव असे जे सिव्हिलियन ते तर व्यक्तिशः किती चांगले असतात हें सांगावयास नको. खुद्द विलायतेंत उत्तमांतलें उत्तम शिक्षण त्यांना मिळालेलें असतें. पुष्कळ सिव्हिलियन लोक इतके विद्वान् असतात कीं, ते कॉलेजांत प्रोफेसर नेमले असतां प्रोफेसर म्हणविणारापेक्षांहि अधिक नांव करतील! त्यांना जगाचा इतिहास माहीत असतो. त्यांना मनुष्यस्वभावाची ओळख असते. आणि विचार व कृति या दोहोंतीलहि शहाणपण त्यांचे अंगीं असतें. पण त्यांच्यामध्यें मुख्य दोष हा असतो कीं, हातीं आलेली सत्ता त्यांना गमवावीशी वाटत नाहीं. पण कोणच्याहि देशांतील राज्यकारभाराचा चांगुलपणा अधिकारी कसे आहेत, यावरून ठरवावयाचा नसून, ते ज्यांच्यावर राज्य करतात ती प्रजा कशी काय आहे यावरूनच ठरविला पाहिजे. या प्रजाजनांपैकीं जर बराच मोठा वर्ग नादान असेल,

त्यांच्यांत धैर्य, स्वावलंबन, स्वाभिमान इत्यादि गोष्टी नसतील तर, मि. हौटन म्हणतात, मी तरी तें राज्य चांगलें असें म्हणणार नाहीं. ही गोष्ट हिंदी लोकांनाहि आतां समजूं लागली आहे; व मनोजागृतीविरुद्ध बोलून त्यांची गाढ निद्रा तशीच कायम ठेवणें शक्य नाहीं.

यानंतर मि. हौटन यांनीं हिंदुस्थानांतील अस्वस्थतेनें गेल्या आठ दहा वर्षांत जीं अनेक रूपें धारण केलीं त्यांची कार्य-कारण-भाव-मीमांसा केली आहे. पण त्याचा सारांशहि देण्याच्या भानगडींत आम्ही पडूं इच्छित नाहीं. त्यांपैकीं फक्त आम्ही एवढेंच नमूद करतों कीं, अधिकारी लोक वादाशिवाय व केवळ स्वेच्छेनें आपले अधिकार देऊन टाकतील अशाविषयीं हौटनसाहेबांची जवळ जवळ निराशाच झाली आहे. एक येथील लोकमत किंवा त्याहून वरचढ असें विलायतेंतील तरी लोकमत त्यांच्या मानगुटीस बसेल तेव्हांच ते प्रजेस अधिकारदान करतील. एकवार हातीं आलेला अधिकार आपल्या हातानें घालविणें हें त्यांस पाप वाटतें. कोणतीहि सुधारणा कोणीं त्यांस सुचविली तर तिच्या अंगीं असणाऱ्या नसणाऱ्या दोषांची सेना उभी करून ते त्यांना पहिल्याच दमास भिववून सोडतात ! सुधारणेचें तत्त्व जर चांगलें असेल, तर तिच्या अंगचे व्यावहारिक दोष कालांतरानें घांसूनपुसून आपोआप निघून जातीलच ही गोष्ट त्यांचे लक्षांत येत नाहीं. जोंपर्यंत हिंदी लोक जुन्या कल्पनांनींच वेढले गेलेले होते तोंपर्यंत ब्युरॉक्रसी पद्धतीचें त्यांना कांहीं वाईट वाटलें नसतें. पण ती स्थिति आतां राहिली नाहीं. बहुजनसमाज अजून परंपराभिमानी असला तरी त्याचे पुढारी नवीन विचार ग्रहण करण्यास समर्थ झाले आहेत; आणि बाणाची योग्यता ठरवावयाची तर ती मागच्या लांबलचक काठीवरून न ठरवितां तिच्या तोंडास लावलेल्या पोलादी फळावरूनच ठरविली पाहिजे.

वस्तुस्थिति व इष्ट स्थिति यांजमध्यें जर असा फरक आहे तर तो नाहींसा होण्यास उपाय तरी काय करावा ! या प्रश्नाचें उत्तर देण्याचा मि. हौटन यांनीं प्रयत्न केला आहे. त्यांच्या मतें पहिला उपाय हा कीं, हल्लींचे सिव्हिलियन लोक ऑक्सफर्ड व केंब्रिजसारख्या एकतंत्री राज्यपद्धतीला अनुकूल अशा वातावरणांतून तयार होऊन येतात ही स्थिति बदलून टाकावी; सिव्हिल सर्व्हिस परीक्षेचें वयहि कमी ठेवावें, असें त्यांनीं सुचविलें आहे. पण सिव्हिल सर्व्हिसची एकच परीक्षा व तीहि विलायतेंतच घेतल्यामुळें हिंदी विद्यार्थ्यांना हल्लींहून अधिकच

अडचण होणार. अर्थात् तिकडील परीक्षेचें वय वाटेल तर कमी करावें, पण इकडेहि परीक्षा ठेवावी हा उपाय उघड दिसतो. मि. हौटन यांच्या मतें, मोर्ले–मिंटो यांच्या हातून झालेल्या कौन्सिलच्या सुधारणे- पासून बरेंच कार्य झालें आहे व होणार आहे. सर्व अशुभवाद्यांची फजिती करून कौन्सिलांत गेलेल्या लोकप्रतिनिधींनीं हिंदुस्थानचें खरें लोकमत काय आहे व तें निर्भीडपणानें आपली छाप दुसऱ्यावर ठेवून बरोबरीच्या नात्यानें कसें बोलून दाखवितां येतें हें दाखविलें आहे. मि. हौटन यांनीं स्वतः सुचवि- लेली विशेष सुधारणा म्हणजे अशी कीं, व्हाइसरॉयसाहेबांच्या कौन्सिलांत, एका सेनापतीखेरीज करून बाकी सर्व सभासद बिन अधिकारी–खासगी लोक– असावे. त्यांची नेमणूक व्हाइसरॉयांनीं स्टेट सेक्रेटरीच्या मंजुरीनें करावी. व्हाइसरॉयांच्या जागीं जर स्वतंत्र विचाराचा मनुष्य हवा म्हणून तो विलायतेहून आणावयाचा, तर त्याचें धोरण यशस्वी करण्यास त्यानें निवडलेलीं स्वतंत्र विचाराचीं बिन अधिकारी माणसेंच कां देऊं नयेत ! स्वतंत्र धोरणाचा म्हणून मनुष्य आणावयाचा आणि त्याला सेक्रेटरिएटच्या काटेरी पिंजऱ्यांत घालून ठेवावयाचा तर त्याच्या स्वतंत्रपणाचा काय उपयोग ? स्वतंत्र देशांत ज्याप्रमाणें मुख्य प्रधान आपलें प्रधानमंडळ निवडून घेतो, किंवा प्रत्येक खात्याचे हेड कारकून किंवा शिरस्तेदार हे कायमचे अधिकारी असले तरी, खात्यावर अंमल चालविणारा प्रधान हा खाजगी मनुष्यच असतो, तीच पद्धति हिंदुस्थानासहि कां लागू करूं नये ? कारण राष्ट्राच्या आत्म्याशीं संबंध पावणारे किंवा त्याचें भवितव्य निश्चित करणारे जे प्रचंड प्रश्न असतात त्यांचा विचार करण्यास योग्य अशी व्यापकदृष्टि व उदार मन जन्मभर अधिकाराच्या आकुंचित रंगणांतच फेर धरलेल्या अधिकाऱ्यास असत नाहीं. तसेंच ‘ प्रांतिक गव्हर्नर नेमावयाचे तेहि बिनअधिकारी लोकच कां नेमूं नयेत ’ ? असाहि प्रश्न मि. हौटन यांनीं विचारला आहे. गव्हर्नर बिनअधिकारी नेमला म्हणजे तेवढ्यानें तो सर्व गाडेंच्या गाडें उलथून टाकतो असें नाहीं. कायमच्या तज्ज्ञ अधिकारीवर्गाच्या मतास त्याला मान हा द्यावाच लागेल; पण प्रत्येक प्रश्नावर लोकहिताच्या बाजूनें म्हणून जो प्रकाश पाडावयास पाहिजे तो तरी त्यास पाडतां येईल. दुसराहि एक उपाय म्हणून मि. हौटन यांनीं असा सुचविला आहे कीं, प्रांतिक कौन्सिलांना आहे याहून अधिक स्वातंत्र्य असावें. वरिष्ठ कायदे-

कौन्सिलचे सभासद इतके नसले तरी चालतील. या कौन्सिलला प्रांतिक सरकारच्या कारभारांत हात घालण्याचा अधिकार फारच मर्यादित असावा. जिल्हाधिकाऱ्यांनाहि लहानशीं कौन्सिलें द्यावीं. व जिल्ह्याचें पुष्कळसें काम त्यांजकडे सोंपविण्यांत यावें. तात्पर्य, मि. हौटन यांनीं सुचविलेले उपाय प्रांतिक स्वराज्य व अधिकारविभागणी याच स्वरूपाचे आहेत.

शेवटीं खुद्द सिव्हिल सर्व्हिसच्या लोकांना उद्देशून मि. हौटन यांनीं जे कळकळीचे चार शब्द सांगितले आहेत, त्यांचा तेवढा उल्लेख करूं. प्रथम सिव्हिल सर्व्हिसचें यथार्थ गुणवर्णन करून ते त्यांना म्हणतातः—" तुम्ही आजपर्यंत हिंदी प्रजेवर केलेल्या उपकारांची गणति कोण करूं शकेल ? पण तुम्ही होऊन नकळत त्यांना स्वदेशाभिमान शिकविलात तो उपकार सर्वांहून श्रेष्ठ आहे. त्या स्वदेशाभिमानानेंच प्रेरित होऊन ते लोक आतां डिमॉक्रसीच्या दाराशीं येऊन आम्हांला आंत जाऊं द्या असें विनवीत आहेत. त्यांची विनंति मान्य कां करांना ? या दारांतून तुम्ही बाजूस होऊन त्यांना आंत सोडण्याची वेळ आली आहे. तुम्ही आतां बाजूस सरण्यांतच शहाणपण आहे व सन्मानहि आहे. अधिकारारूढ होतांना जें तेज तुमच्या तोंडावर होतें त्याहीपेक्षां अधिक उज्वळ असें तेज, तो अधिकार हिंदी लोकांच्या हातीं समर्पण करण्याच्या वेळीं तुमच्या तोंडावर झळकूं लागेल. जहाज बांधून पुरें झालें म्हणजे तें कप्तानाच्या हातीं देऊन चालूं लागलेलें पाहणें हाच खरा आनंद व स्वार्थत्याग, हीच खरी सेवा. " मि. हौटन यांची ही एकंदर विचारसरणी पाहून त्यांचें उदार-मतवादित्व किती अस्सल व उच्च दर्जाचें आहे हें कोणासहि सहज कळून येईल.

---

## ४५ आमचे निंदक आम्हीच कसे !

(ता. १८ जानेवारी सन १९१६)

अँग्लो-इंडियन पत्रकारांच्या दृष्टीनें पाहूं गेल्यास आम्हीं हिंदी लोक स्वराज्यास केव्हांहि पात्र असणार नाहीं, या गोष्टीचा उल्लेख मागील लेखांत केलाच आहे. पण आम्हांस या पत्रकारांची साक्ष खरोखर इतकी नडत नाहीं, तर आमच्यांतीलच कांहीं लोक जेव्हां या पात्रतेविषयीं शंका उत्पन्न करतात तेव्हां तीच आम्हांस विशेष नडते. पुराव्याच्या कायद्याप्रमाणें स्वतःच्या हितसंबंधांविरुद्ध स्वतःच दिलेली कबुली किंवा केलेलें विधान हें जितकें मारक होतें तितकें दुसरें

कोणतेंहि होत नाहीं. तो पहिल्या प्रतीचा ग्राह्य पुरावा मानला जातो, व तो खोडून काढण्यास फार परिश्रम पडतात. विशेष मौज ही कीं, असल्या एका प्रतिकूल पुराव्याविरुद्ध अनुकूल असे दहा पुरावे आणले तरी त्यांचा जोर तितका चालत नाहीं. हें पूर्णपणें जाणून स्वराज्यविरोधी परके लोक असले पुरावे मिळविण्याची व ते थाटामाटानें जगापुढें मांडण्याची योग्य काळजी बाळगतात. उलट आमच्या लोकांच्या मात्र हा कावा लक्षांत न येऊन व प्रांजलपणा हेंच महापुण्य मानून ते हिंदी लोकांच्या अपात्रतेविषयीं शंकाकुशंका व्यक्त करीत सुटतात, यामुळें धूर्ततेला धूर्ततेचा विरोध व्हावा तो न होतां भोळ्याभाबड्या प्रांजलपणाची मदतच होते. पण देशाभिमान, न्यायबुद्धि व औदार्य या तीनहि गुणांच्या दृष्टीनें हिंदी मनुष्यानें हिंदी राष्ट्रास स्वराज्याला नालायक म्हणणें हें समर्थनीय ठरत नाहीं. देशाभिमानाची दृष्टि तर सरळच आहे. देशाभिमानाच्या सबबीवर कोणताहि नैतिक गुन्हा क्षम्य होत नसेल; पण कोणीं केवळ स्वदेशाच्या प्रेमाखातर स्वदेशाची स्तुति केली, निंदा करण्याचें नाकारलें, व या दोनहि बाबतींत, असेंहि समजूं कीं विचाराआगळा आचार केला, जाणूनबुजून थोडीशी अतिशयोक्ति केली—तरी ती कोणत्याहि देशांत भूषणास्पदच मानली जाते; मग हिंदुस्थान हाच त्या नियमाला अपवाद मानावयाचा असला तर मात्र गोष्ट वेगळी! प्रत्येकाचीं आईबापें हीं वस्तुतः माणसेंच असतात; पण एखाद्या मुलाला त्यांचे दोष दिसत असतांहि त्यानें त्यांच्या ठिकाणीं जर अति—मानुषत्वाची भावना ठेवली व भावनेप्रमाणें उद्गार काढले, तर त्याच्या या कृत्याची गणना दोषांत न होतां, गुणांतच होईल. औदार्याच्या दृष्टीनें तर अधिक बोलावयासच नको! औदार्य याचा अर्थच योग्यतेपेक्षां अधिक संभावना; व तीहि जाणूनबुजून. औदार्य हें व्यक्तिविषयक स्वार्थापासून अलिप्त असल्यानें तदंतर्गत अन्याय हा नैतिक गुणच ठरतो; आणि त्याला अप्रामाणिकपणा असें दोषास्पद नांव कोणी देत नाहीं. अर्थात् हिंदुस्थान स्वराज्यास अपात्र ठरविणारांना आम्ही असें विचारतों कीं, मुळीं स्वदेशाचे दोषच न दिसण्याइतका उज्ज्वल देशाभिमान तुमच्यामध्यें नसला, तरी स्वदेशाचे दोष दिसल्यास ते निष्ठुरपणानें पुढें न आणण्याइतका उदारपणाहि तुमच्यामध्यें असूं नये काय ?

पण आमच्यांतील कांहीं लोक स्वतः इतक्या असामान्य किंवा अति—मानुषकोटींतील असल्याचा बहाणा करितात कीं, न्यायाशिवाय दुसरी दृष्टिच ते

ओळखीत नाहींत. व्यवहारामध्यें सरकारी न्यायाधीशसुद्धां 'सरकारी' काम संपलें म्हणजे आपला पोषाख उतरून ठेवतो व नंतर इतर सर्व दिवसभरच्या व्यवहारांत तो आपला न्यायाधीशपणा विसरून जातो; पण स्वराज्याला हिंदुस्थान अपात्र ठरविणाऱ्या आमच्या कित्येक नेमस्त न्यायमूर्तींना आपली तांबडी झूल आणि आपले शुभ्र अजागल–स्तन केव्हांहि उतरून ठेवतांच येत नाहींत. जुन्या पौराणिक नाटककंपन्यांतील राक्षसपार्टी नटांप्रमाणें नाटक संपलें तरी त्यांचें त्या पोषाखावरील प्रेम संपत नाहीं. आमच्या न्यायनिष्ठ न्यायमूर्तींना आई-बाप या नांवाचा विसर पडून घरींसुद्धां ते वादी–प्रतिवादी या भाषेंत त्यांच्याशीं बहुधा बोलत असावे ! पण त्यांच्या लक्षांत हें येत नाहीं कीं, सगळे हिंदी लोकच जर स्वतः हिंदुस्थानचा 'न्याय' करण्याला न्यायाधीश होऊन बसूं लागले तर बिचाऱ्या हिंदुस्थानाला वकील तरी कोण मिळावा ? न्यायकोर्टांतसुद्धां साधारण असा नियम असतो कीं, आरोपीला वकील नसेल तर न्यायाधीशानें कोर्टांतील एखाद्या वकिलास त्याचें काम करण्यास सांगावें व स्वतः त्याला योग्य इन्साफ मिळण्याकरितां मदत करावी. पण हिंदुस्थान इतक्या शिकंदर कमनशीबाचा आरोपी म्हटला पाहिजे कीं, त्याला अपात्रतेच्या गुन्ह्याकरितां फांशी देण्यासाठीं काळी टोपी चढवून सर्व परकीय मुत्सद्दी व वावदूक तयार झाले असतां त्याचा बचाव करण्याला हिंदी मुत्सद्यांना वकील म्हणून उभें राहण्यास लाज वाटावी व त्यांनींहि स्वतः शिष्टाईचें पीठ सोडून न्यायपीठावर जाऊन बसण्याची हांव धरावी ! या न्यायाधीशांची एक मात्र मौज ध्यानांत ठेवण्यासारखी आहे ती अशी कीं, त्यांना सर्व हिंदुस्थान जरी स्वराज्यास नालायक वाटलें तरी सुदैवानें व्यक्तिशः त्यांना कसल्याहि मोठ्या अधिकाराला आपण, स्वतः नालायख आहों असें वाटत नाहीं. स्वतः त्यांची महत्त्वाकांक्षा जितकी दूरवर जाऊं शकते तेथपर्यंत हिंदुस्थानांत एक व्यक्ति तरी मोठ्या मानाच्या व मोठ्या पगाराच्या जागेला योग्य असतेच असते; मग ती जागा हायकोर्टाच्या 'जज्जा' ची असो किंवा कौन्सिलदारीची असो. त्यांची न्यायबुद्धि त्यांना साफ सांगतेच कीं, तुम्हीं या जागेला योग्य आहां येवढेंच नव्हे, तर त्यांचा डोळा जीवर आहे अशी एखादी वरिष्ठ जागा त्यांना न देतां ती दुसऱ्यास, फार काय पण त्यांना सदैव हिंदी लोकांहून सत्पात्र वाटणाऱ्या एखाद्या युरोपियनास मिळाली तरी ते आकाश–पाताळ एक करून सोडतात, आणि

एखाद्या माथेफिरू जहालानें सुद्धां बोलूं नये असले शब्द ते सरकारास खाजगी रीतीनें बोलण्यास तयार असतात. पण त्यांची न्यायबुद्धि त्यांना स्वतःपलीकडे दुसरा मात्र कोणी कशास पात्र आहे असें सांगतच नाहीं. आज ज्या जागा कधीं नेटिव्हास देण्यांत येत नाहींत त्या जर उद्यां जहालांच्या उद्योगामुळें व चळवळीमुळें सरकारानें नेटिव्हांना देण्यास काढल्या तर त्याहि पत्करण्याची त्यांची एका पायावर तयारी होईल. त्यांची पात्रता त्याच पावलीं वाढेल; पण ती फक्त त्यांच्या स्वतःपुरती ! पब्लिक सर्व्हिस कमिशनपुढें ज्यांनीं हिंदी समाजास अपात्र ठरविलें त्यांनाच जर उद्यां लेफ्टेनंट गव्हर्नर किंवा व्हाइसरॉय नेमण्यास काढलें, तर ते केवळ एक वेळ लगबगीनें आरशांत पाहून, व सर्व क्षौर केला नसल्यास मिशीला पीळ भरून, लागलीच मागें वळून तो मान घेण्यास मीं तयार आहें—एवढेंच नव्हे तर मीं पात्र आहें—असें बेधडक सांगतील. पण हिंदी लोक स्वराज्याच्या अधिकारास पात्र आहेत काय असें त्यांस विचारा, कीं लगेच त्यांनीं ‘ अपात्र ’ असें उत्तर दिलेंच ! व्यक्तिदृष्ट्या वर सांगितल्याप्रमाणें स्वराज्यांतील प्रत्येक जागेस व अधिकारास हिंदुस्थान पात्र असतो, पण समष्टिरूप स्वराज्यास मात्र तो अपात्र ठरतो, हें आश्चर्य नव्हे काय !

पण या आपमतलबी न्यायाधीशांना मूर्ख ठरवूनच नुसतें भागत नाहीं. एखादा मनुष्य स्वार्थसाधु नसतां केवळ प्रामाणिकपणानेंहि तो असलें मत देण्याचा संभव असतो; याकरितां अशाहि टीकाकाराच्या टीकेस उत्तर द्यावें लागतें. तें उत्तर हेंच कीं, प्रामाणिक मनुष्याचेंहि मत चूक असूं शकतें, व या ‘ अपात्रते ’ च्या मताचीहि गोष्ट अशीच आहे. मत चूक होण्याला बुद्धीची आकलनशक्ति तरी कमी पडावी लागते, किंवा एखादी गोष्ट बुद्धिग्राह्य होण्यासारखी असली तरी मनुष्याच्या बुद्धींत करारीपणा नसतो, कल्पनाशक्ति कमकुवत असते, किंवा आत्मविश्वास नसल्यानें व्यर्थ शंका कुशंका मनाला आपल्या जाळ्यांत ओढतात. स्वराज्यविषयक पात्रतेसंबंधानें आमच्यांतील चांगल्या चांगल्या म्हणविणारांचीहि स्थिति अशीच झालेली आढळून येते. सर्व जन्म परदास्यांत किंवा दुसऱ्याच्या ओंजळीनें पाणी पिण्यांत गेलेलों असल्यामुळें स्वतःच्या जबाबदारीवर कोणतीहि गोष्ट करण्याची संवय झालेली नसते. जबाबदारी चुकून एखादे वेळीं अंगावर पडली तरी ती आपल्या हातून पार पडली न पडली याविषयीं दुसरा कोणी, अर्थात् वरिष्ठ, काय म्हणेल ही काळजी व भीति मनांत

नित्य जागृत असते. व पुष्कळ वेळां ती जबाबदारी उत्कृष्ट पार पडली असतांहि शाबासकी मिळून ' क्लेशः फलेनहि पुनर्नवतां विधत्ते ' असें होण्याचा सुप्रसंग न येतां वरिष्ठांच्या असूयेमुळें, त्यांच्या दौषेकदृष्टिदोषानें, चांगलें काम वाईट ठरतें निदान वादग्रस्त तरी होऊन राहतें; व वरिष्ठा-कनिष्ठांतला न्याय निवडण्यास अधिकारयुक्त न्यायाधीश नसतो यामुळें आपली खरी योग्यता आपणास कळत नाहींशी होते. पंचतंत्रांतील गोष्टींत वाघाच्या बच्चयाला चुकून आपलें रूप पाण्यांत पहावयास सांपडल्यानें त्यास आपण वाघच आहों असें प्रत्यभिज्ञान झालें; परंतु हिंदी लोकांच्या प्रस्तुतच्या स्थितींत त्यांना आपलें खरें रूप पाहण्याला निश्चळ पाणीच मिळत नाहीं; आणि जो जो परकी परीक्षक म्हणून भेटणार तो तो स्वार्थी असल्यामुळें त्यांच्या रूपाचें खरें वर्णन न करितां तुम्ही कमअस्सल नादान आहां असेंच सांगतो. यामुळें खंबीर मनहि डळमळूं लागल्यास नवल नाहीं. बंगालचे कवि रवींद्रनाथ टागोर यांनीं आपल्या एका कवितेंत दोन पोपटांचें भाषण दिलें आहे. त्यांतला एक म्हणजे स्वतंत्र संचार करणारा पोपट दुसऱ्याला म्हणजे पिंजऱ्याच्या बंदिवासांत राहिलेल्या पोपटास म्हणतोः–

' कारागत तूं कसे पसरसी पंख पंजरागारीं ! '

उघडच आहे; कारण ज्याला नित्य आकाशभर भराऱ्या मारण्याचें सुख मिळतें त्याला वीतभर पिंजऱ्यांत पंख पसरण्यालासुद्धां अडचणच वाटणार. पण दुसऱ्याला जन्मभर पिंजऱ्याची संवय झाल्यानें पंख पसरण्याची अडचण न वाटतां, उलट उभें राहण्यास मिळणाऱ्या आश्रयभूत दांडीचेंच कौतुक वाटतें म्हणून तोच उलट पहिल्यास विचारतो,

' अतल गगन हें; पद ठेविसि तूं कैसें शून्याधारीं '

तीच स्थिति आम्हां हिंदी लोकांची झाली आहे. परदास्याच्या चिरपरिचयामुळें इकडचें अंग तिकडे वळविण्यास जागा न मिळण्याइतका संकोच झाला. किंबहुना सर सत्येंद्रसिंह यांनीं आपल्या भाषणांत वर्णिल्याप्रमाणें, आमची राजकीय स्थिति पोलादी कांटेरी पिंजऱ्यांत बांधून टाकलेल्या मोडक्या तंगडीप्रमाणें दुःखद झाली तरी तिचें आम्हांस संकट वाटत नाहीं. तें दुःख सोसलेंच पाहिजे असा शांतपणें आमचा आम्हांस उपदेशहि करवतो. पण होमरूल किंवा स्वराज्य मिळालें असतां आम्ही सुखसंचार करूं असें मात्र वाटण्याचें कोणासहि धाडस करवत नाहीं ! उलट आम्ही बेफामपणें धांवून कड्यावरून खालीं तरी

पडूं अथवा कदाचित् आमचा हात धरून चालविणारा कोणी नसल्यानें आम्हांस चालतांहि येणार नाहीं—मिळून कोणत्या तरी एका रीतीनें आमचें स्वातंत्र्य हेंच आम्हांस घातक होईल—तस्मात् तें स्वातंत्र्य आम्हांस नको असें हे 'अपात्रता' वादी बेधडक मत ठोकून देतात ! यापरती दुःखाची दुसरी गोष्ट कोणती ?

---

## ४६ चळवळीची भरती भरूं लागली

(ता. २४ जुलै सन १९१७)

हिंदुस्थानच्या राजकीय प्रगतीला आतां बराच रंग चढत चालला आहे. युद्धामुळें हिंदी लोकांची राजनिष्ठा कसास लागली इतकेंच नव्हे तर उज्ज्वल देशभक्तीचा प्रखर प्रतापहि आतां सर्वांस पुरा जाणवूं लागला आहे. लोक राजनिष्ठ असूनहि देशभक्त असूं शकतात, ह्या सामान्य तत्त्वासंबंधानें कांहीं वर्षांपूर्वी आमचें सरकार साशंक होतें; पण त्यांचा तो भ्रम आतां पार उडून जाऊन राजनिष्ठेबरोबर देशभक्तिहि—परकीय साम्राज्याखालींसुद्धां—नांदूं शकते हें त्यांस आतां पुरें कळून चुकलें आहे. हिंदी लोकांच्या राजकीय आकांक्षा न्याय्य आहेत, योग्य आहेत, राजनिष्ठेवर अधिष्ठित झालेल्या आहेत, त्या पुऱ्या केल्याच पाहिजेत, हळू हळू लोकप्रतिनिधींच्या हातांत सत्ता दिलीच पाहिजे, नाहीं तर असंतोषाचा प्रखर दावानल पुनः पेटल्याखेरीज राहावयाचा नाहीं, इतकेंच नव्हे तर ज्या नेमस्तांना एका काळीं आपल्या झेंड्याभोंवतीं गोळा करूं शकणें शक्य झालें होतें तेच वयोवृद्ध, ज्ञानवृद्ध, तपोवृद्ध, नेमस्त पुढारी आतां पुनः राजकीय आकांक्षांच्या सफलतेच्या अभावीं आपल्या झेंड्याभोंवतीं गोळा होणें शक्य नाहीं, ह्या सर्व गोष्टी आज आमच्या राज्यकर्त्यांस स्पष्टपणें दिसत आहेत. अमेरिकेंतील संयुक्त संस्थानांतून स्वातंत्र्यप्राप्तिच्या युद्धाच्या वेळीं राजनिष्ठ म्हणून हद्दपार झालेल्या व लाचार होऊन कॅनडांत आश्रय करून राहिलेल्या राजनिष्ठांनींच ज्याप्रमाणें कॅनडाच्या इतिहासांत स्वराज्याची चळवळ करून कॅनडास स्वराज्यालंकृत केलें त्याचीच आज हिंदुस्थानांत थोडीबहुत पुनरावृत्ति होत आहे. राजनिष्ठ म्हणून राजमान्य झालेले नामदार व राजनिष्ठच पण लोकमान्य झालेले सरदार राष्ट्रीय सभेच्या व मुस्लीमलीगच्या व्यासपीठावरून स्वराज्याचा प्रणवोच्चार करीत आहेत, स्वराज्यसंघास उघडपणें येऊन मिळत आहेत

व अमुक अमुक हक्क आम्हास मिळालेच पाहिजेत अशी नेटानें, निश्चयानें, एकमतानें राज्यकर्त्यांशीं आग्रहाची मागणी करूं लागले आहेत. सरकारनें आपल्या संशयाला बळी पाडलेले राजनिष्ठ देशभक्त व आपल्या बगलेंत घेऊन चुचकारलेले राजनिष्ठ देशभक्त हे दोघेहि हातांत हात घालून एकदिलानें, एकमतानें स्वराज्याचा सत्याग्रह धरण्यास तयार होत आहेत. तेव्हां हिंदुस्थानच्या भाग्योदयाचें हें प्रसादचिन्हच आहे असें कोण म्हणणार नाहीं ? आणि हें उघडच आहे कीं, खुद्द इंग्लंडच जर आज स्वातंत्र्याची ध्वजा फडकवीत हिंदी व आंग्ल वीरांचे प्राण खर्चीं घालून जर्मनीनें चिरडलेल्या छोट्या मोठ्या राष्ट्रांच्या स्वातंत्र्याचें डळमळणारें सिंहासन संभाळून धरूं पहात आहे तर तेंच इंग्लंड आज हिंदुस्थानास साधें स्वराज्य, स्वातंत्र्य नव्हे, कोणत्या तोंडानें नाहीं म्हणणार ? आणि म्हणूं लागलेंच तर तें कोणता अस्सल राजनिष्ठ देशभक्त ऐकून घेणार ? देशभक्तीचें आणि राजनिष्ठेचें ध्येय एकच ठरल्याबरोबर सर्व आड पडदे दूर झाले, सर्व संशय मावळले, सर्व भांडणें मिटलीं, आणि राजनिष्ठ तोच देशभक्त आणि देशभक्त तोच राजनिष्ठ अशी स्थिति येऊन पोंचल्याबरोबर हिंदुस्थानांत दोनच पक्ष उरले. एक स्वराज्यवाद्यांचा व एक त्यास आड येणाऱ्यांचा. ह्या आड येणाऱ्या पक्षांनहि राहण्यास सर्वस्वीं प्रतिकूल लोक थोडेच आहेत, किंबहुना नाहींत असें म्हटलें तरी चालेल. ह्यांत कालहरणवादीच पुष्कळ आहेत. आतांच नाहीं, इतक्यांतच नाहीं हाच त्यांचा मंत्र आहे. मात्र हिंदी स्वराज्यवाद्यांनीं कितीहि थोडें मागितलें तरीहि आतां नाहीं, इतक्यांत नाहीं, हें त्यांचें तुणतुणें चालतेंच, आणि येथेंच खरोखर सध्यां उभय पक्ष हट्टास पेटले आहेत. इतर परकीय राष्ट्रांना स्वातंत्र्य मिळवून देऊं, पण राष्ट्रीय सभेनें व मुस्लीम लीगनें कमींत कमी म्हणून मागितलेल्या मागण्याहि आम्ही तुम्हास देऊंच असें नाहीं, असें जेव्हां लॉर्ड पेंटलंड ह्यांनीं सांगितलें आणि स्वराज्याची द्वाही आपल्या खणखणीत वाणीनें आणि जोरदार लेखणीनें साऱ्या हिंदुस्थानभर प्रसृत करणाऱ्या बेझंटबाई व त्यांचे दोन अनुयायी ह्यांना जेव्हां त्यांनींच अटक केली तेव्हां "प्रजापीडनसंतापसमुद्भूत हुताशन" साऱ्या हिंदुस्थानभर भडकून, हिंदी पुढारी भराभर स्वराज्यवादाचा सत्याग्रह करण्यास प्रवृत्त होऊं लागले आहेत आणि कृतसंकल्पापासून एक रेसभरहि आम्ही मागें हटणार नाहीं म्हणून आपला दृढनिश्चय व्यक्त करूं लागले आहेत.

स्वराज्यवाद्यांचा पक्ष कसा बळावत चालला आहे हें ठिकठिकाणीं त्यासंबंधानें जे नेटानें प्रयत्न चालू आहेत त्यांवरून दिसून येईल. ह्या कामीं संयुक्त प्रांतानें तर फारच आघाडी मारली आहे. अलाहाबाद येथील सन्मान्य पुढारी ना. पंडित मदनमोहन हे ठिकठिकाणच्या पुढाऱ्यांस भेटून ह्यासंबंधानें प्रयत्न करीत आहेत. तेथील लोकमान्य व राजमान्य पुढारी डॉ तेजबहादुर सप्रू, ना. नेहरू, ना. चिंतामणी, ना. वझीर हसन, ना. शमीउल्ला बेग, महमुदाबादचे राजे, ना. गोकर्णनाथ मिश्र ह्यांनीं तर भारतमंत्री मि. चेंबरलेन व प्रधान मि. लॉइड जॉर्ज ह्यांना तारांवर तारा करून बेझंटबाई व त्यांचे अनुयायी ह्यांच्या मुक्ततेबद्दल, त्यांच्या चळवळीस नांवें ठेवल्याबद्दल आणि इतर बाबतींतहि अगदीं भंडावून सोडलें आहे. आपल्या सर्व प्रांतभर स्वराज्याची चळवळ चालवण्याकरतां स्वराज्यसंघाच्या शाखा स्थापून, व्याख्यानें देऊन, वाङ्मयप्रसार करून लोकांना स्वराज्योन्मुख करण्याची हे सर्व पुढारी अत्यंत आस्थेनें, कळकळीनें आणि स्वार्थ-त्यागानें चळवळ करीत आहेत; आणि एवढेंहि करून ते स्वस्थ राहत नाहींत. थोड्याच दिवसांत ते एक खास जादा प्रांतिक परिषद भरवणार असून त्यांत स्वराज्याची चळवळ करण्याकरितां काय काय उपाय योजावे, कॉंग्रेसचा स्वराज्याचा ठराव कसा अमलांत आणावा वगैरे प्रश्नांची चर्चा करून संघटित व्यवस्थित प्रयत्न करण्याच्या उद्योगांत आहेत, आणि त्यांतहि विशेष महत्त्वाची गोष्ट म्हटली म्हणजे या कामीं त्यांना मुसलमानबंधूंचें पूर्ण पाठबळ आहे इतकेंच नव्हे तर महमुदाबादचे राजे हे त्या कामीं पुढाकार घेत आहेत. संयुक्तप्रांतानें हें जें काम चालविलें आहे त्याचा अधिकारीवर्गावर कांहींच परिणाम झाला नाहीं असें नाहीं. तत्प्रांतीय अधिकारी सर जेम्स मेस्टन ह्यांनीं नुकतेंच कायदेकौन्सिलमध्यें जें भाषण केलें त्यांत त्यांनीं इतर प्रांतांतल्या गव्हर्नरांप्रमाणें होमरूलवर न गुरगुरतां तुम्ही आम्ही भाऊ–भाऊच आहोंत, इतर प्रांतिक सरकारनीं जरी कांहीं दडपशाहीचीं कृत्यें केलीं असलीं तरी वरिष्ठ सरकारचें धोरण कांहीं प्रतिगामी नाहीं, हिंदी आकांक्षा पूर्ण करण्याबद्दल सरकारच्या ज्या कांहीं सुधारणा आहेत त्या थोडक्यांतच सरकार जाहीर करणार आहे वगैरे 'शांतिरस्तु'चा उपदेश केला आहे आणि आपणास हें कबूल केलें पाहिजे कीं, कॉंग्रेसच्या वेळीं सरकारास अनिष्ट वाटणाऱ्या सर्व पुढाऱ्यांच्या संयुक्तप्रांतावर स्वाऱ्या झाल्या, त्यांनीं इतर प्रांतांत दडपेगिरीखालीं बंद केलेलीं व्याख्यानें दिलीं व तेथें होम-

रूलची चळवळहि इतर कांहीं प्रांतापेक्षां जारीनें सुरू आहे, तरी ह्या प्रांतिक अधिकाऱ्यानें बिचकून न जातां मनाचा समतोलपणा कायम ठेवून, कोणतीहि दडपेगिरी केली नाहीं, हें खरोखरच त्यांस भूषणावह आहे. हा कशाचाहि परिणाम असो; पण त्यांनीं इतर भेदरट प्रांतिक सरकारांस चांगलें अनुकरणीय उदाहरण घालून दिलें आहे यांत शंका नाहीं. इतर प्रांतिक सरकारें त्यांचें अनुकरण करतील कीं नाहीं हा प्रश्न निराळा; पण सर्व प्रकारच्या राजकीय पुढाऱ्यांस व त्यांच्या सनदशीर चळवळीस आश्रय देऊन होमरूलवर तोंडसुख न घेतां आपल्या प्रांतांत ती चळवळ सनदशीर पद्धतीनें चालली असतां व तिला इतर सरकारें भीत असतां तिच्या पुढाऱ्यांवर कोणताहि वाक्प्रहारसुद्धां त्यांनीं केला नाहीं हें सर जेम्स मेस्टन ह्यांस भूषणच आहे. असो.

बहार प्रांतांतहि ह्या स्वराज्याची चळवळ व्यवस्थित रीतीनें चालू राहील अशीं चिन्हें दिसत आहेत. ना. मझरूल हक्क, ना. कृष्ण सहाय्य इत्यादि तत्प्रांतीय वरिष्ठ कायदेकौन्सिलचे सभासद हे स्वराज्यसंघाचे सभासद असून ना. के. के. चंदा हेहि बंगालसंघाचे सभासद झाले आहेत. बहार प्रांतांत मोंघीर येथें लवकरच एक प्रांतिक परिषद् भरणार असून तिचे सेक्रेटरी व अध्यक्ष हे उभयतांहि मुसलमान आहेत. ह्या गोष्टीवरूनच तेथें हिंदुमुसलमानांचें किती सख्य आहे हें दिसून येतें. तेथील जमीनदारवर्गंहि स्वराज्य संघांत हळूहळू समाविष्ट होत असून त्यांत प्रविष्ट झालेल्या बारा जमीनदारांपैकीं पांच जमीनदार मुसलमान आहेत ही मोठ्या आनंदाची गोष्ट आहे. तेथें सध्यां चंपारण्यप्रकरण उद्भवलें असल्यामुळें पुढाऱ्यांचें पुष्कळसें लक्ष तिकडे लागलें आहे, व तें अनिवार्यहि आहे, पण तें चालू असतांहि प्रांतिक परिषदेसारख्या इतर चळवळी होत आहेत व संघाचे सभासद वाढत आहेत ही समाधानाची गोष्ट आहे.

बंगालमध्यें मुस्लीम–लीगच्या शाखेचें व स्वराज्यसंघाचें पूर्ण ऐक्य आहे असें मुस्लीम–लीगच्या शाखेनें सर्व सभासदांनीं संघास जाऊन मिळावें म्हणून जो ठराव बरेच दिवसांपूर्वी पास केला त्यावरूनच दिसून येतें. तेथें प्रांतिक संघ स्थापित झाला असून ना. रसूल, बॅरिस्टर चक्रवर्ती, दास वगैरे बडे बडे गृहस्थ संघाचे सभासद झाले आहेत. बाबू सुरेन्द्रनाथ हे मात्र संघाचे सभासद झाले नाहींत. तथापि सुरेन्द्रनाथांनीं गया येथें भाषण करतांना होमरूलविषयींची आपली पूर्ण सहानुभूति व्यक्त केली आणि कॉंग्रेसच्या व लीगच्या

चळवळींत विरोध नाहीं असें सांगितलं. शिवाय ते एकटे संघबाह्य असले म्हणून त्यानें संघाचें काम अडत नाहीं, हें इतर पुढाऱ्यांनीं त्यांच्या स्पष्टपणें निदर्शनास आणलें आहे. बाबू भूपेंद्रनाथ ह्यांनीं डेप्युटेशन पाठविण्याच्या बाबतींत जरी कसूर केली असली–व त्याबद्दल ते दोषार्ह आहेतहि–तरी हिंदी पुढाऱ्यांच्या आकांक्षा त्यांना पूर्णपणें माहीत असल्यामुळें त्यांना नुकत्याच प्राप्त झालेल्या पदावरून हिंदुस्थान सरकारनें कॉंग्रेसच्या योजनेपेक्षां पुष्कळच कमी असलेल्या ज्या सुधारणा सुचविल्या आहेत त्यांत फेरफार करून त्या कॉंग्रेसच्या योजनेस शक्य तितक्या जुळत्या करण्याविषयीं ते आपलें वजन खर्च करतील अशी त्यांच्याबरोबरच आम्हासहि उमेद आहे. त्यांतहि सध्यां दुराराध्य चेंबर्लेनसाहेब हे भारतमंत्रिपदावरून अचानक दूर होऊन त्यांच्या जागीं मि. मॉंटेग्यू ह्यांची योजना झाल्यामुळें तर वरील उमेदीस पुष्कळच बळकटी आली आहे.

मध्यप्रांत व वऱ्हाडांत तर होमरूलच्या चळवळीचें अधिष्ठान चांगलेंच आहे, कौन्सिलमध्यें उमेदवार म्हणून उभे राहणाऱ्या सद्गृहस्थांपैकीं दोन कट्टे होमरूलर असून वऱ्हाडांतील दुसऱ्या दोघांना स्वराज्यसंघाचे उमेदवार कां झालां नाहींत म्हणून मतदारांनीं पृच्छा करकरून भंडावून सोडलें आहे. रा. सा. महाजनींना रा. टिळक माझ्या येथें उतरले होते, मी कट्टा कॉंग्रेसभक्त आहें वगैरे समर्थनानें आपली बाजू सांवरावी लागत आहे, हें पाहून कौन्सिलचा सभासद होमरूलर असलाच पाहिजे एतद्विषयक चळवळीचें बीज तेथें चांगलेंच रुजलें गेलें आहे हें सांगणें नकोच.

मुंबई व मद्रास ह्या दोन इलाख्यांत काय चाललें आहे ह्याची माहिती वारंवार वाचकांच्या नजरेस येतच आहे. खुद्द सर नारायणराव चंदावरकरांसारख्यांनीं मिसेस बझंट वगैरेंना केलेल्या अटकेस बेकायदेशीर जरी नाहीं तरी बेसनदशीर म्हणून 'टाईम्स' मध्यें लेख लिहून प्रसिद्ध करावे व सरकारच्या कृत्यावर आपल्या नापसंतीचा छाप ठोकावा हा हल्लीं चाललेल्या चळवळींतील एक मोठाच विजय होय! 'टाइम्स ऑफ इंडिया' सारख्या पत्रानेंहि 'थॉटस ऑन इंडियन पॉलिटी' म्हणून लेखमाला लिहून हिंदी लोकपक्षाची बाजू उचलून धरून अँग्लो–इंडियनी पक्षास नामोहरम करावें हीहि गोष्ट कांहीं कमी महत्त्वाची न व्हे. प्रांतिक सरकारांस सध्यां आहे त्यापेक्षां जास्त स्वातंत्र्य मिळून तीं लोकपक्षाला

बरींच जबाबदार असावींत असें टाइम्सनें प्रतिपादणें व तसें १९११ सालीं सरकारनें जाहीर केलें असतां अद्यापहि त्या बाबतींत कांहीं केलें नाहीं म्हणून सरकारास दोष देणें ही गोष्ट ५।१० वर्षांपूर्वीं अशक्यच म्हणून गणली गेली असती; पण तीहि आज प्रत्यक्ष अनुभवास येत आहे. स्वराज्यवाद्यांच्या मागण्यांच्या योजनेंत ही सुधारणा अंतर्भूत झाली आहे व त्यास 'टाइम्स 'चा पाठिंबा आहे इतकेंच नाहीं तर पार्लमेंटरी कमिटीपुढें आयरिश कन्व्हेन्शनप्रमाणें अराजकांच्या प्रतिनिधींसहि आपलें मत प्रदर्शित करण्यास बोलवावें अशी सूचना टाईम्सनें करावी हें खरोखरच आश्चर्य आहे! आमच्या हिन्दी पत्रांतून जो ध्वनि अद्याप निघाला नव्हता तो 'टाईम्स'नें काढावा व साधार प्रतिपादावा ह्या गोष्टी-वरूनच हिंदी राजकीय परिस्थितीबद्दल अँग्लो-इंडियनांचादेखील दृष्टिकोन कसा बदलला आहे ह्याची साक्ष पटते. सारांश स्वराज्याच्या चळवळीस जें अनुकूल वातावरण सध्यां उत्पन्न होत आहे त्याचें हें निदर्शकच आहे, असें म्हटलें तरी चालेल.

हिंदुस्थानचे स्टेटसेक्रेटरी मि. चेंबरलेन ह्यांनीं राजीनामा दिल्यानंतर त्यांच्या जागीं कोणाची नेमणूक होते याविषयीं हिंदी लोकांस बरीच काळजी वाटत होती. पण मि. मॉंटेग्यू यांच्या नेमणुकीनें ती नाहींशी झाली आहे. मि. मॉंटेग्यू हे उदारमतवादी पक्षाचे आहेत इतकेंच नव्हे तर त्यांच्या मनामध्यें उदारमत-वादित्व खरोखरच नांदत आहे असा पूर्वीचा अनुभव आहे. हल्लींच्या विशेष परिस्थितींत त्यांचें उदारमतवादित्व विशेष कसास लागेल यांत शंका नाहीं. पण या परीक्षेंत ते उतरल्याशिवाय राहणार नाहींत असें पुष्कळांचें मन ग्वाही देत आहे. अशा प्रवृत्तीचा स्टेटसेक्रेटरी हिंदुस्थानास लाभणें हें चिन्ह बरें आहे. पण मि. मॉंटेग्यूसारखा सेक्रेटरी मिळाल्यानें हिंदी लोकांची चळवळ करण्याची जबाबदारी कमी होते कीं वाढते हा प्रश्न सहजच उपस्थित होतो व त्यास आमचें तरी उत्तर अस्तिपक्षींच आहे. ज्यांना चळवळीचें वावडें आहे, ज्यांना सुखलोलुपतेमुळें स्वतः चळवळ करवत नाहीं व परोत्कर्षासहिष्णुत्वामुळें दुसऱ्यांनीं चळवळ केली तर पाहवत नाहीं, त्यांनीं मि. मॉंटेग्यूसाहेबांसारखे गृहस्थ स्टेटसेक्रेटरी झाले आहेत तेव्हां ते आपल्या सत्प्रवृत्तीप्रमाणें गोष्टी करतीलच, आपण चळवळ केल्यानें त्यांच्या मार्गांत उगीच विघ्नें मात्र येतील, अशा प्रकारचा युक्तिवाद करूं लागल्यास आह्मांस त्यांत बिलकुल आश्चर्य वाटणार नाहीं; कारण न कर्त्यांच्या

पहा, हो, हीं आमचीं सर्टिफिकिटें ४९५

आठवड्यांत सातांहि वार शनिवारच असतात. कोणतीहि परिस्थिति येवो तिला खरा उपाय स्वस्थ बसणें हाच होय असें त्यांच्या मनानें घेतलेलें असतें. अफू खाणारा मनुष्य जसा तिच्या जिवावर सुखदुःख समान मानतो त्याचप्रमाणें शांततामृत एकदांच प्राशन करून बसलेले लोक कोणत्याहि राजकीय स्थितीला निर्विकारमनानें तोंड देतात. त्यांच्यापुढें कसलीहि परिस्थिति मांडा, त्यावर 'म्हणून या वेळीं चळवळ करूं नका' अशा शब्दांनीं ते ती समस्यापूरण करण्यास समर्थ आहेत असें आढळून येईल. सेक्रेटरी कोणीहि होवो, तो उदार असो वा अनुदार असो, यांची आपली दोहोंतून एक सबब तयारच असते. 'तो दुष्ट आहे तेव्हां कितीहि चळवळ केली तरी ती फुकट! आपण आपलें डोकें मात्र दगडावर आपटून फोडून घेऊं' किंवा "तो सुष्ट असल्यानें आपण होऊन करायाचें तें करतोंच आहों मग उगीच त्याच्या मार्गांत कांटे कां पसरा" असेंच ते म्हणणार. पण असल्या आत्मवंचक युक्तिवादाकडे हिंदुस्थानचे लोक लक्ष देणार नाहींत, व येत्या शनिवारीं भरणाऱ्या ऑल–इंडिया–काँग्रेस कमिटींतील सभासद तरी आपली पूर्ण जबाबदारी ओळखूनच वागतील अशी आम्हांस आशा आहे.

---

## ४७ पहा, हो, हीं आमचीं सर्टिफिकिटें

( ता. ३ एप्रिल सन १९१७ )

हिंदी स्वराज्याच्या चळवळीची गोळी सरकारास कितपत लागली याचा प्रत्यक्ष पुरावा मिळणें अर्थातच कठीण आहे. स्वराज्याच्या चळवळीविरुद्ध गव्हर्मेंट हाऊसच्या रम्य दिवाणखान्यांत चहापानाच्या वेळीं, किंवा सेक्रेटरीएट-च्या अंधाऱ्या खोलींत मिसलीच्या ढिगांचा फन्ना पाडतां पाडतां काय खलबतें होतात तें कोणास कळणार? पण अप्रत्यक्ष असा कांहीं पुरावा मिळूं शकतो. लॉर्ड वुइलिंग्डन यांसारख्या इलाखाधिपति लोकांनीं ही चळवळ हल्लींच्या दिवसांत करूं नये असा जो आस्थेवाईक उपदेश चालविला आहे तो वरील प्रकारच्या पुराव्यांतच पडतो. मुंबईच्या अँटि होमरूल लीगचें बाळंतपण कोठवर आलें आहे समजत नाहीं. पण मद्रासेकडे ब्राह्मणेतरवर्गानें होमरूलच्या चळवळी-विरुद्ध जणूं काय एक संघच निर्माण करून एक दैनिक वर्तमानपत्रहि काढलें

आहे. इतकेंच नव्हे तर मद्रास इलाख्यांतील कांहीं राजे लोकांनाहि कधीं नव्हे ती राजकारणाच्या वादांत पडण्याची स्फूर्ति झालेली असून ते आतां लेख लिहूं लागले आहेत व भाषणें करूं लागले आहेत! कुरूपम व कोलिंगड येथील राजांनीं आपल्या प्रांतांतील प्रमुख राष्ट्रीय पुढाऱ्यांवर शरसंधान करून लोकपक्षाचा पाडाव करण्यास कंबर बांधलेली आहे. सोन्याच्या पिंजऱ्यांतील या मुक्या पोपटांना एकदम वाचा फुटलेली पाहून कोणासही सहृदयांनीं आश्चर्य वाटल्यावांचून राहणार नाहीं. परंतु 'मूकं करोति वाचालं पंगून् लंघयते गिरिन्' अशा प्रकारचें सामर्थ्य 'प्रभु'कृपेंत नाहीं असें कोण म्हणेल? असमर्थांना समर्थ व अपात्रांना सत्पात्र ठरवून त्यांनाच जर खरें लोकमत व्यक्त करण्याचा मान सरकार देऊं लागलें तर राजे लोक हेच लोकाग्रणी म्हणून मिरविणार यांत काय नवल? पण ज्यांना स्वतःची प्रजा नाहीं असे राजे, ज्यांना शिक्षण नाहीं असे विद्वान्, ज्यांना संपत्ति नाहीं असे श्रीमान्, ज्यांना घरदार नाहीं असे घरंदाज, ज्यांना मनाचा मोठेपणा माहीत नाहीं असे सरदार, चारचौघांत ज्यांना कधीं जीभ हलविणें माहीत नाहीं असे वक्ते, ज्यांना स्वतःला चार ओळीही लिहितां येत नाहींत असे कलमबहाद्दर, ज्यांनीं मागसलेपणामुळें समाजाची पिछाडी कधींही सोडली नाहीं असे पुढारी—असलें जय्यत सैन्य घेऊन सरकार स्वराज्याच्या चळवळीवर स्वारी करण्यास निघाल्यावर त्यांना कितपत जय मिळणार हें दिसतेंच आहे.

पण सरकारनें तरी काय करावें? बहुतेक सर्वांनीं फितुरी करून स्वराज्याचा पक्ष स्वीकारला, ज्याला म्हणून हाताशीं धरावयास जावें त्यानें आयत्या वेळीं दगा देऊन स्वराज्याची तरफदारी करावयास लागावें, असा विश्वासघात अलीकडे सुरू झाला आहे. राजसत्तेचा मक्ता स्वतःच्या हातीं ठेवण्याच्या कामीं सरकारची भिस्त प्रथमतः सुशिक्षितांवरच होती. १८५७ सालीं बंड होऊन ब्रिटिश राज्य उलथून पडतें कीं काय अशी जी भीति उत्पन्न झाली होती तो सर्व खेळ अशिक्षितांचा होता. ज्याला इंग्रजी शिक्षण मिळालेलें आहे असा एकहि मनुष्य बंडांत बहुधा सामील नसावा. सुशिक्षित लोकच अशिक्षितांच्या मनावर कोणत्याहि गोष्टीचा ठसा चांगला उमटवूं शकतात. सुशिक्षणानें लागवडींत आणलेल्या मऊ व सुपीक जमिनींत राजनिष्ठेचें बीज एकदां कां रुजलें म्हणजे लवकरच त्याचे प्रचंड वृक्ष बनून त्यांच्या छायेखालीं एक-

तंत्री राज्यसत्तेला नुसतें लोळतां–लोळतांहि सुखानें कारभार करतां येईल असें सरकारास वाटूं लागलें. शिवाय राज्यकारभार चालविण्याच्या कामीं उपयोगीं पडण्यालायक आणि सांगकामे नोकर व हस्तक होऊन राहण्यासारखे बुद्धिवान् लोक सरकारास पाहिजे होते ते शिक्षणाचा फैलाव केल्यानें आपोआप मिळण्यासारखे होते. यामुळें शिक्षणाची योजना झाली व या अदमासाप्रमाणें शिक्षणानें प्रथम आपलें कामहि चांगलें बजाविलें. पण हिंदी लोकांच्या मनोभूमींत शिक्षण एकदां रुजत घातल्यावर त्याच्या योगानें उत्पन्न होणारी उदारमतप्रवृत्ति अमुक एक मर्यादेपर्यंतच जावी, तिच्या पलीकडे जाऊं नये, असा कांहीं रसायन संस्कार शिक्षणाचें बीज पेरतांना त्यावर सरकारास करतां येण्यासारखा नसल्यानें लवकरच सरकारास शिक्षणाचें भय वाटूं लागलें. शिक्षणाचा हा भस्मासुर आपण निर्माण केला नसता तर बरें झालें असतें असाहि त्यांना पश्चात्ताप होऊं लागला ! पण हातून सुटून गेलेला बाण परत येणार कसा ? अर्थात् शिक्षण यापुढें विवक्षित मर्यादेंत ठेवणें व सुशिक्षितांना तुच्छतादर्शक रीतीनें वागविणें एवढ्या गोष्टी करतां येण्यासारख्या उरल्या व त्या करण्यास सरकारनें सुरुवात केली. सुशिक्षित लोक हे समाजाचे पुढारीच नव्हत, ते स्वार्थी असतात, वगैरे दूषणें त्यांना देण्यांत घेऊं लागलीं.

सुशिक्षितांचें वजन कमी करण्याला दुसऱ्या पारड्यांत घालण्यासारखे सरकारजवळ आणखी दोन वर्ग होते. एक अशिक्षित वर्ग, व दुसरे मुसलमान लोक. पैकीं दुसऱ्या वर्गाचा उपयोग सरकारास प्रथम प्रथम पुष्कळच झाला. मुसलमान लोक हिंदूंना कांहीं मागूं देत नव्हते. राष्ट्राच्या नांवानें त्यांनीं कोणतीहि मागणी मागितली तरी तिची आम्हाला गरज नाहीं असें म्हणून योग्य वेळीं ते राष्ट्रीय आकांक्षेचे पाय मोडीत, इतकेंच नव्हे तर त्याहूनहि विशेष सोईची गोष्ट म्हटली म्हणजे ही कीं, ते स्वतःकरितांहि कांहीं मागत नसत. बरोबरच आहे; मुळांत शिक्षणच नाहीं तर आकांक्षा कोठून येणार ? पण दुर्दैवानें ही स्थिति कायम टिकली नाहीं. सर सय्यद अहमद प्रभृतींनीं म्हणजे मुसलमान पुढाऱ्यांच्या पहिल्या पिढीनें राजकीय भानगडींत न पडतां शिक्षणाचा प्रसार केला. पण या शिक्षणानें आपलें कार्य करतांच गेल्या १२ वर्षांतील आगाखान प्रभृतींनीं—म्हणजे सुशिक्षित मुसलमानांच्या दुसऱ्या पिढीच्या पुढाऱ्यांनीं-अवचित राजकीय आकांक्षांचें निशाण उभारलें. व विशेष मौज ही कीं, अवघ्या बारा

वर्षांत त्यांनीं राजकीय चळवळींत इतकी प्रगति केली कीं, हिंदु एक वेळ पुरवले पण हे मुसलमान नकोत, असें सरकारास वाटूं लागलें असल्यास नवल नाहीं.

हिंदु काय व मुसलमान काय, कोणाहि सुशिक्षिताविषयीं अशा रीतीनें निराशा उत्पन्न झाली तरी त्यांतल्या त्यांत कच्चे कोण, पक्के कोण, निरस कोण, सरस कोण, मऊ कोण, टणक कोण, भोळे कोण, बिलंदर कोण, नेमस्त कोण, जहाल कोण, याची पारख व निवडानिवड करून एकाला हाताशीं धरून दुसऱ्याचा पाडाव करतां येईल कीं नाहीं याचाहि प्रयोग सरकारानें करून पाहिला. हा प्रयोग प्रथम कांहीं वर्षें चांगला साधला, पण लवकरच तोहि निरुपयोगी ठरला. जहाल व नेमस्त दोघांनींहि तत्त्वमर्यादांचें संशोधन चिकित्सकबुद्धीनें व परिश्रमपूर्वक केलें; व अखेर एखादें बाउंडरी कमिशन नेमून शेजारी संस्थानिकांनीं आपापल्या मुलुखाच्या तुकड्यांची देवघेव करून सरहद्दीचा तंटा मिटवावा त्याप्रमाणें सर्वसंमत असा स्वराज्यविषयक ठराव मंजूर करून राष्ट्रीय सभेनें दोनहि पक्ष एक केले. यामुळें एकाददुसऱ्या स्वार्थसाधु व्यक्तीखेरीज सरकारच्या हातीं बाहुलें होऊन नेमस्तपणाचा नंगा नाच करण्यास कोणीहि उरला नाहीं. अशा रीतीनें सुशिक्षित, नेमस्त, मुसलमान वगैरे वर्ग बळकट डोंगरी किल्ल्याप्रमाणें सरकारच्या हातून जाऊन प्रजापक्षाच्या हातीं लागल्यानें आतां सरकारास ज़मीनदार-जहागिरदार यांचा स्वार्थ आणि अशिक्षित लोकांचें अज्ञान याखेरीज दुसरें आश्रयस्थान बहुधा राहिलें नाहीं असें आम्हांस वाटतें. पण हीं आश्रयस्थानें तरी कायम व निर्वेध आहेत असा भ्रम सरकारनें उत्पन्न करून घेऊं नये असें आमचें त्यास मित्रत्वाचें सांगणें आहे. ज्यांची शेंडी सरकारच्या हातीं आहे असे जाहागीरदार जमीनदार हिंदुस्थानांत बरेच आहेत. पण त्यांचें मन आजपर्यंत आपण दुखवलें नाहीं अगर यापुढें केव्हांहि दुखवणार नाहीं अशींच कृत्यें आपल्या हातून घडण्याबद्दल सरकारास खात्री वाटत आहे काय ? आम्हांस तरी ती खात्री वाटत नाहीं. कारण सरकारच्या पोलिटिकल खात्यांत केवळ खरें शहाणपण व खरी मुत्सद्देगिरी हीच वावरत असती तर थोडें दिवसांपूर्वीं दिल्लीस भरलेल्या राजेरजवाड्यांच्या परिषदेंत दत्तक मुलगा गादीवर बसविण्याचा हल्लीं असलेला हक्क काढून घ्यावा कीं नाहीं—सरकारनें आपल्या पसंतीनें मुलगा गादीवर बसवावा व नंतर वाटेल

तर त्यास दत्तक घेऊन त्याजकडून हवें तर श्राद्धपक्ष करवावें—अशा तऱ्हेचा नाजूक प्रश्न वादविवादाकरितां निघालाच नसता. या प्रश्नासंबंधानें सरकारी सूचना काय होत्या व कित्येक राजेरजवाड्यांनीं त्यांवर काय टीका केली याविषयींचे कागदपत्र प्रसिद्ध झाल्यास आम्ही म्हणतों त्यांतील सत्य कळून येईल. सांगायचा मुद्दा इतकाच कीं, राजेरजवाड्यांच्या आश्रयावर स्वराज्याविरुद्ध चाललेल्या मोहिमेची भिस्त सरकारनें ठेवूं नये. राहतां राहिलें अशिक्षितांचें किंवा मागसलेल्या जातींचें अज्ञान. पण या अज्ञानावर तरी सरकारला किती दिवस उभें राहतां येणार? दिवसेंदिवस शिक्षण हें वाढणारच, व सरकारच्या पायाखालची अज्ञानाची वाळू हळूहळू वाहून जाणारच. साक्षरता सक्तीनें सार्वत्रिक करण्याच्या कामीं सरकारनें माघार घेतली तरी तिचा फैलाव झाल्याशिवाय आतां रहात नाहीं. झोंकदार चुनेगच्ची इमारतींत बसून 'ट्रेंड' शिक्षकांच्या हातून 'नमुनेदार' शिक्षण कदाचित् पुष्कळांना मिळणार नाहीं. पण सूर्याच्या प्रकाशाप्रमाणें सरस्वतीचा प्रसादहि श्रीमंतांच्या वाड्याबरोबर गरिबांच्या वळचणींच्या फटींतून शिरूं शकतो. यामुळें सरकारी शाळांची मदत न झाली तरी घरबसल्या मुलांना साक्षरता जाऊन भेटल्याशिवाय आतां राहत नाहीं, व जें मूल साक्षर झालें तें स्वराज्यवादी झालें असें आतां सरकारनें खुशाल समजावें. अशिक्षित प्रजा मुकी असते यामुळें तिला बोलतां येत नाहीं इतकेंच काय तें. पण तेवढ्यावरून कांहीं अशिक्षित प्रजेचीं गाऱ्हाणीं नसतात किंवा त्यांचीं अंतःकरणें नेहमींच संतोषसमुद्रांत पोहत असतात असें कोणी म्हणूं शकणार नाहीं.

पाण्यांत बुडूं लागणाऱ्या मनुष्याला तरंगत्या काडीचाहि आश्रय घेण्याचा मोह पडतो असें म्हणतात तें कांहीं खोटें नाहीं. स्वराज्याच्या चळवळीविरुद्ध आपला लष्करी गोट खंबीर करण्याकरितां सरकारानें हिंदुस्थानाबाहेर पडून अमेरिकेकडेहि धांव घेतली आहे हें पाहून या त्यांच्या कारुणिक स्थितीबद्दल अनुकंपा उत्पन्न झाल्याशिवाय राहात नाहीं. सुमारें तीन दिवसांपूर्वीं मुंबईसरकारच्या पोलिटिकल खात्याकडून आमच्याकडे एक दोन आणे किमतीचें ३१ पृष्ठांचें एक लहानसें छापील चोपडें आलें आहे. पुस्तकांतील विषय 'हिंदुस्थानांतील साम्राज्याविषयीं कांहीं अमेरिकन लोकांचे अभिप्राय' असा असून, सन १९०७ पासून १९१४ पर्यंत प्रसिद्ध झालेल्या कांहीं अभिप्रायांतील कांहीं त्रोटक उतारे त्यांत दिले आहेत. हे उतारे स्वपक्षपाती दृष्टीनेंच काढलेले आहेत याविषयीं शंका नाहीं.

कारण प्रेसिडेंट रूझवेल्ट व टॅफ्ट यांचे मात्र अभिप्राय दिले आहेत; पण मॉ. ब्रायन यांचा अभिप्राय दिलेला नाहीं. उलट ब्रायन यांचा अभिप्राय न देतां त्याच्यावर टीकारूप म्हणून रेवरंड डॉ. जोन्स नांवाच्या मिशनरीनें जो अभिप्राय लिहिला तेवढा मात्र काळजीपूर्वक उद्धृत करून घेतला आहे. सदर चोपडें फिशर अनविन या प्रकाशकांनीं प्रसिद्ध केलें व कॉस्टन आणि सन्स या छापखानेवाल्यांनीं मुद्रित केलें. याहून त्याच्या आईबापांचा अधिक पत्ता लागत नाहीं. सुरवातीस प्रस्तावना आहे, पण तिच्या खालीं सही नाहीं. अनामिक निराश्रित बेवारशी पोरक्या पोरासारख्या अशा या चोपड्याला हिंदुस्थानांतील अनेक संपादकांच्या टेबलावर बसवून त्याच्याकडून त्यांना उपदेश करविण्याचा व बोधामृत पाजण्याचा जर सरकारचा उद्देश असेल तर तो कितपत साध्य होईल याचा मात्र सरकारनेंच विचार करावा. पुराव्याच्या ॲक्टाप्रमाणें सदाचाराचा पुरावा कोणी होऊन मुद्दाम दिल्यास त्याच्याविरुद्ध दुराचाराचा पुरावा देण्यास प्रतिपक्षकारास पूर्ण मोकळीक असते. पण या चोपड्यांतील सोळा अमेरिकन लेखकांच्या अभिप्रायांना धरून त्याची दुसरी बाजू पुढें मांडण्याचें कोणा हिन्दी लेखकानें मनांत आणल्यास तें विवादसुख त्यास कसें लाभणार? कारण प्रेस–ॲक्ट हा नागवी तरवार धरलेला आपला हात उगारून निरंतर सिद्ध झालेला आहे; म्हणून या अभिप्रायाविषयीं सर्वसाधारणपणेंच बोलल्याशिवाय गत्यंतर नाहीं. या अभिप्रायांतून मुख्यतः ब्रिटिश राज्याची स्तुति करण्यांत आलेली आहे. सुमारें दीडशें वर्षांपूर्वी अमेरिकन वसाहतवाल्यांनीं इंग्लंडशीं झगडा करून स्वातंत्र्य मिळविलें. त्या खटपटींत, प्रस्तुत अभिप्राय लिहिणारे रूझवेल्ट–टॅफ्टप्रभृति मुत्सद्दी व जेफ्रिझ जोन्सप्रभृति मिशनरी यांच्या तत्कालीन आद्यपूर्वजांनीं कांहीं कार्यभाग उचलला होता किंवा नाहीं हें आम्हांस माहित नाहीं. पण पूर्वीच्या चुका पूर्वीच्या लोकांनीं केल्या असें म्हणून आजच्या या अमेरिकनांनीं तरी आपल्या राष्ट्रांत ब्रिटिश राज्यपद्धतीचें अनुकरण किंवा अनुवाद कां करूं नये! पण हें अनुकरण तर राहोच, पण हिंदी लोकांच्या मानानें दसपट कमी सुशिक्षित व कमी सत्पात्र अशा फिलिपिनो लोकांना हिंदुस्थानांतील ब्रिटिश साम्राज्यकाराच्या अवघ्या दशांश अवधींत हिंदुस्थानापेक्षांहि दसपट पुढें गेलेलें प्रगतिपर स्वराज्य देऊन कृपण अशा ब्रिटिश साम्राज्यपद्धतीचा त्यांनीं उलट अप्रत्यक्ष निषेधच केलेला नाहीं

काय ? पण हे अभिप्रायवाले मुख्य मर्म विसरतात. इंग्रजी राज्य एकंदरीनें चांगलें आहे कीं नाहीं हा वादाचा मुख्य प्रश्न नसून स्वराज्याचे अधिकार देण्याइतके हिंदी लोक या राज्यामुळें सत्पात्र बनले आहेत कीं नाहींत हाच आहे. नुसती इंग्रजी राज्याची एकतर्फी स्तुतिच करावयाची झाली तर, आम्हांला वाटतें, आम्हीं ती या अमेरिकन अभिप्रायवाल्यांपेक्षां अधिक सार्थ समर्पक व सरस करूं. रूझवेल्ट व टॅफ्ट हे किती झाले तरी दुरून पाहणारे, आम्हांस सुधारलेल्या इंग्रजी राज्याच्या फायद्यांचा पावलोपावलीं प्रत्यक्ष अनुभव येत असतो. पण टीकाकार हा वकील असतो न्यायाधीश नसतो हें विसरतां कामा नये. म्हणून, इंग्रज सरकार हिंदी लोकांचें गुण जाणत असतांहि आपल्या ठरावांतून त्यांचें स्तोत्र कधीं न गातां सुधारलेल्या दृष्टीनें जरूर तेवढी टीकाच करण्याचा अधिकार पत्करतें, त्याप्रमाणें आम्ही वर्तमानपत्रकर्ते ब्रिटिश राज्याचे गुण व फायदे माहीत असतांहि त्यांचें स्तोत्रगायन हें अप्रस्तुत मानून केवळ सुधारणेच्या दृष्टीनें राष्ट्राच्या वतीनें स्वराज्याच्या हक्काची वकिली करीत असतों इतकेंच काय तें. प्रतिष्ठित अमेरिकन लोकांचे स्तुतिपूर्ण अभिप्राय देण्यांत सरकारनें इतकीं पृष्ठें खर्च केलीं तीं न करतां फिलिपिनो लोकांच्या तुलनेनें हिंदी लोक कसे आहेत, फिलिपिनो लोकांना इतक्या लवकर असें स्वराज्य कां मिळालें व हिंदुस्थानास तें कां मिळत नाहीं याचें प्रामाणिकपणाचें विवेचन अवघ्या चार पानांतच करून तें आम्हांकडे पाठविलें असतें तर तें आम्हाला अधिक आवडलें असतें व बोधप्रदहि झालें असतें.

या सोळाहि अमेरिकन प्रतिष्ठितांचे अभिप्राय मुख्य मुद्याला सोडून आहेत. कारण त्यांचा मतितार्थ इतकाच आहे कीं, हिंदुस्थानांतून ब्रिटिश राज्यकर्त्यांनीं आजच आपलें अंग सर्वस्वीं काढून घेऊं नये, कारण तसें झाल्यानें फिरून पूर्वीची अराजकता उद्भवेल; पण हा प्रश्न अशा रीतीनें उपास्थित होतो कसा हेंच मुळीं आम्हांस समजत नाहीं. हिंदी स्वराज्यवाद्यांनीं झालें तरी इंग्रजांना तुम्ही आतां आपलें चंबूगवाळें आवरून बोटींत बसण्याकरितां धक्क्याकडे निघा असें कधीं म्हटलें आहे ? हिंदी पुढाऱ्यांच्या स्वराज्याच्या मागणीचा खरा अर्थ काय, तिची नक्की व्याप्ति किती वगैरे गोष्टी रूझवेल्ट टॅफ्ट प्रभृति लोकांनीं राष्ट्रीय सभेचें किंवा स्वराज्यसंघाचें वाङ्मय काळजीपूर्वक वाचलें असतांहि समजणार नाहींत इतके ते कांहीं मंदबुद्धि खास नाहींत. पण हें वाङ्मय त्यांच्या पुढें जाईल

तर तें वाचतील ना! आपल्या चुलतभावांच्या राज्यकारभारांस त्यांना सामान्यपणें सर्टीफिकीट द्यावयाचें तर तें त्यांनीं हल्लीं दिलें तसेंच असावयाचें हें उघड आहे. पण आमच्या वादांतील मुख्य मुद्दा अमेरिकन गृहस्थांच्या लक्षांत आला नाहीं तरी आमच्या सरकारच्या लक्षांत तो आला नसेल असें नाहीं. इंग्रज सरकारांनीं आज हिंदुस्थान सोडून जाऊं नये असला अमेरिकन अभिप्राय आमच्यापुढें मांडणाऱ्या सरकारनें अशा अभिप्रायाचा प्रतियोगी म्हणजे इंग्रजांनीं हिंदुस्थानांतून आज निघून जावें अशा प्रकारचा सिद्धांत स्वराज्यवाद्यांच्या लेखांतून त्यांना कोठें आढळला असल्यास त्यांनीं तो प्रामाणिकपणानें जाहीर करावा. असल्या सिद्धांताचें जर प्रतिपादनच कोठें नाहीं तर त्याचें निराकरण करण्यांत विशेषतः हल्लींच्या महागाईच्या दिवसांत कागद-शाईचा अपव्यय सरकारनें कां करावा हें आम्हांस समजत नाहीं. तूर्त इतकें खरें कीं, एखाद्या निर्माल्य-पेन्शनराप्रमाणें विदेशी लोकांकडून मिळालेलीं भलेपणाचीं सर्टीफिकिटें चिवडींत व छापीत बसण्याच्या चाळ्यापेक्षां प्रजाप्रेम किंवा स्वतःचें मनःसमाधान मिळवून देणारा दुसरा उद्योग आमच्या सरकारला न उरावा याची आम्हांस अत्यंत कींव येते. सर्टीफिकिटचें हवीं तर त्यांच्याकरितां अमेरिकेकडे धांव घ्यावयास खचित नको. हिंदुस्थानांतहि तीं मिळूं शकलीं असतीं. व कट्ट्या स्वराज्यवाद्यांनाहि तीं प्रामाणिकपणानें देतां आलीं असतीं. पण त्यांनीं किंवा यांनीं स्वराज्याची मागणी मात्र थांबूं शकत नाहीं!

---

## ४८ चला, आतां शिपाई व्हा!

(ता. २० फेब्रुवारी सन १९१७)

लॉर्ड चेल्म्सफर्ड यांनीं ता. ७ फेब्रुवारी रोजींच्या आपल्या भाषणांत हिंदी लोकांस लष्करी नोकरीचें दार उघडण्याचें जें जाहीर आश्वासन दिलें त्याला कायदेशीर स्वरूप देणारें बिल उद्यां दिल्ली येथील कायदेकौन्सिलांत प्रविष्ट होणार आहे. पण बिलाची वाट न पाहतां हिंदी पुढाऱ्यांनीं सभा भरवून व्हाइसरॉयसाहेबांचे आभार मानण्याला, आणि लष्करी नोकरींत शिरण्यास तयार होण्याबद्दल लोकांना उत्तेजन देण्याला आगाऊच सुरवात केली आहे. गेल्या एका आठवड्यांत सातारा, पुणें, मुंबई, वगैरे ठिकाणीं झालेल्या सभांतून या बाबतींत लोकमत इतक्या स्पष्ट रीतीनें जाहीर झालें आहे कीं, लष्करी नोकरीचें दार-

आपण उघडणार खरें पण त्यांतून कोणी आंत येईल कीं नाहीं याविषयीं शंका घेण्याचें व्हाइसरॉयसाहेबांस बिलकुल कारण उरलेलें नाहीं. जी काय शंका उरलेली आहे ती लोकांना; व या सभांतून उच्चार झाल्याप्रमाणें, सरकार ब्रिटिश व हिंदी सैनिकांच्या बाबतींत समानतेचें धोरण ठेवतें कीं अजूनही व याहि बाबतींत काळ्या गोऱ्यांतील पंक्तिप्रपंचाचीच परंपरा चालवितें याबद्दल सरकार आमच्याशीं कसेंहि वागलें तरी आम्ही सरकाराशीं कसें वागावयाचें हें आतां ठरून गेलेंच आहे, पण हल्लींसारख्या कठीण प्रसंगीं तरी पक्षपात व पंक्तिप्रपंच यांचें भूत सरकारास सोडतें किंवा पूर्वीसारख्याच चिकाटीनें तें त्यांस पछाडून बसतें हें पाहण्याविषयीं, म्हणजे त्यांच्या खऱ्या मनाची परीक्षा करण्याविषयीं आमच्या मनाची उत्कंठा जात नाहीं हें आम्हांस प्रांजलपणानें कबूल केलें पाहिजे. पुढाऱ्यांनीं लोकांना बिनशर्त लष्करी नोकरींत शिरण्याचा उपदेश केला आहे हा त्यांचा थोरपणा झाला; व त्या उपदेशाप्रमाणें लोक बिनशर्त लष्करी नोकरींत जातील तर तो लोकांचा थोरपणा होईल. पण सरकारच्या थोरपणाची परीक्षा होण्यासारख्या कित्येक 'शर्ती' नसल्या तरी स्पष्ट सूचना म्हणा किंवा विनंत्या म्हणा वरील सभांत मंजूर झालेल्या ठरावांतून ग्रथित झाल्या असून, त्यांजवरील भाषणांत ठरावापेक्षांहि त्यांच्यावर विशेष जोर देण्यांत आला होता. अर्थात् या विषयाची जितक्या नाजूक रीतीनें चर्चा होणें शक्य आहे तितक्या नाजूक रीतीनें ती जबाबदार लोकाग्रणींनीं केली आहे. पण या नाजूकपणास शोभेल इतका नाजूकपणा उलट सरकारच्या कृतींत दिसून येतो कीं नाहीं, हें मात्र अद्यापि पहावयाचें आहे. व त्याची परीक्षा उद्यांच्या बिलावरील सरकारतर्फेच्या भाषणांत आपोआप होणारी आहे. या सूचनांत किंवा विनंत्यांत झालें तरी सरकारास कांहीं अलौकिक औदार्य दाखविण्यास आव्हान केलेलें नसून सामान्य न्यायबुद्धीलाच आव्हान केलेलें आहे. वरील सभांतून एकच गोष्ट सुचविण्यांत आली आहे. ती हीच कीं, "काळ्या लोकांना गोऱ्या लोकांसारखें वागवा; त्यांचे पगार, त्यांच्या बढत्या व त्यांचा दर्जा गोऱ्या लोकांसारखा ठेवा, गोऱ्यांप्रमाणेंच काळ्यांनाहि लष्करी मानाच्या व अधिकाराच्या जागा द्या; हत्यारांचा कायदा ठेवणेंच असेल, सरकारास तो रद्द करवत नसेल तर काळ्यागोऱ्यांना तो सारखाच लागूं होईल, अशी तरी कायद्यानें व्यवस्था करा." या मागण्या कोणी केवळ अडवणुकी-

करितां केलेल्या आहेत असें नाहीं. तर नेमस्तांतले नेमस्त, विचारवंतांतले विचारवंत, राजनिष्ठांतले राजनिष्ठ, विश्वासुकांतले विश्वासु अशा सर सत्येंद्रप्रसन्न सिंहांनीं, म्हणजे ज्यांना आज सरकारनें आपले प्रतिनिधि म्हणून विलायतेस साम्राज्याच्या युद्धपरिषदेस पाठविलें आहे त्यांनीं १९१५ सालच्या राष्ट्रीय सभेचे अध्यक्ष या नात्यानें आपली जबाबदारी ओळखून, व इतर राजकीय सुधारणांच्या बाबतात हात आंखडल्यानें लोकांची अप्रीतिहि पत्करून, केलेल्या आहेत. अशा मागण्या जर सरकारकडून दिल्या गेल्या नाहींत तर लोकांत नवीन असंतोष उत्पन्न झाल्यास, व कदाचित् लष्करी नोकरींत शिरण्याचें आमंत्रणहि त्यांनीं अवमानिल्यास, त्यांत दोष कोणाचा ?

वरील मागण्यांस इतकें महत्त्व आम्हीं कां देतों याचा थोडासा खुलासा करणें जरूर आहे. लष्करी नोकरीचें दार आज सरकारनें हिंदी लोकांना खुलें केलें याचा वास्तविक अर्थ काय आहे ? हा अर्थ सांगतांना कदाचित् स्पष्टोक्तीचा थोडासा दोष आम्हांस पत्करला पाहिजे हें आम्ही जाणून आहों. पण तो पत्करूनहि, हा अर्थ एका वाक्यांत सांगावयाचा तर आम्ही असें म्हणूं कीं, सरकारचें आतां हिंदी लोकांच्या लष्करी मदतीशिवाय अगदीं अडलें आहे म्हणून हें दार खुलें केलें जात आहे; यांत दुसरा तिसरा अर्थ कांहीं एक नाहीं. हा अर्थ समजून घेतांना फाजील राजनिष्ठेनें बुद्धीला येणारें मांद्य आपण दूर सारलें पाहिजे; फाजील साम्राज्यप्रेमामुळें मनावर पडणारी भुरळ काढून टाकली पाहिजे, व फाजील गोडबोलेपणानें येणारा जिभेवरील चिकटा झाडून टाकला पाहिजे. सरकाराला आम्हांस जर खऱ्या वजनानें व निःस्वार्थबुद्धीनेंच आज पौरुषदान करावयाचें आहे असें म्हणावें तर त्यांना आज शंभर वर्षें कां थांबावें लागलें असतें ? येवढेंच नव्हे तर आम्हांस निःशस्त्र कां करावें लागलें असतें ? पूर्वी आमच्यावर जर सरकारचा विश्वास बसण्यासारखा नव्हता तर आज तो बसावा असें तरी पुण्य आम्हीं काय संपादन केलें आहे ? १८५७ सालीं बंड झालें खरें, पण तें सर्व सामान्य प्रजेनें केलें कीं सरकारच्या नोकरींतल्याच लष्करी शिपायांनीं ? आणि हातांत हत्यार होतें येवढ्याच थोड्या कारणाकरितां तेव्हां त्यांनीं बंड केलें असें म्हणावें तर, उद्यां लोकांच्या हातीं सैनिक म्हणून हत्यारें पडलीं व त्यांना लष्करी शिक्षण मिळालें म्हणजे ते फिरून बंड करणार नाहींत याची तरी हमी राष्ट्रापासून त्यांनीं कोणतीं घेतली आहे ?

१८५७ सालीं लोक स्वराज्य तरी मागत नव्हते, आज ते स्वराज्यच मागूं लागले आहेत; म्हणजे बंडाला जो प्रबळ हेतु पूर्वी नव्हता तो, कोणीं वावदूक तसें म्हणणाराच भेटला तर, आज नव्यानें उत्पन्न झाला आहे. १८५७ सालीं जर्मन किंवा इतर परराष्ट्रीय शत्रूचा धाक तरी सरकारास नव्हता; आज पहावें तों सरकारच्या कडेकोट पाहऱ्यांतूनहि जर्मन हेर हिंदुस्थानांत प्रवेश करितात व माथेफिरू हिंदी तरुणांना गांठून त्यांच्या मनांत बेदिली उत्पन्न करून हातांत पैसा व हत्यारें बांधतात ही गोष्ट सरकारनें स्वतः आपल्या न्यायकोर्टांनीं शाबीत धरलेली म्हणून प्रसिद्ध केली आहे. तात्पर्य, आम्हांला निःशस्त्र करितांना जी स्थिति होती तिच्यापेक्षां आजची स्थिति सरकारच्या दृष्टीनें अधिक चांगली नाहीं, वाईटच आहे असें असतां सरकार आम्हांस सर्रास सैन्यांत दाखल करूं इच्छितें, किंबहुना हें पौरुषदान आम्हीं पदरांत खुषीनें घेतलें नाहीं तर सक्ती करून ते कदाचित् आमच्या गळ्यांत बांधण्याचा उपकार आमच्यावर करणार, याचा खरा अर्थ काय ? तर त्याचा अर्थ फिरून सांगावयाचा तर, हाच कीं, हिंदी लोकांच्या लष्करी मदतीखेरीज सरकारचा यापुढें निभाव लागणें कठीण आहे, असें खुद्द सरकारचें सरकारासच वाटूं लागलें आहे. ही लोकोत्तर औदार्याची निपज नसून लष्करभरतीची गरज आहे. आज स्थितिच अशी आहे कीं, हिंदुस्थानांत गोरें लष्कर कायमचें ठेवून झालें, हिंदी सैन्यांत सरहद्दीपलीकडील म्हणजे परक्या काळ्या लोकांची जितकी खेंचून भरती करितां येईल तितकी करून झाली. हिंदुस्थानांतून काळें गोरें पगारी खडें सैन्य विलायतेंत नेल्यामुळें तात्पुरत्या नोकरीचें गोरें टेरिटोरियल सैन्य हिंदुस्थानांत आणून झालें, हिंदुस्थानांतील गोऱ्या रहिवाश्यांस पूर्वी स्वयंसेवक व आज सक्तीचे शिपाई करून झालें, फार काय पण स्नेहाचे तह केलेल्या जपानसारख्या परराष्ट्राकडून तरी सैन्याची कुमक कितपत मिळेल याचा अंदाज पाहून झाला; तात्पर्य, खुद्द हिंदी प्रजेला आपल्या मातृभूमीचें संरक्षण करूं देण्याकरितां हातीं हत्यार व लष्करी शिक्षण देण्याशिवाय इतर, म्हणजे परक्या भाडोत्री हत्यारबंद लोकांची मदत शक्य तितकी व शक्य त्या उपायांनीं घेण्याचे, सर्व प्रयत्न होऊन चुकले, पण कांहीं केल्या लष्करभरतीच्या गरजेचा खळगा भरून येईचना ! तेव्हां सरकारनें झालें तरी हिंदी लोकांशिवाय आतां दुसऱ्या कोणाकडे जावें ? पूर्वी तपःसामर्थ्यानें मानसपुत्र निर्माण करितां येत असत तसें आज सरकारास करितां येतें, किंवा

शालिवाहन राजाच्या एका जुन्या दंतकथेंत सांगतात त्याप्रमाणें शेणामातीचीं गोऱ्या शिपायांचीं चित्रें करून त्यांच्या ठिकाणीं प्राणप्रतिष्ठा करितां येणें आज शक्य असतें, तर हत्यारांच्या घातक खेळापासून व युद्धाच्या दगदगीपासून आम्हांस आजवर दूर ठेवणाऱ्या अपत्यवत्सल इंग्रज सरकारानें असली नवी फौज निर्माण करण्यांत आपली सर्व पुण्याई खर्च केली असती, व नष्ट झालेली ही पुण्याई मिळविण्याकरितां फिरून शांततेच्या वेळीं तपश्चर्येस आरंभ केला असता. पण नास्तिकपणानें भरलेल्या या विसाव्या शतकांत ही मंत्रसिद्धि कोणाच्या संग्रहीं असणार ? अर्थात् कोणत्याहि दृष्टीनें पाहिलें तरी हिंदी लोकांना खाकी पोषाख व हातांत हत्यार दिल्याशिवाय आतां गत्यंतर नाहीं असें दिसून आल्यामुळेंच केवळ लष्करी नोकरीचें दार खुलें होण्याचा योग आतां आला आहे. आम्ही पूर्वींचीं तींच माणसें आहों, आमची मातृभूमिहि पूर्वींची तीच आहे. आम्ही आज कांहीं दुसऱ्या एखाद्या राष्ट्रमातेच्या मांडीवर दत्तक गेलों नाहीं, किंवा आमच्या राष्ट्रपित्यानेंहि कांहीं दुसरें लग्न करून आम्हांला नवी राष्ट्रमाता मिळवून दिलेली नाहीं. आम्हांसारख्या सख्या राष्ट्रपुत्रांनीं आमच्या सख्या राष्ट्रमातेचें संरक्षण करण्याच्या कामीं सरकारानें आमचे जे हात बांधून टाकून आम्हांस आजवर लाचार करून ठेवलें होतें, ते हात आज कदाचित् सर्वन्यायी काळालाच त्याची लाज वाटून त्यानें सरकारकडून सक्तीनें व प्राणसंकटाची भीति घालून सोडविले इतकाच अर्थ आम्हांस लष्करी नोकरीचें दार खुलें झालें याचा आहे.

पण झालें तें होऊन गेलें. त्याचा फिरून उच्चार करण्याची आमची इच्छा नाहीं. पण अजून झालें तरी सरकार न्यायबुद्धीनें वागणार ? किंवा आज आलेलें अभावित संकट कसें तरी टाळण्यापुरतें आम्हांस तात्पुरते सैनिक बनविणार ? आम्हाला देऊं केलेली लष्करी नोकरी आमचें जन्मसिद्ध असें जें पौरुष तें अनुभविण्याकरितां देणार ? कीं स्वतःच्या कार्याकरितां बंदुका उडविणारीं हजारों लाखों जिवंत यंत्रें पैदा करण्याकरितां देणार ? याचें स्पष्ट उत्तर आम्हाला पाहिजे आहे; कारण आमचा लष्करी नोकरींत शिरण्याचा सर्व उत्साह या उत्तरावर अवलंबून आहे. आमच्या हातीं बंदूक देण्यास सरकार तयार झालें आहे व ती घेण्यास आम्हीहि तयार झालों आहों, पण स्वाभिमानी अशा स्थितींत आम्हांस घेतां आली तरच ती बंदूक, नाहीं तर तें केवळ बंदुकीच्या वजनाचें एक ओझें

याहून दुसरें काहीं नाहीं असेंच आम्हांस वाटणार. ‘ अलिखित ’ अशा इसापनीतींतील एका गोष्टीची आम्हांस या वेळीं आठवण होते ती गोष्ट अशी. एका परटाच्या घरांत रात्रीं चोर शिरले व त्यांनीं घरधन्यास पळवून लाविलें. हें पाहून तबेल्यांत बांधलेला एक गाढव आपल्या सोबत्यास म्हणजे दुसऱ्या गाढवास म्हणूं लागला, “ भाऊ चल, आपण दावें तोडून मालकाच्या बरोबर पळून जाऊं. ” तेव्हां दुसऱ्या गाढवानें पहिल्यास उत्तर केलें “ दादा तूं वाटेल तर जा. मी येत नाहीं. घरधनी परागंदा होऊन त्याच्या जागीं उद्यां स्वतः चोर घरधनी झाला तरी मला तो फार तर ओझेंच वाहावयास लावणारा. मला तो कापून खात नाहीं खास. जुना धनी ‘ माझा ’ होता तरी मी त्याच्या ओझ्याचाच गाढव होतों. झालें तर. ओझेंच वाहण्याचें काम जर मला करावयाचें असेल तर मला घरधनी काय आणि चोर काय दोन्हीही सारखेच. ’ या गोष्टींतील तात्पर्य उघड आहे. केवळ लढण्याचीं यंत्रें या नात्यानेंच हिंदी लोकांचा उपयोग सरकारास करावयाचा असेल तर तें करो; तसें करण्यास तें समर्थ आहे. आज आम्ही खुषीनें सैन्यांत शिरून स्वतःचीं नांवें लष्करी पटांत नोंदवून न घेतलीं तर उद्यां सरकार एका घटकेंत सक्तीच्या लष्करी नोकरीचा कायदा करील व मग तरी, आम्ही सैनिक होऊंच कीं नाहीं ? तात्पर्य, आम्ही राऊत होणारच. पण ‘लढत राऊत’ कीं ‘रडत राऊत’ एवढाच फरक ! व हा फरक सरकार जें धोरण स्वीकारील त्यावरच सर्वस्वीं अवलंबून राहील. ‘ तुम्हांस निःशस्त्र करणारा जर्मनी व निःशस्त्र करणारें इंग्लंड यांत तुमच्या बुद्धीला सरस–निरस वाटण्यासारखें वास्तविक काय आहे ? ’ असें जर आम्हांस कोणीं विचारलें तर आमची राजनिष्ठा झाली तरी आम्हांस काय उत्तर देण्यास शिकविणार ? “ कांहीं झालें तरी आम्ही राजनिष्ठ आहों व राहणार ” असलें उत्तर फार झालें तर आम्ही देऊं शकूं. किंवा तें समर्पक न वाटल्यास मूग गिळून हातानें नुसता ‘ युनिअन जॅक ’ हलवीत गप्प बसूं. पण तेंच इंग्लंड आमच्या हातीं शस्त्र देणार, एवढेंच नव्हे तर आमच्या स्वाभिमानास साजेल असेंहि वागविणार–म्हणजे आमच्यांत व गोऱ्या सैन्यांत पंक्तिप्रपंच करणार नाहीं, आम्हांस योग्यतेप्रमाणें लष्करी मानाच्या व अधिकाराच्या जागा देणार, आमच्या जातभाईच्या वरिष्ठ हुकमतीखालीं पूर्वीच्या काळाप्रमाणें आजहि आम्हांस शिपाईगिरी करतां येणार, आम्हास लष्करी शिक्षण देण्याकरितां ड्यूक ऑफ कॅनॉट यांच्या योजनेप्रमाणें कॉलेजें काढणार, युद्ध संपलें तरी आम्हाला

व्हॉलंटियर होऊं देणार, आम्हाला गोऱ्या लोकांप्रमाणें हत्यारबंद राहण्याची परवानगी देणार व मातृभूमीवर केव्हांहि संकट आलें तरी तिच्या संरक्षणार्थ तावडतोब दंड थोपटून उभे राहण्यास आम्हांला कायमचे पात्र करणार, अशी आमची खात्री पटेल तर आम्ही झोपेंतूनहि असें सांगत उठूं कीं, ' हिंदी राष्ट्र आमचें आहे तसेंच साम्राज्य व ब्रिटिश सरकार हेंहि आमचें आहे. आम्ही आपले प्राण वेचूं; पण आमच्या सरकारच्या किंवा आमच्या साम्राज्याच्या केसालाहि धक्का लावूं देणार नाहीं; शत्रूला यावयाचेंच तर आमच्या प्रेतांच्या ढिगांना तुडवून यावें लागेल," पण असले स्फूर्तिदायक शब्द आमच्या तोंडून वदविणें हें सर्वस्वीं सरकारच्या हातीं आहे, दुर्दैवानें तें आमच्या नाहीं, येवढ्याचेंच मनापासून वाईट वाटतें. "तुम्ही स्वराज्य मिळवून स्वतः वरिष्ठ अधिकारी व्हाल तर तुमच्या हाताखालीं कोणता लेकाचा स्वाभिमानी इंग्रज सिव्हिलियन नोकरी करावयास मिळेल!" असला असंबद्ध प्रश्न वावदूक अँग्लो-इंडियन आम्हांला भेडसावण्याकरितां विचारतात. खुद्द प्रस्तुत लेखकांना हा प्रश्न एकदां एका बड्या गोऱ्या अधिकाऱ्यानें विचारलेला होता. मग आम्हांला तरी उलट असें कां विचारतां येऊं नये कीं "लष्करी वरिष्ठ मानाच्या व अधिकाराच्या जागांवर जर नेहमीं युरोपियनच राहणार तर तुमच्या तरी हाताखालीं कोणता लेकाचा स्वाभिमानी संभावित हिंदी व्हॉलंटिअर हडेलहप्पी करावयास येईल!" सरकार पगार देईल तोंपर्यंत आज सरकारास मिळतें तितकें व तसलें सैन्य त्यांना केव्हांहि मिळेलच, पण आज ज्या दर्जाचें इंग्रज लोक आपले उद्योगधंदे झुगारून देऊन कर्तव्य म्हणून खाकी पोषाख चढवून व बंदूक सरसावून केवळ ' प्रायव्हेट ' म्हणून निशाणाखालीं जाऊन उभे राहतात त्या दर्जाचे हिंदी लोक व्हॉलंटिअर म्हणून मिळणार नाहींत, इतकेंच काय तें आमचें म्हणणें. एरवीं सक्तीचा कायदा केल्यावर काय वाटेल तें होतच आहे. पण सर्व सौदा आपखुषीचा व्हावा ही सरकारला व प्रजेला मिळून उभयतांनाहि सारखीच भूषणास्पद अशी जी गोष्ट आहे ती घडून यावी अशी जर सरकारची इच्छा असेल, तर केवळ लष्करी नोकरीचें बिल मंजूर करून कांहीं भागणार नाहीं. निरनिराळ्या सभांतील ठरावांतून—विशेषतः वक्त्यांच्या भाषणांतून—नाजूक रीतीनें व भलेपणानें ध्वनित केलेल्या व सर सत्यप्रसन्न सिंहांसारख्या विचारी मनुष्यानें उघड मागितलेल्या गोष्टी देण्याचा जाहीरनामा बिलाबरोबर लागला पाहिजे; नव्हे,

नुसता जाहीरनामा लागूनहि भागणार नाहीं, तर त्याच्या अम्मलबजावणीस प्रत्यक्ष सुरवात झाली पाहिजे. हें घडवून आणण्याची पुण्याई आम्हां घरकोंबड्या सुशिक्षित लोकांच्या युक्तिवादांत किंवा जीव तोडून केलेल्या प्रार्थनेंत नसेल; पण ज्या हजारों हिंदी वीरांनीं इंग्लंडच्या अपयशाला आपल्या हाडांचें पर्वत रचून अडवून धरलें आणि रक्तांच्या नद्या वाहवून त्यांच्या पुरानें वेढून ठेवलें त्यांच्या निमालेल्या प्राणवायूंत तरी ही पुण्याई असल्याचें प्रत्ययास येवो एवढीच आमची प्रार्थना आहे!

गेलीं शंभर वर्षें ब्रिटिश सरकारनें एकसारखें हिंदी क्षात्रतेज नष्ट करण्यांत घालविलीं; पण सरकारची खरी इच्छा असल्यास तें क्षात्रतेज त्यांना अद्यापिहि सचेतन व जागृत करतां येईल. क्षात्रतेज हें पोलादासारखें आहे. त्याची वाटेल तर तरवार होते किंवा वाटेल तर त्याचा नांगर होतो. गेलीं शंभर वर्षें तरवारीचे नांगर करण्यांत गेलीं, पण सरकारची खरी इच्छा असल्यास त्यांना अजूनही तेच नांगर तापवून त्याच्या तरवारी सहज बनवितां येतील. शिपाई ही चीज प्रत्येक देशाच्या मनुष्यखाणींत दरएक पिढींत निर्माण होत असते. पण खाणींतून वर काढून घासलीपुसली तर ती आहे, नाहीं तर नाहीं. स्वतः इंग्रज हे ' तागडी तुकाप्पा' असतां व युद्धारंभीं इंग्लंडचें व वसाहतींचें मिळून फक्त दीड लक्ष खडें सैन्य असतां आज तेंच सैन्य तीस चाळीस लक्षांपर्यंत कसें गेलें ? व जन्मांत कधींहि हातांत हत्यार न धरलेल्या लोकांचें हें 'लढाऊ सैन्य ' असें कसें गणलें जातें ? अवघ्या सहा महिन्यांच्या लष्करी शिक्षणानें इंग्लंडतांला पिढीजाद कारकून, खाणावळवाला, वाणी किंवा कलाल जर लढवय्या बनूं शकतो, तर हिंदुस्थानांतील लोकहि तेवढ्या शिक्षणानें शिपाई, कां बनूं नयेत ? योद्धा व लढाऊ शिपाई यांत जो फरक आहे तो नित्य असून सर्व जगांत सारखाच असणार. केवळ हातांत माळ घेतल्यानें किंवा अंगास राख फासल्यानें कोणी जसा साधू होत नाहीं, तसाच केवळ खाकी पोषाक चढवून खांद्यावर बंदुक टाकल्यानें कोणी वीर योद्धा बनत नाहीं. वीर व योद्धा हा जन्मसिद्ध असतो; पण लढाऊ मनुष्य हा शिक्षणसिद्ध खास आहे व केव्हांहि कोणत्याहि राष्ट्रांत राष्ट्ररक्षणार्थ जें सैन्य निर्माण होतें तें सामान्य मनुष्यास अशा प्रकारचें शिक्षण देऊनच होतें. नेपोलियनला सैन्याची गरज लागली म्हणून कांहीं त्याची प्रार्थना ऐकून ईश्वरानें स्वर्गांतून फ्रान्स देशांत वीर योद्ध्याचें पार्सलें पाठविलें नव्हतें. त्याच्या दिग्वि-

ज्याचें काम सामान्य फ्रेंच लोकांनींच केलें. वसंत ऋतूचा संचार झाल्याबरोबर पळस जागजागीं फुलून ज्याप्रमाणें रुक्षपर्वतशिखरेंहि लाल भडक करून सोडतात, त्याप्रमाणें शिवाजीमहाराजांच्या उच्छ्वासांतील देशभक्ति वाऱ्याबरोबर पसरतांच सह्याद्रि पर्वताचे सर्व घाटमाथे जागच्याजागीं निर्माण झालेल्या मावळे शिपायांनीं सजीव होऊन गजबजून गेले. म्हणून कांहीं प्रत्येक मावळा हा अस्सल वीर्यविभूतीच होता असें म्हणतां येत नाहीं. त्याचप्रमाणें आजच्या हिंदुस्थानचीहि स्थिति आहे. अमुक जात लढवय्यांची व अमुक बिनलढवय्यांची हा सूक्ष्म भेद कोण काढीत बसतात? तर ज्यांना खरें राष्ट्रीय सैन्य निर्माण न करितां नुसता चावटपणा करीत बसावयाचें असतें तेच. पण सुदैवानें हा अपमानकारक भेद लोपून मातृभूमीच्या संरक्षणाचा प्रसंग आल्यास तिचे सर्व पुत्र लढाऊ सैनिक होऊं शकतात हें सिद्ध होण्याची वेळ आतां आली असून हिंदुस्थानचे लोक आपल्या उदाहरणानेंच तें सिद्ध करून देतील अशी आम्हांस आशा आहे.

---

## ४९ स्वराज्याचें निशाण रोंवलें

(ता. २ जानेवारी सन १९१७)

प्राचीन अयोध्या प्रांताच्या आधुनिक राजधानीच्या शहरीं गेल्या आठवड्यांत भरलेल्या प्रचंड राष्ट्रीय संमेलनाचें वर्णन अनेकांना अनेक प्रकारांनीं यापूर्वी केलें आहे; व पुढेंहि कांहीं दिवस त्याचें वर्णन अनेक लोक अनेक रीतींनीं करीत राहतील, इतकें हें संमेलन संस्मरणीय झालें ह्यांत शंका नाहीं. पण ज्यांनीं हा राष्ट्रीय मेळा प्रत्यक्ष पाहिला त्यांनीं तो न पाहिलेल्यांना त्याची कल्पना करून देण्याचें मनांत आणल्यास फक्त दोनच उपमा त्यांना यथार्थपणें उपयोगीं पडतील असें आम्हांस तरी वाटतें. ज्यांचें मन बारमास केवळ गृहप्रपंचाच्या गोष्टींतच गढून गेलेलें असतें व ज्यांच्या कल्पनेची भरारी संसारमर्यादेच्या पलीकडे जाऊं शकत नाहीं त्यांना लखनौ येथें भरलेला हा मेळा एखाद्या लग्नसमारंभांतील वऱ्हाडासारखा भासला असल्यास नवल नाहीं. गाडीघोड्यांची गर्दी, माणसांची धांवपळ, धांदल, गैरसोय, जेवणखाण्याचा राडा, खर्चवेंचाची बेपर्वा, मिरवणुकीचा थाट, मिरविणारांची हौस, मंगलपाठ, मंडपशृंगार, मंडपदेवतासंचार वगैरे गोष्टी खरोखरच एखाद्या प्रचंड लग्नसमारंभांतल्यासारख्या अनुभवास येत होत्या. पूर्वी राजकन्यांचें स्वयंवर होत

त्यावेळीं छप्पन्न देशचे राजेरजवाडे जमल्यानें जो देखावा पहावयास मिळत असेल तशाप्रकारचा हा देखावा होता असेंहि वर्णन या प्रसंगाचें कोणीं केल्यास त्यांत फारशी अतिशयोक्ति होणार नाहीं. पण ज्याचें मन राष्ट्रीय राजकारणांत गुंतलेलें असेल त्याला हा देखावा पाहून केवळ लग्नसमारंभाची आठवण न होतां राष्ट्रीय मोहिमेवर निघालेल्या लष्कराचा हा तळच पडला आहे कीं काय असेंच वाटल्याशिवाय राहिलें नसेल. कारण जो पाहावा तो स्वाभिमानपूर्ण, स्वावलंबी, वाटेल ती गैरसोय सोसण्यास तयार पण आपण योजिलेलें महत्त्वाचें काम साध्य झालेंच पाहिजे अशा निश्चयानें खंबीर बनलेला आणि स्वतःच्या मानापमानापेक्षां सर्वांनीं मिळून अंगिकारलेल्या कार्याच्या यशापयशाचीच चिंता वाहणारा असा दिसत होता. सभेच्या मंडपाबाहेर लग्नसमारंभाच्या सुखसोहाळ्याचा भ्रम कदाचित् कोणास पडण्याचा संभव असला तरी मंडपांत प्रवेश केल्यावर—विशेषतः तेथील सणसणीत भाषणें ऐकल्यावर—तो भ्रम टिकणें शक्यच नव्हतें. युद्ध किंवा रणसंग्राम ह्या गोष्टींचा संबंध शस्त्रास्त्रांचा खणखणाट व रक्तपात ह्यांच्याशींच असलेला प्रायः आढळून आला तरी तरवारी बंदुका हेंच काय तें रणसंग्रामाचें एकटें साधन व केवळ रक्तपातानें मिळणारा विजय हेंच त्याचें एकटें साध्य ही कल्पना अर्थातच ग्राम्य होय, व लखनौ येथें जमलेल्या राष्ट्रीय सभावाल्यांचा आवेश, उत्साह व निश्चय हीं लक्षांत घेतलीं असतां या समारंभास स्वराज्याची मुहूर्तमेढ रोंवण्याच्या समारंभापेक्षां स्वराज्याचें निशाण रोंवण्याच्या समारंभाचीच उपमा अधिक शोभेल ह्यांत शंका नाहीं.

आमच्या हल्लींच्या निःशस्त्र व अनुकंपनीय स्थितींत ही लष्करी उपमाहि कदाचित् कोणाला हास्यास्पद वाटण्याचा संभव आहे. तथापि, राष्ट्रीय राजकारणाला हल्लीं आलेली परिणत स्थिति लक्षांत घेतां, व लखनौस जमलेले अनेक प्रांतांतील लोक आज निःशस्त्र असले तरी अगदींच कांहीं शेणामेणाचे केलेले नाहींत, त्यांच्या पांचचार पिढ्यांच्याच पूर्वजांनीं स्वाऱ्याशिकाऱ्या युद्धें प्रत्यक्ष केलीं, राज्यें मिळविलीं व चालविलीं, ही गोष्ट लक्षांत घेतां ही लष्करी उपमा हास्यास्पद मानण्याचें खरोखरच कोणास कारण नाहीं. राष्ट्रीय राजकारण हा केवळ भातुकलीचा खेळ नव्हे किंवा एखाद्या लळितांतील सोंगाड्यांचा प्रवेश नव्हे, तर राष्ट्रांतील ओजस्वी पुरुषांनीं निश्चयानें आरंभिलेला तो राजकारणाचा उद्योग आहे. ही गोष्ट आतां सर्वशक्तिमान् व सद्धीवाल्या अशा राजकर्त्यांनाहि पटूं लागली आहे.

युरोपांतील रणभूमीवर ज्या हिंदी वीरांच्या पराक्रमाला ब्रिटिश जनता आज आदरबुद्धीनें मान तुकवीत आहे व ब्रिटिश सेनापति आपल्या तरवारीनें लष्करी सलामी देत आहेत त्यांच्याच हाडामांसाचें व त्यांच्याच रक्ताचें, पण फक्त राजकारण व मुत्सद्देगिरी यांचें काम शिरावर घेतलेले, भाईबंद लखनौ येथील राष्ट्रीय सभेच्या आवारांत वावरत होते. आणि एका अपशकुनी व उद्दाम गोऱ्या वसाहतवाल्यास पडलेलें दुष्ट स्वप्न खरें ठरून जर प्रत्यक्ष खऱ्याखुऱ्या युद्धाचा प्रसंग आलाच तर त्यांतील शेंकडों किंबहुना हजारों लोक युद्धास तयार झालेले पहावयास मिळतील याविषयीं कोणी शंका बाळगण्याचें कारण नाहीं. हत्यारांचा कायदा रद्द व्हावा, स्वयंसैनिक म्हणून लष्करांत शिरतां यावें, लष्करी युद्धविषयक कर्तव्य आणि पराक्रम दाखविण्याची संधि व मोठमोठ्या लष्करी मानाच्या व अधिकाराच्या जागा मिळाव्या अशा स्पष्ट अर्थाचे ठराव गव्हर्नरांच्या देखत मंजूर करून सरकारकडे पाठविण्यांत येतात हा केवळ रिकामपणामुळें कुडाला तुंबड्या लावीत बसण्याचा प्रकार आहे असें ज्या नादानें बुद्धीच्या मनुष्यास आमच्याविषयीं वाटत असेल, तो आज कितीहि प्रौढ किंवा वृद्ध असला तरी त्यास, नेहमींची मर्यादा सोडून, ईश्वरानें पांचपन्नास वर्षें आयुष्य द्यावें एवढीच आमची सात्त्विक इच्छा आहे. 'पेन् इझ माइटिअर दॅन दी सोर्ड' म्हणजे लेखणी ही तरवारीपेक्षांहि अधिक पराक्रमी असते अशी एक म्हण इंग्रजींत प्रसिद्ध आहे. तिचें प्रत्यंतर 'एका केवलमेव साधनविधौ सेनाशतेभ्योधिका! नंदोन्मूलनदृष्टवीर्यमहिमा बुद्धिस्तु मागान्मम॥' या चाणक्याच्या उद्गारांत जसें पूर्वी इकडे आढळून आलें तसेंच, आज ज्या ब्रिटिश प्रधानमंडळींनीं, सर्व जन्मांत स्वतः शस्त्राला स्पर्श न करतां, अवघें युरोपखंड रक्तकर्दमांत लोळविण्यासारखें अतिभारतीय युद्ध चालविलें त्यांच्याहि कर्तबगारींत दिसून आलेंच आहे. पण हातांत लेखणी धरल्यानें तरवार किंवा बंदूक धरण्यास हात असमर्थ होतो असें नाहीं; ही गोष्ट आज प्रधानकीचा राजीनामा देऊन उद्यां लष्करी गोटांत कर्नल या नात्यानें आपल्या पलटणीची सलामी घेणारा विन्स्टन चर्चिल किंवा १८ व्या शतकांतले आयरिश व्हालंटिअर्स यांच्या उदाहरणावरून सिद्ध होतच आहे. तात्पर्य हिंदी लोक आज अर्ध शतकापर्यंत निःशस्त्र आहेत व लोकसमाजाचे नेते व पुढारी यांच्या हातीं प्रत्यक्ष राज्याधिकार नाहीं एवढ्याच गोष्टीवरून त्यांच्या स्वराज्यविषयक चळवळीला जो तुच्छ मानील व सहज

प्रसंगानें सुचलेली लष्करी उपमा हास्यापद ठरवूं पाहील, त्यानें इतिहासाचें गाढ अज्ञान, बुद्धीचा कमकुवतपणा, व मनाची नादानी दाखविली यापेक्षां दुसरें कांहीं नाहीं.

असो; कालाच्या उदरांत काय सांठविलेलें आहे तें क्वचित् स्वतः कालासहि ठाऊक नसतें. मग आपण त्याविषयीं जिज्ञासा दाखविण्यांत काय अर्थ ! पण शुक्रवार ता. २९ डिसेंबर १९१६ हा दिवस हिंदी राष्ट्राच्या इतिहासांत निदान ब्रिटिश रियासतीच्या इतिहासांत–सुवर्णाक्षरांनीं लिहून ठेवण्यासारखा उगवला ह्याविषयीं शंका नाहीं. कारण त्या दिवशीं आम्हीं वर म्हटल्याप्रमाणें हिंदी स्वराज्याचें निशाण लखनौ येथें गोमती नदीच्या तीरावर रोंवलें गेलें ! जुन्या काळचे ऐतिहासिक प्रसंग आठवून, व केवळ कल्पनेनें त्यांचें भडक रंगाचें चित्र बनवून, अद्भुत रस आळवीत बसणारे कवी पुष्कळ भेटतात; किंवा भविष्यवादाची चटक लागलेली असल्या-मुळें पुढें कधीं काळीं येणाऱ्या सुवर्णयुगाचाच अद्भुतपणा ज्यांना पटूं शकतो असेहि लोक आढळून येतात. पण वर्तमानकाळीं, किंबहुना प्रत्यक्ष डोळ्यापुढें घडणाऱ्या गोष्टींचा अद्भुतपणा पटून त्यांचें स्वारस्य घेण्याला जी सहृदयता लागते ती कांहीं विशेष व दुर्मिळच होय. असली लोकोत्तर रसिकता ज्या थोड्या लोकांना ईश्वरानें दिली असेल त्यांनाच लखनौ येथील राष्ट्रीय सभेच्या मंडपांत स्वराज्याच्या मागणीविषयीं जो ठराव गेल्या शुक्रवारीं मंजूर करण्यांत आला त्याचें महत्त्व कळून येईल. चालू राजकारण डोळ्यानें प्रत्यक्ष दिसतें म्हणून तें कांहीं रुक्ष किंवा कमी अद्भुत खास नव्हे. आणि इतिहास झाला तरी त्यांतील कोणताहि अद्भुत प्रसंग हा कोणत्या ना कोणत्या तरी वेळीं 'चालू राजकारणच' होता कीं नाहीं ? शुक्रवारचा ठराव म्हणजे हिंदुस्थानच्या राष्ट्रीय आकांक्षेनें केलेला मुकुटधारणाविधिच होय ! या समारंभाला तिची सर्व प्रजा आपापला नजराणा घेऊन हजर होती. हिंदुस्थानांतील असा एकहि वर्ग नसेल कीं ज्याचे प्रतिनिधि या समारंभास आले नव्हते. जातिभेद, मतवैचित्र्य, व्यक्ति-द्वेष वगैरे राष्ट्रीय–कार्योच्छेदक पिशाचांनींहि गोमतीच्या प्रवाहांत गति घेतली, व नवीन शुभ देह धारण करून मंगळ आशीर्वादच दिला. ब्रिटिश रियास-तीचा इतिहासकार झाला तरी तो उद्यां याहून दुसरें काय म्हणणार ? आपलें राजकीय हृद्गत हुडकून काढण्याला व त्याला समर्पक अशा शब्दांचें रूप देण्याला हिंदी राष्ट्राला पांच पन्नास वर्षें लागलीं खरीं. पण तें हृद्गत त्याचें त्याला आतां

खरें करून आलें; आणि गेल्या शुक्रवारीं सर्व राष्ट्रानें एकमुखानें त्याचा एवढा मोठा उच्चार केला कीं त्याचा आवाज सर्व जगभर पसरला. अर्थात् त्याचा विसर त्याला स्वतःला ह्यापुढें पडणें शक्यच नाहीं, व त्याच्या हातून यापुढें जो जो म्हणून उद्योग होणार तो तो तें ह्रद्गत सफळ होण्याकरितांच होईल यांत शंका नको.

एखादें कांठीकापडाचें निशाण किंवा जरीपटका प्रतिपक्षी प्रबळ झाला असतां त्याला काढून टाकतां येतो, किंवा हस्तगत करून पायांखालीं तुडवितां येतो. पण हिंदी राष्ट्रानें स्वराज्याची मागणी करून रोंवलेलें हें अपूर्व निशाण आतां त्याचा कोणताहि प्रतिपक्षी काढून टाकण्यास समर्थ होणार नाहीं. सरकार आजपर्यंत हिंदी लोकांतील दुफळीमुळें स्वराज्यवाद्यांची कींव करीत असे; पण आतां ह्या कामीं निराश्रित म्हणून, स्वतः सरकारचीच कींव आम्हांस ह्यापुढें करावी लागणार! राष्ट्रीय सभेच्या जन्मापासून हिंदु–मुसलमानांमध्यें फूट पडण्यास सुरुवात झाली, व गेल्या दहा वर्षांत खुद्द हिंदु लोकांमध्येंहि, त्यांतल्या त्यांत अधिक नेमस्त असणाऱ्या लोकांस हातीं धरून, फूट पाडण्याचा प्रयत्न अनेक व्यक्तींनीं बरेच दिवसपर्यंत यशस्वी रीतीनें केला. पण काळच उलटला म्हणजे उलट्याचें सुलट होण्यास वेळ लागत नाहीं; व तीच गोष्ट हिंदु-मुसलमान आणि नेमस्त–जहाल हे दोन मोठे पक्षभेद अवघ्या ४।५ वर्षांत नाहींसे होण्याच्या कामींहि दिसून आली. हिंदु-मुसलमानांचें वैर एका अर्थानें अनेक शतकांचें असें म्हणण्यास हरकत नाहीं; आणि मवाळ-जहाल हा भेद जरी अगदीं अलीकडचा तरी पक्षद्वेषाच्या दृष्टीनें पाहतां तो हिंदु-मुसलमानांच्या वैराइतकाच किंबहुना त्याहून अधिक घातक होऊन राहिला होता, हें कांहीं खोटें नाहीं. पण हे पक्षभेद उगवत्या राष्ट्रीय बुद्धीच्या तेजामुळें वितळून गेले. शेवटल्या मुसलमान नबाबांच्या राजधानींत मुसलमान व हिंदु विद्वान् आणि राइस एकाच सभापीठावर बसून त्यांनीं प्रत्यक्ष स्वराज्याची ताबडतोब मागणी केली, त्याअर्थीं ब्युरॉक्रसीची सद्दी आतां संपली असें तिनें खास समजावें हा इषारा आम्ही बेलाशक देऊं शकतों. राष्ट्रांत दुफळी माजवूं इच्छिणाऱ्या अँग्लोइंडियन शकुनींना अशिक्षित किंवा अस्पृश्यवर्गाकडे धांव घेण्याशिवाय आतां गत्यंतरच उरलें नाहीं, पण हें त्यांचें आधारस्थानहि त्यांना फार दिवस लाभण्याचा संभव नाहीं. कारण सर्वच लोकांना आतां हें निश्चित

करूं लागलें आहे कीं, हिंदी लोकांपैकीं कोणत्याहि वर्गाच्या हातीं सत्ता आल्यास ती एका दृष्टीनें आपल्याच हातीं आल्यासारखी आहे. अशी बुद्धि खरोखरच उदित झाली नसती तर–कायदेकौन्सिल वगैरेंतून आपल्या प्रतिनिधींचें प्रमाण काय राहावें याविषयीं खासगी करारमदार करून घेऊन कां होईना पण–स्वराज्याचे अधिकार एकंदरीनें हिंदी लोकांच्या हातीं यावे, ब्युरॉक्रसीच्या हातीं यापुढें ते राहूं नयेत, अशा मागणीस मुसलमान लोक हिंदी लोकांना कधींहि मिळाफी झाले नसते. अमेरिकन प्रेसिडेंट आब्राहाम लिंकन ह्यांचें एक असें वचन प्रसिद्ध आहे कीं, ‘ या जगांत सर्व माणसांना कांहीं थोडा वेळ किंवा कांहीं थोड्या माणसांना सर्व वेळ फसवितां येणें शक्य आहे; पण जगांत असा कोणीहि बिलंदर भोंदू असूं शकतच नाहीं कीं जो सर्व लोकांना सर्व काळ फसवीत राहील. ’ ब्युरॉक्रसी ही भोंदू आहे असें आम्ही मुळींच म्हणत नाहीं, ती आपलें कर्तव्य तेंच करीत आहे. तरी स्वराज्याचे अधिकार देण्याच्या बाबतींत त्यांच्या हातून, न कळत कां होईना, पण एकाची सबब दुसऱ्यास सांगून दोघांनांहि अधिकारविरहित ठेवण्याचे प्रयत्न आजवर होत होते. पण एकच सबब सांगून तात्पुरतें निरुत्तर केलेल्या दोघांची गांठ केव्हां तरी पडून खुलासा झाला म्हणजे खरा प्रकार उघडकीस आल्याशिवाय कसा राहणार ! म्हणून “ अधिकाराच्या जागा वाटेल तर हिंदूंना द्या, वाटेल तर मुसलमानांना द्या, पण आमच्यापैकीं कोणाला तरी द्या. मात्र तुम्ही यापुढें त्या आपल्या हातीं ठेवून घेऊं नका ” असें ब्युरॉक्रसीला सांगण्याची स्पष्ट तयारी दोघांचीहि झालेली आज दिसत आहे. राष्ट्रीय भावनेचें खरें बीज काय तें ह्यांतच आहे; व हें बीज हिंदुस्थानच्या भूमींत आतां पुरतें रुजलें गेलें ह्याविषयीं सरकारासहि फारशी शंका उरेल असें आम्हांस वाटत नाहीं.

---

## ५० स्वराज्य, ब्राह्मण व ब्राह्मणेतर

( ता. १८ सप्टेंबर सन १९१७ )

मि. मॉंटेग्यू हे स्वराज्यविषयक चर्चा करण्याकरितां हिंदुस्थानांत येणार असें जाहीर झाल्यापासून स्वराज्याच्या चळवळीस विरोध करणाऱ्या आमच्या कांहीं ब्राह्मणेतर बंधूंनीं बरीच उचल खाल्ली आहे, व ब्राह्मण जातीसंबंधानें आपल्या मनांत उचंबळत असलेली खळमळ ओकण्यास अवेळीं सुरुवात केली आहे.

तथापि त्यांतल्या त्यांत आनंदाची गोष्ट इतकीच कीं, स्वतः ब्राह्मणेतर असून स्वराज्याच्या चळवळीस विरुद्ध नसणारे असेहि पुष्कळ प्रतिष्ठित लोक वेळींच पुढें येऊन वरील आत्मघातकी प्रकारास आळा घालूं लागले आहेत. यामुळें या अनिष्ट वादास भलतेंच स्वरूप न येतां, अखेर समुद्रांतील मोठ्या माशानें लहान मासा खाऊन टाकावा त्याप्रमाणें ब्राह्मणेतरांतला स्वराज्यास अनुकूल असणारा मोठा पक्ष स्वराज्यास विरोध करणाऱ्या लहान पक्षास खाऊन टाकील अशी आशा वाटूं लागली आहे. ब्राह्मण व ब्राह्मणेतर हा विरोध मद्रास इलाख्यांत जितका दृढमूल आहे तितका तो इतर प्रांतांत नाहीं. मुंबई इलाख्यांत तो अगदींच नाहीं असें म्हणवत नाहीं, व स्वतःचीं शिंगें मोडून वासरांत शिरणारे कित्येक सुशिक्षित ब्राह्मणेतर गृहस्थ या नसत्या भांडणावर फुंकर घालघालून त्याची उष्णता कृत्रिम रीतीनें वाढवूं पहात आहेत. तथापि एका हातानें कितीहि प्रयत्न केला तरी त्याला टाळी वाजवितां येणें शक्य नाहीं; व या आगंतुक वादांत आपल्या मनाची समता बिलकूल ढळूं न देण्याचा ब्राह्मणवर्गाचा पुरा निश्चय आहे. यामुळें हा कलहाग्नि इकडे प्रदीप्त होईल अशी आम्हांस बिलकुल भीति नाहीं. तथापि, हा वाद निघालाच आहे म्हणून या बाबतींत ब्राह्मणवर्गासंबंधानें कोणाचा गैरसमज राहूं नये, येवढ्याकरितांच या विषयावर सामान्यतः दोन शब्द लिहिण्याचें आम्हीं आज योजिलें आहे.

प्रस्तुतच्या वादाचे प्रथमतःच दोन भाग आपोआप पडतात. पहिला असा कीं, ब्राह्मणेतरांस खरोखरच स्वराज्य नको कीं काय ? व दुसरा असा कीं, त्यांनाहि जर स्वराज्य हवें तर ते हरकत तरी कोणत्या गोष्टीला घेतात ? पैकीं पहिल्या प्रश्नासंबंधानें आम्हास हें नमूद करण्यास आनंद वाटतो कीं, मद्रासकडे काय किंवा इकडे काय, ब्राणह्मेतरांकडून आजवर प्रगट झालेल्या विचारामध्यें मुळांत स्वराज्याच्या मागणीलाच पूर्ण विरोध असा थोडाच दिसून येतो, व त्याचें कारणहि उघडच आहे. ब्राह्मणेतरांच्या तर्फे म्हणून जे गृहस्थ वादास आज प्रवृत्त झाले आहेत ते स्वतः सुशिक्षितच असल्यामुळें हिंदुस्थानांतील हल्लींची एकतंत्री राज्यपद्धति त्यांना झाली तरी मनापासून आवडणें शक्यच नाहीं. इंग्रज लोकांनीं दिलेल्या शिक्षणाचा गुणच स्वातंत्र्यप्रियता हा असल्यामुळें सुशिक्षित लोक ब्राह्मणेतर असले तरी त्यांनाहि आपण आपल्याच देशांत नादान व खुरटलेलें रहावें आणि आपला सर्व कारभार परक्यांनीं आपली संमति न घेतां

करावा ही गोष्ट कशी आवडणार ? ब्राह्मणवर्गांच्या मानीव सामाजिक जुलमापासून कां होईना पण स्वतंत्र होण्याच्या बुद्धींत जें स्वाभिमानाचें बीज आहे तें राजकीय विचाराच्या भूमींतहि फलद्रूप झालेंच पाहिजे. आपणास मोठ्या हुद्याच्या जागा मिळाव्या व ब्रिटिश ब्युरॉक्रसीनें चालविलेल्या राज्यकारभारावर आपल्यांतील लोकमताचें दडपण असावें अशी महत्त्वाकांक्षा ब्राह्मणेतर झाला म्हणून त्याच्या मनांत उद्भवल्याखेरीज कशी रहाणार ? ब्राह्मणवर्गांचा पाडाव व्हावा अशी ब्राह्मणेतरांना इच्छा होणें स्वाभाविक आहे असें घेऊन चाललें, तरी केवळ ब्राह्मणांना अपशकुन करण्याकरितां आपल्या राजकीय महत्त्वाकांक्षेचें नाक कापून घेण्यासहि ब्राह्मणेतर कबूल होतील इतका अधमपणा आमच्या ब्राह्मणेतरबंधूंमध्यें वसत असेल, त्यांच्या मनुष्यत्वाची इतकी हानि झाली असेल, असें मानण्यास आमचें मनच घेत नाहीं. अर्थात् ब्राह्मणवर्ग क्षणभर विचारांतून अजीबात वगळला आणि केवळ ब्राह्मणेतर व ब्रिटिश ब्युरॉकसी यांच्यापुरतेंच पाहिलें तर स्वराज्य हवें असेंच ब्राह्मणेतरांना वाटलें पाहिजे, व तसें त्यांना आज वाटत आहेहि. हल्लींच्या मुख्य वादांत ब्राह्मण विरुद्ध ब्राह्मणेतर या विशिष्ट उपवादाचीं जीं जाळीं दुर्दैवानें पसरलीं आहेत, तीं या एकंदर प्रश्नाचा खोल विचार करणाऱ्या वाचकानें बाजूस सारून या खऱ्या मुद्याचा लक्ष्यवेध मार्मिकपणानें करण्यास त्यानें शिकलें पाहिजे.

अशा रीतीनें पहिल्या प्रश्नाचें नास्तिपक्षीं उत्तर दिल्यास वादाचें क्षेत्र आपोआप बरेंच कमी होतें. आम्हांस स्वराज्य हवें पण त्याची कोणतीहि योजना निश्चित होतांना 'ब्राह्मणेतरांच्या हक्कांचें योग्य संरक्षण झालें पाहिजे' असा या वादांतील दुसरा मुद्दा आहे. या मुद्यासंबंधानें आम्ही एकदमच असें सांगून मोकळे होतों कीं, ब्राह्मणेतरांच्या हक्कांचें संरक्षण करण्याची कोणतीहि सूचना पुढें आल्यास ब्राह्मण लोक तिचा विचार नुसत्या सहानुभूतीनेंच नव्हे तर थोड्या बहुत दिलदारीनेंहि करण्यास तयार आहेत. कै. ना. गोखले यांनीं आपल्या भाषणांतून व लेखांतून आणि मृत्युसमयीं करून ठेवलेल्या स्वराज्ययोजनेंतून ब्राह्मणेतर वर्गाच्या हक्कांचें संरक्षण करणें योग्य आहे असें ठिकठिकाणीं प्रतिपादिलें असल्याचें प्रसिद्धच आहे. आणि लो. टिळकांनींहि लखनौ येथील राष्ट्रीय सभेच्या प्रसंगीं मुसलमानबंधूंच्या महत्त्वाकांक्षेसंबंधानें जे उद्गार काढले ते लक्षांत घेतले म्हणजे स्वराज्याच्या बाबतींत ब्राह्मणेतरांना किती प्रेमळपणानें वागविण्यास ते तयार आहेत हें

दिसून येतें. “ कायदेकौन्सिलांत उद्यां एक वेळ सगळेच ब्राह्मणेतर आले तरी मला चालतील, पण तेथें लोकनियुक्त हिंदी लोकांचें प्राबल्य असलें पाहिजे, परक्यांचें किंवा सरकारनियुक्तांचें प्राबल्य नसलें पाहिजे ” हे त्यांचे शब्द कोणाहि ब्राह्मणेतरानें विसरूं नये. हे शब्द अगदीं शब्दशः कोणी घेणार नाहीं, ते तात्पर्यार्थानेंच घेतले पाहिजेत, हें कोणाहि समंजस मनुष्यास सांगण्याचें कारण नाहीं. पण या अतिशयोक्तींच्या मुळाशीं खऱ्या राष्ट्रीय भावनेचें बीज आहे हें कोणासहि नाकबूल करितां यावयाचें नाहीं. हिंदुस्थानांत ब्राह्मणेतरांतील सर्वांत मोठा वर्ग म्हटला म्हणजे तो मुसलमानांचा. पण या वर्गासंबंधानें सर्वसंमत अशी तडजोड लखनौस होऊन ती राष्ट्रीय सभेच्या स्वराज्य योजनेंत नमूदहि झाली आहे हें ज्यास माहीत आहे, तो हिंदूंचें मुसलमानांच्या हक्कसंरक्षणाविषयीं खरें धोरण काय आहे याविषयीं साशंक राहूं शकणार नाहीं; व मुसलमानांसंबंधानें सर्व हिंदूंचें जें धोरण तेंच तत्त्वतः ब्राह्मणांचें ब्राह्मणेतरांविषयींहि असणार हें उघड आहे, त्यांत बदल होण्याचें काय कारण ? पण या बाबतींत आम्ही मुख्य हरकत घेतों ती येवढ्यापुरतीच कीं, प्रत्येक जातीनें आपापलें हित दक्षतेनें पाहणें व त्याकरितां योग्य ती चळवळ करणें जरूर असलें तरी अखिल हिंदी जनतेचा ‘ ब्राह्मण व ब्राह्मणेतर ’ असा स्थूल विभाग करून जें केवळ ब्राह्मणद्वेषाचें अवास्तविक स्वरूप या वादास देण्यांत येत आहे तें दुष्ट बुद्धीचें आहे. कायदेकौन्सिलांतील सर्व जागा किंवा बहुतेक जागा आपणासच असाव्या असा हक्क ब्राह्मणांनीं पूर्वी केव्हांहि सांगितलेला नाहीं व ते पुढेंहि सांगूं इच्छित नाहींत. त्यांच्या वांट्याला प्रत्यक्ष व्यवहारांत लोकसंख्येच्या प्रमाणाबाहेर जागा पडत असल्या तर तें त्यांच्या जातिमूलक आग्रहाचें फळ नसून त्यांच्या शिक्षणाचें फळ आहे ही गोष्ट नाकबूल करणें म्हणजे निवळ आडरानांत शिरणें होय. ब्राह्मणांनीं पूर्वी इतर जातींना शिक्षणाच्या बाबतींत मुद्दाम मागें टाकलें किंवा दडपून ठेवलें हा आरोप सर्वस्वीं खोटा आहे. चातुर्वर्ण्याची तात्त्विक पद्धति सर्वस्वीं प्रत्यक्ष अमलांत पूर्वी केव्हां तरी होती किंवा नाहीं याविषयीं शंकाच आहे; व ती असली आणि अध्यापन, याजन व प्रतिग्रह हे अधिकार ब्राह्मणांप्रमाणेंच इतर वर्णांना नसले तरी त्यांची व्याप्ति फारच संकुचित होती. व्यावहारिक शिक्षण व त्याला लागणारी साक्षरता हीं क्षत्रिय व वैश्य यांनाच काय पण शूद्रांनाहि खुलीं होतीं. पुराण इतिहास वगैरे वाचण्याचा त्यांचा अधिकार कोणीं कधींहि काढून घेतला नव्हता.

तात्पर्य, वेदाध्यापनाचा तेवढा अधिकार केवळ ब्राह्मणांसच असला तरी ज्याला हल्लीं आम्ही शिक्षण म्हणतों तें कोणत्याहि वर्णाला सुलभ होतें. म्हणून ब्राह्मणांनीं ब्राह्मणेतरांना शिक्षणरहित ठेवलें या म्हणण्यास कांहींच आधार नाहीं. असें असतां शिक्षणाकडे इतर वर्णांनीं द्यावें तितकें लक्ष दिलें नाहीं. याचें खरें कारण त्यांनीं आपापल्या धंद्याकडे विशेष लक्ष दिलें व शिक्षणाकडे दुर्लक्ष केलें; कारण नुसत्या पुस्तकी व कारकुनी शिक्षणाला त्यावेळीं मान मुळींच नव्हता हेंच होय. आपापल्या धंद्याकडे लक्ष देण्यापासून इतर वर्णांचा आर्थिकदृष्ट्या फार फायदा झाला, व ब्राह्मण म्हटलें कीं ते निर्धन व ब्राह्मणेतर म्हटलें कीं ते सधन असा जो सामान्य भेद दिसतो तो त्यामुळेंच उत्पन्न झाला आहे. पण या स्थितीस अनुलक्षून "आम्हांला द्रव्योत्पादक धंदा इतर वर्णांनीं करूं दिला नाहीं" असें जर ब्राह्मण म्हणतील तर ती जशी त्यांची चूक होईल तशीच "आम्हांला ब्राह्मणांनीं सुशिक्षित होऊं दिलें नाहीं" असें ब्राह्मणेतरांनीं म्हणणें हीहि चूकच आहे. एकानें द्रव्योत्पादक शिक्षण व द्रव्य पसंत केलें, दुसऱ्यानें पुस्तकी विद्या व निर्धनत्व पसंत केलें, अशी केवळ आपखुषीनें पूर्वीं वांटणी झाली; याबद्दल परस्पर दोष कोणासच लावतां येणार नाहीं. बरें, पूर्वीं काय झालें असेल तें असो, पण आधुनिक काळांत तरी ही स्थिति पालटूं लागलीच आहे कीं नाहीं ? महाराष्ट्रांतील ज्ञानेश्वरादि ब्राह्मणसाधु-संतांनीं संस्कृत विद्येचें स्तोम कमीं करून केवळ जनतेविषयींच्या प्रीतीमुळें मराठीमध्यें वेदविद्या आणण्याचा प्रयत्न केला, हें विसरतां कामा नये. आणि आतां गेल्या शंभर वर्षांत इंग्रजी अम्मल झाल्यापासून तर विद्या व शिक्षण हें वाटेल त्याला घेण्यास सुलभ झालें असून ब्राह्मण लोक ब्राह्मणेतरांना तीं मिळण्यास हरकत करीत नाहींत इतकेंच नव्हे, तर ब्राह्मणेतरांना सुशिक्षित करण्यास ब्राह्मण पुढारीपणानें प्रयत्न करीत आहेत. पण अजूनहि पुस्तकी विद्या मिळविण्याचे कामीं ब्राह्मणेतर उदासीन असून त्यांच्यावर विद्या मिळविण्याच्या कामीं सक्ति व्हावी असें म्हणण्यांत ब्राह्मणच पुढारी आहेत. तात्पर्य, तुलनात्मक दृष्ट्या ब्राह्मणेतर अशिक्षित असल्यास त्याबद्दल ब्राह्मणांच्या नांवानें कोणीहि खडे फोडण्याचें खरें कारण नाहीं; व आज सरकारदरबारांत लोकसंख्येच्या मानानें ब्राह्मण अधिक असले तर त्याबद्दल त्यांना दोष लावण्याचेंहि कारण नाहीं. राज्यकारभाराला सुशिक्षण अवश्य असतें, व तें शिक्षण संपादन केल्यामुळें, स्वतः सरकार मनां-

तून ब्राह्मणांवर रुष्ट असतांहि, सार्वजनिक कामकाजांत केवळ ब्राह्मणांना लोकसंख्येच्या प्रमाणाबाहेर जागा त्यांना द्याव्या लागल्या; या गोष्टीला सरकारचा जसा नाइलाज आहे तसाच ब्राह्मणांचाहि नाइलाज आहे. कौन्सिलच्या निवडणुकींत ब्राह्मण येतात ते काय ब्राह्मणच एकजात मतदार आहेत म्हणून ? कायदे-कौन्सिलांत गतवर्षी सरकारतर्फे हिंदी लोकांच्या नेमणुका झाल्या त्यांत ना. कामत, ना. साठे, ना. नाईक, ना. लल्लूभाई सामळदास इत्यादि ब्राह्मणांच्या नेमणुका सरकारनेंच केल्या, इतकेंच नव्हे तर पूर्वी तीन वर्षे त्यांनीं काम केलें असतांहि त्यांनाच फिरून तीन वर्षें नेमलें, हें काय सरकार ब्राह्मण लोकांचे पक्षपाती होतें म्हणून ? इतर जातींचे पुढारी नेमण्यास त्यांचे हात कोणीं धरले होते ? याचा अर्थच हा कीं, सरकार हें ब्राह्मणेतरांचे कट्टे कैवारी असतांहि त्यांना कामकाजांचें महत्त्व लक्षांत घेऊन सुशिक्षितांना नाइलाजानें हातीं धरावें लागतें. ब्राह्मणेतरांत सुशिक्षित मिळतील तर सरकार त्यांनाच आधीं नेमील. पण शिक्षणविषयक सर्व सवलती समान असतांहि केवळ धंद्याच्या आवडीनें ब्राह्मणेतर हे अद्यापि पुस्तकी शिक्षणाकडे वळावे तितके वळत नाहींत. त्याला कोणीं काय करावें ?

ब्राह्मण व ब्राह्मणेतर यांच्यांतील शिक्षणविषयक असमता कालांतरानें निघून जाईलच पण तोंपर्यंतहि समाजांत ब्राह्मण व ब्राह्मणेतर असा द्वेषमूलक भेद कोणी न करितां सुशिक्षित व अशिक्षित असाच भेद केला पाहिजे. ‘ आम्ही अशिक्षित असलों तरी केवळ लोकसंख्येच्या प्रमाणानेंच आम्हाला सर्व अधिकारांच्या जागा मिळाल्या पाहिजेत ’ हें ब्राह्मणेतरांचें म्हणणें जात्यभिमानाला शोभणारें असलें तरी व्यवहारबुद्धीला शोभणारें नाहीं. आतां केवळ मुसलमान लोकांना ठराविक प्रमाणानें जागा राखून ठेवण्यास हिंदूंनीं संमति दिली त्याचीच पुढची पायरी म्हणून हिंदूंतील पोटजातींनाहि यथाप्रमाण जागा राखून ठेवण्याविषयीं ब्राह्मणेतरांचा आग्रहच असेल तर त्यालाहि आम्ही हरकत घेणार नाहीं. मात्र सर्वंच जातींचें सारखेंच समाधान होईल अशी योजना कोणास सुचवितां आल्यास त्यानें ती सुचवावी. कारण शिक्षण व द्रव्यसंपन्नता म्हणजे सरकार देणें देण्याची पात्रता हीं दोन लक्षणें अमुक एक इयत्तेपर्यंत अंगीं असणारास, मग तो कोणत्याहि जातीचा असो, निवडणुकींत मत असलेंच पाहिजे हें म्हणणें वेगळें, आणि फक्त जातवार लोकसंख्येच्या प्रमा-

णानें प्रत्येक जातीस अमुक जागा दिल्या जाव्या, मग त्यांचें शिक्षण किंवा सरकारदेणें देण्याची पात्रता कितीहि कमी असली तरी चालेल, हें म्हणणें वेगळें. मतदार होणें हें शिक्षण व द्रव्यसंपन्नता यांजवर अवलंबून ठेवल्यास जातीचा प्रश्न सहजच सुटतो; पण केवळ जातीकरितां म्हणून जातीला अमुक इतक्या जागा मिळाल्या पाहिजेत असें म्हणूं लागल्यास अमुक एक जातींत शिक्षण कमी आहे किंवा ती जात रानटी आहे असल्या सबबीवर तिला वगळतां येणार नाहीं. सुशिक्षित हे जर अर्धशिक्षितांचें हित रक्षण्यास नालायख तर अर्धशिक्षित हे तरी अशिक्षितांचें हित रक्षण्यास लायक कसे ? ही विचारसरणी मान्य ठरल्यास खानेसुमारीच्या आंकड्यांच्या आधारें अनेक गमतीचे चमत्कार कागदावर मांडतां येतील. पण तसें करण्यास आज आम्हांस स्थलावकाश नाहीं व हा वाद हास्यास्पदतेच्या थरावर नेण्याची आमची इच्छा नाहीं. आम्हांस आज इतकेंच सांगावयाचें आहे कीं, जातवार निवडणुकीचें तत्त्व राष्ट्रीयदृष्ट्या आम्हास संमत नसलें, तरी ज्या कोणास ही हौस पुरवून घ्यावयाची असेल त्यानें ती खुशाल पुरवून घ्यावी, आम्ही त्याच्या आड येऊं इच्छित नाहीं. मि. मँटेग्यूसाहेब हिंदुस्थानांत स्वतः येत आहेत व नुकत्याच प्रसिद्ध झालेल्या तारेवरून इकडे खुला दरबार ठेवण्याचा त्यांचा इरादा आहे. तेव्हां प्रत्येक जातीनें आपापले हक्क त्यांच्यापुढें आपापल्या खास प्रतिनिधींच्या द्वारें ठेवून आपला स्वतःचा मतदारसंघ बनवून घ्यावा. ब्राह्मण लोकांना मात्र या तत्त्वाचा अंगिकार करण्याची इच्छा नाहीं. आम्ही ब्राह्मण म्हणून आम्हांला इतके प्रतिनिधि द्या असें ते कधींहि मागणार नाहींत व तसे दिले तरी ते घेणार नाहींत; मग सर्व कायदेकौन्सिलांत एकहि ब्राह्मण न आला तरी चालेल. आहेत—आमचे इतर जातवाले आहेत—ते आम्हां ब्राह्मणांच्या हक्कांचें रक्षण करितील अशी आमची पक्की खात्री आहे ! सरकार ब्राह्मणांवर हल्लीं रुष्ट आहे हें प्रसिद्धच आहे. तेव्हां बिचाऱ्या ब्राह्मणांनीं ब्राह्मणेतरांच्या पाठीशीं न पडावें तर काय करावें ! 'नावेवर गाडा, गाड्यावर नाव' अशी जगाची राहाटीच आहे ! ब्राह्मणेतर सर्व जातींनीं तरी संतुष्ट राहावें म्हणजे झालें.

तात्पर्य, ब्राह्मणेतर जातींच्या बांधवांना आम्हांस एवढीच विनंति करावयाची आहे कीं, स्वराज्याच्या मागणीला त्यांनीं कोणत्याहि सबबीवर आज हरकत करूं नये, स्वराज्याचे अधिकार आपणास कोणते, कसे व कां पाहिजेत हें

निर्भयपणें सांगावें, आणि ब्राह्मणांना क्षणभर बाजूस वगळून, किंबहुना ते आज अस्तित्वांत नाहींत असेंहि वाटेल तर घटकाभर समजून, सर्व ब्राह्मणेतर जाति वरिष्ठ व कनिष्ठसुद्धां एकत्र होऊन त्यांनीं आपापसांत पोक्त विचार करून आपणास स्वतंत्र प्रतिनिधि किती पाहिजेत व आपले स्वतंत्र मतदारसंघ कसे बनवावे हें ठरवून स्टेटसेक्रेटरीस कळवावें. स्वराज्ययोजनेच्या या बाबीपुरतें ब्राह्मणवर्ग आनंदानें मौन स्वीकारील व ब्राह्मणेतरांच्या मागणीस बिलकूल विरोध करणार नाहीं. या बाबतींत आपलें खरें मत बोलावयास जाऊन स्वतःस स्वार्थी म्हणवून घेण्याची त्यांना इच्छा नाहीं. स्टेटसेक्रेटरीपुढें स्वराज्य-योजनेच्या इतर बाबी राष्ट्रहिताच्या दृष्टीनें त्यांना मांडतां येतील व त्याच ते मांडतील.

---

## ५१. पंजाब सत्याग्रहाची हकीकत

[ केसरी ता० ८ एप्रिल १९१९ तील उतारा ]

रौलेटबिलाविरुद्ध सत्याग्रहव्रताच्या द्वारां जाहीर निषेध करण्याचा विचार इतर अनेक ठिकाणांप्रमाणेंच दिल्ली शहरांतहि ठरला होता. त्याप्रमाणें रविवार ता. ३० मार्च हा दिवस दिल्ली शहरांतील हिंदुमुसलमानांनीं सत्याग्रहदिन म्हणून पाळला. परंतु समारंभ निर्विघ्नपणें तडीस न जातां लष्करी लोकांकडून निःशस्त्र लोकांवर गोळ्या झाडण्यांत आल्या आणि जागच्याजागीं सहा इसम ठार झाले; २ इसम इस्पितळांत मरण पावले आणि १२ असामी जखमी होऊन इस्पि-तळांत पडले. याखेरीज बरेच जखमी इसम इस्पितळांत न जातां घरीं किंवा खाजगी दवाखान्यांत गेले असावेत पण त्यांची संख्या कळली नाहीं. हा जो शोचनीय प्रकार घडून आला त्याचें कारण काय व त्याला जबाबदार कोण या-विषयीं भिन्न भिन्न हकीकती प्रसिद्ध होत होत्या. परंतु सरकारी रीत्या सिमल्याहून ता. ३ रोजीं जी हकीकत जाहीर झाली ती काय सांगते तें पहा.

"रौलेट-बिलाविरुद्ध निषेधप्रदर्शनार्थ रविवार ता. ३० रोजीं दिल्ली शहरांतील बहुतेक दुकानें बंद ठेवण्यांत आलीं. ज्या कोणी आपलीं दुकानें उघडलीं होतीं त्यांनाहि तीं लवकरच बंद करावीं लागलीं, दहा वाजल्यानंतर टांग्यांचीही रहदारी बंद करण्याचा प्रयत्न होऊन उतारूंना पायीं चालावें लागलें. या सर्व

गोष्टींकडे पोलिसचें लक्ष होतें आणि पोलिसची सर्वत्र जय्यत तयारी होती. दीड वाजण्याचे सुमारास सत्याग्रह्यांचा मोठा जमाव स्टेशनाजवळ दाखल झाला आणि त्यांतले कांहीं इसम स्टेशनांत जाऊन त्यांनीं तेथील फराळाच्या दुकानदारास आपलें दुकान बंद करण्यास सांगितलें व त्यानें तें नाकारतांच दुकानदारावर हल्ला करण्यांत आला. तेव्हां रेल्वे–पोलिसांनीं हल्ला करणाऱ्या दोघां इसमांस पकडून अटकेंत ठेवलें. हें वर्तमान कळतांच बाहेरच्या जमावांपैकीं शेंकडो लोक स्टेशनांत घुसले आणि त्यांनीं अटकेंत सांपडलेल्या दोघां इसमांस सोडविण्याचा यत्न केला आणि स्टेशनावरील सर्व व्यवहार बंद होण्याची धास्ती वाटूं लागली. त्यावेळीं प्लॅटफॉर्मवर असलेले कांहीं युरोपियन सोल्जर व मेसोपोटेमियाहून येऊन मणीपुरला जाण्याकरितां रेल्वेंत बसलेले २५० गुरखे शिपाई यांच्या साह्याय्यानें स्टेशनचें रक्षण करण्यांत आलें. परंतु जास्त मदतीची अपेक्षा वाटून किल्ल्यांतून लष्कर बोलावण्यांत आलें. त्यास अनुसरून सुमारें २० ते ३० ब्रिटिश सोल्जरांची एक तुकडी स्टेशनवर येऊन दाखल झाली. नंतर २ वाजतां कांहीं घोडेस्वारांसह पोलिससुपरिंटेंडंटचीहि स्वारी येऊन दाखल झाली. त्यावेळीं स्टेशनवरील पायउतारा पोलिस व त्यांच्या मदतीस आलेले २० ते ३० सोजीर यांच्याभोंवतीं जमावाचा पूर्ण गराडा पडला होता. लष्करचे व पोलिसचे लोक स्टेशनच्या दारांचा बंदोबस्त राखीत होते. पण दंगेखोरांचा जमाव इतका मोठा व नजीक होता कीं एकानें तर शिपायाच्या हातची बंदूक हिसकून घेण्याचा प्रयत्न केला व त्याला संगिनीनें भोकसावें लागलें.

"ही परिस्थिति पाहतांच पोलिससुपरिंटेंडंटनें गर्दी मोडण्याकरितां आपल्या घोडेस्वारांसह गर्दीवर चाल केली व जमावास दुभंगून स्टेशनचा दरवाजा व समोरचा रस्ता मोकळा केला. दंगेखोरांकडून विटांचे तुकडे फेकण्यांत येत होते व त्यांतले कांहीं तुकडे स्वतः पोलिससुपरिंटेंडंट व त्यांचे असिस्टंट डि.ट्रॅफिक सुपरिंटेंडंट आणि ॲ. डि. मॅजिस्ट्रेट यांनाहि लागले. याप्रमाणें लष्कर पोलिस आणि दंगेखोरांचा जमाव यांच्यामध्यें दोन तास झटपट चालल्यावर २-३० वाजतां सुपरिंटेंडंट व मॅजिस्ट्रेट यांनीं असें ठरविलें कीं, जर आतां जास्त कडक उपाय योजले नाहींत तर बेसुमार रक्तपात होण्याचा प्रसंग येईल म्हणून लष्करी लोकांना एकदोन फैरी झाडण्यास हुकूम देण्यांत आला. त्याबरोबर

२ इसम तात्काळ ठार झाले व बाकीचे दंगेखोर पळाले. तेव्हां मग पोलिसांनीं अर्ध्या तासांत राणीचा बाग मोकळा केला. टाऊन हॉलपर्यंत लष्करी पहारा ठेवण्यांत आला व राणीच्या बागेभोंवतीं गुरख्यांचें कडें बसविण्यांत आलें.

## दुसरा गोळीबार

"इकडे चांदणीचौकांत दंगेखोरांचा जोर अधिक आहे असें पो. सु. यांस दिसून आलें व टौन-हॉलच्या दिशेला दोन गोळीबार झाल्याचेंहि कानीं पडल्या-वरून पो. सु. तिकडे गेले. त्या वेळीं १५ सोल्जर व १५ पोलिस यांच्यावर सारखा दगडांचा मारा होत आहे आणि दंगेखोर राणीच्या बागेचे कठड्यावरून आंत घुसत आहेत असें त्यांस दिसून आलें. हा प्रकार असाच चालूं दिल्यास कांहीं सोजीर व पोलिस यांना जबर जखमा होतील अशी भीति दिसून आल्या-वरून जमावावर गोळीबार करण्यास हुकूम देण्यांत आला. गोळीबाराच्या दोनतीन फैरी झडल्या. तीन असामी पटकन प्राणास मुकले आणि इतरांनाहि जखमा झाल्या असाव्यात. या योगानें दंगा मोडला व दंगेखोरांची पांगापांग झाली. आठ इसम मयत असून १२-१३ दवाखान्यांत घायाळ आहेत. मेले-ल्या इसमांत लहान मुलगे कोणीच नाहींत. मशीनगन चढविलेली मोटारगाडी रस्त्यांतून हिंडविण्यांत आली. पण मशीनगनचा उपयोग करण्यांत आला नाहीं. त्याचप्रमाणें लष्करी स्वारांची तुकडी मागविली होती. पण दंगेखोरांची वाताहत झाल्यावर मग ती येऊन दाखल झाली. दंगा मोडण्यांत लष्कर व पोलिस यांनीं मोठें आत्मसंयमन केलें आणि पो. सु. व ॲ. डि. मॅजिस्ट्रेट यांनीं अकस्मात उद्भवलेला वेडावांकडा प्रसंग मोठ्या धैर्यानें पार पाडला असें स्थानिक अधिकाऱ्यांचें मत आहे!"

## जाहीर सभेची हकीकत

इकडे हा रक्तपाताचा प्रकार झाल्यावर सायंकाळीं कॉंग्रेसच्या मंडपाच्या मैदा-नावर स्वामी श्रद्धानंद (पूर्वाश्रमींचे गुरुकुलाचे संस्थापक लाला मुनशीराम) यांच्या अध्यक्षतेखालीं १५ हजार लोकांची जाहीर सभा भरली. या सभेला हरकत करण्याचा दोन वेळ प्रयत्न करण्यांत आला. दुसऱ्या वेळीं तर चीफ-कमिशनर व डि. मॅ. हे सभेच्या जागीं हजर होऊन त्यांनीं सभा बंद करण्यास सांगितलें. परंतु सभेचें सर्व काम अत्यंत शांतपणें चालेल व सर्व श्रोतृसमूह

माझ्या हुकमतीप्रमाणें वागेल असें स्वामीजींनीं आश्वासन दिलें व त्यांस श्रोत्यां-कडून होकार मिळाला तेव्हां अधिकाऱ्यांची कांहीं डाळ न शिजून ते निघून गेले व सभेंत रौलेटा बिलाचा निषेध करून स्टेटसेक्रेटरीनीं त्यास संमति देऊं नये असा ठराव पास करण्यांत आला. सभेचें काम आटपून लोक घरोघर जात असतां स्वामी श्रद्धानंदजी यांचेवर जो प्रसंग गुदरला होता व त्यांत त्यांनीं जें अलौ-किक धैर्य दाखविलें त्याची हकीकत त्यांच्याच शब्दांनीं देणें बरें. ती हकीकत अशी,

## स्वामी श्रद्धानंद यांची हकीकत

"जाहीर सभा आटपल्यावर आम्ही मोठ्या शिस्तीनें शहरांतून चाललों होतों. आम्ही क्लॉक–टॉवरपाशीं आलों त्या वेळीं गुरखे लोकांचा त्या रस्त्यावर पाहरा ठेवण्यांत आलेला आम्हांला दिसला. आम्ही आल्यावर गुरखे अर्थातच एका बाजूला सरले. पण एका गुरख्यानें हवेंत बंदुकीचा बार केला. बार होण्याब-रोबर माझ्याबरोबर असलेल्या लोकांत चलबिचल झालेली दिसली. पण मीं सर्वांना स्वस्थ उभें राहण्यास सांगितलें. त्याबरोबर जागचे जागीं ते स्वस्थ उभे राहिले. गुरखे उभे असलेल्या ठिकाणीं मीं एकटाच गेलों. व निरपराधी लोकांवर तुम्ही गोळ्या कां झाडता! असा मी त्यांना सवाल केला. लगेच दोन गुरख्यांनीं माझ्यावर रायफली रोखून 'तुमकू छेद देंगे' असें ते दरडावून म्हणाले. 'मैं खडा हूं गोळी चलाव' असें मींहि त्यांना सांगितलें. इतक्यांत आठदहा रायफली माझ्यावर रोखल्या गेल्या. गुरख्यांच्या धमकावण्या चालूच होत्या. आतां मात्र लोकांना दम धरवेना. 'तुम मत मरो हम मर जायेंगे' असें म्हणून लोक पुढें घुसण्याच्या बेतांत होते. पण मीं हातानें खूण केल्यावर लोक जागच्या जागीं थबकून राहिले. इतक्यांत एक युरोपिअन अधिकारी त्या ठिकाणीं दाखल झाला व गुरख्यांनींहि आपापल्या रायफली परत घेतल्या. गोळ्या झाडण्याबद्दल आपला हुकूम होता काय व आपण गोळीबार ऐकला काय असें मीं त्यास विचारलें. तेव्हां पहिल्यानें नकारार्थी उत्तर देऊन गोळीबारासंबंधानें मी चौकशी करतों असें त्यानें दुसऱ्या प्रश्नाचें उत्तर दिलें. नंतर तेथून आम्ही पुढें चाललों. इतक्यांत एक गुरखा आपली कुकरी फिरवीत आमच्यावर चाल करून आला. पण असल्या धमकावणीला कोणींहि दाद दिली नाहीं, मशीन-गनचें भेडसावणें चालूच होतें. पण त्यालाहि लोक घाबरले नाहींत किंवा

गांगरून गेले नाहींत. पोलिसासंबंधीं आम्हांला कोणत्याहि प्रकारचा द्वेष वाटत नाहीं. पण या अत्याचारामुळें लोकांचा सरकारच्या न्यायबुद्धीवरील विश्वास उडाला आहे."

## प्रेतांची जंगी अपूर्व मिरवणूक

रविवारीं हा शोचनीय प्रकार घडल्यावर सोमवारीं मयत इसमांचीं प्रेतें मागण्यांत आलीं. अधिकाऱ्यांनीं प्रथम टोलवाटोलवीच केली. पण अखेरीस प्रेतें स्वाधीन करण्यांत आल्यावर हिंदु व मुसलमान हा भेदभाव विसरून जाऊन उभय धर्मीयांच्या बळी गेलेल्या इसमांच्या प्रेतांची जोड मिरवणूक काढण्यांत आली. या मिरवणुकीला दहा हजारपर्यंत इसम हजर होते. ही मिरवणूक क्लॉक टॉवरजवळ आल्यावर ज्या ठिकाणीं हिंदु व मुसलमान वीरांनीं सत्याग्रहाच्या यज्ञांत आपले बळी दिले तेथील रक्तस्रावानें पवित्र झालेल्या भूमीवर हिंदु व मुसलमान यांच्या एकीचें दृढीकरण करण्यांत आलें आणि नंतर हिंदूंचीं प्रेतें स्मशानाकडे व मुसलमानांचीं दफनभूमीकडे नेण्यांत आलीं.

या दंग्यास सुरुवात कशी झाली, एकंदर प्रकार काय घडला व रक्तपाताबद्दल जबाबदार कोण याची चौकशी करण्याकरितां नागरिकांच्या वतीनें बिनसरकारी इसमांचें कमिशन नेमिलें असून सिव्हिल हॉस्पिटलमधील जखमी लोकांच्या साक्षी घेण्यास सुरुवात झाली आहे. सरकारनेंहि आपलें कमिशन नेमून चौकशी करावी अशी मागणी करण्यांत आली पण ती नाकारण्यांत आली.

मंगळवारपासून दिल्लींतील सर्व व्यवहार पूर्ववत् सुरू झाला आहे. परंतु लष्कर व पोलिस यांच्या जोरावर आम्हीं दंगा मोडून शांतता प्रस्थापित केली ही अधिकाऱ्यांची बढाई खरी नसून हकीम अजमलखान, सुलतानासिंग वगैरे लोकमान्य पुढाऱ्यांनीं जेव्हां आश्वासन दिलें आणि लष्करचे लोक शहरांतून काढून न्या म्हणजे पूर्ववत् व्यवहार चालतील असें सांगितलें तेव्हां अधिकाऱ्यांनीं लष्कर काढून नेल्यावर शहरांत पूर्ववत् व्यवहार सुरू झाले.

## अमृतसरच्या लोकांचा छळ

[ ता. १३ माहे एप्रिल सन १९२० ]

पंजाबांत अमृतसर येथें सुवर्ण मंदिराशेजारीं जालियनवाला बागेंत जनरल डायर यानें निरपराधी आबालवृद्धांची कत्तल केल्यास आज तारखेस बरोबर एक वर्ष झालें. या दुःखद गोष्टीच्या स्मरणार्थ आज रोजीं हजारों ठिकाणीं जाहीर

सभा भरविण्यांत येतील व डायर याच्या अमानुष कृत्यांचा निषेध करून जालियनवाला स्मारक फंड जमा करण्यांत येईल. या कत्तलीची बरीच साग्र हकीकत आतांपर्यंत वाचकांस अवगत झालीच आहे. तथापि एका वर्षापूर्वी अमृतसरच्या लोकांस जे जे अनेकविध अकल्पित असह्य हाल व उपमर्द अकारण सोसावे लागले त्या यमयातनांची त्रोटक कहाणी आजच्या या प्रसंगीं वाचकांस सादर करण्यांत येत आहे. यांत ज्या गोष्टी आतांपर्यंत जगजाहीर झाल्या आहेत त्यांची पुनरावृत्ति शक्य तितकी टाळून आतांपर्यंत अप्रसिद्ध पण काँग्रेस कमिटीच्या रिपोर्टांत प्रसिद्ध झालेली अशी हकीकत देण्यांत येत आहे.

डॉ. किश्चलू व सत्यपाल यांना विश्वास दाखवून बोलावून आणून पकडून हद्दपार केल्यावर ता. १० रोजीं अमृतसरचे नागरिक डे. कमिशनरकडे फिर्याद करण्याकरितां जात असतां रेल्वे लाइनवरील दोनहि पुलांचे रस्ते बंद करण्यांत अधिकाऱ्यांची चूक झाली. हे रस्ते बंद केले नसते तर डे. कमिशनरच्या जीवास अपाय झाला असतां ही कल्पना चुकीची आहे. कारण रस्ता बंद केल्यामुळें दंगा सुरू झाल्याबरोबर गोळीबार सुरू केल्यावेळीं डे. कमिशनर तेथें होते. परंतु कोणींहि त्यांच्यावर हल्ला केला नाहीं किंवा त्यांस अपाय करण्याचा प्रयत्नही केला नाहीं. असें असून पुलावरील लोकांना मागें परतण्यास सांगण्याचा मि. मखबुल महंमद व मि. सालेरिया हे प्रयत्न करीत असतां त्यांना बाजूस होण्याविषयीं सूचना न देतां एकदम गोळीबार सुरू करण्यांत आला. त्यांत हे वकील स्वतः बळी पडले नाहींत हा दैवयोगच होय. हा गोळीबार सुरू होतांच लोक परतूं लागले असतां गोळीबार बंद न होतां तो तसाच चालू राहिला व व त्यामुळें जे २०।२५ लोक मृत्युमुखीं पडले त्यांतल्या बहुतेकांना गोळ्यांच्या जखमा पाठीवर झाल्या होत्या. व त्याहि कमरेच्या भागास न होतां वरच्या भागास झाल्या होत्या. जायबंदी झालेल्या इसमांस दवाखान्यांत येण्यास डोल्या आणल्या नव्हत्या व मागाहूनहि आणूं दिल्या नाहींत. वेळेवर औषधोपचार झाला असता तर कांहीं जखमी इसम मृत्यूच्या दाढेंतून वांचले असते. जखमी इसमांस सिव्हिल हॉस्पिटलमध्यें थारा मिळाला नाहीं हा प्रकार तर फारच गर्हणीय आहे. ता. ११ पासून चार पांच दिवस शहरांतील पाण्याचे नळ व विजेचे दिवे बंद करण्यांत आले व त्यामुळेंहि लोकांचे अतोनात हाल झाले. ता. १० रोजीं शहरांत जाळपोळ व नॅशनल-बँकेची लूट झाल्यानंतर ता. ११ रोजीं अधिकारीवर्गाचीं

खलबतें चालू असतां डे. पो. क. मि. मिसूर म्हणाले कीं ' युरोपिअनांच्या एकेका खुनाला नेटिव्हांचे हजारों मुडदे पाडले पाहिजेत ! ' याच खलबतांत शहरावर तोफांचा भडिमार करून अर्ध्या तासांत शहर उध्वस्त करण्याच्या कल्पनेची भवति न भवति झाली. त्यावेळीं लाला धोलनदास यांनीं स्पष्टपणें असें बजावलें कीं, सुवर्णमंदिरास जर यत्किंचितही धक्का लागला तर पंजाबांत शांतता प्रस्थापित होण्याची आशाच बाळगूं नका. ही सुवर्णमंदिराची अडचण झाल्यामुळेंच शहराचा बचाव झाला असें म्हणण्यास हरकत नाहीं; कारण शहरावर तोफा डागण्याच्या कल्पनेची मजल शाब्दिक चर्चेच्या पुढें जाऊन कोणत्या बाजूनें कसा मारा करावा याचा नकाशाहि तयार झाला असून सिव्हिल सर्जन कर्नल स्मिथ यानें आपले असिस्टंट डॉ. धनपतराय यांस आणखी अर्ध्यातासानें जनरल डायर शहरावर मारा करणार आहे सबब तुम्ही शहरांत जाऊं नका अशी इषारत दिली होती! मि. वॅथन यांनीं मात्र डोकें शांत ठेवलें असून भडिमार करण्याच्या सूचनेला हरकत घेतली. ज्यांचा दंग्याशीं कांहीं संबंध नाहीं असे दोघे नेत्र--रोगी शिख आपल्या डोळ्यावर शस्त्रक्रिया करून घेण्याकरितां याच कर्नल स्मिथकडे आले असतां ' जा गांधीकडे जा म्हणजे ते तुमचे डोळे नीट करतील ' असला उद्धट जबाब देऊन त्यानें त्यास इस्पितळांतून घालवून दिलें ! याच कर्नल स्मिथनें जालियनवालाबागेंत जखमी झालेले कांहीं इसम इस्पितळांत आले असतां ' या पिसाळलेल्या कुत्र्यांना येथून हांकलून लावा. गांधी, सत्यपाल व किश्चलू हे त्यांना औषधोपचार करतील ' असे उद्गार काढले ! डॉ. सत्यपाल व किश्चलू यांना हद्दपार करण्याचा हुकूम आला असून देखील त्याची बजावणी करण्याचा डे. कमिशनरला विचार पडला असता, याच कर्नल स्मिथनें लाहोरला मुद्दाम जाऊन ले. गव्हर्नरकडून हुकमाची बजावणी करण्याविषयीं हुकूम आणला !

## घुशीचा सांपळा

ता. १३ रोजीं जालियनवाला बागेंतील कत्तल झाली हें सर्वश्रुतच आहे. हा ' घुशीचा सांपळा ' कसा तयार केला गेला हें गूढ उकलणें कठिण नाहीं. लाला कन्हयालाल हे अध्यक्षस्थान स्वीकारणार आहेत असें जाहीर करण्यांत आलें होतें, पण लाला कन्हयालाल यांना त्याचीं वार्ताहि नव्हती. लालाजींना वार्ताहि नसतां त्यांच्या नांवाचा उपयोग करण्यांत आला याचा अर्थ काय हें ज्याचें त्यानें ओळखावें असें कन्हयालाल हे आपल्या साक्षींत म्हणतात व वाचकांना

त्याचा अर्थ लक्षांत येईलच. जालियनवालाबागेंतील सभा बोलवणारा हंसराज याच्या कित्येक गुप्त पोलिस अधिकाऱ्यांशीं मुलाखती होत असत. डॉ. सत्यपाल यांना हद्दपार केल्यावर हरताळ पाडा व डे. कमिशनरकडे फिर्याद करण्याला चला म्हणून लोकांना चिथावणारा इसम हाच! ता. १३ च्या पूर्वी सी. आय. डी. च्या अधिकाऱ्यांशीं याची मुलाखत झाली होती. याच इसमानें ता. १३ रोजीं जालियनवालाबागेंत सभेच्या तयारीकरितां जागा साफसूफ करविली, प्लॅट-फॉर्म तयार करविला, डोकीवर विमान घिरट्या घालूं लागलें असतां सभा सोडून बाहेर जाऊं नका असें श्रोत्यांस सांगितलें. ही सर्व कारवाई चालू असतां उघड व गुप्त पोलिसांचे अधिकारी सभेच्या जागीं येत व त्यांच्याशीं हंसराजाचें बोलणें किंवा खाणाखुणा होत. डोकीवर विमान घिरट्या घालूं लागतांच गुप्त पोलिस अधिकारी बागेंतून निघून शेजारच्या घरांत जाऊन बसले. विमान निघून गेल्यानंतर अर्ध्या तासांत लष्करी लोकांनीं बागेचें तोंड व्यापिलें व गोळीबार सुरू होण्यापूर्वी हंसराजानें हातरुमाल उडवून खूण केली व नंतर तो प्लॅटफार्म-वरून उतरला! इतर लोक घाबरून भिंतीवरून उड्या टाकीत असतां हंसराज हा लष्करी शिपायांनीं व्यापलेल्या दरवाज्याकडेच गेला व तो त्या दरवाज्यानेंच बाहेर पडला. या 'घुशीच्या सांपळ्यांतून' बाहेर पडलेला प्रत्येक इसम तांतडीनें आपल्या घराकडे जात असतां हंसराज मात्र घराकडे न जातां आपण सुखरूप असल्याचा नुसता निरोप घराकडे पाठवून हॉल बझारकडे चालता झाला! अशा या इसमास हंटर–कमिटीपुढें साक्षीला न आणतां मेसापोटेमियांत पाठवून देण्यांत आलें. या सर्व गोष्टींवरून हा 'घुशीचा सांपळा' कसा बनवला गेला हें उघड होत आहे. लाला हरकिसनलाल यांचें जालंदरच्या प्रांतिक परिषदेंत जें भाषण झालें त्यांत ते म्हणतात कीं "कॉंग्रेस कमिटीपुढें या गोष्टीचा स्पष्ट निर्णय करणारा पुरावा दाखल झाला होता. परंतु तो पुरावा जाहीर करण्याला साक्षीदारांची संमति नसल्यामुळें कमिटीनें स्पष्ट निर्णय दिला नाहीं." पण असें करणें हा सत्याग्रहाचा अतिरेक होय!

मि. थॉमसन यांच्या मताप्रमाणें अवघे २९० इसम मृत्यु पावले नसून मेले-ल्यांची संख्या एक हजारांवर व दगावलेल्यांची संख्या आणखी एक हजारांवर गेली हें या रिपोर्टांतील शेंकडों जबान्यांवरून सिद्ध आहे. पण या कत्तलींत सात महि-न्यापासून सत्तर वर्षांपर्यंत सर्व वयाचीं माणसें होतीं व त्यांत साधु बैरागीहि होते व

स्त्रियाही होत्या हें बहुतेकांस अवगत नाहीं. परंतु निशाणी नंबर २४, ४५, ४६, ५०, ५२, ७६ वगैरे जबान्यांवरून ही गोष्ट कळून येते. एकंदर समाज २० हजारांपर्यंत असून त्यांत अल्पवयी मुलें ४००।५०० होतीं! या गोळीबारानें जितके अधिक बळी घेतां येतील तितके घेण्याचा डायरचा निश्चय स्वतः त्याच्याच जबानीवरून उघड झाला असून या रिपोर्टांतहि त्यास प्रत्यंतर सांपडतें. गोळीबार सुरू झाल्यावर कित्येक इसम जमिनीवर लोळण घेऊन आपला बचाव करून घेऊं लागले तेव्हां शिपायांना खालीं बसून गुडघे टेकून खालीं नेम धरण्याचा हुकूम देण्यांत आला, व हा हुकूम नीट बजावला जात नाहीं असें पाहतांच एका ऑफिसरनें शिपायांना शिव्या हासडून रिव्हॉल्व्हरचा धाक घालून बंदुका खालीं रोखण्यास भाग पाडलें! ज्यास्तींत जास्त प्राणहानि होण्याकरितां हंसराजानें तर सर्व उपाय योजले होतेच. पण त्याशिवाय ज्यावेळीं लष्करी शिपाई बागेच्या दरवाज्यांत शिरत होते त्यावेळीं जे इसम बाहेर जात होते त्यांना दरडावून बागेंत जावयास लाविलें.

## साध्वी रतनदेवी

अशा रीतीनें जाणून बुजून शक्य तितक्या अधिक इसमांची कत्तल करून केवळ दारूगोळा संपल्यामुळें आणखी प्राणहानि करण्याचें साधन न राहिल्यानें डायरची स्वारी परत निघून गेल्यानंतर, त्या बागेंत व आसपास जो करुण, रौद्र, बीभत्स व भयानक या रसांनीं परिपूर्ण असा देखावा दिसूं लागला त्याचें वर्णन करणें अशक्य आहे! ज्यांचे जे कोणी आप्त घरीं आले नाहींत त्यांना शोधून काढण्याची धांदल रात्रीं ८ वाजेपर्यंत चालली होती. पण प्रेतांचा व मृतप्राय देहांचा एवढा खच पडला होता व कोणाच्याच ओळखीचे नसलेले परस्थ लोकहि त्यांत इतके होते कीं सर्व प्रेतांची तपासणी व विल्हेवाट रात्रीं ८ वाजेपर्यंत होऊं शकली नाहीं. आणि रात्रीं ८ वाजल्यानंतर बाहेर पडणाऱ्यास गोळी घालून ठार करण्याची द्वाही फिरली असल्यानें बरींच प्रेतें, बरेच जखमी इसम यांची रात्रभर विल्हेवाट लागली नाहीं. त्या गर्दींत कित्येक जखमी इसमांस वेळेवर पाणीहि न मिळाल्यानें ते गतप्राण झाले. त्या भयानक रात्रीं त्या बागेंतील देखाव्याची कल्पना येण्यास निशाणी नं. ७५ ची साध्वी रतनदेवी या स्त्रीची जबानी वाचावी. या साध्वीचा पति घरीं न आल्यानें तिनें बागेंत जाऊन पतीचें प्रेत धुंडाळून काढलें. तितक्यांत आठ वाजल्यानें सर्व रहदारी बंद झाली

च आळोआळी फिरून तिनें आपल्या पतीचें प्रेत घरापर्यंत पोंचविण्यास मदत करण्याविषयीं विनवणी केली असतां गोळीबाराच्या दहशतीनें कोणीहि घर सोडून बाहेर येईना ! तेव्हां ती बिचारी त्या कत्तलखान्यांत परत पतीच्या प्रेताशेजारीं जाऊन बसली. लवकरच त्या मसणवटींत कुत्र्यांचा धुमाकूळ सुरू झाला. तेव्हां रतनदेवीनें कुत्र्यापासून आपला स्वतःचा व नवऱ्याच्या प्रेताचा बचाव करण्याकरितां तेथेंच पडलेली एक काठी हातांत घेतली व कुत्र्यांना दटावीत ती काळरात्र त्या स्मशानांत घालविली ! ज्यांचा प्राण अद्यापि गेला नव्हता अशांचें विव्हळणें, कुत्र्यांचें भुंकणें, दिवाभीतांचा घुत्कार, घड्याळाचे ठोके व आपल्या धडधडणाऱ्या छातीचे ठोके याखेरिज दुसरें कांहीं तिला ऐकूं येत नव्हतें ! अशा भयानक रात्रींतहि एक दोनदां कांहीं इसम त्या बागेंत आले ! रात्रीं बाहेर पडण्याचा हुकूम नसतां हे इसम निर्भ-यपणें आले कसे व गेले कसे ! कोणा आप्ताच्या प्रेताच्या शोधासाठीं ते आले होते म्हणावें तर पुष्कळशीं प्रेतें त्यांनीं धुंडाळून व चांचपून पाहिलीं खरीं पण एकहि प्रेत उचलून नेलें नाहीं. कित्येक प्रेतांच्या अंगावर दागिने होते, खिशांत घड्याळें होतीं, कप्यांत नोटा व रोकडहि असेल. परंतु सकाळीं पहावें तों सर्व कांहीं झळझळीत झालें होतें ! अशा रीतीनें ही काळरात्र निघून गेल्यावर सूर्योदय होतांच पुनः प्रेतें शोधून घेऊन जाण्याचा व त्यांचा अंत्य संस्कार करण्याचा धुमधडाका सुरू झाला. किती इसम मृत्युमुखीं पडले याची नोंद या वेळीं अधिकाऱ्यांनीं केलीच नाहीं. पण पुढें चार महिन्यानंतर ज्या कोणाचे आप्तइष्ट त्या कत्तलींत मेले असतील त्यांची चौकशी करून नांवें नोंदविण्याचा जाहिरनामा लागला !

ही कत्तल झाल्यानंतर अधिकारीवर्गांत चर्चा होऊन तिच्या युक्तायुक्तते-बद्दल कोणाचें काय मत झालें असेल तें असो. पण ही कत्तल चालू असतां पोलिस अधिकारी मि. रोहिल व जव्हारमल यांना तो देखावा पाहवेना म्हणून ते बागेच्या बाहेर गेले होते. डे. कमिशनर मि. आयर्व्हिंग याला मात्र त्याची दिक्कत न वाटून आपलें समर्थन करण्याकरितां त्यानें एक जाहिरनामा काढला. त्यांत जनरल डायर व त्यांचे शिपाई बागेंत आले असतां लोकांनीं त्यांनाच दटाव-ण्याचा प्रयत्न केला म्हणून गोळीबार करावा लागला असा धडधडीत खोटा जाहिरनामा प्रसिद्ध केला. सभेंतील लोकांनीं आपणांस दटावल्याबद्दल स्वतः

जनरल डायर हंटर कमिटीपुढील साक्षींत एक अवाक्षराहि बोलत नाहीं ! हा जाहिरनामा आणखी एकदोन मुद्यांच्या दृष्टीनेंहि महत्त्वाचा आहे. सभाबंदीचा हुकूम झाला असतां 'सरकारच्या वाइटावर असलेल्या कांहीं इसमांनीं ही सभा भरविली व खोट्या थापा मारून त्या सभेस शक्य तितके अधिक इसम गोळा केले, पण त्या सभेला जाण्यांत धोका काय आहे तो कळविला नाहीं' असें मि. आयर्व्हिंग म्हणतात ! सरकारच्या वाइटावर असलेले हे इसम कोण ! त्यांनीं कोणत्या बाता झोकून दिल्या याचा मि. आयर्व्हिंग हे खुलासा करतील काय ! या घुशीच्या सांपळ्यांत शक्य तितकीं अधिक सावजें कोंडण्याचा लबाडीनें प्रयत्न करण्यांत आला ही गोष्ट सरकारलाहि कबूल आहे. पण सभेची उभारणी करणारा हंसराज हा तर पोलिसांचा हस्तक ! शिवाय सभेच्या आधीं तीन वाजल्यापासून त्या जागीं गुप्त व उघड पोलिस अधिकारी येऊन गेले व गोळीबार सुरू होण्याच्या आधीं दहा मिनिटें त्या सर्वांनीं आसपासच्या घरांत दडी मारली. पण तत्पूर्वी एकानेंहि श्रोतृवर्गापैकीं एकालाहि त्या घुशीच्या सांपळ्यांतून निघून जाण्याविषयीं सूचना किंवा इषारा किंवा हुकूम दिला नाहीं. अर्थात् हेच इसम सरकारचे 'हितशत्रू' ( ill-wishers ) ठरत नाहींत काय ! याच जाहीरनाम्यांत मि. आयर्व्हिंग आणखी असें जाहीर करतात कीं ही कत्तल करणाऱ्यांत एकहि युरोपियन शिपाई नव्हता, पण हें जाहीर करण्यांतला हेतु काय ! ही अमानुष कत्तल युरोपियन सोजिरांनीं केली नसून तुमच्याच शिपायांनीं केली हाच ना या 'न मया' म्हणण्यांतला अभिप्राय ! पण कानावर हात ठेवण्याच्या या असल्या क्लृप्तीनें त्या कत्तलीचा अमानुषपणा जास्तच निंद्य ठरतो. हा गोळीबार करणें न्याय्य होतें असें जर तुमचें मत आहे तर हें 'न मया' म्हणण्यांत मतलब काय ! आणि तो गोळीबार चुकीचा व राक्षसीपणाचा होता असें जर तुमचें मन तुम्हास खात असेल तर गोळीबार करणारे शिपाई गोरे नव्हते एवढ्यानें जनरल डायरच्या शिरावरचें पापाचें खापर दुसऱ्याच्या माथीं थोडेंच फुटणार आहे.

या आसुरी कृत्याची जबाबदारी एकमेकांवर लोटण्याचा प्रयत्न कसा चालला होता याची कल्पना ता. १४ रोजीं घडलेल्या हकीकतीवरून चांगली करतां येते. त्या दिवशीं कोतवालींत प्रमुख नागरिकांची सभा भरली होती. त्यावेळीं डायरनें स्पष्ट सांगितलें कीं, मी सीधा माणूस आहें. मला डावपेंच कांहीं कळत नाहींत.

लढाई म्हटल्यानंतर मला फ्रेंच रणभूमि व अमृतसर सारखेंच आहे. या भाषणा-वरून जनरल डायर याची अमृतसरच्या दंग्यासंबंधीं भलतीच कल्पना करून देण्यांत आली होती हें उघड दिसतें व त्याची जबाबदारी मि. आयर्व्हिंग यांच्या शिरावर येऊन पडते. अर्थातच मि. आयर्व्हिंग यांस ती असह्य होऊन त्याच सभेच्या वेळीं खानबहादूर गुलाम सादिक हे बोलावयास उभे राहिले असतांना मि. आयर्व्हिंग हे एकदम उसळून ह्मणाले 'खानसाहेब गप्प बसा. तुम्ही लोकानीं मला जी भलतीच बातमी दिली त्याचा हा सगळा परिणाम आहे! अशा रीतीनें ही टोलवाटोलवी करण्याचा निंद्य प्रयत्न दुसरे दिवसापासून सुरू झाला. कत्तल करण्याचा हुकूम डायरनें दिला असल्यानें त्याच्यावरची जबा-बदारी नाहींशी होऊं शकत नाहीं हें खरें. परंतु मि. आयर्व्हिंग हेही या दोषांचे बरोबरीनें हिस्सेदार आहेत. परंतु कॉंग्रेस कमिटीनें मि. आयर्व्हिंग यांची चौकशी व्हावी अशी शिफारस केली नाहीं याचें सखेदाश्चर्य वाटतें. हंटर कमि-टीच्या रिपोर्टांत ही उणीव भरून काढली जाते कीं काय पहावें!

या अमानुष कत्तलीशिवाय इतर रीतीनेंहि अमृतसरच्या निरपराधी लोकांचा अत्यंत छळ करण्यांत आला. त्यांत फटके मारणें, पोटानें सरपटावयास लावणें वगैरे अमानुष प्रकार सर्वश्रुतच आहेत. पण त्या सर्वांपेक्षां खोट्या साक्षी देण्यासाठीं झालेला छळ फारच भयंकर असून रक्ताचें पाणी करून सोडणारा असल्यानें त्याचा तेवढा उल्लेख करून ही हृदयद्रावक कहाणी तूर्त संपवूं. कॉंग्रेस कमिटीच्या रिपोर्टांत असलीं शेकडों उदाहरणें नमूद आहेत. पण त्यांतल्यात्यांत मौलवी गुलाम झिलानी यांची हकीगत अंगावर शहारे आणणारी आहे. डॉ. किश्लू, डॉ. सत्यपाल, मि. बाशीर यांच्या विरुद्ध साक्ष देण्याकरितां गुलाम झिलानी यांचा अत्यंत क्रूरपणें छळ करण्यांत आला. त्या छळाच्या प्रकाराचा उच्चार करणें देखील किळसवाणें असल्यानें ती हकीगत सविस्तर देतां येत नाहीं. खोटी साक्ष देण्याच्या धमकींतून स्त्रिया देखील सुटल्या नाहींत हें मिसेस नेली बेंजा-मिन हिच्या साक्षीवरून सिद्ध होतें. या छळाची ही कहाणी जितकी लांब-वावी तितकी लांबणार, परंतु विस्तारभयास्तव ती संपविणें जरूर आहे. तथापि या छळांत हिंदी लोकांना औषधोपचाराची व डॉक्टरांची मदत न मिळाल्यानें त्यांचे झालेले हाल व झालेली प्राणहानि ही अत्यंत शोचनीय व गर्हणीय होय. रात्रीं आठ वाजल्यानंतर कोणीहि घराबाहेर पडूं नये हा जुलमी हुकूम निदान

डॉक्टरना तरी लागूं केला नसता तर जालियनवालाबागेंत जखमी झालेले कांहीं इसम तरी प्राणास मुकले नसते. शेरवुडलेनमधून पोटानें फरपटल्याशिवाय जाण्याचा हुकूम नसल्यानें आजारी इसमास डॉक्टरची मदत मिळूं शकली नाहीं. व त्यामुळें माझा मुलगा मृत्यूच्या दाढेंत सांपडला असली केविलवाणी जबानी वाचून कोणाच्या काळजाचें पाणी होणार नाहीं ! असे एक ना दोन तर शेकडों प्रकार या रिपोर्टांत नमूद आहेत. असला मनुष्यत्वाला लाज आणणारीं कृत्यें या विसाव्या शतकांत ब्रिटिश राज्यांत न्यायाकरितां व सत्याकरतां महायुद्ध करून जय संपादन केल्यानंतर त्या विजयाला कारणभूत झालेल्या पंजाबी लोकांत घडून यावी हें देशाचें दुर्दैव होय! ता. १३ एप्रिल १९१९ पासून अमृतसर वगैरे ठिकाणच्या पंजाबी लोकांवर जो असह्य छळ सोसण्याचा प्रसंग आला तसा प्रसंग वैऱ्यावरहि येऊं नये. पण ज्यांनीं तसा प्रसंग आणला त्या उद्दाम अधिकाऱ्यांना ब्रिटिश पार्लमेंट कोणती शिक्षा करणार हा प्रश्न आज सर्वांच्या पुढें असून हंटर कमिटीच्या रिपोर्टानें त्या प्रश्नाची लवकरच वासलात लागणार आहे. या हंटर कमिटीच्या रिपोर्टानें हिंदी लोकांच्या काळजाला झालेली ही जखम भरून येते का त्या जखमेंत आणखी मीठ चोळलें जातें याचाहि उलगडा लवकरच होईल.

पंजाबांत लष्करी कायद्यान्वयें ज्या लोकांना शिक्षा झाल्या होत्या त्यांच्यातर्फे विलायतेंत प्रीव्ही कौन्सिलपुढें अपिल करण्यांत आलें होतें. सर जॉन सायमन यांनीं अपिलि अर्ज गुदरून तक्रार सांगितली परंतु तिचा उपयोग न होतां लॉर्ड हॉल्डेन यांनीं आपणांला हें अपील घेण्याचाहि अधिकार नाहीं असें ठरवून तें काढून टाकलें. त्यानंतर इकडे पंजाब प्रकरणाची चौकशी करण्याकरिता स्कॉटलंडांतील एक न्यायमूर्ति लॉर्ड हंटर यांच्या अध्यक्षतेखालीं एक कमिटी नेमण्यांत आली. पण काँग्रेसचे अध्यक्ष या नात्यानें पं. मदनमोहन यानीं या कमिटीच्या म्हणजे न्यायकोर्टाच्या घटनेविरुद्ध जाहीर तक्रार केली. ता.१० सप्टेंबर रोजीं भरलेल्या कायदेकौन्सिलांत त्यासंबंधानें त्यांनीं एक ठरावहि मांडला पण तो बहुमतानें नामंजूर झाला. हंटर कमिटीवर फक्त दोनच हिंदी गृहस्थ नेमण्यांत आले. एक अलाहाबादचे जगत् नारायण व मुंबईचे चिमणलाल सेटलवाड. या कमिटीपुढें डायर-ओड्वायर वगैरे लोकांच्या साक्षी व्हावयाच्या होत्या आणि न जाणो कदाचित् या चौकशींतून कांहीं अधिकाऱ्यांचे कांहीं

अपराध अक्षम्य असे निष्पन्न झाले तर कायद्याच्या कचाटींत ते सांपडावयाचे म्हणून त्यांना कायदेशीर अभयवचन देण्याकरितां 'माफीचें बिल' म्हणून एक बिल सरकारनें कौन्सिलपुढें आणून झटपट मंजूर करून घेतलें. आणि ज्यांना निष्कारण कैदेच्या शिक्षा झाल्या ते अजून तुरुंगांतच होते. आणि जे फुकट मारले गेले ते तर मेलेच. पण ज्यांनीं हे अन्याय केले त्यांनीं चुकून माकून फसगतीनें कायद्याच्या तडाक्यांत सांपडूं नये म्हणून ही आगाऊ तरतूद करण्यांत आली होती!

---

# ५२. विसावी प्रांतिक परिषद, सोलापूर

आजची ही विसावी प्रांतिक परिषद. तिचें अध्यक्षस्थान आपण मला दिलेंत याबद्दल मी आपला अत्यंत ऋणी आहें, पण त्याबरोबर एक गोष्ट मागून घेतों. सभेचें सर्व काम संपेपर्यंत आपण मला ममत्वबुद्धीनें वागविलें पाहिजे. उन्हाळा कडकला आहे, काम जिकीरीचें आहे. अशा वेळीं सुस्वभावी मनुष्य सुद्धां सहज रागावतो. कृपा करा व सलोख्यानें सभेचें काम पार पाडण्यास मदत करा.

## जुनी आठवण

पाहावें त्या बाजूस स्नेही मंडळीच दिसतात; पण तिघांमुळें चुकल्याचुकल्यासारखें वाटतें. ते कै. चिं. रानडे, लेले व अप्पासाहेब वारद. पहिले दोन १९०२ सालच्या सभेचे सेक्रेटरीच होते. अप्पासाहेब वारद नांवानें सेक्रेटरी नव्हते, तरी परिषदेचे आधारस्तंभ होते. उदार मन, व्यवहारचातुर्य, सार्वजनिक हितबुद्धि हे गुण त्यांच्यामध्यें विशेष होते. ते आज हयात असते तर समाजाचें मन मिळतें राखण्यास त्यांची मोठी मदत झाली असती. पण मृत्यु यथाक्रम सर्वांना घेऊन जाणारच त्याबद्दल दुःख करून काय उपयोग?

## तेव्हां व आतां!

याच शहरीं अठरा वर्षांपूर्वी बारावी प्रांतिक परिषद भरली होती, पण ती किती छोटेखानी होती! त्या दिवसांच्या मानानें ती मोठी व यशस्वी झाली; पण अलीकडे पहावें तों अशा सभांचें सर्व प्रमाणच वाढलें आहे. तेव्हां रिपन हॉलमध्यें सगळ्या परिषदेचा व आल्यागेल्यांचा समावेश होऊं शकला. आजच्या या विसाव्या परिषदेला मोठ्या मैदानांत ५।६ हजार लोकांना

पुरेल इतका मांडव घालावा लागला. पण सभासदांच्या संख्येबरोबरच सभेचें ध्येय, आकांक्षा, मागण्या सर्वच वाढलें. तेव्हां आम्ही ही चर्चा करीत होतों कीं, प्रांतिक न्यायखातें अमुक अमुक उपायांनीं सुधारावें. युनिव्हर्सिटी कमिशन हाच काय तो तेव्हां वरिष्ठ कारभारांतला मोठा विषय. पण आतां अशा गोष्टींनीं आमचें समाधान होत नाहीं. तेव्हां दिल्लीस दरबार भरण्याच्या कल्पनेनें सरकार लोकांस वेड लावूं पाहत होतें. पण अशा छप्पन्न पोकळ दरबारांना कोण विचारतो? खुद्द बादशहांनीं जाहिरनामा काढून फर्माविलें कीं, स्वराज्य-हिंदुस्थानाला हक्कानें मिळालें पाहिजे; एवढेंच नव्हे, तर या कामीं विलंब सहन न होऊन निदान प्रांतिक कारभारांत तरी लोकांना पूर्ण सोळा आणे स्वराज्य-जबाबदारीचें स्वराज्य दिलें पाहिजे, अशी मागणी कॉंग्रेसच्या शिष्ट—मंडळानें खुद्द पार्लमेंटच्या वेशीवर नेऊन लावलीसुद्धां. जगाच्या राष्ट्रसंघांत हिंदुस्थानला स्थान मिळालें. कोरड्या मानानें का होईना, पण आज आम्ही इतर राष्ट्रांच्या बरोबरीचे झालों. पण हें सर्व घडलें एका युद्धामुळें आणि तें युद्धहि १८ वर्षांपूर्वींच्या बोअर—युद्धासारखें चिल्लर नव्हे. आजच्या महायुद्धाच्या मानानें ती काय खोट्या तलवारीची लढाई, आणि तींत झालें तरी आमच्याकडे काम आलें मुडदेफरासाचें! उलट हल्लींच्या महायुद्धांत आम्ही पैशानें, सोन्यानें केवढी मोठी मदत केली व बहादुरी मिळवली. अर्थांतच अठरा वर्षांपूर्वीं या ठिकाणीं त्या परिषदेचे अध्यक्ष, हिंदुस्थान राजनिष्ठ आहे, हिंदुस्थान राजनिष्ठ आहे असें काकुळतीनें जें प्रतिपादन करीत होते त्याची गरज आज उरली नाहीं. उलट आज जग आपण होऊन विचारतें, "हिंदुस्थानच्या राजनिष्ठेच्या मानानें इंग्लंड त्याला बक्षीस काय देणार?" पण बक्षीस काय हें दिसतेंच आहे. तात्पर्य, हें कालमाहात्म्य आहे. तरी पण इंग्लंडनें यामध्यें कुरकुरीला जागा ठेवलीच आहे. इंग्लंड व हिंदुस्थान जोडीदार म्हणून लढले; पण खऱ्या फायद्याच्या रकमा इंग्लंडला व जखमा हिंदुस्थानला अशी वांटणी झाली. थोरामोठ्यांची जोडीदारी चांगलीशी भावत नाहीं. उलट फरफटून अंगाचें सालडें मात्र निघतें. आम्ही केवळ परोपकाराकरितां हातांत शस्त्र घेतलें असा इंग्लंडचा बहाणा आणि पुकारा! आणि इकडे पहावें तर नवा मुलूख, नवें राज्य, नवी प्रजा पदरीं पडून इंग्लंडची चंगळ चालली आहे. एका साम्राज्याच्या जोडीला जवळजवळ दुसरें एक इंग्लंडला मिळालें. कारण कोणत्याहि नांवाखालीं मिळालें तरी राज्य तें

राज्यच. उगाच दुसऱ्या राष्ट्रांच्या नांवानें मात्र बोंबाटा कीं, याला अन्यायानें हातपाय पसरावयाचे आहेत, त्याला आपलें वर्चस्व वाढवावयाचें आहे, त्याला जगाचा व्यापार आवरून बसावयाचें आहे. बिचारा प्रे. विल्सन! त्याला खरोखरच वाटलें कीं, हें युद्ध म्हणजे परोपकाराची आग! पण आतां तहाच्या वाटाघाटींतले कित्येकांचे स्वार्थसाधुपणाचे चाळे पाहून अमेरिकेनें तहांतून आपलें अंग काढून घेतलें. प्रतिष्ठित अमेरिकन टीकाकार उघड उघड म्हणतात, राष्ट्रसंघ हें एक नुसतें खेकटें आहे. जग जिंकून आपल्या ताब्यांत ठेवावयाला इंग्लंडला तें एक साधन झालें. स्वयंनिर्णयाचा प्रसाद तहाच्या आरतीच्या वेळीं सर्वांना वांटला; मग हिंदुस्थाननेंच काय पाप केलें असें अमेरिकन टीकाकार धडधडीत विचारतात. आम्ही तुमच्याबरोबर लढलों; पण आम्हांला तुमचा मुलूख नको. आमच्यांतला थोडासा मुलूख वाटेल तर कोणाला देऊन टाकतां येण्यासारखा आहे. आम्हांला मोबदला म्हणून, बक्षीस म्हणून, कसें कां होईना, पण स्वराज्याचे हक्क पाहिजेत. ते देतां कीं नाहीं बोला, नाहीं तर तुमची आमची जोडीदारी, भागीदारी कसली? कर्ज वाढलें, बाजारभाव कडकले, रौलेट ॲक्टासारखे कायदे आले, आणि अमृतसरसारख्या हकनाक कत्तली झाल्या. असलेच फायदे पदरांत बांधून घेऊन फिरून तुमच्या जोडीला आम्हांला लढाईला बोलावणार कीं काय?

कित्येकांना वाटतें कीं, नव्या सुधारणा मिळाल्या, सगळा वचपा निघाला, दुःखाचें परिमार्जन झालें, हिंदुस्थानचे हात स्वर्गाला टेकले पण नीट पाहा आणि खरें सांगा, या सुधारणांची योग्यता इतकी मोठी आहे काय? कमलपुष्प चिखलाच्या घाणींत जन्माला येतें, तशा या सुधारणा युरोपियन लोकांच्या कुचक्या विचारकर्दमांत जन्माला आल्या हें खरें; पण कमलाचें सौंदर्य किंवा सुवास हे गुण कांहीं या सुधारणांत दिसत नाहींत. अर्ध्या बाडग्या लोकसत्तेचें एक अपूर्व झाड हिंदी राजकारणाच्या रानांत उगवलेलें दिसतें; पण वनस्पतिशास्त्रज्ञाला त्याला द्यायला नांव मिळत नाहीं व लोकांना या नव्या वल्लीचा उपयोग कसा करावा हें लक्षांत भरत नाहीं. आम्हीं सगळें कांहीं एकदम मागणार आणि आमच्या कृपण सरकारला मुळींच कांहीं द्यायला नको—असल्या या बिनतोड वादांतील कांहीं तरी तोड म्हणून ही द्विदल नामक जबाबदारीची राज्यपद्धति योजून काढली आहे. अशा वादांत अशीच तोड निघावयाची हें खरें; पण वरिष्ठ कारभारापुरती तरी ही योजना ठेवावयाची होती; प्रांतिक कारभार तो काय! त्यांत

साम्राज्याच्या हिताचा घातपात कांहीएक नाहीं. मग या कारभारापुरते तरी आम्हांला पूर्ण स्वराज्याचे अधिकार द्यायला काय हरकत होती ! अशी तक्रार केली म्हणजे म्हणतात, मॉंटेग्यू मोठा सज्जन ! होय; आम्ही म्हणतों ते सज्जन आहेत. पण उपयोग काय ? प्रत्यक्ष कारभाराची गोष्ट तेथें कोणाचें सौजन्य घेऊन काय अंथरावयाचें कीं पांघरावयाचें ! नुसतें कोणाचें सौजन्य उगाळून व पिऊन कोणाचें पोट भरत नसतें. मॉंटेग्यूसाहेब उदार मग सुधारणा कृपण कां ! कर्झन–सिडेनहॅमसारख्यांशीं त्यांची गांठ पडली म्हणून ! असेल. पण आम्हांला त्याचा काय उपकार ! आम्ही माणसाचें बोलत नाहीं; मुद्द्याचें बोलतों. त्यांत सांगा सुधारणा उदार कशा त्या ?

उगीच आपले केंसांचेंच पाट काढावयाचे व राईचा पर्वत करून दाखवावयाचा तर मला सुद्धां छोट्या सुधारणा बड्या करून दाखवितां येतील. पण थोड्या व्यापक दृष्टीनें पाहा. सुधारणांना कांहीं मोजमाप असेल कीं नाहीं ! त्यानेंच मोजूंमापूं. आम्हीं सगळ्या हिंदुस्थानच्या राज्यकारभाराची किंमत, केवळ जमाखर्चाच्या भाषेनें बोलायचें तर, उणीपुरी दोनशें कोटि रुपये धरूं. यांतल्या अवघ्या तेवीस कोटि रुपयांचा जमाखर्च खातीं तोडून देऊन सरकारनें आमच्या स्वाधीन केला. पण त्यांत सुद्धां सरकारनें किती हातचे ठेवले आहेत. साम्राज्याचें हित म्हणून एक, वरिष्ठ सरकारचें हित म्हणून एक, कायद्याची सत्ता देतां येत नाहीं म्हणून एक, मिळून इकडून-तिकडून पायबंद लावलेच आहेत. आणि प्रधान हा लोकशाहीचा नोकर म्हणावा तर त्याला धाब्यावर बसविण्याचा अधिकार गव्हर्नरच्या हातीं आहे. ज्यांत पाहावें त्यांत सरकारचा इसमे मेरा चांदभाई आहेच. त्यांतून उरून लोकांच्या हातीं काय लागेल तें खरें.

पण स्वराज्याचा अधिकार म्हणजे कांहीं नुसता पैसा नव्हे. हातीं पैसा पुष्कळ, पण अधिकार क्षुद्र तो तरी काय उपयोग ? सराफाच्या हातून सुद्धां नाण्याच्या गोण्या रोज हव्या तितक्या येतात जातात. राजकारणांतलें खरें धोरण वरिष्ठ दरबारांत ठरावयाचें. पण तेथें आम्हांला सत्ता नाहीं. तीन हिंदी कौन्सिलर्स सरकार तेथें घेणार. पण त्यांत वशिल्यांचीं तट्टें बरींच. कौन्सिलर नादान नेमला म्हणजे तो साहेबाच्या हाताला हात लावावयाचा. जरा चमक असली कीं सर शंकरं नायरसारखा राजीनामा द्यावा लागणार. वरिष्ठ कारभारांत

आम्ही अस्पृश्य ! आमच्याच घरांत आम्ही चोर; परक्यांनी मात्र कारभाराचा नंगा नाच हवा तसा करावा, वरिष्ठ कार्यकारी कौन्सिल म्हणजे स्वर्गद्वार ! त्यांतून अखत्यारानें स्वराज्यमंदिरांत शिरावयाला आणखी किती युगें तपश्चर्या करावी लागणार कोण जाणें !

कांहीं छोटीं खातीं व वसूल तोडून दिला. पण त्यांतहि किती खुबी ! खर्चांच्या खात्याचें भरताड स्वाधीन केलें. उदाहरणार्थ, शिक्षण आरोग्य वगैरे. यांना पैसा कोठला ? दारुखात्याची दारू कमी करूं म्हणाल तर शिक्षणाला पैसा कोठला आणणार ? दारु कमी न कराल तर मद्यपाननिषेधाची चळवळ केली ती खोटी म्हणा ! तुम्हांआम्हांवर धूर्त इंग्रजांचा हा दुहेरी पेंच आहे. नव्या योजनेंत गोऱ्या एक्झिक्युटिव्ह कौन्सिलराची चैन आहे, कारण सत्ता मत्ता पुष्कळ त्यांच्या हातीं, जबाबदारी थोडी किंवा मुळींच नाहीं. गव्हर्नराची परीक्षा आहे. कारण अब्रूनें दोन तोंड त्याला संभाळावीं लागणार. खरें संकट काय तें प्रधानाला. इकडे काटकसर कशी करावी, कर कसे बसवावे, व राखून ठेवलेल्या खात्यांच्या पिशवींतून अधिक पैसा कसा मिळवावा या विवंचनेनें त्याच्या डोक्यांत किडे पडतील.

नवीन सुधारणा अपुऱ्या वाटण्याला दुसरें एक कारण असें कीं, कायदेकौन्सिल लोकनियुक्त झालें. प्रधान गादीवर आले, तरी आज फाटका शिपाई किंवा तुटका सोजीर पंजाबाप्रमाणें आमच्या अब्रूवर व प्राणावर उठला तर आमचें रक्षण कसें होणार ? आम्ही जर सुधारल्या इंग्रज सरकारची प्रजा तर आम्हांला नैसर्गिक कांहीं हक्क आहेत. नाहीं म्हणा. नाहीं तर उल्लेख करून कायद्यांत घाला. पण आम्हाला कायदेशीर जामिनकी या बाबतींत द्यायला सरकार तयार नाहीं. जॉइंट कमिटीनें तर कानावर बोटच ठेवलें. ती म्हणाली, तेवढी बाब सोडून पुढें बोला. पण पुढें बोला काय कपाळ ? मुळाचाच पत्ता नाहीं. गांधींच्या कमिटीनें पंजाबांतले अनन्वित प्रकार वेशीवर टांगले ते आज पंजाबांत झाले. उद्यां दुसऱ्या प्रांतांत होणार नाहींत कशावरून ? ही मनाची रुखरुख जोंपर्यंत जाणार नाहीं तोंपर्यंत नवीन सुधारणा अंगीं लागणार नाहींत.

आहेत त्या सुधारणा गोड करून खाव्या म्हटलें तरी तुरुंगाचीं द्वारें अद्यापि पुष्कळांना खुलीं झालीं नाहींत. त्यांचे गुन्हे राजकीय आणि बादशहांनीं राज-

कीय कैदी बंधमुक्त करण्याचा हुकूम दिला. तरी बरींद्र कुमाराला सोडा, सावरकरांना सोडूं नका, हॉर्निमनला परत येऊं देऊं नका, या छापखान्याची जामिनकी परत द्या पण त्याची मात्र अडकवून ठेवा, असा पंक्तिप्रपंच सरकार धडधडीत करतें, तो कोणाला गोड लागणार? सुधारणा हलक्या आहेत त्या भरीव दिसाव्या म्हणून त्यांत जबाबदारीचें शिसें ओतून ठेवलें आहे त्यानें तरी खरा भारदस्तपणा आला आहे काय? जबाबदारी हें आजच्या घटकेला तरी सोंग आहे. ती नुसती माया आहे. कारण या 'जबाबदारी'च्या स्वराज्यांतला प्रधान गव्हर्नर नेमणार व गव्हर्नरच काढणार हें कसें? सव्वादोनशें वर्षांपूर्वी खुद्द इंग्लंडांत हीच स्थिति होती व हीच स्थिति होती म्हणून राज्यक्रांतीपर्यंत तंटे गेले. इंग्रज शहाणे, मात्र आपल्यापुरते. सर्व प्रधान लोकपक्षांतून नेमावयाचे असा सल्ला एका मुत्सद्यानें राजाला दिला व त्यानें तो ऐकला. एकाच विचाराचे सर्व कार्यकारी प्रधान असल्यास तंटाबखेडा होत नाहीं. येथें पहावें तों प्रधान आणि कौन्सिलर दोघांचे पंथ वेगळे. दोन दिशांना तोंड करून दोन घोड्यांनीं ओढलेला रथ कशी प्रगति करतो, हें आतां पाहावयाचेंच आहे. दोन डोळे पण दृष्टि एक अशी स्थिति प्रत्ययास आली तर आनंदच आहे. तथापि ही एक बाजू झाली. कारण असेंहि म्हणणारे दुसरे लोक आहेत कीं, ही द्विदल पद्धति कुचकामाची ठरणार. कित्येक जाणते त्याहि पुढें जाऊन म्हणतात, "ज्याला द्विदल उत्पन्न करतां येतें, तो एकाच दळावर काम भागविता; पण सरकारला तुमच्या माणसांकडून तुमचीच फजिती करावयाची आहे. मतदार, प्रतिनिधि व प्रधान सर्वांना जबाबदारीच्या एकाच मडक्यांत घालून सर्वांची उकडहंडी बनवावयाची आहे. त्यांना तुम्ही हें आणि तें काय सांगत बसलां?"

मग आतां बोला, या सुधारणा म्हणजे सुखाचा कळस झाला, हौसेची शिग भरली असें म्हणून आम्हीं काय गप्प बसावें? का उरलेल्या मोठ्या अधिकाराबद्दल चळवळ चालू ठेवावी? टिचभर जिंकलेल्या जागेचें रक्षण किंवा डागडुजी करण्याकरितां राजकारणी लोकांचें सर्व सैन्य येथेंच आणून ठेवलें तर प्रतिपक्षी बाकीच्या मैदानांत धिंगाणा घालतो; त्याची वाट काय? दहा वर्षांनीं लायकीच्या परीक्षेंत पास होऊं, मग पार्लमेंट आणखी अधिकार तोडून देतच आहे; असें म्हणून झोंपीं जावें कीं आज जगांतील असंतोषाचा व न्यायबुद्धीचा नवा तापला आहे त्यावर होईल तेवढी आपली पोळी भाजून घ्यावी! देशांतल्य

देशांत पुष्कळ चळवळ व्हावी, हें तर ब्रह्मदेवानेंच सांगितलें आहे. पण आयता राष्ट्रसंघ निर्माण झाला आहे, नव्या न्यायकचेरीचीं दारें उघडलीं आहेत, भालदार चोपदार अर्जदार पुकारीत आहेत, अशा वेळीं आंत कां घुसूं नये ? आपलें गाऱ्हाणें कां पुढें मांडू नये ? व बहाणा एक आणि कृति एक असें वर्तन ठेवणारांना लाजवितां आलें तर कां लाजवूं नये ! विलायतेंतील मामुली चळवळ चालूंच द्यावी. पण शिवाय इतर राष्ट्रांतहि चळवळ हवी. अमृतसरला याकरितां एक कमिटी नेमली आहे. तिजवर लो. टिळक, लाला लजपतराय असे गृहस्थ आहेत. त्यांतील एकाची उमेद, दुसऱ्याचा अनुभव, एकाचें पीठ व दुसऱ्याचें मीठ मिळून चळवळीची भाकरी लवकरच तयार होईल अशी आशा सर्वांना आहे.

इकडे देशांत आम्हीं काय करावें याचें नवें उत्तर पुष्कळसें जुन्यासारखेंच येणार. जबाबदारीची गंगा वरून आली आणि ती डोक्यावर घेण्याला देशांत सरकारानें मतदारसंघ निर्माण केला. हा सर्व देखावा ठीक आहे. पण खरी जबाबदारी आज आली कां, उद्यां येईल कां, अर्थात् खरी सत्ता स्वाधीन होईल कां याचा सूक्ष्म विचार करा. इकडे मतदार जन्माला घातला. पण त्याचा विलायतचा भाऊबंद आहे तेथेंच आहे. या दोघांच्या जोडीला प्रधान म्हणून एक तिसरा घातला. तरी पण खरी जबाबदारी व खरी सत्ता कोठें आहे. याचा शोध म्हणजे परब्रह्माचाच शोध होय! ग्रीक पुराणांत एक गोष्ट आहे. तीन आंधळ्या जोगिणींना मिळून देवानें एकच डोळा दिला होता. जिला पाहावेंसें वाटेल तिनें तो लावावा. अर्थात् एक पाहात असतां दुसऱ्या दोघी आंधळ्या ! एवढेंच नव्हे, तर कोणा चोरानें तो मध्येंच हिरावून नेला म्हणजे तिघीहि आंधळ्याच. सत्ता म्हणा, जबाबदारी म्हणा, हा एकच डोळा विलायती मतदार, हिंदी मतदार व प्रधान या तिघांना मिळून सरकारनें दिला आहे. पण राखून ठेवलेल्या खात्यांचा धनी जो युरोपियन कौन्सिलर त्याला हा डोळा मध्येंच लांबवितां येण्यासारखा असल्यानें या तिघांनाहि आंधळेपणाच्या अंधकारांत चांचपडत बसावें लागणार. हिंदी मतदारांची मात्र कींव येते. त्यांचें नांव सोनुबाई; पण हातीं कथलाचा वाळा. दोन आणे इतका सत्तेचा राज्यकारभार करण्यास ५०।७५ प्रतिनिधि, आणि दर ४।२ प्रतिनिधींचा चौका वेगळा. त्यांतून मतदार शहाणा प्रतिनिधि निवडून देणार व तो कौन्सिलांतील आकाशाला गवसणी घालणार. हा आपला

लोकशाहीचा अवतार वाटेल तर म्हणावें. पण एकतंत्री अधिकाराच्या संगीन पुतळ्याला नुसत्या बोटानें लावण्याइतकाहि धक्का तूर्त पोंचेलसें वाटत नाहीं. बिचाऱ्या मतदाराला तीन वर्षांतून एकदां मानाचा शेंदूर फांसून कौल लावणार " देवा बोल ! हा उमेदवार कौन्सिलच्या खुर्चीवर जाऊन बसूं दे कीं तो बसूं दे ! " झालें ! देवाला कोणा एकाकडे तरी बोट दाखविणेंच आहे. पण पुढें तीन वर्षें तो कोण आणि हा कोण ! ही स्थिति इकडेच आहे असें समजूं नका. विलायतच्या एका मोठ्या ग्रंथकारानें ५।६ वर्षांपूर्वीं याविषयीं लिहितांना मतदाराला रानटी सावजाची उपमा दिली आहे. सर्कशीच्या तंबूंत वाघ किंवा सिंह ठराविक वेळीं एकदा उतरून ४–२ उड्या मारून व वाटेल तर जळत्या कड्यांतून पार होऊन फिरून आपला पिंजरा गांठतो. तोच प्रकार ५–४ वर्षांनीं होणाऱ्या निवडणुकींचा. ग्रंथकाराच्या म्हणण्याचा खरा अर्थ असा कीं, मतदाराला निवडणुकीचा हक्क देणें जरूर, पण तेवढ्यामुळें त्याला खरी सत्ता किंवा खरी जबाबदारी येतेच हें म्हणणें फुकट आहे.

येत्या नोव्हेंबरांत नव्या निवडणुकी होणार. सर्व देशांतून निवडणुकीच्या मौजा पाहावयास सांपडतात तशाच त्या तेव्हां आपणांसहि पहावयास सांपडतील. जितके हितसंबंध तितकीं सोंगें या निवडणुकीच्या जत्रेंत येतील. त्यांचें वर्णन मी करूं इच्छित नाहीं, व ' सोंगें ' हा शब्द लावला म्हणून निवडणुकीची थट्टाहि करण्याचा माझा इरादा नाहीं. माझा मुद्दा इतकाच कीं, मतदार पुढें आला म्हणून सुशिक्षित पुढारी मागें गेला असें दुर्दैवानें अद्यापि घडलें नाहीं. मला मतदारच पुढें यावयास हवा व तो सुशिक्षित पुढाऱ्याची खरी परीक्षा करील असाहि व्हायला हवा. पण आजच काय पण आणखी कित्येक दिवसपर्यंत त्याला या सर्व गोष्टी अपरिचित राहणार. आजपर्यंत कामें करणें एवढेंच एक कर्तव्य सुशिक्षितांचें होतें, त्याच्या जोडीला मतदाराला शिक्षण देणें हें दुसरें कर्तव्य येऊन बसेल; पण मूळची जबाबदारी कमी होणार नाहीं. जाणत्या मतदाराचा अभिप्राय त्याला घ्यावा लागेलच; पण नेणत्याकरितां स्वतांचा अभिप्राय पूर्वीप्रमाणेंच बनवावा लागेल. वरील विवेचनांत किंचित् निराशेची छटा दिसेल. पण ती खरी निराशा नव्हे तर फक्त हुरळून जाण्याविरुद्ध सावधगिरीची सूचना आहे. सुधारणा अपुऱ्या असतील, देणाराचें मन साफ नसेल, घेणारा असंतुष्ट असेल, कसेंहि असलें तरी, सुशिक्षित पुढाऱ्याला त्यांचा उपयोगच

करून घेतला पाहिजे. तटबंदीला भोंक पडलें असतां दिल्ली–दरवाजा उघडला जाण्याची वाट पहात बसण्यांत शहाणपणा नाहीं. तूर्त खिंडारांतूनच नोकरशाहीच्या किल्ल्यांत शिरूं व आंतील झटापटींत यश मिळवून दिल्ली दरवाजा सर्व जनतेला मोकळा करून देऊं, अशी सुशिक्षित पुढाऱ्यानें, निवडणुकीच्या प्रत्येक उमेदवारानें उमेद धरली पाहिजे. सुशिक्षितांची सरकारनें कितीहि बदनामी केली तरी हें खिंडार मूळ त्यांनींच पाडलें हें जनता जाणून आहे, व हातीं निशाण घेऊन या खिंडारांतून जाण्याचा पहिला मान त्यांनाच मिळेल. पण आपण एकट्यानेंच आंत जावें अशी त्यांची आपमतलबी बुद्धि नाहीं. सुदैवानें आमचा चाणाक्ष व्यापारिवर्ग पुरा राजकारणी असून तो सुशिक्षितांचे मागोमाग येत आहे. जमीनदार वगैरे माणसें जड बुडाचीं म्हणून अर्थात् तीं व्यापाऱ्यांच्या मागून येतील. पण राजकारणी खरें ज्ञान होण्याला त्यांनाहि फार दिवस लागतील असें वाटत नाहीं. पूर्वी या जमीनदार वगैरे लोकांना सरकारचा मोठा दरारा असे. आणि दरारा कां ? तर एकदम मोठें नुकसान करतील म्हणून. पण त्या गोष्टी आतां दिवसेंदिवस विसरा. लोक अधिक जाणते, अधिक धीट, अधिक स्वाभिमानी व अधिक स्वदेशाभिमानी होऊं लागले आहेत. अर्थात जनतेचें जुनें वर्गीकरण जाऊन त्या जागीं नवें वर्गीकरण येईल. लांगूलचालक, भेदरट, लब्धप्रतिष्ठित, तटस्थ, उडाणटप्पू, नेमस्त, जहाल, तामस, अत्याचारी इतके वर्ग जनतेंत होते. यापुढें यांपैकीं फक्त दोनतीन वर्ग राहून बाकीचे नामशेष होतील.

येथपर सर्वसाधारण विचार केल्यानंतर आपल्या परवानगीनें कांहीं प्रांतिक प्रश्नांचा विचार मी करणार आहें. पहिला मुद्दा हा कीं, आपल्या प्रांतिक परिषदेच्या प्रतिनिधींची संख्या वाढत असली तरी दूरदूरच्या ठिकाणांहून येणाऱ्या लोकांची अडचण कायमच आहे. कारवार ते कराचीपर्यंत सर्व लोक यावे हें म्हणणें सोपें; पण घडणें कठीण. मोठ्या सुट्या थोड्या व सुट्टीकरितां टपून बसलेलीं कामें फार. इतक्या वर्षांत सिंध प्रांतांत एखादुसरीच प्रांतिक सभा भरूं शकली. अर्थात् सिंधी बंधूंना सवता सुभा सुचला व तोच बरोबर होता. त्यांनीं वेगळी प्रांतिक कॉंग्रेस कमिटी करून घेतली व वेगळी उपप्रांतिक परिषद ते भरवूं लागले. गुजराथपरिषदेला अद्यापि केवळ राजकीय स्वरूप आलें नाहीं. पण कदाचित् येईल. कन्नडपरिषद् वेगळी भरतच आहे व ती राज-

कीय परिषद् व्हावी अशीहि कोणीं सूचना केल्यास तिला नांवें ठेवतां येणार नाहींत. नव्या परिस्थितींत भाषावर उपप्रांतिक सभा व संघ अधिक बनतील तरच लोकमत घटविण्याचें काम अधिक सुकर होईल. तरी पण पोट-प्रांतांतून फूट होऊं नये म्हणून परस्परांची ओळख व दळणवळण वाढलें पाहिजे. घरच्या सभेला बाहेरचा अध्यक्ष नेमण्यानें उपप्रांतांतील स्नेहसंबंध सुदृढ होतील. तात्पर्य, लोकमत हरप्रयत्नांनीं दिवसेंदिवस अधिक कमावीत नेलें पाहिजे व त्याला अनुकूल अशा अनेक साधनांची योजना केली पाहिजे.

आपली ही सभा प्रांतिक स्वरूपाची आहे. अनेक जिल्ह्यांचे लोक जमले आहेत. अशा वेळीं प्रांतिक गाऱ्हाण्यांची चर्चा अध्यक्षाच्या भाषणांत होणें इष्ट आहे. पण एक तर या बाबतींत कायदेकौन्सिलांत होणाऱ्या प्रश्नोत्तरांवरून स्थिति कळतच असते. शिवाय मीं जिल्हानिहाय कांहीं गृहस्थांस पत्रें लिहून माहिती मागविली त्याप्रमाणें बरीच माहिती त्यांजकडून आली आहे. तथापि ती सर्व येथें विस्तारानें देत बसल्यास पुष्कळ वेळ लागेल. शिवाय दुसरें असें कीं, त्यासंबंधांत कांहीं निश्चित ठराव आपणापुढें मांडण्यांत येतीलच; व त्यावर होणाऱ्या भाषणांतून ती माहिती आपणांस समक्ष ऐकावयास सांपडणार आहे. म्हणून मी तिची येथें द्विरुक्ति करीत नाहीं. या व्यापक मुद्द्यासंबंधानें मी एवढेंच सांगतों कीं, सर्वच नाहीं तरी कांहीं बाबतींत नव्या कायदेकौन्सिलांत लोकमताची बाजू अधिक नेटाला लागेल. कांहीं प्रश्न तोडून दिलेल्या खात्यांपैकीं असल्यास भावी प्रधान त्याकडे लक्ष पुरवून कसोशीनें कांहीं तरी तोड काढतील. सर्वच प्रश्न एकदम सुटतील अशी आशा कोणीहि बाळगूं नये. पण नवीन सुधारणांमुळें कांहीं प्रश्न नव्या रीतीनें सोडविण्याची व कांहीं अखत्यारीनें सोडविण्याची संधि आपणांस मिळेल असें वाटतें. गेलीं ३०।३५ वर्षें राष्ट्रीय सभेचे कारभारांतील सुधारणांची सर्वसाधारण दिशा दाखवून कांहीं योजनाहि मुक्रर केल्या आहेत, त्यांचाहि उपयोग होईल. माझी विनंति इतकीच कीं, मतदार, प्रतिनिधि व प्रधान या सर्वांनीं एकजीव होऊन एका धोरणानें काम केल्यास आजवर न दिसलेले कांहीं नवीन मार्ग आपणांस दिसूं लागतील. प्रायः कोणतीहि सुधारणा बिनखर्चानें होत नसते मग तो खर्च काटकसरीनें किंवा जुन्या वसुलांतून काढा, किंवा त्याकरितां जरूर तो नवा कर बसवा. पहिल्या मार्गांत आपणांला मुख्य अडचण गोऱ्या अधिकाऱ्यांच्या पगाराची व आजवर सुखानें पोसलेल्या खात्यांच्या उपांगांची

असणार. ही अडचण दूर होण्याकरितां सरकाराशीं हुजत घालावी लागेल, व लोकप्रतिनिधी ती घालतीलहि. पण जेथें त्यानें काम भागणार नाहीं व नवीन कर बसवावे लागतील तेथें ते बसवून घेण्याची आपली तयारी पाहिजे. करांना भिऊन चालावयाचें नाहीं व आपखुषीनें बसवून घेतलेल्या करानें सिद्ध केलेल्या सुधारणेचें फळ चाखावयाला गोड लागतें. कारण त्याला स्वार्थत्यागाची लज्जत असते.

देशांत आज राजकीय असंतोष आहे, त्याप्रमाणें आर्थिक असंतोषहि पुष्कळच आहे. पण ही गोष्ट राजकीय नव्हे म्हणून तिला राजा किंवा सरकार कारण नाहीं अशी मात्र समजूत करून घेऊं नका. आमच्या देशांतील पैशा-अडक्याचा सगळा व्यवहार परदेशांतील लोकांवर अवलंबून आहे. बँका, हुंडणावळ, चलनी नाणें, सोन्यारुप्याची आयातनिर्गत, व्यापार—सगळ्या गोष्टींचीं सूत्रें आमच्या सरकारचे जातभाई आपल्या हातीं ठेवतात व सरकार त्यांस मदत करतें. फार काय पण हल्लीं शेत पिकलें तरी त्याच्या धान्याचा उपयोग देशांतील लोकांना होत नाहीं. देशांत काय यावें व देशांतून काय बाहेर जावें, याला धरबंधच नाहीं. किंमती वाढल्या यावरून देश श्रीमान् झाला असें कांहीं लोकांना वाटतें, पण नुसत्या धान्याच्याच किंमती वाढल्या नसून सगळ्याच पदार्थांच्या वाढल्या आहेत. यामुळें लंकेंतल्या सोन्याच्या विटांसारखी स्थिति झाली आहे. सोन्याच्या विटा घ्यायच्या आणि सोन्याच्याच विटा द्यायच्या. मात्र शिल्लक कांहीं नाहीं. डॉ. मॅनसाहेबांनीं नुकतेंच एका निबंधांत असें सिद्ध केलें आहे कीं, बाजारभाव वाढल्यापासून कांहीं लोक बेसुमार श्रीमंत होतात, पण पुष्कळांना बेसुमार हलाखी सोसावी लागते.

बाजारभावाबरोबर मजुरीहि वाढली आहे. पण मजुरी वाढून तरी मजूरवर्ग सुखी झाला आहे काय ? देशांत संपाचें पीक आलें आहे व मजूर आपल्या पोटाच्या धंद्यावरच उठल्यासारखें सकृद्दर्शनीं भासतें. पण तसें नाहीं. कोठें कोठें संपवाल्यांची एकाददुसरी मागणी बेसुमार असते. पण एकंदरीनें पाहतां गिरण्या व कारखाने यांच्या मालकांना जो भारी नफा पडतो व मजुरांचा संसार चालण्याला आज जे पैसे लागतात, ते लक्षांत घेतले असतां मजूरवर्गाच्या सर्वसाधारण मागण्या योग्य आहेत असेंच म्हणावें लागतें. मागणी कमीअधिक पडताळून पाहण्याला आज कोणी निःपक्षपाती पंच नाहीं. भांडवलवाल्यांनीं मजु-

रांना कमींत कमी किती मजुरी द्यावी, नफ्याचा किती अंश द्यावा, त्यांचें शिक्षण आरोग्य व सुधारणा यांवर किती खर्च करावा हें तिऱ्हाईत मतें कां होईना पण ठरविण्याला आज सरकारनें नेमलेला असा कोणी नाहीं. मला वाटतें, सरकारनें ही गोष्ट लोकांच्या विचारें जरूर करावी. देशांतील मजूरपक्ष अद्यापि बाल्यावस्थेंत आहे. विलायतेंतील मजूरपक्षाइतकी भांडवलवाल्यांना खाऊन टाकण्याची हाव त्यांना अद्यापि उत्पन्न झालेली नाहीं. ते बिचारे शांततावादी आहेत. त्यांच्यावर उगाच भीतीनें गोळ्या झाडण्यांत अर्थ नाहीं. सोलापूरच्या गोळीबारासंबंधानें तरी हें खुशाल म्हणतां येईल; पण आपले सिमकॉक्ससाहेब महाउद्योगी आहेत, जिल्ह्यांतील लोकांमागें त्यांचा नेहमीं कांहीं तरी ससेमिरा असावयाचाच.

असो; प्रधानांचें काम प्रधानांना पुरेसें आहे. कायदेकौन्सिलच्या सभासदांनाहि त्यांनीं मनोभावानें केलें तर वर्षभर पुरण्याइतकें काम आहे. पण जे कौन्सिलांत जाणारे नाहींत, अशांनींहि करण्यासारखें देशाचें एक काम आहे व त्याविषयीं दोन शब्द बोलून मी पुरें करतों. हे दोन शब्द सामाजिक स्थितीसंबंधाचे होत.

नवे दिवस लोकशाहीचे आहेत पण ही लोकशाही केवळ राजकारणापुरती किंवा राज्यकारभारापुरतीच इष्ट आहे, किंवा ती राज्यकारभारापुरतीच अवतरले असें कोणीं समजूं नये. जी स्फूर्ति राजकीय महत्त्वाकांक्षेला कारणीभूत होते, तीच सामाजिक स्थित्यंतरहि घडवून आणते. भरतीचें पाणी भरलें म्हणजे समुद्राशीं जितका निरनिराळ्या प्रवाहांचा संबंध येतो तितक्यांतून तें एकसारखें फुगत जाईल यांत काय नवल ? लोकशाहीचा पाया बहुमतावर व बहुमत पाहावयाचें तें समान हक्क असलेल्या मतदारांचें. या दृष्टीनें पाहतां राजकीय लोकशाहीचा पाया समतेवर रचलेला असतो. पण राजकीय बाबतींत तेवढी समता मानूं, सामाजिक बाबतींत मानणार नाहीं हें चालणार नाहीं. मनुष्यमात्र हा ईश्वराच्या घरचा प्राणी आहे. त्यानें दिलेल्या गुणांच्या देणगींत विषमता असेल तर तिच्या योगानें मनुष्यामनुष्यांत महत्त्व व किंमत कमीअधिक आपोआपच होत असते. पण याला आपण आपल्या गर्वाची व विषमताबुद्धीची जोड देण्याचें कारण नाहीं. राजकीय बाबतींत मत देणारे लोक जसे त्यापुरते एकसारखे, त्याप्रमाणें इतर सर्व व्यवहारांतहि आपण एकमेकांस सारख्या योग्यतेचे मानण्यास शिकलें पाहिजे. जातिभेद मोडला म्हणजे त्यानें हटकून स्वराज्य

मिळतें ही समजूत अर्थात् चुकीची आहे. पण स्वराज्याची नांदणूक सुखानें, सलोख्यानें, ओजस्वितेनें व्हावयाची तर समाजांतील जितक्या अधिक लोकांचीं मनें एकजीव होतील तितकीं करणें इष्ट आहे. जुन्या काळीं जातिभेद हा वरच्या तीन वर्णांपुरता तरी परस्पर तुच्छतादर्शक नव्हता असें म्हणतां येईल. ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य तिघांनाहि निरनिराळ्या दृष्टीनें श्रेष्ठपणा मिरवितां येण्यासारखा होता. ऐतिहासिक दृष्ट्या केवळ धर्मबुद्धीपेक्षां धंद्याच्या सोयीमुळें जाति बनल्या व त्यांची परंपरा चालली असें दिसतें. आज गुण व कर्म या दोनही दृष्टींनीं जातींचें व वर्णांचें वैशिष्ट्य राहिलें नाहीं. स्थितिच अशी आली आहे कीं—मग तिला राजा कारण म्हणा, काल कारण म्हणा-वाटेल त्यानें वाटेल तो धंदा करावा. कोणीं वडिलार्जित धंदा केला तर ठीकच आहे; किंबहुना वडिलार्जित धंदा करणें सामान्यतः अधिक फायद्याचेंहि असतें. आहे तो घरचा संच मोडावा व नवा शोधीत बसावें यांत काय शहाणपण ? पण कित्येकांना घरचा धंदाच नसतो व कित्येकांची बुद्धिमत्ता त्या धंद्याच्या मानानें अधिक तरी असेल किंवा कमी तरी असेल. अशा स्थितींत अनुकूल असा दुसरा कोणताहि धंदा मनुष्यानें करावा व तो करण्यास समाजानें त्याला मोकळीक ठेवावी हेंच इष्ट आहे. पूर्वी राजा फक्त क्षत्रियाचें काम करी, आज त्यानें तीनहि हिंदु वर्णांचीं कामें संभाळलीं आहेत. देशांत खऱ्या जुन्या पद्धतीचा ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य उरला नाहीं. अशा स्थितींत—म्हणजे जातिभेदाचें मुख्य कारण निघून गेल्यानंतर—केवळ स्पर्शास्पर्शाचा भेदभाव शिल्लक ठेवणें म्हणजे बिगबाळी निघून गेल्यावर कानाच्या नुसत्या भोंकाचा अभिमान बाळगण्यासारखें हास्यास्पद आहे.

आतां पाश्चात्य देशांत जातिभेद नाहीं म्हणून तेथें सामाजिक भेदभाव सर्वस्वींच लुप्त झाला आहे असें नाहीं. विलायतेंत लोक मी इंग्रज, मी स्कॉट, मी आयरिश असा अभिमान बेसुमार बाळगतात, हें मीं स्वतः पाहिलें आहे. आणि मौज ही कीं, त्यांच्या वरच्या पिढ्या तपासल्या तर पदोपदीं रक्ताची भेसळ हटकून आढळते. आमच्या इकडे ती भेसळ नसल्यानें आम्हीं परंपरेचा किंवा खानदानीचा अभिमान बाळगला तर तो यथार्थ तरी असतो. पण याजबरोबर विलायतेंतील दुसरी एक गोष्ट आहे, ती मात्र विसरतां येत नाहीं, ती ही कीं, तोंडानें जरी मनुष्य स्वतःस इंग्रज, स्कॉच, आयरिश म्हणवून अभिमान मिरवीत असला तरी खाणेंपिणें एवढेंच काय पण लग्नव्यवहार या बाबतींत सुद्धां तो

अभिमान फारसा आड येत नाहीं. कशाचा तरी अभिमान धरावासा वाटतो म्हणूनच या नांवाचा धरावयाचा; पण सर्व कृति मुक्तद्वारपणें करावयाची. यामुळें सलोखा राहून व्यवहार सुरळीत चालतो. इंग्रजांनीं जगभर हिंडण्याफिरण्याचें वसाहत करण्याचें धाडस केलें व तेंच त्यांच्या आजच्या ऐश्वर्याचें मूळ कारण आहे. पण इंग्रज, स्कॉच, आयरिश या जातिदर्शक नांवाचा निर्बंध आमच्या इकडील जातिभेदाच्या निर्बंधाप्रमाणें ते कडकडीत पाळते, तर त्यांच्या हातून जगाची मुशाफरी झाली नसती व जगाचें साम्राज्य व ऐश्वर्यहि मिळालें नसतें. आतां हीं नवीन तत्त्वें आपण मान्य केलीं म्हणजे लगेच उद्यां सर्व जातिभेद नष्ट होईल असें मात्र कोणी मानूंहि नये किंवा आशाहि करूं नये. कारण सामाजिक स्थित्यंतर हें एका दिवसांत घडून येत नाहीं. शिवाय सहाराच्या वाळवंटांत ज्याप्रमाणें वारा एकीकडे वाळूचे डोंगर उचलतो, पण तेच दुसरीकडे रचतो, त्याचप्रमाणें दुरभिमानी मनुष्यसमाज एक भेदभाव नष्ट झाला तर त्याचे जागीं दुसरा निर्माण करण्यास तयार होतो. पण तें कसेंहि असलें तरी आपण केव्हांहि जो जाणूनबुजून प्रयत्न करावयाचा तो विषमता घालवून समता स्थापित करण्याचाच असला पाहिजे. वरच्या तीन वर्णांत पूर्वीं भेद असला तरी परस्परांशीं त्यांचें सारख्या महत्त्वाचें नातें तरी होतें; पण चवथ्या वर्णांतील लोक म्हणजे शूद्र, अतिशूद्र व त्यांतील सर्व प्रकार यांच्याविषयीं जी कमीपणाची बुद्धि पूर्वीं होती ती आज घालवून टाकण्याचा प्रयत्न प्रथम जारीनें व्हावयास पाहिजे. या तीन जातींचें शिक्षण आपणांस एका दिवसांत करतां आलें नाहीं तरी त्यांजवरील अस्पृश्यतेची आपत्ति आपण मनांत आणल्यास तेव्हांच काढून टाकतां येईल, ती आपण काढून टाकली पाहिजे. इतर कोणत्याहि गोष्टींत ब्राह्मण खालावला असला तरी शिक्षणाच्या बाबतींत त्याचें धुरीणत्व अद्यापि कायम आहे; पण त्या गुणाचा उपयोग आपण वर्णगुरु किंवा राजा या आढ्यतेनें न करितां स्वतःस समाजसेवक असें मानून हीन जातींस त्यांचा उपयोग आस्थापूर्वक करून दिला पाहिजे. ज्यांनीं ब्राह्मणवर्गास शिव्या देण्याचें व्रतच पत्करलें असेल, त्यांनीं तें खुशाल चालवावें, पण या शिव्या ब्राह्मणाच्या अंगास न लागण्याचा खरा एकच उपाय आहे व तो हा कीं, त्यानें आपल्या शिक्षणाचा व संस्कृतीचा उपयोग इतरांना निःस्वार्थ बुद्धीनें करून द्यावा. इतरांप्रमाणें ब्राह्मणासहि ब्राह्मण

ह्या नांवाचा अभिमान अवश्य वाटला पाहिजे, पण ब्राह्मण्याचा अभिमान निःस्वार्थी लोकसेवेनेंच तडीस जाईल, एरवीं जाणार नाहीं हें लक्षांत ठेवावें. ब्राह्मणेतरांनाहि याचबरोबर मी अशी विनंति करतों कीं, केवळ ब्राह्मणांनीं आपणांस बुडविलें हें त्यांचें म्हणणें सर्वस्वीं खरें नाहीं. शिवाय त्यांनीं थोडेंसें आत्मनिरीक्षण करून आपणहि स्वतः खालच्या जातींना कसें वागवितों हें ध्यानांत आणावें. जो खालच्या पायरीस लाथ न देईल त्यालाच वरच्या पायरीस हात घालण्याचा अधिकार पोंचतो. असो; विस्तार फार झाला. पुढें येणारे दिवस सर्वांना सुखाचे जावोत व सर्व वर्गांना परस्परांशीं मित्रत्वाच्या नात्यानें वागून सर्वांचीच एकसारखी उन्नति करून घेण्याची बुद्धि होवो, अशी इच्छा करून मी हें भाषण संपवितों.

---

# ५३ कुठें बर्क आणि कुठें मॉंटेग्यू !

( ता. १३ जुलै सन १९२० )

पंजाबांतील अत्याचारासंबंधानें पार्लमेंट-सभेंत जो वादविवाद होणार होणार म्हणून इतके दिवस गाजत होतें तो अखेर गेल्या गुरुवारीं एकदांचा झाला ! एखाद्या वादापासून फलनिष्पत्ति काय होणार याचा जरी पूर्वीं अंदाज असला तरी वादाच्या नुसत्या पूर्वकल्पनेंतच एक प्रकारची अद्भुतरम्यता असते. विलायती डोंबारी किंवा सर्कसवाले एखाद्या शहरीं जावयाचे असतां ते 'येणार येणार' म्हणून ज्या जाहिराती लागतात त्यांनीं मनाची जितकी करमणूक होते तितकी पुष्कळ वेळां त्यांचा प्रत्यक्ष खेळ पाहूनहि होत नाहीं. आपल्या जुन्या देशी नाटकांतहि राक्षस रंगभूमीवर येण्यापूर्वीं राळ उडविण्याचा व आरडाओरडीचा जो प्रकार होतो त्याहून राक्षसाचें प्रत्यक्ष दर्शन किंवा पुढें घडणारा त्याचा पराक्रम हे प्रायः कमी उग्र किंवा भयंकर ठरतात. पार्लमेंटमध्यें होणाऱ्या या वादविवादाचाहि कांहींसा असाच प्रकार झाला असें म्हटल्यावांचून राहावत नाहीं. डायरसाहेब हजारों निरपराधी लोकांची कत्तल करून चुकले. जॉन्सनप्रभृतींनीं जिवंत माणसांना यमपुरींतील लीला दाखविल्या. ओड्वायरसाहेबांनीं शांततेच्या कालांत लष्करी कायदा सुरू करून हिंदी प्रजेचे हक्क व जीवित या विसाव्या शतकांत व सुधारलेल्या राज्यांतहि क्षणभंगुर आहेत हें खुशाल सिद्ध करून दाखविलें व हें सर्व घड-

वून येऊं देणाऱ्या चेम्सफर्डसाहेबांनीं विलायतसरकारकडून शाबासकी मिळविली ! तात्पर्य, व्हावयाच्या त्या सर्व गोष्टी होऊन गेल्या व सरकारकडून जें निराकरण किंवा जी दुरुस्ती व्हावयाची ती एका डायरच्या नोकरीचा बळी घेतलेला दाखवून करण्यांत आली. राहतां राहिलें लोकपक्षाचें भांडण. हें भांडण हिंदुस्थानांत होऊन गेलेंच होतें, फक्त आतां ब्रिटिश राज्याच्या मुख्य केंद्राच्या ठिकाणीं त्याविषयीं काय खळबळ होते एवढेंच पहावयाचें राहिलें होतें. होणार होणार म्हणजे नुसता वादविवाद होणार, याहून अधिक कांहीं होणार नाहीं हें माहीतच होतें. पण हा वाद तरी कसा होतो, सरकारतर्फे अत्याचारांचें समर्थन कितपत करण्यांत येतें व हिंदुस्थानांत या पंजाबप्रकरणानें इंग्रजांच्या न्यायनीतीच्या नांवाची धूळधाण झाली असें वाटून तात्त्विक रोष पावलेल्या मूठभर टीकाकारांच्या तोंडून जास्तीत जास्ती कडक असे शब्द तरी कोणते येतात एवढेंच पाहण्याचें बाकी राहिलें होतें. पण या शुष्कवादाच्या पूर्वतयारीची राळ इतकी उडविण्यांत आली होती कीं, नृसिंह–हिरण्यकश्यपू यांचा खरा युद्धप्रसंगच पहावयास सांपडतो कीं काय, अशा अपेक्षेनें कांहीं लोकांचे डोळे तिकडे लागून राहिले होते. अशा लोकांची अखेर निराशा झाल्यास नवल नाहीं.

अशा जंगी वादांत मुख्य मुद्दा म्हणून कोणता उपस्थित करण्यांत आला होता, किंवा ज्यावर अनुकूल प्रतिकूल मतें घेतलीं जाणार त्या प्रश्नाचें स्वरूप तरी काय होतें हें या प्रसंगीं कोणासहि विचारावेसें वाटेल. व त्याचें आम्ही जें उत्तर देणार तें वाचून तज्ज्ञांचेंहि समाधान होणार नाहीं व अतज्ज्ञांना तर हंसूंच लोटेल. तें उत्तर असें कीं, प्रस्तुतचा वादविवाद सरकारतर्फे सुरू करण्यांत आला तो विलायतसरकारच्या चालू सालच्या बजेटांत स्टेटसेक्रेटरीच्या खर्चाकरितां साडेत्रेपन्न हजार पौंडांस मंजुरी मागण्याच्या रूपानें. अशा प्रकारची मंजुरी मागण्याचा हा पहिलाच प्रसंग असून गतवर्षी पार्लमेंटनें केलेल्या नव्या सुधारणांच्या कायद्यानें उत्पन्न झाला हें वाचकांस माहीत असेलच. पूर्वीहि स्टेटसेक्रेटरी बिनखर्ची काम करीत होते असें नाहीं; पण तो खर्च हिंदुस्थानावर लादला जात होता. या खर्चमंजुरीची सूचना जवळ जवळ पार्लमेंट उठण्याच्या शेवटच्या दिवशीं आणली जात असे, म्हणून ब्रिटिश जनतेचें तिकडे लक्ष वेधलें जात नसे. हल्लीं हा खर्च विलायतसरकारच्या अंगावर टाकण्यांत आल्यामुळें 'गाडीबरोबर नळ्याला यात्रा' या न्यायानें विलायतसरकारच्या बजेटाबरोबर स्टेटसेक्रेटरीच्या

पगाराची मंजुरी पार्लमेंटच्या ऐन मोसमांत चर्चेस निघूं लागली. वेळेच्या दृष्टीनें हा फायदा झाला यांत शंका नाहीं. तथापि या पहिल्याच वाद-विवादाच्या अनुभवावरून हा फायदा इतर दृष्टीनें फारसा फायदेशीर झाला असें म्हणवत नाहीं. असो. पंजाबांतील अत्याचारासंबंधानें सरकारनें कोणास काय शासन करावें असा मुख्य प्रश्न असतां स्टेटसेक्रेटरीच्या खात्याची मंजुरी मागितली इतकी द्यावी कीं कमी करावी असा प्रश्न मतें घेण्याचे वेळीं विचारण्यांत आला! हें पाहून मुंबईस जावयाचें तर सोलापुरची वाट कोणती असें विचारल्यासारखें हास्यास्पद दिसणार हें उघड आहे. आतां चर्चेचें हें स्वरूप चमत्कारिक दिसलें तरी तें परंपरागत व रूढ आहे असें मानून एक वेळ निर्वाह होऊं शकेल, पण प्रत्यक्ष पंजाब प्रकरणाचा वाद सुरू झाल्यानंतर तरी सरकारी गुन्हेगारांस शासन काय व्हावें याविषयीं जितक्या स्पष्ट व कडक सूचना व्हावयास पाहिजे होत्या तितक्या झाल्या नाहींत हें पाहून मात्र कोणाहि हिंदी मनुष्यास खेद झाल्यावांचून राहणार नाहीं. अजून या वादांतील सविस्तर भाषणें आमच्या हातीं यावयाचीं आहेत. कदाचित् मजूर-पक्षानें या कामीं राष्ट्रीय सभेनें केलेल्या मागण्यांपैकीं कांहीं सुचविल्याहि असतील. पण अखेर निष्पन्न कांहींच झालें नाहीं एवढें निश्चित आहे. खर्चमंजुरीच्या सरकारी सूचनेस दोन उपसूचना आल्या होत्या. दोहोंचाहि कटाक्ष मॉंटेग्युसाहेबांवर असून पंजाबप्रकरणीं सरकारनें चूक केली असाच दोहोंतील मुद्दा होता. मात्र ही चूक निरनिराळ्या प्रकारची. हिंदी जनतेतर्फेची सूचना मजूरपक्षाच्या पुढाऱ्यानें आणली तिचा हेतु डायर-ओड्वायरादिकांचा निषेध करण्याचा होता; पण तिला फक्त ३७ मतें अनुकूल पडून २४६ विरुद्ध पडलीं. तेंच कार्सनसाहेबांनीं डायर-ओड्वायर यांचें समर्थन करणारी जी उपसूचना आणली तीहि नामंजूर झाली खरी; पण तिला १२९ मतें अनुकूल व २३० प्रतिकूल पडलीं हें ध्यानांत ठेवण्यासारखें आहे. पंजाबांत सरकारनें केलें तें योग्यच केलें असा मुद्दा निघाला तेव्हां ३५९ लोकांनीं मतें देण्यास हात वर उचलले, पैकीं २३० च विरुद्ध गेले. आणि या अधिकाऱ्यांनीं दुर्वर्तन केलें असा मुद्दा निघाला तेव्हां पार्लमेंटच्या सभागृहांतून ८० सभासद आधींच उठून गेले असून फक्त २७९ लोकांनीं हात वर केले व हिंदुस्थानच्या बाजूला अवघीं ३७ मतें पडलीं. या एका गोष्टीवरून विला-

यतेंत जुलमी अधिकाऱ्यांचेच पाठीराखे अधिक आहेत आणि न्यायाचे पुरस्कर्ते, अनाथांचे वाली असले तर फारच थोडे हें उघड ठरतें. यावरूनच पुढें हा उपसिद्धांत सिद्ध होतो कीं, हिंदुस्थानला आपली दाद लावून घ्यावयाची असेल तर त्यानें स्वावलंबीच बनलें पाहिजे.

प्रस्तुत वादविवादाचा जो तपशील आतांपर्यंत हातीं आला आहे त्यावरून एक गोष्ट दिसते ती ही कीं, माँटेग्यू व चर्चिल या दोघांनींहि आपल्या भाषणांत बराच समंजसपणा दाखविला. माँटेग्यूसाहेबांनीं स्वच्छ सांगितलें कीं, हिंदुस्थानांत इंग्लंडचें राज्य कोणत्या तत्त्वावर चालावें हाच या प्रकरणीं मुख्य प्रश्न आहे. आधींच स्वत: निष्कारण भिणें व भेद्रटपणानें किंवा सूड घेण्याच्या इच्छेनें सरसकट अत्याचार करीत सुटणें, अशानें तुम्ही राज्य राखणार कीं हिंदी लोकांची प्रीति दिवसेंदिवस अधिकाधिक संपादून राखणार? चर्चिलसाहेब हे युद्धमंत्रि असून थोडेसे दांडगेश्वरी वृत्तीचे आहेत म्हणून ते कदाचित् डायरसाहेबांचा निषेध फारसा करणार नाहींत, असें वाटलें होतें. पण तो निषेध त्यांनीं सप्रमाण व बऱ्याच जोराच्या शब्दांनीं केला. ॲस्किथसाहेब हल्लीं बोलून चालून विरोधी पक्षांतले आहेत; यामुळें त्यांनीं अत्याचारांचा निषेध केला, पण त्यांत तीव्रता नसून केवळ वकिली बाणाच होता. येऊन जाऊन मजूर पक्षांतील कांहीं लोकांनींच काय ती थोडी कडक भाषा वापरल्याचें दिसतें. कसेंहि असलें तरी लॉर्ड चेल्म्सफर्ड यांच्या इभ्रतीस कोठें धक्का लागला नाहीं, व एका डायरच्या राजीनाम्याखेरीज अत्याचारांचा प्रतिकार म्हणून हिंदी जनतेच्या पदरांत कांहीं पडलें नाहीं!

हिंदुस्थानांत घडलेल्या एवढ्या घोर प्रकाराबद्दल इतका फोल व चुटकीसारखा चुटपुटता निकाल झालेला पाहून विलायतेंतले जुने मुत्सद्दी बरे कीं नवे बरे, अन्यायाची चीड अधिक कोणाला असावी, असा प्रश्न सहजच मनांत येतो, आणि फलनिष्पत्ति एका बाजूस ठेवली व चळवळ म्हणजे चर्चा, वादविवाद, घासाघीस, सवालजबाब, या दृष्टीनें पाहतां कंपनीसरकारच्या ताब्यांत हिंदुस्थानचें राज्य होतें तेव्हांचीच वेळ बरी असें म्हणण्याची पाळी येते. डायर–ओड्वायर यांच्या मानानें वॉरन हेस्टिंग्ज यानें ब्रिटिश साम्राज्याची जी सेवा केली ती अत्यंत अधिक मौल्यवान् ठरेल यांत शंका नाहीं. डायरसारखे हडेलहप्पी, अविचारी व निःशस्त्र लोकांची कत्तल करणारे लष्करी अधिकारी गोऱ्या सैन्यांत वाटेल तितके सांपडतील. पण ज्यानें हिंदुस्थानांत ब्रिटिश राज्याचा भरभक्कम

पाया घातला असा वजनदार मुत्सद्दी विरळा. अशा मुत्सद्याविरुद्ध विलायतेंत एक ब्रही काढणें किती कठिण असलें पाहिजे? असें असतां हाऊस ऑफ लॉर्डसचा हटवाद हटवून हाऊस ऑफ कॉमन्सकडून वॉरन् हेस्टिंग्जची चौकशी सुरू करून दोषारोपाचें सुदर्शन हेस्टिंग्जच्या डोक्यावर बारा वर्षे फिरतें ठेवून त्याला जन्म नकोसा करून टाकणारे बर्क, शेरिडन वगैरे इंग्रज लोक खचित अधिक महानुभाव म्हटले पाहिजेत. हेस्टिंग्जची चौकशी एकसारखी सहा वर्षे सुरू होती व या अवधींत बर्कनें केलेलीं भाषणें ब्रिटिश न्यायदेवतेची खरी साक्ष पटवितात. आणि एका अर्थानें पाहूं गेलों तर हेस्टिंग्जचे गुन्हे डायर किंवा ओड्वायर यांच्या गुन्ह्याइतके दोषास्पद ठरतील कीं नाहीं याची शंकाच आहे. पण ईस्ट इंडिया व्यापारी कंपनीचा द्वेष अगर सात्विक न्यायबुद्धीची चीड यामुळें म्हणा, ब्रिटिश जनतेचें मन हिंदुस्थानांतील अन्यायासंबंधानें अधिक नाजुक होतें यांत शंका नाहीं. तो मनाचा नाजूकपणा जाऊन इंग्रज राज्यकर्त्यांचें मन आतां अधिक निर्ढावलें आहे. ऐश्वर्यकर्दमांत त्यांचे पाय अधिक रुतले आहेत. रुधिरप्रदिग्ध राज्योपभोगाची चटक त्यांच्या जिभेला लागली ती वाढतच आहे, कमी होत नाहीं. यामुळें बर्कसारखा निःस्वार्थी, तेजस्वी वकील हिन्दुस्थानला मिळणें अधिक कठिण झालें आहे. बर्कनें एवढा जबरदस्त उद्योग केला. हेस्टिंग्जविरुद्ध कांहीं काळपावेतों आकाशपाताळ एक झालें, असें असतांहि त्याची दोषमुक्तता अखेर झालीच; मग आतां तर काय मॉंटेग्यूसाहेबांसारख्या व्यवहारचतुर, हिशेबी व धूर्त मुत्सद्याशीं गांठ. अर्थात् भलेपणाचा नाद सोडून देऊन सरकाराशीं वागतांना 'जशास तसें' या न्यायानें शक्य तितकी कठोर वृत्ति व स्वार्थदक्षता ठेवल्याशिवाय हिन्दी जनतेला दुसरा तरणोपाय नाहीं. पार्लमेंटांतील वादविवाद होऊन गेला, पण पंजाबांतील अत्याचार व त्यांची स्मृति हिन्दी लोकांच्या हृत्पटलावरून अजून पुसली गेली नाहीं व पुढेंहि लवकर पुसली जाणें शक्य नाहीं. न्यायी म्हणविणाऱ्या ब्रिटिश जनतेच्या सरड्याची धांव डायरसाहेबांच्या राजीनाम्याच्या कुंपणापर्यंत जाऊन थडकली हें आपण पाहिलें. अर्थात् आपलें आपण पुढें काय करावयाचें याचा विचार करण्यालाच आतां लोकांनीं लागलें पाहिजे.

---

# ५४ निवडणुकीचा 'वस्तुपाठ'

( ता. १९ आक्टोबर सन १९२० )

पुणें शहरच्या व जिल्ह्याच्या निवडणुकीकरितां उभे राहिलेल्या उमेद्‌वारांपैकीं कोण निवडून येतात व मवाळांना प्रिय अशी सहकारिता यशस्वी करून दाखवितात हें पुढें दिसून येईलच. तूर्त त्यांच्या उमेद्‌वारीच्या सरकारी जाहिरातीनें लहान मुलांना बरीच करमणूक लाभली आहे. शहरच्या उमेद्‌वारांच्या पेट्यांना 'घोडा' 'वाघ' 'हत्ती' 'तलवार' 'निशाण' व 'खटारा' अशीं नांवें दिलीं आहेत. पण निवडणुकीच्या धांदलींत 'मरायाला देखील फुरसत नाहीं' या म्हणीप्रमाणें समग्र बोलायला वेळ नसतो व सर्व व्यवहार संक्षेपावरच चालणार, म्हणून पेट्यांच्या खुणा उठून लक्षणेनें त्या उमेद्‌वारांना चिकटण्याचा संभव फार. या खुणा अर्थात् चिठ्या टाकून काढल्या असतील. एरवीं बिचारे सुळे वकील आपण होऊन 'खटारा' हें संबोधन कधींहि पत्करतेना.

घोडा, वाघ, हत्ती, तलवार, निशाण व खटारा इतक्यांचीं नुसतीं चित्रें देऊन हा कशाचा संच आहे असें कोणास विचारल्यास 'शिकारीची तयारी' असें तो उत्तर देईल! निवडणूक ही शिकार तर खरीच आणि नांवाला म्हणजे नशिबाला ज्या खुणा आल्या त्यांना अनुसरून निकाल झाला तर बरें, नाहीं तर विपरीत! सुळ्यांचा 'खटारा' हा स्वतः कधींच शिकार जिंकीत नाहीं. मारलेली शिकार वाहून आणण्याचाच त्याचा उपयोग. शिकारी दमले भागले तर वेळीं त्यांत बसून मात्र येतील. विश्वबंधुत्वाचा सनातन अभिमान सोडून देऊन 'मराठी' जातीचा अभिमान उसना घेऊन निवडणुकीस उभे राहणाऱ्या शिंद्यांच्या हातीं 'निशाण' मिळालें आहे. पण स्वतः निशाणानें शिकार मारली असें कधींच होत नाहीं. शिकारी लोकांचें स्थान कळण्यापुरता व शिकारीस रंग येण्यापुरताच त्याचा प्रायः उपयोग.

मानूरकरांची 'तलवार' आज पुष्कळ दिवस ब्रह्मद्वेषाच्या दगडावर घासली जात आहे. पण ती हातीं धरणाराचें लक्ष जर दुसरीकडे स्वतःच्या निवडणुकींत गुंतलें असलें तर बिचारी तलवार काय करील! एरवीं तलवार मोठी तडफदार खरी! खोपकरांचा 'हत्ती' आयत्या वेळीं वाघावर सोडण्यांत आला आहे. पण प्रत्यक्ष सोंडेंत जेव्हां वाघाला आणून शिकाऱ्यांनीं घालावा तेव्हां मग त्यांच्या मोहऱ्याचा प्रभाव पहावयास मिळणार. मिरवणुकींत गजगति चालते.

शिकारींत धांवपळ चालू पाहिजे. आपट्यांचा ' घोडा ' चपळ व पाणीदार आहे व त्यानें आजपर्यंत बऱ्याच शर्यती जिंकल्या आहेत. पण शर्यती व शिकार यांत थोडासा फरक आहे. शर्यत मैदानावर व शिकार आडरानांत करावयाची असते म्हणून थोडी भीति वाटते.

राहतां राहिला बिचाऱ्या गुप्त्यांचा ' वाघ ' हा वाघ ताबुतांतला आहे का अस्सल जंगलांतला आहे हें लवकर दिसून येईल. पण एक गोष्ट निश्चित आहे. ती ही कीं हत्ती, घोडा, तलवार, निशाण व खटारासुद्धां सर्व वाघाची शिकार करायला उद्युक्त दिसतात ! वाघाचे पुठ्ठ्यावर ' कोल्हापूर ' अशीं अक्षरें उमटलेलीं आहेत. मग तीं काय बेगडीचीं किंवा अंगाच्या रंगीत पट्ट्यांत आपोआप उठलेलीं किंवा सोनें तापवून त्यानें डाग दिल्यामुळें उठलेलीं आहेत समजत नाहीं. कसेंहि असो, पुणें शहरांत कोल्हापुरचा वाघ शिकार जिंकील ही आशा दूरच; पण त्याचीच शिकार होण्याचा संभव मात्र अधिक.

मराठी दुसऱ्या पुस्तकांत ' वाघ होऊं पाहणाऱ्या कोल्ह्याची ' खालील गोष्ट दिलेली आहे:—" वाघाला सर्व जनावरें भितात व मान देतात त्याप्रमाणें आपणालाहि त्यांनीं भ्यावें व मान द्यावा अशी एका कोल्ह्यास इच्छा झाली. परंतु वाघाला पट्टे असतात तसे आपल्या अंगावर आल्याशिवाय आपणांस विचारतो कोण ! असें त्यास वाटलें व तसे पट्टे आपल्या अंगावर आणावयास काय युक्ति करावी म्हणून तो पुष्कळ दिवस विचार करीत होता. एके दिवशीं तो इकडे तिकडे फिरत असतां एका लोहाराच्या दुकानांत शिरला. तेथें लोहार लोखंडाचें फाळ भट्टींत घालून तापवीत होता. तें पाहून कोल्हा म्हणाला, ' लोहारदादा, लोहारदादा, मला वाघ बनायचें आहे. तर माझ्या अंगावर फाळानें पट्टे ओढा पाहूं. ' तेव्हां लोहार म्हणाला, ' तुम्हाला वाघ बनावयाचें आहे काय ? बरें तर, या राव, इकडे ! माझ्याकडे पाठ करून बसा ! ' कोल्हा तसा बसतांच लोहारानें तापून लाल झालेला फाळ सांडसानें धरून कोल्ह्याच्या अंगावर भराभर चारपांच पट्टे ओढले. तेव्हां त्याचें अंग चराचर भाजून जो भडका होऊन गेला, तो सहन न होऊन तो तोंड वासून मोठमोठ्यानें ओरडूं लागला व शेवटीं त्या वेदनांनीं मरून गेला. " तात्पर्य, आपणांहून जे श्रेष्ठ आहेत त्यांच्यासारखी नुसती ऐट आणूं पहाणारांची अशीच गत व्हावयाची !

वरील गोष्टींतल्या लोहाराचे फाळ लोखंडी होते. कोल्हापुरच्या लोहाराचे फाळ सोन्याचे आहेत एवढाच फरक !

हा सर्व शिकारीचा संच जमला खरा; पण यांत खरा शिकारी जो 'मनुष्य तो कोठेंच दिसत नाहीं ! शिकारीची सर्व तयारी करून स्वतः शिकार व गडी आयत्या वेळीं शिकारीचा नाद सोडून देऊन घरीं बसला असावा असें वाटतें. कदाचित् तो शिकारीला निघता तर हत्ती-घोड्यांचीहि त्याला गरज नव्हती. त्यानें पायानें शिकार केली असती. आतां तो न आल्यामुळें तरी परस्पर वाघाची, हत्ती-घोड्यांशीं गांठ पडल्यास युद्ध होऊंहि शकेल व हत्ती, घोडा व तलवार यांच्या माऱ्यांत वाघ मरेल, आणि निशाण व खटारा हे त्याला साक्षीभूत होतील. पण शिकाऱ्याशिवाय झालेली ती शिकारच नव्हे; म्हणून ती पाहण्यासहि कोणी जाणार नाहीं हें उघड आहे.

---

## ५५ हे कोण आले ? बादशहांचे काका !

( ता. ११ जानेवारी सन १९२१ )

मनुष्य पाण्यांत बुडूं लागला म्हणजे हाताला गवताची काडी लागली तरी तिचा आधार घेण्याला त्याचा हात सरसावतो. पण ती बोलूनचालून गवताची काडीच ! ती त्याला आधार कितपत देणार ? काडीचा आधार घेण्याला हात पुढें करणाऱ्या माणसाच्या मनःस्थितीचें अनुकंपनीय असें आविष्करण मात्र त्यामुळें होतें व बुडणार तो बुडणारच; पण त्याची ही अखेरची फजिती तरी वांचली असती तर बरें, असें सहृदय प्रेक्षकाला वाटतें. आमच्या इंग्रज सरकारचीहि हिंदुस्थानासंबंधानें जवळजवळ अशीच स्थिति झाली आहे. इंग्रजांचें हिंदुस्थानांतलें राज्य बुडावयाचें असेल तर तें राष्ट्रीय सभेच्या ठरावानें खास बुडत नाहीं. तें केव्हांहि झालें तरी सरकारी कर्जबाजारीपणाच्या व लोकप्रियतेच्या खोल पाण्यांत गटंगळ्या खात खात आपल्या वजनानेंच बुडेल व आपल्या लोकप्रियतेला हिंदुस्थानांत ओहोटी लागलेली असून साम्राज्याविषयींची हिंदी लोकांची आदरबुद्धि दिवसेंदिवस विनाशाच्या अतल समुद्रांत ओढून नेली जात आहे हें सरकारास माहीत नसेल असें नाहीं. पण अजूनहि उलट्या दिशेनें तोंड फिरवून, जोराचा प्रयत्न करून इमानीपणाचे हात टाकून, परत किनाऱ्याकडे यावें अशी

बुद्धि त्यांना होत नाहीं. एवढेंच नव्हे तर आजच्या घटकेला ड्यूक ऑफ कनॉट-सारख्या एखाद्या मनुष्याला हिंदुस्थानांत पाठवून आपली सगळी पडती बाजू सांवरूं, असला भ्रमहि त्यांना सोडवत नाहीं. ड्यूकसाहेबांची स्वारी काल रोजीं मद्रासच्या बंदरांत उतरणार होती. त्यापूर्वी गेल्या शनिवारीं, ड्यूकसाहेबांच्या आगमनप्रसंगीं काय काय समारंभ करावयाचे त्यांची भरपोषाखाची रंगीत तालीमहि झाली व या तालमीबरहुकूम स्वतः ड्यूकसाहेबांचें पात्र रंगभूमीवर आल्यावर पूर्वी जाहीर केलेला नाट्यप्रयोगहि होईल यांत शंका नाहीं. पण असल्या नाट्यप्रयोगानें ब्रिटिश साम्राज्य संभाळून धरण्याचा प्रयत्न इंग्लंड करीत असलेलें पाहून कोणाहि विनोदप्रिय मनुष्यास हंसूं लोटल्यावांचून राहणार नाहीं. हा नाट्यप्रयोग खूप रंगणार अशा जाहिराती सरकारपक्षपाती वर्तमानपत्रांनीं आगाऊच प्रसिद्ध केल्या आहेत व त्यांच्या छापखान्यांतील काळ्या शाईनें जितका म्हणून रंग भरूं शकेल तितक्या सर्वांचा उपयोग, या प्रयोगाची मागाहून तारीफ करितांना, हीं पत्रें केल्याशिवाय राहणार नाहींत. पण एखाद्या राजाच्या खास आश्रयाला असणाऱ्या नाटक कंपनीनें राजवाड्यांत केलेल्या प्रयोगाला जितका रंग भरूं शकेल तितकाच ड्यूकसाहेबांच्या आगमनप्रसंगीं होणाऱ्या या नाट्यप्रयोगाला भरणार ! राजवाड्यांतील खासगी नाटकप्रयोग म्हटला म्हणजे त्याचें वर्णन करावें तेवढें थोडेंच. राजेसाहेब येण्याची वाट पाहतां पाहतां कंटाळून पेंगूं लागलेला नटवर्ग व रंगभूमीकडे पाठ वळवून परस्परांत हंसणारा, खिदळणारा व चकाट्या पिटणारा निरवधान प्रेक्षकवर्ग, अशांची गांठ पडल्यावर नाटकाला रंग कितपत भरणार हें दिसतच आहे.

ड्यूकसाहेब आज मद्रासेस काय किंवा उद्यां इतर ठिकाणीं काय, हिंडतील-फिरतील. तेव्हां मारूनमुटकून होणाऱ्या समारंभाचें विवर्णचित्र आम्हांला डोळ्यांपुढें दिसत आहे. या पाहुण्याचा सत्कार करण्याचें मुख्य काम येणार सरकारी नोकरांवर; व पगारी लोकांचा सत्कार हा खरा अंतःकरणाचा सत्कार होऊं शकत नाहीं हें सांगावयास नकोच ! सरकारजवळ पैसा, मनुष्यबळ व सत्ता हवीं तितकीं असल्यामुळें, त्यांना एखादें बंदर, शहर किंवा रस्ता शृंगारणें हें मोठेसें कठिण नाहीं. पण लोकांनीं खऱ्या प्रेमानें केलेल्या स्वागतसमारंभाची गोष्ट कांहीं वेगळीच आहे. पैसा खर्चून सरकारला विजेचे वाटेल तितके दिवे लावतां येतील, पण पाहुण्याला पाहून प्रेमकुतूहलानें स्त्री–पुरुषांचे ओठ फुलून गेल्यामुळें आंतून झळ-

कणाऱ्या शुभ्र दंतपंक्तींच्या चिराखदानाची शोभा हजारों विजेच्या दिव्यांनींहि येणार नाहीं. युनियन जॅकचीं निशाणें पैशाला पासरीभर मिळूं शकतात. व तोरणें लावण्याकरितां ओरबाडण्यास लागणाऱ्या वृक्षपल्लवांचीहि वाण या देशांत नाहीं. पण लोकप्रिय पाहुण्याला डोळाभर पाहून घेण्याकरितां जनतेच्या भुवयांनीं ज्या कमानी उभारल्या जातात तींच खरीं तोरणें! सरकारच्या पदरीं हवें तितकें सैन्य असल्यामुळें तमासगिरांची व्यवस्था ठेवून, आंत वाटेल तर चिटपांखरूहि न फिरकूं देण्याची व्यवस्था सरकारास सहज करतां येईल. पण टिळक किंवा गांधी यांच्या दौऱ्यांत हजारों लोकांची एकच गर्दी होऊन माजणाऱ्या पंढरीच्या अव्यवस्थेंत मनाला जो खरा आनंद लुटावयास सांपडतो त्याची सर या सरकारी समारंभाला कशी येणार? आम्हांला तर वाटतें कीं, राष्ट्रीय सभेनें मुद्दाम ठराव केला नसता तरी कित्येक ठिकाणीं ड्यूकसाहेबांच्या आगमनाच्या पंचक्रोशींत स्वतंत्र दिलाचें चिटपांखरूहि फिरकलें नसतें; व या पाहुण्याला संगीनवाल्या शिपायांच्या पहाऱ्यांत ठेवलेले आपण एक कैदी असून, तुरुंगाच्या नियमाप्रमाणें आपणास कोणाशींहि भेटण्याबोलण्याची बंदी आहे, असा भास झाल्यास नवल नाहीं. या गोष्टींची साक्ष बादशहांचे दुसरें एक प्रतिनिधि, म्हणजे आमचे व्हाइसरॉयसाहेब, हे आपल्या ताज्या अनुभवावरूनच देऊं शकतील.

ड्यूकसाहेब हिंदुस्थानांत आले, पण ते येऊन काय करणार? त्यांच्याइतके गोरे, वयानें पिकलेले, श्रीमंत व दिमाखदार लोक हिंदुस्थानांतहि पुष्कळ सांपडतील. ते स्वतः पूर्वी हिंदुस्थानांत शिपाईपेशानें आले होते तेव्हां लोकांनीं त्यांना पुष्कळ पाहिलें आहे, पुष्कळांनीं त्यांच्याशीं गप्पागोष्टी केल्या आहेत, पुष्कळ लोक त्यांच्याबरोबर एका टेबलावर बसून जेवले—खाल्ले आहेत. आमच्या पुण्याला तर त्यांचा पुष्कळच परिचय आहे. पुणें शहराला लागून लष्कराच्या हद्दींत हरि रावजी चिपळूणकरांनीं बांधलेल्या बंगल्यांत इतर साहेब लोकांप्रमाणें ते राहत होते व हल्लीं त्याच बंगल्यांत त्यांच्या नांवाचें एक हॉटेल सुरू असल्यामुळें पुण्याच्या लोकांस त्यांची अगदींच विस्मृति पडली असें कोणास म्हणतां येणार नाहीं. अर्थात् हा माणसासारखा साधा माणूस विलायतेहून येऊन इकडील लोकांना कसा गुंगविणार किंवा भुलविणार हें कोणी सांगेल काय? ड्यूकसाहेब 'हे बडे बापके बेटे' आहेत. नव्हे चुकलों, बडे,

माके बेटे' आहेत. कारण ते राजपुत्र म्हणजे त्यांची आई राणी होती या अर्थानें; पण राजवंशांत बापापेक्षां मातुःश्रींच्या नांवावर विकण्यांत जरी कोणत्याहि प्रकारें कमी भूषण नसलें तरी, स्वतः ड्यूकसाहेबांच्या अंगीं लोकांना कौतुकानें कोलमडून सोडण्यासारखा किंवा अद्भुत रसांत डोईबूड बुडविण्याइतका कोणता गुण आहे हें आम्हांस समजत नाहीं. हल्लींच्या बादशहांचे ते काका आहेत हें खरें; तथापि 'तूं नाहीं तुझा काका' या मराठी म्हणींत काकाकडे जें श्रेष्ठत्व येतें तेंहि ड्यूकसाहेबांना लाभूं शकत नाहीं. शिवाय खुद्द बादशहा हिंदुस्थानांत येऊन त्यांना जर हिंदी प्रजेचें सर्वस्वीं समाधान करतां आलें नाहीं तर ड्यूकसाहेब येऊन तरी तें काय करणार ! बोलूनचालून त्यांचा पेशा निरोप सांगणाऱ्या जासुदाचा आहे, व त्यांच्या आगमनाला महत्त्व असलेंच तर तें त्यांनीं बरोबर आणलेल्या निरोपाच्या गुलदस्तांत कांहींतरी झांकलें माखलें माणिक मोतीं असावें असें जें आशाळभूत झोंपाळू लोकांना चुकून स्वप्न पडतें त्यामुळें केवळ होय. पण गारुड्यानें शंभर वेळां कुडबुडें वाजविलें व 'आव आव' म्हणून दाही दिशांच्या देवतांना दोहों हातांनीं आमंत्रण केलें तरी शेवटीं त्याच्या पोतडींत रंगीत चिंध्यांच्या चेंडूहून अधिक मौल्यवान् असें कांहीं निघूं शकत नाहीं हें लोकांना पूर्वीं माहीत झालें आहे. किंबहुना पूर्वीच्या निराशाजनक अनुभवानें असे आशाळू, श्रद्धाळू, झोंपाळू लोकहि हिंदुस्थानांत फारसे राहिलेले नाहींत. म्हणून फिरून प्रश्न हाच कीं, ड्यूकसाहेब हिंदुस्थानांत येऊन काय करणार ! करणार म्हणजे देणार किंवा नेणार ! पैकीं देण्याच्या दृष्टीनें त्यांच्या खिशांत कांहीं विशेष मौल्यवान् चीज आहे असें आम्हांस वाटत नाहीं, आणि त्यांना बरोबर परत नेण्यासारखी गोष्ट आम्हांस तरी एकच दिसते, पण ती बादशहांना फारशी आनंददायक असण्याचा संभव नाहीं. 'हिंदुस्थानांत इंग्रज सरकारच्या न्यायनीतिवर भरंवसा ठेवणारा आतां एकहि मनुष्य उरला नाहीं. निवळ पोटजाळ्या माणसांखेरिज या राज्याची आतां कोणी स्तुति करीत नाहीं, व सर्वस्वाची होळी करा पण या घातुक राज्यपद्धतीला आतां लगाम घाला अशी देशांतील सर्व लोकांना बुद्धि झाली आहे', या बातमीशिवाय काकासाहेबांना पुतण्यासाहेबांकडे नेऊन नजर करण्याला दुसरी चीज या असंतुष्ट हिंदुस्थानांत आतां उरली नाहीं व ती त्यांनीं खुशाल आपणाबरोबर न्यावी. निरोपी मनुष्याचा मुख्य गुण वस्तुस्थितीचें

यथार्थ निवेदन करण्याची पात्रता हाच होय. हिंदुस्थानांतील अधिकाऱ्यांनीं ड्यूकसाहेबांच्या डोळ्यावर घातलेल्या झापडींतूनहि जें त्यांना इकडे दिसल्याशिवाय राहणार नाहीं, तें तेवढें जरी त्यांनीं आपल्या सिंहासनाधिष्ठित पुतण्याला जाऊन सांगितलें तरी देखील त्यांच्या आगमनाप्रीत्यर्थ होणाऱ्या गरीब हिंदी रयतेच्या पैशाच्या बेसुमार अपव्ययाकडे आम्ही दुर्लक्ष करूं.

---

## ५६ व्हाइसरॉय म्हणे न्याय देणार !

( ता. १८ जानेवारी सन १९२१ )

नवे व्हाइसरॉय लॉर्ड रीडिंग यांचा पगार ते हिंदुस्थानांत येऊन दाखल झाल्यावर सुरू होणार; पण त्यांचीं हिंदुस्थानविषयक भाषणें आधींच सुरू झालीं आहेत. कोण ही हिंदुस्थानाविषयीं कळकळ! पण ही कळकळ पगार न घेतां भाषण करण्यांत दिसून आली इतकेंच नव्हे, तर त्यांनीं केलेल्या या भाषणाच्या शब्दांतहि ती ओतप्रत भरली होती. गेल्या बुधवारीं लॉर्ड रीडिंग हे न्यायासनावर विराजमान झाले असतां कोर्टांतील एका वकिलानें, त्यांची नेमणूक हिंदुस्थानच्या गव्हर्नर जनरलच्या जागीं झाल्याबद्दल अभिनंदन केलें. वकील लोकांना न्यायाधीशाची स्तुति करण्यास शिकवावें लागत नाहीं हें प्रसिद्धच आहे. लॉर्ड रीडिंग यांनाहि अभिनंदनात्मक भाषणास उत्तर देणें प्राप्तच होतें. ते म्हणाले, "हिंदुस्थान आज आणीबाणीला येऊन ठेपलें आहे अशा वेळीं मला, म्हणजे इंग्लंडच्या मुख्य न्यायाधीशाला, बादशहांनीं या जागेवर नेमलें ही गोष्ट ध्यानांत धरण्यासारखी आहे. तिजवरून हेंच दिसून येईल कीं, हिंदुस्थानच्या लोकांना पूर्णपणें न्याय मिळावा अशी इंग्लंडची इच्छा आहे. माझ्या हातीं ताजव्याची दांडी सरळ धरण्याची शक्ति जितकी म्हणून आहे तितकी खर्च करून मी न्यायच देईन. केवळ न्यायबुद्धीनें वागावें एवढीच महत्त्वाकांक्षा मी धरणार असल्यामुळें माझ्या हातून मोठी कीर्ति लाभण्यासारखीं कृत्यें जरी न झालीं तरी नादानपणा तरी माझ्या पदरीं येणार नाहीं."

लॉर्ड रीडिंग यांचें भाषण स्वाभाविक आहे. अवचित जागा केलेला मनुष्य-देखील आपल्या धंद्याच्या गोष्टीच बरळत उठेल, मग सर्व जन्म न्यायकोर्टांत घालविलेल्या या गृहस्थांना आपल्या नेमणुकीचा व ब्रिटिश न्यायबुद्धीचा मेळ घालावासा वाटल्यास नवल नाहीं. हिंदी लोकांना बरें वाटेल असें, पण इंग्रज

सरकारचें कांहीं न खर्चेल असें, बोलावयाचें असेल तर टकल्या शिलेदाराच्या डोक्यासारखा गुळगुळीत अशा न्यायबुद्धीच्या विषयावर बोलण्याशिवाय गत्यंतरच नाहीं. लॉर्ड रीडिंग यांच्या जागीं समजा चर्चिल आले असते, तर त्यांना साम्राज्यविषयक असेंच कांहीं तरी बोलावें लागलें असतें. पण आज हिंदुस्थानला स्वराज्य देणें जितकें कठिण तितकेंच साम्राज्याचें समर्थन करणेंहि कठीण होऊन राहिलें आहे ! चेंबर्लेन येते तरी तीच अडचण. साम्राज्यांतील व्यापार खुला असावा म्हणण्याची सोय नाहीं, कारण खुद्द इंग्लंडनेंच जर्मनीविरुद्ध प्रतिबंधक व्यापार सुरू केला आहे. व्यापार प्रतिबंधक असावा असें म्हणावें तर हिन्दुस्थान खुद्द इंग्लंडविरुद्ध त्याचा फायदा मागणार ! एखादा शिपाईगडी व्हाइसरॉय होता तरी तेंच संकट. हिन्दुस्थान तलवारीच्या जोरावर राखूं म्हणाल तर जग तोंडांत शेण घालणार; आणि तलवार म्यानांत घालूं म्हणाला तर अँग्लो-इंडियन ओरडत उठणार ! पण न्यायाचा विषय मात्र बोलायला फार चांगला. बोलणारांना सफाईनें बोलतां येतें; हिन्दी लोकांना अविश्वास दाखविण्यापलीकडे कांहीं मागतां येत नाहीं व अँग्लो-इंडियनांनासुद्धां मूग गिळून बसणें प्राप्त होतें.

हिन्दी लोकांना ऐकून बरें वाटावें अशा हेतूनें लॉर्ड रीडिंग यांनीं न्यायदेवतेचें स्तोत्र गायलें खरें. पण आपण न्यायदेवतेचे प्रतिनिधि होऊन काय करणार याचा त्यांना फारसा उमज पडला नसावा. इंग्लंडच्या न्यायासनावर बसल्यामुळें इंग्रजाइंग्रजांच्या दरम्यानच्या वादांत त्यांना ताजव्याचा दांडा सरळ धरतां येत असेल. पण हायकोर्टांत जें न्यायाचें काम चालतें तें गव्हर्नर-जनरलच्या जागेवरून करावयाचें नसतें याची वाट काय ? राजदंड व तराजूचा दांडा हीं दोनहि एक नव्हत. वादीप्रतिवादींच्या भांडणांत कांहीं एका मर्यादेपलीकडे व्यवहाराचा पूर्वेतिहास पहावा लागत नाहीं. पण राज्यकारभारांत खरा न्याय करावयास बसेल त्याला नदीच्या उगमाप्रमाणें अन्यायाचें मूळ शोधीत जावें लागेल; व तेथून तो खणून काढून टाकल्याशिवाय त्याला खऱ्या न्यायदात्याचें श्रेय मिळवितां येणार नाहीं. आपण पंजाबच्या अत्याचाराचेंच उदाहरण घेऊं. प्रिव्ही कौन्सिलनें अपिलें काढून टाकल्यापासून पंजाब-प्रकरणीं अधिकाऱ्यांनीं केलेलें कोणतेंहि कृत्य बेकायदेशीर म्हणण्यास आतां प्रायः वाव राहिला नाहीं. जालियनवालाबागेंतील खून व लष्करी अधिकाऱ्यांचे अत्याचार या सर्वांना कायदेशीर भाषेत आधार आहे आणि 'झालें तें फार वाईट झालें पण त्याला

कायदेशीर इलाज नाहीं ' असें म्हणूनच जर लॉर्ड रीडिंग आपली न्यायमुनसफी गाजविणार असतील तर त्यानें कोणाचें समाधान होणार!

हिंदुस्थानांत कायदेशीर न्यायाला तोटा नाहीं. पण खरा म्हणजे नैतिक अन्याय हा कायदा करण्याच्याच बाबतींत मूळ होत असतो त्याची वाट काय? समजा, उद्यां रौलेट ॲक्ट अंमलांत आला तर त्याच्या अन्वयें होणाऱ्या न्याया-च्या खुनांना बेकायदेशीर म्हणण्याची कोणाची छाती आहे ! उलट रौलेट ॲक्ट नैतिक तत्त्वांवर रचला आहे असें तरी कोण म्हणेल ! अशा या स्थितींत " मी ब्रिटिश न्यायदेवतेचा प्रतिनिधि म्हणून हिंदुस्थानांत जात आहे " असें लॉर्ड रीडिंग म्हणाले तर त्याचा अर्थ आम्हीं काय समजावा ? किंवा अर्थ कळला तरी त्यानें आमचें कितपत समाधान होणार ? खुद्द रौलेट ॲक्टाची मूळ कल्पन सुचवायला इंग्लंडमधील हायकोर्टाचे एक न्यायमूर्तिच आले होते ना ! पंजाबां-तील अत्याचारांची सरकारी चौकशी करणारे हंटरसाहेब हेहि न्यायमूर्तिच होते. चिरोल प्रकरणांत प्रत्यक्ष न्यायासनावर बसून डार्लिंग यांनीं किती मासलेवाईक न्याय दिला हें हिन्दी जनता कधींहि विसरणार नाहीं. तात्पर्य, रौलेट, डार्लिंग व हंटर हीं नांवें जोंपर्यंत हिन्दी लोक विसरले नाहींत तोंपर्यंत ब्रिटिश न्यायमूर्तींच्या बड्या नांवाच्या दिमाख्यानें कोणीहि भुलून जाणार नाहीं. न्यायाच्या ताजव्याच्या दांडीलाच आंगचा बांक असेल किंवा ताजव्याच्या पारड्यांत जर एका बाजूला आधींच एखादें जड वजन घालून ठेवलेलें असेल तर ताजवा धरणाराचा हात कितीहि सरळ असला तरी त्याचा काय उपयोग ? प्रजेच्या पदरांत माप पडेल तें खोटेंच असणार !

लॉर्ड रीडिंग हातांत धारवाडी कांटा धरून कोणता न्याय देणार ? इंग्रज लोक व हिन्दी लोक यांच्यामध्यें जर कायद्यानेंच फरक केला असला तर ते काय करतील ? क्रिमिनल प्रोसीजरमध्यें काळ्या-गोऱ्यांच्या हक्कांत जो पंक्ति-प्रपंच केला आहे तो दूर करण्याची महत्त्वाकांक्षा ते धरतील काय ? सिव्हिल सर्व्हिसमध्यें इंग्रज लोकांना विलायतेंतील परीक्षेमुळें फायदा मिळतो तो ते कसा काढून टाकणार ? गोऱ्या लोकांना जे भाराभर पगार मिळतात, ते कमी होऊन काळ्या लोकांइतकाच त्यांनाहि पगार मिळावा असें ते म्हणणार आहेत काय ? लष्करामध्यें गोऱ्या लोकांनाच कमिशनें मिळतात, हजार जागांत एक जागाहि हिंदी लोकांच्या वांट्याला येत नाहीं, याचें तें काय करणार ? तोफखान्यांत काळ्या

लोकांना मज्जाव आहे तो ते काढून टाकतील काय ? गोऱ्या शिपायांचा पगार व काळ्या शिपायांचा पगार सारखा असावा असा आग्रह त्यांच्यानें धरवेल काय ? ख्रिस्ती धर्माला अप्रत्यक्ष रीतीनें हिंदुस्थानांतहि अधिक मदत मिळते ती ते बंद करतील काय ? गोऱ्या भांडवलवाल्यांना पक्षपातीपणानें वागविलें जातें तें हे थांबवितील काय ? आगगाड्यांचा उपयोग गोऱ्या व्यापाऱ्यांना अधिक करून दिला जातो त्याला हे आळा घालतील काय ? न्यायकोर्टांतून गोऱ्या अपराध्यांना फाजील दया किंवा सहानुभूति दाखविली जाते ती यांच्या हातून कशी थांबविली जाणार ? कारण न्यायकोर्टें न्यायमुनसफीच्या कामांत स्वतंत्र आहेत ! लॉर्ड कर्झन यांनीं गोऱ्या लान्सर पलटणीला केव्हां एकदां धाक दाखविला तेवढ्या आधारावर ते आपल्याला न्यायाचे पुरस्कर्ते म्हणवून घेत आहेत; पण कर्झन जर न्यायी तर सैतानहि साधू कां म्हणूं नये ?

तात्पर्य, लॉर्ड रीडिंग, म्हणजे खुद्द इंग्लंडचे सरन्यायाधीश, आज गव्हर्नर-जनरल होऊन हिंदुस्थानांत आले तरी ते कोणतें शतकृत्य करून ब्रिटिश न्यायदेवता जागृत आहे असें सिद्ध करणार हें आम्हांस तरी समजत नाहीं. येऊन-जाऊन गव्हर्नर-जनरल या नात्यानें ते फारसे उद्दामपणानें वागणार नाहींत, लॉर्ड हार्डिंजसाहेबांप्रमाणें गोड व सहानुभूतिपूर्ण असें बोलत जातील; तर तो न्यायबुद्धीपेक्षां मुत्सद्देगिरीचाच पुरावा अधिक ठरेल. पण निवळ गोडबोलेपणानें हिंदुस्थानास वश ठेवूं पाहण्याचे दिवस आतां राहिले नाहींत. लॉर्ड रीडिंग, म्हणजे पूर्वाश्रमींचे रूफस आयझॅक्स हे अत्यंत मिट्ठास बोलणारे आहेत अशी त्यांची प्रसिद्धि आहेच. डेली क्रॉनिकल पत्राचे माजी संपादक मि. गार्डिनर यांनीं त्यांचें वर्णन एका चरित्रमालेंत दिलेलें आम्हीं वाचलें त्यावरून तर ते अत्यंत आंतल्या गांठीचे शिष्ट व 'पायघोळ संत' दिसतात. प्रतिपक्षाच्या वकिलानें चिडून रागावून न्यायकोर्टाला आग लावण्याचा बेत आणला तरी यांच्या तोंडून एकहि वावगा शब्द निघावयाचा नाहीं, ओंठावरचें हास्य लोपावयाचें नाहीं, पण हातचा मुद्दा म्हणून सुटावयाचा नाहीं; आणि ज्यूरी काय किंवा साक्षीदार काय यांना आपल्या डोळ्यांतलें काजळ केव्हां कसें काढून नेलें हें कळावयाचें नाहीं. जो म्हणून उदार उपकारकर्ता असतो त्यांच्या अंगीं असले गुण नसतातच; पण खरा न्यायनिष्ठुर

मनुष्यही यांच्याहून अधिक तापट असतो. जखमी व रक्तबंबाळ झालेल्या हिंदुस्थानच्या काळजावर घालायला जुन्या तुपाचा व संगजिऱ्याचा लेप म्हणून एवंगुणविशिष्ट गृहस्थ इकडे पाठविण्याचा प्रधानमंडळाचा विचार असेल. अशा लेपानें फार तर जखम अधिक चिघळणार नाहीं. परंतु रक्तनाश झाला तो भरून कशानें येणार ?

आम्हांला आशा वाटत असेल तर ती इतकीच कीं, लॉर्ड रीडिंग हे वकील किंबहुना मुख्य न्यायाधीश आहेत यापेक्षां, त्यांच्या योगानें हिंदुस्थानाला फायदा झालाच तर ते स्वतः जातीनें ज्यू आहेत या एका गोष्टीनेंच अधिक फायदा होण्याचा संभव आहे. सामान्यतः ज्यू लोक हे ख्रिस्ती लोकांचा द्वेषच करितात. ज्यू लोक हे प्राच्य म्हणजे एशियाटिक आहेत. ख्रिस्ती धर्माचा उदय झाल्यापासून हे लोक आपल्या जन्मभूमीला व राष्ट्रीयत्वाला मुकले, ते आज विस शतकेंपर्यंत तसेच निराधार लोंबत आहेत. प्रत्येक देशांत त्यांनीं छळच सोसला आहे; फार काय पण त्यांना प्रत्येक देशानें कुत्र्यासारखें कसें वागविलें आहे हें जर्मनी, रशिया यांचे इतिहास व इंग्रज कवि शेक्सपीअर यांचें 'मर्चंट ऑफ व्हेनिस' हें नाटक वाचणारास कळून येईल. स्वतः निंदा व छळ सोसल्यामुळें आपल्यासारख्या स्थितींत असलेल्या इतर लोकांबद्दल त्यांना सहजच सहानुभूति वाटते. छळ सोसण्याच्या संवयीमुळें त्यांच्या मनांत खोल विचार सांठवून ठेवण्याची पात्रता येते; यामुळें ज्यू लोक सहसा उन्मत्त किंवा उथळ नसतात. इंग्रजांच्या साम्राज्याचें त्यांना वैभव वाटण्याचें कारण नाहीं, कारण तें त्यांचें साम्राज्य नव्हे. या सर्व दृष्टींनीं पाहतां लॉर्ड रीडिंग यांचा अंमल, कोणाहि इंग्रजापेक्षां अधिक चांगला होण्याचा संभव आहे व तसें झालें तर इष्टच आहे. स्टेट सेक्रेटरी ज्यू व गव्हर्नर जनरल ज्यू अशी जोडी इतिहासांत ही पहिलीच होय. मॉंटेग्यूसाहेबांचे पुतळे उभारण्याइतका जरी आम्हांला त्यांच्याबद्दल आदर वाटत नाहीं, तरी पूर्वींच्या कोणत्याहि स्टेटसेक्रेटरीपेक्षां त्यांनीं हिंदुस्थानाविषयीं अधिक व सक्रिय सहानुभूति दाखविली असें म्हणण्यास हरकत नाहीं; व मॉंटेग्यूसाहेबांचा पाठपुरावा करण्याकरितांच जर लॉर्ड रीडिंग यांची नेमणूक झाली असेल तर तें चिन्ह कांहीं वाईट नाहीं.

तथापि सर्वच ज्यू सारखे नसतात. चाळीस वर्षांपूर्वीं लॉर्ड बीकन्सफील्ड हे मुख्य प्रधान होते. त्यांचा हिंदुस्थानाशीं जो संबंध आला तो लक्षांत घेतां ज्यू लोकांविषयीं झालें तरी फारशी आशा बाळगण्याचें कारण नाहीं. सन १८७७ सालीं दिल्लीस

जो बडा दरबार भरला त्यांत राणीसाहेबांनीं बादशाहीण हा किताब घेतल्याचें जाहीर झालें. ही नवीन पदवी राणीला देण्यांत इंग्लंडचा गौरव करून हिंदुस्थानाला हीनपणा आणण्याचा हेतु होता. एरवीं राणी व बादशाहीण असा फरक करण्याचें कारण नव्हतें. इंग्लंडांतील गोऱ्या प्रजेला जे हक्क राणीविरुद्ध आहेत ते हिंदुस्थानांतील काळ्या प्रजेला नाहींत, इंग्लंड स्वराज्य भोगीत आहे व हिंदुस्थान हा पादाक्रांत झालेला परावलंबी देश आहे, हेंच या नव्या पदवीच्या द्वारें जगास कळविण्यांत आलें. असें असतां बीकन्सफील्डसाहेबांनीं पार्लमेंट-मध्यें असें बोलून दाखविलें कीं, हिंदी राजेरजवाड्यांच्या विनंतीवरूनच हा नवा किताब धारण करण्यांत आलेला आहे. जणूं काय हिंदी राजेरजवाडे इतके मूर्ख, नादान व स्वाभिमानशून्य झाले होते कीं, आपल्या हातानें आपल्या कपाळावर गुलामागिरिचा छाप मारून घेतल्याशिवाय त्यांना अन्न गोड लागत नव्हतें! पण ही सर्व या इस्त्राइली प्रधानाची कारवाई! त्यानेंच रशियाशीं कज्जा करण्याचा घाट घातला. त्यानेंच सरहद्दीकडील भांडखोर धोरण बळावलें. त्यानेंच साम्राज्याच्या कल्पनेस जोर आणला, व त्यानेंच हिंदुस्थानांतील काळें सैन्य माल्टापर्यंत नेऊन परदेशच्या युद्धांत हिंदुस्थानाला गुंतविण्याचा पायंडा घातला. बीकन्सफील्डला 'ओरिएंटल डिक्टेटर' म्हणजे 'पूर्वेकडील राजकारणांतला अरेराव' अशी पदवी लाभली होती व त्यानेंच प्रथम पार्लमेंटच्या प्रातिनिधिक स्वरूपाची रेवडी उडविली!

तात्पर्य, लॉर्ड रीडिंग हे इंग्लंडचे सरन्यायाधीश आहेत किंवा ज्यू आहेत यावरून त्यांच्या कारकीर्दीचें निश्चित असें कांहींच अनुमान करितां येणें शक्य नाहीं. म्हणून त्यांच्या शब्दावर विश्वास न ठेवतां, प्रत्यक्ष कृति करून ते आपली न्यायबुद्धि शाबीत करीपर्यंत, त्यांच्या खात्यांतील जमेची बाजू कोरी ठेवणें हेंच योग्य होईल. आपल्याला स्वराज्य देण्याइतका उदारपणा दाखवितील असा हिंदुस्थानचा खुद्द बादशहांवरहि विश्वास नाहीं; मग त्यांच्या प्रतिनिधीवर तो कोठून बसणार? हिंदुस्थानानें पुराव्याचा सर्व बोजा आतां अधिकाऱ्यांवर टाकलेला असून साम्राज्य बचावावयाचें असल्यास त्यांनीं होऊन पाऊल पुढें टाकलें पाहिजे. हिंदुस्थानचा तर बोलूनचालून सर्वनाश झालेलाच आहे. त्याचें आतां अधिक वाईट तें काय होणार आहे? यामुळें जुने व्हाइसरॉय जाणें, नवे येणें, असल्या नियतकालिक गोष्टींचें त्याला कांहींच कौतुक राहिलें नाहीं.

दर आठवड्यास शेंकडों प्रवासी विलायतेस जातात किंवा हिंदुस्थानास येतात त्यांतलेच लॉर्ड चेल्म्सफर्ड किंवा लॉर्ड रीडिंग; कोणी आल्याचा सुहेर नाहीं व गेल्याचें सुतक नाहीं. हिंदुस्थानच्या रथचक्राची कक्षा हळूहळू साम्राज्याच्या चाकोरींतून बाहेर पडूं लागली आहे. ती आंत ठेवून घेणें किंवा पुरी बाहेर जाऊं देणें ही सर्वस्वीं इंग्लंडच्या मुत्सद्दीगिरीची गोष्ट आहे; व यापुढें हिंदुस्थानावर येणाऱ्या गव्हर्नर-जनरलांना आपण स्वतः हिंदी आहों असें वाटूं लागेल तरच इंग्लंडला त्यांच्याकडून या कामीं खरी मदत होईल. लॉर्ड रीडिंग यांच्या अंगीं अनेक गुण आहेत. ते स्वावलंबीपणानें थोरवीस चढले. शेअर–बाजारामध्यें दलालीच्या कामांत दिवाळें निघालें असतां त्यांनीं प्रयत्नानें आपली बाजू सांवरली असें सांगतात. इंग्लंडचेंहि मुत्सद्देगिरीच्या बाबतींत आज दिवाळें वाजलें आहे असें सर्व जग म्हणतें; मग स्वतःच्याप्रमाणेंच इंग्लंडची दिवाळखोरी लॉर्ड रीडिंग यांना वांचवितां येते कीं काय पाहावें !

---

## ५७ अखेर भ्रमाचा भोपळा फुटला !

( ता. १५ फेब्रुअरी सन १९२१ )

अखेर गेल्या आठवड्यांत ड्यूकसाहेब दिल्लीला जाऊन पोंचले, आणि इतके दिवस अगदीं ठेवणींत ठेवलेला बादशहांचा संदेश त्यांनीं जाहीर केला. ड्यूकसाहेब वृद्धपणीं अनेक हालअपेष्टा सोसून इतक्या दूरवर आले तेव्हां त्यांच्या पोतडींत कांहीं तरी बडी अमोलिक चीज असणार अशी साहजिकपणेंच लोकांची कल्पना होती. ठिकठिकाणच्या नव्या कौन्सिलांचीं दारें उघडीत हिंदुस्थानभर फिरण्याखेरीज ड्यूकसाहेबांना दुसरें कांहीं काम नसेल असें लोकांना वाटत नव्हतें; कारण नुसतीं दारेंच उघडावयाचीं तर तीं येथल्या नोकरशाहींतील एकादा काळा पुरभय्या किंवा फारच झालें तर एखादा गोरा रखवालदार सहज उघडूं शकता. केवळ दारांच्या उघडाउघडीसाठीं बादशहांच्या काकांना वृद्धपणीं हजारों मैलांच्या समुद्रपर्यटनाची तसदी दिली जात असेल अशी कोणाचीहि समजूत नव्हती. शिवाय हे ड्यूक म्हणजे प्रत्यक्ष व्हिक्टोरिया चक्रवर्तिनीचे चिरंजीव. मद्रास, कलकत्ता, वगैरे ठिकाणीं भाषणें करतांना ड्यूकसाहेब पुनः पुन्हा लोकांना बजावीत कीं, ज्या व्हिक्टोरिया राणीला हिंदी लोकांविषयीं अमर्याद प्रेम वाटे तिचा मी मुलगा. राणीसरकारनीं सन १८५७ सालीं जाहिरनामा काढून हिंदु-

स्थानांतील असंतोषाची लाट थोपटून धरली आणि त्यापुढें वाटेल ते अत्याचार करावेत व त्या अत्याचारांवर राणीच्या आश्वासनांचें पांघरूण घालून लोकांची दिशाभूल करावी अशी उत्तम सोय नोकरशाहीला करून दिली. तेव्हां "बापसे बेटा सवाई" त्याचप्रमाणें "मा से बेटा सवाई" अशा न्यायानें ड्यूकसाहेब हिंदुस्थानांत आल्यानंतर कांहीं तरी अद्‌भुत गोष्ट करून दाखविणार असा सर्वांचा तर्क होता. मवाळ मंडळींची तर सर्व भिस्त ड्यूकसाहेबांच्या दिल्लीच्या भाषणावर होती. परगांवाहून बाप घरीं आला म्हणजे त्यानें कांहीं तरी खाऊ आणला असेल या अपेक्षेनें लहान मुलें त्याच्या गांठोड्याभोंवतीं घिरट्या घालीत असतात. त्याचप्रमाणें आशाळभूत मंडळी ड्यूकसाहेबांच्या गांठोड्याकडे टक लावून बसली होती. कोणी पंजाबांतील अत्याचाराविषयीं निषेध प्रदर्शित करूं लागला तर ही मंडळी त्याला थांबवून म्हणत कीं "जरा धीरानें घ्या, पंजाबाविषयीं न्याय द्यावयास ड्यूक येथें आले आहेत." ड्यूक येतील आणि ते हिंदी लोकांचा क्षोभ नाहींसा करतील अशीं सुखस्वप्नें अनेक लोकांना पडत होतीं. ड्यूक प्रथम दिल्लीला जाऊन थडकले नाहींत, याचें कारणहि पुष्कळ लोकांना असें वाटलें कीं, एकदम पहिल्या तोंडींच ड्यूकसाहेबांनीं बादशहांचा संदेश सांगितला तर ज्यासाठीं हिंदुस्थान उत्कंठ झालेलें आहे तें बाहेर पडून ड्यूकसाहेबांच्या दौऱ्याची सारी वाफ निवून जाईल; म्हणूनच त्यांना मद्रासेहून वऱ्हाडांत, वऱ्हाडांतून कलकत्त्यास, कलकत्त्याहून दिल्लीस असें मिरविण्यांत आलें असावें. परंतु शेवटीं हे सर्व तर्क सपशेल चुकीचे ठरले, आणि ड्यूकसाहेबांचा दौरा म्हणजे निवळ पोकळ तमाशा ही गोष्ट हिंदी अंतःकरणाला पुरी पटवून देण्यासारखा बादशहांचा संदेश गेल्या आठवड्यांत ड्यूकसाहेबांनीं दिल्लीस जाहीर केला.

ड्यूकसाहेबांनीं आमची निराशा केली असें आम्ही म्हणत नाहीं. कारण आम्ही कोणती आशाच बाळगली नव्हती तर आमची निराशा ती काय होणार ? इंग्रजी राज्यपद्धतीची घटनाच अशी विचित्र आहे कीं, खुद्द बादशहांच्या हातून अन्यायाचें कृत्य घडत नाहीं हें जितकें खरें तितकेंच कोणत्याहि अन्यायाची दाद घ्यावयाचें त्यांच्यांत सामर्थ्य नाहीं हेंहि खरें. लोकशाही आणि राजशाही यांचें असें कांहीं सोईस्कर मिश्रण इंग्रजी मुत्सद्द्यांनीं करून ठेवलें आहे कीं त्यामुळें हिंदी लोकांवर वाटेल तो जुलूम करून न्यायदानाची गोष्ट निघाली कीं, बादशहांच्या सिंहासनाकडे बोट दाखविण्याची नोकरशाहीला सवड आहे आणि कोणताहि न्याय

न देतां राजनिष्ठेची भरपूर खंडणी लोकांकडून वसूल करून घेण्याची बादशहांस सवड आहे. शिराळशेटानें नुसतें औटघटकांचें राज्य करून लोकांचें कल्याण केल्याची गोष्ट प्रसिद्ध आहे. पण इंग्लंडच्या तख्तावरील बादशहा युगानुयुगें राज्य करीत राहिले तरी त्यांना प्रजेच्या गाऱ्हाण्यांची दाद काय घेतां येणार ! इंग्लंडचे बादशहा आमच्यावर उपकारहि करूं शकत नाहींत आणि अपकारहि करूं शकत नाहींत; व जी गोष्ट बादशहांना अशक्य ती त्यांच्या काकांना तरी कशी शक्य होणार ? काका इकडे यावयास निघाले तेव्हांच आम्हीं आपल्या अग्रलेखांत लिहिलें होतें कीं, त्यांच्यापासून कांहीं लाभ होईल अशी कोणीहि आशा बाळगूं नये.

ड्यूकसाहेब प्रथम दिल्लीस पोंचले तेव्हां म्युनिसिपालिटीच्या मानपत्रास उत्तर देतांना त्यांनीं आपल्या पुढील भाषणाची भली मोठी जाहिरात फडकावून दिली. ते म्हणाले, " ज्या कार्यासाठीं मला बादशहांनीं इकडे पाठविलें आहे, आणि जें कार्य लवकरच या शहरांत कळसाला पोंचणार आहे तें कार्य करण्याविषयीं तुमच्या या सन्मानामुळें मला अधिक उल्हास वाटेल. " ड्यूकसाहेबांच्या कार्याचा दिल्लीस कळस होणार हें पाहून कित्येक मंडळी चिभल्या चाटूं लागली होती, आणि बादशहांचा संदेश काकासाहेबांच्या तोंडून कधीं बाहेर पडतो असें त्यांस होऊन गेलें होतें. पण अखेर हा कळस म्हणजे एका शोकरसपूर्ण कहाणीचा कळस ठरला. अन्नासाठीं तळमळणाऱ्या गरीब रयतेच्या फुटक्या गाडग्यांतील पैसे जमा करून ड्यूकसाहेबांसाठीं गुढ्या–तोरणें उभारलीं, पाण्याच्या थेंबावांचून तरफडून मरणाऱ्या गोरगरिबाचा पैसा ड्यूकसाहेबांच्या स्वागतासाठीं पाण्यासारखा ओतला, जमिनीचें अंथरूण आणि आकाशाचें पांघरूण करून थंडी वाऱ्यांत निजणाऱ्या हिंदी लोकांच्या जीवावर ड्यूकसाहेबांसाठीं शामियाने शृंगारण्यांत आले आणि अखेर दिल्लीच्या नव्या कौन्सिलांत ड्यूकसाहेबांनीं रयतेच्या डोळ्यांतील एकहि अश्रु पुसला नाहीं, त्याच्या इतकी शोकपूर्ण कहाणी दुसरी कोणती असेल ! विराटाच्या दरबारांत आत्मश्लाघेचीं गर्विष्ठ भाषणें करणाऱ्या कीचकाप्रमाणें चेल्म्सफर्ड साहेबांनीं भाषण करावें आणि ड्यूकसाहेबांनीं या व्हाइसरॉयांना त्यांच्या उत्तम कामगिरीबद्दल शाबासकी द्यावी, याहून अधिक उद्वेगजनक गोष्ट दुसरी कोणती असेल ! नव्या दिल्लीचें महत्त्व वर्णन करतांना ड्यूक म्हणाले, " जुन्या काळच्या जुलमी राजांच्या अत्याचारांची साक्ष देणारें शहर म्हणून

-या शहराची आजपर्यंत प्रसिद्धि होती. पण आतां नव्या काळच्या सुधारणा या रंगभूमीवर प्रदर्शित होणार व त्यामुळें दिल्लीचें नांव चिरस्मरणीय राहणार." जुन्या काळच्या जुलमी राजांच्या अत्याचारांचा उल्लेख ड्यूकसाहेबांनीं केला नसता तर फार बरें झालें असतें. राणीची गोळी लागून आपला नवरा मेला म्हणून न्याय मागावयास येणाऱ्या यःकश्चित् धोबिणीच्या हातीं बंदूक देऊन आपली छाती तिच्यापुढें उघडी करणारे मोंगल राजे दिल्लीच्या तख्तावर होते त्या वेळीं दिल्लीस अधिक अत्याचार झाले कीं, चांदणीचौकांत जमलेल्या असहाय लोकांवर तोफा डागणाऱ्या नोकरशाहीच्या कारकीर्दींत अत्याचारांच्या रक्तानें दिल्ली रक्तबंबाळ झाली हें कोणीही सांगूं शकेल. प्राचीन दिल्लीच्या ( हस्तिनापूरच्या ) सिंहासनावर प्रत्यक्ष पांडव शत्रू दुर्योधन असतांना देखील प्रजा सुखी होती; पण अर्वाचीन इंद्रप्रस्थांत इंग्रजांचा अन्याय लोकांना असह्य झाला आहे, ही गोष्ट कोण विसरूं शकेल ! ड्यूकसाहेब पाहुणे म्हणून इकडे आलेले असले तरी "तुमचे बापजादे जुलमी होते, आम्ही आतां न्यायाचें राज्य करून तुम्हांला सुखी करणार" असें त्यांनीं म्हणावें याहून अधिक अपमानास्पद गोष्ट ती कोणती असणार !

ड्यूकसाहेबांच्या मनांत असतें तर पंजाबाच्या अत्याचारांमुळें झालेल्या हिंदी अंतःकरणांतील जखमा बऱ्या करणारा बादशाही संदेश त्यांना इकडे आणतां आला असता. बंगालच्या फाळणीनें उत्पन्न झालेला असंतोष शांत करण्यासाठीं बादशाही संदेश जाहीर करण्यांत आला त्याचप्रमाणें पंजाबप्रकरणानें दुखावलेल्या हिंदी लोकांची तळमळ बादशाही संदेशानें शांत करतां आली असती. पण परवांच्या बादशाही संदेशांत त्याबद्दल एक अवाक्षरही नाहीं. खिलाफतीच्या प्रश्नामुळें असंतुष्ट झालेल्या मुसलमानांना आनंदित करणारें आश्वासन बादशहांना आपल्या संदेशांत देतां आलें असतें. पण त्याविषयींहि बादशहांनीं मौनवृत्ति पत्करली. अंदमानांत आणि इतर ठिकाणीं नरकयातना भोगीत खितपत पडलेल्या राजकीय कैद्यांच्या मुक्ततेविषयीं अभिवचन देऊन बादशहांना आपला संदेश लोकप्रिय करतां आला असता; पण बादशहांनीं तीहि गोष्ट लक्षांत आणली नाहीं. हिंदुस्थानांतील कोरड्या दुष्काळाहूनहि अधिक कोरडा बादशाही संदेश ड्यूकसाहेबांच्या हस्तें इकडे पाठविण्यांत ब्रिटिश मुत्सद्यांनीं कोणती गोष्ट साधली कोण जाणें ! बादशाही संदेश जाहीर करतांना ड्यूकसाहेबांचें अंतःकरण सद्गदित होऊन त्यांच्या आवाजांत

कंप उत्पन्न झाला असें टाइम्सकारांनीं वर्णन केलें आहे. ड्यूकसाहेबांना सद्गदित करण्यासारख्या कोणत्या भावना त्या बादशाही संदेशांत भरलेल्या आहेत तें आम्हांस तर कांहीं समजत नाहीं. अथवा असला निःसत्त्व संदेश हिंदी लोकांच्या वांट्याला आलेला पाहून आमच्या फुटक्या नशिबाची कींव येऊन ड्यूकसाहेबांना करुणरसाचा उमाळा आला असल्यास न कळे किंवा न्यायासाठीं तळमळणाऱ्या तीस कोटी जीवांचा आशाभंग करणारा बादशाही संदेश उच्चारल्यामुळें लागणाऱ्या पापाचें प्रायश्चित्त घेतल्याखेरीज आपल्या मनाची टोंचणी कशी नाहींशी होईल या चिंतेमुळेंहि त्यांच्या हृदयांत कालवाकालव झाली असल्यास कोण जाणें ? टाइम्सकार म्हणतात कीं, पूर्वी सातव्या एडवर्ड बादशहांचा राज्यारोहणसमारंभ झाला किंवा पंचम जॉर्ज यांनीं हिंदुस्थानाला भेट दिली त्या वेळचे समारंभ, रोषणाई, दारूकाम व शृंगार या बाह्यांगांच्या दृष्टीनें परवांच्या समारंभाहून अधिक नयनमनोहर झाले असले तरी तात्त्विक दृष्टीनें पाहतां हाहि समारंभ कांहीं कमी महत्त्वाचा नाहीं. कारण या समारंभामुळें हिंदुस्थानांत स्वराज्याला प्रारंभ झाला. फेब्रुवारी ९ तारखेपर्यंत हिंदुस्थान परराज्याखालीं होतें, आणि १० तारखेला दुपारीं लोक डोळे उघडून पाहतात तों जिकडेतिकडे स्वराज्याचा प्रारंभ झालेला त्यांना दिसूं लागला, असें दृश्य टाइम्सकारांना दिसत असून आम्हां पामरांच्याच दृष्टीला दिसत नसलें तर आमच्या दुर्दैवाला त्यांनीं काय करावें ?

बाकी आमच्याहि मतें बादशहांचा संदेश आणि ड्यूकसाहेबांचें भाषण एका दृष्टीनें अत्यंत महत्त्वाचीं आहेत. राजघराण्यांतील एखादा पुरुष इकडे येऊं लागला म्हणजे आतां आपला कांहीं तरी फायदा होणार अशा आशेनें त्या पुरुषाच्या तोंडाकडे पहात बसण्याची हिन्दी लोकांना संवय लागली होती. पण आतां यापुढें राजपुरुषाची भेट म्हणजे फलप्राप्तीची संधि नसून केवळ द्रव्यहानीची आपत्ति होय असें हिन्दी जनतेनें पक्कें समजावें, म्हणूनच जणूं काय ईश्वरानें असला स्नेहशून्य संदेश पाठविण्याची बादशहांस बुद्धि दिली. मेघगर्जना झाली कीं, पाऊस पडणार अशी लोकांची कल्पना असते. पण ढग जमावयाचे, गार वारे सुटावयाचे, गडगडाट व्हावयाचा, विजा देखील चमकावयाच्या, पण पावसाचा एक थेंबहि पडावयाचा नाहीं असा अनुभव येऊं लागला म्हणजे लोक आपोआप शहाणे होतात; आणि 'केचिद्

वृष्टिभिरार्द्रयन्ति धरणीं गर्जन्ति केचिद् वृथा' या कन्युक्तीप्रमाणें कांहीं ढग कितीहि गर्जले तरी वृष्टि करूं शकत नाहींत ही गोष्ट त्यांना पटते. त्याचप्रमाणें राजवंशांतील पुरुषांची भेट म्हणजे फुकट गर्जना करणाऱ्या ढगांची भेट होय ही खूणगांठ यापुढें प्रत्येक हिंदी माणसानें आपल्या मनाशीं पक्की बांधून ठेवावी. एखादी यात्रा जमली म्हणजे चार बाहुल्यांचा कुचकामाचा खेळ तंबूच्या आंत सुरू करून तंबूबाहेर ढोलगें वाजवीत बसणाऱ्या तमाशेवाल्यांच्या आर्जवाला बळी पडून कांहीं लोक खेळ पाहावयास आंत जातात आणि नंतर आंबट तोंड करून निराशेनें बाहेर येतात.

जो आशा बाळगतो त्यालाच निराशेचें दुःख होतें. पण हल्लींच्या राज्यांत 'नैराश्यं परमं सुखं' हेंच वेदांतवचन खरें ठरतें. यामुळें ड्यूकसाहेबांच्या जाहिरनाम्यांत महत्त्वाचें असें कांहीं नव्हतें याचें खरें दुःख राष्ट्रीय पक्षापेक्षां नेमस्तांनाच अधिक झालें असलें पाहिजे. अँग्लो-इंडियन पत्रकार दुसऱ्या एका रीतीनें आमच्यासारखेच खरे सुखी आहेत. सरकारच्या हातून जें जें घडतें तेंच शहाणपणाचें असतें असें म्हणण्याचें धोरण त्यांनीं स्वीकारल्यामुळें त्यांना आशाहि नाहीं व निराशाहि नाहीं. ड्यूकसाहेबांच्या भाषणांत कांहीं महत्त्वाच्या देणग्या जाहीर झाल्या असल्या तर हीं पत्रें म्हणतीं, "पहा, आपले अधिकारी किती समयज्ञ आहेत ते! त्यांनीं बरोबर वेळ ओळखून भुकेलेल्या भिकाऱ्यांच्या ताटांत हातभाजेशी उन्ह उन्ह पोळी वाढलीच." उलट ड्यूकसाहेबांचें भाषण चोखून टाकलेल्या उसाच्या चोयट्यांसारखें निःसत्त्व ठरलें तरी तीं म्हणण्यास तयारच कीं, "वाः! देणग्या जाहीर करण्याची ही काय वेळ वाटते? ड्यूकसाहेब केवळ निरोपे म्हणून आले. निरोप्यांच्या हातून कोणी महत्त्वाच्या देणग्या पाठवितो कीं काय?" येवढेंच नव्हे तर टाइम्सनें या प्रसंगीं फसलेल्या आशाळभूतांची कींव करावी ती न करितां उलट त्यांची टवाळीच केली. पण तो बाण आपले शत्रु राष्ट्रीय पक्ष यांना न लागतां आपले मित्र जे मवाळ लोक त्यांनाच लागणार आहे हें टाइम्सच्या लक्षांत आलें नाहीं. टाइम्स म्हणतो, "कोणाला वाटे कीं, दडपशाहीचे कायदे रद्द होणार, कोणास वाटे कीं, ड्यूकसाहेब नोकरशाहीचें शिर कापून आणून सोन्याच्या थाळींतून तें दिल्लीस हिंदी जनतेला नजर करून तिला प्रसन्न करणार!" पण हा बराच मिथ्यारोप आहे. हिन्दी लोक हें जाणतात कीं, ड्यूकसाहेब शिपाईगडी असल्यामुळें त्यांनीं रणांग-

णावर शिरें कापलीं असतील अशी कल्पना होते; पण लाक्षणिक अर्थानेंहि नोकरशाहीचें शिर कापून आणावें अशी त्यांची मगदूर नाहीं. कारण या विचित्र राज्यपद्धतींत तो अधिकार खुद्द बादशहांनाहि नाहीं; मग त्यांच्या केवळ निरोप्या जासुदाला कोण विचारतो ! ड्यूकसाहेब भ्रमाचा भोपळा बरोबर घेऊन आले आणि तो त्यांनीं दिल्लीच्या तक्तावर फोडला येवढीच गोष्ट खरी. या भोपळ्यांतील राड मवाळ लोकांच्या अंगावर उडून ते आधींच फसगतीनें मेल्याहून मेले झाले होते. अशा स्थितींत टाइम्सनें त्यांची अशी निर्दयपणाची टवाळी करावयाची नव्हती. पण आमचे कित्येक मवाळ बंधूहि असे निगरगट्ट दिसतात कीं, फोफशा भोपळ्यांतील राडीनें अंग घाण झालें तरी ड्यूकसाहेबांच्या भाषणांत कोठें एखादी बी अर्थात् बीजवाक्य, सांपडतें कीं काय हें पाहण्याकरितां ते भाषणाची चिवडाचिवड करीतच आहेत. पण त्यांना हें कळेना कीं, भ्रमाच्या भोपळ्यांतील बीं खाऊन पोट भरत नाहीं व रुजत घातली तरी तिला कालांतरानेंहि भ्रमाचा भोपळा हेंच फळ येणार.

ज्या कांहीं वेड्या हिंदी लोकांची निराशा झाली असेल त्यांनाहि परवांच्या दिल्लीच्या समारंभापासून कांहीं शिकतां येण्यासारखें आहे. पंजाबप्रकरणाचा उल्लेख करतांना ड्यूकसाहेब म्हणाले, "माझी एवढीच इच्छा आहे कीं, आम्हां इंग्रज लोकांच्याविषयीं ज्या कांहीं गैरसमजुती तुम्हीं करून घेतल्या असतील त्या तुम्हीं विसरून टाकाव्या." ड्यूकसाहेबांचा हा उपदेश आम्हीं पूर्ण लक्षांत ठेवला तर त्यापासून आमचा किती तरी फायदा होण्यासारखा आहे ! पंजाबांतील जुलमाची दाद ब्रिटिश पार्लमेंटांत लागेल ही आमची केवढी गैरसमजूत ! खिलाफतीसंबंधीं न्यायाचें धोरण स्वीकारून ब्रिटिश मुत्सद्दी आपल्या वचनाला जागतील ही आमची केवढी गैरसमजूत ! आपल्या हातून घडलेल्या अन्यायांचें परिमार्जन इंग्रज अधिकारी करतील ही आमची केवढी गैरसमजूत ! वेड्या हिंदी लोकांनीं असले गैरसमज खोल गाडून टाकावेत आणि स्वराज्यप्राप्तीचा आपला मार्ग 'दुसऱ्यावरी' न 'विश्वास' तां स्वावलंबनानें चोखाळावा हें हिंदी लोकांस शिकविण्यासाठीं तर बादशहांचे काका तमसातीरावरून उठून इकडे आले. नाहीं तर रात्रंदिवस मेजवान्या झोडण्याचा, दुतर्फा बंद केलेल्या दुकानांनीं विभूषित केलेल्या रस्त्यांतून स्वतःच्या मिरवणुकी काढविण्याचा आणि

मानपत्रांचा भारा स्वीकारून भाषणावर भाषणें करण्याचा नसता खटाटोप यांनीं इतक्या म्हातारपणीं कशाला केला असता !

---

## ५८ पोषाख–पेहराव व स्वदेशी

( ता. ३० माहे ऑगस्ट सन १९२१ )

स्वदेशी व बहिष्कार हा सुशिक्षित लोकांच्या गळीं न उतरण्याचें एक कारण 'फॅशन' किंवा पोषाखाची रूढि हें असतें. कोणत्याहि पोषाख–पेहरावाचे मुख्य दोन हेतु असतात. एक शरीरसुख किंवा सोय, व दुसरा शोभा. पण त्यांतल्या त्यांत सुखसोयीपेक्षांहि शोभेचा हेतुच प्रायः अधिक प्रभावी ठरतो. कोणत्याहि प्रांतांला आजचा पोषाख घेतला तर तो सुखसोयीच्या दृष्टीनें एखाद्या उपपत्तीबरहुकूम सप्रमाण बनविलेला आहे असें सहसा आढळणार नाहीं; तर केवळ लोकरूढि किंवा शिष्टसंकेत, व या उभयतांची गतानुगतिक परंपरा, यांना अनुसरून त्याची बनावट झालेली आहे असेंच आढळून येईल. पोषाखाची सुखसोय म्हणजे उष्णता व थंडी यांपासून शरीराचें संरक्षण करणें व मनुष्याला जो कोणता धंदा करावयाचा असेल तो करण्याला व्यत्यय न होणें. हें लक्षण गृहीत घेतलें तर निरनिराळ्या प्रांतांत आज जे निरनिराळे पोषाख प्रचलित आहेत, त्या सर्वांची समर्पक मीमांसा होऊं शकत नाहीं किंवा समर्थनहि करतां येत नाहीं. तसें असतें तर थंड प्रदेशांत थंडीच्या वेळीं बूट पाटलोणी व लोंकरीचे कपडे, पण तेथेंच उन्हाळ्याच्या वेळीं वारा आंतबाहेर खुला खेळणारीं तलम धोतरें व मलमलीचे सदरे असा दुरंगी पोषाख प्रचलित असावयास पाहिजे. पण कोणत्याहि प्रांतांत पाहा, बूट, पाटलोण व बनातीचे लांब आंखूड कोट हा पोषाख सुशिक्षित लोकांमध्यें श्रेष्ठ मान मिळवून बसलेला आढळेल. बनातीच्या कपड्यांचें वर्चस्व बूट पाटलोणीइतकें नसलें तरी त्याच्या खालोखाल खास आहे. या गोष्टींचें समर्थन उपपत्तिदृष्ट्या कसें होणार ?

पोषाखाच्या विपरीतत्वाचा कडेलोट मुंबईइतका इतर क्वचितच पाहावयास सांपडेल. जेथें वर्षांतून निदान दहा महिने तरी उकाडा बेसुमार असतो, व

पंख्याशिवाय जीवित दुःसह होतें, तेथें बूट पाटलोण व कोट घातल्याशिवाय वावरणारा सुशिक्षित किंवा शिष्ट असा मनुष्य क्वचितच आढळेल! याचें कारण युरोपियन लोकांचा सहवास व त्यांच्या चालीरीतींचें वर्चस्व हेंच होय. पण हें अनुकरण एवढ्यावरच थांबत नाहीं. ज्या दास्यबुद्धीमुळें बूट पाटलोण व कोट अंगावर चढतात, तिच्याच योगानें कपडा देखील युरोपियन लोक घालतात त्या आकाराचा नव्हे तर त्याच रंगरूपाचा व त्याच मूलद्रव्याचा असावा अशीहि इच्छा सहजच होऊं लागते. युरोपियन लोक हे स्वतःच्या चालीरीतींना चिकटून बसणारे असल्यामुळें विलायतेच्या थंड हवेंत जसे लोंकरीचे कपडे ते वापरतात तसेच ते इकडल्या उष्ण हवेंतहि वापरीत असल्यामुळें, हा उबदार लोंकरी कपडाच, मुंबईतील उष्ण वाफेनें शिजून निघालेल्या, शिष्ट लोकांच्याहि मानगुटसि बसतो. जी गोष्ट मुंबईस घडली तीच क्रमाक्रमानें बाहेरगांवींहि घडून आली. कारण रूढि पाडण्याचा अधिकार युरोपियन लोकांच्या हातीं गेला, व इलाख्यांत असा एकहि भाग नाहीं कीं, जेथें त्यांचा रूढि पाडण्याचा हा अधिकार मानला जात नाहीं. अशा कारणपरंपरेनें विलायती कपडा सुशिक्षित लोकांत एकदां जो रूढ होऊन बसला तो बसलाच. विलायती कपडा अशिक्षित खेडवळ लोकांच्याहि अंगावर चढलेला आहे, पण तो वरील कारणांकरितां मात्र नव्हे. गरिबांच्या अंगावरचा विलायती कपडा मांजरपाटासारखा स्वस्त व ओबडधोबड असतो. तो इतका कीं, हिंदुस्थानांत आलेला किंवा विलायतेंत असलेला एकहि गोरा अद्मी तसला कपडा अंगावर कधींच घालीत नाहीं. अर्थात् या ठिकाणीं इंग्रजांचें राजकीय वर्चस्व कारणीभूत नसून औद्योगिक वर्चस्व आहे. शिवाय अशिक्षित किंवा खेडवळ लोक अद्यापि बूट पाटलोण किंवा लोंकरीचा कपडा वापरूं लागले नसल्यानें रूढिच्छेदमूलक स्वदेशी—बहिष्कार हा त्यांना उपदेशण्याचें आज कारण नाहीं. तो उपदेश फक्त सुशिक्षितांनाच पाहिजे आहे.

वास्तविक सुशिक्षित लोकांनीं आपल्या शिक्षणामुळें सुख व सोयी यांकडे नजर देऊनच आपला पोषाख कायम करावयास पाहिजे होता असें कोणीहि म्हणेल, परंतु वर दर्शविल्याप्रमाणें मनोदास्य व अनुकरणबुद्धि हींच सुशिक्षितांमध्यें प्रभावी ठरलीं. एरवीं, निदान महाराष्ट्रापुरतें बोलावयाचें तर, निःशंकपणानें असें म्हणतां येईल कीं, बूट व पाटलोण हीं दोनहि या प्रांतांत अस्थानीं

होत. तीच गोष्ट लोंकरीच्या कापडाची. ईश्वरकृपेनें महाराष्ट्राची हवा इतकी समधात, समशीतोष्ण व सर्वकाळ सुखावह आहे कीं, केवळ कापसाच्या एखाद्-दुसऱ्या जाड्याभरड्या वस्त्रावर पोषाखाचें काम बारमहा निभूं शकतें. यापेक्षां जो अधिक कपडा वापरला जातो, त्याला केवळ रूढीच जबाबदार होय. पण अजूनहि महाराष्ट्रीयांनीं मनांत आणल्यास स्वदेशी–बहिष्काराला अनुकूल अशा रीतीनें ही रूढि बदलतां येणें अगदीं शक्य आहे. मात्र मनाचा निश्चय हवा. पोषाख–पेहराव यांमध्यें असलेली शोभा ही केवळ एक प्रकारच्या संकेतामुळें उत्पन्न होते; व हा संकेत भाषापद्धतीच्या संकेताप्रमाणें चल असून स्थानभेद व कालभेद यांनीं तो बदलूं शकतो, ही गोष्ट निरनिराळ्या उदाहरणांवरून सिद्ध करितां येईल. कसें तें पाहा. पोषाख–पेहराव ही एक सामाजिक बाब असली तरी अमक्या समाजाचा पोषाख–पेहराव अमुक एक प्रकारचाच असावा असा त्रिकालाबाधित नियम नाहीं. आजच्या घटकेला हिंदु व मुसलमान यांचा पोषाख वेगवेगळा. व हिंदूंतल्या हिंदूंतही महाराष्ट्रीयांचा वेगळा, असा भेद दाखवितां येतोच. पण शिवाय सर्व हिंदु किंवा त्यांतले महाराष्ट्रीय यांचा पोषाख अनादिकालापासून एकाच प्रकारचा नव्हता इतकेंच नव्हे, तर प्रत्येक पिढीला त्यांत थोडथोडा फरक पडत गेला हें कोणत्याहि दोनतीन पिढ्यांतील पोषाखांची तुलना करून पाहतां उघड दिसून येतें.

वेदकालीं हिंदु लोकांचा पोषाख कशा प्रकारचा असेल याची नक्की कल्पना सर्व वेद किंवा वैदिक वाङ्मय धुंडाळलें तरी मिळणें शक्य नाहीं. रामायण-कालीं किंवा भारतकालीं आर्य लोकांचा पोषाख कसा असेल याची कल्पना करण्यास थोडीं अधिक साधनें उपलब्ध आहेत. पण भारत–रामायणकालीं मुळीं फारसा कपडा आर्य लोक वापरीतच नव्हते. त्या वेळचा पोषाख फारच साधा म्हणजे दोन धोतरांचा असावा असें दिसतें. एक अंतरीय म्हणजे कमरेखालीं नेसलेलें धोतर, व दुसरें उत्तरीय म्हणजे अंगावर उपरण्यासारखें किंवा शेल्या-सारखें घेतलेलें धोतर. विजार घालण्याची पद्धत प्राचीन काळीं नव्हती असें भारताचार्य चिंतामणराव वैद्य यांनीं अनुमान केलेलें आहे. श्रीमंत व गरीब दोघेहि धोतरेंच नेसत. मात्र श्रीमंताचें धोतर तलम व मौल्यवान् आणि गरी-बाचें जाडेंभरडें व कमी किंमतीचें इतकाच फरक असे. मिजासी लोक खांद्यावरून धोतर पांघरीत. अर्थात् त्यांचे हात मोकळे न राहिले तरी चालत

असे. गरीब लोकांनीं अंगावर उपरणें घेतलेंच तर कामकाजाला मोकळें राहण्याकरितां, ब्रह्मचाऱ्याप्रमाणें, उपरण्याबाहेर ते हात काढून घेत. बंड्या किंवा अंगरखे त्या वेळीं मुळींच नव्हते. अर्थात् शिंप्याचा धंदाहि नव्हता; व भारतांत शिंपी या अर्थी शब्दहि कोठें आढळत नाहीं. सोनार, लोहार, कासार, चांभार वगैरे धंदे दर्शविणारे शब्द भारतांत असतां शिंपी याला प्रतिशब्द नाहीं ही गोष्ट वरील अनुमान दृढ करणारीच आहे. भारतकाळीं आर्य लोक डोक्याला पागोटें घालीत, पण तें म्हणजे फक्त लांब व अरुंद असें एक वस्त्र डोक्याभोंवतीं गुंडाळलेलें असे. वल्कलांचीं वस्त्रें नुसते ऋषीच नव्हे तर इतर लोकहि वापरीत; व हीं वल्कलें कुश, तृण व लव्हाळा वगैरेंचीं असत. चिंतामणराव वैद्य आपल्या महाभारताच्या उपसंहारांत लिहितात कीं, "महाभारतकाळीं हिंदुस्थानांतील आर्य लोक पोषाखाच्या बाबतींत अगदीं साधे असून, त्यांचे हल्लींचे वंशज ज्या प्रकारानें घरीं किंवा खेडेगांवांत वस्त्रें वापरतांना हल्लीं आपण पाहतों त्या प्रकारचे पूर्वींचे लोक पोषाखानें होते. हल्लींचा वरिष्ठ लोकांत वापरण्यांत येणारा पोषाख हा हिंदुस्थानच्या बाहेरचा असून तो ग्रीक, पर्शिअन, मुसलमान व अलीकडे इंग्रज लोक यांजकडून घेतलेला आहे."

त्यानंतर अर्वाचीन ऐतिहासिक कालाच्या आर्यांच्या पोषाखाचीं वर्णनेंच काय पण क्वचित् चित्रेंहि उपलब्ध आहेत. पण त्यांत आढळणारा पोषाख हा आपल्या आर्यपूर्वजांचा अतएव आपणास प्रिय व आदरणीय असला, व तसा एकदा शिंप्याला आज बनवितां आला, तरी तो अंगावर घालून रस्त्यांतून हिंडण्याइतके भरतभूमीचे कट्टे अभिमानी लोक किती निघतील ? चिनी प्रवासी ह्यूएनसँग हा सातव्या शतकांत हिंदुस्थानांत येऊन गेला. तोहि हिंदु पोषाखाचें वर्णन जवळ जवळ वरीलप्रमाणें करतो. तो लिहितो कीं, "येथील लोकांचे घरांत व समाजांत वापरण्याचे पोषाखांत शिवण्याचें काम मुळींच नसतें. रंगासंबंधानें पाहिलें तर स्वच्छ पांढऱ्या रंगालाच विशेष आदर आहे. अतिशय निरनिराळे रंग देणें हें त्यांस बिलकुल पसंत नसतें. पुरुष कमरेभोंवतीं एक लांब वस्त्र गुंडाळतात आणि खांद्यावर दुसरें वस्त्र घेऊन उजवा खांदा उघडा ठेवतात. महाराष्ट्रीयांच्या दृष्टीनें पुणें हें मराठी पोशाखाची 'फॅशन' बनविणारें प्रति 'पॅरिस' होय; पण पुण्यांतील आजच्या पोषाखांत व जुन्या

काळच्या या पोषाखांत बेसुमार फरक पडलेला आहे. कांहीं वर्षांपूर्वी 'पुण्याचें वर्णन' या नांवाचें पुस्तक प्रसिद्ध झालें त्यांत ग्रंथकारानें पुणेंकर ब्राह्मण-मराठ्यांच्या पोषाखाविषयीं खालीं दिल्याप्रमाणें उल्लेख केला आहे. "त्यांस पोषाख करण्याची रीत माहीत नव्हती. ते मुसलमानांचे पोषाख पाहून त्याप्रमाणें करूं लागले. त्यांचा स्वतांचा पोषाख एक लंगोटी, अंगावर एक पटकुर, डोकीला एक चुंबळी पागोटें व खांद्यावर एक घोंगडी. त्यांतून जे सभ्य होते ते मात्र पंचे नेसत असत. पायांत चेपल्या, पावसाला उबणें, कोणी कोणी ताडाची छत्री व कोणी पळसांच्या पानांचें विरलें करीत. पुढें मुसलमानांच्या पोषाखाची नक्कल उतरूं लागले. त्यांच्या पायघोळ झग्यावरून त्यांनीं आपले अंगरखे केले. त्यांचे कलाबुतीचे जोडे पाहून त्यांनीं आपल्या चेपल्या सोडून दिल्या आणि हल्लींचे शिरोळीजोडे घालूं लागले. त्यांच्या इजारींची नक्कल मांडचोळण्यांत केली आणि त्यांच्या पागोट्याप्रमाणें आपलीं पागोटीं नीटनेटकीं बांधूं लागले."

भारतकालीन आर्य लोक उत्तर हिंदुस्थानांत अतिशय थंडीच्या मुलखांत राहत असतां ते धोतरें नेसत असत, त्यावरून पाहतां दक्षिणेच्या समशीतोष्ण मुलखांतील शिष्ट लोकांनीं आजतागायत धोतरांचाच पोषाख ठेविला, व विजारी या परकीय मानल्या तर त्यांत आश्चर्य नाहीं. पेशवाईंत मोगलाईची नक्कल करण्याची रीत पडून तिचा परिणाम त्यांच्या पत्रव्यहारांतील मुसलमानी तारिखांप्रमाणें पोषाखांतहि दिसून आला. त्यांच्याच अनुकरणानें लोक विजारी घालूं लागले व अंगरख्याच्या अस्तन्या व कमरेखालचे झोळ इतके वाढले कीं, त्यांत तलम कापडाचीं ठाणेंच्या ठाणें जिरावीं! लहानशा फेट्यावजा पागोटें जाऊन तेथें शंभरसवाशें हाती पागोटें केव्हां आलें हें नक्की सांगतां येत नाहीं. पण डोकीस पागोट्याचें चाक घालण्याची रीत परवां परवांपर्यंत जिवंत होती. सन १८८०-८५ येथपर्यंत पास झालेल्या पदवीधरांचीं कॉलेजमधील सामुदायिक छायाचित्रें पाहिल्यास जे कित्येक आज 'फॅशनेबल' बनून नखशिखांत विलायती पेहराव करतात त्यांच्या डोक्यावर तेव्हां भलीं मोठीं पागोटीं घातलेलीं दिसून येतील. पुण्यांतील जुन्या पद्धतीचें शेवटचें पागोटें श्रीधर विठ्ठल दाते यांच्या डोक्यावर लोकांनीं पाहिलें असेल. या गोष्टीला अद्यापि वीस वर्षेंहि पुरीं झालीं नाहींत. वरील सर्व विवेचनाचें तात्पर्य हेंच कीं, पोषाखाची फॅशन किंवा रूढि ही

पाडावी तशी पडते. ' स यत् प्रमाणं कुरुते लोकस्तदनुवर्तते ' ही गोष्ट धार्मिक आचाराप्रमाणें पोषाखालाहि लागू आहे.

रूढि म्हणजे घटीव किंवा घोटीव संकेत व संकेत घटण्याला किंवा घोटण्याला निश्चयाचा प्रारंभ व निश्चयाची पुनरुक्ति लागते. संकेताच्या मात्रेचा पहिला वळसा उगळतांना क्षणभर कोणाचेंहि हंसेंच होणार. महात्मा गांधी हे कितीहि आदरणीय पुरुष असले तरी त्यांच्या डोक्यावर खादीची पांढरी टोपी पहिल्यांदा ज्यानें पाहिली त्याला मनांत किंवा उघडहि हंसूं आल्याशिवाय राहिलें नसेल. संकेताच्या युद्धांत जय हा निश्चयावर अवलंबून असल्यामुळें, या युद्धांत लोक जिंकणार किंवा नवीन संकेत पाडूं पाहाणारा धीट मनुष्य जिंकणार, याचा निकाल कांहीं काळपर्यंत हेलखावेच खात असतो. पण जगाचें हंसें खाऊन जिरविण्याइतका ज्याचा निश्चय तीव्र असतो त्याला नवी पद्धति पाडण्यास अडचण पडत नाहीं. पोषाखांतील नवीन रीति राजे लोक, व्यापारी उदमी, फार काय पण कुशल शिंपीहि पाडूं शकतात; मग स्वदेशी बहिष्कारासारख्या देशहिताच्या कामीं जर एखादी नवी फॅशन पडणें जरूरीचें असलें तर निश्चयी लोकांनीं ती पाडण्यांत काय कमीपणा आहे ? एकानें दुसऱ्यास हंसावें हा पोकळ डोक्यांच्या लोकांचा रिकामटेकडा धंदाच आहे; व नवीन पोषाखांच्या रूढि पडेपर्यंत तो घालणारांच्या माथीं निर्भर्त्सनेबरोबर अनेक खोट्यानाट्या हेतूंचा आरोपहि केला जाण्याचा संभव असतो. पण जे खोट्या बुद्धीनें हंसतील त्यांचेच दांत दिसतील असें म्हणून मनुष्य एकदां मोकळा झाला म्हणजे पुढें त्याला लोकांच्या हंसण्याची बाधा होऊं शकत नाहीं.

लोकांनीं खादीचे कपडे किंवा टोप्या किंवा अशाच प्रकारचे इतर नवीन पोषाख त्यांना हंसण्याचीं कारणें दोन संभवतात. एक स्वतः या पोषाखांचा विपरीतपणा व दुसरें अनुकरणबुद्धि. पैकीं पहिल्या कारणासंबंधानें असें उत्तर देतां येईल कीं खादीचे कपडे, घोंगड्या, खादीच्या पांढऱ्या अगर रंगीत टोप्या यांमध्यें थोडें नाविन्य म्हणून विपरीतत्व दिसलें तरी, हिंदी मनुष्यानें महाराष्ट्रासारख्या समशीतोष्ण प्रदेशांत बूट पाटलोण व साहेबी टोपी घालावी याइतकें तें विपरीतत्व खास नाहीं. स्वतः साहेब लोकांना हिंदी लोक हिंदी पोषाखांत पाहिलेले जसे आवडतात तसे विलायती पोषाखांत पाहिलेले आवडत नाहींत; मग हिंदी लोकांना तर ते आवडूं नयेत यांत काय आश्चर्य ? मुंबईतील हिंदी लोक

पोषाख किती गैरसोयींचा करतात हें वर दिलेंच आहे. तसेंच इतर शहरीं थंडीच्या दिवसांत संध्याकाळच्या अंधाऱ्या वेळीं देखील साहेबांची तिरकस टोपी डोक्यावर घालून हिंडणारे लोक पाहिले म्हणजे या पोषाख करणाऱ्याला सोय हा शब्द माहीत नसावा असेंच वाटतें. तीच गोष्ट ' नेकटाय ' ऊर्फ गळोटीची. आधीं कारण नसतां छाती हटकून उघडी पडेल असला कोट घालणें, आणि मग छाती उघडी पडूं नये म्हणून त्यावर गळोटी घालणें, या करणेंकऱ्याच्या वश्याला एकच उपमा साजते ती अशी कीं, साहेब लोक उन्हाळ्याकरितां म्हणून पर्वत-शिखरावर जातात, तेथें गारठा बाधूं नये म्हणून मद्यसेवन करितात, व मद्य-सेवनाची उष्णता कमी करण्याकरितां बर्फ घेतात! कित्येक फॅशनेबल लोकांना गळोटी ही इतकी अनिर्वाह होऊन बसली आहे कीं, सभ्य स्त्रीला वक्षस्थळा-वरील पदर किंचित् बाजूस सरल्यानें जितकी एक वेळ लाज वाटणार नाहीं तितकी लाज यांना गळोटी नसली तर वाटूं लागते.

अनुकरणाच्या दृष्टीनें पाहिलें तर महात्मा गांधींचें अनुकरण करून खादीची टोपी घालणें हें साहेबाचें अनुकरण करून डोक्यावर चिमणीचें धुराडें, किंवा गळ्यांत गळोटीचा फांस, घालण्यापेक्षां खचित कमी हास्यास्पद ठरेल व त्याहून मौज ही कीं, ज्या साहेबी फॅशन्सचें अनुकरण डोळे मिटून आम्ही करतों त्या खुद्द विलायतेंत भलभलत्या कारणांनींच मूळ उत्पन्न झालेल्या असून, त्यांचा व सुखसोयींचा तिकडेही मेळ बसला नाहीं, तर इकडे तो कोठून बसणार ? मिस् बॉलिन नांवाच्या एका इंग्रज व्याख्यात्रीनें युरोपिअन लोकांना खालील प्रमाणें सर्टिफिकेट दिलेलें आहे:—"In manners, custom and dress, the so-called civilised nations of Europe are in the matter of 'apishness' no further advanced than the most uncultured savage. Imitation is the great principle which governs fashion and reason, in this matter, plays but a very minor part." चालीरीति व पोषाख यांचे बाबतींत सुधारलीं म्हण-विणारीं युरोपियन राष्ट्रें रानटी लोकांसारख्याच माकडचेष्टा करितात. या बाईनें या आक्षेपाचीं उदाहरणेंहि कांहीं दिलीं आहेत. इलिझाबेथ राणी आपल्या गळ्यावरील आवाळूं झांकण्याकरितां केसाळ गळपट्टा घाली हें पाहून इंग्रज बायकाहि तसेंच करूं लागल्या; व अजूनहि गळ्याभोवतीं केसाळ कुत्र्याकोल्ह्यांचीं सबंध कातडीं

घालून इंग्रज बायका शोभा मिरवितात! आठव्या हेनरीनें गालावरील नायटे बुजविण्याकरितां मेणाच्या चकत्या लावल्या तें पाहून लोकही तेंच करूं लागले. अशाच रीतीनें उंच गळपट्टे, भारी खळ लावलेले गळपट्टे, अस्तन्यांचे कॉलर, गळोटी, उंच खोटांचे निरुंद बूट, कंबर चिरडून टाकणारे कंबरबंद, जघन फुगवून दाखविणाऱ्या स्प्रिंगच्या तारा, झगे, वगैरेंची उपपत्ति आहे (सायन्स ऑफ ड्रेस, पृ. २५८) विद्वान् इंग्रज ग्रंथकार ले हंट यानें तर इंग्रजी पोषाखाविरुद्ध तडाक्यांवर तडाके उडविले असल्याचें प्रसिद्ध आहे. इंग्रजी कोटासंबंधानें तो लिहितो–"Here is absolutely not one iota of sense, grace or economy in the modern coat. It is an article as costly as it is ugly and as ugly as it is useless. In winter it is not enough, in hot-weather it is too much." विद्यमान कोटाच्या पोषाखांत सुखसोय, समंजसपणा किंवा काटकसर हीं गतिमात्रहि नाहींत. तो जितका कुरूप तितका निरुपयोगी आणि जितका निरुपयोगी तितकाच खर्चाचा असतो. पोषाखाचे हे सर्व दुर्गुण निलायतेंतून इकडे येऊन द्विगुणित झाले असल्यास काय नवल?

वरील सर्व विवेचनाचें तात्पर्य इतकेंच कीं, हिंदुस्थानांत अनेक दृष्टींनीं पोषाखाची क्रांति होण्याची आतां वेळ आली आहे; व ती होतांना सुख, सोय, खर्च, स्वदेशाभिमान वगैरे हेतूंकडे लोकांनीं नजर पुरविल्यास तें योग्यच होईल. हे सर्व हेतू संभाळून त्यांतल्या त्यांत प्रांतिक राष्ट्रभावनाहि कोणास संभाळतां आली तर इष्टच आहे. पण ती संभाळतां येत नसल्यास राष्ट्रीय पोषाखाच्या संशोधनांत क्वचित् स्वत्व गमाविलें तरीही मोठीशी फिकीर नाहीं. बहुमताच्या बळावर पोषाखाचा निर्णय करण्याची वेळ आली तर सर्व हिंदुस्थानांत टोपीचा नंबर पहिला, फेटा व रुमाल यांचा दुसरा, उघड्या डोक्याचा तिसरा व पगडीचा चवथा नंबर लागेल. नर्मदेच्या उत्तरेस बहुतेक टोपीचाच प्रसार आहे; मग ही टोपी विलायती किंवा हंगेरियन घालण्यापेक्षां बिचाऱ्या खादीची घातली तर स्वदेशीला किती तरी उत्तेजन मिळेल! व एकाच संकेतांत सर्व गुंतले गेल्यामुळें कोणी कोणास हंसण्याचेंहि कारण नाहीं. पोषाखाची फॅशन बदलावयाची म्हणजे उगाच मुद्दाम गबाळपणा करावयाचा किंवा लकतरें वागवावयाचीं असा मात्र अर्थ नव्हे. स्वदेशी कपडा पोषाखाला वापरला तरी त्यांतहि स्वच्छता व साधे-

पणा हीं जीं सभ्यतेचीं मुख्य दोन अंगें तीं असलींच पाहिजेत. पण एकदां स्वदेशीच्या दृष्टीनें आपण पोषाखाकडे पाहूं लागलों म्हणजे पोषाखाचा आकार, वजन माप, किंमत, कपड्याची जात व वाण वगैरे बाबतींत इष्ट अशीच क्रांति घडून येईल यांत शंका नाहीं. ही क्रांति घडवून आणण्याची मुख्य जबाबदारी सुशिक्षित लोकांवर येऊन पडते, म्हणून स्वदेशीच्या चर्चेंत उगीच फुगविलेली व्यापक दृष्टि, अर्थशास्त्राचें अवडंबर, व आंकड्यांचें गौडबंगाल न रचतां त्यांनीं स्वतः तावडतोब सक्रिय होण्यास व अशिक्षितांना वळण लावण्यास उद्युक्त झालें पाहिजे.

---

## ५९ युवराजांचें पुण्यास आगमन !

( ता. २७ सप्टेंबर सन १९२१ )

युवराजांची स्वारी इकडे येण्याचें निश्चित झालें असून पुण्यामुंबईचा कार्यक्रमहि प्रसिद्ध झाला आहे. युद्धांत पडलेल्या मराठा शिपयांचें स्मारक व श्रीशिवाजीमहाराजांचें स्मारक या दोन गोष्टी त्यांच्या पुण्यांतील कार्यक्रमांत मुख्य असून शिवाय शर्यतीच्या मैदानावर लष्करी खेळ 'कवाईत' वगैरे देखावे त्यांना दाखविण्यांत येणार आहेत. एवढेंच नव्हे तर 'न मिळे अशि मौज कधीं पाहाण्या नरा' असें घडवून आणण्याचा गव्हर्नरसाहेबांचा उद्देश असून बुडीत खर्चाकरितां हजारों रुपये सरकारी तिजोरींतून मंजूरही झाले आहेत. पण असहकारितावादी राष्ट्रीय सभेनें केलेल्या आज्ञेनुसार राजपुत्राच्या स्वगतावर बहिष्कार घालून दाखविण्याला हें एक जोरदार आव्हान व उत्कृष्ट संधिच असून, पुणें शहरचे नागरिक मनावर घेतील तर वरील अवतरणांतील शब्दच पण निराळ्या अर्थानें त्यांना खरे करून दाखवितां येतील. युवराजांसारखे पाहुणे, गव्हर्नरसाहेबांसारखे यजमान, सरकारी तिजोरीसारखा उधळपट्टीला आधार व सरकारच्या मर्जीखातर वाटेल ती गम्मत करून दाखविण्यास तयार असलेले त्यांचे हस्तक असा सरंजाम सिद्ध असतां या नवलपूर्ण स्वागतसमारंभाकडे ढुंकूनहि न पाहाणारे वर्गच्या वर्ग, पेठांच्या पेठा व मोहलेच्या मोहले मिळाले तर कवीनें वर्णन केल्याप्रमाणें मनुष्याला पुनः केव्हांहि पाहण्यास न सांपडणारी अशी तीहि एक मौजच कां म्हणूं नये ! दृश्य डोळ्यांसमोर सजविलें गेलें असतां तें पाहणें

ही जशी मौज तशी न पाहावयास जाणारे लोक पहाणें हीहि मौजच आहे. नागरिकांनीं बहिष्कार घातला तरी युवराजांभोंवतीं गर्दी झाल्याचें भासविण्यास स्वतः सरकारच्या नोकरांचें व हस्तकांचें सैन्य कांहीं थोडें नाहीं. पुण्यास होणाऱ्या या एका दिवसाच्या समारंभानिमित्त ठिकठिकाणांहून तीनचार हजार लष्करी शिपाई व अधिकारी आणविण्यांत येणार आहेत. आपली हौस भागविणारे आहूत किंवा अनाहूत असे राजेरजवाडेहि बरेच येतील व आपल्याबरोबर आग-गाडीचे डबे भरभरून परिवारहि आणतील हें सर्व खरें. परंतु ज्या शहरांत राजपुत्राचें आगमन होणार तेथें खास स्थानिक जनतेनें त्यांचें स्वागत कोणत्या रीतीनें केलें हीच मुद्याची गोष्ट असून, बाहेरून येणाऱ्या उपरी लोकांनीं गर्दी करून गांवांत उभें राहाण्याला जागाहि न मिळूं दिली तरी त्याला 'पुण्याचा स्वागतसमारंभ' असें नांव देतां येणार नाहीं हें लक्षांत ठेवावें.

पुण्यास युवराजांच्या स्वागतसमारंभानिमित्त लष्करी खेळ वगैरे होतील, तो एक प्रसंग हिंदी सैनिकांच्या एक प्रकारच्या सत्काराचाच आहे असें भासवितां येणें सहाजिक आहे. तसेंच जे मराठे वीर महायुद्धांत मृत्यु पावले त्यांचें स्मारक सुद्धां युवराजांच्या हस्तें खुलें करणें म्हणजे त्यांचा एक प्रकारचा मोठाच सन्मान होय हीहि गोष्ट कांहीं खोटी नाहीं. परंतु या देशी वीरांच्या असा हा लटुपुटीचा सन्मान करणें ही राजकारणाच्या दृष्टीनें तरी त्यांची व महाराष्ट्राचीहि फसवणूकच होय असें आम्ही स्पष्ट म्हणतों. मराठे सैनिकांनीं युद्धांत मर्दुमकी गाजवून धारातीर्थी देह ठेविले हें जर खरें, तर त्यांचा सन्मान त्यांच्या नांवानें एखादा जयस्तंभ उभारून करण्यापेक्षां सरकारी नोकरींत असलेल्या मराठे वीरांचा लष्करी दर्जा वाढविण्यानेंच त्यांचा सन्मान अधिक होईल. आज एक जिवंत मराठा सैनिक पक्का कॅप्टन किंवा कर्नल केल्यानें मराठा वीरांचें मुख जसें उज्ज्वल होईल तसें या दगडी जयस्तंभावर सूर्यकिरण वर्षानुवर्षें पडल्यानें होणार नाहीं. शौर्य, वीर्य, हुकमत, हिकमत व अनुभव यांपैकीं कोणत्याहि दृष्टीनें पाहतां, मराठा शिपायांच्या पलटणीवर अधिकार गाजविणाऱ्या व हजारों रुपये पगार खाणाऱ्या गोऱ्या अधिकाऱ्यांच्या तांड्यांतील कोणत्याहि व्यक्तीच्या बरोबरीचे गुण अंगीं असणारे मराठे सुभेदार–मेजर किंवा रिसालदार–मेजर आज मिळणार नाहींत अशीहि स्थिति नाहीं. असें असतां श्रेष्ठांतला श्रेष्ठ मराठा वीर केवळ हुकमतीच्या जोरावर कनिष्ठांतल्या कनिष्ठ गोऱ्या सैनिकाच्या मताखालीं डांबून टाकणारी स्वार्थी

हिकमत न ओळखील तो मनुष्य नसून पशुच होय. युद्धांत पडलेले मराठे वीर पगारी नोकर म्हणून हुकमाचे बंदे होते व लढाईंतील चाकरी बजावणें हें त्यांचें कर्तव्य होतें, असेंच म्हणून भागवावयाचें असेल तरी सहज भागण्याजोगें आहे; मग त्याकरितां दगडी जयस्तंभ उभारण्याचा खर्चहि करण्याचें कारण नाहीं. पण खरी कृतज्ञता किंवा क्षात्रतेजाविषयीं आदरबुद्धि या दृष्टीनें जर मृत सैनिकांचें स्मारक व्हावयाचें असेल तर मराठे वीरांचा लष्करी दर्जा न वाढवितां असा हा दगडी पुतळा उभारणें ही महाराष्ट्राची निवळ फसवणूक आहे; व तिची स्वतः सरकारला जरी लाज वाटली नाहीं तरी महाराष्ट्राला तरी लाज वाटली पाहिजे असें आम्ही पुनः स्पष्ट म्हणतों.

पुणें येथें युवराजांच्या हस्तें 'श्रीछत्रपति शिवाजी महाराजां'च्या स्मारकाचा पाया घालण्यांत येणार हें अर्थात् योग्य आहे. उभयपक्षीं ही बहुमानाची गोष्ट होय. युवराज या प्रसंगीं न येतां ते मागेंपुढें केव्हां येते तर अशा प्रसंगास हजर राहण्याला पुण्याच्या नागरिकांना फार आनंद झाला असता. ज्याला इंग्रज इतिहासकारांनीं पूर्वीं 'सह्याद्रीच्या बिळांतला उंदीर' किंवा 'घाटखिंडींतील दरोडेखोर' असें नांव दिलें, व ज्याचें नांव उच्चारल्यानें नोकरशाहीच्या कपाळास पूर्वीं तिडीक उठे, त्याच्या स्मारकाचा पाया विद्यमान साम्राज्यापैकीं सर्वांत बलिष्ठ व वैभवशाली अशा साम्राज्याच्या युवराजानें बसवावा हा कालाबरोबर कलाटणी खाणाऱ्या दैवाचा चमत्कार होय. पण युवराज हिंदुस्थानाला येणार ते शिवाजीमहाराजांच्या कार्याकरितांच मुख्यतः येत नसून त्यांच्या आगमनाचा हेतु सर्वस्वीं वेगळा आहे. त्यांना साम्राज्य सुदृढ होण्याकरितां हिंदुस्थानांतील ब्रिटिश राजसत्तेला आपल्या साहचर्यानें जेवढा अधिक फायदा मिळेल तेवढा मिळवून द्यावयाचा आहे. आणि ही गोष्ट तर आतां हिंदी लोकांना सर्वथा अप्रिय अशी होऊन राहिली आहे. यामुळें शिवाजीमहाराजांच्या नांवाचा संबंध युवराजांच्या स्वागतसमारंभांत ओढून ताणून आणण्याचा कितीहि प्रयत्न सरकारनें केला तरी तो सिद्धीस जाणें शक्य नाहीं. लोक आतां तितके शहाणे झाले आहेत. ते म्हणतात, शिवाजीमहाराजांचें स्मारक आम्हांला सर्वस्वीं प्रिय अशा प्रकारचें व्हावयाचें असेल तर तें आमचें आम्हीच करूं. त्यांत आम्हांला युवराज कशाला हवेत ! इंग्रजांच्या हातून आम्हांला शिवाजीच्या स्मारकाच्या पायाचा 'दगड' नको तर खुद्द स्वराज्यच हवें. तें देतां येत असेल तर

युवराजानें द्यावें; नाहीं तर तूर्त हिंदुस्थानांत पाऊलहि घालूं नये. हल्लींच्या राज्यपद्धतींत एखाद्या युवराजानेंहि हिंदुस्थानचें हित करण्याचें मनांत आणलें तरी हातानें प्रत्यक्ष त्यास किती साधून देतां येईल हें आम्हांस माहीत आहे. मग न पावणाऱ्या देवाला कोण भजणार ? तसेंच राष्ट्रीय पक्षानें केला म्हणून शिवाजी उत्सव जर अधिकाऱ्यांना वर्ज्यसा वाटतो तर अधिकाऱ्यांनीं केलेला म्हणून युवराजांचा उत्सवहि आम्हांस त्याज्य कां वाटूं नये ? खरोखर आमच्या प्रेमाचे, आमचें हित पाहणारे व आमच्यांत मोकळेपणानें मिसळणारे असे एखादे युवराज असते तर आम्हीं त्यांचें स्वागत केलें असतें. पण केवळ आपल्या पटावर आपला डाव जिंकण्याकरितां अधिकारी वर्ग हिंदी लोकांना नाचवूं पहात आहे हें जर आम्हांला माहीत आहे, तर आम्हीं तरी कां नाचावें ? युवराज हे आपल्या परीनें उच्च घराण्यांतले एक सुशील तरुण सद्गृहस्थ आहेत, तेव्हां त्यांनीं येऊन हिंदुस्थान खुशाल पाहून जावें. राज्य त्यांचें आहे. पण त्यांचा हौसेनें सत्कार करण्यासारखी राजकीय मनःस्थिति दैवानें आमची आज ठेविली नाहीं त्याला आम्हीं तरी काय करावें ?

---

## ६० हे राजपुत्र हिंदुस्थानांत कशाला आले ?

(केसरी, जानुवारी १९२२)

वरील प्रश्नाचें उत्तर एकटें एकच नसलें तरी जीं अनेक शक्य आहेत त्यांतील बहुतेक उत्तरें पूर्वीं कोणीना कोणी तरी देऊन टाकलीं आहेत असा आमचा समज होता. परंतु तो खोटा ठरूं पाहात आहे. कारण राजपुत्र हिंदुस्थानांत येण्याचा जो एक हेतु ‘न्यूयॉर्क अमेरिकन’ नांवाच्या एका पत्रांत प्रसिद्ध केला गेला आहे तो आम्हांस तर सुचलाच नाहीं, पण इतरहि कोणाला सुचला असता किंवा नाहीं याची शंकाच वाटते. वरील पत्राचा २७ नोव्हेंबरचा अंक केसरीचे एक हितचिंतक व कोलंबिया युनिव्हर्सिटींत शिक्षण घेत असलेले एक सद्गृहस्थ यांनीं आमचेकडे पाठविला आहे. त्यावरून पाहतां राजपुत्राच्या आगमनाविषयींचे सर्व जुने तर्क लटपटून जाऊन या राजकारणावर अतर्कित असा नवाच प्रकाश पडत आहे. मात्र हा प्रकाश उलट्या काळजांतून निघून रंगीबेरंगी कांचेंतून आलेला असल्यामुळें भ्रामक आहे हें

निराळें सांगावयास नकोच. 'आधींच मर्कट तशांतहि मद्य प्याला' या न्यायानें आधींच अमेरिकेंतील एक फाजील वर्तमानपत्र व त्यांत पत्र लिहिणारा विलायतेंतील एक गप्पाड्या बातमीदार अशांचा मेळ पडल्यावर असत्याचा हिमालय रचण्यास फारसा उशीर लागणार नाहीं हें उघड आहे.

असो. इंग्लंडांतील बिनहाडाच्या जिभेचे लोक काय बोलतात व अमेरिकेंतील भोळे लोक कशावर विश्वास ठेवतात हें लक्षांत चावें, आणि हिंदुस्थानानें परराष्ट्रांतहि सावधानता कां राखिली पाहिजे हें वाचकांस कळावें; म्हणून या मासलेवाईक पत्रांतील थोडसा सारांश खालीं देत आहों.

लंडनहून ता. ९ नोव्हेंबर रोजीं लिहिलेल्या बातमीपत्रांत 'न्यूयॉर्क अमेरिकन' चा बातमीदार लिहतो—

"राजपुत्र विलायतेहून हिंदुस्थानास जाण्याकरितां निघाला तेव्हां बरीच रडारड झाली. राणी मेरीच्या डोळ्यांतून सहसा टिपूस निघावयाचें नाहीं, पण तीहि पदराआड तोंड करून रडली. राजपुत्राची बहीण तर त्याचा हात धरून हुंदके दे-देऊन रडत होती. पुरुषांना रडणें शोभत नाहीं म्हणूनच, नाहीं तर खुद्द राजेसाहेबहि अश्रु ढाळण्याच्या बेतांत आले होते. अर्थात् राजघराण्यांतील इतर सर्व लोकहि खालीं माना घालून डोळ्यांना हातरुमाल लावलासें दाखवीत होते हें लिहावयास नको."

होय. सर्व खरें. पण हें दुःख कशाकरितां? याचें उत्तर ऐका—"हिंदुस्थानाला राजपुत्र जावयाचा तो सुखाच्या व चैनीच्या सफरीकरितां. बरें, हिंदुस्थानांत वातावरण बिघडलें असलें तरी त्यानें राजपुत्राला धक्का काय लागणार? रक्षण करण्याला सैन्यसल्लागार वगैरे आहेतच. पण हा दुःखाश्रुपात होण्याचें कारण जरा नाजुकच होतें. कित्येकांनीं राजाराणीला असा सल्ला दिलेला होता कीं, राजपुत्र जर एकाद्या श्यामवर्ण हिंदी राजकुमारिकेशीं विवाह करून येईल तर साम्राज्यविषयक धोरण यशस्वी होऊन बहार उडेल! अशा तरुण राजपुत्राहून अधिक उमदा व कुशल वकील साम्राज्याला कसा लाभणार? खरोखर एखाद्या हिंदी राजकुमारिकेच मन राजपुत्र वेधून घेऊं शकेल तर मग उभ्या जन्मांत त्याला साम्राज्याची दुसरी कांहीं सेवा करण्याचें कारणच उरणार नाहीं! तीस कोटि हिंदी लोक ही विलायती व्यापाऱ्यांची एक कामधेनूच आहे. पण दुर्दैवानें या टोंकापासून त्या टोंकापर्यंत

हिंदुस्थानांत आज बंडाचा झेंडा उभारण्यांत आला आहे ! गांधी नांवाच्या एका माथेफिरूनें कायदेभंगाची चळवळ आरंभिली आहे ! सरकाराला कर देऊं नका म्हणून तो लोकांना सांगत आहे ! बंगाल्यांत बहिष्कार फारच कडकला आहे ! सरकारनें इतर हरप्रयत्न केले तरी लोकांचें समाधान होईलसें दिसत नाहीं. युद्धानें बाजारभाव कडकले आणि युद्ध तर दुसऱ्याकरतांच झालें आणि आपला तोटा मात्र फुकट झाला असें हिंदी लोकांना वाटतें. एक नामांकित ज्यू व्हाइसरॉय म्हणून पाठविला; वाटलें कीं, इंग्रजापेक्षां ज्यू लोकांना हिंदी लोकांचें मनोगत अधिक चांगलें कळेल. लोकांना मोठमोठ्या जागा दिल्या, कमिशनें पाठविलीं, पण सर्व फुकट; कां तर हिंदी लोकांना परकी राजे नकोत. त्यांना स्वकीयांनीं तुडविलें तरी चालतें. आतां यांतून तोड काय काढावी ? तेव्हां कांहीं कल्पक इंग्रजांनीं सुपीक मेंदूंतून अशी युक्ति काढली कीं, हिंदुस्थानच्या सिंहासनावर कोणी तरी हिंदी राजपुत्र बसवावा. पण यानें हिंदुस्थान साम्राज्यांतून फुटून वेगळें निघालें तर ? तेव्हां त्याला जोडयुक्ति अशी कीं, इंग्लंडच्या राजपुत्राला हिंदु नवरी करून द्यावी ! तीच पुढें हिंदुस्थानची बादशाहीण व विलायतची राणी होईल ! मग हिंदुस्थानचा अभिमान व त्याजबरोबर राजनिष्ठा वाढूं लागेल ! आणि ही सर्व खाशी युक्ति घडवून आणण्याच्या मुळाशीं स्वतः लॉर्ड रेडिंग हे आहेत !

"राजपुत्राचें हिंदी राजकन्येशीं लग्न झालें म्हणजे सर्व बंडखोरी नाहींशी होणार आहे. देशी संस्थानांतील प्रजेला सुराज्यलाभ नसला तरी खालसा प्रजेपेक्षां ती अधिक संतुष्ट असते. वरील प्रकारच्या लग्नानें खालसा प्रजेला आपण एखाद्या संस्थानिकाच्या अमलाखालीं आहोंत असें वाटूं लागेल ! तर एकाद्या हिंदी राजकन्येशीं लग्न करून साम्राज्याची ही सेवा राजपुत्रानें कां करूं नये ? स्वतः इंग्लंडच्या राजाला खुद्द इंग्लंडांत कांहींच काम नसतें. तो एकाद्या बाहुलीसारखा परतंत्र असतो. त्याच्या खऱ्या उद्योगाची व पराक्रमाची जागा म्हटली म्हणजे साम्राज्यांतील दूरदूरचे भाग होत. राजेसाहेब आतां वृद्ध झाल्यामुळें लग्नाच्या द्वारें साम्राज्यसेवा करणें त्यांच्या लागीं नाहीं, पण राजपुत्र तरुण व हौशी आहेत, आणि वरील प्रकारचें लग्न केल्यानें त्यांना मोठें नांव मिळणार आहे ! बरें, इंग्रज वरानें हिंदी वधूशीं लग्न करण्यांत फारसें वावगें कांहीं नाहीं. कारण हे दोनहि लोक आर्यवंशीच आहेत व हिंदी कुमारिका सुंदर असतात हें आंग्ल समाजांत मान्य केलें जातें.

" यांतल्या यांत दुसरी एक सोय अशी आहे कीं, हिंदी राजघराण्यांत जनाने इतके मोठे असतात कीं, एखाद्या राजाला मुली किती असतात याचा पत्ताच नसतो. अर्थात् वधूपरीक्षेला क्षेत्र विस्तृत मिळेल. ××× महाराजांच्या घराण्यांतील मुलगी मिळविण्याविषयीं त्यांतल्या त्यांत गुप्त सल्ला देण्यांत आला आहे. तेथेंच बहुतेक राजपुत्राचें काम फत्ते होईल व साम्राज्यविषयक फार मोठें धोरण साधेल. इकडे हे ××× महाराजहि मनांतून इंग्रजांचा द्वेष करितात. तेव्हां असला राजा व त्याची शूर प्रजा ही आपलीशी झाली तर केवढा फायदा ! या महाराजांच्या एका मुलीचें लग्न दुसऱ्या एका संस्थानिकाशीं पूर्वींच झालें आहे. महाराज इतके श्रीमान् आहेत कीं, खुद्द त्यांचा खासगी खर्च सालिना सात कोटि रुपये आहे ! त्यांच्या एका मुलीच्या लग्नाला पाऊण कोटि रुपये खर्च आला व शिवाय आंदणादाखल कमींत कमी पंधरा मोठे खटारे भरून जवाहिर देण्यांत आलें. शिकारखाना शेंकडों मैल लांब व शेंकडों मैल रुंद आहे. त्यांच्या संग्रहीं काय काय आहे यांची यादच देणें कठीण !

" हिंदुस्थानच्या ईशान्य टोंकाकडे सिकिमच्या राजालाहि बदामी डोळ्याच्या मंगोलियन कुमारिका पुष्कळ आहेत, पण त्यांतील नवरी राजपुत्राला बहुधा आवडणार नाहीं. "

' न्यूयॉर्क अमेरिकन ' च्या लंडनच्या बातमीदारानें रचलेला हा असत्याचा हिमालय पाहून कोणाची छाती दडपून जाणार नाहीं ? खरोखर राजपुत्र हिंदुस्थानांत नवरी शोधावयाला आले ही बातमी अजब खरी. त्यांना हिंदी जनतेकडून मानपत्राचें एक चिटोरेंहि का न मिळेना, पण ते हिंदी नवरी मिळवून त्या सर्वांचा वचपा काढणार; आणि आपल्या आगमनाच्या वेळीं हिंदुस्थानभर पडलेले हरताळ हिंदी राजकन्येशीं होणाऱ्या विवाहाच्या हळदीनें झांकून टाकणार ! पण काय ! दुर्दैव बेट्या या बातमीदाराचें व त्याच्याबरोबर राजपुत्राचेंहि. ज्या राजघराण्यावर या बातमीदाराचा डोळा दिसतो त्या घराण्यांत लग्नाची मुलगीच नाहीं, एवढाच काय तो सर्वांच्या मुळाशीं दोष आहे.

पण कदाचित् या बातमीदारानें उलटी बातमी ऐकून घोटाळा केला नसेल कशावरून ? सहा कोटि रुपयांची खासगी तैनात असणारे धनिक राजे म्हणजे इंग्लंडच्या राजापेक्षां सहापट श्रीमंत असे राजे हिंदुस्थानांत आहेत त्याअर्थी गरिबाची मुलगी श्रीमंताच्या घरीं पडावी या न्यायानें, विलायतेच्या राजघराण्यांतली

एखादी मुलगी एखाद्या हिंदी राजपुत्राला देण्याचा विचार असून ही सोयरीक जमविण्याकरितांच राजपुत्राला इकडे पाठविलें असेल असें कां म्हणूं नये ? व्हाइसरॉय देखील ओरओरडून सांगत असतात कीं, राजपुत्राचा इकडे येण्याचा हेतु राजकीय नाहीं, ही गोष्टहि वरील अनुमानाला पोषकच आहे. वधूपरीक्षेऐवजीं वरपरीक्षा इतकाच फरक ! पुष्कळ हिंदी लोक यापूर्वीं इंग्रज मुली आपल्या बायका करून घेऊन हिंदुस्थानाला आले आहेत त्याअर्थीं आम्हीं सुचविल्याप्रमाणें हा विवाह होणें यांत कांहीं विशेष नवीनवाळ नाहीं. पण इंग्लंडचा व हिंदुस्थानचा संबंध राहावा अशी इंग्लंडची इच्छा असेल तर असला हा ‘ शरीरसंबंध ’ उपयोगी पडणार नाहीं. तर त्याला स्वराज्यदानच हवें !

---

# ६१ पुणें शहरांतील म्यु. निवडणुकी

( केसरी, मार्च १९२२ )

गेल्या तारीख १८ रोजीं पुणें म्युनिसिपालिटीच्या निवडणुकी झाल्या. पुणें शहरांत अशा निवडणुकींची ही तेरावी खेप असेल. अगदीं पहिल्या निवडणुकी १८८३ च्या मार्च महिन्याच्या १९ व्या तारखेस म्हणजे ३९ वर्षांपूर्वीं झाल्या. निवडणुकी त्रैवार्षिक असल्या तरी कारणपरत्वें तीन वर्षांचीं साडेतीन वर्षें होऊं शकतात, असे प्रकार आजवर पांचचार वेळां तरी झाले आहेत. यामुळें तेरात्रिकें एकोणचाळीस असा हिशेब न करतां, बारात्रिकें छत्तीस अधिक तीन असाच हिशेब करणें अधिक बरोबर होईल.

निवडणुकीचा हक्क हा आज जर इतका महत्त्वाचा वाटतो तर मूळ मिळाला तेव्हां तो किती महत्त्वाचा वाटला असेल याची कल्पना सहज करितां येईल. ता. १३ मार्च १८८३ चा ‘केसरी’ लिहितो, “पुणें शहरचे संबंधानें ता. १९ मार्च १८८३ हा दिवस विलक्षण आनंदाचा असल्यामुळें त्या दिवशीं सर्व सरकारी व सावकारी हपिसें, शाळा वगैरे कामकाजाचीं ठिकाणें बंद ठेवून सर्वांस सुटी मिळावी अशी बऱ्याच लोकांची इच्छा आहे.” कलकत्त्यास पहिली नमुन्याखातर निवडणूक झाली तेव्हां लॉर्ड रिपन यांनीं सुटी दिली होती. म्यु. निवडणुकीकरितां “बँक हॉलिडे.” केवढा हा मान !

पुण्याच्या पहिल्या निवडणुकींत बारा जागा ठेवण्यांत आल्या असून त्या आठ

वार्डांत वांटून दिल्या होत्या. पैकीं शनवार, बुधवार व रास्ते पेठ यांचे एकेरी वार्ड असून बाकी सर्व पेठा कोणा वार्डांत मोठ्या दोन दोन, कोणांत लहान पांच पांच, अशा विभागल्या होत्या. त्या वेळच्या व आतांच्या वार्डांच्या चतुःसीमा एकच नसल्यामुळें तंतोतंत तुलना होऊं शकत नाहीं. पण थोडीशी तुलनात्मक कल्पना देतां येईल. शनवार वार्डांत तेव्हां ३७७ मतदार व निवडणुकीकरितां एक जागा होती. तेथेंच यंदा मतदारांची संख्या १४०३ इतकी वाढली असून निवडणुकीच्या जागा चार ठेवण्यांत आल्या आहेत. १८८३ सालीं या वार्डांत एकंदर ३७७ मतें होतीं तर यंदा त्याच वार्डांत निवडून आलेल्या सर्वांत शेवटच्या उमेदवारास ४३७ इतकीं मतें पडलीं आहेत. १८८३ सालीं बुधवारांत एकंदर ३५१ मतदार होते. यंदा त्याच वार्डांतील शेवटच्या उमेदवारास ३१६ मतें पडलीं आहेत.

वरीलप्रमाणें फरक पडण्याचें एक कारण असें कीं, पूर्वी पांच रुपये म्युनिसिपल कर देणाराला मतदारीचा अधिकार होता; हल्लीं तो तीन रुपये कर देणाराला आहे. शिवाय प्रत्यक्ष कर न देणाऱ्या अशा तीन रुपये भाडें देणाऱ्या भाडेकऱ्यालाहि तो हक्क देण्यांत आलेला आहे. यावरून स्थानिक स्वराज्यांत मतदारांच्या वाढीच्या द्वारें लोकसत्ता दिवसेंदिवस अधिक प्रबळ होत चालली आहे हें दिसून येईल. हीच गोष्ट इतर रीतीनेंहि सिद्ध होते. १८८३ पर्यंत सरकारी अधिकाऱ्यांचें प्रस्थ म्युनिसिपालिटींत फार होतें. स्वतः कलेक्टरसाहेब प्रेसिडेंट, मग हें प्रस्थ किती असेल हें सहजच ध्यानांत येईल. पण हें कमी होत होत यंदाच्या नवीन म्युनिसिपल घटनेंत पन्नास सभासदांत फार तर तीन सरकारी नोकर इतकें तें कमी झालें आहे व यंदा कदाचित् हे तीनहि प्रत्यक्ष नेमण्यांत येणार नाहींत. सरकारनियुक्त सभासदांची संख्याहि पाऊण, निम्मी, तिजाई अशी कमी होतां होतां आतां ती पन्नासांत सात इतकी उरली आहे.

पूर्वी खुद्द कलेक्टर प्रेसिडेंट असत. या गोष्टीला उद्देशूनच कै. शंकर मोरो रानडे यांनीं म्युनिसिपालिटीवरील संगीत प्रहसनांत "नगर माउली म्युनिसिपालिटी, वंदन करितों तुला, कलेक्टर मुख्य पति तुज भला" असें वर्णन केलें होतें. तो काळ जाऊन प्रथम सरकारनियुक्त पण खाजगी गृहस्थ, त्यानंतर लोकनियुक्त पण बडा सरदार, त्यानंतर लोकनियुक्त पण बडा नामदार, त्यानंतर नामदार किंवा सरदार नसला तरी गाडी-घोडा बाळगण्याइतका श्रीमंत, त्यानंतर अगदीं मध्यम

स्थितींतील नागरिक, अशा उतरत्या भांजणीनें पुणें म्युनिसिपालिटीचे प्रेसिडेंट होत आले आहेत. पुढेंमागें कदाचित् असाहि दिवस येऊं शकेल कीं, ज्याला गांवांत घर नाहीं, रानांत शेत नाहीं, घरचा गाडीघोडा नाहीं व भाड्याच्या गाडींतहि तो फार थोड्याच प्रसंगीं बसतो, असा एखादा अगदीं निःस्वार्थी पण प्रतिष्ठित लोकप्रिय मनुष्य अध्यक्ष निवडण्यांत येईल; नाहीं कोणीं म्हणावें ?

पण पुण्याची म्युनिसिपालिटी लोकसत्तेच्या काबूंत अधिकाधिक येत चालली म्हणून तिची सांपत्तिक स्थिति खालावत चालली असें नसून मात्र तिच्या व्यवहाराचा आढावा श्रीमंतीकडे व कदाचित् उधळेपणाकडेहि झुकत चालला आहे. पुणें शहरची म्युनिसिपालटी सन १८५७ सालाचे सुमारास अस्तित्वांत आली; पण याहि पूर्वी सुमारें आठ वर्षें कमिटी नेमण्याचें काम सुरू होतें. सन १८४९ च्या नोव्हेंबर महिन्यांतील एक दाखला असा सांपडतो कीं, " पुणें शहराचे रस्ते व पाण्याचे हौद वगैरे दुरुस्त राहावे यास्तव खर्चपट्टी बसवून वीस हजार रुपये काढावे, आणि कमिटी नेमावी याविषयीं सरकारास परवानगीकरितां लिहून गेलें आहे. " अर्थात् वीस हजार रुपयांच्या उत्पन्नाच्या कल्पनेनें पुणें शहरची म्युनिसिपालिटी सुरू झाली असें दिसतें. १८८३ सालीं या कमिटीचें निवळ उत्पन्न सुमारें दोन लक्ष असून जमाखर्चाचा ढोबळ आढावा फार तर पांच लक्षांचा भरता. तेंच १९२२ सालीं पुणें कमिटीचें निवळ उत्पन्न साडेदहा लाखांवर गेलें असून देणगी, कर्ज वगैरे गोष्टी जमेस धरल्या तर आढावा एकवीस लक्षांपर्यंत जात आहे. १८८३ सालीं पुणें कमिटीला एक पैचेंहि कर्ज नव्हतें, हल्लीं तें कर्ज कित्येक लाखांवर गेलें आहे. आढावा व कर्ज यांच्या मानानें शहरांत सुखाच्या सोयी, सफाई, सुधराई या गोष्टीहि वाढल्या आहेत कीं नाहींत याचा निर्णय मात्र पुणें शहरच्या नागरिकांनींच देण्याचा आहे.

१८८३ व १९२२ या दरम्यान निवडणुकीच्या पद्धतींत किंवा इतिहासांत मात्र फारसा फरक पडला नसावा. कारण इतक्या थोड्या वेळांत मनुष्यस्वभाव बदलत नाहीं. १८८३ च्या निवडणुकीपूर्वी एका हितचिंतकानें केसरीच्या द्वारें कोणत्या प्रकारचे उमेदवार निवडले जावे याविषयीं कांहीं गमतीदार सूचना केल्या होत्या त्या अशाः—' कमिटीचा सभासद होणार तो गर्भश्रीमंत नसावा; एकदम श्रीमंत झालेलाहि नसावा; गरीब, थापडवाईक, मिंधा, किंवा शांतिसमुद्र नसावा; खाण्यापिण्याची ददात असणारा नसावा; स्वतंत्र, निर्भीड, इमानी व द्वाड असा असावा. द्वाड

हवा असल्याचें कारण सरकारचा धाक चालूं नये, शिवाय अशा उमेद्वाराकडून कांहीं अटी करून घ्याव्या' असेंहि त्यानें सुचविलें होतें. वरील गुणच पाहून तेव्हां तरी किती लोक निवडले गेले व आज तरी किती निवडले जात आहेत याविषयीं विचारांत शिरूं नये. निवडणुकीच्या वेळीं घातलेल्या अटी, दिलेल्या कबुल्या या प्रायः निवडणुकीच्या शेवटीं संपून जातात. यंदा पुण्यांत नागरिक सभेनें उमेद्वारांस प्रश्न वगैरे विचारण्याचा कांहीं उपक्रम केला होता. पण मतदारानें विचारलेल्या प्रश्नांस उमेद्वाराकडून एखादें उत्तर मिळेल, विचाऱ्या नागरिक सभेला कोण विचारणार ? कुचेष्टेशिवाय प्रतिष्ठा नाहीं !

१८८३ च्या निवडणुकींत सुमारें शेंकडा साठ मतदारांनीं मतें दिलीं, हल्लींहि हें प्रमाण जवळ जवळ तितकेंच पडेल. निवडणुकींत सर्व ब्राह्मण येतील अशी या पहिल्या निवडणुकीच्या वेळींहि भीति होती, व ते पुष्कळ येतील अशी भीति यंदाहि कांहीं लोकांना वाटत होती पण आतांसारखी ती तेव्हांहि निष्फळच ठरली. तेव्हां एकंदर बारा जागांपैकीं सात ब्राह्मणांना मिळाल्या, आज त्रेचाळिसांतील अवघ्या बारा मिळाल्या, यावरून पूर्वींपेक्षां हल्लीं स्थानिक स्वराज्यांत लक्ष घालण्याचें काम ब्राह्मणेतर लोक अधिकाधिक करूं लागले आहेत हें उघड होत असून ही आनंदाची गोष्ट होय. १८८३ सालीं निवडणुकीनंतर त्यांत झालेल्या गैरवाजवी प्रकारांबद्दल बरेंच रण माजलें होतें. असलीं रणें अलीकडील कामांत फारशीं कमी झालीं होतीं असें म्हणतां येत नाहीं. यंदा १८ तारखेस निवडणुकी बिन-बोभाट पार पडल्या. पण अजून कोर्टांत अर्ज वगैरे होतात कीं काय पहावें !

पुणें शहर म्युनिसिपालटींत लोकपक्षाचा प्रवेश अधिकाधिक होत गेल्याचें वर लिहिलेंच आहे. कमिटींतील राष्ट्रीय पक्ष शहरवासी लोकांना किती प्रिय आहे व लोकहिताच्या दृष्टीनेंच कोणतेंहि काम होण्याविषयीं या पक्षावर लोकांचा किती भरंवसा आहे, हें अलीकडील व विशेषतः यंदाच्या निवडणुकीवरून दिसून आलेंच आहे. आपल्या पक्षाचे कमिटींतील वीर नामशेष झाले असें पाहून कित्येक स्थानिक दुबळ्या मवाळ पत्रांनीं नवीन निवडून आलेल्या सभासदांचा बुद्धिभेद करण्याचा खोडसाळ प्रयत्न चालविला आहे. पण जे पूर्वीं सह्या देऊन राष्ट्रीय पक्षाचे उमेद्वार म्हणून पुढें आले ते तर या पक्षास चिकटून राहतीलच; पण इतरहि याच पक्षास मिळून मवाळ किंवा सरकार पक्षाचें मत कमिटींत औषधासहि उरणार नाहीं असें करून टाकतील अशीच आम्हांस आशा आहे.

शेवटीं राष्ट्रीय पक्षाचें कमिटींत या तीन वर्षांत धोरण काय राहील याविषयींच कच्चा अजमास सांगून हें विवेचन पुरें करूं. कमिटीचा खर्च पुष्कळ वाढला असून सरकारी खात्यांप्रमाणें कमिटीच्या खात्यांतहि काटकसर होणें अगदीं जरूर आहे. करांचे बाबतींत अजूनहि श्रीमंतांकडे झुकता कांटा असल्यामुळें तो दुरुस्त करून कराचा बोजा गरिबांवर कमी व श्रीमंतांवर अधिक पडेल अशीच व्यवस्था झाली पाहिजे. शहरांतील व्यापारी वर्ग व कमिटी यांजमध्यें गैरसमजाच्या अनेक बाबी आहेत त्या काढून टाकल्या पाहिजेत. ड्रेनेज हें चांगलें असलें तरी त्यावर खर्च बेसुमार करून तज्ज्ञांची हौस भागविलीच पाहिजे कीं काय याचाहि विचार झाला पाहिजे व सर्वांत महत्त्वाची गोष्ट ही कीं, केवळ मवाळ पक्षाच्या खुनशी व स्वार्थी विरोधानें सक्तीच्या शिक्षणाचा जो प्रश्न मागें पडला आहे तो सोळा-आणे न सुटला तरी आठदहा आणे तरी हटकून सुटेल अशी योजना ताबडतोब अमलांत आली पाहिजे. या सर्व गोष्टी राष्ट्रीय पक्षाच्या हातूनच तडीस जाण्यासारख्या आहेत. याकरितां ज्या नव्या सभासदांना राष्ट्रीय पक्षाचे उमेदवार म्हणून कांहीं कारणानें उभें राहतां आलें नसेल त्यांनींहि पुढील कामकाजांत याच पक्षास मिळावें म्हणजे वरील सर्व सुधारणा हटकून अमलांत येतील. नवीन कमिटींत ब्राह्मणेतर वर्ग पुष्कळ असल्यामुळें सक्तीचें शिक्षण, काटकसर वगैरे बाबतींत ते मनांत घेतील तीच गोष्ट सिद्धीस जाईल हें उघड आहे.

---

## ६२. मुळशी सत्याग्रह खुलासा

(केसरी, ता. २२ ऑगस्ट सन १९२४)

रा. **ज. स. करंदीकर** व **पां. म. बापट** यांस—

वि. वि. आपलें पत्र पोहोंचलें व त्यांत असलेला खुलासा वाचला. मुळशी-सत्याग्रहाची चळवळ मध्यंतरीं थांबून पुनः सुरू होणार या वेळीं मीं स्वतः कोणतें धोरण स्वीकारावें हा मजपुढें प्रश्नच होता; व मजवर या बाबतींत ज्या टीका झालेल्या कर्णोपकर्णीं ऐकूं येतात; त्या लक्षांत घेतां मीं आजपर्यंत या बाबतींत व्यर्थ मौन धरलें तें टाकून देऊन माझा खुलासा काय असेल तो जाहिर रीतीनें करणें, हाच हल्लींच्या मतभेदाची कुचंबणा टाळण्याचा एक मार्ग आहे असें मला वाटूं लागलें होतें. परंतु तुम्हांसहि हीच जरूरी कार्याच्या दृष्टीनें भासली, व तुम्हीं मजकडे तुमचा खुलासा पाठविण्याचें मनांत आणलें, याबद्दल मला बरेंच वाटलें. या वादांतील बहुतेक खरी हकीकत तुम्हांस बऱ्याच आधींपासून माहीत

आहे; तथापि तुम्हांस व बापट यांना कदाचित् माहीत नाहीं असाहि कांहीं भाग आहे. सदर चळवळीस प्रारंभ झाला त्या दिवशीं मुळशीस जाहीर सभा भरून अनेक भाषणें झालीं. या सभेंत अध्यक्ष या नात्यानें मीं सुमारें एक तासभर भाषण केलें. त्यांत मुख्यतः कॉंपेन्सेशनच्या बाबतींत सरकार किती अन्याय करतें हें आसपासचीं व इतर अनेक उदाहरणें देऊन, मीं दाखविलें होतें. मुळशींतिल मावळ्यांनीं ‘ हक्कसंरक्षक सभा ’ नांवाच्या संस्थेमार्फत पूर्वीं भरपूर कॉंपेन्सेशन मिळण्याची शिकस्त करून पाहिली होती. कलेक्टरसाहेबांकडे डेप्युटेशनें गेलीं होतीं व जमीन–मोबदल्याविषयींहि बोलणीं झालीं होतीं. या गोष्टींचा इतिहास मीं सदर संस्थेच्या कागदपत्रांत वाचला होता, व ज्या चालकांनीं मला मुळशीस बोलावून नेलें त्यांनींहि तो तोंडीं सांगितला होता; त्यावरून मनाजोगें कॉंपेन्सेशन किंवा मोबदला–जमिनी मिळण्याची एक प्रकारें निराशा वाटल्यावरूनच या चळवळीला सत्याग्रहाचें स्वरूप येत चाललें आहे, असें मला वाटलें. आदल्या वर्षीं सोलापूर येथील खुद्द माझ्याच अध्यक्षतेखालीं भरलेल्या प्रांतिक परिषदेंत, लँड ॲक्विझिशन ॲक्टासंबंधीं म्हणजे मुळशीसारख्या मोठ्या प्रमाणांत जमिनी घेण्या-संबंधानें प्रश्न निघाला असतां, जमिनी अजीबात घेऊं देऊं नयेत हा ठराव विषयनियामक कमिटींत बहुमतानें नापास झाला; व त्यानंतर भरसभेंत पास झालेल्या ठरावांत जमिनी घ्यावयाच्या तर कोणत्या अटी सरकारनें अवश्य पाळल्या पाहिजेत, याचाच फक्त निर्देश केलेला होता. मुळशी येथील सदर सभेंत मीं हा सर्व ठराव कलमवार वाचून दाखवून समजावून सांगितला व अशा मार्गानें जाण्यास सरकार तयार नसून सनदशीर मार्गाच्या तुमच्या चळवळीची सरकार हेटाळणी करील, तर तुम्हांस सत्याग्रह करण्याशिवाय अर्थात् मार्गच उरणार नाहीं, व अशा सत्याग्रहास तुम्ही मला बोलवाल तेव्हां मी येईन, असें मीं भाषणाच्या शेवटीं सांगितलें. माझें भाषण संपतांच एक गृहस्थ माझें सत्याग्रहा-संबंधाचें तेवढेंच वाक्य उचलून, तेवढेंच मावळ्यांना पुनः पुनः सांगूं लागले; तेव्हां मीं जागच्या जागींच त्यांना दाबून म्हटलें कीं, “ माझें सर्व भाषण मावळ्यांनीं समक्ष ऐकलें आहे; तुम्ही एकच वाक्य घेऊन कां सांगतां ! ” यानंतर मी यवत येथें आजारी असतांना तेच गृहस्थ मजकडे आले तेव्हां मीं त्यांस स्पष्ट सांगितलें होतें कीं, तुम्ही म्हणतां त्या तत्त्वाचा सत्याग्रह मला मान्य नाहीं व तुम्हींहि करूं नये. याउपर तो तुम्हांस पटल्यास तुम्ही तो करा; मी

फक्त त्याला विरोध करणार नाहीं, व स्वतंत्र रीतीनें मला काय मदत देतां येईल ती देईन. बारामतीस हा प्रश्न निघाला तेव्हां उघडपणें मतभेद झाला; व सर्वसाधारणरीत्या सत्याग्रहाच्या चळवळीला मदत करण्याकरितां अनुकूल असा ठराव परिषदेनें केला, तरी सत्याग्रहास प्रत्यक्ष सुरुवात करावी अगर न करावी, हें ठरविण्याकरितां मुद्दाम सल्लागार मंडळ नेमण्यांत आलें. बारामती कॉन्फरन्सचा हा सर्व ठराव तुम्हीं वाचलाच असेल म्हणून तो येथें देत नाहीं.

या ठरावान्वयें सल्लागार मंडळ सल्ला देईल तरच व तेव्हांच सत्याग्रहास सुरवात करावी असें ठरलें हें उघड दिसून येईल. रामनवमीला सत्याग्रहास सुरवात झाली त्याच्या आधीं कांहीं दिवस पुण्यास सल्लागार-मंडळाची सभा भरविली होती, तिला मावळेहि हजर होते. हा सल्ला देण्याच्या वेळीं या प्रश्नाचा विचार खाजगी रीतीनें व्हावा, मावळ्यांस आमच्या समोर आणूं नये, असें मीं सांगितलें होतें. तथापि "त्यांना तुमच्याच तोंडून प्रत्यक्ष सल्ला ऐकण्याची इच्छा आहे म्हणून त्यांना आणलें" असें सांगण्यांत आलें, त्याबरोबर त्याच क्षणीं मीं त्यांना सांगितलें कीं, 'माझाच सल्ला ऐकावयाचा तर मी सांगतों कीं, तुम्हीं सत्याग्रह करूं नये.' त्यानंतर लगेच त्याच बैठकीस सल्लागार-मंडळाची सभा झाली व तींतहि बहुमतानें असें ठरलें कीं, सत्याग्रहास तूर्त तरी सुरवात करूं नये. परंतु मी सभेंतून निघून आल्याबरोबर त्याच बैठकींत बाकींपैकीं कांहीं मंडळींनीं असें ठरविलें कीं, सल्लागार–मंडळानें सल्ला न दिला तरी आपण स्वतंत्रपणें सत्याग्रहास सुरवात करावी. अर्थात् अशा मतभेदांत जन्म पावून सुरू झालेल्या सत्याग्रहांत मीं प्रत्यक्ष जाऊन सामील होणें किंवा पुढारीपणाचा भाग घेणें हें अशक्य होतें. विशेषतः 'जान अगर जमीन' या तत्त्वावर सत्याग्रहांत मी पडणें शक्य नव्हतें, म्हणूनच मी प्रथमपासून ह्या चळवळींत पडलों नाहीं. तथापि माझ्या तत्त्वाला अनुसरून, लवादपद्धतीनें कॉंपेन्सेशन ठरविण्याचें सरकार कबूल करीपर्यंतच हा सत्याग्रह व्हावयाचा असेल तर तो करण्यास मीहि तयार आहें, असें मीं म्हटल्याचें तुम्हांस माहीत आहेच. ही माझी विचारसंगति पुढें सत्याग्रह सुरू असतांहि कायम राहिली. आर. डी. टाटा आणि लल्लूभाई सामळदास हे तडजोडीचें बोलणें करण्याकरितां पुण्यास आले, त्या वेळीं तुम्हांपैकीं करंदीकर यांनीं तडजोडीच्या कांहीं अटी लेखी दिल्या; व त्याच्याहि पूर्वीं केसरी ऑफिसमध्यें भाभा, कॅमेरॉन वगैरे मंडळी तडजोडीला आली तेव्हां त्यांस सत्याग्रहांतील प्रमुख मंडळीं-

कडून मोबदल्याच्या जमिनी भरपूर कोठें व कशा मिळतात याचा तपास करण्यास सांगण्यांत आलें. व अशा जमिनी आपण देतों असें सरकारनें जाहीर करावें असेंहि सुचविण्यांत आलें. यावरूनच कोणासहि हें स्पष्ट दिसून येईल कीं, माझी विचारसरणी सत्याग्रहमंडळाच्याहि विचारकक्षेंतून सर्वस्वीं वर्ज्य झालेली होती असें नाहीं. तथापि, मावळे आपल्या सत्याग्रहानें आपल्या जमिनी वांचविण्यास तयार असतील तर तेंहि योग्यच आहे; व या सत्याग्रहांत स्वतः कोणी सामील होणारा नसला तरी त्यानें इतर शक्य ती मदत करावी, याच हेतूनें मीं केसरीच्या द्वारें चळवळीच्या प्रसिद्धीची वगैरे मदत केली; व हें जाणून तुम्हीं त्याचा उल्लेख आपल्या पत्रांत केला, याबद्दल आपला मी आभारी आहें. 'सत्याग्रहमीमांसा व पक्षोपन्यास' या अग्रलेखांत मीं माझी विचारसरणी मुद्दाम पण सूक्ष्मपणें दर्शविली होती, तिचा कित्येकांनीं उघड निषेध मात्र केला. पण तेव्हांहि हल्लींच्या या गोष्टी मी उघड बोललों नाहीं. तथापि मी गप्प बसल्यानें गैरसमज व टीका वाढल्या, हें तुम्हांसहि आतां दिसून आलेंच आहे. तरी तुमचें पत्र व माझें हें पत्र दोनहि प्रसिद्ध झालीं असतां एकदां खुलासा केलासा होऊन, सदर खुलाशानें सत्याग्रहमंडळांतील कांहीं स्नेह्यांचा किंवा इतरांचा असलेला गैरसमज दूर होईल; म्हणून तुमच्या खुलाशाबरोबरच माझें पत्रहि प्रसिद्ध व्हावें असें मला वाटतें. कसेंहि असलें तरी मावळ्यांच्या या कार्यास पूर्वींप्रमाणेंच मला 'केसरी' पत्रद्वारें जी मदत करतां येईल ती मी करण्यास केव्हांहि तयार आहें.

आपला,

**न. चिं. केळकर**

---

## ६३. पेण येथील कुळें व जमीनदार

(ता. २३ मे सन १९२२)

### तंटा कसा तुटेल ?

पेण तालुक्यांतील जमीनदार व कुळें यांनीं आपसांतील तंटा तोडण्याकरितां आपापले पंच नेमल्याचें पूर्वीं प्रसिद्ध झालेंच आहे. यानंतर सरपंचाची निवडणूक व्हावयाची, परंतु ती अनेक कारणांनीं अद्यापि घडून आली नाहीं असें समजतें. उभय पक्षांना मान्य व खुद्द जिल्ह्यांतील रहिवासी असे गृहस्थ कुलाबा जि. काँ. क. चे अध्यक्ष रामजी लक्ष्मण घरत हेच सरपंच निवडले जातील असा अदमास दिसतो, व तसें झाल्यास ती फार आनंदाची गोष्ट आहे. तथापि ते काशी-

यात्रेहून येण्यास बराच काळ लागणार असें समजतें व पाऊसकाळ तर येऊन ठेपला; म्हणून कायमचा निकाल त्यांच्यावर सोंपून उभय पक्षांना समान अशा, म्हणजे अर्धेलीच्या, मोघम अटीवर तूर्त जमीनदारांनीं जमिनी कुळांच्या स्वाधीन कराव्या, व त्यांनींहि त्या घेऊन पूर्ववत् वहिवाटण्यास सुरुवात करावी हेंच इष्ट आहे. पक्का निकाल रामजी मास्तर यांच्या विद्यमानें पिकें कापून आणण्याच्या वेळेपर्यंत झाला तर उत्तमच; नाहीं तरी एक वर्ष अर्धेलीनें जमिनी केल्या म्हणून कोणत्याहि पक्षाचें त्यांत विशेष नुकसान होईल असें नाहीं. संपानेंच या प्रश्नाचा निकाल लावावा असें वाटत असल्यास कुळांना फिरून पुढच्या वर्षी संप करतां येईल. त्याला विशेष तयारी लागेल असें नाहीं. आमची ही सूचना संप मोडावा व जमीनदारांचें हित व्हावें अशा बुद्धीनें केलेली नाहीं; तर मेहनत–मशागत न झाल्यानें जमिनी खराब होणार असें कुळांचेंच म्हणणें आहे, व मग त्यांत पीक करण्यास कुळांनाच अधिक त्रास पडणार, याच हेतूनें ही सूचना आम्ही करीत आहों. एरवीं आज जरी जमीनदार कुळांना शरण येऊन, कुळें म्हणतील त्या अटींवर त्यांना जमीनदारांनीं जमिनीं देण्याचें ठरविलें तरी, त्यांत आम्हाला वाईट वाटण्याचें कारण नाहीं. कां कीं, या वादांत आमची सहानुभूति श्रीमान् जमिनदारांपेक्षां गरिब कुळांकडेच अधिक झुकत आहे हें आम्ही प्रांजलपणें कबूल करितों.

पेण तालुक्यांतील कुळें व जमीनदार हे आपल्या खुषीला येईल त्याप्रमाणें आपला तंटा तोडून घेवोत वा न घेवोत; उभयतांनाहि मित्रत्वाच्या नात्यानें सल्ला देणें हें त्यांचेविषयीं सहानुभूति बाळगणाऱ्या कोणाहि तिऱ्हाइताचें कर्तव्य आहे; व तेंच आम्ही आज करणार आहों. मग आमचा सल्ला उभयतांपैकीं कोणास कितीहि प्रिय किंवा अप्रिय वाटो ! प्रस्तुतच्या संपासंबंधानें चौकशी करतां त्याचीं कारणें कांहीं नित्य स्वरूपाचीं असलीं तरी कांहीं अनित्य म्हणजे आगंतुक स्वरूपाचींहि आहेत. नित्य स्वरूपाच्या कारणांत आम्ही खालील गोष्टींचा समावेश करितों—( १ ) सावकार व कुळें यांचा संबंध पूर्वापार चालत आला असून सावकारांना आपण राजाप्रमाणें, व कुळांना आपण ताबेदार प्रजेप्रमाणें आहों असें वाटत आहे, ( २ ) कांहीं सावकार खरोखरच कुळांपासून निर्दय वृत्तीनें जेवढा म्हणून भातगोटा वसूल करितां येईल तेवढा करतात व योग्य वेळीं योग्य ती सूट देत नाहींत, व तोंडी सूट दिली तर जराशी मर्जी बिघडली कीं मुदतीच्या फ़िर्यादी करून सर्व वसूल करितात, ( ३ ) सावकाराचा खंड घालून व वर्षभर

गुजारा करून विकण्यासारखें भात कुळांजवळ क्वचितच उरतें यामुळें, व खंड ऐनजिनसीं घालण्याचा असल्यामुळें, वाढत्या बाजारभावाचा फायदा कुळांस फारसा मिळत नाहीं. उलट पुरून उरण्यासारखा व विकण्यासारखा गल्ला सावकारांना बराचसा मिळत असल्यामुळें बाजारभावाचा फायदा सावकारासच मिळतो व ही गोष्ट कुळांना खपत नाहीं. कारण सावकार बसून खातात व कुळें मेहनत करून खातात.

तथापि हीं कारणें असतांहि दुसरीं कांहीं आगंतुक कारणें घडून आलीं नसतीं तर पेण तालुक्यांतील संप आजच किंवा निदान आहे त्या प्रमाणावर घडून आला नसता. याचें प्रत्यंतर हेंच कीं, हल्लींचा संप फक्त खाऱ्या जमिनीपुरताच आहे, गोड्या जमिनींना तो बहुतेक लागू नाहीं म्हटलें तरी चालेल. खाऱ्या जमिनी बऱ्याचशा मारवाडी सावकारांच्या ताब्यांत असतात. त्यांची व्यवस्था ते प्रायः आपल्या हस्तकांकडून करवितात. अशा हस्तकांपैकीं कांहींकडून आगरी लोकांशीं असभ्यपणाचें वर्तन झाल्यामुळें एकदोन मारवाडी सावकारांच्या जमिनी प्रथम टाकून देण्यांत आल्या. या संपाचें स्वरूप आगरी जातींतील एकजुटीमुळें बळावलें, व संप टिकविण्याच्या मार्गांत तो समर्थनीयहि ठरविण्याचे मुद्दे सहजच त्यांना सुचूं लागले. कांहीं सावकार कुळासंबंधानें कठोरपणाचें वर्तन करितात हें आम्हीं वर सांगितलेंच आहे. तथापि चांगलें वर्तन करणाऱ्या सावकारांनाहि या संपाचे परिणाम भोगावे लागत असून, जीं पापें त्यांजकडून घडलीं नाहींत अशांचेंहि प्रायश्चित्त माथीं बसूं पाहात आहे. उदाहरणार्थ, वसुलाबद्दल मागितली असतां पावती न देणें किंवा तोंडानें सूट देऊन हातानें फिर्याद करणें, असले प्रकार वस्तुतः फारच थोडे घडत असतां, हीं संपाचीं कारणें म्हणून दाखविण्यांत येतात तीं खरीं मानणारा तिऱ्हाइत मनुष्य मनानें कुळाकडे सहजच वळतो.

तथापि संप होऊं नये, तो झाल्यावर म्हणजे अविश्वासानें सावकार व कुळें यांच्या संबंधाची घडी विसकटल्यावर, कोणतें कारण नित्य व कोणतें आगंतुक याची फारशी चिकित्सा करीत बसण्यांत अर्थ नाहीं. चालू तंटा मोडेल कसा व तो मोडण्याकरितां कोणीं कोणास काय द्यावें घ्यावें, हाच विचार मुख्य होय. संप चालला तेव्हां आगरी कुळांनीं खरोखरच अपूर्व जूट व जोर दाखविला. तो इतका कीं, कधीं बंद न होणारें मद्यपान आपणांतून त्यांनीं हाकून दिलें व कधीं कमी न होणारे लग्नकार्यांतील खर्च त्यांनीं बरेच कमी केले. पण या गोष्टी केवळ साधन-

रूप होत, साध्यभूत नव्हत. संप चालूं असतां या दोन गोष्टींना महत्त्व असलें तरी, संप मोडण्याच्या अटींचा विचार करितांना कुळांचे हे गुण ध्यानांत न घेतां त्यांचीं खरीं गाऱ्हाणीं कोणतीं याचाच विचार करावा लागतो. पण या बाबतींत आम्हांला कष्टानें असें म्हणावें लागतें कीं, वरील दोन गुणांच्या बळावर संप टिकवून आगरी कुळांनीं स्वतःला स्तुतीस पात्र करून घेतलें असलें तरी, खरीं गाऱ्हाणीं उलगडून घेण्याच्या बाबतींत त्यांनीं जितकी विवेकबुद्धि ठेवावयास पाहिजे तितकी ठेविलेली नाहीं. संपाच्या जोरावर जर भलत्याच गोष्टीचा हट्ट त्यांनीं धरला तर तो आज सिद्धीस जाणार नाहीं; किंवा आज सिद्धीस गेला तरी तो पुढें कायम टिकणार नाहीं. उदाहरणार्थ, संप जिंकला असें समजून स्वतः कबुलायती लिहून देण्याऐवजीं उलट कुळें जमीनदाराकडूनच 'गावगोतावर' सह्या मागूं लागलीं—म्हणजे जमीनदाराकडून एक प्रकारें शरणचिट्ठी मागण्यांत आली हें सुविचाराचें चिन्ह नव्हे !

असो. आमच्या समजुतीप्रमाणें पेण येथील तडजोड खालील अटींच्या आंतबाहेर झाल्यास तिजपासून कोणत्याहि पक्षाचें अहित नसून, हा तंटा सामोपचारानें तुटण्याचा संभव आहे. पहिली गोष्ट, उभयतांमधील व्यवहारासंबंधानें अविश्वास घालवून विश्वास उत्पन्न करण्याची. याविषयीं आम्हांस असें वाटतें कीं, कुळें व सावकार यांजमधील मामुली व्यवहार मुख्यतः लेखी म्हणजे कागदोपत्रींच होत जावा; तोंडी कबुलायतीचा प्रघात असल्यास तो बंद होऊन कुळांनीं लेखी कबुलायती द्याव्या; जमिनीसंबंधीं वसुलाच्या पावत्या तर द्याव्याच द्याव्या, पण सूट वगैरे सवलती कबूल केल्या असल्यास, अगर प्रत्यक्ष दिल्या असल्यास, त्याहि वेळोवेळीं कबुलायतीवर नमूद कराव्या. जमिनीच्या किंमती उंची दिसाव्या अशाकरितां लेखी कबुलायतींत भारी मक्ता लिहून घेऊन, प्रत्यक्ष वसुलांत सूट देण्याच्या पद्धतीचा कांहीं जमीनदार अवलंब करितात; पण ही पद्धति एकंदरीनें फायदेशिर नसून तिनें अविश्वास मात्र वाढतो. जमिनीची किंमत ठरविण्याचा प्रसंग आल्यास न्यायकोर्टें कबुलायतींतील दर्शनी मक्त्याचा आधार न घेतां; प्रत्यक्ष आदा होणारा वसूलच जमेस धरितात हें प्रसिद्ध आहे. उलट हरहमेष एका हातानें मक्ता फुगवून लिहून घ्यावयाचा व दरसाल सूट देत जावयाचें असा अनागोंदी जमाखर्च करण्यांत हंशिल नाहीं; व या प्रघातामुळें जमाखर्चाच्या दोन दोन वह्या ठेवाव्या लागून सर्व हिशेब बेभरंवशिक ठरतात.

कबुलायतींचा मसुदा कसा असावा हा वादाचा एक मोठाच मुद्दा होऊन राहिला आहे. यासंबंधीं आम्हास असें वाटतें कीं, मामुली कबुलायती पाहतां त्या इतर खात्यांतील सामान्य कबलायतींहून अधिक जाचक आहेत, असें म्हणतां येत नाहीं. भाडेचिठ्ठी किंवा कबुलायत लिहून देणाराला घरवाला, जमीनदार किंवा वरिष्ठ हक्क धारण करणारा हा प्रायः कोठेंहि असेंच बांधून घेत असतो; परंतु जुना नमुना राखून हल्लीं होणाऱ्या तडजोडीनें ठरतील तीं सवलतींचीं कलमें नक्की करून त्यांतच घालतां येण्यासारखीं आहेत. उदाहरणार्थ, खंड किंवा मक्ता याचें धान्य घालाव-याचें तें जमीनदाराच्या मापानें घालण्याची शर्त काढून टाकून सरकारी छापाच्या मापानें घातला जावा अशी दुरुस्ती करणें योग्य होईल. कित्येक जमीनदार आपल्या मापाचा, तें अधिक फायदेशीर म्हणून, आग्रह धरून बसतात तें सर्वस्वीं अयोग्य आहे. वाटेल तर खंड हडसूनखडसून अधिक ठरवून घ्यावा, पण दर्शनीं खंड थोडा ठरवून मोठ्या मापामुळें तो अधिक वसूल करावयाचा हें अप्रामाणिक-पणाचें होईल.

दुसरी गोष्ट खंडाचें धान्य कोठें घालावें. याविषयीं आमच्या मतें कुळानें साव-कार म्हणेल तेथें खंड नेऊन पोंचता करावा अशी अमर्याद अट घालणें योग्य नाहीं. खळ्यापासून अमुक एका योग्य मर्यादेपर्यंतची वाहतूक कुळानें सोसावी, पण त्यापलीकडची वाहतूक जमीनदारांनीं कां सोसूं नये ? यानंतरची बाब बांध-बंदिस्तीची व लागवडीची. पैकीं जमीनदारांची अशी तक्रार दिसते कीं, कुळें अनेक ठिकाणच्या जमिनी खंडानें घेतात यामुळें कोणत्याहि ठिकाणची मशागत त्यांचे हातून चांगली होत नाहीं. पण कुळांनीं अर्धेली, म्हणजे प्राप्तींतील अर्धा वांटा, कबूल केल्यास या तक्रारींतील बीज नाहींसें होईल. पण कुळांना अर्धेली कबूल नसेल तर या तक्रारींत खरेपणा उरूं शकतो पण त्याचाहि परिहार कबुला-यतींत खंड नक्की लिहून घेऊन तो बिनसूट वसूल झाल्यास होणार आहे. बांध-बंदिस्तीच्या बाबतींत देखरेख ठेवणें हें मुख्यतः कुळांचें कर्तव्य आहे, व अमुक मर्यादेपर्यंत बांध फुटल्यास तो कुळानें आपल्या खर्चानें दुरुस्त करावा, व त्याहून मोठी खांड पडल्यास त्याच्या दुरुस्तीला लागणारा अधिक खर्च जमीनदारानें द्यावा अशी मागणी कुळांनीं केल्यास ती वावगी होणार नाहीं व ती कबुलायतींत काय-मची नमूदहि व्हावी. बोलूनचालून अकरा महिन्यांच्या कबुलायती; अशा स्थितींत तात्पुरती किंवा चालचलाऊ बंदिस्ती कुळानें करावी, पण कायम स्वरू-

पाच्या बंदिस्तीचा योग्य खर्च मालकानेंच सोसला पाहिजे. मात्र कुळानें मनुष्य-बळ वेळींच पुरविलें पाहिजे. तसेंच जमीन प्रत्यक्ष कुळाचे ताब्यांत असल्यामुळें बांधवरोळ्या, सर्व्हेचे दगड, झाडझाडोरा वगैरेचें रक्षण कुळानेंच केलें पाहिजे व या कामीं कसूर झाल्यास त्याचा दंडहि त्यानेंच सोसला पाहिजे.

या सर्वांहून महत्त्वाचा प्रश्न म्हटला म्हणजे पूर्वीच्या खंडांत आगरी कुळांना म्हणजे खाऱ्या जमिनींना सरसकट कायमची सूट किती द्यावी हा होय ! दुर्दैवानें या प्रश्नाचें उत्तर सर्व जमिनींना सारखें लागू पडणारें असें एकच देतां येत नाहीं. तथापि एवढें निश्चित म्हणतां येतें कीं, एकंदर स्थिति लक्षांत घेतां जमीनदारांनीं आपले मक्ते निदान दहाबारा टक्क्यांनीं तरी कमी करणें न्यायाचें होईल. आजवर कुळें अमुक एक खंड घालीत आलीं म्हणून त्यांत कांहीं कमी करण्याचें कारण नाहीं, हा युक्तिवाद कठोरपणाचा आहे. केवळ नाइलाज म्हणून कित्येक वेळीं कुळें कबूल केलेला खंड घालतात, पण तो त्यांना आपलें पोट बांधून घालावा लागतो. उलट तोंडीं वाटेल तो खंड कबूल करून प्रत्यक्ष आपल्याच हातानें हवी तेवढी सूट घेणारीं कुळें लाभूं शकतात हें जमीनदारहि जाणतात; व त्यावरूनहि खंड कमी म्हणजे न्याय्य ठरवून मग तो मात्र सक्तीनेंहि वसूल केला तर त्यांस कोणी नांवें ठेवणार नाहीं, हेंच दिसून येतें. हल्लीं कुळांची मागणी अशी दिसते कीं, खाऱ्यांपैकीं वाईट जमिनीला एकरीं नऊ मण व चांगल्या जमिनीला दहा मण असा खंड ठरविला जावा. एकरीं भाताचें उत्पन्न सरसकट एक खंडी धरलें तर दहा मण म्हणजे अर्धेलीच झाली व नऊ मण म्हटले म्हणजे त्यांतहि एक मण कमीच झाला. यावर जमीनदारांचें म्हणणें कीं, कुळानें अधिक व आम्ही कमी हिस्सा घेतला तर आम्ही वरिष्ठ हक्क धारण करणारे ते कसले ! पण आमच्या मतें या युक्तिवादांत अर्थ नाहीं. वरिष्ठ हक्क धारण करणारा झाला म्हणून तो जर निव्वळ जमिनीपेक्षां अधिक भांडवल शेतकींत न घालील व घरबसल्या फायदा घेऊं म्हणेल तर त्याचा हिस्सा, मजुरी व अंगमेहनत करून जमीन कसणारापेक्षां मुठभर कमी झाला तर; त्यांत आपल्या वरिष्ठ हक्काचा घात झाला असें जमीनदारांनीं मानण्याचें कारण नाहीं. वरील नऊ व दहा मण हें प्रमाण योग्य किंवा अयोग्य हें नियोजित सरपंच श्री. घरत यांसारखे अनुभविक तज्ज्ञ लोकच ठरवूं शकतील. तथापि थोडेसें नुकसान सोसावयाचें झालें तर तें कुळांपेक्षां जमीनदारांनीं सोसणें योग्य, म्हणून कुळांच्या मागणीप्रमाणें नऊ व दहा मण असा खंड ठरला तरीहि

आम्हांस वाईट वाटणार नाहीं. मात्र ही कमालीची सूट मागतांना एकदां ती मिळाल्यावर इतर कोणतीहि सवलत मागण्याचा हक्क आपणास राहणार नाहीं हें कुळांनीं नीट ध्यानांत धरावें ! उदाहरणार्थ, त्यांना अशी सूट कायमची मिळाल्यास मग फिरून अवर्षण वगैरेंनीं पीक कमी आल्यास त्यांनीं जादा सूट हक्कानें मागणें अन्यायाचें होईल

हें स्पष्ट व जोरानें सांगण्याचें कारण असें कीं, संपवाल्या कुळांनीं कबुलायतीचा जो एक नवीन मसुदा तयार केला आहे त्यांत, कायमच्या पंचायतपद्धतीचें एक शुक्लकाष्ठ जमीनदारांच्या मागें लावून दिलें आहे. खंड भरपूर कबूल केल्यावर मग, आकस्मिक कारणानें सूट मागण्याचा प्रसंग आल्यास, आणि उभय पक्षांचें मतैक्य न झाल्यास एकेक पंच नेमून देऊन त्याचा निकाल दोघांनीं मान्य करावा हें ठीक आहे. पण इकडे मक्ता तर कमालमर्यादेपर्यंत कमी करून घ्यावयाचा, व तोहि जमीनदारांच्या पदरीं पुरा पडूं नये म्हणून वरतीं पंचायतीचा कायम स्वरूपाचा करार कबुलायतींत घालून, ती अजागलस्तनाप्रमाणें अंमलबजावणीस निरुपयोगी करून टाकावयाची हें सरळ बुद्धीचें लक्षण नव्हे असें आमचें स्पष्ट मत आहे. सरकार जमीनसाऱ्यांत सूट बहुधा कधींच देत नाहीं व याचें कारण असें सांगतें कीं, चांगलें पीक येतें तेव्हां सरकारास अधिक सारा कोणी देत नाहीं. तोच युक्तिवाद येथेंहि लागू पडतो असें आम्हांस वाटतें. तथापि दुष्काळाचे सालीं म्हणजे सरकार ही सूट किंवा तहकुबी देतें तेव्हां, जमीनदारांच्या मनांत नसलें तरी त्यांना थोडीबहुत सूट द्यावीच लागेल व ते देतीलहि; किंवा त्यांनीं न दिली तरी रेव्हिन्यू कोर्ट ती देण्यास भाग पाडील, निदान हप्तेबंदी करून सुटीचा वचपा काढून देईल.

इतके स्वाभाविक जामीन कुळांना असल्यानंतर फिरून कबुलायतीच्या गळ्यांत कायमच्या पंचायतीचें लोढणें बांधूं पाहणें हें निव्वळ अन्यायाचें आहे; व त्यांच्या मागणीप्रमाणें त्यांना कायमची सूट मिळून त्यापुढील मक्ता हलका झाला म्हणजे मग तरी त्यांनीं ही भानगडीची अट कबुलायतींत घालण्याचा हट्ट धरूं नये, असा आमचा त्यांना मित्रत्वाचा सल्ला आहे. त्यांनीं संपामुळें आपला फायदा करून घेण्याची पात्रता अंगीं आणली असली तरी, असा दोदोहातांनीं फायदा करून घेऊन, म्हणजे मक्त्याची जबाबदारी अनिश्चित करून कबुलायती म्हणजे निवळ अप्रामाणिक बुद्धीचा फार्स असें करणें योग्य होणार नाहीं. लहानलहान जमीन-

दार या संपामुळें हातघाईस आले असले तरी, भांडणच जुंपलें तर श्रीमान् जमीनदार अनेक वर्षें नुकसान सोसण्यास तयार आहेत; किंबहुना कोकणपट्टींत उद्यां रेलवे झाल्यास जमिनीच्या दहा वर्षांच्या वसुलाचें नुकसान जमिनीच्या ऐनजिनसी किंमती वाढल्यानें भरून येईल अशी त्यांस आशा वाटते. पण त्यामुळें कुळांचें गाऱ्हाणें मनावर घेऊंच नये हा सल्ला जसा जमीनदारांना आम्ही देणार नाहीं, तसाच इतके दिवस संप यशस्वी झाला म्हणून जमीनदारांविरुद्ध भलत्याच अटी उगवून घ्याव्या असा सल्ला आम्हाला कुळांनाहि देववणार नाहीं.

तात्पर्य, वाटेल ती सूट एकदां कायमची मागून घेऊन मग सक्तीनें मक्ता भरपूर देण्यास कुळांनीं एका सहीच्या कबुलायतीनें स्वतः बांधून घेण्यास तयार व्हावें तरी एक, किंवा वेळोवेळीं सूट मिळण्याची अपेक्षा असेल तर हल्लींच्या मागणीइतका मक्ता किमान मर्यादेवर न नेतां, गेल्या दहाबारा वर्षांतील ऐनमक्त्याची सरासरी काढून त्यांत शेंकडा दहाबाराइतकीच सूट घेऊन पूर्ववत् सर्व व्यवहार चालू करावेत. कागदोपत्रीं कोणीं कितीहि बंदिस्ती करून घेतली तरी अखेर मोहबत, भीड, मुरवत वगैरे गोष्टी निर्मूल होऊं शकत नाहींत. शेवटीं त्यांच्याच योगानें व्यवहाराचा सुरळितपणा राखला जातो. हें लक्षांत घेऊन आम्हीं वर दर्शविलेल्या तत्त्वास अनुसरून हा तंटा मिटता घ्यावा अशी पेण तालुक्यांतील जमीनदार व कुळें यांस आमची स्नेहभावाची विनंति आहे.

---

## ६४ बंडखोरीचा बाष्कळ आरोप

( केसरी ता. १६ डिसेंबर १९२४ )

या इंग्रजी राज्यांत शुभाशुभाचीं चिन्हें कांहीं जुनींच आहेत तर कांहीं नवीनहि प्रचारांत आलीं आहेत. परवां व्हाइसरॉय लॉर्ड रीडिंग हे काठेवाडांतील एका संस्थानास भेट देण्याकरितां गेले तेव्हां, आपल्या इकडील जुन्या पद्धतीप्रमाणें, डोक्यावर मंगलकलश घेणाऱ्या सुवासिनी मिरवण्यांत आल्या, हें जुनें लक्षण झालें. पण नवें लक्षण असें कीं, सरकार जेव्हां दडपशाहीच्या स्वारीवर निघतें तेव्हां कांहीं हिंदी पुरुष, नामांरताचा बुरखा तोंडावर घेऊन, अंतरंगांतले विषकुंभ अँग्लो–इंडियन वर्तमानपत्रांच्या द्वारें सडकेवर ओततात. स्वतः सरकार आमच्यांतील पुढारी लोकांना नांवें ठेवतें त्यांत कांहीं विशेष नाहीं. तें सर्व ‘ सरकारी ’ या सदराखालीं येतें, व सरकारी निंदा ही कोणाला निंदाहि

वाटत नाहीं. पण आपलेच हिंदी बांधव जेव्हां सरकारच्या अंतरंगांत शिरून त्यांच्या दृष्टीनें पाहूं लागतात व त्यांच्या भाषेनें बोलूं लागतात, तेव्हां त्या निंदेचें अर्थांतच वाईट वाटतें. आणि त्या निंदेला चह्याडखोरीची घाण येते तेव्हां तर ती खरोखरच दुःसह होते. दडपशाहीचे पुष्कळ प्रसंग असे सांगतां येतील कीं, त्यांच्या सुरवातीस अँग्लो-इंडियन पत्रांतून कांहीं प्रतिष्ठित हिंदी लोकांनीं लोकप्रिय पुढाऱ्यांची निंदा केली व ज्या गोष्टी सरकाराला कोणीं मुद्दाम सांगितल्याशिवाय सहज लक्षांत येणार नाहींत, त्या समजावूनच नव्हे तर खुलवूनहि सांगितल्या. १८९७ सालीं टिळकांवर खटला होण्यापूर्वीं 'जस्टिस' हें नांव धारण करणाऱ्या एका गृहस्थानें केसरींतील कांहीं लेखांचें भाषांतर करून त्यांतील सटीक उतारे 'टाइम्स'मध्यें प्रसिद्ध केले. हल्लीं 'हिस्टिरिकस' हें पड नांव धारण करणाऱ्या एका हिंदी गृहस्थानें 'लोकमान्य टिळकांच्या आठवणी'च्या ग्रंथांतील कांहीं उतारे असेच सटीक दिले आहेत. जस्टिस नामक गृहस्थाचे लेख हे टिळकांवरील खटल्याचें कारण नसलें तरी तें अशुभ चिन्ह खास होतें. हिस्टिरिकस यानेंहि त्याच पूर्वीच्या प्रसंगाचें स्मरण देण्यासारखी कृति केली आहे. फरक हा कीं, सरकारच्या दडपशाहीपासून स्वतः लोकमान्य आतां फार दूर गेले आहेत. तथापि अशुभ लक्षण हें घडलें असतां तें अमक्यालाच नसलें तरी कोणाला ना कोणाला तरी बाधक होतेंच. "हिस्टिरिकस" हे कोणाला बाधणार, म्हणजे ते दडपशाहीच्या कोणत्या व कोठल्या प्रकारची कृष्णपताका ठरणार, हें पाहावें !

## आरोपाचें विधान

असो; पण टिळकांच्या उल्लेखापूर्वीं इतर एकदोन गोष्टींचा परामर्ष घेणें क्रमप्राप्त झालें आहे तो घेऊन मग त्या मुद्याकडे वळूं. 'हिस्टिरिकस' या इंग्रजी शब्दाचें भाषांतर उन्मादखोर असें करतां येईल. प्रस्तुत लेखांत दिसून येणारा त्याचा उन्माद कांहीं खरा आंगचा तर कांहीं लेखकाच्या भूमिकेला स्पर्श केल्यानें अंगांत शिरलेला आहे. या गृहस्थानें 'टाईम्स ऑफ इंडिया'चा ता. ५ डिसेंबरचा व ता. १० चा अशा दोन अंकांत दोन लेख लिहून त्यांत चळवळ्या पुढाऱ्यांवर सडकून टीका केली आहे. या टीकेचा निष्कर्ष असा कीं, स्वराज्यपक्षीय काय किंवा असहकारितावादी काय, हे सर्वच पुढारी देशांतील अराजकतेला जबाबदार आहेत! व त्यांच्यामुळेंच देशांत

अत्याचार फैलावत आहेत. आम्हांला वाटतें कीं ' व्हिस्टिरिकस ' याचे हातीं पंजाबांतल्याप्रमाणें लष्करी कायदा असता तर त्यानें एकाच झाडावर एका फांदीला दास नेहरू हे ' स्वराज्यपक्षीय अराजक ' म्हणून व दुसऱ्या फांदीला महात्मा गांधी वगैरे हे ' असहकारी अराजक ' म्हणून फांशीं देऊन लटकविले असते! कारण हिस्टिरिकस म्हणतो–" मुंबई येथील ऐक्य परिषद् हा एक चाहाणा होता. ऐक्यवर्धनाच्या दृष्टीनें ती सफळ होवो वा निष्फळ होवो, तींत झालेल्या भाषणावरून एक गोष्ट मात्र उघडकीस आली ती ही कीं राज्यक्रांति व अराजकता यांच्या उद्देशानें देशांत जे गुन्हे घडत आहेत, गुप्त मंडळ्या स्थापन केल्या जात आहेत, व राजकीय खून होत आहेत, त्यांविषयीं जहाल पक्षाची वृत्ति सहानुभूतीची असते. हेतु व कृत्य या दोन गोष्टींत ते मोठे सूक्ष्म फरक काढतात व ही साल सोलण्याची त्यांची कारागिरी इतकी सफाईदार वठते कीं, या वावदूकांच्या मनांत खरोखर असतें तरी काय हेंच कळेनासें होतें ! " यानंतर टिळकांच्या आठवणींच्या ग्रंथांतील उताऱ्यांवर टीका करून व फिरून दास नेहरूंच्या ध्रुपदाला चेऊन मिळून हा उन्मादग्रस्त किंवा उन्मादखोर लेखक निराशेनें लेखणी टाकून देऊन उद्गारतो कीं, " काळ्या डोईच्या मनुष्याच्या मनांत काय आहे व काय नाहीं हें सैतानालाहि उमगणार नाहीं ! " तुमच्या मनांत काय आहे? पण आमच्या मतें, मनुष्यमात्राच्या अंतरंगांतील ठाव काढण्याचा हा ' हिस्टिरिकस' चा प्रयत्नच मुळीं असंबद्ध व मूर्खपणाचा आहे. आम्ही स्वतः ' हिस्टिरिकस ' यालाच विचारतों कीं, स्वतः त्याच्या मनांत काय आहे हें आधीं त्याचें त्याला तरी उमगलें आहे काय? कारण त्याचा सर्व लेख वाचला असतां त्यांत दास–नेहरू, टिळक–गांधी यांना नांवें ठेवण्याची खरी इच्छा किती व सरकारला खूष करण्याची खरी इच्छा किती हें सांगणें कठीण आहे. हे लेख लिहिण्यांत प्रचलित प्रश्नांच्या चर्चेला मदत करणें हा त्याचा हेतु किती आणे होता, व ' टाइम्स ' च्या उदार हस्तानें मिळणाऱ्या मोबदल्यानें प्राप्तींत भर टाकण्याचा हेतु किती आणे होता! तो नेमस्त म्हणवीत असला तरी ज्या कित्येक कृत्यांचा तो निषेध करीत आहे तीं त्याला स्वतःलाहि वरकरणीं किती अमान्य व अंतरंगांतून खरीं किती अमान्य हें त्याचा आवडता सैतानहि सांगू शकणार नाहीं. आमचें तर मत असें आहे कीं, आजच्या घटकेस कोणाहि जाणत्या सुशिक्षित मनुष्याचें मन उघडून खोलून तपासतां आलें

तर त्यांत कांहीं नित्य प्रकाराविषयीं दृढ झालेले व नैमित्तिक कारणांनीं प्रसंग विशेषीं चमकून जाणारे, प्रतिकाराचे विचार जहालपणाच्या एकाच कसोटीस उतरणारे आढळतील. उदाहरणार्थ, स्वतः 'हिस्टिरिकस' देखील तो सरकारी नोकर असल्यास त्याची जन्माची बढती अन्यायानें बुडाली असेल तर, तो दरबारी उमेदवार असल्यास त्याची मिनिस्टरशिप एखाद्या गव्हर्नराच्या रागानें गेली असेल तर, तो जमीनदार असल्यास त्याचा आवडता बंगला व जमीन लँड ॲक्विझिशन ॲक्टानें घेतली गेली असेल तर, तो बडा व्यापारी असल्यास त्याच्यावर इन्कमटॅक्सची जुलमी आकारणी झाली असेल तर, तो कधीं मिजाशीनें प्रवास करीत असल्यास त्याचें सामान एखाद्या उन्मत्त युरोपियन प्रवाशानें डब्यांतून बाहेर फेंकून दिलें असेल तर, किंवा तो एकादा गुलहौशी चंडोल असल्यास हातांत हात घालून चाललेल्या त्याच्या सुंदर सहधर्मचारिणीवर एकाद्या सोजिरानें गहिरी नजर फेंकून तिला धक्का दिला असेल तर—तात्पर्य त्याला या जगांत कांहीं प्रिय म्हणून असल्यास त्याचा कधीं कोणाकडून, विशेषतः परकीयांकडून, नाश किंवा अपमान झाला असेल तर त्याच्याहि मनांत अनेक जहाल विचार, क्षणभर कां होईना, पण कसे आले असतील याचा त्यानें आपल्या मनाशींच विचार करावा, व या कामीं वाटेल तर सर्वांत धूर्त असा जो सैतान त्याची मदत घ्यावी. म्हणजे मग त्याला कदाचित् आत्मौपम्यबुद्धीनें कळून येईल कीं, ज्या पुढाऱ्यांना स्वदेशाहून अधिक प्रिय अशी जगांत वस्तू नाहीं त्यांच्या मनांत स्वतः तो ज्या जहाल विचारांना नांवें ठेवतो तेच क्षणभर तरी कां होईना उठत असतील. हेतु व क्रिया यांतील भेद प्रथम दास व नेहरू यांच्या भाषणावर टीका करून हिस्टिरिकस असें म्हणतो कीं, राजकीय गुन्ह्यांचा विचार करतांना हेतु व कृत्य यांमध्यें भेद मानतां येत नाहीं; अर्थात् गुन्हा तो गुन्हा, मग हेतु कसाहि असो. पण ही विचारसरणी कोणत्याहि देशांतील शासनपद्धतीला मान्य झालेली नाहीं, मग शासनशास्त्राला मान्य होण्याची गोष्टच नको. आपला पीनल कोड घेतला तर तोहि क्रिया व हेतु यांमध्यें फरक मानतो, म्हणजे विशिष्ट हेतु नसेल तर क्रिया गुन्हा ठरत नाहीं व प्रत्यक्ष क्रिया घडली नसेल तर नुसता हेतु हा गुन्हा होत नाहीं. बरें नुसत्या हेतूंतहि प्रामाणिक व अप्रामाणिक असा भेद कायद्यानें केलेला आहे. आणि याच्याहि पुढें जाऊन अप्रामाणिक हेतूंत देखील स्वार्थी व निःस्वार्थी असा एक पोटभेद होऊं शकतो.

न्यायाधीश आरोपीवर गुन्हा शाबीत किंवा नाशाबीत ठरवितो यांत या भेदाचें प्रत्यंतर तर मिळतेंच, पण गुन्हा शाबीत धरल्यावरहि तो शिक्षा कमी किंवा अधिक देतो यांत तर तें प्रत्यंतर विशेष मिळतें. राजकीय गुन्हेगाराला दास व नेहरू हे प्रेमानें बेहोष झालेल्या शुद्ध मनाच्या 'तरुणा 'ची उपमा देतात असा त्यांजवर हिस्टिरिकस यानें आरोप ठेविला आहे, मग काय त्यांनीं त्याला बदमाष गळेकापूची उपमा द्यावी ! व ती दिली तर यथार्थ होईल काय ? राजकीय गुन्हेगार झाले म्हणून त्यांना योग्य शिक्षा असेल ती होऊं नये असें कोणीच म्हणत नाहीं. पण शिक्षा दिलेल्या व भोगणाऱ्या किंवा भोगलेल्या मनुष्याला त्याच्या हेतूच्या दृष्टीनें, विशेषण कोणतें लावणें योग्य व न्यायाचें होईल हाच मुख्य प्रश्न असतो. तुरुंगांत शिस्त मोडण्याच्या गुन्ह्याबद्दल मुख्याधिकाऱ्यास त्याला कदाचित् फटके मारणें अनिवार्य होईल. पण फटके मारून रक्त काढल्यानंतर त्या जखमेंत मीठ भरावयाचें कीं तिजवर तेलाची घडी घालावयाची अशासारखा हा सोपा प्रश्न आहे. युद्धांत शत्रु समोर आला तर गोळी घालणें ही रणनीति आहे. पण लढणें थांबलें म्हणजे घायाळ होऊन रणांगणावर पडलेल्या शिपायांना शत्रुपक्षाचेहि अधिकारी खाटेवर घालून जखमा बांधून योग्य औषधपाणी देतात. राजकीय गुन्हेगाराला शिक्षा करणें हें तुरुंगांत फटके मारण्यासारखें किंवा रणमैदानावर गोळी घालण्यासारखें आहे. पण त्यानंतर त्याच्या हेतूविषयीं यथान्याय चिकित्सा करूं न देणें, किंवा त्या हेतूला भलतीं विशेषणें लावणें, हें कैद्याच्या जखमेवर तेलाची घडी घालूं न देण्यासारखें किंवा जखमी सैनिकाला औषधपाणी करूं न देण्यासारखें निर्दय अमानुषपणाचें होईल.

## न्यायकोर्टाच्या विवेकाची साक्ष

खुनी मुकदम्यांत शिक्षा फांशीची होते किंवा फक्त कांहीं थोड्या वर्षांच्या सक्तमजुरीचीहि होते. हा फरक कशानें पडतो ? अर्थात् स्वार्थी किंवा निःस्वार्थी हेतूनें. निःस्वार्थी हेतूंत अपमान चीड वगैरे कारणें लक्षांत घेण्यांत येतात, व स्वार्थांतहि व्यक्तिगत स्वार्थ, सामुदायिक सामाजिक स्वार्थ, आणि राष्ट्रीय स्वार्थ, अशा दर्जाच्या स्वार्थांचा समावेश होतो. परवां जी. आय. पी. वर पगार वांटणाऱ्या एका नोकराचा खून आगगाडींत झाला त्याला अप्रामाणिकपणें पैसे मिळविण्याची आरोपीची स्वार्थबुद्धि हा हेतु होता. मयतानें आरोपीचा कांहीं एक अपमान किंवा घातपात केलेला नव्हता; व आरोपीला राग

घेण्यासारखें कांहींएक कारणहि घडलें नव्हतें. अर्थात् आरोपीला फांशीची शिक्षा देण्यांत आली. पण आपल्या स्त्रीचें दुर्वर्तन प्रत्यक्ष पाहिल्यानें क्षणभर ज्याचें देहभान गेलें अशा खुनी नवऱ्याला न्यायाधीश प्रायः दया दाखवून सौम्य शिक्षा देतात. हेतु व कृत्य यांत कांहींच फरक नाहीं हा हिस्टिरिकिसचा सिद्धांत खरा मानला तर ही दया अन्यायमूलक ठरेल! वरील प्रकारचीं उदाहरणें इकडच्या-पेक्षां पाश्चात्य देशांत फार आढळतात. अशा खटल्यांत ज्यूरी आरोपीला प्रायः दोषमुक्त करून सोडूनच देते, व कोर्टानें शिक्षा दिलीच तर त्या नवऱ्याला कांहीं दिवस कैद भोगल्यावर सरकार सोडून देतें. तात्पर्य, गुन्ह्याच्या व्याख्येंत फरक न पडला, म्हणजे इन्साफाला कलम तेंच लागलें किंवा आम्ही म्हणतों कीं एक वेळ शिक्षाहि तीच दिली, तरी हेतूविषयीं बोलतांना खरें तेंच वर्णन दिलें पाहिजे. मनुष्य अत्याचारी ठरला म्हणून तो खरोखरच निःस्वार्थी असेल तर त्याला निःस्वार्थी म्हणण्यांत चोरी कसली? आणि मग त्यांत प्रत्यक्ष राजकारणाचा संबंध आला म्हणून तरी काय झालें? जनरल डायर यानें निःशस्त्र लोकांवर गोळ्या झाडून इतके खून पाडले; त्याच्याविषयीं बोलतांना अँग्लो-इन्डियन पत्रकर्ते किंवा सरकारी अधिकारी किंवा पार्लमेंटांतले साम्राज्यवादी यांनीं चुकून तरी खुनी हा शब्द वापरला होता काय? व अखेर त्या नराधमाचें कृत्य ही नुसती समजुतीची चूक ठरली! देशभक्तीनें वेडावलेले लोकहि समजुतीच्या चुकीनेंच अत्याचारास प्रवृत्त होतात. त्या कृत्याविषेणें त्यांच्या घरची चूल खोळंबलेली नसते किंवा मुलाची मुंज अडलेली नसते. मग जिवापरी जीव देण्यास तयार होणाऱ्या देशभक्ताला नुसतें निःस्वार्थी म्हणण्याची चोरी कां व्हावी? व तें विशेषण त्यांना लावणाराला अत्याचारांस उत्तेजन देणाराच्या सदरांत कां घालण्यांत यावें?

## सगळे एकाच माळेचे मणी

मुंबईच्या परिषदेंत दास व नेहरू हे दोघे दोन प्रकारांनीं बोलले पण दोघांनींहि अत्याचारांचा निषेधच केला. तथापि जॉर्ज जोसेफ यांनीं एक खवचट उपसूचना आणून या दोघांनाहि आपण अत्याचा-चारांना उत्तेजन देणारे मानतों असें ध्वनित केलें. पण महात्मा गांधी यांनीं तरी काय म्हटलें? विशिष्ट प्रकारच्या अत्याचारी लोकांच्या देशभक्तीचा त्यांनीं गौरवच केला कीं नाहीं? मग स्वतः गांधींनाहि जोसेफनीं अत्याचारप्रवर्तक कां

म्हणूं नये ! आणि टाईम्स वगैरे पत्रकारांनीं तर त्यांना जवळ जवळ तसें म्हट- लेंहि आहे ! अनत्याचारित्वाचा उपदेश जीव तोड तोडून आज चार वर्षे गांधीजी करीत आहेत, पण त्याचें टाईम्सला कांहीं तरी आहे काय ? जॉर्ज जोसेफ हे आपणाकडून मोठी चलाखी म्हणून करण्यास गेले, पण तिच्यांतून त्यांचे गुरू हेहि सुटूं शकत नाहींत हें ते विसरले ! अर्थात् अनत्याचारित्वाचा उपदेश करणाऱ्या गांधींना केवळ असहकारितेच्या वाईट परिणामांवरून अत्याचारप्रवर्तक म्हणणें ही टाइम्सची जशी एक चूक तशीच हेतु व क्रिया हीं एकच होत असें मानणें ही हिस्टिरिकस याची दुसरी चूक होय !

## विषारी उद्गारांचा मासला

'हिस्टिरिकस' यानें पंडित मोतिलाल यांजवर दुसराहि एक आरोप केला आहे तो हा कीं, मुंबई येथील याच भाषणांत त्यांनीं बंड करण्याच्या पवित्र हक्काविषयीं बडबड केली; अशी बडबड करणें ही देखील एका प्रकारची गुन्हेगारीच होय असें या लेखकाचें मत उघड दिसतें. तो म्हणतोः—

"गांधीसुद्धां हे पुढारी लोक अनेक वेळां असें उद्गारतात कीं, एखादें बंड करून तें यशस्वी होण्याची आशा असती तर आम्हीं त्यांतहि पुढाकार घेतला असता. पण या उद्गारांपैकीं खऱ्या मनाचा अंश किती व केवळ तोंडांतून उष्ण वाफ सोडावयाची म्हणून सोडलेली किती ? हे लोक जेव्हां असलीं धाडसी विधानें करतात तेव्हां ते प्रांजळपणानें बोलत नसले पाहिजेत अशीच मनाला जबरदस्त शंका येते. उद्यां जर खरोखरच एखादें बंड झालें तर गांधी, दास व नेहरू यांपैकीं कोणीहि खरोखरीच तरवार उपसून झेंड्याखालीं जाऊन उभे राहतील असें वाटत नाहीं. फार काय पण जे उभयतां मौलाना बंधु राक्षस व विदूषक यांचा संमिश्र पार्ट सभांच्या रंगभूमिवर करतात त्यांच्या हातून देखील ही गोष्ट होणार नाहीं. बंडाचे पुढारी हे बंडें घडून येण्याची वाट पाहत नसतात तर ते स्वतःच तीं उत्पन्न करतात. ते आयत्या भडकलेल्या डोंबाळ्यांत उडी घेणारे नसतात तर आपल्याच हातानें पहिली काडी पेटवून लावतात. अर्थात् दास, नेहरू व गांधी वगैरे लोकांचे शब्द धैर्यशाली दिसले तरी मूर्खपणाचे असतात. तें एक पुढारीपणाच्या धंद्यांतलें कसब आहे. त्यांतून खरा धोका असा कांहींच निष्पन्न होत नाहीं. पण राजकारणाची ऊब कायम राहावी, त्याचे किंवा आपले हातपाय गार पडूं नयेत, म्हणूनच केवळ ही ऊष्ण वाफ मधून मधून सोडण्यांत येते. आणि आपल्याकडे पाहणाराला आपलें जरा

भय वाटून त्यानें आपलें कौतुक करावें हीच खरी मुळांतली इच्छा असते ! समजा, उद्यां खरोखरच बंड झालें तर मी अशी पैज मारतों कीं, महात्मा गांधी हे आणखी एक जाहिरनामा काढून त्यांत बंडाचा निषेध करतील, व आपल्या विदीर्ण जखमी झालेल्या काळजाचें हास्यास्पद प्रदर्शन करून हात जोडून स्वस्थ बसतील. मौ. शौकतअल्ली यांना आजवर राहिलेली मक्केची पवित्र यात्रा आठवेल. आणि दास–नेहरू हे सैतानी विलायतेला जाण्याकरितां पुढच्याच आगबोटीचीं तिकिटें खरेदी करतील ! हे सर्व पुढारी केवळ नाटकी राक्षस किंवा ललितांतले आग्यावेताळ होत, व आम्हीं त्यांना असेंच थट्टेवारी पाखडून टाकलें असतें. पण त्यांच्या या नाटकी ढंगाचे परिणाम दुःखकारक होतात, अविचारी अर्धपक्क मनाचीं मुलें धाडसी कृत्यें करतात, म्हणूनच त्यांना केवळ केरावारी लोटून देतां येत नाहीं. ”

## ही सैतानावर ताण झाली.

वरील उद्गारांत किती खोटेपणा, किती कुत्सितपणा व अनुदारपणा खेंचून भरला आहे हें वाचकांनींच पाहावें. कोणाच्या मनांत काय असतें हें सहसा कळत नाहीं असें या लेखकानें पूर्वी लिहिलें तें सहेतुक असलें तरी निदान समंजसपणाचें होतें. पण सैतानालाहि ठाव न लागणारे दास, नेहरू आणि गांधी यांचें अंतरंग या बहाद्दरानें स्पष्ट अचूक पाहिल्यासारखें प्रगट करणारे हे उद्गार काढून खरोखरच सैतानावरहि ताण केली. बंडखोरीच्या सर्वच गोष्टी जर निवळ कल्पनामय तर आम्ही असें विचारतों कीं, दास, नेहरू व शौकतअल्ली असे लोक बंड झालेंच तर बंडाचे पुढारी होण्यास धजणार नाहींत याला तरी काय आधार ? याविषयीं शंका प्रगट करणें म्हणजे वरील लोकांचे अंगीं खरें धैर्य असें मुळींच नाहीं असें सुचविण्यासारखें आहे. पण आपण गुप्त राहून ‘ हिस्टिरिकस ’ यानें अशा प्रकारें या लोकप्रिय पुढाऱ्यांवर कुचेष्टेच्या गोळ्या झाडणें हें नामर्दपणाचें व बेशरमपणाचें कृत्य होय. ‘ हिस्टिरिकस ’ हा आपलें नांव प्रगट करील तर तो स्वतः कितपत धाडशी व धीट आहे याची कल्पना त्याच्या वाचकांस करतां येईल. जुन्या काळीं सर्रास व हल्लींहि फ्रान्स, इटाली वगैरे देशांतून क्वचित्प्रसंगीं सशस्त्र द्वंद्वयुद्धाचीं आव्हानें मानी पुरुष परस्परांना करतात, तसें आव्हान ‘ हिस्टिरिकस ’ याला करण्याचा हा एक प्रसंग होता. आणि खरोखरच ‘हिस्टिरिकस ’ हा वरील प्रकारचे शब्द दास, नेहरू,

शौकतअल्ली यांच्या समोर उभा राहून बोलेल तर, या अनत्याचारी चरित्राच्या दिवसांतहि तो वेताच्या छडीचा किंवा चाबकाचा सडकून मार खाल्ल्याशिवाय राहणार नाहीं हें आम्ही खात्रीनें सांगतों. दुसऱ्याला नामर्द म्हटल्यास स्वतः मार खावा लागतो किंवा थोबाड फोडून घ्यावें लागतें. या सिद्धांताला महात्मा गांधींची कारकीर्द देखील अपवादाचा दगा देईल असें वाटत नाहीं. पण हा व्यक्तिविषय राहो. आम्ही एरवींच असें विचारतों कीं, राजकारणाची तात्त्विक चर्चा करीत असतां बंड करण्याच्या पवित्र हक्काचा उल्लेख कोणीं केला तर त्यांत 'अब्रह्मण्यम् अब्रह्मण्यम्' म्हणून उठून जाण्यासारखें काय आहे? व दुसरा प्रश्न असा कीं, खरोखर हिंदुस्थानांत एकादें बंड झालेंच तर दास, नेहरू, अल्लीबंधु यांच्या दर्जाचीं माणसें, आपले इतर व्यवसाय टाकून, बंडांत पुढारीपणानें सामील व्हावीं या कल्पनेंत तरी अशक्य किंवा असंबद्ध किंवा आश्चर्यकारक असें काय आहे?

## तत्त्ववेत्ता काय म्हणतो पहा

राजकारणाची तात्त्विक चर्चा बंडखोरीच्या हक्काच्या चर्चेशिवाय वास्तविक पुरीच होत नाहीं. याविषयीं एकच ठळक उदाहरण आम्ही देतों व तें प्रो. सिज्विक यांच्या सर्वमान्य ग्रंथाचें. 'राजनीतीचीं मूलतत्त्वें' या ग्रंथाच्या सोळाव्या व एकतिसाव्या भागांत त्यांनीं या विषयाचा ऊहापोह केलेला आहे. स्वराज्याची चळवळ ही आज कितीहि सनदशीर अशा पायावर शहाणपणानें रचलेली व चाललेली असली तरी हिंदी स्वराज्याच्याविषयीं, तात्त्विक चर्चेत या अंतिम हक्काचा कोणीं केव्हां उल्लेखहि करूं नये हें म्हणणें मूर्खपणाचें होईल. सिज्विक म्हणतो, "बंड करण्याचा हक्क हा 'कायदेशीर' या शब्दानें अर्थातच उल्लेखितां येत नाहीं. पण कोणत्याहि पद्धतीचें राज्य असो, तींत लोकक्षोभाचा कडेलोट होण्याची वेळ आली असतां अधिकारपदस्थ लोकांना प्रतिकार व जरूर तर राज्यक्रांति व त्याकरितां बंड करण्याचा नैतिक अधिकार जनतेला असतो ही गोष्ट कोणीहि समंजस मनुष्य नाकबूल करीत नाहीं. लोकशाही राज्यांत देखील हा नैतिक हक्क थोडा उरला तरी अवशिष्ट असतोच; मग केवळ जित व जेते असाच जेथें संबंध व राजसत्तेला जेथें प्रजेची संमति नाहीं तेथें या हक्काचें नैतिक स्वरूप कोण नष्ट करणार?"

"We should not ordinarily condemn rebellion-supposing a reasonable prospect of success-on the part

of any such conquered nation, whatever formal submission it had made to its conquerors, so long as the old national sentiment remained predominant. But in proportion as the old patriotism had diminished in intensity or range of diffusion, the disturbance of the established order would seem to lose its justification" (पृ. २६९) सिज्विकचें म्हणणें हें कीं, देश जिंकलेला आहे व लोकांनीं राजसत्तेला कागदोपत्रीं मान्यता दिली आहे, अशाहि स्थितींत जर जुन्या राष्ट्रीयत्वाची भावना लोकांच्या मनांत उज्ज्वल असेल व यश मिळण्याचा सामान्य संभव असेल तर बंडखोरीच्या हक्काचा निषेध करतां येत नाहीं. मात्र जसजशी ही भावना खरोखर नष्ट होत जाईल व लोकसत्तेची वाढ अधिकाधिक होईल तसतसें या हक्काचें नैतिक अधिष्ठान कमी होत जाईल. सिज्विकचा हा सिद्धांत हिंदुस्थानला लावला असतां, तात्त्विक चर्चेंत पुढाऱ्यांच्या तोंडून क्वचित् एकादे वेळीं निराशेच्या भरांत बंडाच्या हक्काचा शब्द निघाला तर त्याचा 'हिस्टिरिकिस' सारख्यांनीं असा दिमाखपूर्वक गवगवा कां करावा?

## दादाभाइ नौरोजींचा दाखला

पंडित मोतिलाल नेहरू काय बोलले व कोठें बोलले हें प्रसिद्ध आहे. मुंबई येथें ऐक्य परिषदेंत सर्व प्रकारच्या मताचे लोक हजर असतां, एकीकडे अत्याचारांचा निषेध व दुसरीकडे दडपशाहीचा निषेध अशा दुहेरी मुद्यावर चर्चा सुरू असतां स्वतःवर केलेल्या अत्याचारप्रवर्तनाच्या आरोपाला उत्तर देतांना, पं. मोतिलाल नेहरू बंड करण्याच्या हक्काविषयीं जर कांहीं बोलले असतील तर तें तात्त्विकच असणार आणि अशा तात्त्विक विवेचनानें जर तरुणांचीं मनें बिथरून ते अत्याचार करूं लागतात हें खरें असेल, तर राजकीय तत्त्वज्ञानाचे सर्व ग्रंथ, उदारमतवादी लोकांचे लेख, अनेक देशांचे इतिहास, किंबहुना बंड हा शब्द ज्यांत येतो ते कोश सर्व जाळून टाकावे लागतील! पं. मोतिलाल नेहरू किंवा दास यांची जी मनःस्थिति आज दिसून येते ती अलौकिक किंवा अश्रुतपूर्व आहे अशांतलाहि प्रकार नाहीं. अनत्याचारित्वाच्या बाबतींत तरी महात्मा गांधींशीं आज चार वर्षें खांद्याला खांदा लावून काम करणारे दास व नेहरू यांचे संबंधानें, केवळ त्यांच्या तोंडून बंड करण्याचा हक्क असे शब्द निघाल्यानें, गैरसमज होण्याचें कारणच नव्हतें. पण स्वराज्य पक्षाच्या अडवणुकीच्या धोर-

णानें कावलेल्या लोकांना या दोघां पुढाऱ्यांना नांवें ठेवण्याला कांहीं तरी जागा हवी होती, ती मात्र या भाषणांनीं मिळाली असें आपण समजूं. पण बंड करण्याची इच्छा केवळ निराशेमुळें मनांत चमकून गेलेल्या व तसें तोंडानें बोलून दाखविलेल्या अशा दुसऱ्या एका देशभक्ताचें उदाहरण प्रसिद्ध आहे व तें खुद्द दादाभाई नवरोजी यांचें. सन १९०६ सालीं कलकत्ता येथील राष्ट्रीय सभेचे अध्यक्ष या नात्यानें महर्षि दादाभाई यांनीं जें भाषण केलें त्यांत त्यांनीं खालील उद्गार काढले होते. " Since my early efforts I must say that I have felt so many disappointments as would be sufficient to break any heart and lead one to despair and even, I am afraid, to rebel. " " मी पूर्ववयांत असले प्रयत्न करूं लागल्यापासून माझी इतके वेळां निराशा झाली कीं, मी म्हणतों कीं, दुसऱ्या कोणत्याहि मनुष्याला मजप्रमाणें निराशाच वाटली असती तर त्याचें काळीज फुटून गेलें असतें, किंबहुना बंड करण्यासहि तो प्रवृत्त झाला असता ! !" दादाभाई यांनीं या ठिकाणीं वापरलेला बंड करणें हा शब्दहि वाच्यार्थानेंच घेतला पाहिजे. तो केवळ अलंकारिक प्रयोग नव्हे. 'हिस्टिरिकस' हा जर निदान नेमस्त असेल तर त्याला आम्ही असें विचारूं कीं, दादाभाईंच्या उद्गारांविषयीं तुमचें काय म्हणणें ? दादाभाई हे दास-नेहरूंपेक्षां जितके अधिक पूज्य तितकी त्यांच्या शब्दांना किंमतहि अधिक. आणि अशा शब्दांत घातपात करविण्याची जर शक्ति असेल तर तिचा परिणाम दास-नेहरूंच्या शब्दांपेक्षां दादाभाईंच्या शब्दांपासून अधिकच होण्याचा संभव ! पण त्या वेळीं दादाभाईंना कोणीं असें म्हटलें नाहीं कीं 'काय पहा या पिकल्या केसांच्या म्हाताऱ्याला म्हातारचळ लागला. जन्मभर सनदशीरपणाचें प्रस्थ माजविणाऱ्या या पुढाऱ्यानें बंडाची गोष्ट बोलावी हें काय ? हिंदुस्थानांत विद्यमान स्थितींत बंड यशस्वी होऊं शकत नाहीं हें यांच्या लक्षांत येऊं नये काय ? व अयशस्वी होणाऱ्या बंडाची गोष्ट बोलून तरुण मुलांचीं मनें बिथरण्यास यानें मदत करावी ही केवढी लांछनास्पद गोष्ट !' दादाभाई बोलले त्या सुमारास बंगालच्या फाळणीची चळवळ अतिशय विकोपाला गेली होती ! स्वदेशी, बहिष्कार, राष्ट्रीय शिक्षण व स्वराज्य या चतुष्टयाचा आवाज सर्व देशभर भरून राहिला होता. मवाळ व जहाल यांचें भांडण कडेलोटाला जाऊन पोंचण्याचे

रंगांत होतें. तरुण मुलांच्या मनांतील असंतोष उग्र स्वरूप धारण करण्याच्या बेतांत होता. अशा परिस्थितींत अशा जबाबदार पुढाऱ्यानें बंडाची भाषा बोलणें हें दारूखान्यांत कोलीत भिरकविण्यासारखें घातक नव्हतें काय? पण नेमस्तांनीं तेव्हां दादाभाईंना नांवें ठेवलीं नाहींत. उलट त्यांच्या धैर्याचें व स्पष्ट-वक्तेपणाचें कौतुकच केलें.

## ह्यूमसाहेब काय म्हणाले ?

पण पंडित मोतिलाल नेहरू यांचे उद्गार अश्रुतपूर्व नव्हत, हें जसें दादाभाईंच्या उदाहरणावरून आम्हीं दाखविलें, तसेंच खुद्द दादाभाईंचे उद्गारहि अश्रुतपूर्व नव्हत हें इतर उदाहरणांवरून दाखवितां येईल. आपण राष्ट्रीय सभेचे जनक ए.ओ. ह्यूम यांचें उदाहरण घेऊं. सर वुइल्यम वेडरबर्न यांनीं ह्यूमसाहेबांचें चरित्र लिहिलें. त्यांत लिटनशाहीच्या वेळीं हिंदुस्थानांत असंतोषाची काय स्थिति होती याचें वर्णन त्यांनीं दिलें आहे. ते लिहितात कीं, "ह्यूमसाहेबांना १८५७ च्या बंडाचा अनुभव होता म्हणून त्यांना देशस्थितीविषयीं मिळालेली माहिती खरी आहे असें वाटलें. ह्यूमसाहेबांचा धार्मिक हिंदी लोकांशीं मोठा जिव्हाळ्याचा संबंध होता. फकीर, बैरागी, साधू, म्हणजे गुरु व चेले यांचेकडून त्यांना असें कळलें होतें कीं, 'जंगल वाळून करपून गेलें आहे, ठिणगी पडतांच वणवा पेटेल, वारा आधींपासून वाहतोच आहे!" १८५७ प्रमाणें जवळ जवळ बंडाची तयारी होती; मात्र हें बंड शिपायांचें नसून या वेळीं शेतकऱ्यांचें झालें असतें. महाराष्ट्रांत दंग्याधोप्यांना सुरुवातहि झाली होती, यासाठीं निजलेल्या ब्रिटिश जनतारूपी भीमसेनाला जागें करण्याकरितां मोठ्यानें त्याच्या कानांत ओरडून हिंदुस्थानांत बंड होण्याचा बेत आहे असें ह्यूमसाहेबांना सांगावें लागलें. या विषयावर दादाभाईंनीं जीं जाहीर पत्रकें प्रसिद्ध केलीं त्यांबद्दल त्यांजवर सरकारचा व अँग्लोइंडियन लोकांचा फार रोष झाला व ह्यूमसाहेबांवर कदाचित् हद्दपारीहि आली असती. आपल्यावरील आरोपाला ह्यूमसाहेबांचें उत्तर असें होतें कीं, मी ज्या अप्रिय गोष्टी उघड बोलतों त्याच खेडेगांवांतले लोक घरोघरीं बोलतात. प्रत्येक खेड्यांत जनतेचा आवडता व विश्वासूक असा कोणीना कोणी पुढारी असतोच. या असंतोषाला बाहेर पडण्याला राजमान्य मार्ग न मिळेल तर देशांत खास बंड झालें असतें, व तें बंड वांचवावें म्हणून ह्यूमसाहेबांनीं राष्ट्रीय सभा काढली." (पृ. ७७). आपल्या लेखांतून ह्यूमसाहेबांनीं हिंदुस्थानांतलि परकी राजकर्त्यांना डोळे व कान नसलेल्या बुर्बोन राजांची

उपमा दिली होती; व ही उपमा देणें म्हणजे फ्रान्समधील बंडें व राज्यक्रांति यांचीच आठवण करून देण्यासारखें होतें. ह्यूमसाहेबांच्या वेळीं या देशांत प्रातिनिधिक लोकसत्तेचा किंबहुना स्थानिक स्वराज्याचाहि जन्म झालेला नव्हता; त्या ठिकाणीं आज स्वतंत्र स्वराज्याचे मुख्य हक्क मागण्यापर्यंत मजल येऊन ठेपली आहे. ही प्रगति कालानें आपल्या ओघानें घडवून आणली असली तरी पुढाऱ्यांची निराशेची स्थिति आणि तिजमुळें मनाला वाटणारी व तोंडांतून निघणारी राज्यक्रांतीची भीति व बंड करण्याच्या तात्त्विक हक्काचा उल्लेख या गोष्टी तेव्हांला व आतांला समानच नाहींत काय! अमेरिकेंतील बंड कां झालें? पण ह्यूम काय किंवा दादाभाई काय, यांची भीति किंवा भविष्यें झालीं तरी इतिहासाच्याच ज्ञानावर रचलेलीं होतीं व इंग्रजांचा संबंध प्रत्यक्ष ज्यांत आला असाहि एक भाग त्या इतिहासांत होता. ह्यूमसाहेबांनीं फ्रेंच राज्यक्रांतीचें उदाहरण दिलें, दादाभाईच्या मनांत कदाचित् अमेरिकेचें उदाहरण असेल. अमेरिकेंतील खुद्द आपल्या जातभाईचें मन ज्यांना मिळवून घेतां आलें नाहीं, आपल्या हाडामांसाच्या भाऊबंदांना ज्यांना आपल्या स्वातंत्र्यांत वांटणी देण्याची बुद्धि जिव्हाळी तुटेपर्यंत झाली नाहीं, ते हिंदुस्थानांतल्या विजातीय, विधर्मीय व एक वेळ जिंकलेल्या लोकांना स्वातंत्र्य कितपत खुषीनें देतील हें दिसतच आहे. हिंदुस्थानांत जसे दादाभाई, टिळक, दास व नेहरू हे लोक झाले तसेच अमेरिकेंत फ्रँकलीन, वॉशिंग्टन वगैरे लोक होऊन गेले. हे दोघेहि मूळचे राजनिष्ठ होते. वॉशिंग्टन तर जुन्या खानदानीचा कट्टा अभिमानी होता. असें असतां एकतंत्री सत्ता गाजविण्याच्या राजाच्या आग्रहानें हे राजभक्त लोकहि अखेर बंडखोर बनले. शिवाय त्यांनीं जेव्हां बंडाला सुरुवात केली तेव्हां तें हटकून यशस्वी होईल अशी आशाहि त्यांना नव्हती. डॉ. फ्रँकलीन यानें हाऊस ऑफ कॉमन्सपुढें जबानी दिली तेव्हां खालील प्रश्नोत्तरें झालीं, तीं 'हिस्टिरिकस' यानें लक्षांत बाळगण्यासारखीं आहेत.

प्रश्न—सन १७६३ च्या पूर्वी ग्रेटब्रिटनविषयीं अमेरिकन लोकांची भावना कशी होती?

उत्तर—अतिशय उत्तम. राजनिष्ठा ही आनंद मानण्याची एक गोष्ट असें अमेरिकन लोक मानीत. इंग्लंडचा राज्यकारभार अमेरिकेवर चालण्याला एक पैहि खर्च पडत नसे. इंग्लिश लोकांबद्दल आमच्या मनांत आदर व प्रेम होतें

इतकेंच नव्हे तर त्यांच्या अस्सल चालीरीति अनुसरण्यांत एक प्रकारचें भूषण वाटे. कोणी इंग्रज अमेरिकेंत आला तर त्याचा मोठा सन्मान होई.

प्रश्नः—हल्लीं अमेरिकेची इंग्लंडाविषयीं काय भावना आहे?

उत्तरः—"जुनें वारें सगळें बद्‌ललें. अमेरिकेवर कर लादण्याचा हट्ट इंग्लंड न सोडील तर जुना आदर व प्रेम हीं तर आतां नष्ट झालींच आहेत पण हळूहळू व्यापारहि नष्ट होईल; व कर वसूल करणें तेंहि सशस्त्र सैन्याशिवाय दुसऱ्याचे हातून होणार नाहीं." 'बोस्टन पोर्ट बिल' मंजूर झाल्यावर स्वातंत्र्य-रक्षणार्थ अमेरिकन लोकांनीं संघ स्थापन केले. अर्थात् ते बेकायदेशीर व राजद्रोही म्हणून जाहिरनामे लागले. लष्करी शक्तीचीं प्रदर्शनें जागजागीं होऊं लागलीं, तेव्हां वॉशिंग्टनसारख्या राजनिष्ठ उमरावालाहि जुलमाचा वीट आला, एक वेळ राजाला अर्ज करून पाहूं असें ब्रायन फेअर फॉक्स यानें त्याला लिहिलें, तेव्हां वॉशिंग्टन यानें उत्तर दिलें कीं, "अर्ज करण्याची गोष्ट मीं मान्य केली असती, पण अर्जाची पराकाष्ठा करून आपण पाहिली नाहीं काय? आमच्या-वर कर लादण्याचा इंग्लंडचा निश्चय सूर्यप्रकाशाप्रमाणें मला स्वच्छ दिसतो." यानंतर वॉशिंग्टन हा ब्रिटिश मालावरील बहिष्काराच्या चळवळीस जाऊन मिळाला. व नाइलाज तरच मी शस्त्र धरीन असें म्हणत म्हणत अखेर त्यानें बंडाचा पुढारीपणा व लष्कराचें आधिपत्य स्वीकारलें! अशाच एका प्रसंगीं पॅट्रिक हेनरी सभेंत ओरडून म्हणाला, "सीझरचा जुलूम असह्य झाला तेव्हां त्याला ब्रूटस भेटला. चार्लसचा जुलूम कळसास पोंचला तेव्हां त्याची क्रॉमवेलशीं गांठ पडली. आणि आतां हा राजा तिसरा जॉर्ज" इतक्यांत सरकार पक्षाच्या लोकांनीं "राजद्रोह राजद्रोह" असा एकच गिल्ला केला तेव्हां चार्लस पॅट्रिक पुढें म्हणाला "तिसऱ्या जॉर्ज राजानें जुन्या उदाहरणापासून शहाणपण शिकावें इत-केंच मी म्हणतों, व मी बोलतों हा राजद्रोह असेल तर काय माझें डोकें मारावयाचें तें मारून द्या."

## टिळकांची बंडखोरी

'हिस्टिरिकस' यानें टिळकांवर टीका करण्याकरितां त्यांना एका स्वतंत्र लेखाचा मान दिला आहे. या टीकेला त्यानें मुख्य आधार घेतला आहे तो लो. टिळकांच्या आठवणी व आख्यायिका हा नुकताच प्रसिद्ध झालेला ग्रंथ होय. हा ग्रंथ आतां हजारों मराठी वाचकांनीं वाचलेलाच आहे

व त्यांतील चरित्रविषयासंबंधीं आपलें संकलित मत त्यांनीं बनविलेंच असेल. ' हिस्टिरिकस ' यानें त्यांतील पांचसात आठवणींचा उल्लेख आपल्या कामाकरितां केला, त्यांत मुद्दा इतकाच निघतो कीं, टिळक हे देखील पं. नेहरूप्रमाणें बंड करण्याचा तात्त्विक हक्क मानणारे व प्रतिपादन करणारे होते, व खासगी संभाषणांत प्रसंगविशेषीं ते असें बोलून दाखवीत कीं, स्वराज्य मिळविण्याकरितां शक्य असतें तर मीं बंडहि केलें असतें. ग. वि. केतकर यांच्या एका आठवणींत टिळक, गांधी व शौकतअल्ली यांच्या १९२० सालच्या संभाषणांतील उद्गार दिले आहेत. या वेळीं गांधी असहकारिता सुरू करण्याच्या बेतांत होते. टिळकांना ती गोष्ट पसंत नव्हती. गांधी म्हणत होते कीं, असहकारिता ही सनदशीर आहे. असहकारिता हें निर्वाणीचें एक शस्त्र आहे, व प्रत्येकाला तें इच्छेप्रमाणें उपयोगांत आणण्याचा हक्कहि आहे. पण तें सनदशीर आहे हें म्हणणें टिळकांना पसंत नव्हतें. टिळकांचें मत असें कीं, निर्वाणीचें म्हणून कोणतेंहि शस्त्र उचलण्यास कोणी तयार झालाच तर तें सनदशीर आहे कीं नाहीं याचा विचार कशाला ? आपल्या प्राणाचें रक्षण करण्याकरितां जवळच पडलेली तरवार उचलण्याचा प्रसंग आल्यावर त्या तरवारीचा परवाना काढला आहे किंवा नाहीं ही विचक्षणा कोणी करीत बसावी ? अर्थात् सनदशीरपणा बिनसनदशीरपणा हा प्रश्न मुद्याला सोडून आहे व शक्याशक्यता हीच मुद्याला धरून आहे हें जाणविण्याकरितांच टिळक असहकरितेच्या पुढचें उदाहरण देऊन गांधींना म्हणाले, " मी सशस्त्र बंड देखील सनदशीर(!) समजतों,आज तें शक्य नाहीं इतकेंच. सशस्त्र बंडाला यश येईल अशी कोणीं आठ आणे जर खात्री दिली तर बाकीच्या आठ आण्यांबद्दल परमेश्वरावर विश्वसून मी बंड उभारीन." अर्थात् या भाषणांत बंडाची कल्पना टिळकांच्या तोंडून आली. पण ती कोणत्या अर्थानें हें वाचकांनींच पाहावें. डॉ. भट यांनीं लिहिलेल्या आठवणींतहि हीच गोष्ट आहे. वामन मोरेश्वर पोतदार यांच्या आठवणींत असें लिहिलें आहे कीं, ' मवाळ म्हणून कोणा एका ज्वलज्जहालानें टिळकांचा अधिक्षेप केला तेव्हां त्याला निरुत्तर करण्याकरितां ते म्हणाले, 'उगाच गप्पा कशाला ? तुम्हीं पंचवीस हजार लोक जीव द्यायला तयार होऊन बरोबर येणारे दाखवा, मी बंड उभारण्याला तयार आहें !' याहि संभाषणांत बंडाच्या कल्पनेचा उल्लेख कोणत्या कारणानें आला हें उघडच दिसतें. ज्वलज्जहाल भेटला तर त्याच्याशीं बोलतांना टिळकांनीं

बंडखोरीची सरळ स्तुति करून त्याची पाठ थोपटून त्याला उत्तेजनच द्यावें कीं नाहीं! 'पण पंचवीस हजार लोक कोठें आहेत तें दाखवा,' असें विचारण्यांत टिळकांचा इरादा हाच कीं, बंडाची चळवळ अशक्य आहे म्हणून तिचा विचारहि कोणीं मनांत आणूं नये. ग. स. मराठे यांनीं दिलेल्या आठवणींतहि असाच एक प्रसंग आहे. या वेळच्या भाषणांत टिळकांच्या तोंडून उद्गार निघाले कीं, पांचशें लोक तरी जीव द्यावयाला तयार कोठें आहेत ! या संख्यानिदर्शनाचेंहि महत्त्व इतकेंच कीं, बंड करण्याकरितां लोकांची आज बिलकूल तयारी नाहीं हें जाणावें. तसेंच स्वतः बापट यांनीं दिलेल्या एका आठवणींत टिळक एका गृहस्थाला म्हणतात कीं, 'मी तुरुंगांत असतांना महाराष्ट्रांतील लोकांनीं विशेष कांहीं पराक्रम करून दाखविला असता तर महायुद्धाची संधि साधून मीहि म्हणालों असतों, चला आतां बंड करूं या.' या संभाषणांतहि उत्तरास प्रत्युत्तर देणें एवढाच टिळकांचा उद्देश होता हें उघड आहे. पण हे उघड सरळ अर्थ लक्षांत न घेतां हिस्टिरिकस या संभाषणावरून असा निष्कर्ष काढतो कीं, 'टिळक नेहमीं मनांत बंडाचें ध्यान करीत असले पाहिजेत. कसें ? तर हल्लींचे दास नेहरू करतात तसें. त्याचा परिणाम हा झाला कीं, टिळकांच्या भोंवतीं वावरणाऱ्या व त्यांना पूज्य मानणाऱ्या तरुण लोकांच्या मनांत क्रांतिकारक कल्पना उत्पन्न झाल्या. अर्थात् अत्याचारांना टिळक हे जबाबदार होते.'

## बंड करण्याचा जन्मसिद्ध हक्क

पण 'हिस्टिरिकसला' कशी द्वाड बुद्धि सुचली कोणाला ठाऊक ! कारण त्यानेंच पुढें नाशिकच्या कटासंबंधानें डॉ. भट यांच्या दुसऱ्या एका आठवणीचा उल्लेख केला आहे. यांत पूर्वी प्रसिद्ध असलेली तीच हकीकत, पण चक्षुर्वैसत्यं म्हणून दिली आहे. १९०६ सालीं नाशिक येथील कांहीं तरुण लोकांना इतरांच्या मानानें टिळकांचा मवाळपणा म्हणून जो वाटे त्याविषयीं निंदास्पद टीका त्यांनीं ध्वनित केली असतां टिळकांनीं त्यांना अत्याचाराविरुद्ध उपदेश केला व त्यांची अप्रियता संपादली या एका उल्लेखानेंच 'हिस्टिरिकस' यानें टिळकांवर रचूं घातलेल्या सर्व आरोपांचें पाणी आपोआप होत आहे. जो मनुष्य खरोखर अत्याचारप्रिय असेल तो नाशिकच्या प्रसंगासारखी सोन्याची संधि कां गमावील ? दुसरे पक्षीं अत्याचारापासून तरुणांचें मन टिळक निवृत्त करतात या अनुभवानें तरुण मुलांनीं त्यांना मवाळांत गणावें, आणि त्याच अत्याचारांना चिथावणी दिल्याबद्दल सरकारादि प्रतिपक्षीयांनीं त्यांना जबाबदार धरावें या गोष्टी सूर्यप्रकाश व

अंधेर यांच्याइतक्या परस्पर विसंवादी नव्हेत काय ? आणि त्यांतल्या त्यांत प्रत्यक्ष पुराव्याची गोष्ट अनुमानाला सहजच मारक ठरते. पण राहतां राहिला आरोप हा कीं, टिळकांच्या मनांत बंडखोरीची कल्पना जिवंत असून कारणपरत्वें तिचा उल्लेख खासगी संभाषणांत ते करीत असत. पण ज्या दृष्टीनें हा आरोप आणला जातो त्या दृष्टीनें तो व्यर्थच ठरतो. कारण आत्मसंमतीशिवाय प्रस्थापित झालेल्या कोणत्याहि सत्तेविरुद्ध बंड करणें हा मनुष्यमात्राचा जन्मसिद्ध हक्कच आहे. आणि आम्हीं वर दर्शविल्याप्रमाणें राजनीति सांगणारे तत्त्ववेत्ते तो हक्क कबूल करतात. इतकेंच नव्हे तर जॉर्ज वॅशिंग्टनसारख्या भल्या भल्या राजनिष्ठ लोकांनींहि तो अंमलांत आणला व दादाभाईसारख्या सत्त्वनिष्ठ तपोनिधीच्या तोंडून त्याचा भरसभेंत उच्चार झाला. मग जे देशभक्त पुढारी दादाभाईइतके प्रवृत्तिपर असून अधिक राजस बुद्धीचे; ज्यांच्या ठिकाणीं दादाभाईपेक्षां मनुष्यस्वभावाचें ज्ञान अधिक खोल, चढत्या काळाच्या वाढत्या राष्ट्रीय भावनेचे अनेक नवीन मार्ग ज्यांच्या दृष्टिपथांत आले, त्यांच्या मनांत किंवा नैमित्तिक संभाषणांत बंड करण्याच्या हक्काची तात्त्विक चर्चा केव्हां उमटल्यास तो असा काय घोर अपराध झाला ? सनदशीरपणाचा पतिव्रताधर्म उपदेशून नवरेशाहीच्या जुलमाखालीं प्रजेनें निमूटपणें मान वांकविण्यास तिचें मन वळविण्याचे कपटनीतीचे दिवस इतर देशप्रमाणें याहि देशांत आतां संपले आहेत. त्यांत अशक्य त काय ? बंड आज कोणी उपदेशीत नाहींत किंवा कोणाला तें आज शक्यहि वाटत नाहीं. टिळकांसारखे लोक प्रत्यक्ष अत्याचारांविरुद्ध तरुणांना उपदेश करतात. ज्यांना निर्भयपणाची मूर्ति असें लोक मानतात, संतकवि तुकारामबुवांच्या उक्तीप्रमाणें 'आपलें मरण पाहिलें म्यां डोळां' असें म्हणण्याची ज्यांची तयारी, व सरकारचें गुणवर्णन करतांना त्यांना सैतान म्हणण्यापर्यंत ज्यांची मजल जाते ते मूर्धाभिषिक्त असहकारितावादी गांधीहि राष्ट्रीय सभेचें 'क्रीड' बनवितांना आपली मजल नरो वा कुंजरो वा असें ठेवण्यापलीकडे नेत नाहींत; स्वातंत्र्य हें साम्राज्यांतच मिळालें तर तें अधिक इष्ट, नाइलाजच तर साम्राज्याबाहेर जाऊन मिळविणें प्राप्त असें स्पष्ट भाष्य करण्याची सावधगिरी बाळगितात व अनत्याचारित्वाचा उपदेश थट्टा करून घेण्यापर्यंत नेतात. अशा स्थितींत कोणत्याहि हिंदी पुढाऱ्यावर बंडखोर वृत्तीचा छाप मारूं पाहणें

निवळ बाष्कळपणाचें आहे. त्याहूनहि बाष्कळपणा हा कीं, अशा पुढाऱ्यांच्या तोंडून प्रसंगोपात्त मोठे तेजदार किंवा जहाल विचार प्रकट झाले तर ते कृतींत उतरविण्याइतका मर्दपणा त्यांच्या अंगीं नाहीं असा फिरून उलटा एक आरोप त्यांजवर करणें ! पण या दोनहि आरोपांना आम्ही फिरून स्पष्ट उत्तर देतों कीं, बंड करणें आजच्या घटकेला प्राप्त झालेलें नाहीं, कोणाला तें प्राप्त वाटलें तरी शक्य नाहीं, मिळून ती गोष्ट आज कोणी उलट किंवा सुलट लक्षांतहि घेण्याचें कारण नाहीं. तथापि स्वराज्य मिळविण्याचा ज्यांना जन्मसिद्ध हक्क आहे त्यांना, ज्या प्रसंगीं जे उपाय अपरिहार्य ठरतील त्या उपायांनीं तें मिळविणें हाहि ईश्वरदत्त व जन्मसिद्ध हक्क आहे यांत शंका कसली ? आणि समजा कीं, कधीं काळीं तसा प्रसंग आलाच तर टिळक, दास, नेहरू वगैरे पुढारी ज्या वर्गाचें उपलक्षण होत त्या वर्गांतील भावी पुढारी त्या प्रसंगीं निर्वाणीचें शस्त्र घेऊन बाहेर पडण्याचें धैर्य दाखवितील, त्यांत माघार घेणार नाहींत. ब्रिटिश साम्राज्यावर परचक्र आलें असतां फ्रान्सच्या रणभूमीवर जाऊन तें परतविणारे निधड्या छातीचे लोक ज्या हिंदुस्थानांत निपजतात त्यांत स्वतःच्या देशांत व स्वतःच्या देशाकरितां जरूर पडली तर बंड उभारून स्वतःचा जीव धोक्यांत घालण्याला लोक मिळणार नाहींत हें कसें सिद्ध होईल ?

## सुशिक्षितांवरील एक आरोप

येऊन जाऊन यावर उत्तर हेंच कीं, हें धैर्य अंगीं असणारीं माणसें हिंदुस्थानांतहि आहेत, पण तीं इतर वर्गांत आहेत, सुशिक्षितांतहि मिळणें नाहीं. पण सुशिक्षित वर्गाची ही निव्वळ बदनामी होय असें आम्ही स्पष्ट सांगतों. १८५७ चें बंड निरक्षर शिपायांनीं केलें. पण गेल्या तीस वर्षांत हिंदुस्थानांत जी प्रखर चळवळ झाली ती सर्व सुशिक्षितांनींच केली, त्यांत अशिक्षितांचा भाग नाहीं. या चळवळीचा हेतु बंडाचा नव्हता व तिला प्रत्यक्ष बंडाचें स्वरूप चुकूनही केव्हां आलें नाहीं. तथापि या चळवळींत धैर्य, धाडस, व स्वार्थत्याग हे गुण कसोटीस लागण्यासारखे शेंकडों प्रसंग घडून आले व त्या शेंकडों प्रसंगीं सुशिक्षित लोक या कसोटीला पूर्णपणें उतरले. शिक्षणानें मनुष्याच्या मनांत एकप्रकारें विवेकाची बुद्धि होते, व ज्या प्रमाणानें विवेक वाढतो त्या प्रमाणानें अनिश्चितता व अनिश्चयामुळें भीति वाढते ही गोष्ट खरी. परंतु शिक्षणाच्या या दुष्परिणामाची मर्यादा आतां गांठली गेलेली

असून सुशिक्षित झाला तरी तोहि संमोह नदी उतरून पैलतीराला जातो व कार्यकृत होतो हा रोकडा अनुभव आतां आलेला आहे. पिनल कोडाच्या व्याख्येंत सांपडल्यानें ज्यांना तुरुंगवास घडला अशांपैकीं पुष्कळांनीं तो आनंदानें स्वीकारला. कित्येकांनीं तर उघड्या डोळ्यांना दिसणाऱ्या गळफांसांत आपली मान गुंतविली व पेटलेल्या खाईंत देशाचें नांव घेऊन उडी टाकून सतीचें वाण, सुशिक्षित पुरुषहि घेऊं शकतो हें दाखविलें आणि पुढेंहि हेंच दाखविणारी पिढी अबाधित निपजत जाईल यांत आश्चर्य कसलें ! परकीय साम्राज्याच्या युद्धांत सरकार क्षात्रवृत्तीला हांक मारतें त्याला जर ओ मिळते तर खुद्द देशानें ती हांक मारली असतां त्यालाहि ती मिळणारच. पुढाऱ्यांचा बंडखोरीचा गवगवा करणारा 'हिस्टिरिकस' हा आपल्या लेखावरून जरी सरकारपक्षपाती दिसला तरी त्याच्यासारख्यावर ईश्वरकृपा झाल्यास तोहि राष्ट्राला स्वातंत्र्य मिळवून देण्याच्या कार्यांत यथोचित भाग घेणार नाहीं कशावरून ? सरकारपक्षपाती लोक झाले तरी त्यांचे अंगीं पौरुषगुण नसतात असें नाहीं. त्यांच्या वीर वृत्तीचा सर्व उपशम स्वार्थ-बुद्धि कमावण्यांत व ती फलप्रद करण्यांत होतो इतकेंच काय तें दुर्दैव. ज्या वेळीं अमेरिकेच्या यशस्वी उदात्त उदाहरणानें आयर्लंडाला राष्ट्रीय स्वातंत्र्याची चळवळ करावीशी वाटली, तेव्हां स्वयंसेवकांचें जें मोठें सैन्य उभारलें गेलें तें सुशिक्षित लोकांतूनच. त्यांना कवाईत शिकविण्याची व्यवस्था झाली, त्यांच्या पलटणी बनविल्या गेल्या, त्यांचे अधिकारी नेमले गेले, या अधिकारी-वर्गांत बहुतेक पुढारी सामील असून आपाआपल्या योग्यतेप्रमाणें निरनिराळ्या हुद्यांच्या जागा त्यांनीं पत्करिल्या होत्या, आणि "दिवसा हातांत लेखणी घेऊन उत्कृष्ट लेख लिहिणारा अगर रात्रीं पार्लमेंटामधील वादविवादांत वक्तृत्वानें इतरांस दिपवून टाकणारा असा आयरिश देशभक्त सकाळीं पाहावें तों मैदानावर तलवार लटकावून कनिष्ठांकडून कवाईत व सलामी घेत आणि वरिष्ठांना कवाईत व सलामी देत उभा असलेला दृष्टीस पडे." अशा प्रकारचा देखावा हिंदुस्थानांतहि दृष्टीस पडणें हें खरोखर कल्पनातीत आहे काय ?

## बंडखोरीविरुद्ध खरा उपाय

असो. पूर्वी प्रो. सिज्विक यांचा उतारा दिला त्यांत लिहिल्याप्रमाणें जुन्या राष्ट्रीय भावनेचा आपोआप विसर पडेपर्यंत, किंवा नवी राष्ट्रीय भावना उत्पन्न

होऊन ती जुनीचा विसर पाडीपर्यंत; प्रजेचा बंड करण्याचा जन्मसिद्ध नैतिक हक्क जागृतच राहणार. या नव्या भावनेचा उदय हिंदुस्थानांत होऊं लागला आहे. पण तो त्या भावनेचा अद्यापि फक्त अरुणोदय आहे, पूर्ण बिंबयुक्त असा सूर्योदय नाहीं. कारण त्या भावनेला अनुरूप अशी सत्ता व ती वापरण्याला सोयीच्या अशा प्रातिनिधिक संस्था अद्यापि कांहीं निर्माण व्हावयाच्या आहेत व त्यांना अधिक स्वातंत्र्य मिळावयाचें आहे. महाराष्ट्रांत तर, सिज्विकनें म्हटल्याप्रमाणें, जुन्या स्वराज्याचा अद्यापि विसर पडलेला नाहीं. यामुळें नव्या सत्तेविरुद्ध प्रतिकार करण्याची तात्त्विक कल्पना कोणाच्या विचारचर्चेत किंवा संभाषणांत आल्यास ती स्वाभाविकच मानली पाहिजे. ती स्वाभाविक म्हणूनच टिळकांच्या आठवणींत तसलीं संभाषणें प्रसिद्ध करण्यांत कोणास हरकत वाटली नाहीं. आणि पंडित मोतिलाल नेहरू यांनीं बंड करण्याच्या तात्त्विक हक्काचा जो मुंबईस उच्चार जाहीर रीतीनें केला तोहि स्वाभाविक म्हणूनच. केवळ अशा उद्गारांनीं तरुण मुलें अत्याचारास प्रवृत्त होतात हें म्हणणें खोटें आहे. असला बादरायण कार्यकारणसंबंध खरा मानला तर त्याची संगीन सांखळी बादशहांच्या सिंहासनाला जाऊन भिडलेली आहे असा माग लागूं शकतो. कारण बंड करण्याची खरी प्रवृत्ति बंडाची नुसती चर्चा कानांनीं ऐकून उत्पन्न होत नाहीं, तर पारतंत्र्याचा वीट व जुलमाची चीड काळजापर्यंत जाऊन भिडते तेव्हां! म्हणून हें घडून येण्याला स्वतः सरकारच कारणीभूत असतें. वैराग्य हें नुसत्या गुरूपदेशापेक्षां संसारपीडेनेंच अधिक खात्रीनें बाणत असतें. करितां बंडाची भाषा कधीं कानावर येऊं नये असें कोणास वाटत असेल तर त्यानें एकतंत्री सत्तेची संपादणी न करतां लोकांना खरी सत्ता देण्याचाच उपदेश सरकारला करावा. बंड ही एक नैसर्गिक प्रतिक्रिया आहे; व परिस्थितीप्रमाणें समाजांत तें प्रत्येकाला करावें लागतें. प्रजाच तेवढी बंड करते असें नाहीं, राजेहि बंड करतात. इंग्लंडच्या पहिल्या चार्लस राजानें आपल्या पार्लमेंटाविरुद्ध बंड केलें व तिसऱ्या जॉर्जनें आपल्या मंत्रिमंडळाविरुद्ध बंड केलें. जॉर्ज हा मऊपणानें वागतो त्यामुळें त्याचें प्रधानमंडळ शिरजोर झालें आहे, असें पाहून त्याच्या महत्त्वाकांक्षी आईनें त्याला "George be a King" "बाळ, तूं राजा हो!" असा उपदेश केला तो प्रसिद्ध आहे. आधींच राज्यपदावर असलेल्या मुलाला 'तूं राजा हो' या म्हणण्याचा अर्थच हा कीं, तूं आपली सत्ता प्रस्थापित कर म्हणजे प्रधानमंडळाविरुद्ध

बंड कर. मुद्राराक्षसांतहि राजा चंद्रगुप्त याला आर्य चाणक्याविरुद्ध अखेर बंड करावें लागलें असेंच दाखविलें आहे. हल्लीं पुण्याच्या रंगभूमीवर 'राजाचें बंड' या नवीन नाटकाचे प्रयोग सुरू आहेत. त्यांतील काल्पनिक राजाच्या बंडाचें काल्पनिक उदाहरण एका जुन्या संस्कृत नाटकांतहि सांपडतें. कवि म्हणतो—

अत्युच्छ्रिते मंत्रिणि पार्थिवे च
विष्टभ्य पादावुपतिष्ठते श्रीः ।
सा स्त्रीस्वभावादसहा भरस्य
तयोर्द्वयोरेकतरं जहाति ॥

याचा अर्थ राजा आणि मंत्री हे दोनहि सारखेच ताठर आणि महत्त्वाकांक्षी मिळाले असतां राज्यश्रीला म्हणजे निर्णायक सत्तेलाहि पाय खुडकल्यासारखें दोघांच्या खांद्यावर उभें राहावें लागतें. पण स्त्रीस्वाभाविक नाजूक प्रकृतीमुळें ही श्रमाची कसरत तिला सोसत नाहीं म्हणून शेवटीं तिला त्या दोघांपैकीं कोणा एकाचा तरी त्याग सहन करावा लागतो. राजसत्तेनें अधिष्ठान बदलणें याचेंच नांव राज्यक्रांति व तें बदलण्यास भाग पाडणें याचेंच नांव बंड ! मग यथाप्रसंग यथानुकूल त्या बंडांत शस्त्रास्त्रांचा उपयोग असो वा नसो. 'हिस्टिरिकस' सारख्यांनीं हे राजनीतीचे सिद्धांत लक्षांत घेऊन हिंदी पुढाऱ्यांच्या बंडखोरीचा वाष्कळ गवगवा करण्याचें सोडून दिलें तर असल्या प्रश्नांची अशी चर्चा करण्याचेंहि कोणास कारण पडणार नाहीं.

---

## ६५ कोळशाचे चार वळसे

( ता. २८ एप्रिल सन १९२५ )

शुद्धि व संघटन यांच्या वादांत केळकरांवर टीका करतांना टाइम्सकार टिळकांवर विनाकारण कसे घसरले हें मागील लेखांत सांगितलेंच आहे. आज इतर कांहीं गोष्टींचा विचार करूं. अलीकडे कांहीं दिवस टाइम्सकारांनीं हिंदु-मुसलमानी पत्रांतील उताऱ्यांचें भाषांतर देऊन या देशांत धर्मकलह परमावधीला गेला असल्याचें वाचकांस भासविण्याचा प्रयत्न चालविला आहे; जणूं काय या पत्रांतून धर्मकलह हा एकच विषय असतो. हीं पत्रें राजकारणासंबंधानें काय

लिहितात याचेहि उतारे जर टाईम्स देईल तर स्वराज्य मिळविण्याच्या आकांक्षेंत व प्रयत्नांत तीं एक आहेत असेंच वाचकांस आढळून येईल. पण स्वतः हिंदु व मुसलमान हे जितके भांडतात त्यापेक्षां अधिक भांडखोरी टाइम्सला त्या उभयतांच्या गळ्यांत बांधावयाची असते. एकदां एकाला तर दुसऱ्या वेळीं दुसऱ्याला नांवें ठेवणें एवढाच टाइम्सचा धंदा होऊन राहिला आहे. पण या प्रत्येक वेळीं प्रत्येक गारड्यांतला थोडाथोडा खवा उचलून हा वानरशील न्यायाधीश आपल्या तोंडांत टाकीत असतो हें हिंदु व मुसलमान दोघेहि जाणतात.

अँग्लो-इंडियन पत्रकारांनीं मुसलमानांना नांवें ठेवावीं असा एक काळ होऊन गेला. १८५७ सालचें बंड मुसलमानांनींच मुख्यतः केलें अशी तेव्हां समजूत झाली होती. १८७०–७५ चे सुमारास इंग्रजांना हिंदुस्थानांत मुसलमान हेच मुख्य शत्रु असें वाटत असे; व त्या वेळीं मुसलमानांचा असंतोष कसा शमवावा याविषयीं त्या वेळचे प्रमुख इंग्रज मुत्सद्दी यांच्या दरम्यान चाललेले वाद वाचले म्हणजे मौज वाटते; पण कालांतरानें ही स्थिति बदलून हिंदु हेच हिंदुस्थानांतले आपले खरे प्रतिस्पर्धी अशा विचारानें इंग्रजांनीं मुसलमानांची पाठ थोपटण्याचें व हिंदूंच्या पाठीवर, तडाखे देण्याचें धोरण स्वीकारलें आहे. शेवटीं प्रसंग येईल तेव्हां ते दोघांनाहि सारखाच विरोध करणार, व दरम्यान महायुद्धांत तसा प्रसंग आलाहि होता. ‘ गुरूची विद्या गुरूला फळली ’ या गोष्टींतील कुळानें प्रथम सावकाराला फेंः केलें व मागाहून फी मागतांना वकिलालाहि फेंःच केलें तसेंच इंग्रज करणार, पण हिंदु व मुसलमान परस्पर भांडण्याला आज मुसलमानांना पक्षपात दाखविणें अधिक श्रेयस्कर असें इंग्रजांनीं ठरविलें आहे.

हें त्यांचें धोरण सयुक्तिक नाहीं असें कोण म्हणेल ? कोणाहि दोन पक्षांतील भांडण जोरांत चालू राहावयाचें तर ते पक्ष अर्थात् तुल्यबल असले पाहिजेत, पण हिंदुस्थानांत मुसलमान हिंदूंच्या तिसऱ्या हिश्शाइतकेहि नाहींत. आपण संख्येनें थोडे ही गोष्ट मुसलमानांना माहीत आहे. आणि संख्येनें वाढून निदान हिंदूंच्या बरोबरीचे झाल्याशिवाय आपलें चालणार नाहीं हें ते जाणून आहेत. मुसलमानी धर्म स्वभावतःच प्रसरणशील आहे; तथापि हिंदुस्थानांतील विशेष परिस्थितीमुळें आपला धर्म पसरविण्याला मुसलमानांना विशेष प्रयत्न

करणें प्राप्त आहे. पूर्वी, म्हणजे हिंदी स्वराज्याचें निशाण दिसूं लागलें नव्हतें तोंपर्यंत, धर्मप्रसार एवढाच मुसलमानांना त्यांच्या संघटनाला हेतु होता. पण स्वराज्याच्या स्वयंपाकघरांतून धूर निघूं लागतांच अधिक पानें व पत्रावळी आपणास कशा अडवून ठेवतां येतील या विचाराची त्या हेतूंत भरच पडली. एकंदर जगांत मुसलमानांची संख्या वाढली तर ती इंग्रजांना इष्ट आहे असें नाहीं. मुसलमानांची धर्मनिष्ठा किंवा धर्मवेड त्यांना आशिया खंडांत अनेक महत्त्वाच्या नाक्याच्या जागांवर जाणवतेंच आहे. लंडनपासून दिल्लीपर्यंत इंग्रजी प्रभुत्वाची सांखळी जोडण्याला जर मध्यंतरीं कोणाकडून अडचण होत असेल तर ती मुसलमानांची. अर्थात् मुसलमानांचें हितशत्रुत्व इंग्रजांच्या दृष्टीआड होणें शक्यच नाहीं, पण हिंदुस्थानापुरतें बोलावयाचें तर हिंदूंची लोकसंख्या कमी होऊन मुसलमानांची वाढली तर ती इंग्रजांना नकोशी नाहीं. जो कोणी नवा हिंदु मुसलमान होईल त्याच्या नांवानें हिंदी लोकांना स्वराज्य मिळविण्याच्या मार्गांतील बुरुजांवर एकेक दगड आणखी चढेल ही इंग्रजांची अटकळ कांहीं खोटी नाहीं. हिंदुधर्म हा सहिष्णु आहे, कूर्माप्रमाणें तो आपलीं अंगें आंत ओढून घेऊन 'जगलों तर पुरें' असें म्हणणारा आहे, हें इंग्रज जाणतात व त्यांचे गुणहि घेतात. पण त्यामुळें त्यांची दया मात्र त्यांना येत नाहीं.

खिस्ती धर्म हाहि मुसलमानी धर्माप्रमाणें प्रसरणशील असल्यामुळें इंग्रज व मुसलमान यांच्या मनोवृत्ती जुळणें हेंहि स्वाभाविक आहे, नाहीं असें नाहीं. पण कोणतेंहि कारण निर्णायक असलें तरी इंग्रज लोक धर्मांतराच्या कामीं मुसलमानांना पक्षपात करतात ही गोष्ट कांहीं खोटी नाहीं. आपण 'टाइम्स' चेंच उदाहरण घेऊं. देखावा असा कीं, 'टाइम्स'ला हिंदुस्थानांत धर्मद्वेषमूलक कलह नकोत, तर राष्ट्रीय बुद्धीचीच वाढ झालेली त्याला हवी. पण या तत्त्वाविरुद्ध कोणाकडून कसें व किती वर्तन होतें याचा विचार किंवा उल्लेख करण्याची वेळ आली म्हणजे मात्र टाइम्स हिंदूंनाच अधिक नांवें ठेवावयाचा व मुसलमानांना कमी नांवें ठेवावयाचा हें ठरून गेल्यासारखें आहे. दोघींनाहि बोलावयाचें पण लेकीला व सुनेला इतकाच फरक! पं. मदनमोहन मालवीय व लाला लजपतराय यांचीं हिंदुमहासभेंतील भाषणें सौम्य झालीं अशीच टाइम्सनें कबुली दिली आहे, तरी त्यांच्या कपाळीं 'आगीचे काकडे' हें विशेषण ठेवलेलेंच आहे. आणि टिळक व केळकर यांचें नांव निघालें कीं मग तर बोलावयासच नको!

याचें एकच उदाहरण दिलें असतां पुरें होईल. गेल्या पंधरवड्यांत 'टाइम्स'नें शुद्धि व संघटन यांना अनेक वेळां नांवें ठेविलीं. पण पक्षपातित्वाची लाज वाटूनच कीं काय त्यानें मुसलमानांच्या 'तबलिघ'च्या चळवळीवरहि एक वेळ टिका केली. पण या टीकेंत राष्ट्रीय बुद्धिघातक अशा धर्मांतराच्या ह्या चळवळीचा कडक निषेध न करतां 'टाइम्स'नें फक्त इतकेंच म्हटलें आहे कीं, मुसलमान मिशनरी लोक हिंदूंना बाटविल्याचे जे आंकडे प्रसिद्ध करतात ते किंचित् फुगविलेले असतात! मुसलमान मिशनऱ्यांनीं संघटना कसकशी चालविली आहे याचें वर्णन स्वतः 'टाइम्स'नेंच दिलें आहे. एका जम्मू शहरांत पांचशें हिंदु मुसलमान होतात! केवढा हा खऱ्या धर्मवृद्धीचा विजय! धर्मांतराच्या या घाऊक व्यापारांत कांहीं कपट, दगेबाजी किंवा जोरावारी असेल अशी भोळ्या 'टाइम्स'ला शंकाहि येत नाहीं. तसेंच कोट्यवधि अस्पृश्य हिंदु मुसलमान करून घेण्याची मुसलमानांची प्रतिज्ञा 'टाइम्स'ला माहीत आहे. पण त्यांतहि त्याला वावगें असें कांहींच दिसत नाहीं.

मग येऊन जाऊन 'टाइम्स'ला वावगें कोणतें दिसतें तर हिंदूंची शुद्धि व संघटनेची चळवळ! मुसलमानांच्या मिशनरी चळवळीप्रमाणें हिंदूंची धर्मरक्षक चळवळ ही न्याय्य व कायदेशीर आहे; मात्र दोघांनींहि ती शांतपणें व सत्याला स्मरून करावी असें तरी एक 'टाइम्स'नें म्हणावें; किंवा दोनहि चळवळी आज राष्ट्रीय–बुद्धिसंवर्धनाच्या आड येतात असें म्हणून दोहोंचाहि त्यानें सारखाच निषेध करावयास पाहिजे होता. पैकीं त्याला दुसरा मार्ग अर्थातच स्वीकारतां येत नाहीं. कारण तबलिघ व तंजीम आणि शुद्धि व संघटन हीं दोनहि जर वाईट, तर मिशनऱ्यांची चळवळ तरी योग्य कशी ठरते! हिंदु–मुसलमान झाला किंवा बाटलेला मुसलमान पुनः हिंदु झाला तर त्यानें मात्र धर्मकलह माजतो! आणि ख्रिस्ती लोकांनीं हिंदु व मुसलमान दोघांनाहि बाटविलें तरी तें चालतें, तो निवळ शुभवर्तमानाचा शांततामय प्रसार! त्यानें धर्मबुद्धींत बिघाड होत नाहीं, राष्ट्रांतील कलह वाढत नाहींत असें कसें म्हणतां येईल!

या दुसऱ्या मार्गाचा अवलंब 'टाइम्स'सारख्यांना करणें त्यांच्या हिताचें नसल्यामुळें फक्त पहिलाच मार्ग उरतो पण तो अनुसरतांना शांतवृत्तीचा अवलंब एकजण करतो व दुसरा करीत नाहीं असें म्हणण्यास सहजच वाव सांपडतो. आणि तो वाव साधूनच 'टाइम्स'नें हिंदु पुढाऱ्यांवर तेवढी शिस्त

धरून मुसलमानांचा प्रच्छन्न पक्षपात चालविला आहे. टिळकांनीं लखनौ येथें मुसलमानांच्या पदरांत झुकतें माप टाकण्याची तयारी दाखविली तरी ती फुकट! लजपतराय व मालवीय यांनीं हिंदुमहासभेसारख्या उत्साहजनक प्रसंगीं सौम्य भाषणें केलीं तरी तीं फुकट! आणि केळकरांनीं "मी धर्मद्वेषापासून व जातिद्वेषापासून अलिप्त आहें" असें जीव तोडून शंभर वेळां सांगितलें किंवा तसें प्रत्यक्ष आचरण केलें तरी तेंहि फुकट. उलट मुसलमान मिशनरी लोकांचें वक्तृत्व कशा प्रकारचें असतें हें 'टाइम्स'ला माहीतच आहे. पण त्याबद्दल तो कधीं चकार शब्दहि काढणार नाहीं. पण केळकरांनीं केवळ युक्तिवादाचा आश्रय करून शुद्धि व संघटन हीं समर्थनीय ठरविलीं तर त्यांचे वाभाडे काढण्यास मात्र 'टाइम्स' तयार! 'टाइम्स'ला हिंदु पुढाऱ्यांच्या डोळ्यांतील धर्मद्वेषाचें कुसळ दिसतें, पण मुसलमानांच्या डोळ्यांतील मुसळ दिसत नाहीं!

केळकरांनीं अहमदाबाद येथील भाषणांत मुसलमान मिशनऱ्यांच्या धर्मप्रसाराच्या रीतीला जीं चार विशेषणें लाविलीं त्यांचा आम्ही फिरून उच्चार करतों. तीं विशेषणें अशीं, 'धीट, सूक्ष्म, मर्मस्पर्शी व बऱ्यावाईटांची चाड कमी बाळगणारी." या विशेषणांत असत्य असें काय आहे? तीं विशेषणें सत्य असतांहि मुसलमान मिशनऱ्यांना त्यांचा राग आला तर तो योग्य कीं अयोग्य याचा विचार 'टाइम्स'लाच करावा लागेल. हिंदुधर्मावर असे हल्ले होत असतां त्याच्या शरीराचा पळापळानें व कणाकणानें ऱ्हास होत असतां, हिंदु पुढाऱ्यांनीं आपल्या बंधूंना सावधगिरीचा इषाराहि देऊं नये व प्रतिस्पर्धी धर्मप्रसारकांचे प्रयत्न कसकसे चालले आहेत याची माहितीहि देऊं नये एवढी चोरी काय म्हणून? अर्थात् हिंदु पुढारी प्रतिपक्षाच्या धोरणाविषयीं व आचरणाविषयीं विधानें करतात तीं खरीं कीं खोटीं एवढाच प्रश्न शिल्लक उरतो. महाराष्ट्रांत उर्दू व हिंदी दोनहि भाषांचा प्रचार कमी असल्यामुळें एतद्विषयक वाङ्मय मराठी वाचकांना सुदैवानें अद्यापि फारसें परिचित नाहीं. परंतु उत्तर-हिंदुस्थानांत हा वाद बराच वाढला असल्याकारणानें हिंदी वाचकांना असलें पुष्कळसें वाङ्मय परिचित आहे.

या बाबतींत एकच उदाहरण किंवा आधार द्यावयाचा तर तो कोल्हापूर येथील 'आर्यभानु' छापखान्यामध्यें आर्यसमाज-शाखेच्या विद्यमानें गतवर्षी प्रसिद्ध झालेलें एक छोटेसें मराठी पुस्तक आहे तें कोणींहि पाहावें. या पुस्तकाचें

नांव ' अलार्मबेल ' अर्थात् ' भयसूचक घंटा ' असें आहे. त्यांत ख्वाजा हसन निजामी यांच्या ' दाई ए-इस्लाम ' या चोपड्याचें भाषांतर श्री. हरि सखाराम तुंगार यांनीं केलेलें दिलें आहे. तेवढें वाचलें असतां हिंदु लोकांना बाटविण्याचे मुसलमान मिशनऱ्यांचे प्रयत्न कसे चालले आहेत याची उत्कृष्ट कल्पना येईल. आणि केळकरांनीं केलेलें वर्णन यथार्थ व सौम्य असेंच कोणासहि आढळून येईल. या पुस्तकांत हिंदूंना मुसलमान करण्याचे एकंदर ३५ प्रकार सांगितलेले आहेत. ते सर्व येथें सांगत बसण्याचें कारण नाहीं, परंतु कांहीं गोष्टींचा उल्लेख करणें जरूर वाटतें.

कोणत्याहि धर्माच्या प्रसाराचें काम शंकास्पद न व्हावयाचें तर तें प्रसिद्धपणें झालें पाहिजे. हिंदु मिशनरी हे पतितपरावर्तन प्रसिद्धपणें चारचौघांसमक्ष किंवा जाहिरात देऊनहि करतात. पण हिंदूंना मुसलमान करण्याचें काम प्रायः गुप्तपणें चालतें. वरील ३५ कलमांपैकीं कलम २९, ३० व ३१ हीं खालीं दिल्याप्रमाणें आहेत—( २९ ) शक्य तोंपर्यंत शास्त्रार्थ करण्याचें टाळावें व गुपचूपपणें धर्मप्रसार करण्याची खबरदारी राखावी. ( ३० ) जेथें जेथें काम सुरू झालें असेल अगर जोरांत चाललें असेल त्याची बातमी वर्तमानपत्रांत प्रसिद्ध न होईल अशी दक्षता राखावी. ( ३१ ) वर्तमानपत्रद्वारें कोठें व किती लोक मुसलमान केले याबद्दल एक अक्षरहि जाहीर होतां कामा नये. कलम ११ याखालीं मुसलमान भिकाऱ्यांचा उपयोग धर्मप्रसाराकरितां कसा करून घ्यावा हें सांगितलें आहे. त्यांत मुसलमान भिकारणीकडे हिंदूंच्या घरांतील गुप्त बातम्या काढण्याचें काम सोंपविण्यांत आलें आहे. गुप्त कामाची अशी काळजीपूर्वक व्यवस्था झाल्यावर मुसलमान कलावातिणींना मुद्दाम इस्लामी धर्मविषयक गज्जल पाठ करण्याची शिफारस झाल्यास आश्चर्य नाहीं !

कॉंग्रेसमध्यें धर्मनिरपेक्ष असेंच राजकारण मुसलमान पुढाऱ्यांच्या मनांत असतें असें आम्ही समजतों, परंतु हसन निजामी यांचा लेख पाहतां हिंदुसंघटन, शुद्धि व अस्पृश्योद्धार या हिंदूंच्या चळवळी बंद पाडाव्या असा कॉंग्रेसमधील मुसलमानांना इषारा आहे. हसन निजामी म्हणतात, कॉंग्रेसच्या मुसलमान पुढाऱ्यांचें प्रथम अत्यंत महत्त्वाचें कर्तव्य ठरतें तें हें कीं, " कॉंग्रेसच्या पडत्या फळाची आज्ञा घेऊन अस्पृश्योद्धाराचा प्रश्न त्यांनीं तातडतोब हातीं घ्यावा व राष्ट्रीय सभेच्या आज्ञेप्रमाणें सर्व अस्पृश्य वर्ग इस्लाम-धर्मा-

नुयायी बनवावा ! " पण म. गांधीप्रणीत अस्पृश्योद्धारविषयक काँग्रेसचा ठराव जो नीट वाचील त्याला त्याचा उपयोग 'धर्मांतर करविण्याची सदनच' असा केला जाईल हें कोणाच्या तरी स्वप्नीं आलें असेल काय ! वास्तविक हे ठराव हिंदुधर्मविषयक म्हणून मुख्यतः हिंदूंना उद्देशूनच लिहिलेले आहेत. पण त्यांचा अर्थ विपरीत करणें कसें शक्य आहे हें वरील उताऱ्यावरून आपोआप दिसून येईल.

शेवटीं एकच उदाहरण देऊन हा विषय पुरा करूं. खिलाफतीच्या सुप्रसिद्ध चळवळीचा हेतु मुख्यतः राजकीय होता अशीच सर्वांची समजूत. खलिफा हा स्वतंत्र राहावा, इंग्रजांनीं किंवा इतर कोणीं त्याचें राज्य घेऊं नये. हाच या चळवळीचा अर्थ. म्हणून त्यांतील राजकीय भावनेला हिंदूंची सहानुभूति सहजच होती आणि म्हणूनच त्यांनीं ती सक्रिय रीतीनें प्रगटहि केली, पण खिलाफत शाबूत राहावी याचा अर्थ हिंदुस्थानांतील सर्व हिंदु मुसलमान व्हावेत असा नव्हे ! व तसा तो त्या वेळींहि कोणीं केला असता तर सामान्य हिंदु पुढारीच काय पण महात्मा गांधी यांनीं देखील या चळवळीला इतकें उचलून धरलें नसतें. पण पोटांतील पाय कोणास दिसणार ? कारण हसन निजामी हे याविषयीं काय म्हणतात पाहा: "खिलाफतीच्या पुढाऱ्यांना व मुसलमानांना हिंदूंप्रमाणें निराळी संघटनेची चळवळ करावयास नको, कारण खिलाफत चळवळ म्हणजेच इस्लामी संघटनेची चळवळ होय." खिलाफतीच्या चळवळीशीं सहानुभूति दाखविणारांची शोभा वरील उताऱ्यानें किती उत्कृष्ट केली आहे !

खिलाफतीची चळवळ व तबलिघ म्हणजे हिंदूंना बाटविण्याची चळवळ या सख्ख्या भांवडाप्रमाणें आहेत. एवढेंच नव्हे तर तें एक जुळें मूलच होय ! व याचा जन्म सन १९२१ सालीं झाला ! या वर्षाचें महत्त्व हेंच कीं, सगळें भोळें जग हिंदु–मुसलमानांची एकी परमावधीला गेली असें तेव्हां मानित होतें व एका अर्थानें ती गोष्ट खरीहि आहे, पण खिलाफत चळवळ ही एक धर्मपक्षपाती म्हणून राष्ट्रीय सभेचा व तिचा परस्परावलंबी संबंध ठेवूं नये असें जे थोडे जाणते लोक तेव्हां म्हणत होते त्यांचें शहाणपण आतां जगाच्या लक्षांत येईल. इकडे राजकारणाची चाल दाखवून हिंदु समाजाचा हात उजव्या हातांत धरावयाचा, पण डाव्या हातानें तबलिघचें म्हणजे

धर्मांतराच्या चळवळीचें कार्य विशेष व नव्या जोरानें सुरू करावयाचें हें मित्रप्रेम अलौकिक नव्हे काय ! ' म. गांधींसारख्या हिंदु पुढाऱ्याला आम्हीं आपला गुरु केला ' यांत हिंदुधर्माला आपण मोठा मान दिला असें म्हणणाऱ्या वावदूकांनीं तबलिघच्या चळवळीच्या उगमाचा काळ व खिलाफतीच्या चळवळीचें काँग्रेसमध्यें माजविलेलें स्तोम या गोष्टींचा मेळ कसा पडतो याचा विचार उघडच केलेला नव्हता. असो. कोळसा उगाळावा तितका काळाच. पण ' टाइम्स 'कारांनीं हिंदू पुढाऱ्यांवर धर्मद्वेषबुद्धीच्या आरोपाचे शिंतोडे उडविण्याचें काम चालविलें असल्यामुळें या कोळशाचे चार वळसे उगाळणें आम्हांला भाग पडलें.

---

## ६६ केसरीकार व ज्ञानकोशकार

### ( एका खोडसाळ टीकेस उत्तर )

( केसरी, ता. २३ जून १९२५ )

'विद्यासेवक' मासिक पुस्तकाच्या गेल्या अंकांत ज्ञानकोशाचे संपादक ( डॉ. श्री. व्यं. केतकर ) यांनीं ' केसरीकारांची ज्ञानकोशविषयक वृत्ति ' या मथळ्याखालीं एक अत्यंत खोडसाळ असा लेख लिहिला आहे. सदर लेखाचा अनुचितपणा लक्षांत येण्याला वाचकांनीं तो स्वतःच संपूर्ण वाचावयास पाहिजे. परंतु केसरीवर केलेल्या आक्षेपांस उत्तर देण्याला जरूर तेवढींच विधानें जमेस धरून आम्हास या लेखाचा निर्वाह करावयाचा आहे.

ज्ञानकोशकारांचा मुख्य आक्षेप असा कीं, केसरीनें त्यांच्या ज्ञानकोश ग्रंथाची उपेक्षा केली ! डॉ. केतकर यांना आपल्या ग्रंथाचें महत्त्व ज्या मानानें प्रचंड वाटतें त्या मानानें अर्थात् उपेक्षाहि दुःसहच वाटणार. पण आधीं या उपेक्षेचा आक्षेप सर्वस्वीं निर्मूल आहे. शिवाय त्यांनीं या उपेक्षेचीं जीं अनेक कारणें किंवा लक्षणें दिलीं आहेत तीं पाहिलीं म्हणजे, तर या टीकेच्या बाष्कळपणाविषयीं जितकें हंसूं येतें तितकाच तिच्या खोडसाळपणाचा तिटकाराहि येतो.

### कृतघ्न भिक्षुक !

हल्लींच्या केसरीकारांनीं ज्ञानकोशाची उपेक्षा केली हें भासविण्याला, टिळकांनीं त्या ग्रंथाची विशेष आस्था बाळगिली ही विरोधमय भूमिका सहजच

उपयोगीं पडणारी आहे. हल्लींच्या केसरीकारांनीं ज्ञानकोशाची कितीहि स्तुति केली तरी तिची किंमत ज्ञानकोशकारांना वाटत नाहीं हें त्यांनीं या लेखांत परोपरीनें सांगितलें आहे. अशी स्थिति खरीच असती तर उपेक्षेचा रागहि येण्याचें कारण नव्हतें. पण इकडे मनांतून आपल्या कार्यांचा परामर्ष तर घेतला जावा अशी इच्छा व अपेक्षा, आणि फिरून तो परामर्ष घेतला गेला तरी त्याची आपणास किंमत वाटत नाहीं असें तुच्छताबुद्धीचें प्रदर्शन, हीं परस्पर कशीं सुसंगत आहेत हें ज्ञानकोशकारच जाणोत! पण या विसंगतीनें त्यांनीं 'पोटभर जेवून उठतांना अन्नाला नांवें ठेवणाऱ्या' कृतघ्न भिक्षुकाचेंच अनुकरण केलेलें आहे. "टिळक व महाजनी हे ज्ञानकोशकारांची पाठ थोपटण्याला आज हयात नाहीत, आणि डॉ. भांडारकर जिवंत आहेत पण ते प्रकृतीनें निरुपयोगी, असें झाल्यानें योग्य माणसांच्या अभिनंदनाच्या असंभवामुळें आपणास आपल्या कर्तृत्वाचेंहि महत्त्व वाटेनासें झालें आहे" असे निराशेचे उद्‌गार डॉ. केतकर यांनीं दिमाखानें काढले आहेत. जणूं काय महाराष्ट्रांत टिळक, महाजनी, भांडारकर यांच्या जोडीला बसण्याला स्वतः डॉ. केतकर हेच काय ते एकटे चौथे विद्वान् व बाकी सर्व शून्यांधकार! पण या मानभावी निराशेच्या रडण्यानें डॉ. केतकरांनीं योजिलेल्या प्रतिष्ठेचें घर त्यांना सहज मिळेल असें मात्र त्यांनीं समजूं नये. कुठें टिळक, भांडारकर व कुठें केतकर!

डॉ. केतकर लिहितात कीं, "अनेक वर्षांच्या परिचयामुळें त्यांच्या अमेरिकेस जाण्याला जे गृहस्थ कारणीभूत झाले त्यांत लोकमान्य प्रामुख्यानें असल्यामुळें ज्ञानकोशाच्या मुख्य संपादकाविषयीं टिळकांना प्रेमबुद्धि व अभिमान वाटत होता." टिळकांच्या निकट परिचयाच्या लोकांनाहि हें शुभवर्तमान अपूर्वच वाटेल! अमेरिकेला धाडण्याला हाच एक मोहरा योग्य असें म्हणून टिळकांनीं डॉ. केतकरांची निवडणूक केली असें आमच्या तरी ऐकिवांत नाहीं. एरवीं अमेरिकेंत जाणारे पुष्कळ तरुण लोक चालीप्रमाणें टिळकांचा आशीर्वाद घेऊन जात असत ही सामान्य गोष्ट आम्हांस माहीत आहे. पण लोकमान्यांचें विशेष प्रेम व ममत्व स्वतःला नसतें चिकटवून घेण्यांत डॉ. केतकरांचा हेतु एवढाच दिसतो कीं, या प्रेमामुळें टिळक होते तोंपर्यंत त्यांनीं ज्ञानकोशाचा विशेष परामर्ष घेतला व त्यांच्या मरणानंतर केळकरांनीं तसा परामर्ष घेतला नाहीं. हें सकारण म्हणून वाचकांस भासवावें! पण केसरीद्वारां परामर्ष घेणें

हाच त्यांचा मुख्य मुद्दा असल्यास त्यांना विघातक अशी एक गोष्ट डॉ. केतकर यांच्या लक्षांत आली नाहीं ती ही कीं, ज्ञानकोशाची कल्पना निघण्याच्या फार पूर्वींपासून आतांपर्यंत केळकर हेच प्रायः केसरीचे संपादक आहेत. टिळकांच्या हयातींत केसरीमध्यें ज्ञानकोशासंबंधीं मजकुराला जो वाव मिळाला आहे तोहि केळकरांनींच दिलेला होता ! केळकरांची इच्छा नसतां तो वाव देण्यास टिळकांनीं केळकरांना भाग पाडलें असला कांहीं पुरावा डॉ. केतकर यांजपाशीं असल्यास त्यांनीं तो जरूर प्रसिद्ध करावा.

## खरी मदत केळकरांचीच

पण या बाबतींत वस्तुस्थिति काय आहे हें एकदांच सांगून टाकलेलें बरें. टिळकांच्या हयातींत ज्ञानकोशासंबंधीं मजकूर केसरींत चार वेळां आला. त्या तारखा येणेंप्रमाणें ( १ ) १९-६-१७; ( २ ) १८-१२-१७; ( ३ ) १-१०-१८; ( ४ ) १७-१२-१८. हे चारहि लेख डॉ. केतकर यांच्याच सहीचे आहेत व ते ज्ञा. को. योजनेच्या प्रसिध्द्यर्थ आहेत. हें सांगावयाचें कारण इतकेंच कीं, टिळकांनीं ज्ञानकोशाचा पुष्कळ परामर्ष घेतला या केतकरांच्या विधानावरून स्वतः टिळकांनीं याविषयीं केसरींत अनेक लेख लिहिले असा वाचकांस भ्रम होतो तो दूर व्हावा. त्यांतूनहि एक गोष्ट विशेष सांगण्याची ती ही कीं, टिळकांच्या हयातींत जे केतकरांचे ४ लेख प्रसिद्ध झाले म्हणून वर सांगितलें त्यांतले नं. ३ व ४ हे तर टिळक विलायतेस गेल्यावरच प्रसिद्ध झाले. अर्थात् ते लेख तरी टिळकांच्या भिडेमुळें घातलेले नाहींत तर स्वतः संपादकाच्या सहानुभूतीनें ! ज्ञानकोशाचा हा काळच असा होता कीं, प्रत्यक्ष ग्रंथ असा अद्यापि प्रसिद्धच व्हावयाचा होता, यामुळें भागीदारांना काय काम चालू आहे याचीच फक्त माहिती मिळणें जरूर होतें; व ती माहिती देण्याला डॉ. केतकर यांना भरपूर वाव टिळक असतांना त्यांच्या आग्रहाशिवाय व ते नसतांना संपादकांच्या स्वयंस्फूर्त सहानुभूतीनें दिला गेला, उपेक्षा किंवा आबाळ केली गेली नाहीं.

"सूचि" हा पहिला ग्रंथ प्रसिद्ध झाला तेव्हां केळकर हे विलायतेंत होते. ते परत आल्यावर व टिळकांच्या मृत्यूनंतरहि ज्ञानकोशाचे भाग अभिप्रायाला पाठविण्यांत येऊं लागल्यानंतर, अर्थात् कमजास्त उशीरानें, कांहींचें परीक्षणहि करण्यांत आलें. हे भाग प्रसिद्ध होण्यांत केसरीकडे अभिप्रायार्थ पाठविण्यांत जितकें आगेंमागें झालें व अव्यवस्था घडली तितकी अव्यवस्था परीक्षणांत

खास घडली नाहीं. सन १९२२ सालीं ज्ञानकोशमंडळापैकीं कर्वे यांचें एक चर्चात्मक पत्र आलें तेंहि केसरींत छापलें होतें. १९२३ सालीं "वेदविद्या" या विभाग ग्रंथाचें सविस्तर परीक्षण देण्यांत आलें. तसेंच १९२४ सालीं 'बुद्धपूर्व जग' या विभागाचें परीक्षण व फिरून त्याच वर्षात 'विद्यासेवक' नामक जें मासिक पुस्तक ज्ञानकोशानें सुरू केलें त्याच्या स्वागताच्या निमित्तानें, स्वतः ज्ञानकोशाचा गौरवपूर्ण व अभिनंदनपर उल्लेख आला होता. चालू सालीं प्रसिद्ध झालेल्या कांहीं विभागांची पोंच दिलेली आहे. पण प्रसिद्ध झाले असे कित्येक विभाग केसरीकडे अद्यापि अभिप्रायाला आलेलेच नाहींत ! अर्थात् परीक्षण यथावकाश कांहीं झालें व कांहीं पुढें होणार आहे. पण ग्रंथच न आले तर परीक्षण तरी कसें व्हावें ? बरें, ज्ञानकोशासंबंधीं केसरींतील परामर्षाचे गौरवपूर्ण उल्लेख केवळ औपचारिक असते तर डॉ. केतकर यांना कुरकुर करण्यास कदाचित् जागा असती. परंतु तसें घडलेलें नाहीं, व त्याचा प्रत्यक्ष पुरावा म्हणून आम्ही दोनतीन उतारे खालीं देतों.

## पदरांत पुराव्याचें माप घ्या

'वेदविद्ये' च्या विभागाचे परीक्षणांत केसरीनें दोन सवादोन कॉलम खर्ची घातले आहेत. त्यांतील एक उल्लेख असा आहे "अशा रीतीचें विवेचन पाश्चात्य किंवा भारतीय विद्वानांनीं कोठें केलेलें नाहीं. ग्रंथकारांनीं मांडलेले सिद्धान्त अगदीं नवे, फार महत्त्वाचे, आणि मतभेद व वाद उत्पन्न करणारे आहेत. तथापि त्या योगानें वाचकांच्या चिकित्सक बुद्धीला चालना मिळणार असल्यामुळें तज्ज्ञांनीं व संशोधकांनीं तिकडे अवश्य लक्ष पुरवावें एवढें आम्ही सुचवितों."

सन १९२४ सालीं 'बुद्धपूर्वजग' या विभागाचें परीक्षण करतांना खालील वाक्य लिहिलेलें वाचकांस आढळेल. "एकंदरींत बुद्धपूर्व जग हा ग्रंथ मराठी भाषेंत अपूर्व झाला आहे."

याच सालीं 'विद्यासेवका' चें केसरीनें जें स्वागत केलें त्यांतील खालील उतारा डॉ. केतकर यांस आम्ही सादर करतों.:—

"महाराष्ट्रीय ज्ञानकोश प्रकाशित करण्याचें महत्त्वाचें कार्य ज्ञानकोशमंडळानें चालविलें आहेच. ज्ञानकोशाच्या निरनिराळ्या विषयांवर त्यांतील दोष दाखविणाऱ्या प्रतिकूल टीका होतील त्यांस उत्तर देणें, आणि शुद्ध भौतिक शास्त्रें व यंत्रकला वगळून बाकीचीं शास्त्रें, विद्या व कला यांवर स्वतंत्र लेख

लिहिणें, ह्या उद्देशानें ज्ञानकोशमंडळाच्या संपादक वर्गानेंच ' विद्यासेवक ' चालू महिन्यापासून सुरू केलें आहे. विद्यासेवकाकडून महाराष्ट्राची सेवा त्याच्या नांवास साजण्यासारखी होईल अशी उमेद बाळगण्यास हरकत नाहीं. "

( केसरी ३०-९-२४. )

ज्ञानकोशाला केळकर यांनीं, साहित्यसंमेलनाचे अध्यक्ष या नात्यानें केलेल्या भाषणांत, अवघ्या ५।४ ओळीच दिल्या अशी तक्रार केतकरांनीं केली आहे. पण त्या ५।४ ओळींत किती उत्साहपूर्ण स्तुति व उत्तेजन आहे, त्यांत ' अंगचोर ' पणा मुळींच कसा नाहीं, हें वाचकांस कळावें म्हणून मुद्दाम त्या पांच ओळी खालीं देत आहें. " डॉ. केतकर यांच्या प्रस्तावना खंडांतील ' हिंदुस्थान आणि जग ' हा ग्रंथहि जुन्या इतिहासाच्या दृष्टीनें वाखाणण्यासारखा आहे. केतकर यांचा ज्ञानकोश प्रसिद्ध झालेल्या योजनेप्रमाणें संपूर्ण झाल्यास मराठी भाषेची ती बिनमोल सेवा घडून येणार आहे. "

असले उतारे देण्याचें एरवीं कारण नव्हतें. पण पुराव्याचें माप पदरांत घालणें जरूर झालें. कारण टिळकांच्या मृत्यूनंतर ज्ञानकोशाकडे " लोकांचें लक्ष ओढण्याची क्रिया फारच कमी झाली व झाल्यास नाखुषीनें व अंग चोरून होऊं लागली " असा निराधार बाष्कळ आरोप डॉ. केतकर यांनीं केसरी-कारांवर केला आहे. केसरीकारांच्या मनांत ज्ञानकोशाविषयीं वैर असतें तर वरील उताऱ्यांत लिहिलेले गौरवपर शब्द त्यांजकडून कधींच लिहिले गेले नसते. त्यांनीं तसें लिहिण्याला भाग पाडण्यास त्यांच्या मानगुटीवर तेव्हां कोणता समंध बसला होता ! असो; आमचे हे वरील उतारे व डॉ. केतकर यांच्या आक्षेपाची द्वाड भाषा एकत्र वाचल्यास ' कृतघ्न भिक्षुका'ची जी उपमा आम्हीं त्यांस प्रारंभीं दिली आहे ती किती समर्पक आहे हें वाचकांस कळून येईल.

## व्यक्तिविषयक आरोप

पण डॉ. केतकर यांच्या टीकेला व्यक्तिविषयक भावनांची मूळ स्फूर्ति असल्यामुळेंच त्यांच्या हातून असले निर्मूल आक्षेप आणण्यांत आले. कसें तें पाहा. " लो. टिळकांच्या निधनानंतर केसरीची ज्ञानकोशविषयक वृत्ति पालटली," असें विधान डॉ. केतकर यांनीं केलें आहे; व लगेच त्यापुढें त्यांच्या मतें त्याला घडलेलें कारणहि दिलें आहे ! तें असें कीं, "कॉंग्रेस डेमोक्रॅटिक पक्षातर्फे केळकर व डॉ. केतकर या दोघांचीं नांवें १९२० सालीं पुणें शहरा-

तर्फे मुंबई-कौन्सिलच्या निवडणुकींत उमेदवार म्हणून प्रसिद्ध करण्यांत आलीं होतीं व त्यांपैकीं या पक्षातर्फे नक्की निवडणूक कोणाची व्हावयाची हेंहि टिळकांच्या निधनापर्यंत ठरलें नव्हतें." डॉ. केतकर म्हणतात, "त्या काळापासून केसरीच्या ज्ञानकोशाविषयक वृत्तांत फेरबदल झाला. व कोशाचा उल्लेख होतां होईतों केसरींतून कमी व्हावा अशी प्रवृत्ति होऊं लागली." वरील विधानांत डॉ. केतकर यांना काय सुचवावयाचें आहे तें अगदीं उघड आहे. काँग्रेस डेमोक्रॅटिक पक्षातर्फे कौन्सिलांतील पुणें शहराच्या जागेकरितां ते एक उमेदवार म्हणून स्वतः पुढें आले होते ही गोष्ट खरी. आणि त्यांचेंच काय पण या पक्षातर्फे कोणत्याहि मतदारसंघांत जो जो कोणी उमेदवार म्हणून उभा राहिला त्याचें त्याचें नांव केसरीमध्यें उमेदवाराच्या यादींत प्रसिद्ध झालें होतें. पण केळकरांच्या ऐवजीं डॉ. केतकरांना उमेदवार म्हणून कायम करण्याची टिळकांची इच्छा असल्याची जी गर्भित सूचना केतकरांनीं केली आहे ती सर्वस्वीं असत्यमूलक आहे. पुण्यांतलें एकादें पोरहि या सूचनेला हंसेल !

या बाबतींत एक गोष्ट आम्हांस पक्की आठवते ती अशी कीं, डॉ. केतकर यांनीं मात्र या सुमारास एक धाडसी व बढाईखोर पत्र लिहून टिळकांकडे धाडलें. त्यांत त्यांनीं असें लिहिलें होतें कीं, 'मी केळकरांना निवडणुकींत लीलेनें सहज चारीमुंडे चीत करीन असा माझा आत्मविश्वास आहे. याकरितां उमेदवार म्हणून न राहण्याविषयीं केळकरांना तुम्ही सल्ला द्या व मला उमेदवार निवडा ' ! परंतु केतकरांनीं टिळकांना असलें पत्र लिहिलें यावरून टिळकांच्या मनांत केळकरांऐवजीं केतकरांना उमेदवार म्हणून निश्चित करण्याचें आलें होतें असें सिद्ध कसें होणार ? आम्हाला एवढेंच स्मरतें कीं, या पत्राचा उघड उपहास करून टिळकांनीं तें पत्र केळकरांचेच स्वाधीन केलें ! तें कसेंहि असो, केतकरांनीं दिलेल्या या माहितींत अशी कोणतीच गोष्ट नाहीं कीं, जीमुळें ज्ञानकोशावर अप्रसिद्धीचें दडपण घालण्याइतकें केतकरांचें वैर केळकरांनीं मनांत बाळगावें ! केतकरांच्या उमेदवारीची किंमत केळकर केव्हांहि पूर्णपणें जाणून होते. बरें, पुढें असहकारितेमुळें केळकरांनीं उमेदवारीचा राजीनामा दिला तेव्हां, आणि निदान यंदा फिरून स्वराज्य पक्षानें आपले उमेदवार निवडणुकीस उभे केले तेव्हां, हे बढाईखोर केतकर कां दडून बसले ? केळकरांना ' सहज चारीमुंडे चीत ' करण्याची ज्यांना खात्री त्यांना आपटे-

भोपटकरांच्या चढाओढींत पुष्कळच फायदा झाला असता. पण आम्ही चुकलों! ते टिळक व ते केतकर अशीच काय ती जोडी जगांत होऊन गेली! रंडक्या महाराष्ट्रांत टिळकांच्या मृत्यूनंतर, आपल्या बरोबरीचा पुरस्कर्ता नाहींसा झाल्यामुळें, डॉ. केतकरांनीं निवडणुकीवर तुच्छतेनें सहजच पाठ फिरविली असावी!

## बडोद्यास काय घडलें

असलाच एक दुसरा व्यक्तिविषयक बाष्कळ आक्षेप, केळकरांच्या उपेक्षेचें निदर्शक म्हणून, डॉ. केतकर यांनीं गंभीरपणें पुढें आणलेला आहे! ते म्हणतात, "ज्ञानकोशाच्या संपादक मंडळाचा अपमान व उपेक्षा करण्याची संधी केळकरांनीं वेळोवेळीं साधली!" आणि याला पुरावा काय तर म्हणे "ज्ञानकोशाचे प्रतिनिधि म्हणून दाते हे बडोद्याला साहित्यसंमेलनास (१९२१ नोव्हें.) गेले असतां त्यांना विषयनियामक मंडळांतून वगळण्याची खटपट झाली, व संमेलनाच्या सभासदांना सयाजीरावमहाराजांनीं आमंत्रण केलें त्यांतूनही ते वगळविले जात होते"! जणूं काय या गोष्टी संमेलनाचे अध्यक्ष केळकर यांनींच मुद्दाम घडवून आणल्या! कशास काय संबंध! पण ही गोष्ट केळकरांनीं केली असें केतकर कोणत्याहि माहितीवरून म्हणत असले तरी तें निखालस निखालस खोटें आहे असें आम्हीं सांगतों. दाते यांना अशा रीतीनें वगळण्यांत केळकरांना स्वतःचें काय हित साधावयाचें होतें हें केतकरांनीं नुसतें दर्शाविलें असतें तरी बरें झालें असतें! केळकर स्वतः अध्यक्ष असल्यामुळें विषयनियामक मंडळांतील व राजवाड्यांतील त्यांची जागा तरी सुरक्षित होतीना! दाते ती अडवूं शकत नव्हते. मग केळकरांनीं दाते यांच्या आड कां यावें? याचा खुलासा केतकर करतील तर बरें होईल. कदाचित् असा संभव आहे कीं, ज्ञानकोशमंडळ पुण्यास नुकतेंच स्थापन झालें असून दाते यांची त्या वेळीं संमेलनाच्या चालकांना व्यक्तिशः असावी तितकी माहिती नसेल. तसेंच ते ज्ञानकोशाचे 'प्रतिनिधि' या नात्यानें गेले म्हणून काय झालें? खुद्द ज्ञानकोशाचेंहि महत्त्व ग्रंथांच्या द्वारें लोकांच्या मनांत बिंबावें तितकें त्यावेळीं बिंबलेलें नसेल.

तें कसेंहि असो, तो विषय आमचा नाहीं. दाते यांची परामर्षाची अपेक्षा निष्फळ झाली असल्यास केतकरांनीं तो वाद बडोदें-संमेलनाच्या अधिकृत चालकांशीं भांडावा. आम्ही इतकेंच सांगतों कीं, केळकरांचा या गोष्टींत काडीइतकाहि संबंध नाहीं. उलट अध्यक्ष केळकर यांचेपर्यंत जी गोष्ट गेली

तींत दाते यांची दाद केळकरांनींच लाविली अशी पुढाऱ्यांच्याच वाक्यांत डॉ. केतकर यांनीं स्वतःच कबुली दिली आहे! कारण ते म्हणतात, "संमेलनांत वाङ्मय संस्थांची माहिती सांगण्याची त्यांच्या चालकांस संधि देण्यांत आली. त्या वेळीं अध्यक्षांस (केळकरांस) मुद्दाम चिठ्ठी पाठवून ज्ञानकोश मंडळाची सोय लावावी लागली." दाते यांना सोय लावावी लागली असेल, पण ती सोय केळकरांकडे चिठ्ठी जातांच त्यांनीं लावून दिली. यावरून केळकरांना ज्ञानकोशाची उपेक्षा करण्याची इच्छा नव्हती हेंच सिद्ध होत नाहीं काय? या गोष्टी एरवीं किती किरकोळ आहेत हें वाचकांच्या तेव्हांच लक्षांत येईल. पण डॉ. केतकर यांनीं केवळ केळकर यांजवर दोषारोप करण्याकरितां इतकी क्षुद्र दृष्टि चालविली म्हणूनच उत्तरादाखल असल्या क्षुद्र गोष्टींत आम्हांसहि शिरावें लागतें.

## जोडप्याच्या उपहासाचें पाप

याहि पुढची पायरी म्हणजे डॉ. केतकरांनीं असा एक आरोप केला आहे कीं, ते स्वतः किंवा त्यांचें कुटुंब यांनीं जर कोठें व्याख्यान दिलें, तर त्यांचा उपहासात्मक सारांश केसरींत देण्याची 'पद्धत कायमची' पडलेली आहे. जणूं काय केसरीला या जोडप्याचा उपहास करण्याखेरीज दुसरा उद्योग नाहीं! पण आम्ही डॉ. केतकर यांना असें उघड आव्हान करतों कीं, त्यांना सत्याची कांहीं चाड असेल तर, या 'कायम पद्धतीं' तील गोष्ट किती वेळां व कोणकोणत्या बाबतींत कसकशी घडली याचीं त्यांनीं उदाहरणें द्यावीं, नाहीं तर आपला खोटा आरोप निमूटपणें परत घ्यावा. या वादांत डॉ. केतकर यांनीं आपल्या कुटुंबाचाहि उल्लेख केला ही गोष्ट मात्र अश्लाघ्य आहे. ती बिचारी या तुमच्या आमच्या वादांत कशाला? आपला उपहास झाला अशी तक्रार करणारीं माणसें पुष्कळ वेळां आपल्या उपहासास स्वतःच कारणीभूत होतात, ही गोष्ट तरी, डॉ. केतकर वरील उदाहरणें देतील, तर आपोआप सिद्धहि होईल. ज्ञानकोश-मंडळ म्हणजे स्वतः डॉ. केतकर, त्यांचें कुटुंब, त्यांचे दुय्यम संपादक, अशा सर्व गोतावळ्याचा घोळ घालून या सर्वांचा अपमान केसरीकार संपादक व व्यक्ति या दोनहि नात्यांनीं करण्याची संधि दवडीत नाहींत असलें विधान करणें म्हणजे धाष्टर्याची व बेजबाबदारीची कमालच होय! केळकर यांस एक वेळ ज्ञानकोशकारांनीं मुद्दाम कचेरींत निमंत्रण केलें होतें असें केतकर मोठ्या आढ्यतेनें

सांगतात. पण केळकरांनाहि ज्ञानकोशाचा केसरींतून ७१८ वेळ तरी परामर्ष घेतला हा प्रत्युपकार कांहीं कमी नाहीं.

## आपली आपण उपेक्षा करी

डॉ. केतकर यांचा दुसरा एक आक्षेप असा कीं, ज्ञानकोशमंडळाची कचेरी नागपुराहून पुण्यास आणिली गेली तेव्हां त्याविरुद्ध चळवळ करणाऱ्या मंडळींना केसरीकारांनीं "भिंत भिंत हातभार लावला" ! यांतील खरी गोष्ट इतकीच आहे कीं, ज्ञानकोशाची मूळ घटना नागपुरास झाली, डॉ. केतकर यांस पहिले सहाय्यक व आश्रयदाते नागपुरास मिळाले, अशा स्थितींत नागपूरच्याच आठ-दहा प्रमुख प्रमुख गृहस्थांनीं नागपुराहून कचेरी पुण्यास आणण्याविरुद्ध महत्त्वाचीं कारणें देऊन एक पत्र केसरीकडे पाठविलें व तें केसरीनें छापलें. स्वतंत्र रीतीनें या वादांत केसरी मुळींच पडला नाहीं. तसें त्यास पडावयाचें असतें तर डॉ. केतकर यांचेपेक्षां नागपूरच्या स्नेही मंडळींचीच बाजू उचलून धरण्याला केसरीकारांना स्वाभाविक अधिक कारण होतें; पण तसें त्यांनीं केलें नाहीं. आणि या सर्व सरळ प्रकाराला, आपल्या विरोधकांना भींत भींत हातभार लावला असें केतकर म्हणतात. तेव्हां तें त्यांच्या दूषित मनास शोभेसेंच आहे याहून अधिक काय म्हणावें ?

दुसरा एक चिल्हर आक्षेप केवळ अकरणरूपी असाहि आणला आहे तो असा कीं, "मुंबई सरकारानें ज्ञानकोशाला आश्रय देण्याचें लांबणीवर टाकलें या गोष्टीवर केसरीकारांनीं टीका केली नाहीं." पण ज्ञानकोशाला ह्या बाबतींत आलेलें सरकारी उत्तर म्हणजे कांहीं बादशाही जाहिरनामा नव्हे कीं तो सर्व जगाला कळेल. इतर चार लोकांप्रमाणें आपलें गाऱ्हाणें ज्ञानकोशकारांनीं केळकरांकडे साधार कळविलें असतें व टीकेची अपेक्षा दर्शविली असती तर ती गोष्ट सहज घडली असती. पण यावर केतकर म्हणतात कीं, "हा टीकेचा प्रसंग केसरीकारांनीं ज्ञानकोशविषयक विरोधबुद्धीमुळें मुद्दाम दवडला. ज्ञानकोशाची प्रसिद्धि होईल ती होऊं देण्यापेक्षां या मुद्द्यावर मुग्धच राहिलेलें काय वाईट ?" आम्ही म्हणतों कीं, हा आक्षेप म्हणजे अधमपणाच्या आरोपाची कमालच होय !

## विक्षिप्तपणा कोण चालूं देणार ?

ज्ञानकोशांतील कित्येक विषयांवर व विधानांवर आक्षेप घेणारे एकदोन लेख

केसरींत प्रसिद्ध झाले आहेत हें खरें. पण असल्या महत्त्वाच्या ग्रंथांत भरमसाट विधानें करून डॉ. केतकर यांनीं आपल्या बेसुमार बेताल मतांचें नंगें प्रदर्शन मांडल्यास त्यावर टिका होणारच. केतकर ज्ञानकोशाचे संपादक झाले म्हणून शुद्ध ज्ञानाचा व बिनचूक मतांचा मक्ता त्यांना मिळालेला नाहीं. आणि लोकांच्या खर्चानें ते आपलीं विक्षिप्त मतें एका टोंकाला नेऊन भिडवूं लागले तर लोकांनीं तीं काय म्हणून निमूटपणें ऐकून घ्यावीं ? श्रीयुत नानासाहेब पावगी यांचा ज्ञानकोशावरील टीकालेख फार लांब म्हणूनच आम्हांस तो पुरा करतां आला नाहीं. तसेंच काव्य विषयावरील श्रीयुत दत्तात्रेय केशव केळकर यांचा टिकालेख समर्पक, एवढेंच नव्हे तर आम्हांस सर्वस्वीं मान्य, म्हणूनच आम्हीं तो छापला. लेखणीच्या एका घोटाला पुरेल इतकें थेंडें तेजाब शिंपडून सगळें जुनें नवें मराठी काव्यवाङ्मय दग्ध करूं पाहणाऱ्या या ऋषिमन्य तामसी व्रात्य टीकाकाराला आपलें स्तोम कोण कसें माजवूं देईल ? आपल्या टीकाकारांशीं दोन हात करण्याचें धैर्य डॉ. केतकर यांना खरें असतें तर या दोनही लेखांना त्यांनीं आजवर उत्तर दिलें असतें. पण त्यांनीं मौन धरणें हेंहि 'ब्रूहि सिंहो मया जितः' या वाक्यानें स्वतःच्या निरुत्तराचेंच समर्थन नव्हे काय ? टीकाविषयक लेखांना डॉ. केतकरांनीं उत्तरें देण्याकरितां लेख आम्हाकडे पाठविले व आम्हीं ते छापले नाहींत असें किती वेळां घडलें हें डॉ. केतकर उदाहरणें देऊन सांगतील तर बरें होईल. प्रतिकूल टीकेच्या चिखलानें ज्ञानकोशाचें तोंड खराब झालें असें त्यांना वाटत असल्यास आपल्या प्रतिटीकेच्या पदरानें त्यांनीं तें वेळींच पुसून काढावयास पाहिजे होतें. बरें, उलट टीका होऊन देखील स्वतः जर त्यांना निरुत्तर बसवतें तर केसरीनें त्यांची उपेक्षा केल्यास तरी कां रागवावें ?

आरतूनपरतून डॉ. केतकर यांनीं केसरीकारांस असा एक टोमणा मारण्याचा प्रयत्न केला आहे कीं, केसरीनें ज्ञानकोशाचा परामर्ष घेतल्यापासून जी प्रसिद्धि लाभेल तिच्यावरच आपली आज मुख्य नजर आहे, इतर रीतीनें केसरीच्या अभिप्रायाची किंमत आपणास वाटत नाहीं ! अशा टीकेला आम्हांजवळहि उत्तर मिळेल. कारण ज्या अनुकूल अभिप्रायाची ज्ञानकोशकारांना किंमत वाटत नाहीं तो यापुढें आम्हीहि पण देऊं इच्छित नाहीं. म्हणून त्यांनीं यापुढील आपले ग्रंथ केसरीकडे अभिप्रायाला मुळींच न पाठविलेले बरें. केसरी पत्राचा प्रसार 'पूर्वसंपादकां'च्या म्हणजे टिळकांच्या कार्यामुळें मोठा झाला ही गोष्ट

खरी असली तरी, तिने केळकरांस भोसकावें म्हणून तीहि केतकरांनीं तशी मुद्दाम लिहिली आहे. अर्थात् केसरीच्या प्रचंड वाचकसंख्येचें कांहींच श्रेय केळकर यांजकडे नाहीं असेंहि ध्वनित करण्याचें धाष्टर्य डॉ. केतकर यांनीं केलें आहे. पण टिळकांच्या मृत्यूनंतर पांच वर्षांनींहि अवशिष्ट राहिलेल्या केसरीच्या प्रसाराचा फायदा घेण्याचा लोभ डॉ. केतकर यांना अजूनहि सुटत नाहीं. या एका गोष्टीवरूनच या अवशिष्ट अशाहि प्रसादाचें प्रचंडत्व किती आहे हें सहजच कळून येतें. ज्ञानकोशाची तीन हजारांची आवृत्ति खपत आली असें जें डॉ. केतकर दिमाखानें सांगतात त्याचें कितीसें श्रेय केसरीनें वेळोवेळीं घेतलेल्या त्यांच्या परामर्षाला असेल हें कोणीं सांगावें ! "ज्ञानकोशाला उरलेली गिऱ्हाइकी मिळण्यास अडचण पडणार नाहीं अशी केसरीकारांची खात्री झाल्यावरच त्यांनीं ज्ञानकोशाकडे लक्ष देण्यास सुरुवात केली आहे," असें डॉ. केतकर लिहितात ! पण आम्ही इतकेंच सांगतों कीं, या खासगी माहितीची आम्हांस पूर्वीं जरूर नव्हती व पुढेंहि ती नाहीं. ग्रंथाकडे ग्रंथ या दृष्टीनेंच केसरी पाहणार. केसरीद्वारें मिळणाऱ्या प्रसिद्धीची ज्ञानकोशकर्त्यांना किंमत वाटत नसल्यास त्यांनीं केसरीकडे आपले ग्रंथ आणि आपल्या जाहिराती देखील यापुढें पाठविण्याचें कारण नाहीं. ज्ञानकोशाशिवाय लिहिण्याला इतर विषय, व जाहिरातींच्या रकान्यांचे इतर आश्रयदाते, सुदैवानें केसरीला पुष्कळच आहेत.

## 'नाठाळाच्या काठीं देऊं माथां'

डॉ. केतकर यांच्या टीकेला वरील लांचलचक उत्तर आम्हीं खरोखर मोठ्या खेदपूर्ण मनानें दिलें आहे. कारण कित्येक प्रतिष्ठितंमन्य ग्रंथकारांची वृत्ति, वांकड्या पापडानें मर्जी जाणाऱ्या विहिणींच्या मिजासीइतकी, नाजूक झालेली आढळते. नवीन होणारे चांगले ग्रंथ हे मराठी भाषेच्या उत्कर्षाला कारणीभूत आहेत अशा बुद्धीनें केसरीकार होईल तितक्या दक्षतेनें ग्रंथपरीक्षणाचें काम करीत असतात. हें काम एवढें व्यापक आहे कीं, त्यांत क्वचित् कोणास अन्याय होत नसेल असें आम्ही म्हणत नाहीं. पण ईश्वरानें हातीं दिलेल्या प्रसिद्धिसाधनाचा उपयोग वाङ्मयभक्तांना व वाचक वर्गाला होईल तितका करून देण्याच्या सद्बुद्धीनें आम्ही वागत असतां, डॉ. केतकर यांच्यासारखी क्षुद्र बुद्धीची आणि अधमपणाचे आरोप करणारी टीका कोणीं केली म्हणजे तिचा राग केसरीकारांस आल्यास त्यांस कोणी नांवें ठेवील असें वाटत

नाहीं. ग्रंथपरीक्षणाचे बाबतींत आमचेकडून बुद्धिपुरस्सर अन्याय असा कोणास होत नाहीं, व चुकून तो झाल्यास तो दुरुस्त करण्याचीहि आमची इच्छा असते. पण सरळपणानें वागल्यास केसरीची मदत वाटेल तेवढी मिळण्यासारखी असतां ती न घेतां कोणी विनाकारण हत्यार उपसून उठेल, तर त्याच्या विरुद्ध उपसण्याला स्वतः केसरीकारांजवळहि त्यांचें हत्यार नेहमीं तयार असतें हें कोणी विसरूं नये एवढें दर्शविण्याकरितांच डॉ. केतकर यांना हें विस्तृत उत्तर आम्हीं दिलें आहे.

---

## ६७ पुण्यांतील पुतळ्यांचा वाद

( केसरी, १९२५ )

हा वाद प्रत्यक्ष वादाच्या स्वरूपानें आतां संपलाच आहे. तथापि शांत व निःस्पृह मनानें या वादाचा विचार करणारास थोडी मदत म्हणून खालील माहिती लिहित आहें. फुल्यांचा पुतळा नको तर लो. टिळकांचा तरी कां केला, असा प्रश्न अजाणपणें कित्येकांकडून करण्यांत येतो. त्याला एका दृष्टीचें उत्तर म्युनिसिपालिटींत झालेल्या चर्चेंत अनेकांनीं दिलेलेंच आहे, तथापि त्या प्रश्नाला दुसरेंहि एक उत्तर आहे व तें माझ्या मतें विशेष महत्त्वाचें आहे. लो. टिळकांचा जो पुतळा उभा केला तो कोणीं केला हें पाहणें महत्त्वाचें आहे. कारण टिळकांच्या अनुयायांनीं ती गोष्ट घडवून आणली असेल तर त्यांचें मत स्वपक्षाभिमानानें दूषित झालें असण्याचा थोडा तरी संभव आहे. पण तीच गोष्ट जर खरोखर इतरांनीं केली असेल तर पुतळ्याच्या कल्पनेला वेगळेंच स्वरूप येतें व याच दृष्टीनें खालील हकीकत मी देत आहें.

यासंबंधानें प्रथमच एक गोष्ट नजरेला येते ती ही कीं, स्वतः केसरी अशा पुतळ्यांच्या कल्पनेच्या विरुद्ध मुळापासूनच आहे. लॉर्ड सँढर्स्ट, लॉर्ड कर्झन वगैरेंच्या पुतळ्यांना केसरीनें विरोध केला हें प्रसिद्धच आहे; पण केसरीचीं ठराविक राजकीय मतेंच याला कारण असें म्हणून कांहीं लोक या अडचणीचा निर्वाह करतील. पण खुद्द लो. टिळक मृत्यु पावतांच त्यांच्या गुणग्राहकतेंत सर्व देश समरस होऊन त्यांच्या स्मारकाचा उत्साहपूर्ण उपक्रम सुरू असतां ता. २४ ऑगस्ट १९२० च्या केसरींत केसरीकारांनीं या विषयावर अग्रलेख लिहिला होता. त्यांत—“ स्वतः आमची आवड काय असें जर सांगावयाचें

तर आम्ही असें स्पष्ट म्हणूं कीं, मूर्तिपूजेचा प्रकार शक्य तितका कमी करावा व पुतळे वगैरेसारख्या स्मारकांवर खर्च न करतां उपयुक्ततेकडेच विशेष लक्ष द्यावें ' असा स्पष्ट अभिप्राय दिला आहे.

टिळक–स्वराज्यसंघानें टिळकांच्या स्मारकाची जी ट्रस्टरूपानें योजना केली तींत स्मारकाच्या इमारतीमध्यें एकादी शिल्पमूर्ति ठेवण्याचें कलम आहे; परंतु त्या कामीं इमारतीला पुरून उरण्याइतक्या रकमेची तजवीज केलेली नाहीं. शिवाय मुंबईचे प्रसिद्ध शिल्पकार म्हात्रे यांनीं या स्मारकमंदिरांत ठेवण्याकरितां टिळकांचा अर्ध–पुतळा बिनमोबदल्यानें देण्याचें आश्वासन आपण होऊन दिलेलें होतें व तें पुरें होणार आहे. अर्थात् स्मारकट्रस्टींच्या एक लक्ष रुपयांपैकीं शेंपांचशें रुपये देखील पुतळ्यावर म्हणून बहुधा खर्च होणारे नाहींत. श्रीशिवाजी–मंदिरांत बसविण्याकरितां शिल्पकार फडके यांनीं एक लहानशी टिळकांची प्रतिमा देण्याचें जाहिर केलें आहे व तीहि निवळ देणगी आहे.

आतां पुणें शहर म्यु. नें मंजूर करून बसवलेल्या पुतळ्याच्या बाबतींत तरी टिळकांच्या अनुयायांचा हात कितपत होता हेंहि पाहणें महत्त्वाचें आहे. अशी गोष्ट स्पष्ट न सांगितली तर विनाकारण गैरसमज राहतो म्हणूनच ती मुद्दाम स्पष्ट करून सांगावयाची. गतवर्षीं रेमार्केटांत टिळकांचा पुतळा बसविण्याचा समारंभ झाला त्या वेळीं पुतळ्याच्या हकीकतीचें एक पत्रक छापून वांटण्यांत आलें होतें, त्यावरून या पुतळ्याच्या कामीं खरा पुढाकार कोणीं घेतला होता हें दिसून आलेंच आहे. पण तें पत्र आज ज्यांचे हातीं नाहीं अशांच्याकरितां त्यांतली खालील माहिती मुद्दाम देत आहें.

“टिळकांच्या मृत्यूनंतर चार दिवसांनीं शहर म्यु. त टिळकांचें कांहीं स्मारक करण्याच्या कल्पनेचा उगम झाला. हा उगम ज्या चार गृहस्थांनीं केला त्यांत दोन मराठे, एक मुसलमान व एक ब्राह्मण असे होते. यांनीं त्यावेळचे अध्यक्ष रा. ब. आपटे यांजकडे यादी लिहून कमिटीच्या मुख्य दालनांत टिळकांचें एक तैलचित्र मांडावें इतकीच सूचना केली होती. ही सूचना विचाराकरितां पुढें आली तेव्हां श्रीयुत कामत यांनीं असें सुचविलें कीं, तैलचित्रामध्यें हल्लीं कांहीं विशिष्टपणा राहिला नाहीं. रेमार्केटमध्यें संगमरवरी अर्ध-पुतळा बसविला तर जास्त शोभेल. इतर कोणीं कांहीं खर्च सोसला तर या कामीं बाकीची रक्कम म्यु.नें द्यावी. याला श्रीयुत मानुरकर यांनीं अशी पुष्टि दिली

कीं, मार्केटाच्या बागेंत म्यु०नें आपल्या खर्चानें स्वतंत्र बस्ट बसवावा. याच सभेंत लवाटे, दामले यांसारखे टिळकांचे अनुयायी होते. त्यांपैकीं एकानें मार्केटांतील जागा तेवढी पुतळ्याला फुकट द्यावी असें सुचविलें व दुसऱ्यानें ती जागा मोफत देऊन शिवाय एक हजार रुपये द्यावे इतकेंच सुचविलें. त्या बैठकींत तसबिरीला लागणारी रक्कम मंजूर करावी इतकेंच स्पष्ट ठरलें व पुतळ्याच्या बाबतींत फक्त एक कमिटी नेमण्यांत आली. नंतर या कमिटीनें पुतळ्याच्या रकमेचा अंदाज घेण्याकरितां अनेक चित्रकारांकडून आंकडे मागविले व पांच हजार रुपये खर्च करून पुतळा करावा असा रिपोर्ट केला. या कमिटींतील बहुमत टिळकांच्या अनुयायांचें नव्हतें. या कमिटीचा रिपोर्ट चर्चेला निघून नमुने मागविण्याचें ठरलें व नमुने आल्यावर चित्रकार वाघ यांचा नमुना पसंत होऊन पंधरा हजार रुपये खर्च मंजूर झाला. या बैठकीस एकोणीस गृहस्थ हजर होते व त्यांत 'टिळकांचे अनुयायी' हें उपपद लावतां येण्यासारखे पांचसहाहि गृहस्थ हजर नव्हते. उलट कांहीं मुसलमान गृहस्थ व खेडकर, कानिटकर, मानुरकर, ल. र. गोखले वगैरे टिळकांचे अनुयायी नसलेले असे गृहस्थ हजर होते. पण या बैठकींत पुतळा करावा कीं करूं नये असा वाद नसून फक्त वाघ किंवा तालीम यांतून कोणाचा नमुना मंजूर करावा इतकाच वाद होता. पुढें पुतळा तयार होऊन पुण्यास आल्यावर ता० ४ जुलै १९२४ रोजीं जी बैठक झाली तींत ३४ सभासद हजर होते व त्यांत सहा मुसलमान सभासद असून सोळा ब्राह्मणेतर सभासद होते. त्या सभेंत पुतळा बसवून समारंभ करण्याचा प्रश्न आणि कोर्टानें पुतळ्यावर खर्च करण्याचा अधिकार कमिटीस आहे असें ठरविलें तर शिल्पकाराची उरलेली रक्कम देऊन करार पुरा करण्याचा प्रश्न, यावर मतें घेतलीं तेव्हां फक्त एक ब्राह्मणेतर व एक मुसलमान गृहस्थ एवढ्यांनींच विरुद्ध मत दिलें; बाकी सर्वांनीं अनुकूल मत दिलें. "

वरील हकीकतीवरून हें उघड होत आहे कीं, या पुतळ्याच्या कामीं टिळकांच्या अनुयायांनीं आपला हात चालला म्हणून साधून घेतला असें नाहीं. फार काय पण मूळ स्फूर्तिहि त्यांची नाहीं. मूळच्या उपक्रमांत मानुरकरांसारखे ब्राह्मणेतर पक्षाचे पुढारी व कामत, कानिटकर यांसारखे टिळकांचे प्रतिपक्षी असेच लोक होते. या पुतळ्याच्या प्रकरणांत पुतळा पुण्यास प्रत्यक्ष येऊन

त्याच्या उरल्या रकमेचा प्रश्न निघेपर्यंत श्रीयुत केळकर यांनीं तर कांहींहि लक्ष घातलेलें नव्हतें. पुढें केसरीमराठ्याचे ट्रस्टी या नात्यानें म्यु. स दहा हजार रुपये देण्याचें पत्र कमिटीस श्री. केळकरांनीं लिहिलें. त्याचा हेतु तेव्हां लोकांच्या सहज लक्षांत येण्यासारखा होता. पुतळ्याच्या प्रकरणीं पूर्वीं भाग विशेष घेतला नव्हता तरी पुतळा पुण्यास येऊन पडला, पंधरापैकीं सहा हजार रुपये आधींच कमिटी देऊन बसली होती व उरलेले नऊ हजार न दिले तर कमिटीवर फिर्याद होणार होती. खर्चास संमति दिलेल्या अनेक म्युनिसिपल सभासदांवर फिर्यादी होऊन भारी जोखीम पडते व अशा रीतीनें वादाच्या वादळांत पुतळा सांपडतो हें पाहूनच केसरी-मराठा संस्थेनें नऊ हजार रुपये देऊं केले. यांत एक प्रकारें अशा रीतीनें रकमेची तरतूद परस्पर झाली तरी कमिटींतील बहुमताचे मनांत पुतळा उभा करूं नये असेंच असतें तर त्यांनीं समारंभाचा ठरावच नामंजूर केला असता व केसरी-मराठ्यानें देऊं केलेल्या दहा हजार रुपयांची देणगी तत्त्वाकरितां नाकबूल केली असती. पण तसें न होतां टिळकांच्या अनुयायांव्यतिरिक्त इतर लोकांच्या बहुमतानें या पुतळ्याची प्रथम मंजुरी दिली व त्यानेंच ती कल्पना शेवटास नेली. या बहुमतांत सर्व प्रकारचे लोक होते व त्यांनीं जें केलें तेंहि लोकविलक्षण किंवा भरमसाट केलें असेंहि म्हणतां येत नाहीं. कारण अहमदाबाद म्यु० प्रमाणें हिंदुस्थानांत पुण्याबाहेर टिळकांचे पुतळे, अर्ध-पुतळे बसविण्याच्या कल्पनेचा अंगिकार अनेकांनीं केलेला आहे. अर्थात् टिळक हे ब्राह्मण म्हणून त्यांचा पुतळा झालेला नाहीं तर सर्व हिंदुस्थानभर सर्व जातींत त्यांना मान्यता आहे म्हणूनच तो झाला असला पाहिजे.

---

## ६८ मुंबई प्रांतिक पोस्ट व रेल्वे-मेलसर्व्हिस परिषद, बडोदें १९२५

### ( अध्यक्षीय भाषण )

गेल्या फेब्रुवारीमध्यें ले. असेंब्लीमध्यें पोस्टाच्या तक्रारींबद्दल झालेल्या वादविवादाची अखेर आशाजनक झाली हें आपणांस माहीत आहेच. ही आशाजनक परिस्थिति उत्पन्न होण्यास कारण, या खात्याचे मुख्य सर भूपेंद्रनाथ

मित्र व सर जिऑफ्रे क्लॉर्क यांनीं अत्यंत खुल्या दिलानें व सहानुभूतीच्या दृष्टीनें या प्रश्नाकडे पाहिलें, हें होय. चौकशी कमिटीची मागणी त्यांस फेटाळूनच लावावयाची असती तर ती गोष्ट त्यांस शक्य होती. परंतु बसू व क्लार्क यांनीं या खात्याच्या तक्रारींत मन घालण्याचें ठरविलें व त्याप्रमाणें ते लक्ष घालीतहि आहेत.

असेंब्लींतील विवादामुळेंच पोस्टल यूनियनच्या शिष्टमंडळास सर बी. मित्र व सर जि. क्लार्क यांची मुलाखत घेऊन चर्चा करण्यास संधि मिळाली. या खासगी बैठकींत काय झालें याची माहिती तुम्हांस तुमच्या प्रतिनिधींनीं दिली असेलच. या मुलाखतीचें पर्यवसान काय होईल हें भविष्य आतांच वर्तवणें इष्ट नसलें तरी ती मुलाखत एकंदरीनें समाधानकारक झाली असें म्हणण्यास प्रत्य-वाय नाहीं. या बैठकींत काय घडलें याची वाटाघाट आपण न करतां शिष्टमंड-ळानें ज्या विषयावर जोर दिला त्यांचीच चर्चा येथें करणें योग्य होईल.

पोस्टांतील नोकरांचीं मुख्यतः दोन प्रकारचीं गाऱ्हाणीं आहेतः—

( १ ) पगार व भत्ता यांखेरीज नोकरीच्या सामान्य स्थितीसंबंधानें व

( २ ) पगार आणि भत्ता याबद्दल.

पोस्ट खात्यांतील नोकरांच्या नोकरीच्या सामान्य स्थितीसंबंधानें ले० असें-ब्लींतील बिनसरकारी सभासदांचें एकमत आहे; तथापि पगाराच्या व भत्त्याच्या किमान व कमाल मर्यादेसंबंधीं मात्र त्यांच्यांत एकमत नाहीं हें आपणांस प्रारं-भींच सांगून ठेवतों. सरकारी इतर खात्यांतील नोकरांप्रमाणें पोस्टखात्यानेंहि सवलती मागणें हें न्यायाचें आहे व त्यामुळें खर्चाचा जास्त बोजा बसत नस-ल्यास त्यांस सर्वांचा पाठिंबा मिळेल. परंतु पगार व भत्ता यांचा प्रश्न वेगळा पडतो, काटकसर आड येते व असेंब्लींतील कित्येक बिनसरकारी सभासद या मागण्यांच्या न्याय्यान्याय्यतेला कसोटी लावीत असतात.

नोकरीच्या स्थितीसंबंधीं पाहतां ( १ ) अपुऱ्या सुट्या ( २ ) शिलकी रजाहि न मिळणें ( ३ ) रात्रपाळी ( ४ ) कामाचें अव्यवहार्य स्केल ( ५ ) खेड्यांतील पोस्टमनाला लांब व एकसारखें हिंडावयास लागण्याची पद्धत व ( ६ ) त्याच्या संरक्षणाची गैरतरतूद इतक्या तक्रारी सामान्यतः नमूद करतां येतील.

सुट्यांसंबंधीं मला असें वाटतें कीं पोस्टाच्या नोकरांना सणावाराच्या सुट्या

न देण्यापेक्षां त्या दिवशीं लोकांना टपाल न मिळालें तरी चालेल. वर्षांतील कांहीं सुट्यांच्या दिवशीं लोकांची थोडीशी गैरसोय होऊनहि पोस्ट अजीबात बंद असलें तरी चालेल.

पोस्टाच्या नोकराला त्याची वाजवी असलेली रजाहि न मिळणें हा सर्वांत मोठा अन्याय आहे. रजेच्या अंमलबजावणीसंबंधीं विलक्षण प्रकारची काटकसर दाखविण्यांत येत असल्याचीं उदाहरणें टाईम्ससारख्या वृत्तपत्रांतून आलेलीं आहेत. रजा न देण्यानें नोकरांची अत्यंत गैरसोय होऊन कित्येक प्रसंगीं त्यांच्या प्रकृतीवरहि वाईट परिणाम घडल्याचीं उदाहरणें शेंकड्यांनीं दाखवितां येतील. असली भलतीच काटकसर काय कामाची ! वाजवी रजा मिळणें न्याय्य असूनहि ती देण्यांत आली नाहीं अशीं जितकीं उदाहरणें गोळा करतां येतील तितकीं करा; म्हणजे रजेचा दुरुपयोग केला जातो अशीं भलतींच केलीं जाणारीं विधानें हाणून पाडतां येतील. रात्रपाळीसंबंधानें एवढेंच म्हणतां येईल कीं, सरकारच्या इतर कांहीं खात्यांतहि रात्रपाळी असते, तेव्हां रात्रपाळी करणाराची दिवसा लवकर सोडवणूक करण्याबद्दल मागणी करावी. खेड्यांतील पोस्टमनाला सतत हिंडावयास लागून मुख्य कचेरींत परत येण्यास तीन चार दिवस लागत असल्यास त्या गोष्टीचा विचार झाला पाहिजे. त्याला या दिवसांत अन्न मिळणेंहि दुरापास्त असतें. अर्थात् त्याला भत्ता मिळणें इष्ट आहे. खेड्यावरील पोस्टमन बरोबर रक्कम घेऊन जात असतां त्याचें संरक्षण कसें करावें हा एक प्रश्नच आहे. पण खेड्यांतील पोलीस व पोलीसपाटील यांच्या मदतीनें हा प्रश्न सुटण्यासारखा आहे.

पोस्टखात्यांतील जे लोक कायम नोकर समजले जात नाहींत परंतु ज्यांनीं आजन्म–वृद्धापकाळापर्यंत पोस्टाची नोकरी केली आहे. त्यांच्यासाठीं प्रॉव्हिडंट फंड सरकारनें काढला नाहीं हें मोठें आश्चर्य आहे! वृद्धापकाळ झालेला, प्रपंचाचा खर्च वाढलेला अशा स्थितींत कुटुंबाच्या आधारस्तंभाची नोकरी सुटल्यावर कुटुंबाची काय शोचनीय स्थिति होईल याचा विचार करावयास पाहिजे. बरीच किंवा कांहीं विवक्षित मर्यादेपर्यंत नोकरी झाली असल्यास नोकरांना ग्रॅच्युइटी म्हणून एक वर्षांचा पगार व त्याच्याच पगारांतून कापून घेतलेल्या रकमेंत सरकारनें तितकीच भर घालून त्याला बोनस द्यावा.

पगार व भत्ता यासंबंधीं विचार करतां सरकारच्या इतर खात्यांपेक्षां या

खात्यांत यांचें प्रमाण कमी असतां कामा नये. एकाच खात्यावर जास्त मेहरबानी झाल्यास दुसऱ्यास तक्रारीस जागा राहणारच. सरकारच्या तिजोरीवर ताण पडण्यास वरिष्ठ नोकरांचे पगार हें एक प्रमुख कारण आहे. कनिष्ठ प्रतीचे नोकर भरपूर पोटाला मागण्यापेक्षां जास्त मागतच नाहींत. व सरकाराला काटकसर जर खरोखरीच करावयाची असेल तर त्यांनीं आपली कात्री वरिष्ठ नोकरावर फिरवावी.

मुख्य महत्त्वाच्या गोष्टीवरच जास्त भर द्या असें माझें तुम्हांस सांगणें आहे. सुदैवानें सर भूपेंद्रनाथ मित्र यांची तुमच्याबद्दल सहानुभूति आहे. तुमच्या शिष्टमंडळानें केलेल्या मागण्यांचा ते विचार करीत असतील. दरम्यान तुम्ही आपलें म्हणणें पुनः मांडल्यास तें तुमच्या फायद्याचेंच होईल. या खात्याच्या मुख्यांची इच्छा तुमचें हितच करावें अशी आहे, हा एक शुभ शकुनच आहे. ले० असेंब्लींत माझ्या हातून होण्यासारखी मदत मी अवश्य करीन.

---

## ६९ सहकारी परिषद, सोलापूर.

### ( अध्यक्षीय भाषण. )

( ता. १० जुलै १९२६ )

आजच्या या परिषदेमुळें आपणां सर्वांची गांठ पडली. आनंद झाला. ही सभा सहकारी लोकांची आहे. येथले पुष्कळसे सभासद सहकारी संस्थांचें प्रत्यक्ष काम करणारे आहेत. कोणीं सोसायट्यांतून कर्ज घेतलें असेल. कोणी मॅनेजिंग कमिट्यांचे सभासद असतील, कोणी दुसऱ्यांना जामीन असतील, कोणी इन्स्पेक्टर असतील, कोणी तपासनीस असतील, कोणी प्रतिनिधी असतील. मी हल्लीं यांपैकीं कोणींहि नाहीं. परंतु पूर्वीं सातआठ वर्षें अशा संस्थांतून मीं थोडेंबहुत काम केलें आहे. पुण्याची कॉसमॉस सोसायटी, पुण्याची सेंट्रल बँक यांचा माझा पूर्वीं जिव्हाळ्याचा संबंध होता. अलीकडे मी चेअरमन, डायरेक्टर वगैरे नाहीं. इतर कामांच्या गर्दीमुळें मीं तें काम सोडलें आहे. तरी मी त्यांच्या कामांत अद्यापि आस्थेनें लक्ष घालतों. दुरून चौकशी करतों, सल्लामसलत देतों, पैसा-अडक्याचा बहुतेक व्यवहार त्यांच्याशींच करतों, त्यांच्याविषयीं लेख

लिहितों, त्यांच्या विशेष प्रकारच्या सभांना हजर राहतों. आजहि तशाच मित्रत्वाच्या भावनेनें येथें हजर आहें. तुमच्यांतलाच एक आहें असें मी मानतों, तुम्हीहि तसें मानतां हें दिसूनच आलें. कारण आज तुम्हीं मला अध्यक्षच निवडलें आहे. तरी आपल्या या सहकारी चळवळीचें पाऊल पुढें कसें पडेल याचा आपण सर्व मिळून विचार करूं.

सहकारिता हा शब्द अगदीं थेट असहकारिता या शब्दाच्या उलट आहे. या दोनहि शब्दांचा अर्थ एकमेकांविरुद्ध असला तरी दोनहि चळवळी गेल्या पांच वर्षांत एकत्र एकदम चालू होत्या. असहकारिता म्हणजे तोडून—फटकून वागणें, सहकारिता म्हणजे मिळून—मिसळून एकविचारानें वागणें. पण असहकारिता या शब्दाचा संबंध जितका सरकारकडे तितकाच सहकारिता या शब्दाचा संबंध लोकांकडे आहे. म्हणूनच गेल्या पांच—सहा वर्षांत या दोनहि चळवळी एकत्र नांदूं शकल्या. विशेष मौज ही कीं, राष्ट्रीय सभेनें असहकारिता पुकारली तरी आपली ही सहकारी चळवळ तिनें तींतून वगळली होती. बहिष्काराचा पुष्कळ उपदेश झाला, थोडेंबहुत आचरणहि झालें. पण त्याचा स्पर्श सहकारी चळवळीला लागला नाहीं.

अनेक प्रमुख लोक या दोनहि चळवळींत एकाच वेळीं काम करीत होते. आमच्या या सहकारी चळवळीचा आधार सरकारचा कायदा आणि बरीचशी सरकारची हस्तें परहस्तें मदत, असें असतां या चळवळीविरुद्ध तेव्हां कोणींहि उपदेश किंवा चळवळ केली नाहीं. याचें कारण या चळवळीपासून झालें तर लोकांचें थोडेंबहुत हितच होईल असा कोणाचाहि विश्वास आहे. राजकारणांत हें धोरण चूक, तें बरोबर, असा मतभेद होऊं शकतो. त्यामुळें राजकारणांत अनेक पक्ष उपस्थित होतात. पण आमच्या सहकारी चळवळीच्या मुख्य धोरणाविषयीं दुमत नाहीं. शंका, मतभेद व स्पर्धा असेल तर हें काम अधिक आणि अनेक बाजूंनीं कसें वाढेल याविषयींच आहे.

'सहकारी चळवळ' हें नांव ऐकलें म्हणजे आज पतपेढ्या यांच्याशिवाय दुसरें कांहीं डोळ्यापुढें सहसा उभें राहत नाहीं. गरजू कर्जभरी शेतकऱ्याला गांवच्या सोसायटींतून किंवा जिल्ह्याच्या बँकेंतून कर्ज मिळणें, त्याला सगळी सोसायटी जामीन राहणें, त्यानें कर्ज फेडतांना कुचंबणें, लांबची हप्तेबंदी मागून घेणें, येवढ्यानेंहि भागलें नाहीं तर रजिस्ट्रारसाहेबांच्या हुकमानें खातेदाराच्या

जमिनीचा लिलांव होणें, व शेवटीं सोसायटी मोडून टाकणें इतक्याच गोष्टी सामान्य लोकांच्या नजरेपुढें येतात; पण सहकारी चळवळीचा खरा अर्थ इतका लहान नाहीं. तिचें खरें कार्य इतकें थोडें नाहीं. इतर देशांच्या कर्तबगारीनें व अनुभवानें ही गोष्ट दिसून आली आहे; आणि ती आपल्या देशांतहि दिसून यावी अशी पुढारी लोकांना आशा आहे.

गरजेमुळेंच कोणालाहि अक्कल सुचते. सहकारी चळवळ ही कोणीं मुद्दाम शोधून काढली आहे असें नाहीं तर तिची कल्पना सहज सुचणारी आहे. आणि ही चळवळ, चळवळ या नात्यानें, सुरू होण्यापूर्वीं देखील आपण सहकारी होतों. मात्र न समजतां, जें न समजतां हातून होत असतें तें समजून-उमजून विशेष पद्धतीनें करणें याचेंच नांव चळवळ. 'सहकारी पतपेढी' हें अगदीं या चळवळींतलें लहानसें उदाहरण घेतलें तर त्यांत आपणाला काय आढळतें तें पाहा. शेतकऱ्यांना सोसायटी कर्ज देते ! पण तें कशांतून देते ! तर प्रथमतः गांवच्या सभासदांनीं घातलेल्या भांडवलाच्या व ठेवीच्या रकमेंतून. दहाजण ठेवी ठेवतात; दहाजणांना कर्ज मागण्याचा अधिकार असतो; पण दहांतील कित्येकांना कर्जाची गरज नसते; आणि ज्यांना गरज असते त्यांची ती सर्वांची गरज एकदम उभी राहत नाहीं, यामुळेंच कांहींची गरज भागते.

बरें हें कर्ज वसूल होण्याची खात्री जामीनकी काय ? कर्जाला स्वतः कर्जदाराजवळ मिळकतीचेंच भरपूर तारण असेल तर गोष्ट वेगळी. पण पुष्कळ वेळां एकट्या कर्जदाराजवळ तितकें तारण नसतें. कर्ज फेडण्याची त्याची इच्छा खरी. पण विकून फेडण्याइतकी त्याच्याजवळ मिळकत नाहीं. अशा स्थितींत त्याजकडील कर्ज सगळें किंवा थोडें बुडालें तर तें नुकसान कोण सोसतो ? अर्थात् सोसायटीचे सगळे सभासद मिळून. पण हें तरी तें कां सोसतात ? तर सर्वांचीच निवळ परोपकारबुद्धि म्हणून नव्हे, तर त्यांत कांहीं स्वार्थी बुद्धिहि असते. आज तुमची गरज मीं भागविली, पण जगांत देवाण-घेवाण चालूच आहे. म्हणून उद्यां मला गरज लागली तर ती तुम्ही भागवाल. अशा रीतीनें सगळेच केव्हां कर्जदार तर केव्हां सावकार तर केव्हां जामीन सगळेच एकदम कर्जदार होत नाहींत व होतील तर सोसायटी पुरी पडणार नाहीं. त्याचप्रमाणें सर्वांवर जामीनकी बजाविली जाण्याचाहि प्रसंग नाहीं. थोडा धोकाहि आहे पण केव्हां थोडा फायदाहि आहे, आणि फायदा

आळीपाळीनें, धोका आळीपाळीनें, असें असलें तरी सोसायटीच्या सभासदांची जामीनकी, नांवानें कां होईना, इरेला घालण्यांत आलेली असल्यामुळें, तिच्या बळावर धोका संभाळला जाऊन फायदा पदरांत पडतो. पण या सगळ्यांचें बळ एकाच वेळीं एकवटलेलें असणें हीच या कार्यांतील गुरुकिल्ली आहे.

कापसाच्या धाग्याचा तंतू तो काय, पण आडवे–उभे एकांत एक मिसळून असे शेंकडो धागे होतात. एकजीव म्हणून कोणाहि एकावर सगळा ताण पडत नाहीं यामुळेंच वस्त्र बनूं शकतें व वापरण्याच्या धबडग्याला टिकतें. एकेक काठी वेगवेगळी हातीं दिली तो मोडली. पण त्याच काठ्यांचें जुडगें बनवून दिलें तेव्हां तें भीमासही मोडवेना ही कल्पित गोष्ट प्रसिद्धच आहे. गवताची एक काडी ती काय, पण रानहत्तीलाहि न तुटणारें असें दोरखंड गवताच्या काड्याकाड्यांनींच मिळून तयार होऊं शकतें. लष्करी शिपाई खुर्चीशिवाय खुर्चीवर बसण्याचा खेळ करतात. प्रथम एक शिपाई खुर्चीवर बसल्यासारखा वांकून बसतो. त्याचे गुडघ्यावर दुसरा बसतो, त्याचे गुडघ्यावर तिसरा. अशा रीतीनें वर्तुळ पुरें होत आलें म्हणजे शेवटचा शिपाई पहिल्या शिपायाच्या मागें बसून त्याला दृढ व सुखानें बसण्याला आपल्या गुडघ्याचा आधार देतो. यांत प्रत्यक्ष खुर्ची तर नाहीं, पण अनेक शिपायांना खुर्चीवर बसल्यासारखी विश्रांतीची सोय झाली. हे दृष्टान्त दाखले समजून घेतले व त्यांचें मर्म जाणलें तर सहकारी पतपेढी कशी सिद्ध होतें हें कळून येईल.

पेढीची पत म्हणजे पेढींतील सगळ्या सभासदांची मिळून बनलेली पत हीच होय. पूर्वीं एकेकट्या सावकारांच्या पेढ्या असत. पण त्यांच्यांतील बहुतेक सगळें भांडवल एकट्याचेंच असे. नुकसानीचा आणि जामीनकी बजावण्याचा प्रसंग एकट्यावर आला आणि तो त्याला पुरा पडला नाहीं तर दिवाळखोरीचाच प्रसंग! सहकारी पतपेढीवरहि दिवाळखोरीचा एकाद वेळ प्रसंग येऊं शकेल. पण आधीं एक तर, एकाला दहा जामीन असतातच, पण कर्जदाराला कर्ज किती द्यावें या विषयीं नियम असतात. कूळ डोळ्यांपुढें असतें, जामीनदाराची प्रत्यक्ष नजर राहते, वसुलीला साधन सुलभ असतें, वगैरे गोष्टींमुळें तसा प्रसंग सहसा येत नाहीं. लहानशा सोसायटींत एकादा मनुष्य लुच्चा लफंगा उधळ्या निघेल. पण दहाचे दहा एकाच वेळीं तसे असूं शकत नाहींत. हीच स्वाभाविक जामीनकी होय. या व्यवस्थेंत एकाला सगळा नफा जसा नाहीं तसाच एका-वर सगळा तोटाहि नाहीं.

गांवसोसायटीच्या समाईक सावकारीचें व समाईक पतीचें हें उदाहरण तुमच्या आमच्या डोळ्यापुढें घडतें म्हणून आपल्याला कळतें. पण पतपेढी सोडून समाजांतील इतर व्यवहारांना हें तत्त्व लावून पाहिलें तर तें लागू पडतें असें दाखवितां येईल. पतपेढीप्रमाणें तेथें सरकारी कायदा व लेखी नियम नाहींत इतकेंच काय तें. कसें तें पाहा. पतपेढीची जशी समाईक सावकारी, समाईक कर्जदारी, व समाईक जामीनकी तशीच समाजांतील अब्रू बे-अब्रू, खंबिरी, ढिलाई, यशापयश हीं देखील समाईक असतात. आपण त्याचा न कळत फायदा घेतों व नुकसानहि सोसतों. पण पटावर भागीदार म्हणून नांवें नमूद नसतात इतकेंच. पेढीच्याच नांवावरून सुचलेलें मिठाईच्या पेढ्याचें उदाहरण घेऊं. मथुरेचा पेढा प्रसिद्ध आहे. त्या नांवावर तो पुण्यांत विकला गेला तर इतर पेढ्यांहून अधिक खपतो. आणि या व्यापारांत चार पैसे मिळाले तर त्यामुळें मथुरेंतलि कांहीं हलवायांना श्रीमंती येऊं शकते. बरें गांवांत चार लोक श्रीमान् झाले तर खर्चाच्या द्वारें तो पैसा त्या गांवच्याच कारणीं पडावयाचा. पण अशा रीतीनें मथुरेला फायदा झाला तर तो केवळ मथुरेंतील एका व्यक्तीचा प्रभाव नसून, चांगले पेढे करणारे पुष्कळसे हलवाई वंशपरंपरेनें मथुरेंत राहत असल्यामुळें झाला ही गोष्ट उघड आहे.

उलट मथुरेचा चोभ्या हा मूर्ख खादाड आळशी रगेल व्यसनी अशी अपकीर्तिहि प्रसिद्ध आहे, व ही अपकीर्ति मथुरेला कोणाहि एकट्या पहेलवानाच्या कारणानें मिळालेली नसून, गांवच्या नांवावर विकणारे अनेक चोभे मथुरेंत होऊन गेले किंबहुना त्यांच्या पिढ्या झाल्या यामुळेंच. पण उलट असेंहि समजा, कीं मथुरा शहरावर दरवडेखोरांच्या टोळीनें हल्ला करावयाचें मनांत आणलें तर चोभे आळशी व्यसनी खादाड असे असेनात का; पण दरवडा परतविण्याच्या प्रसंगीं किती चोभे हातांत लाठ्या घेऊन उभे राहूं शकतील याचा ती टोळी विचार केल्याशिवाय राहणार नाहीं. व अशा रीतीनें मथुरा शहराचें रक्षण झालें तर तें कोणा एका व्यक्तीच्या भीतीमुळें न होतां सामुदायिक पद्धतीनेंच झालें असें उघड ठरेल.

हाच दाखला लक्षांत घेतला असतां इतर अनेक चांगल्या व वाईट विशेषणांचा अर्थ लावितां येऊन, प्रत्यक्ष कायद्याच्या आधारानें सोसायटी स्थापून रजिस्टर न केली तरी, समाजांत सामुदायिक कार्य आपोआप

कसें घडत असतें हें कळून येईल. मथुरेच्या पेढ्याप्रमाणें किंवा चोभ्याप्रमाणें दिल्लीचा भामटा, काशीचा पंडित, पुण्याचा चळवळ्या, हिमालयांतला तपस्वी, पंजाबचा पठाण हे मनुष्य, गुणवाचक व मनुष्यदोषवाचक शब्द समजावेत. गांवची एकादी इमारत, गांवचा एकादा जिन्नस, गांवचा एकादा मनुष्य हा देखलि सगळ्या गांवाला कीर्ति किंवा अपकीर्ति, फायदा किंवा तोटा घडवूं शकतो; मग एकाच प्रकारच्या अनेक इमारती, अनेक जिनसा, अनेक माणसें, यांच्या परंपरेनें हें सामुदायिक कार्य म्हणजे सामाजिक कीर्ति-अपकीर्ति, फायदा-तोटा अधिक मोठ्या प्रमाणावर कसा होईल हें अधिक स्पष्ट करून सांगण्याचें कारण नाहीं.

अशा रीतीनें समाजांत न कळत किंवा अनिच्छेनें जें सहकारितेचें कार्य सुरूच आहे, तें जाणूनबुजून इच्छापूर्वक चांगल्या हेतूनें अधिक नियमबद्धपणें आणि हिशेबी रीतीनें केलें जावें हाच सहकारी चळवळीचा खरा हेतु आहे आणि हा हेतु लक्षांत घेतला म्हणजे सहकारी पतपेढी ही एक अगदीं सामान्य किंबहुना क्षुद्र अशी गोष्ट वाटते. कारण सहकारी तत्त्वानें आक्रमिण्याजोगें व्यवहाराचें रान अजून जवळ जवळ सगळेंच्या सगळें मोकळें आहे असेंच दिसून येईल. पतपेढी हें एक नुसतें किरकोळ उदाहरण झालें. अधिक महत्त्वाचीं व अधिक मोठीं अशीं याच तत्त्वाचीं आणखी उदाहरणें कितीतरी देतां येतील. पतपेढीच्या उदाहरणांत गरजू शेतकरी कर्ज मिळवून आपली तात्पुरती भांडवलाची अडचण कशी भागवितो येवढेंच दिसून येतें. पण शेतकरी हाच कांहीं समाजांत एकटा गरजू नसतो. हिंदुस्थानांत शेतकऱ्यांची संख्या फार मोठी हें खरें पण व्यापारीहि नाहींत असें नाहीं. व्यापाऱ्यांना भांडवलाची गरज लागते, आणि शेतकऱ्यांप्रमाणें त्यांनींहि जर सहकारी संस्था काढल्या तर त्यांची गरज आपापसांत भागून समाईक रीतीनें उभारलेल्या भांडवलाचा व पतीचा फायदा त्यांच्याहि पदरांत पडेल. शेती व किरकोळ व्यापारटापार यापलीकडे हिंदुस्थानांत अद्यापि व्यवहाराची मजल गेलेली नाहीं. पण इतर देशांत तशी मजल गेली असल्यामुळें सहकारितेचे नवीन नवीन प्रकार तिकडील लोकांनीं व्यवहारांत आणलेले आहेत, आणि त्यांचा फायदाहि तिकडे त्यांना मिळत आहे. त्यांचें उदाहरण पाहिलें म्हणजे अर्थशास्त्रांत बसणाऱ्या कोणत्याहि बाबींमध्यें सहकारी तत्त्वाचा उपयोग कसा

होतो हें दिसून येतें. अर्थशास्त्रांत मुख्यतः बाबी येतात त्या अशा–( १ ) संपत्तीचें उत्पादन ( २ ) संपत्तीची वांटणी ( ३ ) संपत्तीची देवघेव ( ४ ) संपत्तीचा व्यय (५) संपत्तिरक्षणाची व्यवस्था. या प्रत्येक बाबतींत हवी तितकी सहकारिता करण्यास जागा आहे.

संपत्तीचें उत्पादन म्हणून आपण शेतकऱ्याचें उदाहरण घेऊं. त्याला जमीन विकत किंवा भाड्यानें घ्यावी लागते. स्वतःची असली तरी नांगरावी कुळवावी लागते. चांगलें बीं–बियाणें राखावें किंवा बाहेरून आणावें लागतें. पेरणी करावी लागते. बागायती असेल तर पाण्याची योजना करावयाची असते. पीक उगवल्यावर फेर–कुळवणी करावी लागते किंवा तण काढावें लागतें. टोळ, पांखरें, किडे व चोरहि यांपासून पीक राखावें लागतें. योग्य वेळीं तें कापून मळावें लागतें. आणि अधिकांत अधिक किंमत येईल अशा रीतीनें हंगामशीर म्हणजे केव्हां केव्हां दम धरून त्याची विक्री करावी लागते. इतक्या गोष्टी होऊन, आणि भांडवलाचें व्याज, नोकरचाकरांचा खर्च, हक्कदारांचे हक्क, बलुतेदारांचें वतन, पाखरा–किड्यांचें भक्ष्य, चोराचिलटांचा लोभ, सरकारचा सारा, गांवकामगारांचें पोटिस्त, अडत्याची दलाली, आणि अस्मानी सुलतानीचा संभव इतकीं तोंडें भागवून मग जो उरेल तो त्याचा नफा. मध्यंतरींच्या दहा–पांच पायऱ्या सांगितल्या त्यांतली प्रत्येक सहकारी तत्त्वानेंच भागेल असें नाहीं. पण त्यांतील पुष्कळशा त्या तत्त्वानें भागतील यांत शंका नाहीं.

समाईक मालकीची किंवा खंडाची जमीन शेतीला उपयोगांत आणण्याची पद्धत जुन्या ग्रामव्यवस्थेंत आमचे इकडे होती व रशियासारख्या देशांतहि ती आढळते. आज ती नामशेष झाली आहे. पण एकजिवाच्या चार कुळांनीं समाईक भांडवलानें किंवा खंडानें जमीन घेतली आणि त्यांत ते राबले, तर एकेकट्यानें शेत करण्यापेक्षां त्यांना अधिक फायदा होईल यांत शंका नाहीं, समाईक भांडवलाचा प्रकार पतपेढ्यांतून दिसून येतच आहे. बियाणें समजा बटाट्याचें असलें तर एकटा शेतकरी इटालीहून जहाज भरून एकदम बटाट्याचें बियाणें कसा आणूं शकेल? पण आमच्या खेड तालुक्यांतील पुष्कळशा शेतकऱ्यांनीं जर सहकार्य केलें तर त्यांना घाऊक व्यापार म्हणून स्वस्त दरानें खात्रीचें बियाणें मिळूं शकेल—बाजारांत महाग घ्यावें लागणार नाहीं, किंवा

निस्सत्व बियाणें पुनः पुनः वापरून शेती खालावण्याचा प्रसंग येणार नाहीं. खत बाहेरून आणण्याचीहि अशीच व्यवस्था करतां येईल. सहकारी योजनेनें मोठे नांगर किंवा मोठे ट्रॅक्टर यांचा उपयोग करतां येणें अशक्य नाहीं.

आपले गांवगन्नाचे जुने पाटबंधारे समाईक भांडवलानें व अंगमेहनतीनें बांधले जात असून, समाईक बुद्धीनें ठरलेल्या नियमाप्रमाणें पाळ्या ठरवून शेतकरी पाणी घेत असत. निरा कॅनॉलवर बाजूच्या पाटाखालीं पिकणाऱ्या निरनिराळ्या गटांतील सगळ्या शेतकऱ्यांना मिळून नाळ्या नेमून ताब्यांत देऊन स्वतंत्रपणें वापरण्याला द्या असें इरिगेशन खात्याला सांगतां येईल व ती गोष्ट तें कबूलहि करील. आणि शेतकऱ्यांनीं सहकारी तत्त्वावर पोटनाळ्यांची व्यवस्था आपल्या हातीं घेतली तर पाटकऱ्यांची लांचलुचपत आणि लहरी अधिकाऱ्यांची अरेरावी हीं दोनही वांचतील. पीक आल्यावर तें स्वार्थी दलालांच्या मार्फत न विकतां सहकारी भांडवलाच्या दुकानामार्फत विकल्यास शेतकऱ्याचा फायदा होतो, हें बारामतीच्या दुकानानें प्रत्यक्ष सिद्ध करून दिलें आहे. तात्पर्य, सहकारितेनें धंदा केल्यास अनेक व्यवहार अधिक फायदेशिर करतां येतील. कळत नाहीं असें नाहीं. पण अद्यापि हातून त्याविषयीं व्हावा तितका उद्योग होत नाहीं इतकेंच.

पश्चिमेकडील देशांत सहकारितेचें तत्त्व व्यवहाराचें सगळें रान अजून अडवून बसलें नाहीं. पण आमच्या पुढें तें पन्नास वर्षें गेलें किंवा आम्ही त्यांच्या मागें पन्नास वर्षें आहों यांत शंका नाहीं. आमचे इकडे जशी शेतकऱ्यांची संख्या अधिक तशी विलायतेंत कामकरी मजुरांची संख्या अधिक. आमचेकडे जशी शेती तशी तिकडे कारखानदारी. आमचेकडे शेतकरी गरीब असले तरी स्वतःच्या मालकीचा असा जमिनीचा लहानसहान तुकडा प्रत्येकाचा असतो. जमिनीच्या तुकड्यासारखा कारखाना मात्र लहानसहान असूं शकत नाहीं. अर्थात् मजुराला रोजंदारीपेक्षां अधिक फायदा कारखान्याच्या धंद्यांत मिळूं शकत नाहीं. स्वार्थी कारखानदार अधिकांत अधिक नफा मिळविण्याकरितां मजुरांना पिळून काढण्याला तयार असतो. येवढेंच नव्हे तर अशा स्वार्थी व बुद्धिवान् कारखानदारांनाच सहकारितेचें तत्त्व पटल्यामुळें; व त्यांनीं त्याचा मोठ्या आस्थेनें अवलंब केल्यामुळें,कारखानदारांचे व भांडवलवाल्यांचे संघ बनले. आधींच विष आणि तें शतपुटी बनविल्यानें जसें जालीम होतें, तशीच सहकारी

तत्त्वाच्या दुरुपयोगानें भांडवलवाल्यांची स्वार्थबुद्धि देखील अधिक जालीम बनली.

पण तिकडेहि आतां याविरुद्ध प्रतिक्रिया सुरू झाली आहे; आणि नफेबाजी कमी कशी व्हावी, भांडवलवाल्यांचा जुलूम कसा हटावा; चढाओढीनें मजूर कामगारांच्या मानेवर अधिकाधिक रुतणारें जूं कसें वर उचललें जावें—एवढेंच नव्हे, तर मजुराला कारखाना धन्याचा तसाच आपलाहि अंशरूपानें तरी आहे अशी आपलेपणाची भावना त्यांच्यांत कशी उत्पन्न व्हावी, अशाविषयीं खासगी प्रयत्न सुरू आहे, शिक्षण देण्यांत येत आहे; व सरकारी कायद्याची मदतहि या कामीं घेण्यांत येत आहे. तिकडील जनतेच्या हातीं स्वराज्यच जवळ जवळ असल्यानें जी कल्पना मतदारसंघाला सुचेल व पटेल ती अमलांत आणण्याला त्यांना कायदेमंडळाचा उपयोग सहज करतां येतो; आणि भांडवलवाले व मजूरवर्ग यांची जी कुस्ती किंवा लढत हल्लीं सुरू आहे तींत कोण हरतो कोण जिंकतो हें लवकरच दिसून येईल. आणि हा सर्व सहकारितेचाच प्रभाव, म्हणजे सामुदायिक बळ उत्पन्न करून सामुदायिक फायद्याकरितां तें खर्च करण्याच्या बुद्धीचा व युक्तींचा प्रभाव होय.

सुदैवानें आमच्या देशांत अद्यापि तिकडच्या देशांतील ही जुलमी पद्धति कळसास पोंचलेली नाहीं. आणि ती पोंचण्यापूर्वींच सहकारी तत्त्वाचें शिक्षण मिळण्याची सुरवात झालेली आहे म्हणून ती कळसास जाण्याची भीति नाहीं. दुसरीहि गोष्ट मला प्रांजलपणें सांगितली पाहिजे ती ही कीं, मूळ सरकारच्या प्रयत्नानें सहकारी चळवळ इकडे सुरू झाली. अद्यापिहि लोकांपेक्षां या चळवळींत सरकारच अधिक आस्थेनें लक्ष घालीत आहे व योग्य ती मदत अद्यापि त्यांनीं नाकारलेली नाहीं. या खात्याला अधिकारी लाभतात त्यांचेंहि धोरण सामान्यतः चांगलें असतें. सिव्हिलियन तोच, पण मुलकी खात्यांत तो असतांना त्याची जी दृष्टि असते तिच्याहून तो रजिस्ट्रार असतां त्याची दृष्टि वेगळी व अधिक चांगली असते. मग हल्लीं नुकतेच बदलून गेलेले मदनसाहेब यांचेसारखे हिंदी सिव्हिलियन हे रजिस्ट्रार झाल्यास त्यांना लोकसेवेची एक अपूर्व संधि आपणाला लाभली असें वाटून तिचा त्यांनीं सदुपयोग केल्यास काय नवल !

सरकारला सहकारी चळवळीची कल्पना सुचण्याला मूळ कारण असें कीं, शेतकऱ्याची स्थिति दिवसेंदिवस खालावत चालली, त्याला त्राण उरलें नाहीं,

अवर्षणाचा किंवा नापिकीचा किंचित् धक्का बसतांच त्याचें सगळें भांडवल, त्याची सगळी पत, मडक्याच्या उतरंडीसारखी ढांसळून पडूं लागली, आणि त्याहून विशेष हें कीं, तगाई म्हणून किंवा शेती सुधारण्याकरितां म्हणून त्याला सरकारानें कर्ज देण्याची पद्धत सुरू केली तरी तिचेंही कांहीं फळ दिसेना. शेतकऱ्यांच्या ऋणमुक्ततेचा कायदा करून पाहिला तोहि निष्फळ ठरला. त्यानें सावकारावर जितकीं बंधनें पडलीं तितकाच शेतकऱ्याच्या पतीवर घाला पडला. शेतकऱ्याला जमीन विकण्याची बंदी करण्याचें धोरण चालवून पाहिलें त्यानें तर शेतकऱ्याची अगदींच नापत झाली. इतकें झाल्यावर सरकारी शेतकी पेढ्या काढण्याची कल्पना १८८४ सालीं पुढें आली. परंतु अशा बँकांचा प्रयोगहि प्रत्यक्ष झाला नाहीं. रा. ब. रानडे, सर वुइल्यम वेडरबर्न वगैरे गृहस्थांनीं याविषयीं पुष्कळ खटपट केली, पण विलायतसरकारनें योजना नामंजूर केली.

या अनेक प्रयत्नांच्या अनुभवानें, व त्यांच्या कार्यकारणमीमांसेंत सरकारला एक गोष्ट दिसून आली कीं, केवळ सरकारनें आपल्या पैशानें व कायद्यानेंहि वाटेल तितका प्रयत्न केला तरी शेतकऱ्यांची स्थिति सर्वस्वीं सुधारणार नाहीं. याचें कारण तो प्रयत्न स्वतः लोकांनीं लोकांकरितां केलेला नव्हे. आणि लोक सरकारची मदत घेऊन कां होईना, पण स्वतःच्या स्फूर्तीनें व कळकळीनें जी गोष्ट करतील तीच यशस्वी होईल. तिकडे परदेशांतहि सहकारी चळवळीचे फायदे दिसून आले होते. म्हणून १९०४ सालीं सहकारी संस्थांचा कायदा झाला. गेल्या २२ वर्षांत या चळवळीचें पाऊल बरेंच पुढें पडलें आहे. प्रथम कर्ज देण्याघेण्याच्या पेढ्यांपुरताच हा कायदा होता, पण पुढें दुकानें व द्रव्योत्पादनाचे कारखाने अशा स्वरूपाच्या सोसायट्यांचाही समावेश कायद्यांत झाला. क्रमाक्रमानें प्रॉव्हिन्शियल बँका म्हणजे प्रांतिक पेढ्या, जिल्हानिहाय मध्यवर्ति पेढ्या, यूनिअन्स वगैरे स्थापन होऊन, या चळवळींतलि भांडवल जसें मुख्यतः लोकांकडून यावें तशीच सोसायट्यांची पाहणी, तपासणी व सहकारी तत्त्वाचा प्रसार करण्याचें कामहि होईल तितकें खासगी लोकांकडून होण्यास आतां सुरवात झाली आहे. एकंदर मुंबई इलाख्यांतील सोसायट्यांना बँकांमार्फत कर्ज मिळण्यास जशी मुंबईच्या प्रॉव्हिन्शियल बँकेची थोडीबहुत मदत होते, तशीच सहकारी चळव-

ळीचा प्रसार करण्यास मुंबईस स्थापलेली इन्स्टिटयूट व तिच्या शाखोपशाखा यांची बरीच मदत होत आहे.

तथापि अजूनहि बहुतेक बाबतींत खऱ्या कामाला केवळ प्रारंभ आहे असेंच म्हणावें लागतें. कारण अडचणी अद्यापि दोहों बाजूंनींहि आहेत. एकीकडे सरकारनें या चळवळीस जरी आजवर चांगली मदत केली आहे तरी माझ्या मतें त्यांनीं आणखीहि पगारी लोक ठेवून या चळवळीचें शिक्षण लोकांना दिलें पाहिजे. खर्चाच्या दृष्टीनें त्यांनीं आपलें अंग केव्हांहि काढून घेतां कामा नये. तसेंच सरकारचा, म्हणजे एका अर्थानें लोकांचाच पैसा, जो आज इम्पीरियल बँकेच्या द्वारें वरिष्ठ प्रतीच्या व्यापाराला व श्रीमंन भांडवल-वाल्यांना मिळूं शकतो तो प्रांतिक व जिल्हा बँकांच्या द्वारें अधिक प्रमाणावर रयतेच्या उपयोगीं पडावयास पाहिजे. दोन वर्षांपूर्वी ढांसळणाऱ्या बँकांना सरकारनें मदत देण्यासंबंधानें कायदेशीर योजना दिल्ली-कौन्सिलांत मंजूर झाली, तेव्हां इतर बँकांबरोबर सहकारी बँकांचाहि समावेश व्हावा अशी खटपट आम्हीं केली; पण ती सिद्धीस गेली नाहीं. इम्पीरिअल बँकेसारखी लाखों व कोट्यावधी रुपयांची देवघेव एकदम करूं शकेल अशी पेढी सरकारच्या हातीं पाहिजे ही गोष्ट खरी. तथापि सूक्ष्म दृष्टीनें पाहिलें तर इम्पीरियल बँकेच्या हातीं सरकाराकडून जाणारा कांहीं पैसा, सरकारचें नुकसान न होतां पण रयतेचा फायदा होईल अशा रीतीनें, सहकारी बँकांकडे वळवितां येईल. उलटपक्षीं हेंहि खरें आहे कीं, पतपेढ्या आणि सेंट्रल बँका यांचेकडून मिळणाऱ्या कर्जाच्या बाबतींत, तें कर्ज घेणारांनीं आपणामध्यें सहकारी तत्त्वाचे मुख्य गुण अवतरले आहेत असें करावें तितकें सिद्ध केलेलें नाहीं.

पतपेढी म्हणजे केवळ एक नवी सावकारी. फक्त त्या सावकारीच्या अव्यवस्थेंत एकाच्या ऐवजीं दहांचा हात अशी पुष्कळ खेडेगांवच्या लोकांची समजूत अद्यापि आहे. पूर्वीं तगाईत पाटील-कुळकर्णी हात मारीत असत, व सावकार हिशेबांत हातचलाखी करीत असे ही गोष्ट खरी. तरी पण पतपेढ्या झाल्या म्हणून त्यांच्या परीनें होणारा हा गोंधळ अगदींच थांबला आहे असें नाहीं, सार्वजनिक किंवा परोपकारबुद्धीनें या चळवळींत पडणाऱ्या मनुष्यापेक्षां आपणाला कर्ज मिळेल म्हणून तींत पडणारे लोक अधिक भरल्यास नवल नाहींच. पण शुद्ध भावनेनें या चळवळींत पडणाऱ्या एका माणसा-

गणिक, त्यांतून कांहीं स्वार्थ आपणास आडमार्गानेंहि साधतां येईल अशा भावनेनें पडणारें लोक किती याचा ज्याचा त्यानेंच विचार करावा. को-ऑपरेटिव्ह इन्स्टिटयूटसारख्या मध्यस्थ व मतप्रसार करूं इच्छिणाऱ्या संस्थेला तूर्त ही दोहोंकडून अशी अडचण आहे. सरकार उदार व रयतेविषयीं अधिक प्रेमी बनेपर्यंत, मागें सांगितल्याप्रमाणें सरकारी पैशाचा मुबलक उपयोग शेतकऱ्यांच्या उपयोगाकरितां तें करणार नाहीं. पण जोंपर्यंत सहकारितेचें तत्त्व खेडेगांवांतील लोकांच्या मनांत खरोखर चिंचलें नाहीं तोंपर्यंत हल्लींहून अधिक पैसा शेतकऱ्यांना कर्जाऊ देण्यांत व तो बुडाला म्हणून सोसायट्या मोडून टाकून जमिनी लिलांवाला काढण्यांत काय फायदा? पण हें आतां नुसतें म्हणत बसून उपयोग नाहीं. सहकारी पतपेढ्या आपण चांगल्या चालविल्या तर त्यांतच आपलें खरें कल्याण आहे हें ओळखून शेतकरी जर आपली पात्रता सिद्ध करूं लागतील तर शहर गांवांतून जिल्हा बँकांच्या द्वारें त्यांना भांडवलाचा वाटेल तितका पुरवठा होऊं शकेल; व सरकारनेंहि इम्पीरियल बँकांऐवजीं सहकारी बँकांशीं आपले व्यवहार वाढवून आपला पैसा रयतेच्या उपयोगीं अधिक लावावा अशी त्यांच्यावरहि सक्ती करतां येईल.

असो. हे व यासारखे अनेक विचार या विषयावर कोणासहि सहज सुचण्यासारखे आहेत. पण आजच्यासारख्या सभेंत त्या प्रश्नांचा खोल विचार करण्यास जागा नाहीं. सोसायट्या, यूनिअन्स, जिल्हा बँका व प्रांतिक बँक यांजमधील अनुभविक कार्यकर्त्या लोकांनींच एकत्र बसून ही चर्चा केली तर अधिक फायदेशीर होईल. आज मुख्य प्रश्न हा कीं, शेतकऱ्यांना हल्लीं मिळतें याहून हलक्या व्याजानें कर्ज कसें मिळेल? पण उलटपक्षीं तें न बुडतां योग्य वेळीं वसूल कसें होईल? हा प्रश्न सोडविणें हें सरकारी अधिकाऱ्यांच्या कक्षेबाहेर काढून, लोकांनींच सहविचारानें त्याचा निकाल लावला पाहिजे. एका बाजूनें सेंट्रल बँका या आपले इन्स्पेक्टर व वसुली कामगार, दुसऱ्या बाजूनें इन्स्टिट्यूट व तिचे मतप्रसारक, पगारी बिनपगारी उपदेशक, व तिसऱ्या बाजूनें सरकारी हिशेबतपासनीस—यांचा प्रवेश सहकारी पतपेढ्या असलेल्या खेड्यांतून अधिकाधिक होऊं लागलाच आहे; व तो जितका अधिक वाढेल आणि त्यांचें निरीक्षण जितकें सूक्ष्म होईल तितका हा प्रश्न सुटण्याला अधिक उपयोग होईल असें दिसतें. सरकारनेंहि सहकारी तत्त्वाचें शिक्षण हें

प्राथमिक व दुय्यम शिक्षणाइतकेंच जरूरीचें मानून त्यावर सढळपणें खर्च करण्यास तयार झालें पाहिजे. आणि तो खर्च सेंट्रल बँका व इन्स्टिटयूट यांच्या द्वारें केल्यास, बिनसरकारी अशा उपदेशकांच्या हातून मतप्रसार अधिक झपाट्यानें होईल.

कर्ज थोड्या व्याजानें मिळालें तरी तें ज्या त्या कुळाच्या हातींच बिनखोट पोंचलें पाहिजे. त्यानें झाला तरी लिहून दिलेल्या कामाकडेच त्याचा व्यय केला पाहिजे. सोसायट्यांचें कर्ज झालें—म्हणजे आपणाला गांवचे लोक जामीन असले—तरी कर्ज हें एक लांछन निदान जबाबदारी आहे म्हणून तें होईल तितकें हटविलेंच पाहिजे. कर्ज मिळतें म्हणूनच कर्ज न काढतां मितव्ययानें राहावयास शिकलें पाहिजे. आणि प्रामाणिकपणानें वागूनहि जी गरज आपली आपण भागवूं शकत नाहीं ती सहकारितेच्या तत्त्वावर इतरांकडून भागवून घेण्याला, आणि स्वतःला अनुकूल होईल तेव्हां तीच गरज दुसऱ्याची भागविण्याला तयार झालें पाहिजे. आणि यानंतर सहकारितेचें तत्त्व निवळ कर्जाच्या देवघेवीच्यहि पुढें जाऊन, व्यवहाराच्या अनेक अंगांना तें लाविलें पाहिजे. या सर्व गोष्टी लोकांनीं शिकून आपल्या आपणच अंगीं आणावयाच्या आहेत. या बाबतींत शिक्षण देण्याचें काम सरकार व इन्स्टिटयूटसारख्या संस्था करतील. पण शाळा व कॉलेजें यांतून शिक्षण घेतल्यावरहि त्याचा व्यवहारांत उपयोग करणें हें जसें सुशिक्षित मनुष्यावरच राहणार, त्याचप्रमाणें उपदेशकांनीं शिक्षण दिलें तरी सहकारी तत्त्व मनांत बिंबवून त्याप्रमाणें आचरण ठेवणें हें लोकांकडेच आहे. म्हणून शेवटीं माझी या सभेंत जमलेल्या लोकांना अशी विनंति आहे कीं, सहकारी चळवळीला त्यांनीं योग्य तो आदर दाखवून तिच्या कामाला शक्य तितकी हस्तें परहस्तें मदत करावी. पूर्वीं उल्लेखिल्या गेलेल्या कित्येक प्रश्नांची चर्चा यानंतर ज्या कमिट्या नेमण्यांत येतील त्यांच्या खासगी सभांतून होईल व तिला अनुसरून आपणापुढें ठराव येतील, त्या वेळीं त्यासंबंधीं चर्चा करण्याची आपणालाहि संधि मिळेल. तरी या परिषदेच्या निमित्तानें आपण जे या ठिकाणीं जमलेले आहों त्या सर्वांनीं हे तीन दिवस केवळ एक सहकारी चळवळ डोळ्यापुढें ठेवून तिच्या चर्चेंत घालवावे.

आपण मला अध्यक्षस्थान दिलें व माझे हे विचार मांडण्याची संधि दिली याबद्दल आभारी आहे.

---

# ७० माधवराव बोडसांचें बोडण !

( केसरी, ता. ९ फेब्रुवारी १९३६ )

हल्लींच्या वादांत लो. टिळकांचें नांव होतां होईतों आणावयाचें नाहीं असें आम्हीं प्रथमपासून मनाशीं ठरविलें व त्याप्रमाणें आजवर आम्ही वागतहि आलों आहों. कारण टिळकांच्या नुसत्या नामनिर्देशानें कोणत्याहि मताचें खंडन काय किंवा मंडन काय सयुक्तिकपणें होऊं शकत नाहीं. टिळकांच्या नांवाचा 'प्रकाशक' मागें धरून एखाद्या मतावर कोणी मुद्दाम झगझगीत प्रकाश पाडला तर, त्याच्या योगानें पाहणाराचे डोळे दिपण्यापेक्षां त्या मतरूपी वस्तूचे उच्चनीच भाग व गुणदोष हेच अधिक स्पष्ट दिसूं लागावयाचे ! पण या वादांत टिळकांचें नांव आणावयाचें नाहीं असें आम्हीं योजिलें असतां प्रतियोगी सहकारितेचे प्रतिपक्षीच ती गोष्ट आपल्या फायद्याकरितां करीत आहेत; यामुळें टिळक व प्रतियोगी सहकारिता यांच्यासंबंधाचा थोडाबहुत उल्लेख केव्हां केव्हां करणें आम्हांलाहि प्राप्त होत असतें.

## बोडस यांचा लेख

आजचा प्रसंगहि तसलाच एक आहे. कारण 'चित्रमयजगता'च्या ताज्या अंकांत आमचे एक मुंबईकर प्रतिपक्षी, किंवा अकारण शत्रु, किंवा निंदाप्रेमी गृहस्थ श्री. माधवराव बोडस यांनीं प्रस्तुत विषयावर लेख लिहिला आहे. त्यांत आपल्या बाजूनें म्हणून ( म्हणजे प्रतियोगी सहकारिता आजच्या अर्थानें टिळकांना संमत नव्हती असें दाखविण्याकरितां ) त्यांनीं टिळकांचे नांवाचा मनसोक्त उपयोग केला आहे. येवढेंच नव्हे तर, टिळकांचें अंतरंग खरें आपणा एकट्यालाच तेवढें काय तें माहीत होतें असें वारंवार भासविण्याचा बाष्कळ प्रयत्न केला आहे ! टिळकांचें नुसतें नांव पुढें केलें तरी त्या नांवाचा उपयोग योग्य किंवा अयोग्य केला जात आहे हें सामान्यरीत्या कळण्याला लोकांना कांहीं तरी साधन असतें. परंतु " टिळकांच्या अंतरंगाचें खरें व अनन्यसाधारण असें ज्ञान फक्त आपणा एकट्यालाच आहे, व तें अंतरंग फक्त आपणाजवळच उघडें करण्याइतका आपला व टिळकांचा अनन्यसंबंध होता, " असें एकादा मनुष्य प्रतिष्ठितपणें शपथेवर सांगूं लागला म्हणजे वाचकांना थोडा बहुत भ्रम पडण्याचा सहजच संभव असतो. म्हणून या विशेष हक्काविषयींहि दोन शब्द लिहिले तर ते अयोग्य होणार नाहींत. श्री. बोडस यांनीं अशा

प्रकारचे लेख प्रसंग साधसाधून आजवर पांचसात वेळां लिहिले. आणि आम्हीं त्यांची मुद्दाम उपेक्षा केली. पण अशा लेखकास एकादे प्रसंगींहि उत्तर न दिलें तर भ्रमाचा भोपळा फुगत जातो. येवढ्याचकरितां हें अप्रिय कार्य आज नाखुषीनें करावें लागत आहे.

## टिळक म्हणे मवाळ झाले!

प्रस्तुत लेखांत श्री. बोडस यांनीं असें लिहिलें कीं, 'टिळक हे मंडालेहून सुटून आल्यावर मवाळ बनले, व प्रच्छन्न मवाळांच्या हातीं सांपडल्यानें त्यांची अशी दुर्दशा झाली.' एकट्या चिरोल केसला उद्देशून बोडस हे बोलते, किंवा गंगापुराहून टिळकांनीं प्रतियोगी सहकारितेची तार पाठविण्यांत घाई केली असें नुसतें ते म्हणते, तर त्यांच्याशीं समान वृत्ति असणाऱ्या इतर कित्येकांची जोड तरी त्यांच्या बाजूला त्यांना मिळती. पण १९१४ पासून पुढें टिळकांचें एकंदरच वर्तन नेमस्ताचें किंवा मवाळाचें झालें असा आरोप बोडस करतात, तेव्हां ते आपण होऊन आपल्या पायावर दगड पाडून घेतात असेंच होत नाहीं काय? या गुन्ह्यांत त्यांना सगळ्या हिंदुस्थानांत एकहि साथीदार मिळणार नाहीं!

## गुप्त संभाषणांचा हवाला

श्री. बोडस यांचीं खुद्द टिळकांविषयीं, व त्यांच्यामागें त्यांच्या संस्था चालविणाऱ्यांविषयीं, मतें कशीं व काय आहेत याविषयीं पुढें ओघानें सांगण्यांत येईल. परंतु प्रत्येक वेळीं टिळकांचें एकादें मत म्हणून बोडस सांगतात व त्याला आधार म्हणून हें मत मला टिळकांच्या खाजगी, गुप्त, रहस्यमय संभाषणांत कळलें असें बोडस लिहितात तेव्हां त्यासंबंधानें एकादा शब्द लिहिलाच पाहिजे. टिळकांच्या हयातींत बोडसांनीं असले आधार कधीं दिलेले नाहींत. किंबहुना टिळक जिवंत असेपर्यंत टिळकांविरुद्ध किंवा त्यांच्या परिवाराविरुद्ध लिहिण्याची त्यांची छातीच झाली नाहीं. आज या सर्वांविषयीं ते जसें वेडेवांकडें लिहितात तसें टिळक जिवंत असतां लिहिलें असतें तर, स्वतः टिळकांकडूनच त्यांना खरमरीत व सडेतोड उत्तर मिळालें असतें. पण टिळकांच्या मृत्यूनंतरच बोडस यांनीं त्यांच्यावरील आपल्या हल्ल्याला खरा प्रारंभ केला; आणि त्यांच्या कांहीं अनुयायांवर हल्ला करण्यासाठीं टिळकांशीं झालेल्या—म्हणजे तीं झालीं असें बोडसांकडून भासविलें जाणाऱ्या—गुप्त संभाषणांचा हवाला अलीकडे ते देऊं लागले आहेत. पण मृताचा हवाला देण्यांत तो खोडून न निघण्याची सोय

असली तरी लोकहि इतके शहाणे असतात कीं, असल्या हवाल्यावर कोणी विश्वासच ठेवीत नाहीं. बोडसांनीं टिळकांच्या लेखांतील किंवा छापलेल्या व्याख्यानांतील उतारे आधारादाखल दिले असते तर ते कोणाला पडताळून तरी पाहतां आले असते; व मग पुरावा या नात्यानें त्या आधारांना कोणी किंमत देता. परंतु मृताशीं पूर्वीं एकांतीं झालेल्या खासगी संभाषणांचा आधार कोणीं दिल्यास त्याला पडताळून पाहण्यास साधन नसल्यामुळें त्याला काडीचीहि किंमत राहत नाहीं. अशा आधारांची विश्वसनीयता किती ! तर त्याचें उत्तर हेंच कीं, स्वतां आधार देणाराची जितकी विश्वसनीयता तितकीच. स्वतः माधवराव बोडस यांच्यावर लोकांचा जितका विश्वास असेल तितकाच टिळकांच्या म्हणून त्यांनीं दडपून दिलेल्या संभाषणावर असणार! त्याहून अधिक असूं शकतच नाहीं.

## बोडस यांना कां वगळलें ?

बोडस हे पूर्वीं एक वेळ विद्यार्थीदशेंत केसरी-मराठ्याच्या उपसंपादक वर्गांत होते; व जुने संबंधी म्हणून टिळकांशीं त्यांचें भाषणसंभाषण, कामकाज पुढेंहि कांहीं वर्षें चालत असे हें खरें. पण टिळक पहिल्या कैदेंतून मुक्त होऊन परत आले व ताईमहाराजांचा खटला सुरू झाला तेव्हांपासून अगदीं अखेरपर्यंत टिळकांच्या सार्वजनिक किंवा खासगी कामकाजांत बोडस हे सतत वगळले गेले होते ही गोष्ट पुण्यामुंबईत जवळ जवळ सर्वांनाच माहीत आहे. चित्रमयजगतांतील लेखांत स्वतः बोडसच लिहितात कीं "जगन्नाथमहाराजांचा खटला, चिरोल केस, सुरतेची काँग्रेस, लखनौची काँग्रेस, विलायतचें डेप्युटेशन या प्रत्येक प्रसंगीं (टिळकांच्या) अनुयायांचे मताविरुद्ध या लेखकानें ( बोडसांनीं ) मत दिल्यामुळें तटस्थ राहणें इष्ट वाटलें व त्यामुळें अनेक अपवाद...सोसावे लाग ले." सन १९०१ पासून सन १९२० पर्यंत टिळकांच्या सार्वजनिक व खासगी आयुष्यांतील मुख्य गोष्टींची किंवा प्रकरणांची जंत्रीच एक प्रकारें स्वतः बोडसांच्या शब्दांत वर दिली गेली आहे. ती लक्षांत घेतां टिळक पहिल्या कैदेंतून सुटून आल्यापासून अखेरपर्यंत बोडसांवर कोणतेंहि कार्य सोंपवीत नव्हते, किंवा त्यांना आपल्या विश्वासांतील कार्यकर्ते मानीत नव्हते, हें आपोआपच सिद्ध होत आहे. टिळकांनीं जें जें करावयास पुढें काढावें त्यांत बोडसांनीं आपली म्हणून आढ्यतेनें कांहीं शक्कल किंवा अक्कल लढविण्याचा किंवा उपदेशिण्याचा क्रम टिळकांनीं मुळींच चालूं दिला नसेल हें टिळकांचा स्वभाव माहीत असणारा कोणीहि सांगेल.

## विश्वासाचें खरें गमक

विरोधी माणसाला कोणीहि आपलें काम विश्वासानें सांगत नाहीं, व सल्लामसलतींतहि कांहीं एका मर्यादेपलीकडे कोणी त्यांस घेत नाहीं याविषयीं सहज अनुमान होऊं शकतें. जुना स्नेही म्हणून कोणी मुद्दाम होऊन भेटण्यास आला असतां त्याच्याशीं गप्पागोष्टी सांगाव्या व प्रचलित विषयासंबंधीं वादविवादहि करावा असा टिळकांचा परिपाठ असल्यामुळें टिळकांहूनहि स्वतःला अधिक बुद्धिमान्, कायदेबाज व हिकमती समजणाऱ्या बोडसांसारख्या घमंडानंदनांनीं व्यर्थ टिळकांशीं हुजत घालीत बसावें आणि शल्यासारखा त्यांचा मनोभंग करूं पहावें यांत आश्चर्य नाहीं. टिळकांनीं बोडसांची किती किंमत मानली हें ठरविण्याचें मुख्य गमक हेंच कीं, त्यांच्या सहकारितेनें किंवा त्यांच्यावर विश्वास टाकून कोणतें महत्त्वाचें कार्य केलें ? या प्रश्नाला 'एकहि नाहीं' असें उत्तर बोडसांकडूनच मिळण्यासारखें आहे. याच्या उलट–याच अवधींत ज्यांच्याशीं मिळून-मिसळून टिळकांनीं आपलीं कामें केलीं व करवून घेतलीं त्या अनुयायांवर, म्हणजे त्यांच्या बुद्धिमत्तेवर, सल्लामसलतीवर, किंवा कर्तृत्वशक्तीवर टिळकांचा थोडाबहुत तरी विश्वास होता ही गोष्ट देखील आपोआपच लोकांना पटण्यासारखी आहे. मग स्पर्धा, असूया, हेवादावा, निराशा, कुत्सितपणा यांच्यामुळें या अनुयायांविषयीं बोडस लोकांना कांहींहि भासवोत.

## भाग्यहीन करंटा कोण ?

टिळकांच्या परिवारांतील ज्या लोकांविषयीं बोडस इतक्या तुच्छतेनें लिहितात त्यांना टिळकांनीं जवळ करावें, सतत पंचवीस–तीस वर्षें जवळ ठेवावें, आणि पूर्वीं संबंध आला असतांहि टिळकांपासून बोडस हे फुटून निघावेत व त्यांना दुरावावें याचा खरा अर्थ काय हें वाचकांस सांगण्याचें कारणच नाहीं. बोडस लिहितात कीं, टिळक हे हिमालयासारखे असून या हिमालयावर "चरणाऱ्या बकऱ्या–मेंढ्यांना त्या पर्वताचे पोटांत काय होतें, थोडेंच कळणार ! त्यांनीं वरचा चारा खावा. अंतर्गत धन शोधून काढणारा समानधर्मी आणि तादात्म्य पावणारा मनुष्य लागतो. टिळक मंडालेहून परत आल्यानंतर त्यांच्या परिवारांत असा एकहि मनुष्य नव्हता !" पण बोडसांना हें कळत नाहीं कीं, पर्वतावर चरणाऱ्या बकऱ्या–मेंढ्या चरतां चरतां कां होईना पण पर्वताच्या गुहेंत केव्हां केव्हां प्रवेश करून त्याचें अंतरंग पाहूं तरी शकल्या असतील. पण ज्या कलहप्रिय अशा कुत्सित घमंडा–

नंदन पशूचें दर्शन झाल्याबरोबर तटस्थपणाचें, मौनव्रताचें किंवा सावधगिरीचें बर्फ पडून गुहांचीं तोंडें बंदच व्हावयाचीं, त्याला गुहांतून दुरून डोकावण्यास मिळणें देखील अशक्य. बोडसांनीं देखील आपल्याकडून टिळकांच्या "अंतर्गत धना" चा शोध कांहीं थोडाथोडका केला नाहीं. येवढेंच काय पण त्यांच्या मृत्यूनंतरहि इतरांना हातीं धरून तो शोध त्यांनीं परिश्रमपूर्वक चालू ठेवला होता. पण तें "अंतर्गत धन" लाभणें त्यांच्या नशिबांतच नव्हतें. त्याला कोणीं काय करावें आणि अंतर्गत धन लाभलें नाहीं म्हणूनच तर बोडसांचा हा जळफळाट !

## उलट्या काळजाचा आरोप

टिळक व त्यांच्या अनुयायांचा परिवार यांचा उल्लेख करतांना स्वतः बोडसांना असें वाटत असावें कीं, 'मी एका दगडानें दोन पक्षी पाडीत आहें.' पण ते तर पडत नाहींतच, मात्र तशा केवळ प्रयत्नानें एकाऐवजीं दोन गुन्हे करायाची दुर्बुद्धि बोडस व्यक्त करित आहेत. सन १९०० ते १९२० पर्यंत, विशेषतः १९१४ पासून टिळकांच्या कारकीर्दीची अखेर होईपर्यंत, टिळक हे मवाळ, नेमस्त, अराष्ट्रीय, स्वार्थी, कर्तृत्वहीन, बिनधोरणी, भित्रे असल्या अनुयायांच्या कह्यांत सांपडले होते असा धाडसी किंवा उलट्या काळजाचा आरोप बोडस करतात. पण एक तर बोडसांच्या हें लक्षांत येत नाहीं कीं, त्या अवधींतील या अनुयायांमध्यें त्यांना नावडती अशी एकादीदुसरीच व्यक्ति येत नसून महाराष्ट्र, कर्नाटक, वऱ्हाड-नागपूर व इतर प्रांतांतीलहि मिळून पांचपन्नास तरी लोकप्रिय ठळक व्यक्ती येतात. या सर्वांना मिळून बोडसांनीं हीं सर्व विशेषणें लावावीं ही निवळ बदनामी होय. पण त्यांच्या योगानें या इतक्या लोकांची बेअब्रू तर होऊंच शकत नाहीं, पण स्वतः बोडस मात्र लोकांच्या दृष्टीनें साहसी, मूर्ख, घमंडानंदन असे ठरतील. कां कीं, इतक्या प्रांतांतील पांचपन्नास ठळक लोकांत मिळून जें शहाणपण निष्पन्न झालें नाहीं तें या एकट्या बोडसांच्या कानांत सांगण्याला कोणत्या शुभ मुहूर्तावर स्वर्गातून बृहस्पति खालीं उतरला होता तें एक देव जाणें ! अशा तऱ्हेचा सरसकट सर्वांवर आरोप करण्याची शरम ज्याला वाटत नाहीं त्या माणसाच्या धाडसाचें तर राहोच पण शिक्षणाचेंहि कौतुक करावें तितकें थोडेंच होईल !

## जीभ फार लांबली

पण १९००-१९२० मधील टिळकांचे सर्व अनुयायी मूर्ख हें एक वेळ कोणीं कबूल केलें तरी, अशा अनुयायी वर्गाचें टिळकांनीं द्हावीस वर्षें एकसारखें ऐकलें व ती टिळकांनीं चूक केली असें विधान करण्यांत टिळक हेच स्वतः बिनअकली होते, त्यांची अक्कल एक वेळच फसली असें नसून सतत वीस वर्षें दुसऱ्याच्या नादानें ते घोडचुका करीत गेले, असें मानण्यास लोकांनीं तयार झाल्याशिवाय बोडसांचा हा निंदाग्रंथ कोणासहि नीट लागावयाचा नाहीं. पण निंदाप्रिय बोडसांनीं टिळकांवर मारलेला हा बेअकलीपणाचा शेरा लोक मानणार नाहींत, इतकेंच नव्हे तर, तोच शेरा उलट बोडसांच्या कपाळावर उत्तरादाखल हाणल्याशिवाय ते राहणार नाहींत. टिळक हे कांहीं सर्वज्ञ नव्हते, त्यांच्याहि हातून एखादी चूक होणें शक्य आहे व होतहि असे. आणि अमुक एका माणसासंबंधानें, किंवा अमुक एका विषयासंबंधानें, किंवा अमुक एका प्रसंगासंबंधानें त्यांचें धोरण चुकलें, त्यांची दृष्टि दूरवर गेली नाहीं, किंवा एखाद्या भलत्या माणसावर त्यांनीं चुकून विश्वास टाकला, असें विवेचक बुद्धीनें कोणीं दाखवून दिल्यास टिळकांना झालें तरी चूक म्हणण्यास जनतेला कोणती चोरी ! व तसें केव्हां केव्हां लोकांनीं म्हटलेंहि आहे. पण बोडसांनीं टीका विषय लेखांत जी जंत्री दिली तिजवरून टिळकांचें वीस वर्षांचें शेवटचें आयुष्य हीं सर्वच्या सर्व मिळून एक लांबलचक चूकच होती असेंच बोडस भासवीत नाहींत काय ? जगन्नाथमहाराजांचा खटला, चिरोल केस, सुरतेची कॉंग्रेस, लखनौची कॉंग्रेस, विलायतचें डेप्युटेशन या सर्वच जर टिळकांच्या चुका तर टिळकांचें बरोबर असें शिल्लक तरी काय उरतें ! आणि या सर्वप्रकारणीं ज्यांचा व टिळकांचा मतभेद होता अशा एका जन्मभर दूर ठेवलेल्या गृहस्थाला टिळक म्हणे आपलें खरें अंतरंग समजून सांगत असत ! आणि त्या गुप्त संदेशाच्या आधारावर हा गृहस्थ टिळकांना व त्यांच्या सर्व परिवाराला मर्ख ठरवूं पाहणार !

## एका विपर्यस्त गोष्टीचा खुलासा

बोडसांची जीभ लांब असली तरी ती फार तर त्यांच्या टाळ्यांत फिरूं शकेल पण तिनें कितीहि कृतघ्न होऊन किंवा मत्सरानें गरळ ओकलें तरी, टिळक व त्यांचा निकट अनुयायी असा विस्तृत वर्ग यांच्याविषयीं सर्व साधारण रीत्या जनतेनें जें मत, जो ग्रह, बनविलेला प्रसिद्ध आहे तो अणुरेणूइतकाहि विटाळला

जाण्याचा संभव नाहीं. बोडस जर टिळकांचे येवढे मोठे जिगरदोस्त, ठेवणींतले विश्वासु सल्लागार, आणि मार्मिक व उपकारी टीकाकार, तर जवळचा दूरचा सगळा परिवार दूर करून बोडसांना उघडपणें जवळ करण्याला किंबहुना आपल्या ह्यातींत त्यांच्या स्वाधीन आपल्या संस्था करून आपल्या पश्चात् त्या चालविण्याचें अधिकारपत्र बोडसांच्या नांवें करून देण्याला, टिळकांना कोणता प्रत्यवाय होता ? सन १९२० च्या ' ऑक्टोबरांत कांहीं एक विशेष गोष्ट करून आपण गुलामगिरींतून मोकळे होऊं ' असें आपणाजवळ मरणापूर्वी पंधरा दिवस टिळक बोलल्याचें बोडस य.नीं सहज ओघानें लिहिलें आहे. ती गोष्ट कोणती हें बोडसांनीं नक्की प्रगट केलें असतें तर बरें झालें असतें. पण आमच्या माहितीप्रमाणें खरोखरच १९२० च्या ऑक्टोबरांत किंवा त्या सुमारास एक गोष्ट होणार होती. अशी कीं, काँग्रेस डेमोक्रॅटिक पक्षाच्या जाहिरनाम्यान्वयें राष्ट्रीय पक्षाचा कायदेकौन्सिलांत प्रवेश करवून, राष्ट्रीय दृष्टीनें हें एक कार्य परस्पर सुरू करवून देऊन राष्ट्रीय दृष्टीचीं इतर कार्यें करण्याची योजना मनांत स्वस्थपणें आणावी, आणि स्वतःचें वार्धक्य झाल्यामुळें केसरी-मराठा पत्रांचा ट्रस्ट करून तो श्री. केळकर यांच्या स्वाधीन एक प्रकारचा जाहीर समारंभ करून करावा, अशी टिळकांची इच्छा होती. ही गोष्ट जी इतर कांहीं जवळच्या थोड्या लोकांना माहिती होती ती, कदाचित् टिळक बोडसांजवळ बोलले असतील; व टिळक आतां जिवंत नाहींत असें पाहून तिचा असा हा विपर्यास करून संशयोत्पादक अशा मोघमपणानें त्यांनीं ती सांगितली असावी. एरवीं १९२० च्या ऑक्टोबरांत टिळक कोणत्या व कोणाच्या गुलामगिरींतून मोकळे होणार होते ?

## ईश्वर इतका कां वेडा असेल !

बोडसांचा झोंक पाहावा, तर असा कीं, कदाचित् केळकर, खाडिलकर, गोखलेप्रभृति आपल्या सगळ्या संपादक वर्गाचा आणि महाराष्ट्र, कर्नाटक, वऱ्हाड-नागपूर वगैरे प्रांतांतील सर्व अनुयायी वर्गाचा व सहकारी मित्रांचा-त्यांच्या नेमस्त वृत्तीबद्दल तिटकारा येऊन टिळक त्या सर्वांना एकदम डिसमिस किंवा बडतर्फ करणार होते ! व हा गैरसोयीचा सर्व गोतावळा झाडून टाकून आपल्या एकट्या आवडत्या बोडसांना तेवढें घेऊन दोन माणसांची प्रचंड पार्टी ( कित्येक वेळां महात्मा गांधी आपणास आपल्या विधायक कार्याला पुरेशी म्हणतात त्याप्रमाणें ) स्थापून ' नवी विटी नवें राज्य ' याप्रमाणें हिंदुस्थानचें

राजकारण एकाद्या अकल्पित अद्भुत रीतीनें सुरू करणार होते! पण बोडसांच्या शब्दानें बोलावयाचें तर "ती वेळ यावी अशी परमेश्वराची इच्छा नव्हती!' खरेंच आहे. इच्छा असेल कशी? ईश्वर कसाहि असला तरी इतका का वेडा असेल? ज्या बोडसांना दुरून पाहतांच माझें घडणारें सार्वजनिक कार्य हटकून बिघडेल असें वाटून लोकांनीं तोंड फिरवावें, ज्यानें हातांत लेखणी घेतली कीं दादाभाईसारख्या निरपवाद माणसावरहि निंदेचे शिंतोडे उडावेत, ज्याच्या स्वयंमन्यतेचा दर्प व मनाच्या कुजकेपणाची घाण येतांच नाकाला पदर लावून विनयशील माणसानें चार हात दूर जावें, एकादें कार्य मला हटकून बिघडवावयाचें असेल तेथें योजना करण्यासारखा मजजवळ एक मनुष्य ठेवणींतला आहे असें ज्याच्याविषयीं टिळकांनीं विनोदानें म्हणावें, एकाद्या संस्थेंत प्रवेश झाल्याबरोबर ज्याच्या मुत्सद्देगिरीचा परिणाम तेथें हटकून भांडणें उपस्थित होण्यांत व्हावा, ज्यानें विधायक किंवा विध्वंसक असें एकहि कार्य स्वतःचें म्हणून किंवा स्वतःच्या सामर्थ्यावर तीस वर्षांत केलें नाहीं, ज्याला आपल्या वकिलीच्या साध्या धंद्यांतहि भरपूर यश मिळवितां आलें नाहीं, टिळकांना कज्जेदलाल म्हणतां म्हणतां स्वतः ज्याच्या कोर्टांतील वादी-प्रतिवादी नात्याच्या फेऱ्या क्षुद्र कामांतहि चुकल्या नाहींत, ज्याला लोकमतानुनयकारकच असें काय पण साधेंहि सभावक्तृत्व लाभलें नाहीं, आणि वडिलार्जित तशीच स्वसंपादित विद्वत्ता पदरीं चांगली असतां ज्याच्या हातून नांव घेण्याजोगी फुकाची वाङ्मयसेवा देखील झाली नाहीं—अशा या सार्वजनिक दोषाचें माहेरघर बनलेल्या छद्मी व लोकविलक्षण मताच्या व्यक्तीला हातीं धरून आपलें सुकर काम टिळक मुद्दाम होऊन दुष्कर करतील इतके टिळक बेअकली नव्हते! व ईश्वरहि असली अघटित घटना घडवून आणण्याइतका मूर्ख नव्हता!

## खुशाल मनगटं चावा

टिळकांच्या वीस वर्षांच्या सार्वजनिक चारित्र्यासंबंधानें कोणाकोणाचा प्रामाणिक मतभेद असूं शकेल व आहेहि. परंतु टिळकांना अयुक्तिक रीतीनें मवाळ ठरवून एका विषबिंदुमात्रानें बोडसांनीं टिळकांची जी असमंजसपणानें या व इतर लेखांत बेअब्रू केली आहे, ती त्यांनीं इतर रीतीनें टिळकांच्या स्तुतीचे हौद भरल्यानेंहि भरून येणारी नाहीं. टिळकांचें राजकारण, त्यांचीं वर्तमानपत्रें व संस्था, यांची व्यवस्था टिळकांनीं आपल्या हयातींत हातानें हवी तशी व

जाणूनबुजून केली होती, त्यांत कोणताहि घातपात झालेला नाहीं किंवा धोरणाची फसगत झालेली नाहीं, अर्थात् टिळकांऐवजीं स्वतः पश्चात्ताप करून ऊर बडवीत बसण्याचें बोडसांना खरोखर कांहीं एक कारण नाहीं. बोडस ज्यांची निंदा करतात तेच जिंकून गेले. आतां बोडसांनीं जन्मभर खुशाल मनगटें चावीत 'विविधज्ञानविस्तारां'त आणि 'चित्रमय जगतां'त कुत्सित लेख लिहीत बसावें !

## बापट यांचा पुरावा

कोणीहि एकाद्या निवळ सत्कार्यांत भाग घेण्यास येण्याविषयीं बोडसांना आमंत्रण दिलें तरी त्याच्याशीं यथाशक्ति सहकार्य करण्याचें तर बाजूसच राहिलें पण तूं मला बोलावणार कोण ? तुला हें कार्य करावयास अधिकार काय ? तुझ्या संस्थेचा जन्मच कायदेशीर नाहीं ! असेंच नुसतें ओरडत उठण्याचा व केवळ अपशब्दांनीं भरलेलीं पत्रें उत्तरादाखल लिहिण्याचा बोडसांचा परिपाठ कसा आहे हें पुष्कळांना माहीत असेल. याचें एकच उदाहरण देऊं. श्री. सदाशिवराव बापट यांनीं टिळकांच्या आठवणींचा संग्रह छापून प्रसिद्ध केला त्यावेळीं इतरांप्रमाणें बोडस यांनाहि त्यांनीं सविनय विनंतिपत्र धाडलें होतें. त्याला आलेलें मासलेवाईक उत्तर वाचण्यासारखें आहे. आणि बापट यांनीं आपल्या प्रस्तावनेंत जरी बोडसांचें प्रत्यक्ष नांव न घेतलें तरी त्यांचें खालील वाक्य बोडसांनाच उद्देशून असावें यांत आम्हाला संशय वाटत नाहीं. तें वाक्य असें— " पण सर्वांवर ताण म्हणजे मुंबईच्या एका प्रसिद्ध शास्त्रीपुत्र आधुनिक 'महा' विद्वानानें या बाबतींत माझे पत्रास उत्तर म्हणून हेवा–मत्सर–द्वेषादिकांचें बोडण भरून त्याचा मला पत्ररूप प्रसाद पाठविला. तो गुप्त रूपानें झांकून ठेवणेंच प्राप्त आहे. कारण त्याचा नुसता विषारी आस्वादहि वाचकांस दिल्यास त्यांची मानसिक प्रकृति बिघडविल्याचें फुकट पाप मात्र मला माझ्या माथीं घ्यावें लागेल. " ( आठवणी खंड १ आत्मनिवेदन पृ. ८ ) कोणाचाहि कधींहि उपमर्द न करूं इच्छिणाऱ्या बापटासारख्या गृहस्थाला असलें काव्य लिहावेंसें वाटलें यावरून बोडसांच्या या विशिष्ट मनोवृत्तीचा लोकांना तिटकारा किती येत असला पाहिजे तें उघड दिसून येतें.

## हा बेशरमपणा नव्हे काय !

बोडस यांनीं टिळकांना 'सुशिक्षित मेंढरूं' म्हटलें आहे. कारण काय तर त्यांनीं प्रतियोगी सहकारितेचा मार्ग उपदेशिला. पण टिळक जर सुशिक्षित मेंढरूं

ठरले तर, स्वतः बोडस यांचा क्रमप्राप्त दर्जा प्राणिश्रेणीमध्यें किती खालीं असेल याची कल्पनाच करावयास पाहिजे. चावणें, दुगाण्या झाडणें, भुंकणें अशा त्यांच्या अनेकविध गुणांवरून बोडसांच्या स्थानाचा कोठें तरी सुगावा लागेल. राजकारणांत बोडस हे कर्दमभक्षी सरपटणाऱ्या प्राण्यामध्यें सांपडतील. राष्ट्रीय पक्षाची कर्तबगारी स्वतंत्र व तपश्चर्या खडतर असावी लागते, पण बोडस यांनीं स्वतःला राष्ट्रीय म्हणविण्यासारखी कोणती कर्तबगारी दाखविली आहे किंवा तपश्चर्या केली आहे ! बोडस हे प्रस्तुत लेखांत महात्मा गांधींच्या सर्वांगीण असहकारितेची तळी उचलूं पाहतात, व ही गांधींची असहकारिता राष्ट्रीय पक्षाचे मूलतत्त्वांना अनुसरून असल्यानें लोकांना लगेच पटली, असें म्हणतात. पण जी पटली ती गांधींची गांधींनींच परत घेतली त्याची वाट काय ! हठयोगी तपस्वी योगभ्रष्ट झाल्यास त्याला जें शासन द्यावें असें बोडस म्हणतात तें आधीं असहकारितेचा उपदेश करून ती परत घेतलेल्या गांधींना द्यावयाचें कीं मूळ कलकत्त्यास राष्ट्रीय सभेपासून ज्यांनीं तिला विरोध केला त्यांना द्यावयाचें, पण विरोध करणारे व ज्यांना विरोध केला ते दोघे काँग्रेसमध्यें होते व राहिले ! त्यांनीं शक्य ती चळवळ केली व बनेना तेव्हां भांडले तंडले. तें एक असो. पण या सर्व चळवळीच्या काळांत स्वतः बोडस हे कोठें दडून बसले होते ? किंवा प्रगट असल्यास त्यांनीं कोणत्या पक्षाचें कोणतें कार्य केलें ! किंवा ज्याला सार्वजनिक म्हणतां येईल असें तरी कार्य कोणतें केलें ! ज्याची त्याची कुचेष्टा व निंदा करणें यालाच जर सार्वजनिक कार्य म्हणावयाचें तर तें मात्र त्यांनीं भरपूर केलें.

## बोडसांचा राष्ट्रीय पक्ष कोणता ?

टिळकांचीं व त्यांचीं मतें किती जुळत होतीं हें त्यांचें त्यांनींच सांगितलें आहे. आणि गांधींच्या तर ते वाऱ्यालाहि उभे राहिले नाहींत. त्यांनीं वकिली सोडली नाहीं, खादी वापरली नाहीं, विधायक कार्यक्रमाचें काम केलें नाहीं, शुद्ध राजकीय चळवळ केली नाहीं, व कायदेभंग तर केला नाहींच नाहीं. पण ते कायदेभंग कसा करणार ! कारण ते प्रस्तुत लेखांतच म्हणतात, " सरकाराविषयीं आमची राजानिष्ठा कायदे पाळण्यापुरती आहे. " उलट ज्यांना बोडस नांवें ठेवतात त्यांनीं स्वतः कायदेभंग केला आहे, तुरुंग पाहिला आहे, व ही मर्यादित राजनिष्ठाहि कर्तव्यांत गणली नाहीं. बरें, राष्ट्रीय पक्षाच्या मुळाला गांधींच्या असहकारितेचें मूळ हें बोडस नेऊन भिडवितात तर, ते ज्याला जुना राष्ट्रीय पक्ष

मानतात त्या पक्षाच्या कोणत्याहि (एकाद्या प्रांतांतील) लोकांच्या जाहीर लेखांत अगर भाषणांत गांधींच्या बहिष्कारत्रयीचा अंधुक असा मागमूस तरी त्यांनीं काढून दाखवावा ! जो राष्ट्रीय पक्ष बोडसांच्या आचरणावरून कळून येत नाहीं, जो टिळकांच्या लेखांवरून, भाषणांवरून किंवा चळवळींवरून सिद्ध होत नाहीं आणि ज्याच्या गणगोत्राशीं गांधींचा कार्यक्रम जुळत नाहीं असा तो राष्ट्रीय पक्ष तरी कोणता ? किंवा बोडस हेच त्या पक्षाचे आद्य संस्थापक व शेवटचे अनुयायी असले पाहिजेत. टिळकांनीं स्वतःच्या राष्ट्रीय पक्षाची व्याख्या व त्याच्या तत्त्वांची चर्चा १९०७-८ सालीं म्हणजे बोडसांच्या मतांप्रमाणें ऐनतेजस्वितेचा काळ त्यांत, किंवा टिळक विलायतेहून परत आल्यानंतर, म्हणजे बोडसांच्या मतें टिळक मवाळ बनल्यानंतर केली आहे. ती दोनही प्रकारची पाहणारास प्रतियोगी सहकारिता ही प्रत्यक्ष कार्याच्या दृष्टीनें त्याहून फारशी वेगळी नाहीं असेंच आढळून येईल.

## एक निराधार विधान

प्रतियोगी सहकारिता या शब्दांचा इतिहास देतांना बोडस एका ठिकाणीं म्हणतात कीं, बॅरिस्टर बॅप्टिस्टा यांनीं सुचविलेल्या शब्दांची टिळकांना गंमत वाटली व मौज म्हणून त्यांनीं तो शब्द स्वीकारला. पण तेच स्वतः पुढें १०–२० ओळींनंतर म्हणतात कीं, " असले संदिग्ध व निरर्थक शब्द टिळक उगीच वापरतील हें संभवत नाहीं." या त्यांच्या परस्परविरोधामुळें आमचे उत्तर देण्याचे श्रम आयतेच वांचले. टिळकांच्या रेस्पॉन्सिव्ह को-ऑपरेशनमध्यें दिवाणगिऱ्या बसत नाहींत असें एक विधान बोडस यांनीं केलें आहे. तसेंच " मिळेल तें खिशांत टाकावें व आणखी मिळविण्याकरितां धडपडावें असें एक महातत्त्व अलीकडेच टिळकांच्या गळ्यांत बांधण्यांत येत आहे " अशीहि कुचेष्टा बोडसांनीं केली आहे. पण आजच्या अंकांत दुसरीकडे टिळकांच्या लेखांतील व भाषणांतील जे उतारे दिले आहेत त्यांत त्यांचें उत्तर वाचकांना मिळेल. मग बोडसांच्या रहस्योपनिषदांत टिळकांनीं त्यांना कांहीं वेगळें सांगितलें असल्यास एक ईश्वर जाणें कीं बोडस जाणें. कॉंग्रेस डेमोक्रॅटिक पार्टीच्या जाहीरनाम्यावर टिळकांची सही नव्हती तरी वस्तुतः तो त्यांनीं इतरांचा विचार घेऊन मुख्यतः आपल्या शब्दांनीं लिहिला होता व त्यांत त्यांचे व इतरांचे विचार जमेस धरून एकवाक्यता केली होती. असें असतां

जाहिरनाम्यांतील मजकूर टिळकांना पसंत नव्हता असें बोडस लिहितात त्याला आधार काय ? बरें त्यांच्यावर हा मजकूर कोणीं लादला ? तर त्याचें उत्तर बोडस असें देतात कीं "टिळकांचे भोंवतीं होमरूल लीगच्या नांवानें गोळा झालेल्या अर्धनेमस्त–प्रच्छन्न नेमस्तांचा तो निष्कर्ष अथवा लघुत्तम होता म्हटला तरी चालेल." पण स्वतः बोडस हे आपल्या अंगच्या गुणामुळें उत्तमांतले लघु किंवा लघूंतले उत्तम कांहींहि होऊं शकले नाहींत. त्यांचा जन्म दिवाभीताप्रमाणें अंधारांत बसून अभद्र कुजबुजीनें दुसऱ्यांना अपशकून करण्यांतच गेला !

## दोहोंचा अर्थ एकच

बोडस लिहितात कीं, "अमृतसर येथें दासबाबूंनीं भाषण केलें त्यांत प्रतियोगी सहकारितेला आधार नाहीं तरी जयकर, केळकर आम्हाला अमृतसरला मागें जाण्यास सांगतात." आणि बोडसांच्या मतें कानपूरच्या सभेनें अमृतसरच्या ठरावांचाच विस्तार करून त्याच धोरणानें पुढील मार्ग आंखून दिला आहे. पण बोडस हें विसरतात कीं, प्रतियोगी सहकारिता हे प्रत्यक्ष शब्द अमृतसरच्या ठरावांत नाहींत ही गोष्ट त्यांच्याइतकीच केळकरांनाहि माहीत आहे. पण प्रतियोगी सहकारिता या शब्दांशिवाय अमृतसरकडे मागें चला असेंहि म्हणून त्या सभेंतील ठरावांच्या शब्दांचाच केळकर आधार घेतात. बोडसांना ठरावाचे शब्द कबूल पण केळकरांचा अर्थ कबूल नाहीं, म्हणून ते अमृतसरला परत जाण्याच्या विरुद्ध नाहींत. पण बोडस हे ज्याच्याकरितां ज्यांच्या तर्फेनें बोलतातसें दिसतें ते पंडित नेहरू अमृतसरला परत जाण्याच्या शब्दाची माशीहि नाकावर बसूं देत नाहींत, कारण आपण अमृतसरला काय बोललों याची आठवण देखील पंडितजींना दुःसह होते !

## तुंबड्या लावण्याचा उद्योग

कानपूरच्या राष्ट्रीय सभेच्या ठरावाचा अर्थ म्हणून बोडस असें भाष्य करतात कीं, राष्ट्रीय पक्षाच्या कसोटीनें कानपूरच्या ठरावांतील सिद्धान्तच कायम होतो. कारण राष्ट्रीय पक्षाचें मुख्य ब्रीद म्हणजे "तटस्थ वृत्ति" ! बोडसांनीं हा गहन सिद्धान्त कोठून काढला देव जाणें. या तटस्थ वृत्तीचीं उदाहरणें प्रत्यक्ष राजकारणाला लावून त्यांनीं तें विशद केलें असतें तर त्यांचे वाचकांवर फार उपकार झाले असते. आम्हाला ते कांहींहि म्हणोत, पण पंडित नेहरू यांचें

धोरण तरी त्यांना तंतोतंत मान्य आहे कीं काय हें बोडसांनीं सांगितलें तरी ते उपकारच करतील. पण संदिग्धपणा हेंच ज्यांच्या शहाणपणाचें भांडवल, व सरसकट सर्वांवर लाथा झाडणें हीच ज्यांची मुत्सद्दिगिरी, त्यांनीं जर कधीं स्पष्ट विधान केलें तर त्यांचा धंदा बुडेल त्याची वाट काय ? आजच्या घटकेला राष्ट्रीय पक्षांतील खरे लोक कोण व त्यांतल्या त्यांत खरा कणखर कोण हें तरी लोकांना मार्गदर्शक म्हणून बोडस सांगतील काय ? गांधींनीं टिळकांनंतर राष्ट्रीय पक्षाची अब्रू बचावली असें एक विधान बोडसांनीं एके ठिकाणीं केलें आहे. पण असहकारितावाद हा पोरकट म्हणून त्यांनीं लेखाच्या शेवटीं म्हटलेंच आहे. शिवाय गांधींचें झालें तरी अमुक वेळचें आचरण तंतोतंत बरोबर असेंहि बोडसांनीं कोठें लिहिल्या म्हटल्याचें आम्हांस आठवत नाहीं.

## काय तें करून दाखवा

राष्ट्रीय पक्ष असल्यास त्याची आठवण करून देण्याला व नसल्यास तो स्थापण्याला बोडसांना रान मोकळें आहे. पण तें काम वर्ष सहा महिन्यांनीं एकाद्या मासिकांत एकादा कुजकट लेख लिहून होणारें नाहीं हें त्यांनीं ध्यानांत ठेवावें. प्रत्यक्ष काम करणारा एकादे वेळीं चुकेलहि व त्या चुकीची क्षमा जनता त्याला करतेहि. पण आपल्या समजुतीप्रमाणें बरेंवाईट कसेंही क्कां असेना पण कार्याची टीका चालू ठेवणारा कोण, आणि नादान अंगचोर व फुकट लब्धप्रतिष्ठित कोण यांतील अंतर न कळण्याइतकी कांहीं जनता अद्यापि मूढ बनलेली नाहीं.

---

# ७१ ब्राह्मण विरुद्ध म्हणे सर्व जग !

( ता. ३१ ऑगस्ट १९२६ )

क्रिकेटच्या खेळांत खिळाडू लोक निरनिराळ्या नांवाचे पक्ष बनवून सामने करीत असनात. या देशचे–परदेशचे, या गांवचे–त्या गांवचे, हा जिमखाना–तो जिमखाना, हें हपसि–तें हपसि, धंदेवाईक–बिनधंदेवाईक, असे जातिनिरपेक्ष पक्ष असतातच. पण हिंदुस्थानांत जातिनामांचें प्राबल्य असल्यामुळें हिंदु, पारशी, मुसलमान, युरोपियन अशा नांवानेंहि पक्ष बनून चतुरंगी सामने अलीकडे होऊं लागले आहेत. पण या सर्वांशिवाय आणखी एक नांव खिळाडलोक

केव्हां केव्हां गमतीनें धारण करतात. समजा, खडकीस खिळाडू लोकांचा एक अड्डा आहे, व स्वतः त्यालाच अकराहून अधिक गडी मिळत नाहींत. मग दुसऱ्या बाजूला ते कोणता पक्ष गांवांतल्या गांवांत निर्माण करणार? अशा वेळीं आपल्यांतलेच चार-पांच, परगांवचे पाहुणे आलेले दोन-तीन, वाटेचा एखाद दुसरा वाटसरू, कोणाच्या घरचा गडी तर कोणाच्या घरचा बाल्या, किंवा भय्या असा संच जमवून दोन पक्ष बनवितात, व त्या सामनेवाल्या जोडीला 'खडकी विरुद्ध सर्व जग'-खडकी अगेन्स्ट धी वर्ल्ड-असें नांव देऊन सामन्याची हौस पुरवून घेतात!

ब्राह्मण-ब्राह्मणेतर वाद घेतला तर त्याचीहि गोष्ट कांहींशी अशीच आहे मात्र त्यांत फरक दोन प्रकारचा आहे. एक हा कीं, ब्राह्मण-ब्राह्मणेतर हा सामना क्रिकेटच्या सामन्यासारखा खेळांतला मौजेचा सामना नसून त्यांतल्या चुरशींत द्वेष मत्सर वगैरेंची भेसळ झाली आहे. ती इतकी कीं, खेळांत तसा कांहीं प्रकार घडल्यास पंच किंवा अंपायर घंटा वाजवून खेळच बंद करून टाकतात! दुसरा फरक असा कीं, "अमुक विरुद्ध जग" अशा जोड्या जेव्हां लागतात तेव्हां जग हें कांहीं आपला पक्ष बनवीत नाहीं; तर 'अमुक' नाम धारण करणारे लोकच आधीं स्वतःला बाजूला काढून मग दुसऱ्या बाजूला जगाची स्थापना करतात. पण या ब्राह्मण-ब्राह्मणेतर वादांत ब्राह्मणांनीं आपण होऊन उरलेलें सर्व जग दुसऱ्या बाजूला पक्षरूपानें प्रस्थापित केलेलें नाहीं. उलट ब्राह्मणांविरुद्ध प्रतिकार, द्वेष, मत्सर अशा भावनांनीं प्रवृत्त झालेल्या लोकांनींच एकाला दुसरा, दुसऱ्याला तिसरा अशा संघटनेनें एकत्र येऊन ब्राह्मणेतर नांवाचा घेडगुजरी पक्ष बनविलेला आहे. जसें कांहीं सर्व जगांतल्या माणसांनीं एकत्र होऊन आपले क्रिकेटिअर गडी निवडून मग खडकीला सामन्याला पाचारण करावें अशांतला हा प्रकार आहे. ब्राह्मणांनीं आपण होऊन सर्व जगाला सामन्याला बोलावलेलें नाहीं; पक्षभेदाचें हें नामाभिधान केवळ ब्राह्मणांचा व्यवच्छेद व त्याचबरोबर त्यांचा उच्छेद करूं इच्छिणारांनींच स्वतः बनविलें आहे.

पण ही गोष्ट कांहीं आजकालची नाहीं. अनेक वर्षें ती घडून येत आहे. ब्राह्मणेतर हा शब्द मात्र अलीकडे बनला गेलेला आहे. केसरी पत्राच्या पहिल्याच वर्षाच्या ११।१२ व्या अंकांत 'ज्याचा त्याचा ब्राह्मणांवर कटाक्ष' या

मथळ्याखालीं दोन लेख आलेले आढळतात. 'ज्याचा त्याचा' या शब्दांनीं काय ध्वनित होतें हें सांगावयास नकोच. मात्र या लेखांचे वेळीं ब्राह्मणांची निंदा नालस्ती करण्यांत मुख्य भाग साहेब लोकांनीं घेतलेला होता. पण साहेबांना युरोपियन, अँग्लो-इंडियन हीं नांवें आधींच असून तीं त्यांना प्रियहि होतीं. पुढें ब्राह्मण हे हिंदुधर्माचे पुरस्कर्ते म्हणून मुसलमान लोक त्यांचा द्वेष करूं लागले. पण त्यांना 'मुसलमान' या नांवाचा अभिमान म्हणून त्यांनीं तें सोडलें नाहीं. पार्शी हे हिंदूंचे द्वेष्टे नसले तरी क्वचित् निंदक असत. पण त्यांच्या निंदकत्वाची हौस स्वतःस ब्राह्मणेतर हें प्रतियोगी नांव घेऊन पार्शी किंवा झोरोष्ट्रीयन हें नांव टाकण्यापर्यंत गेली नाहीं. मराठा समाजांतील कांहीं वर्गांनीं ४०।५० वर्षांपूर्वींहि ब्राह्मणवर्गावर टीका सुरू केली होती. पण त्यांनींहि ब्राह्मणेतर नांव धारण केलें नव्हतें. अस्सल मराठ्याला आतांप्रमाणें तेव्हांहि मराठा हेंच नांव भूषणास्पद व प्रिय होतें, व ब्राह्मणेतर हें संकर नाम घेऊन आपलें अभिजात सनातन ऐतिहासिक नांव बुडविण्याला ते तयार झाले नाहींत.

आज देखील स्वतःच्या जातीविषयीं अभिमान बाळगणारे लोक ब्राह्मणेतर हे संकर नांव घेण्याला तयार नाहींत. त्यांना स्वतःच्या नांवानेंच ओळखून घेण्याची इच्छा असते. कोणतीही जात झाली तरी ती जशी सर्वगुणसंपन्न असत नाहीं, तशी ती निर्दोषहि असत नाहीं; अर्थात् अभिमान धरावयाचा तर त्याच नांवाचा धरावा. दोष पदरांत घ्यावयाचे तर सुधारण्याच्या बुद्धीनें त्याच नांवानें स्वीकारावे व दुसऱ्याला वाटणारे दोष खरे नाहींत असें समर्थन करावयाचें असेल तर तें त्याच नांवानें करावें, अशी सामान्यतः सुजाण व स्वाभिमानी लोकांची रीत असते. परंतु ज्यांना आपल्या नांवाचा अभिमान नाहीं ते लोक मात्र दुसरें एखादें नांव सहज स्वीकारतात, मग त्यांत आपलें परंपरागत नांव किंवा व्यक्तित्व नष्ट झालें तरी चालेल. 'ब्राह्मणेतर' हें नांव अशाच प्रकारचें आहे. तें मिश्र व संकीर्ण म्हणून त्यांत स्वारस्य नाहीं व त्यांत सर्व जगाचा व्यर्थ समावेश केल्यामुळें त्यांत यथार्थ सत्यहि नाहीं. पण दुसऱ्याला अपशकून करण्याची इच्छा अनावर झाली म्हणजे आपल्या स्वतःची काय स्थिति होते याजकडे द्वेषांध मनुष्याचें लक्ष राहतें आहे कशाला ?

सन १९२० च्या मार्च महिन्यांत लो. टिळकांनीं 'ब्राह्मण व ब्राह्मणेतर' या नामविभागावर एका लेखांत मार्मिक टीका केली होती. ते म्हणतात,

"ब्राह्मण व ब्राह्मणेतर हा भेद कसा व कोणत्या शहाण्यानें काढला हें आम्हांस कळत नाहीं. तर्कशास्त्रानेंच कदाचित् असा भेद करतां येईल. इंग्रजींत या वर्गीकरणाला 'डिव्हिजन बाय डायकॉटमी' असें म्हणतात. मराठींत त्याचें वर्णन 'अस्तिनास्तिरूप किंवा तत्तदितरूप वर्गीकरण' असें करतां येईल. त्याची रीत अशी कीं, कोणास तरी बाजूला वगळून काढून ठेवावयाचें असें आधीं ठरवून मग तदितर जगांतील सर्व इतर वस्तू एक म्हणून त्यांचा वर्ग बनवावयाचा." पण हा दुसरा वर्ग बनवितांना त्यांतील सर्व घटकांना समान असें लक्षण हुडकून काढूं गेल्यास असंबद्धताच पदरीं येते. अर्थात् हें वर्गीकरण तर्कशुद्ध नाहीं तर निवळ तर्कटपणाचें होय.' ब्राह्मणेतर शब्दासंबंधानें पाहतां अशीच गोष्ट घडलेली आहे. पण नदीला पूर आला म्हणजे असेंच व्हावयाचें. कारण मग तिच्या पाण्याचें समर्याद म्हणून स्वच्छ असें जें रूप तें नष्ट होऊन, ज्याचें पाण्याशीं समानधर्मत्व नाहीं असे, शेंकडों पदार्थ त्यांत वाहून येतात व ते सर्व पुराबरोबर वाहवत जातात. उदाहरणार्थ, नदीच्या पात्रांतील वाळू, नदीकांठची माती, दगड, धोंडे, काटक्या, कांटे, साप, विंचू, खेकडे, मैलमोऱ्यांची घाण, सर्व कुचकेनासके पदार्थ वगैरे सर्व असंबद्ध पदार्थ जणुं काय एका घरचे असल्यासारखे एकत्र दिसतात. आणि पुराचा फायदा घेऊन पोहण्याची हौस पुरवून घेणारा एखादा धाडसी जवान, किंवा गढुळ पाण्यानें आंधळे झालेले मासे पकडूं पाहणारा एखादा धूर्त कोळी हे देखील या पुरांतलेच भाग आहेत कीं काय असें एखाद्या भोळ्या मनुष्याला वाटण्याचा संभव असतो.

ब्राह्मणेतर चळवळीचा मूळ उगम निदान मुंबईइलाख्यांत तरी मराठा जातींत झालेला आहे. व या चळवळीचें पाणी जोंपर्यंत त्या जातीच्या नदीच्या पात्रांतूनच समर्याद वाहत होतें तोंपर्यंत त्या चळवळींत कांहीं अयुक्तिकपणा असला तरी कांहीं सयुक्तिकपणाहि होता. पूर्वी ब्राह्मणवर्ग व मराठावर्ग हे दोघेहि आपआपल्या परीनें पुढारलेलेच होते. यामुळें त्यांना परस्परांचा हेवा करण्याचें फारसें कारण नव्हतें, किंबहुना त्यांतल्या त्यांत राज्याच्या गादीची मालकी, जहागिरदाऱ्या, लष्करी पेशा वगैरे अनेक दृष्टींनीं मराठ्यांचीच बाजू थोडी चढ असून ब्राह्मण आपलें जरी महत्त्वाचें स्थान टिकवून राहिले होते तरी उत्कर्ष मराठ्यांचाच होता. इंग्रजी राज्यांत मराठी राज्याची गादी गेली, जहागीरदाऱ्या कमी झाल्या व लष्करी पेशा जवळ जवळ ठार बुडाला, या-

मुळें मराठा समाज उत्कर्षाच्या तिमजल्यावरून अपकर्षाच्या तळमजल्यावर एकदम येऊन पोंचला. त्याच इंग्रजी राज्यांत ब्राह्मणांचेंहि मूळचें वैभव राहिलें नाहीं. तोहि अपकर्षाच्या तळमजल्यावरच येऊन आदळा. परंतु मराठ्यांप्रमाणें तिमजल्यावरून न पडतां दुमजल्यावरून पडल्यामुळें त्याचें अंग तितकें ठेचलें नाहीं. अर्थात् या अधोगतीची सर्व जबाबदारी इंग्रजी राज्याकडे आहे आणि मराठे आणि ब्राह्मण हे दोघेहि समदुःखीच असल्यामुळें प्रथम त्यांना परस्परां-विषयीं सहानुभूतिच वाटली असली पाहिजे.

पण कोणीहि दोघे एकाच खड्यांत पडले असले तरी त्यांतील प्रत्येकजण त्यांतल्यात्यांत अधिक बरीशी जागा खास आपणाकरितां मिळविण्याचा प्रयत्न करीत असतो. आणि मोठमोठीं राज्यें, संस्थानें, जहागीरदाऱ्या नष्ट झाल्या असतां नोकऱ्याचाकऱ्यांच्या रूपानें मिळणाऱ्या भाकरीच्या तुकड्यांत अधिक भाग आपणांस मिळावा, व तो मिळविण्याचें साधन जें शिक्षण तें ब्राह्मणांइतकें आपणासहि असावें, अशी एक प्रकारची स्पर्धेची बुद्धि मराठा समाजांत नंतर उत्पन्न झाली असल्यास ती स्वाभाविक असें आपण म्हणूं. परंतु केवळ त्या बुद्धीनें आजच्या ब्राह्मणेतर चळवळीच्या संकीर्ण स्वरूपाचें किंवा बेहोपपणाचें समर्थन तर नाहींच पण त्याचा सयुक्तिक खुलासाहि होत नाहीं. अर्थात् ही चळवळ म्हणजे केवळ द्वेषाचें तें एक वेडें पीक पिकलें आहे किंवा तो एक महा-पूर आला आहे इतकेंच म्हणतां येतें. पण ब्राह्मणेतर या नांवाखालीं व त्याचा फायदा येऊन त्यांत निरनिराळ्या हेतूंनीं मिसळलेले विविध व अजब प्राणी पाहिले म्हणजे वर दिलेल्या महापुराच्या पोटांतील वस्तूंच्या यादीची आठवण झाल्याशिवाय राहात नाहीं.

अठरापगड जातींतून एक ब्राह्मण जात तेवढी वेगळी काढून बाकी सतरा जातींचा एक संकीर्ण वर्ग कोणी बनवूं गेल्यानेंहि तो बनूं शकतच नाहीं, ही गोष्ट वेगळी. पण तसा तो बनविण्याचा आज हास्यास्पद प्रयत्न मात्र होत आहे यांत शंका नाहीं. एकदां ब्राह्मण व ब्राह्मणेतर असा भेद केला म्हणजे या ब्राह्मणेतर वर्गांत सह-जच कोण कोण येतात तें पहा. टिळकांच्या शब्दांनीं या वर्गाचें वर्णन द्याव-याचें तर तें असें कीं " यांत सयाजीराव गायकवाड येतात, महाराज शिंदे-सरकार येतात, रजपूत राजेरजवाडे येतात, भाटे व मारवाडी व्यापारी लोक येतात, जातिवंत मराठे व कुणबी शेतकरी येतात, माळी येतात, कुंभार येतात,

कोष्टी येतात, तेली येतात, तांबोळी येतात, जैन येतात, लिंगायत येतात, अस्पृश्य येतात, अंत्यज येतात, कोळी येतात, कातकरी येतात, ठाकर येतात, रामोशी येतात, बेरड येतात, पारशी येतात, मुसलमान येतात व इंग्रजहि येतात." पण असें तोंडानें 'येतात' म्हटल्यानें प्रत्यक्ष कोणी थोडेच येऊं शकतील ! कारण आजच्या ब्राह्मणेतर चळवळींत कोण कोण मिसळले आहेत तें पाहा. १ माथें फिरलेला एखादा अस्पृश्यांचा पुढारी; २ शुद्धिसंघटनेच्या चळवळीवरील रागामुळें मराठे लोकांना आलिंगन देऊन त्यांच्या गालांना ओष्ठ-स्पर्श करूं पाहणारा एखादा खिलाफतिस्ट मुसलमान; ३ असहकारितेच्या चळवळींत एकाच्या भावनेनें बेहोष होऊन जानवें तोडून किंवा दाढी वाढवून मीं देशाकरितां जातीवरहि पाणी सोडलें असें म्हणून आत्मवंचना करणारा एखादा कट्टर ब्राह्मण; ४ कुजकी घाण मिळाली तरी तिची निदान दारू करून ती पितां पाजतां येऊन घाणीचेहि चार पैसे करण्याची वंशपरंपरा संवय लागलेला, आणि म्हणूनच या ब्राह्मणेतर चळवळीच्या घाणीनें आपल्या वैभवाची भट्टी सजविणारा एखादा पारशी; ५ किंवा चोरांचा मेळा हातीं ठेवून, त्यांजकडून परस्पर दरवडे घालवून, आपण लूट घेऊन, शेवटीं त्यांनाच धरून देऊं पाहणारा; स्वतः चोराचा वेष व चोराचें नांव क्षणभर घेणारा, गुप्त पोलिसाचें अनुकरण करणारा एकादा स्वार्थी हिकमती इंग्रज; अशी सर्व मासलेवाईक नमुनेदार मंडळी ब्राह्मणेतर या नांवाखालीं आज एकत्र झाली आहेत ! अर्थात् पाणिनीचें 'श्वानं युवानं मघवानं' हें सुप्रसिद्ध सूत्र पुनः एकवार यथार्थ झालें !

पण कोणीहि भला मनुष्य असें विचारीत नाहीं कीं, या सतरा–पगड जातींचें एके ठिकाणीं काय काम ? कोणी विचारी मनुष्य क्षणभर स्वतःच्या मनाला किंवा दुसऱ्याला विचारून पाहत नाहीं कीं, या सतरा–पगड जाती, हे छपन्न देशचे मूर्खांचे राजे, हे आपापल्या बगलेनेंच चालणारे खेकडे, हे अखेर एकमेकांना गिळणारे साप, हे आपापल्या दिशेनें धांवणारे पण शेपटींत शेपटी मिसळणारे धूमकेतू, चार दिशेला जातांना चवाठ्यावर गांठ पडलेल्या या घातक संक्रांती, हे विरुद्ध दिशांकडे पाहणारे पण एकाच तोंडावर येऊन बसणारे तिरळे डोळे, एकत्र येऊन स्वतःचें असें संकलित हित काय साधणार ? किंवा येवढा मोठा कट करून ब्राह्मणजातीचें तरी काय वांकडें करणार ? यांचा काय धर्म एक आहे, का संस्कृति एक आहे; का जात एक आहे, का भाषा एक आहे,

का ऐतिहासिक परंपरा एक आहे, का भावी ध्येय एक आहे, का भावना एक आहे, कीं हे एकत्र आले म्हणून एकजीव होतील ? येऊन-जाऊन ब्राह्मणांच्या सरकारी नोकऱ्याच काढून घ्यावयाच्या असतील तर त्याला येवढा कट किंवा पोक्त सरंजाम कशाला हवा ? उलट ब्राह्मणांच्या नोकऱ्या गेल्या म्हणून ब्राह्मण जाति उद्यां मरणार असेंहि थोडेंच आहे ! पण एकेक काळच असा येत असतो कीं, अशी एखादी असमंजस चळवळ एखाद्या देशांत क्षणभर व्हावी, क्षणभर द्वेषबुद्धीला महापूर यावा, आणि 'यथा काष्ठं च काष्ठं च' या श्लोकांत वर्णिल्याप्रमाणें प्रचंड 'भूतसमागम' एकत्र घडलेला दिसावा.

वर एके ठिकाणीं आम्हीं दर्शविल्याप्रमाणें केसरीला हें स्वप्न पंचेचाळीस वर्षांपूर्वीच पडलेलें होतें, व त्या स्वप्नाची फलश्रुतीहि केसरीनें त्याच वेळीं सांगितली होती. ती अशी "सुदैवानें सरकारचा थोडा डोळा ब्राह्मणावर आहे, यासाठीं ब्राह्मणांचा अभ्युदय न साहणाऱ्यांस आमची अशी सूचना आहे कीं, त्यांनीं ब्राह्मणांच्या वर्चस्वाचें जूं झुगारून देण्याचा हा अमोलिक प्रसंग दवडूं नये ! परमेश्वराच्या कृपेनें इतकेंच न होवो कीं, दोन बोक्यांच्या तंट्यांत सगळाच खवा भांडण मिटविणाऱ्या कार्यसाधू वानराच्या तोंडांत पडावा. पण सध्यां आम्हांत ज्या फळ्या होऊं लागल्या आहेत त्यावरून सगळ्या जाती मोडून जाऊन त्यांच्या दोनच जाती होतीलसें वाटतें. एक इंग्रजी ब्राह्मण, सगळे आंग्ल-भौम शाखेचे. दुसरी जात पहिल्या जातीच्या अंकित सगळ्या भारतीय जातीच्या मिश्रणानें झालेली !" ब्राह्मणेतर पक्षांत जमलेल्या या आगंतुक जातींत मिश्रविवाह होऊन हा नवीन पक्ष दृढमूल होण्याची जामिनकी अजून त्यांतील घटकांनीं एकमेकांस दिली घेतलेली किंवा मागितलेली नाहीं. हा सर्व प्रकार लावालावीच्या नात्याचाच आहे व तसाच तो राहणार. कारण 'समेत्य च व्यपेयातां' हें अनादि तत्त्व ठरलेलेंच आहे. उंसाभोपळ्याची मोळी बांधतां बांधतांच सुटावयाची. दुसऱ्याचें वाटोळें करण्याकरितां एकत्र झालेले आंवळे स्वतः स्वार्थबुद्धीनें वाटोळेच असल्यामुळें त्यांची मोट केव्हांहि नीट बांधतांच येत नाहीं.

पण परवांच्या ब्राह्मणवर्गाच्या जाहीर सभेंत कित्येक वक्त्यांनीं दाखवून दिल्याप्रमाणें, या ब्राह्मणेतर चळवळीनें अखेर ब्राह्मणवर्ग तर नष्ट होणार नाहींच, पण 'अपकृतापि उपकृतं' या न्यायानें तूर्त तरी ब्राह्मणवर्गाचा एक फायदा

झाला आहे. तो असा कीं, उघडपणें ब्राह्मण म्हणवून घेण्यांत किंवा ब्राह्मण ज्ञातीची संघटना करण्यांत आपण राष्ट्रीय हिताचा घात हटकून करीत आहोंत अशी जी कांहीं फाजील उदारमतवादी ब्राह्मणांची कल्पना होऊन राहिली होती, ती नष्ट होऊन स्वतःस ब्राह्मण म्हणवून घेण्यांत एक प्रकारचें भूषण आहे असें त्यांना आतां कांहींसें पटूं लागलें आहे. मात्र ही एक प्रकारची प्रतिक्रियाच होय. आणि प्रतिक्रिया ही फक्त क्रिये-पुरतीच असते, यामुळें या जातिविशिष्ट भावनेचा ब्राह्मणवर्गाकडून कधींहि अतिरेक होणार नाहीं. गेलेला तोल संभाळण्यापुरताच कां होईना पण तेवढ्या वेळेपुरता दुसऱ्या बाजूला मुद्दाम तोल टाकावा लागतो हें शुद्ध शास्त्रीय असें तत्त्व आहे. कालिदासानें म्हटल्याप्रमाणें

" ज्वलति चलितेंधनोऽग्नि विप्रकृतः पन्नगः फणां कुरुते
प्रायः स्वमहिमानं क्षोभात्प्रतिपद्यते जंतुः ॥ "

हेंच खरें आहे. विस्तवाला कोणीं चाळविलें तर त्या चाळविण्यानें उलट त्याजवरची राख निघून जाऊन तो अधिक सतेज होतो. ब्राह्मणेतर पक्षानें तोंडचा किंवा हातवाऱ्यांचा वारा कितीहि सोडला तरी गवताच्या काडीप्रमाणें ब्राह्मण वर्गाला तो उडवून टाकील एवढें वादळ होणें शक्यच नाहीं. सयुक्तिक-पणाचे वाद असतील ते केव्हांहि देशांतील एका वर्गानें दुसऱ्याशीं बेलाशक घालावेत. समाजांतील बेतालपणा किंवा अव्यवस्था किंवा दुःस्थिति नाहींशी करण्याकरितां स्पष्टपणें बोलणें भांडणें हा प्रत्येक वर्गाचा निसर्गसिद्ध हक्कच आहे. या गोष्टीला ब्राह्मण वर्गानें कधींहि नाहीं म्हटलें नाहीं. किंबहुना बदल-लेल्या परिस्थितींत ब्राह्मण वर्गाच्या कर्तव्यांत व आचारविचारांत जो योग्य फेरबदल व्हावयास पाहिजे होता व आहे त्याचा उपदेश करण्याला, स्वजातिहितविरोध लक्षांत न घेतां, ब्राह्मणवर्गांतील पुढाऱ्यांनींच गेल्या पन्नास वर्षांत प्रारंभ केला, त्या कामीं इतरांच्या चळवळीची वाट त्यांनीं पाहिली नाहीं. पण हें जसें त्यांनीं पूर्वी केलें तसेंच त्यांजविरुद्ध असमं-जसपणाचा कडेलोट किंवा अत्याचार होऊं लागला असतां, त्याच उदार बुद्धीचें रूपांतर स्वसंरक्षक शक्तींत करण्यासहि ईश्वर त्यांना स्फूर्ति व बळ दिल्याशिवाय राहाणार नाहीं, असा आमचा भरंवसा आहे.

असो. याविषयीं स्वतः ब्राह्मणांना काय म्हणावयाचें तें ते म्हणतीलच, पण

ब्राह्मणेतर हा असंबद्ध समुदायवाचक शब्द घेऊन त्यांत ब्राह्मणांचा द्वेष न करणाऱ्या व त्यांच्याशीं स्नेहभावानें राहणाऱ्याहि अनेक वर्गांना अळेंबळें कोंबण्याचा जो प्रयत्न सुरू आहे त्यानें अशा वर्गांची बदनामी होत आहे, याकरितां त्या बाबतींत स्वतः त्यांनाहि कांहीं म्हणण्यासारखें असणारच, व तेंहि त्यांचें त्यांनींच बोलून दाखविलें पाहिजे. असें केल्यानेंच ब्राह्मणेतर या भभुक व जगड्व्याळ नांवांत खरें सत्व किंवा तत्त्व किंवा सत्य किती आहे, आणि भ्रमाचे कपड्यावर कपडे आंगावर चढवून मूळच्या काडीजवानाला एखाद्या मल्लाचें किंवा राक्षसाचें स्वरूप आणून देण्याचा प्रयत्न किती झाला आहे हें आपोआप लोकनिदर्शनाला येईल.

---

## ७२ कौन्सिलच्या मतदारांचें कर्तव्य

( ता. २ नोव्हेंबर १९२६ )

प्रांतिक कायदे कौन्सिलाची निवडणूक आतां फक्त एक आठवड्यावर आली व पुढें आठ दिवसांनीं वरिष्ठ कायदे कौन्सिलचीहि निवडणूक होणार. अशा वेळीं कौन्सिलांच्या मतदारांचें कर्तव्य काय आहे याविषयीं थोडेसें विवेचन केलें असतां तें अस्थानीं होणार नाहीं म्हणून त्याविषयीं आज दोन शब्द लिहीत आहों.

स्वराज्य हें जसें या देशांतील सर्व लोकांच्या हिताकरितां हवें आहे, त्याचप्रमाणें मतदारीचा अधिकारहि यच्चयावत् सर्व लोकांना मिळाला तर तोहि इष्टच आहे. पण एक तर केवळ शिरगणतीनें मताधिकार देण्याची वेळ या देशांतच काय, पण अनेक शतकें लोकशाही–स्वराज्याचा उपभोग घेत असलेल्या पाश्चात्य देशांतहि आलेली नाहीं. आणि तें सयुक्तिकहि आहे. जगांत माणसासारखा माणूस या दृष्टीनें ईश्वराच्या घरीं सर्व सारखेच आहेत. तथापि कोणताहि अधिकार म्हटला म्हणजे तेथें पात्रतेचा प्रश्न आल्याशिवाय राहातच नाहीं. ज्याचें फल अदृष्ट म्हणजे पारलौकिक अशा धर्मांतहि पात्रतेप्रमाणें अधिकारभेद व अधिकारभेदाप्रमाणें कर्तव्यभेद मानण्यांत येतो, तर दृष्टफल असें जें राजकारण त्यांतहि हा भेद मानल्यास तें अयोग्य नाहीं. राज्य म्हणजे सर्व संसारांचा एकवटलेला संसार. या संसाराचा सुरळीतपणा व सुरक्षितपणा पैशाच्या खर्चावरच मुख्यतः अवलंबून राहतो. त्यामुळें हा पैसा देणारे व

हा पैसा पुरविणारे लोक हेच त्या राज्याचे मूलघटक व चालक असें ओघानेंच प्राप्त होतें.

'नो–टॅक्सेशन विदाऊट रिप्रेझेंटेशन' हें राजकारणांतील सूत्र सर्वसंमत आहे व त्याचा अर्थ असा कीं, 'ज्याला राज्याधिकार नाहीं त्याजवर कर देण्याचीहि जबाबदारी नाहीं' पण याच सूत्राचें परिवर्तन केलें असतां दुसरें जें एक प्रतियोगी सूत्र निर्माण होतें तेंहि तितकेंच यथार्थ आहे. तें म्हटलें म्हणजे 'नो रिप्रेझेंटेशन विदाऊट टॅक्सेशन' अर्थात् 'कर देण्याची जबाबदारी जो स्वीकारीत नाहीं त्याला राज्याधिकारहि मिळणार नाहीं." सुधारणांचा कायदा होईपर्यंत प्रतिनिधी निवडून देण्याच्या द्वारानें जो राज्याधिकार या देशांतील लोकांना मिळाला होता तो फारच मर्यादित होता. म्हणजे सुमारें एक लक्ष लोकसंख्येला कायदेकौन्सिलचा एक मतदार किंवा सर्व हिंदुस्थानांत मिळून तीन हजार मतदार इतकी ही संख्या मर्यादित होती. आजमितीला ही संख्या सुमारें साठ लक्षांपर्यंत गेली आहे व दिवसेंदिवस ती आणखी वाढेलहि, तथापि ती केव्हांहि मर्यादितच राहणार. म्हणून या मर्यादित संख्येंत समावेश होण्याचें भाग्य कर देण्याच्या गुणानें ज्यांना लाभलें त्यांनीं त्यायोगें आपल्यावर येऊन पडणाऱ्या जबाबदारीचाहि विचार केलाच पाहिजे.

ही जबाबदारी म्हणजे सर्वस्वीं लोकांचें हितच जो पाहील असा प्रतिनिधी निवडून देणें ही होय. वास्तविक तीन वर्षांत एकदां मत देऊनहि ती पुरी पडत नाहीं. कारण प्रतिनिधी झाला तरी मतदाराच्या बळावरच काम करणार. तो चांगला दक्ष कार्यकर्ता असेल तर त्याला त्याच्या नेमणुकीच्या कालावधींत मतदारसंघाचें पाठबळ लागेल. तो वाईट असेल तर मतदारसंघाची त्याच्यावर देखरेख व कदर रहावी लागेल, पण मुळांत निवडून दिलेला हा प्रतिनिधी चांगला किंवा वाईट असेल त्यावरच पुढील गोष्टी अवलंबून राहाणार, म्हणून निवडणुकीच्या एका क्षणांत घडून येणाऱ्या कार्यांची, म्हणजे उमेदवार चांगला किंवा वाईट निवडून देण्याची जबाबदारी ही प्राथमिक व अधिक महत्त्वाची ठरते.

एकाद्यास सकृद्दर्शनीं असें वाटेल कीं आपलें हित काय आहे हें मतदाराला समजत असलेंच पाहिजे आणि तें हित कोणता उमेदवार अधिक साधेल हें ठरविण्यांत मतदाराला अवघड तें काय आहे? पण ही गोष्ट दिसते इतकीच जर खरोखर सोपी असती तर राजकारणाचा पुष्कळसा लढा आपो-

आपच उलगडला असता, पण ती दिसते इतकी सोपी नाहीं. हें कसें तें पाहा. देशाचें राज्ययंत्र हें तराजू सारखें आहे. तराजूला दोनच सारख्या वजनाचीं पारडीं असतात. तीन पारड्यांची तराजू असूं शकत नाहीं. त्याप्रमाणें राज्ययंत्राच्या तराजूचें एक पारडें म्हणजे राजहित व दुसरें पारडें म्हणजे लोकहित. यांतील कोणतेंही एक पारडें किंचित् जड झालें कीं तें तितकें खालीं बसतें व दुसरें वर राहतें. लोकहित व राजहित यांचा विरोध असाच दुस्तर आहे. म्हणूनच 'नृपतिजनपदानां दुर्लभः कार्यकर्ता' ही म्हण किंवा हें नीतिवचन बनलें. सरकार हें रयतेकरितां असावें खरें पण हटकून असतेंच असें नाहीं, त्याला काय करणार ! निदान इतकें तरी खास म्हणतां येईल कीं लोकहित साधण्याची सरकारची जी दृष्टि तीच लोकांची असत नाहीं. सुराज्य हें स्वराज्य नव्हे. तर स्वराज्य म्हणून कांहीं वेगळें असतें. स्वराज्य तेंच कीं, प्रजेची कोणत्याहि विषयांत जी खरी इच्छा तीच प्रभावी झाली पाहिजे. मग ती वेळीं चुकीची किंवा अहिताचीहि असो. इंग्लंडसारख्या देशांत म्हणजे लोकच जेथें अंतिम सत्ता हातीं ठेवतात तेथील प्रधानमंडळाला जर ही गोष्ट लागूं आहे तर हिंदुस्थानांत म्हणजे जेथें बोलून चालून परके लोक आपल्या व आपल्या देशाच्या लोकांकरितां राज्य करतात तेथें राजहित व प्रजाहित यांचा विरोध विशेषच दुस्तर झाला तर त्यांत काय आश्चर्य ! असो. अशा या विरोधाच्या स्थितींत कायदेकौन्सिलांत सरकारनें लोकप्रतिनिधींना बहुमत दिलें असतांहि तें बहुमत लोकांच्या पदरांत पडत नाहीं. यावरून अद्यापि हिंदी जनतेला आपलें खरें हित कळत नाहीं असें म्हटलें तर काय वावगें ?

निदान त्यांतल्या त्यांत इतकें तरी निर्विवाद आहे कीं, लोकनियुक्त प्रतिनिधींचें बहुमत बहाल केलेल्या कायदेकौन्सिलांत अद्यापि मतें मोजतांना सिद्ध होणारें बहुमत जर पुष्कळ वेळां सरकारच्या बाजूलाच पडतें, तर आपलें हित प्रजेला कळत असूनहि तें हित कायदेकौन्सिलांत साधून देतील असे प्रतिनिधी निवडून देण्याचें ज्ञान मतदारांना नाहीं. याचें कारण राजकीय स्वार्थापेक्षां वैयक्तिक स्वार्थ हाच उमेदवार व प्रतिनिधि काय किंवा मतदार काय यांच्या मनांत अद्यापि प्रभावी होऊं शकतो. येथें स्वार्थ हा शब्द आम्ही जरासा विस्तृत अर्थानें वापरलेला आहे. कारण उमेदवार लोक द्रव्यलोभाच्याच आशेनें कौन्सिलांत शिरतात असें नाहीं तर पुष्कळसे बहुमानाच्या व बडेजावीच्या इच्छेनें. आणि

बहुमान किंवा बडेजावी यांचा समावेश स्वार्थांतच होतो. दुसरे पक्षीं कांहीं थोडे मतदार प्रत्यक्ष द्रव्य घेऊन मतें देत असले तरी इतर अनेक मतदार केवळ जातीच्या अभिमानाला, किंवा भीतीला, किंवा भिडेला, किंवा खासगी ऋणानुबंधाला बळी पडून असा उमेदवार निवडून देतात कीं, तो पुढें कौन्सिलांत गेल्यावर लोकहिताच्या बाजूचें मत न देतां सरकारच्या बाजूला मत देतो. तथापि इतर कांहीं मतदार असे असतात कीं, ते वरील सर्व गोष्टी बाजूला ठेवून केवळ लोकांच्या बाजूनेंच कौन्सिलांत कोण लढेल व कोण लढणार नाहीं या विवेकबुद्धीनेंच मत देतात. मतदारपद्धति व प्रातिनिधिक संस्था यांचें जें समर्थन केव्हांहि करतां येतें तें अशाच सुज्ञ मतदारांच्या बळावर.

कायदे कौन्सिलांची आजची रचना पाहिली तर सोज्वळ दिसते. कारण सरकारास असा बहाणा करण्यास सांपडतो कीं, " आम्हीं तुम्हांला लोकनियुक्त प्रतिनिधींचें बहुमत दिलें आहे. तें तुम्हीं वाटेल तसें पदरांत पाडून घ्यावें. आम्हीं त्याला ना म्हणत नाहीं. तें तुमच्या पदरांत न पडलें तर त्याकरितां तुम्हीं स्वतःलाच नांवें ठेवावीं व दोष द्यावा किंवा जें आज होत आहे तेंच खरें लोकहिताचें काम आहे अशी कबुली द्यावी." 'बाप दाखीव नाहीं तर श्राद्ध कर' या म्हणीचेंच वरील शब्द भाषांतर होत! आणि लोकांच्या तर्फेच्या बहुमताचा बाप जोंपर्यंत जीवंत उभा करून दाखवितां येत नाहीं तोंपर्यंत वरील प्रकारच्या कबुलीचें श्राद्ध लोकांना करावेंच लागणार! मतदारांच्या लक्षांत पुढें केव्हांही ही गोष्ट येत नसेल असें नाहीं. पण बैल गेल्यावर झोपा करून काय उपयोग? किंवा चोरी होऊन गेल्यावर जाग येऊन काय उपयोग? इंग्रजींत एक म्हण आहे कीं, 'उतावळीचें लग्न आणि जन्मभर पश्चात्ताप' तीच येथेंहि लागू पडते. निवडणुकींत मतें देतांना अविश्वासू किंवा बेइमानी प्रतिनिधि निवडून दिला आणि मग पुढें तीन वर्षें त्याच्या नांवानें ओरड केली तर त्याचा काय उपयोग? तीन वर्षेंपर्यंत पदर पसरून अशा प्रतिनिधीच्या बेइमानीचें किंवा स्वार्थबुद्धीचें फळ पदरांत मोजून घ्यावेंच लागतें. तें टळत नाहीं. ज्यांत काडी मोडून देण्याचा अधिकार नाहीं असल्या विवाहाच्या बंधनासारखें निवडणुकीचें हें त्रैवार्षिक बंधन आहे!

निवडून दिलेला उमेदवार वाईट किंवा बेइमानी ठरल्यावर त्याच्या नांवानें कितीहि बोटें मोडलीं, किंवा त्याला शिव्याशाप वाहिले, किंवा त्याचा जाहीर

निषेध केला तरी तो फुकटच. त्यामुळें प्रतिनिधी स्थानभ्रष्ट होऊं शकत नाहीं. बेइमानी लक्षांत येतांच वकिलाचें वकीलपत्र रद्द करतां येतें, मुखत्याराचें मुखत्यार पत्र काढून घेतां येतें, आणि मुनिमाला बडतर्फ करतां येतें; पण लोकनियुक्त प्रतिनिधी बेइमानी ठरला तरी त्याला कौन्सिलांत आपल्या मतदारांच्या नांवानें गोंधळ घालतां येतो. कोणत्याहि रीतीनें त्याला प्रतिबंध होऊं शकत नाहीं. तो फिरून निवडणुकीला उभा राहिला तर तेव्हां त्याची बेइमानी लक्षांत घेऊन मतदार त्याला घराबाहेर घालवून बेइमानीचें प्रायश्चित्त देऊं शकतील. पण तीन वर्षांच्या कालावधींत त्यांना आपल्या नांवावर विकणाऱ्या व मिरवणाऱ्या प्रतिनिधींचें कांहीं एक वांकडें करतां येत नाहीं. म्हणून 'वेळींच घातलेला एक टाका पुढचे नऊ टाके वांचवितो ' या म्हणीप्रमाणें मतदारांनीं जी काय सावधगिरी ठेवावयाची ती निवडणुकीच्या वेळींच ठेवणें अवश्य असतें. आपल्या हातचा बाण एकदां गेला कीं तो परत येत नाहीं. याकरितां आपलें हित कशांत आहे, व तें साधण्याची खरी पात्रता कोणत्या उमेद्वारांत अधिक आहे, हें मतदारांनीं निवडणुकीच्या वेळींच मनाशीं ठरविलें पाहिजे.

हें ठरविणें अनेक कारणांनीं जड जातें. पण आजहि सामान्य मतदाराला या निर्णयास लागणारी शुद्ध उपजत बुद्धि असते असें आम्हांस वाटतें. ती बुद्धि फलद्रूप होण्याला विघातक कारणें अनेक उपस्थित होतात व तीं त्याला आवरत नाहींत इतकेंच काय तें. म्हणूनच आज कागदोपत्रीं लोकप्रतिनिधींचें बहुमत आम्हांला असतां तें प्रत्यक्ष पदरांत पडत नाहीं. आपल्या बाजूस अल्पमत ठेवून सरकारनें जरी दुबळेपणा पदरीं घेण्याचा बाहाणा कागदोपत्रीं केला तरी त्यांना मनांतून हा विश्वास असतो कीं, लोकनियुक्त प्रतिनिधींची जुडी मुळांत एकजीव नाहीं किंवा शिस्तीच्या दोरांनींहि ती घट्ट जखडून बांधलेली नाहीं, ती विस्कळीत आहे. या जुडींतील एखादा मनुष्य फाजिल जात्यभिमानानें राष्ट्राभिमान विसरूं शकतो. एखादा पदवीला हपापलेला असतो. एकाद्यास अर्धपगारी सरकारी वकिली दिली तरी पुरते. एखादा आपल्याला मुलासाठीं मुलकी किंवा लष्करी खात्यांतील नोकरी मिळविण्याच्या खटपटींत असतो. एकाद्याच्या तोंडांत फायदेशीर कंत्राटाचा गोळा कोंबला असतां त्याचें तोंड बंद होऊं शकतें. एकाद्याला एखाद्या कमिटीवर किंवा कमिशनवर नेमणूक झाल्यानें मिळणाऱ्या बहुमानाची किंवा भत्त्याची लांच पुरी होते. एखादा सर-

कारी अधिकाऱ्यांच्या दृष्टीला दृष्टि भिडविण्यासच भितो. एकादा त्यांच्या पुढून लोकपक्षाच्या लॉबींत जाण्यास कचरतो. एकादा सरकारतर्फेच्या पांडित्याला व माहितीनें भरलेल्या वक्तृत्वाला बुजून जातो. एकाद्याला लोकपक्षाच्या बाजूपेक्षां सरकारची बाजूच अधिक डोळ्यांत भरते. एकाद्याची पक्षपाती दयाबुद्धि लोकांच्या अडचणीपेक्षां सरकारच्या अडचणीचीच अधिक कींव करते. एकाद्याला लोकपक्षाचें समर्थन करणें हा नैतिक दुबळेपणा व सरकारच्या बाजूचें समर्थन करणें हेंच नैतिक धैर्यसें वाटतें. एकादा स्वतःच्या सद्सद्विवेक बुद्धीचें फाजील स्तोम माजविणाराच असतो. एकादा आळशी असतो व वेळेवर हजर राहात नाहीं. आणि एकदा हजर राहिला तरी संशयात्मा असल्यामुळें कोणाच्या बाजूस मत द्यावें याचा निर्णय करण्यास असमर्थ होऊन कोणीकडेच मत न देतां गप्प बसतो! तात्पर्य, लोकपक्षाचें बहुमत प्रत्यक्ष पदरांत न पडण्यास अशीं हीं विविध कारणें असतात; व जोंपर्यंत कौन्सिलांतून व अर्थात् कौन्सिलाबाहेरहि लोकपक्षाची संघटना होत नाहीं तोंपर्यंत हें असेंच चालावयाचें.

आतां कायदेकौन्सिलांत असेहि प्रश्न केव्हां केव्हां उपस्थित होऊं शकतात कीं तेव्हां असल्या प्रकारचें मतवैचित्र्य हें सद्सद्विवेकबुद्धीला भूषण ठरतें. पण तें केव्हां? तर अशा विषयांत लोकपक्ष व सरकारपक्ष यांच्या हिताचा विरोध नसेल तेव्हां. अशा वेळीं सरकार केव्हां तटस्थ राहतें तर केव्हां आपल्या ताब्यांतील सभासदांनाहि आपापल्या इच्छेप्रमाणें मतें देण्यास मोकळीक ठेवतें. तसेंच खासगी स्वरूपाचीं बिलें वा ठराव हे केव्हां केव्हां अशा अशा विषयाच्या स्वरूपाचे असतात कीं त्यांत व्यक्तिशः सभासदांची हौस, बुद्धिमत्ता, उद्योगप्रियता किंवा लहरी स्वभाव किंवा एकांडे शिलेदारी, किंवा निवळ कांहीं तरी करावें म्हणून कांहीं तरी करण्याची बुद्धि असते. अशा वेळीं मतवैचित्र्यानें खेळकर बुद्धीस मौजच वाटते. कित्येक वेळां विशिष्ट धर्म, जाति, वर्ग यांच्यासंबंधीं प्रश्न उपस्थित होतात व तेव्हांहि मतवैचित्र्य हें क्षम्य ठरतें व पक्षाची शिस्त हा जुलूम वाटतो. परंतु कायदेकौन्सिलांत आधीं सरकारी कामच शें. ८० इतकें असतें व त्यांत लोकहित व सरकारहित यांच्या विरोधाच्या बाबीच अनेक येतात. अशा वेळीं मात्र मतवैचित्र्य हें आत्मघातकी म्हणून दुःसह वाटतें. अशाच वेळीं कौन्सिलांत

लोकपक्षाच्या शिस्तीची गरज भासते. व अशा शिस्तीचा फायदा मिळावा म्हणूनच पक्षसंघटनेची अवश्यकता असते.

कारण, सरकारपक्ष जरी अल्पसंख्याक दिसला तरी त्याची संघटना कायमचीच झालेली असते. त्या पक्षाची जुडी एक जीव किंवा निदान दोरीनें घट्ट जखडलेली सिद्ध असते. फाजील शिस्तीचें बंधन, प्रामाणिक मतें मनांतल्यामनांत दडपून टाकण्याचें धैर्य, आणि सदसद्विवेकबुद्धीच्या खुनाची माफी, या सर्व गोष्टींचें लोकपक्षाला पाप ठरलें तर सरकारपक्षाला पुण्य ठरतें! असल्या सुसंघटित पक्षावर विजय मिळवावयाचा तर तो संघटना करूनच मिळेल. एरवीं मिळणार नाहीं. याकरितां कोणत्याहि पक्षाला बांधून न घेणारे स्वतंत्र उमेदवार हे जरी स्वतः सुखी व मतस्वातंत्र्याचे पुतळे म्हणून शोभिवंतसे दिसले, तरी कौन्सिलांतील वाद जिंकण्याला ते फारसे उपयोगी पडत नाहींत. ही वैयक्तिक स्वार्थाची व सुखाची दृष्टि जाऊन तिच्या जागीं शिस्तीची, निष्ठेची व संघटनेची दृष्टि येण्याला अद्यापि कांहीं काळ जावा लागणार असें दुर्दैवानें म्हणावें लागतें. पण राजकीय पक्षसंघटनेचें हें कार्य घडून येईपर्यंत मतदारांनीं मनावर घेतलें तर त्यांना पक्षाचें बंधन नसणाऱ्याहि अनेक उमेदवारांतून लोकहिताला प्रायः जागृत राहील असा प्रतिनिधी देतां येईल व तें करण्यास तरी त्यांनीं झटलें पाहिजे. अशा प्रसंगीं उमेदवारांच्या नुसत्या उद्देशपत्रिका शब्दशः खऱ्या मानून चालत नसतें. कारण उद्देशपत्रिका कितीहि सोज्वळ असली तरी पुढें बेइमान ठरणाऱ्या उमेद्वाराचें पारिपत्य मतदारांना कां व कसें करितां येत नाहीं याचें दिग्दर्शन आम्हीं पूर्वीं केलेंच आहे. अर्थात् उमेदवारांच्या जाहीरनाम्यापेक्षां त्यांचें एकंदर पूर्वचरित्रच मतदारांना खरें मार्गदर्शक होऊं शकतें. याकरितां मतदारांना आमची अशी विनंति आहे कीं, त्यांनीं सरकारचें अनुकरण करून पक्षबंधन व शिस्त यांनाच मुख्य महत्त्व द्यावें, आणि स्वतंत्र म्हणून उभे राहणाऱ्या उमेदवारांच्या पूर्वचरित्रावर दृष्टि द्यावी. निदान त्यांच्या पुढील वर्तनाबद्दल तरी हडसून खडसून स्पष्ट करार, कबुल्या किंवा शपथ प्रमाण करून घ्यावें. सरकारचें अनुकरण करण्यासारखी दुसरीहि एक गोष्ट मतदारांना सुचविण्यासारखी आहे. ती ही कीं मतदारींत किंवा उमेदवारांच्या लायकींत ज्याप्रमाणें सरकारनें धर्म, जात, विद्या, श्रीमंती वगैरे गोष्टी ओळखल्या नाहींत व सरकार देणें कोण किती देतो येवढ्यावरच दृष्टि ठेवली, त्याप्रमाणें मतदारां-

नींहि उमेदवार निवडतांना जात, गोत, कुल, धर्म, श्रीमंती फार काय पण वेळीं विद्वत्ताहि जमेस न धरितां लोकपक्षाचें समर्थन करण्याच्या बाबतींत कोणाचा विश्वास धरावा कोणाचा धरूं नये इतकेंच पाहून उमेदवार निवडावा.

निवडणुकीच्या तत्त्वाचें हें सामान्य विवरण केल्यानंतर मतदारांना शेवटीं एक मुख्य गोष्ट सांगावयाची ती ही कीं, मतदान ही तीन वर्षांनीं एकदां येणारी पर्वणी आहे. ती कोणाहि मतदारानें गमावूं नये. मतदारी हा जर एक प्रकारचा अधिकार आहे तर तो गाजविण्याची आस्था हाच मतदाराचा पुरुषार्थ, पोलिंग स्टेशनवर जाऊन मत देणें याला जितके श्रम पडतात व खर्च येतो त्यापेक्षां किती तरी अधिक श्रमाचीं आणि निष्कारण व निष्फळ कामें आपण इतर नित्यनैमित्तिक लौकिक व्यवहारांत करीत असतों. म्हणून मतदारीचा उपयोग न करणें हें राजकारणी बुद्धि किंवा राष्ट्रीयत्वाची भावना नसल्याचें लक्षण सहजच मानलें जाईल; व हें लक्षण कोणाहि जाणत्या मनुष्यास भूषणास्पद नाहीं. ज्या इंद्रियांत अगदींच चलनवलन नाहीं तीं इंद्रियें कालांतरानें नष्ट होतात असा प्राणिशास्त्राचा एक सिद्धान्त आहे. मतदानाचेंहि तसेंच समजावयाचें. मतदानाच्या हक्काचा उपयोगच न करण्यानें तो हक्क कालान्तरानें नष्ट होईल. याकरितां मतदारांनीं तो हक्क बजावलाच पाहिजे. पण तो बजावतांना त्याचा दुरुपयोग न होईल अशी दक्षता ठेवणें अधिक महत्त्वाचें आहे. यास्तव भलत्याच उमेदवाराला मत देऊन भस्मासुर निर्माण करूं नयेत आणि मूठभर ज्ञातीच्या हितासाठीं राष्ट्र-हिताला तिलांजलि देणाऱ्याला मतदारांनीं निवडून देऊं नये. त्याचप्रमाणें मतांच्या जोरावर निवडून आल्यावर मतदारांना धाब्यावर बसवून बिनमत-दारांच्या आज्ञेनें भलत्याच वेळीं उठून येणाऱ्या अवसानघातकी उमेदवारांना मत देण्यांतहि आत्मघातच आहे; म्हणून असल्या चुका मतदारांनीं करूं नयेत. आधुनिक पद्धतीच्या लोकशाहीचा मतदारी हाच पाया आहे. तो पायाच कच्चा भरला गेल्यास स्वराज्याची इमारत उभारली जाण्याची आशाच नाहीं. यास्तव हा पाया जितका खंबीर, जनहितदक्ष आणि विश्वासूक उमेदवारांनीं भरला जाईल तितकें स्वराज्य समीप येईल.

---

# ७३ रिझर्व्ह बँक बिलाचें भांडण

( ता.९ ऑगस्ट १९२७ )

मुंबई व कलकत्ता येथें दोन आठवडे काम चालून, रिझर्व्ह बँक बिलाच्या सिलेक्ट कमिटीनें आपला रिपोर्ट तारीख २५ रोजीं तयार केला. त्यासह हें बिल सिमला येथील असेंब्लीच्या बैठकींत पुढील चर्चेकरितां निघणार आहे. रिपोर्टांत सर्वमान्य अशाच गोष्टी संख्येनें पुष्कळ आहेत. आणि हातांत बिलाचा जुना व नवा मसुदा घेऊन तुलना करून कोणी पाहील तर त्याला वाटेल कीं, कमिटींत मतभेद असा प्रायः झाला नसावा ! परंतु ज्या कलमांत मतभेद झाला तीं थोडींच असलीं तरी विशेष महत्त्वाचीं आहेत. सुदैवानें लोकपक्षाचें बहुमत झाल्यानें आतां रिपोर्ट झाला आहे तो लोकपक्षाचा व भिन्नमतपत्रिका सरकारी सभासदांची असें स्वरूप येणार आहे. तथापि इतरहि कांहीं थोड्या वादस्थळांत लोकपक्षाच्या मताप्रमाणें निकाल न होतां सरकारपक्षाचें म्हणणें बहुमतानें मंजूर झालें आहे. याकरितां लोकपक्षाचे कांहीं सभासदहि आपल्या भिन्नमतपत्रिका जोडणार आहेत. रिपोर्टांवर औपचारिकरीत्या सर्व सभासदांच्या सह्या असल्या तरी, ह्या परस्परविरोधी भिन्न पत्रिकांमुळें बिलांतील खऱ्या महत्त्वाचीं कलमें अशीं जागेवर फारच थोडीं अबाधित राहिलीं आहेत. इसापनीतींतील दोन बायकांच्या दादल्याची गोष्ट आपण वाचतों. एकीनें त्याच्या डोक्यावरील काळे केंस आवडत नाहींत म्हणून ते काढले व दुसरीनें पांढरे आवडत नाहींत, म्हणून ते काढले; आणि शेवटीं टक्कल जागेवर राहिलें ! अशीच स्थिति ह्या बिलाची झाली आहे. मुंबईपासून सर बेसिल ब्लॅकेट यांनीं जो धाक दाखविण्याला सुरुवात केली त्यावरून पाहतां, सिमला येथें सरकारनें सर्व बिलच्या बिलच मार्गें घेतलें पाहिजे. पण प्रायः सरकारचाच हात केव्हांहि अखेरीस अधिक नाधतो, म्हणून सर बेसिल यांना याहि बिलांत आपणास अखेर यश मिळेल अशी सकारण आशा वाटत असल्यामुळें बिल परत घेण्याची भाषा त्यांच्या तोंडांतून रिपोर्टानंतर निघालेली नाहीं हें लक्षांत ठेवलें पाहिजे. लोकपक्षाचें बहुमत झालें तें अगदीं कांठावर झालें आहे. म्हणजे लोकपक्षाला १३ व सरकार पक्षाला १२ अशीं मतें पडून बहुमत झालें आहे. अर्थात् अगदीं कांठावर उभें राहिलेलें हें बहुमत ढांसळून पाडण्याला सरकारला फारसे परिश्रम पडणार नाहींत.

किंबहुना शनिवार ता. २३ रोजीं कलकत्त्यास रिझर्व्ह बँक बिल आणि इंपीरियल बँक बिल यांची चर्चा संपली त्याच वेळीं फिरून सर्वांच्या संमतीनें एक-दोन म्हणजे मुख्यच वादस्थळें, पुनः चर्चेला पुढें काढावीं अशा कानगोष्टी हळूहळू सुरू झाल्या होत्या. आणि शनिवारीं हजर असलेली सर्व मंडळी सोमवार ता. २५ रोजीं हजर असती तर कदाचित् तो प्रसंग भिडेभाडीनें येताहि. पण त्या दिवशीं केळकर, जम्नादास मेथा व शेठ गोविंददास हे तिघे सभासद आपापल्या गांवीं निघून गेल्यानें त्यांच्या पश्चात् ही उलथापालथ करणें अशक्य झालें म्हणूनच ही गोष्ट घडली नाहीं. पण तेव्हांपासून सिमल्याच्या बैठकींपर्यंत तीन आठवड्यांची संधि मिळणार असल्यामुळें सर बेसिल ब्लॅकेट यांचा आशातंतु नुसता जीव धरून राहिला नसेल तर खासगी कारवाईनें अधिक बळकट झाला असेल असा अंदाज आहे. सिलेक्ट कमिटींत मुसलमान सभासद नाराज झाल्यामुळें त्यांचें सगळें टोळकेंच्या टोळकें सरकारास जाऊन मिळणार हें निश्चित आहे. शिवाय सिलेक्ट कमिटींतील एकदोन लोकांचीं मनें बोटचेपीं असल्याचें तेथेंच आढळून आलें होतें. आणि तीं वळविण्याचा प्रयत्न अखेरच्या क्षणापर्यंत होईलहि. तात्पर्य सर बेसिल ब्लॅकेट हे आपलें बिल परत घेणार नाहींत. दोन तीन वादग्रस्त मुद्द्यांपैकीं ते एखादा सोडून देतील व इतर जिंकून घेतील व अशा रीतीनें बिल असेंब्लींत पास होईल असा आजचा अजमास आहे.

मतभेदासंबंधानें इतका तपशील सांगितल्यावर वादस्थळें तरी अशीं कोणतीं असा प्रश्न सहजच सुचतो. त्याचें उत्तर खालीलप्रमाणें आहे. ( १ ) रिझर्व्ह बँकेनें सोन्याचें नाणें चालू करावें कीं नाहीं ? ( २ ) रिझर्व्ह बँकेचें भांडवल सरकारी पैशानें उभारावें कीं शेअर काढून उभारावें ? ( ३ ) रिझर्व्ह बँकेच्या डायरेक्टरबोर्डांत कायदेमंडळानें निवडलेले असे चार दोन किंवा एकदोन तरी प्रतिनिधी असावेत कीं नाहीं ? पैकीं बँकेनें सुवर्णचलन कांहीं मर्यादित का होईना पण सुरू करावें अशी सूचना केळकर यांनीं सिलेक्ट कमिटींत मांडली. तिला तेथेंहि नऊच मतें पडल्यानें ती असेंब्लींत मंजूर होण्याची फारशी आशा नाहीं. त्यामुळें हा तडजोडीचा प्रश्नच ठरत नाहीं. तथापि केळकर, जम्नादास मेथा वगैरे मंडळी हा प्रश्न पुनः असेंब्लींत काढणार आहेत.

जो कोणी मनुष्य ठराविक दरानें सरकारला शुद्ध सोनें नेऊन देईल त्याला तितक्या किंमतीच्या मोहरा पाडून द्याव्या ही केळकरांची सूचना होती व

सिलेक्ट कमिटींत ती नामंजूर झाली. ज्याअर्थी चांदीच्या रुपयांची किंमत करन्सी बिलानें सोन्यांत ठरविली आहे त्याअर्थी वीस रुपयांची एक मोहोर हें हिंदुस्थानांतील सोन्याचें नाणें म्हणून ठरवावें, आणि गव्हर्नरजनरल यांना योग्य वाटतील तितक्या मोहरा त्यांनीं टांकसाळींत पाडून त्या रिझर्व्ह बँकेचे स्वाधीन कराव्या. आणि यापुढें निघणाऱ्या करन्सी व बँक नोटा यांच्यावर २० रुपयांबरोबर एक मोहोर व १० रुपयांबरोबर ½ मोहोर असें प्रमाण अक्षरांनीं उमटवावें. हें खुद्द सरकारनेंहि मान्य करून तशा अर्थाचें कलम सर्वानुमतें दुरुस्त बिलांत घालण्यांत आलेलें आहे. अर्थात् चांदीचा रुपया आणि सोनें यांचा नित्य संबंध जोडल्याचें अशा रीतीनें जगजाहिर होणार. आणि यासंबंधाचें दृश्य फल म्हणून सोन्याची मोहोर टांकसाळींतून मूर्त स्वरूपांत बाहेर येणार ही गोष्ट तर पदरांत पडलीच. पण याच्याहिपुढें थोडेंसें जाऊन, केळकर यांनीं अशी सूचना मांडली होती कीं, जो कोणी प्रत्यक्ष सोनें देईल त्याला त्याच्या किंमतीइतक्या मोहरा वाटेल तर त्याच्याच खर्चानें सरकारनें पाडून द्याव्या. यांत सरकारला तोशीस अशी कांहींच नाहीं आणि आपल्या गंगाजळींतील सोन्याचा ऐवज कमी होण्याची भीतिहि सरकारला उरत नव्हती. ही सूचना मान्य न झाल्याचें वर दर्शविलेंच आहे. तथापि कोणतीहि प्रगतिपर कल्पना लोकांच्या डोळ्यापुढें सतत जागृत ठेवल्यानें ती पुढें केव्हां तरी सफल होण्याची आशा असते या हेतूनें केळकर व जम्नादास मेथा यांनीं असेंब्लीपुढें हें बिल येईल तेव्हां वरील आशयाची उपसूचना पुनः मांडण्याचें ठरविलें आहे. आणि ती नामंजूर झाली तरी वर सांगितल्या दिशेनें तितका फायदाच होईल.

दुसरें वादस्थळ बँकेच्या भांडवलासंबंधाचें. या मुद्द्यावर मुंबईस सरकार पक्षाचा पराभव होऊन, बँकेचें भांडवल सरकारनें भरावें, म्हणजे तें खासगी भागीदारीनें उभारूं नये असें ठरलें. तेव्हां पुढ डायरेक्टरबोर्ड नेमण्याच्या बाबतींत तरी आमच्या मनासारखें घडून आलें तर, हा झालेला निकाल कदाचित् आम्ही मान्य करूं असें सर बेसिल ब्लॅकेट यांनीं कळविलें होतें. परंतु कलकत्ता येथें ह्या दुसऱ्या बाबतींतहि त्यांच्या मनासारखें घडून आलें नाहीं. तेव्हां पहिल्या मुद्द्यावर झालेला कमिटीचा निर्णय मान्य करण्याला आपण बांधले गेलेलों नाहीं, असा बहाणा त्यांनीं केला. आणि असेंब्लीमध्यें बिल येईल तेव्हां बँकेचें भांडवल भागीदारीनें जमवावें, सरकारन तें घालूं नये, अशा

अर्थाची उपसूचना ते पुढें आणिल्याशिवाय राहणार नाहींत. पण पूर्वी दर्शविल्याप्रमाणें बोटचेपे मताचीं कांहीं माणसें त्यांना मिळालीं तर, डायरेक्टर बोर्डाचा प्रश्न त्यांच्या मनाप्रमाणें सुटण्याची खात्री त्यांना वाटूं लागेल. आणि यामुळें मोबदल्यादाखल भांडवलासंबंधाचा आपला मुद्दा ते सोडून देतील असा संभव दिसतो. मात्र याहि मुद्यावर त्यांचें साधलें नाहीं तर तें सगळेंच्या सगळें बिलच परत घेतील म्हणजे मग बँकच मुळीं होणार नाहीं, आणि त्याबरोबर भांडवल कसें उभारावें हा प्रश्नहि आपोआपच जिरून जाईल.

तिसरें वादस्थळ डायरेक्टरबोर्डाच्या रचनेविषयीं. यांत लोकपक्षाच्या बहुमतानें बोर्डावरील कांहीं जागा मध्यवर्ति व प्रांतिक कायदेकौन्सिलांनीं भराव्यात असें ठरविलें आहे. पण भागीदारांच्या भांडवलानें बँक सुरू करूं नये, याविषयीं लोकपक्षाचें मत जितकें ठाम आहे तितकेंच कायदेकौन्सिलांनीं डायरेक्टर नेमून देऊं नयेत अशाविषयीं सरकारचेंहि मत ठाम आहे. आणि यावर कोणत्याहि प्रकारची तडजोड करण्याला हें तयार नाहीं. सरकारचें म्हणणें असें कीं, बँकेसारख्या संस्थेच्या कामांत राजकारणाच्या दृष्टीनें ढवळाढवळ होतां कामा नये. पण ह्या म्हणण्यांत कांहीं विशेष अर्थ नाहीं. कारण इतर डायरेक्टर नेमून देण्याचा अधिकार गव्हर्नर-जनरल व व्यापारी मंडळें यांना दिला आहे, तसाच तो कायदेमंडळांनाहि असावा यांत वावगें तें काय ? कायदे—मंडळांनीं डायरेक्टर निवडून देणें याचा अर्थ, कायदे—मंडळें हीं एक मतदारसंघ मानला जावा इतकाच आहे. गव्हर्नर—जनरलनें बँकेचे कांहीं डायरेक्टर नेमले म्हणून त्यामुळें तो जसा बँकेच्या कारभारांत हात घालतो असें समजण्यांत येत नाहीं; किंवा हिंदी, युरोपियन व्यापारी मंडळांनीं कांहीं डायरेक्टर निवडून दिले म्हणून त्यांचा हात बँकेच्या कारभारांत शिरला असें कोणी म्हणत नाहीं; त्याचप्रमाणें कायदेमंडळांनीं डायरेक्टर निवडून दिले म्हणून कांहीं त्यांचा हात बँकेच्या कामांत शिरला असें मानण्याचें कारण नाहीं. कायदेमंडळाला राजकीय स्वरूप एका अर्थानें आहे हें खरें. परंतु त्या राजकीय स्वरूपाचा उपसर्ग बँकेला कसा लागणार ? कायदेमंडळांनीं आपले प्रतिनिधी डायरेक्टर तीन वर्षांतून एकदां निवडून दिले म्हणजे त्यांचें काम संपलें. त्या प्रतिनिधींचा आणि कायदेमंडळाचा पुढें प्रत्यक्ष काय संबंध येणार ? कायदेमंडळाला विचारून हे डायरेक्टर कोणतेंहि काम करणार नाहींत. बँकेचे ताळेबंद मागवून घेऊन तें कायदेमंडळ पास

करणार असेंहि नाहीं. येऊनजाऊन या डायरेक्टरांना राजकारणाचा वास असला तर इतकाच कीं, ते कायदेमंडळानें नेमून दिलेले आहेत. कायदेमंडळानें निवडून द्यावयाचे म्हणून ते कायदेमंडळाचे सभासद असलेच पाहिजेत असेंहि कलमांत घातलेलें नाहीं, पण कायदेमंडळाच्या द्वारें आलेला राजकारणाचा हा सूक्ष्म वास सरकारच्या नाकाला जर खपत नाहीं तर खुद्द गव्हर्नर–जनरल किंवा हिंदी, युरोपियन व्यापारी मंडळें यांच्या द्वारें राजकारणाचा वास मुळींच येत नाहीं असें होतें काय ? आणि आला तर तो मात्र सरकारला कसा खपतो ? गव्हर्नर–जनरल म्हटला म्हणजे तो तर अंतर्बाह्य मूर्तिमंत राजकारणाचा पुतळाच होय. राजकारणाची ती एक सहस्रपुटी मात्रा होय. त्याच्या अंतःकरणाच्या प्रत्येक खणांत राजकारण इतकें खचून भरलेलें असतें कीं राजकारणाच्या विचाराशिवाय तो विचारच करीत नाहीं आणि राजकारणाच्या भाषेशिवाय तो भाषाच बोलत नाहीं आणि त्याबरोबर त्याचे हातीं सत्ताहि अमर्यादित व अबाधित राहते. अशा एका अधिकारी व्यक्तीनें, बँकेचे गव्हर्नर व इतर चार दोन डायरेक्टर नेमले तर त्यामुळें मात्र बँकेचा कारभार बिघडत नाहीं ! राजकारणापासून तो अलिप्त राहूं शकतो. आणि प्रांतिक कायदे-कौन्सिलांचे शेंकडो सभासद व वरिष्ठ कायदेमंडळाचे शेंकडो सभासद इतक्यांच्यामध्यें निवडणुकीची सत्ता वांटून गेली असतां, म्हणजे अमुकच प्रकारचा मनुष्य निवडून येईल अशी केव्हांहि खात्री नसतां अशांनीं निवडलेल्या प्रतिनिधींचें राजकारण बँकेच्या कारभाराला भोंवेल असें म्हणावयाचें म्हणजे हा नुसता वितंडवाद होय.

लोकपक्षाच्या दृष्टीनें पाहूं गेल्यास कायदेमंडळाविषयीं सरकार पक्षाच्या मनांत जो नेहमीं एक प्रकारचा अनादर वाटत असतो तो मात्र ह्या वितंडवादानें, सर बेसिल ब्लॅकेट हे व्यक्त करीत आहेत हें उघड होय. राजकारण म्हटलें तर सर्वस्पर्शी आहे. प्रस्तुतच्या स्थितींत कोणताहि काळा मनुष्य काय, गोरा मनुष्य काय, त्याच्या जाणत्या मनाला तें इतकें चिकटून बसलेलें असतें कीं, त्यापासून तें सोडवतांच येत नाहीं, किंवा मनुष्याच्या अंगाचा रंग हा जसा अंगापासून कोणाला सोडवतां येणार नाहीं, किंवा खरडून काढतां येणार नाहीं, त्याप्रमाणेंच राजकारण व मन यांची गोष्ट आहे. पण इतर एखाद्या कामावर मनुष्य नेमावयाचा असतां त्याच्या अंगाचा रंग पाहून जसा

कोणी तो नेमीत नाहीं, त्याचप्रमाणें कोणाचें राजकारण काय याचाहि विचार डायरेक्टराच्या जागीं त्याची निवडणूक होतांना कोणी करीत नाहीं. याचें कारणच असें आहे कीं, कोणाचीं कांहीं विशिष्ट राजकीय मतें असलीं तरी, ज्या कामाच्या व्यवहारांत प्रत्यक्ष राजकारण नाहीं त्या कामांत तो आपलें राजकारण घुसडीत नाहीं व घुसडूं नये हें त्याला समजतें. कोणाहि सर्वमान्य समंजस मनुष्याविषयीं हें खचित मानतां येईल. तात्त्विक दृष्ट्या कोणत्याहि सार्वजनिक कार्याला राजकारणाचें एक अंग अंतिम स्वरूपांत असतें असें कदाचित् प्रतिपादितांहि येईल. पण ह्या कार्याचें विधान काय आहे यावरच त्यांत राजकारण घुसडलें जावें कीं नाहीं हें अवलंबून असतें. आणि त्याप्रमाणें त्या कार्यांत पडलेला मनुष्य वागतहि असतो. निराळ्या भूमिकेवर बसलें असतां निराळ्या पद्धतीनें काम करणें ही गोष्ट मनुष्याला शक्य असते, एवढेंच नव्हे तर सामान्य समंजस मनुष्य ती करूनहि दाखवितो. राजकारणांत पडलेला चळवळ्या मनुष्य घेतला तरी तो ज्यूरीवर नेमला असतां न्यायदानच करील. व्यापारी सभेंत बसला असतां ऐननफातोटाच अधिक पाहील. एखाद्या कलामंडळावर नेमला असतां सरसनिरस अशीच निवड करील, किंवा धर्ममंडळांत बसला असतां धार्मिक कोणतें, अधार्मिक कोणतें याचाच तो निर्णय देईल. स्थलपरत्वें यथान्याय किंवा यथानियम किंवा धर्म्य वर्तणूक करणें यावरच मनुष्याची अब्रू अवलंबून असते व तिच्यासाठीं तो जपत असतो. सांगण्याचें तात्पर्य इतकेंच कीं, कायदे–मंडळानें बँकेवर कोणी डायरेक्टर निवडून दिला म्हणून तो बँकेचा व्यवहार राजकारणामुळें बुडवील किंवा घोटाळ्यांत आणील असें मानण्याचें कारण नाहीं.

शिवाय कायदेमंडळ घेतलें तरी त्यांत नुसते राजकारणीच पुरुष असतात असें नाहीं. तर त्यांत शेतकऱ्यांचे प्रतिनिधी, व्यापाऱ्यांचे प्रतिनिधी, सुशिक्षित वर्गाचे प्रतिनिधी, धंदेवाल्यांचे प्रतिनिधी, काळा-गोरा, मागासलेला-पुढारलेला अशा सर्व वर्गाचे व सर्व प्रकारच्या हितसंबंधाचे प्रतिनिधी कायदेमंडळांत असतात. आणि अशा शेंकडों प्रतिनिधींनीं मिळून केलेल्या निवडणुकींत राजकारणाशिवाय ज्याला दुसरा विचार सुचत नाहीं असा डायरेक्टर निवडून दिला जाईल असें कसें घडेल ? पण हा प्रश्न तत्त्वापेक्षां आग्रहाचाच अधिक झालेला आहे. आणि ज्या कारणाकरितां सरकारच्या बाजूचा आग्रह त्याच कारणा-

करितां लोकांच्या बाजूचा आग्रह हें ओघानेंच प्राप्त होतें. कायदेमंडळावर शिंतोडे उडविण्याची बुद्धि सर बेसिल ब्लॅकेट यांनीं धरली नसती तर कदाचित् पं. मदन मोहन मालवीय, केळकर, जम्नादास मेहता वगैरेंनीं कायदे–मंडळाला डायरेक्टर नेमण्याचा अधिकार असावा असा आग्रह धरला नसता.

असो. रिझर्व्ह बँक बिलासंबंधानें वादस्थळें कोणतीं व कशा प्रकारचीं याचें दिग्दर्शन येथपर्यंत झालें, तथापि हीं वादस्थळें कळल्यानें तो वाद जिच्याविषयीं चालला आहे त्या रिझर्व्ह बँकेचें स्वरूप काय हें कळण्यासारखें नाहीं. तूर्त इतकें सांगणें जरूर कीं,रिझर्व्ह बँकेला तसेंच कांहीं विशेष महत्त्व आहे म्हणून हा एवढा वाद सुरू आहे. इंम्पीरिअल बँक बिल १९२१ सालीं मंजूर झालें तेव्हांहि बँकेचाच प्रश्न होता. परंतु त्या बँकेचें आणि हल्लींच्या रिझर्व्ह बँकेचें स्वरूप वेगळें कसें व किती आहे हें लक्षांत घेतलें म्हणजे वादाचें स्वरूप लक्षांत येईल.

---

## ७४ इनामदारवर्गांतील जागृति

( ता. २७ सप्टेंबर सन १९२७ )

मुंबई इलाख्यांतील सरदार व इनामदार लोकांची दुसरी प्रांतिक परिषद् पुणें येथें भरली ती अनेक दृष्टींनीं यशस्वी झाली. परिषदेला निमंत्रण 'डेक्कन सरदार दुमालदार' सभेनें दिलें. येथील सरदार घराण्यांतील एक पुढारी गृहस्थ, सरदार खंडेराव चिंतामण मेहेंदळे, यांची योजना स्वागताध्यक्षाचे जागीं झाली. परिषदेचें अध्यक्षस्थान इचलकरंजी संस्थानाचे अधिपति श्रीमंत बाबासाहेब घोरपडे यांनीं स्वीकारलें. सभेवर ब्राह्मणेतर इनामदारांनीं प्रत्यक्ष बहिष्कारच पुकारला नसला तरी ब्राह्मणेतर सरदारांची संख्या फार थोडी होती. परंतु पोटइनामदारांपासून संस्थानिकांपर्यंत–म्हणजे शराकती, इनामदार, दुमालदार, वतनदार, जहागीरदार, सरंजामदार, सरदार इत्यादि सर्व दर्जाचे इनामदार ह्या परिषदेला हजर होते. एका संशोधकानें असा पुरावा मिळविला आहे कीं, सन १८८१ चे सुमारास लोकमान्य टिळक हे एका इनामदार–दुमालदार संघाचे चिटणीस असून, त्यांनीं संघटनेच्छु इनामदारांशीं सहकारिता केली होती. तथापि त्या प्रयत्नाचें फळ तेव्हां विशेष

आल्याचें दिसत नाहीं. याचें कारण संघटित कार्य करण्याची बुद्धिच इनामदार वर्गामध्यें तेव्हां तितकीशी नव्हती. परंतु अलीकडे या बुद्धींत फरक पडलेला आहे. गतवर्षी सातारा येथें सरदार मुतालिक यांच्या प्रयत्नानें परिषद् भरविण्याची कल्पना प्रथम निघून ती रंगरूपाला आली. त्यापूर्वीहि इनामदारांनीं ८–१० वर्षें आपलीं गाऱ्हाणीं वेशीवर टांगण्याची खटपट मधून मधून केली होती.

कांहीं वर्षांपासून इनामदार वर्गाचे प्रतिनिधि कायदेकौन्सिलांत निवडून येऊं लागले आहेत. श्रीमंत बाबासाहेब इचलकरंजीकर, कुरुंदवाडकर, मुतालीक, मुजुमदार, मुदलियार वगैरे गृहस्थांनीं मुंबई–कौन्सिलांत इनामदारांचे प्रतिनिधी म्हणून कामें केलीं. १९२४ ते १९२६ या तीन सालीं दक्षिणेंतील सरदार-इनामदारांना वरिष्ठ कौन्सिलांत आपला प्रतिनिधि पाठविण्याचा अधिकार मिळाला. सरदार मुतालीक यांनीं त्यांचें कार्य तेथेंहि केलें. परंतु परिषद् जिल्हानिहाय फिरतीवर निघाल्यापासून जें जागृतीचें काम होतें तें दोन तीन वर्षांनीं एखादी निवडणूक उपस्थित झाल्यानें होत नाहीं. म्हणून गतवर्षीच्या पहिल्या परिषदेनंतर ताबडतोब यंदा दुसऱ्या परिषदेचा उपक्रम झाला याबद्दल आम्ही चालकांचें अभिनंदन करतों. पुढील वर्षी परिषद् कर्नाटकांत बोलावण्यांत येणार असल्याचें समजतें. तसें झालें तर फारच चांगलें. कारण फक्त निवडणुकीच्या प्रसंगानें महाराष्ट्राच्या कर्नाटकावर व कर्नाटकाच्या महाराष्ट्रावर स्वाऱ्या झाल्या असतां, एकंदर इनामदारवर्गाचें हित साधण्यापेक्षां निवडणुकीच्या स्पर्धेमुळें विनाकारण व्यक्तिद्वेष मात्र बळावतो, आणि व्यक्तिद्वेषामुळें समाजहित लोपून जातें असा अनुभव येतो. पण परिषद् भरविल्यानें ही आपत्ति टळेल. निरनिराळ्या उपप्रांतांतील इनामदारांचा स्नेहपरिचय वाढेल; व गरजा, अडचणी, गाऱ्हाणीं यांचें ज्ञान परस्परांना करून देऊन संघशक्तीनें कांहीं उपाययोजना करण्यांत येईल. या कारणाकरितां परिषद् भरविण्याची ही परंपरा अखंड चालू ठेवावी अशी आमची या वर्गाला सूचना आहे, ती पार पाडण्याला लागणारी ऐपत या वर्गामध्यें नाहीं असें कोणीच म्हणणार नाहीं. आणि त्याला लागणारी सामुदायिक हितबुद्धि उदित झाल्याचींहि चिन्हें आतां दिसूं लागलीं आहेत.

इनामदारवर्गाची उत्पत्ति कशी झाली? समाजाला त्याचें महत्त्व काय? आज त्यांची स्थिति काय आहे? भावी स्थिति कशी होईल? त्यांचीं दुःखें व गाऱ्हाणीं कोणतीं? लोकांत त्यांच्याविषयीं अप्रीति कां? त्यांच्याविषयीं खऱ्या व खोट्या

कल्पना कोणत्या ? या वर्गानें मनावर घेतलें तर स्वतःची स्थिति सुधारून आपल्या खानदानीचा उपयोग समाजकार्याला त्यांना कसा करतां येईल ? या अनेक मुद्यांचें विवेचन स्वागताध्यक्ष मेहेंदळे व अध्यक्ष इचलकरंजीकर यांच्या भाषणांत आलेंच आहे. यंदाच्या परिषदेंत मान्य झालेल्या १०–२० ठरावांत मिळून, इनामदारवर्गाच्या मागण्या बहुधा सर्व संकलित केल्या गेल्या आहेत, आणि मुंबई इलाख्याचे गव्हर्नर यांनीं नुकतीच इनामदारवर्गाच्या शिष्टमंडळाची भेट घेऊन त्यांचीं गाऱ्हाणीं दूर करण्याविषयीं आश्वासनहि दिलें आहे, या सर्व गोष्टी लक्षांत घेतां इनामदारवर्गांत जागृति उत्पन्न झाली असून तिचें थोडथोडें फळहि त्यांच्या पदरांत पडत चाललें आहे असें दिसतें.

तथापि एकंदर इनामदारवर्गासंबंधानें आज लोकांत जी भावना आहे तिच्या विषयीं दोन शब्द लिहिणें अवश्य आहे असें वाटतें. इनामदारांसंबंधानें ही भावना दोन प्रकारची आहे. कांहीं लोकांना 'इनामदार' हें त्यांचें नुसतें नांव उच्चारल्याबरोबर ते फार प्रतिष्ठित वाटतात. राजे हे जसे देवाचे अंश तसेच इनामदार हे राजाचे अंश ! त्यांच्या अधिकाराचें प्रमाण लहान पण त्यांचा अधिकार यांना अस्सल राजकीय स्वरूपाचा वाटतो. कांहीं रयतवर्गाचे तर इनामदार हेंच सरकार होय. इनामदाराला शेतसाऱ्याची माफी असते, याचा अर्थ आपल्या 'राज्याच्या' मालकीचा एक लहानसा तुकडाच सरकारनें काढून इनामदाराला दिला ! इनाम जमिनीची मालकी खालीं पाताळापर्यंत व वर स्वर्गापर्यंत इनामदाराला असते. त्याच्या हद्दींत खाणी काढण्याला त्याला सरकारची परवानगी लागत नाहीं. त्याच्या हद्दींतील जंगल त्याच्या मालकीचें असतें ! त्याच्या हद्दींत इमारत बांधण्याला सरकारी परवानगी घ्यावी लागत नाहीं. शेतीशिवाय अन्य कामाकडे जमिनीचा उपयोग इनामदारांनीं किंवा त्यांच्या कुळांनीं केल्यास त्यांना 'बदलून साऱ्याचा' भूर्दंड पडत नाहीं ! लँड रेव्हिन्यू कोडाच्या ८८ कलमाप्रमाणें इनामदारीचे अधिकार मिळाले असतां शिपाई किंवा तगादेदार पाठवून कुळाच्या मालाच्या जप्त्या करून इनामदारांना आपली सारा-वसुली करतां येते. इत्यादि कांहीं पक्क्या व कांहीं कच्च्या समजुतीमुळें अडाणी लोकांच्या मनांत अजून इनामदारवर्गाविषयीं एक प्रकारची पूज्यता नसली तरी प्रतिष्ठितेची भावना असते खास.

सुशिक्षित लोक घेतले असतां, त्यांच्या मनाला वरील सर्व कारणें पटत

असतां स्वसामर्थ्याची ऐट मारण्याचें सोडून बर्कनहेड यांनीं आपली मान शरमेनें खालींच घालावयास पाहिजे. इंग्रजांनीं हिंदुस्थानांतील यादवी व बेबंदशाही बंद पाडली असें क्षणभर गृहीत धरलें तरी त्यांत फुशारकी मारण्यासारखें काय आहे ? यादवी व बेबंदशाही बंद पडली असली तरी त्यानें हिंदुस्थान सुखी, संतुष्ट व समृद्ध झाला काय ? हिंदुस्थान स्वराज्य मागतो याचा अर्थच तो इंग्रजी राज्यांत सुखी, संतुष्ट व समृद्ध नाहीं. आणि जर तो सुखी, संतुष्ट व समृद्ध नाहीं किंवा तुरुंगांत अडकवून टाकलेल्या असहाय कैद्याप्रमाणें तो दुःखी, असंतुष्ट व दरिद्री आहे, तर यांत बर्कनहेड यांनीं फुशारकी मारण्यासारखें काय आहे ?

ब्रिटिशांनीं सैन्य, आरमार व सिव्हिल सर्व्हिस काढून नेली तर काय होईल ही बर्कनहेडसाहेबांची फुशारकीहि इंग्रजी राज्याच्या नालायकीची टिमकीच वाजवीत आहे. लाखों हिंदी सैन्य फ्रान्समध्यें ओतलें म्हणून जर्मनीनें इंग्लंडच्या प्राणावर आणलेलें संकट शेपटीवर गेल्याची कबुली बर्कनहेडसाहेबांनीं फ्लँडर्सच्या रणभूमी-वरील हिंदी वीरांचें स्मारक उघडतांनाच दिली आहे. केवळ शिपाईगिरीवर आपला चरितार्थ चालविणारे लाखों शिपाईगडी इंग्रजी राज्यापूर्वी ज्या हिंदुस्था-नांत होते व प्रसंग पडल्यास लाखोंच काय पण कोट्यावधि नवे शिपाई निर्माण करण्याचें सामर्थ्य ज्या भरतभूमीच्या कुशींत आहे, तिचें क्षात्रतेज सत्तेच्या पाया-खालीं दाबून ठेवून ‘आमच्या फिरत्या संगिनीशिवाय व आमच्या तरत्या आरमा-राशिवाय तुमचा त्राता कोण ?’ असें ज्या सत्ताधाऱ्यांच्या तोंडांतून उद्गार निघतात त्यांचा धिःकार तो वेगळा काय करावयाचा ?

कमिशनमध्यें हिंदी सभासद घ्यावयाचें ठरलें कीं हिंदु, मुसलमान, ब्राह्मणेतर, ख्रिश्चन, अस्पृश्य व मिश्र यांपैकीं कोणास नको म्हणावें व कोणास होय म्हणावें याची पंचाईत पडेल अशी कांगावखोरपणानें लॉर्ड बर्कनहेड यांनीं हिंदुस्थानांतील अठरापगड जातींची टवाळी केली आहे. पण या बाबतींत सगळा शहाणपणाचा मक्ता आपणास मिळाला आहे असें त्यांनीं समजण्याचें कारण नाहीं. जाती अनेक असल्या तरी हिंदुस्थानास मिळावयाचें स्वराज्य एकच आहे हें जाणण्याची अक्कल हिंदी लोकांस आहे. बर्कनहेड व त्यांचे जातभाई इंग्रज लोक शहाणेना ! तरी सुद्धां कमिशन नेमतांना पक्षभेद लक्षांत घेऊन लिबरल, कॉन्झर्व्हेटिव्ह व मजूर या त्रिविध पक्षांस राजी राखण्याकरितां त्यांतून यथाप्रमाण सभासदांची निवड ब्रिटिश पार्लमेंटास करावी लागलीच कीं नाहीं ? मग तुमच्यांत जातिभेद

आहे म्हणून तुमचे सभासद आम्हास नकोत असें बोट बर्कनहेड व त्यांचे साथीदार यांनीं हिंदी लोकांच्या डोळ्यांत घालण्यांत अर्थ काय ?

तात्पर्य, लॉर्ड बर्कनडेड यांनीं अशा प्रकारें हिंदुस्थानचा उपमर्द, उपहास, टवाळी व नालस्ती करून आणि इंग्रजी सामर्थ्याचा, शहाणपणाचा व घमेंडीचा दिमाख दाखवून आपल्या हेतूविषयीं जनतेचीं मनें प्रथमपासूनच गढूळ बनविलीं ही मुत्सद्दीपणाच्या दृष्टीनें त्यांची घोडचूक होय. बर्कनहेड यांसच काय, पण प्रस्तुतच्या एकंदर ब्रिटिश मंत्रिमंडळास खरें धोरणच नाहीं. तें असतें तर हिंदी लोकमताची समजूत त्यांना थोडक्यांत घालणें कठीण नव्हतें. आहे याच सायमन कमिशनमध्यें कांहीं जागा लोकसमाजास मान्य अशा हिंदी सभासदांस दिल्यानें हिंदुस्थानची इभ्रत राहून स्वयंनिर्णयाच्या तत्त्वास मान मिळत होता. ती एक गोष्ट केवळ दुराग्रहास पेटून, पार्लमेंटरी कमिशनचा स्वतःच्या घमेंडींत भलताच अर्थ करून, रॅम्से मॅक्डोनाल्ड यांच्या शिष्टाईस लाथाडून, हिंदी लोकमतास तुच्छ लेखून न घडून आल्यामुळें मोठीच चूक करण्यांत आली आहे. या चुकीचें प्रायश्चित्त वरिष्ठ कायदेकौन्सिलच्या कमिटीस सायमन कमिशनच्या बरोबरीचे अधिकार मिळाले तरच प्रधानमंडळानें घेतलें असें होईल. पुढें कमिशननें आपला रिपोर्ट पार्लमेंटास सादर केल्यानंतर जॉइंट पार्लमेंटरी कमिटीच्या मांडीस मांडी लावून बसण्याचें मधाचें बोट बर्कनहेड यांनीं हिंदुस्थानच्या तोंडास लावलें आहे. पण त्यानें कोणाचें समाधान होईल असें वाटत नाहीं !

हिंदुस्थानाच्या स्टेटसेक्रेटरीसंबंधानें जशी कांहीं रीतच पडून गेली आहे कीं, जो म्हणून नवा स्टेटसेक्रेटरी गादीवर बसेल त्यानें मुख्य मुख्य प्रसंगीं हिंदुस्थानानें स्वराज्य गमावल्याच्या गुन्ह्याची आठवण त्याला होईल तितक्या अपमानास्पद शब्दांनीं करून द्यावी. पण त्याला उत्तर म्हणून आमचीहि रीत अशीच आहे कीं, जशास तसें या पद्धतीनें अशा अरेरावाला अशा प्रत्येक प्रसंगीं योग्य तेंच उत्तर द्यावयाचें. आणि तें उत्तर हेंच कीं, हिंदी लोकांनीं जरी जुनें स्वराज्य गमावलें असलें तरी नवें स्वराज्य मिळविल्याशिवाय ते स्तब्ध बसणार नाहींत. गर्वाचें घर खालीं या न्यायानें किंवा चक्रनेमिक्रमानें पडतो तो चढतो व चढतो तो पडतो ! म्हणून लॉर्ड बर्कनहेड यांनींहि खूप समजून ठेवावें कीं, इंग्लंडला झालें तरी ईश्वरानें सगळ्या जगावर यावच्चंद्रदिवाकरौ राज्यसत्ता गाजविण्याचा ताम्रपट किंवा मक्ता दिलेला नाहीं. ज्या केविलवाण्या तोंडानें इंग्लंडनें युद्धांत हिंदी सैन्याचा

धावा केला त्यानें फिरून हिंदुस्थानापुढें लष्करी गुर्मीची भाषा बोलणें हें खचित लज्जास्पद होय. तसेंच ज्या गोऱ्या सैन्याच्या जिवावर हा सगळा दिमाख त्याला आत्मसंरक्षणार्थ इंग्लंडमध्यें परत बोलावून घेण्याची कधीं वेळ येणार नाहीं असें तरी कोणीं सांगावें ! बर्कनहेडसाहेबांनीं आपल्या पूर्वजांचा इतिहास वाचला आहे. पण त्यांच्या वंशजांचा इतिहास अजून घडावयाचा आहे, म्हणून लिहावयाचाहि आहे, तेव्हां तो ते कसा वाचणार ! युरोपांत जें स्वार्थबुद्धीचें भूत आज नाचत आहे तें असेंच आणखी कांहीं दिवस नाचत राहिल्यास पूर्वी रोमन लोकांना, इंग्लंडचें राज्य इंग्रज लोकांवर सोंपवून; आपलें सर्व सैन्य रोमला परत बोलवावें लागलें तसेंच हिंदी लोकांच्या स्वाधीन हिंदुस्थानचें राज्य करून इंग्लंडांतल्या इंग्रजांना गोरें सैन्य परत बोलवावें लागणार नाहीं कशावरून ! महायुद्धामध्यें इंग्लंडच्या काळजाचे ठोके कसे पडत होते ते सगळ्या जगाला ऐकूं आले. आणि इंग्लंडची जी अब्रू तेव्हां एका शब्दबिंदूनें गेली ती बर्कनहेडसारख्या रावण राजानें गर्वोक्तीचे हंडे आतां कितीहि भरले तरी परत येत नाहीं. पण अशा प्रकारच्या उत्तराला साजेल असें धोरण हिंदी लोकांनींहि प्रस्तुत प्रसंगीं ठेवलें पाहिजे. कमिशनवर चारदोन कसले तरी हिंदी लोक नेमल्यानें हिंदुस्थानच्या स्वयंनिर्णयाच्या हक्काची पूर्ण भरपाई झाली असती असली दुबळी भाषा व भावना टाकून देऊन, हिंदुस्थानांत खरी एकी आहे व तिच्या जोरावर आम्ही काय वाटेल तें करूं शकूं असें इंग्लंडांतील जाणत्या लोकांना जाणविलें पाहिजे. निरनिराळ्या पुढाऱ्यांनीं एकत्र बसून स्वतःची स्वराज्याची योजना तयार केली पाहिजे. पार्लमेंटरी कमिटीच्या बरोबरीचे हक्क कायदेमंडळानें नेमलेल्या कमिटीला मिळणार असतील तरच आम्ही तुमच्याशीं सहविचार करूं, तसें न घडल्यास तुमच्या कमिटीवर बहिष्कार पडावा म्हणून कायदेमंडळाची कमिटीहि मुळीं नेमणार नाहीं, असें एकमुखानें जाहीर केलें पाहिजे. तात्पर्य, बहिष्कार या नुसत्या शब्दोच्चारानें सर्व कांहीं मिळालें अशी स्वतःची समजूत करून न घेतां किंवा दुसऱ्याची समजूत करण्याचा प्रयत्न न करितां स्वयंनिर्णयाचें विधायक कार्य करावें आणि सक्रिय अशा ऐक्याच्या भूमिकेवर खंबीर उभें राहावें अशी आमची बहिष्कारवादी लोकांना सूचना आहे. जोंपर्यंत स्वतः आम्हाला स्वयंनिर्णय करून दाखवितां आला नाहीं, जोंपर्यंत आम्हीं अमुक स्वराज्य-योजना अमक्यानें केली असें म्हणून तेवढ्याचकरितां ती तुच्छ मानितों, पण स्वतःची अशी कांहीं योजना करित नाहीं, जोंपर्यंत राष्ट्रीय सभा

पूर्वीप्रमाणें सर्वपक्षसमावेशक होत नाहीं, तोंपर्यंत लॉर्ड बर्कनहेडसारख्यांना आमच्या क्षतावर चोंच मारण्याला जागा राहणार हें ध्यानांत ठेवलें पाहिजे.

---

## ७८ राष्ट्रीय चळवळ

( केसरी, सन १९२७ )

**[ निपाणी येथें श्रीव्यंकटेशाचे देवालयांत झालेलें व्याख्यान ]**

प्रास्ताविक भाषण करणाऱ्या गृहस्थांनीं माझ्यावर जो एक प्रकारचा विश्वास टाकला आहे त्याबरोबर एक प्रकारची जबाबदारीहि टाकली आहे असें मी समजतों व ती जबाबदारी ओळखूनच मी आपणाला सध्यांच्या राष्ट्रीय चळवळीसंबंधानें चार शब्द सांगणार आहें. कित्येकांना सध्यां देशांतील राष्ट्रीय चळवळीसंबंधानें किंचित् थोडी निराशा वाटते. पण राष्ट्रीय चळवळीसंबंधानें कोणीहि निराश होण्याचें कारण नाहीं. कारण जो दिवस येतो तो राष्ट्रीय चळवळ जिवंत असून तिची प्रगतिच होत आहे असें दाखवितो; तिच्या दृश्य स्वरूपांत फेरबदल होत असलेले आपणास दिसत असतील. परंतु त्यावरून राष्ट्रीय चळवळ नाहींशी झाली असें कोणासहि म्हणतां येणार नाहीं. निमित्तकारणामुळें चळवळीचें दृश्य स्वरूप हरघडीं बदलतच असतें. एखाद्या जलसंचयाचे पृष्ठभागावर वादळ चालू असलें म्हणजे मोठमोठ्या लाटा उत्पन्न होतात, कित्येक वेळां लहान लहान लहरी उठतात व कांहीं प्रसंगीं वारा पडल्यामुळें पृष्ठभागाची अणुमात्राहि हालचाल दिसत नाहीं. पण त्यामुळें जलसंचयाचें मूळ स्वरूप नष्ट झालें असें आपण मानीत नाहीं तीच गोष्ट राष्ट्रीय चळवळीची आहे. जनसमाजामध्यें वेळोवेळीं प्रक्षोभ उत्पन्न करणारीं निमित्तकारणें व त्यांचीं स्वरूपें हीं नेहमीं बदलत असतात; यामुळें राष्ट्रीय चळवळ अमुक क्षणीं एका विशिष्ट तऱ्हेची दिसत नाहीं म्हणून कोणास निराश होण्याचें कारण नाहीं.

राष्ट्रीय चळवळ होण्याचीं कारणें तरी कोणतीं ? एक अनुयोगी सरकार व दुसरें प्रतियोगी रूपानें वागणारे लोक. कोणतीहि नवी गोष्ट उपस्थित करून लोकांपुढें ठेवण्याची सत्ता व पात्रता प्रारंभीं बहुतांशीं सरकारकडेच असते म्हणून राष्ट्रीय चळवळीचें अनुयोगी सरकार होय व एखाद्या नव्या गोष्टीचा उपक्रम सरकारनें केला असतां आपणाला सोसाव्या लागणाऱ्या दुष्परिणामाबद्दल प्रति-

कार करण्याची लोकांची तयारी असते यामुळें प्रतियोगित्वाची भूमिका सहजच लोकांकडे येते. एकीकडे सर्व सत्ता आपल्याच मुठींत ठेवावी, व लोकांना आपल्याच टांचेखालीं सदैव दाबून ठेवावें ही नोकरशाहीची मनोवृत्ति अद्याप कायम आहे; तितकीच या गोष्टीचा शक्य तितका प्रतिकार करण्याची लोकपक्षाचीहि इच्छा जागृत आहे. मग राष्ट्रीय चळवळ नाहींशी होणार कशी ?

इंग्रज सरकारच्या दुर्दम शक्तिकडे किंवा त्यांच्या असामान्य व अफाट राज्यविस्ताराकडे पाहून हिंदी लोकांच्या स्वातंत्र्याबद्दल खरोखर निराश झालेल्यांचीं उदाहरणें मला माहीत आहेत. शिवाजीनें स्वराज्य स्थापलें तेव्हां मोंगल बादशाही विरुद्ध मराठ्यांना मनुष्यबळाच्या दृष्टीनें तरी निराश होण्याचें कारण नव्हतें. सरस निरस कसा का होईना, हत्यार धरणाऱ्या माणसास माणूस त्यांना त्या वेळीं उभा करतां येत असे. पण आजच्या इंग्रजांच्या लष्करी सामर्थ्याकडे व त्यांच्या भौतिक व यांत्रिक विद्येकडे पाहून हिंदुस्थानाला कधीं काळीं तरी स्वातंत्र्य मिळेल काय अशी निराशा वाटूं लागते. परंतु अडचणींचा पर्वत सकृद्दर्शनीं दुर्लंघ्य असा भासत असला तरी परमेश्वराची लीलाप्रियता ही सृष्टीच्या चमत्कारांत जितकी आढळते तितकीच राष्ट्रांच्या घडामोडींतहि दिसून येते. म्हणूनच आशावादी मनुष्याला पारतंत्र्याच्या निबिड अंधकारांतहि कोळ्याच्या सूक्ष्म धाग्याप्रमाणें आपला स्वातंत्र्यकाल दिसत असतो.

इंग्रज आपल्या आरमारी सामर्थ्याच्या बळावर आज जगभर धिंगाणा घालतो आहे; पण त्या आरमारालाच पायबंद बसून घरचें सांभाळतांना पुरेवाट अशी पाळी केव्हां तरी येणारच नाहीं, असें थोडेंच आहे ? अशी गोष्ट खुद्द इंग्लंडच्याच इतिहासांत पूर्वी घडलेली आहे. पूर्वी रोमन लोकांनीं इंग्लंड जिंकून या इंग्रजांना पांचशें वर्षें आपल्या टांचेखालीं ठेवलें. त्याच रोमन लोकांच्यावर रानटी गॉथ लोकांनीं स्वारी केली असतां आपलें घर सांभाळतां सांभळातां पुरें होऊन त्यांना इंग्लंडास असा खलिता पाठवावा लागला कीं, " इकडची सत्ता संपुष्टांत आली आहे, तेव्हां सर्व शिपाईप्यादे व चीजवस्त इकडे आणा. इंग्लंडचें राज्य तिकडचें तिकडे राहूं दे ! " हिंदुस्थानाच्या व्हाइसरॉयालाहि असा एखादा खलिता विलायतेहून येण्याची वेळ अघटितघटनेनें इंग्लंडावर कधीं येणारच नाहीं असें कोणीं सांगावें ? मनुष्यशक्तीप्रमाणें साम्राज्यसत्तेलाहि अंत आहेच, हें कांहीं मार्मिक व शहाणे इंग्रज लोकहि मानतात. सत्तेच्या अजिंक्य, अफाट व दुर्दम पसाऱ्यांतहि

त्याचा नाशक्षण हा प्रज्ञाप्रतिष्ठित विवेचकाला दिसत नसतो असें नाहीं. अनेक बादशाह्यांची घडामोड झालेल्या दिल्लीच्या वास्तूप्रमाणेंच लंडन शहरचें भावी वर्णन एखाद्या भविष्यवाद्याप्रमाणें लॉर्ड मेकॉले यानें एके ठिकाणीं केलें आहे. तो म्हणतो; कोणीं सांगावें, उद्यां केव्हां तरी अशी वेळ येईल कीं, सर्व साम्राज्याच्या प्रचंड घडामोडींचें एके वेळीं अधिष्ठान असलेलें हें लंडन शहराचें वैभव नामशेष व स्मृति-शेष होईल व एखाद्या पडक्या भिंतीवर किंवा टेकडीवर उभा राहून एखादा कुतूहलप्रिय व जिज्ञासू प्रवासी बोट दाखवून म्हणेल–' हो, येथेंच ती ब्रिटिश साम्राज्याच्या पार्लमेंट सभेची इमारत असावी ' ! !

सर्वस्वीं अशक्य वाटणाऱ्या गोष्टी कणाकणानें व क्षणाक्षणानें होतच असतात. पण कालालाहि कलाटणी आपल्या हातभारानें देतां आली तर द्यावी यांतच सर्व पुरुषार्थाचें बीज आहे. कालांतरानें सर्व घडतच असतें. पण त्यांत आपणाला भूषण तें काय ? व प्रत्येकानेंच असें म्हटलें तर ही कलाटणी मिळणार कशी ? पुढारी अगदीं शंभर नंबरी योग्य असा असला तरी साधनें व परिस्थिति यांच्या मर्यादा त्याला आड येतातच. राष्ट्रीय सभेचे सभासद किंवा स्वराज्य संघाचे सभासद पुढें हजारों झाले. पण मूळ सुरुवातीला टिळकांच्यासारख्या लोकांच्या विश्वासांतल्या पुढाऱ्यालाहि किती कष्ट पडले तें मला माहीत आहे. पण ती परिस्थिति बदलून पुढें लोकांची शंका नाहींशी झाल्यावर चळवळीचें पात्र मोठें झालें, निमित्त कारण बदलल्यामुळेंच राष्ट्रीय चळवळीच्या स्वरूपांत हे भेद झाले, व आज दहा वर्षांत राजकारणाचीं स्थित्यंतरें अनेक झालीं; म्हणून राष्ट्रीय चळवळीची प्रवृत्तिच देशांतून नाहींशी झाली किंवा कमी झाली असें कोणास म्हणतां येईल काय ?

मनुष्याच्या कमी–अधिक प्रसन्न प्रकृतीप्रमाणें राष्ट्रीय मनाची कांहीं प्रकृति असते, व त्याप्रमाणें राष्ट्रीय चळवळीचें स्वरूपहि कमी–अधिक तेजस्वी होत असतें. तुमच्या मनांत कधीं निराशाजनक विचार आला तर असें समजा कीं, आज जें अन्न आपण खाल्लें तें बरोबर पचलें नाहीं. राष्ट्राचीहि उल्लसित वृत्ति अशाच कारणांनीं कमी–अधिक होत असते. अनेक पुढारी व अनेक साधनें यांनीं बिचकून जाऊं नका. सर्वच पुढाऱ्यांची मनःप्रकृति सारखी कशी असणार ? पुढाऱ्यांत भेद आहेत म्हणतां तर मी तुम्हाला विचारतों अनुयायांत तरी एकमत कोठें आहे ? ज्या गांवांत सर्व अनुयायी एकाच वृत्तीचे व प्रकृतीचे आहेत असें एक तरी गांव मला दाखवा. ' साधनानाम् अनेकता ' हें जें हिंदुधर्माचें उपलक्षण

टिळकांनीं सांगितलें तेंच राष्ट्रधर्मालाहि लागू आहे. त्रैगुण्य हें जसें व्यक्तीला लागू तसेंच समाजालाहि लागू आहे. त्रैगुण्य हा शब्द मी केवळ उपलक्षणात्मक मानतों. समाज हा दशगुणी आहे, त्याचप्रमाणें साधनेंहि तितकींच आहेत. हें साधन-वैचित्र्य पचनीं पाडून श्रमविभागानें कार्य करून दाखविणें हा खरा राष्ट्रधर्म होय. अनत्याचारापासून तों अत्याचार करण्याची तयारी असणाऱ्या अनुयाया-पर्यंत सर्व प्रकारचे अनुयायी आम्ही पुरवितों, असें बेलाशक पुढाऱ्यांना आव्हान करण्याची तयारी तुम्हीं दाखविली पाहिजे.

धर्मसाधनाचे जसे अनेक मार्ग आहेत, तसे राष्ट्रधर्मांचे मार्गहि अनेक आहेत. पण त्यांत विरोध कोठेंच नाहीं. मग कोणाची निंदा नालस्ती किंवा मत्सर करण्याचें काय कारण ? श्रीकृष्णानें गोवर्धन पर्वत आपल्या करांगुलीवर उचलून धरला व त्याला बाळगोपालांनीं आपल्या काठ्या लावल्या होत्या या पौराणिक कथेचें वर्णन ऐतिहासिक दृष्टि जाणणारा मनुष्य तरी असें करील कीं, श्रीकृष्ण ही ऐति-हासिक व्यक्ति होती. कांहीं एक संकटकाल आला असतां त्यामध्यें त्यानें पुढा-रीपणानें कार्याला हातभार लावला होता, व त्या वेळीं सर्व पक्षांच्या व सर्व मतांच्या बाळगोपाळांनीं आपआपल्या सामर्थ्यानुसार त्यांत कार्यभाग घेतला होता. राष्ट्रीय चळवळीमध्यें सर्वत्रांनीं अशीच राष्ट्रीय बुद्धि ठेवून साधनांमध्यें विरोध न मानतां श्रमविभागानें कामें केलीं पाहिजेत. समजा, एखाद्या देवालयांत कोणी पूजा करीत आहे; कोणी पोथी वाचीत आहे आणि एखादा हटयोगी एका पायावरच उभा राहून परमेश्वराचें ध्यान करीत आहे. तर या त्यांच्या साधनांत कोठें विरोध उत्पन्न होतो ? त्याचप्रमाणें ज्याला जो जो मार्ग सुचेल, रुचेल व पचेल त्या त्या प्रत्येक मार्गानें त्यानें देशाचें हित साधावें हा एकच राष्ट्रीय चळवळीचा राजमार्ग होय.

---

## ७९ ही घ्या एकमुखी स्वराज्य-घटना

( ता. ४ सप्टेंबर सन १९२८ )

पूर्वीं सर्वपक्षीय परिषदेंत ठरल्याप्रमाणें पं. मोतिलाल नेहरू यांच्या अध्यक्षते-खालीं नेमलेल्या कमिटीनें हिंदुस्थानास मिळावयाच्या स्वराज्याची योजना तयार केली व तिजविषयीं थोडाबहुत मतभेद असला तरी योजनेचें काम पं. मोतिलाल-प्रभृति कमिटींतील सभासदांनीं एकंदरींत फार कुशलतेनें व मुत्सद्दीपणानें केलें

असाच सर्वांचा अभिप्राय पडून त्याबद्दल साऱ्या हिंदुस्थानांत कमिटीची वाहवाच झाली. तथापि हिंदुस्थानांतील ज्या अनेक पक्षांनीं एकत्र जमून ही कमिटी नेमली त्या सर्वांची संमति कमिटीच्या योजनेस मिळावयाची उरली होती. हिंदु-मुसलमान पुढाऱ्यांनीं योजनेची वाहवा आगाऊ केली असल्यामुळें ती योजना सर्व पक्षांस पसंत पडेल अशीच सामान्यतः अटकळ होती. परंतु ती गोष्ट साक्षात् घडून येईपर्यंत स्वराज्याची आस्था बाळगणाऱ्या कोणाहि विचारी माणसाच्या मनास चिंता वाटणें स्वाभाविक होतें. याच चिंतातुर मनानें स्वराज्यवादी हिंदुस्थान गेल्या आठवड्यांत लखनौकडे डोळे लावून बसला होता आणि आनंदाची गोष्ट अशी कीं, जनतेची ही आशा सर्व पक्षांनीं लखनौस जमून व नेहरू कमिटीच्या योजनेस थोड्याबहुत फरकानें मान्यता देऊन सफळ केली.

नेहरू कमिटीची योजना जशीच्या तशी सर्व पक्षांनीं कबूल करणें संभवनीय नव्हतें व अशी कोणाची अपेक्षाहि नव्हती. परंतु त्या योजनेंत जरूर ते फेरबदल करूं, पण ती झुगारून देऊन राष्ट्रघात करणार नाहीं या बाबतींत सर्व पक्षांची एकवाक्यता असणें आवश्यक होतें; व तोच अनुभव अखेर आला यांतच लखनौस लाभलेल्या यशाचें खरें बीज आहे. प्रत्येक पक्षाच्या मतानें योजनेंत जे फरक व्हावयास पाहिजेत त्यांची वाटाघाट खुद्द सर्वपक्षीय परिषदेंत करीत बसण्यापेक्षां प्रत्येक पक्षानें आपली वेगळी बैठक भरवून तिच्यांत योजना छानून घेणें अधिक सोयीचें या दृष्टीनें परिषदेच्या अधिवेशनापूर्वीं प्रत्येक पक्षानें आपली बैठक लखनौस भरविली व तिच्यांत योजना तपासून पाहिली. या तपासणीसाठीं लखनौस मुस्लीम लीग, सेंट्रल खिलाफत कमिटी, हिंदु-महासभा, लिबरल पक्ष व स्वातंत्र्यपक्ष यांनीं आपले तळ कांहीं दिवस आगाऊ दिले. डोमीनियन स्टेटस् ऊर्फ वसाहतीचें स्वराज्य प्राप्त करून घेण्यासाठींच नेहरू कमिटीची योजना असल्यामुळें ती लिबरल पक्षास ठोकळमानानें मान्य होण्याजोगी होती आणि हिंदु-मुसलमानांच्या प्रश्नासंबंधीं त्यांचा विशेष आग्रह असा नव्हता, या कारणानें लिबरल पक्षाच्या प्रतिकूलतेची धास्ती कोणास वाटत नव्हती. त्यानंतर पं. जवाहरलाल नेहरू व मौ. हसरत मोहानी यांचा स्वातंत्र्यपक्ष येतो. स्वातंत्र्यपक्षाचें स्वातंत्र्याचें ध्येय मूठभर लिबरल पक्षाचे नेमस्त सोडल्यास कोणासहि पटण्यासारखेंच असून तें नेहरू कमिटीनें आपल्या योजनेंत समाविष्टहि केलें असल्यामुळें त्यास तात्त्विक विरोध फारच थोड्यांचा होता.

परंतु या तत्त्वाच्या आधारावर हसरत मोहनींसारखे ध्येयवादी गृहस्थ स्वराज्याची योजना ऐनजिनसी फेटाळून देऊं म्हणतील तर त्यांची मात्रा हिंदुस्थानांतील सर्व पक्ष मिळून बनलेल्या या परिषदेंतील बहुमतापुढें चालणारी नसल्यामुळें ध्येयवाद्यांच्या विरोधाची काळजी करण्याचेंहि कारण नव्हतें. खरा खटका हिंदु–महासभा व मुस्लीम लीग यांचे दरम्यान उडावयाचा होता आणि तो टाळून हिंदु–मुसलमानांची समजूत घालण्यांतच हिंदु–मुसलमान पुढाऱ्यांच्या मुत्सद्दीपणाची पारख व्हावयाची होती. खुद्द नेहरू कमिटींत हिंदु–महासभा व मुस्लीम लीग यांची बाजू मांडण्याकरितां श्री. माधवरावजी अणे, सर अल्ली इमाम व श्वेब कुरेषी यांचा सभासद या नात्यानें समावेश करण्यांत आलाच होता. परंतु त्यांसहि ज्या मुद्द्यांचें निराकरण करतां आलें नाहीं असेहि कित्येक मुद्दे वादग्रस्त स्वरूपांत शिल्लक असल्यानें त्या मुद्द्यांवर रणें माजून रहाणार हें उघड होतें. त्यासाठीं हिंदुमहासमेच्या वतीनें पं. मालवीय, लाला लजपतराय, डॉ. मुंजे यांनीं आणि मुस्लीम लीग व खिलाफत कमिटी यांच्या वतीनें डॉ. किश्लू, अबुल कलाम अझाद, महमुदाबादचे राजेसाहेब, सर अल्ली इमाम, डॉ. अन्सारी व श्वेब कुरेषी यांनीं लखनौस परिषदेपूर्वीं हजर राहून आपआपल्या मुद्द्यांचा कापूस पिंजून ठेवला होता.

हिंदु-मुसलमानांच्या अलीकडील झगड्यावरून पड खाण्याचा स्वभाव हिंदूंचा व ओढून धरण्याचा स्वभाव मुसलमानांचा याविषयीं बहुतेकांची खात्री पटलीच आहे. पं. मोतीलाल नेहरू यांस हिंदु-मुसलमानांच्या स्वभावांतील हा फरक पक्का माहीत आहे आणि सामान्य हिंदु पुढाऱ्यांपेक्षांहि मुसलमानांपुढें ते अल्पसंख्य म्हणून नमतें घेण्याविषयीं त्यांची प्रसिद्धि आहे. पं. मोतीलाल हे स्वराज्ययोजनामंडळाचे अध्यक्ष असल्यामुळें त्यांनीं मुसलमानांचीं तोंडें मिटविण्याकरितां मुसलमानांच्या पदरांत शक्य तितकें झुकतें माप टाकण्याच्या कामीं कमिटीस मदत केली असल्यास त्याबद्दल कोणासहि आश्चर्य वाटण्याचें कारण नाहीं. अशा रीतीनें ज्या पाण्यांतून ही योजनेची नौका वल्हवावयाची त्यांतील भोंवरे मोडून टाकल्यामुळें व खडक फोडल्यामुळें ती बिनधोक पैलतीरास जाऊन पोंचेल अशी नेहरू कमिटीची अटकळ होती व ती सर्वपक्षीय परिषदेंत बहुतांशीं खरी ठरली. हिंदुमहासभा कांहीं बाबतींत मुसलमान पुढाऱ्यांशीं झगडली व तिला अल्पस्वल्प यशहि लाभलें. परंतु तें यश नेहरू कमिटीच्या योजनेंत हिंदूंना अधिक हक्क संपादन करण्याच्या स्वरूपाचे

होते असें म्हणण्यापेक्षां नेहरू कमिटीनें ज्या सवलती मुसलमानांना पूर्वींच दिल्या आहेत त्याहून अधिक सवलती मिळविण्याच्या त्यांच्या प्रयत्नास पायबंद घालण्याच्या स्वरूपाचें होतें असेंच म्हणणें वस्तुस्थितीस धरून होईल.

पंजाब व बंगाल या दोन प्रांतांत हिंदूंपेक्षां मुसलमानांची संख्या अधिक आहे. आणि इतर आठदहा प्रांतांतून मुसलमानांपेक्षां हिंदूंची संख्या अधिक आहे. एवढ्या मोठ्या हिंदुस्थानांत ज्यांत मुसलमान हिंदूंपेक्षां जास्ती आहेत असे अवघे दोनच प्रांत पाहून मुसलमानांस हिंदूंचा हेवा वाटतो व त्याकरितां नवीन मुसलमानी प्रांत निर्माण करण्याच्या युक्त्या ते अलीकडे शोधीत असतात. वायव्य सरहद्दप्रांत पंजाबास जोडूं न देणें, मुंबई इलाख्यापासून सिंध प्रांत वेगळा करणें व बलुचिस्थानालाहि सुधारणा लागूं करणें या युक्त्या वरील पैकींच होत. हिंदुस्थानांतील वेगवेगळ्या प्रांतांची रचना सदोष आहे व ती सुधारून राज्यकारभाराच्या दृष्टीनें सोयीचे असे भाषावार प्रांत पाडावे अशी सर्व हिंदी लोकांची पुष्कळ दिवसांची मागणीहि आहे हें खरें. परंतु हा मूलभूत हेतु गुंडाळून ठेवून व केवळ मुसलमान या जातीचा अभिमान धरून जेव्हां सिंधसारखा आर्थिक दृष्ट्या स्वयंपूर्ण नसणारा प्रांत मुसलमान पुढारी वेगळा करून मागतात तेव्हां एकाच राष्ट्रांत राहाणाऱ्या हिंदुमुसमानांत कायमची दुही पाडण्याचा ते इरादा बाळगतात असें हिंदूंनीं कां समजूं नये ? ही गोष्ट उघड दिसत असतां मुसलनांच्या मर्जीखातर नेहरू कमिटीनें सिंध प्रांत मुंबई इलाख्यांतून पृथक् करण्यास संमति दिली.

वायव्य सरहद्द व सिंध या दोनहि प्रांतांत मुसलमानांपेक्षां हिंदु फारच थोडे असल्यानें येथील प्रातिनिधिक संस्थांत आपले कांहीं प्रतिनिधी हटकून निवडून यावे यासाठीं हिंदूंकरितां राखीव जागा ठेवण्याची तरतूद नेहरू कमिटीच्या योजनेंत हवी होती. तशी तरतूद कमिटीनें सरहद्द प्रांताकरितां आणि सिंध प्रांताकरितां केली होती. या उपायानें हिंदूंची सोय पाहाण्यांत आली तर सिंधसारखा छोटा प्रांत वेगळा काढल्यानंतर त्यासाठीं येणारा राज्यकारभाराचा मोठा खर्च भागावयाचा कसा ही अडचण लहान नव्हे. पण तिचा निर्वाह ज्या युक्तीनें झाला ती युक्ति परिणामीं हिंदूंना घातक ठरेल कीं काय अशी भीति वाटते. सिंधमधील बहुमतानें, अर्थात् मुसलमानांनीं, राज्यकारभाराच्या खर्चाचें अवजड ओझें आपल्या शिरावर घेण्याचें ठरविलें तर सिंध प्रांत वेगळा करण्यास कोणीं हरकत आणूं नये असें हिंदुमुसलमान पुढाऱ्यांच्या तडजोडींत निश्चित झालें व त्यास सर्वपक्षीय

परिषदेची मंजुरीही मिळाली. तथापि सिंधमधील हिंदु मुसलमानांपेक्षां संख्येनें कमी पण संपत्तीनें अधिक असल्यामुळें तेथील मुसलमान बहुमताच्या जोरावर हिंदूंवर पक्षपातानें कर बसवून त्यांजपासून वाजवीपेक्षां फाजील पैसा पिळून घेणार नाहींत अशी खात्री बाळगण्यास आधार काय ?

सिंध व सरहद्द प्रांत यांत हिंदूंपेक्षां मुसलमान जितके जास्ती आहेत तितके ते पंजाब व बंगाल या इलाख्यांत नसले तरी संख्याधिक्य मुसलमानांचेंच आहे. या दोन इलाख्यांत आपण अल्पसंख्य आहोंत हें निमित्त सांगून हिंदूंना आपल्याकरितां राखीव जागा मागतां आल्या असत्या. पण त्या त्यांनीं मागितल्या नाहींत. याबद्दल मुसलमान बंधूंनीं त्यांस धन्यवाद द्यावयाचा बाजूसच राहिला. उलट बहुसंख्य असे मुसलमान आपण हिंदूंपेक्षां मागासलेले या सबबीवर राखीव जागा मागतील कीं काय अशी भीति उद्भवली व ती पंजाबांत प्रत्ययासहि आली. वास्तविक अशी धास्ती बाळगण्याचें नेहरू कमिटीनें मुसलमानांस निमित्त ठेवलें नव्हतें. कारण त्या अडचणीवर तोड म्हणून प्रत्येक वयांत आलेल्या स्त्री-पुरुषास मताधिकार असावा अशी मुसलमान पुढाऱ्यांनीं पूर्वीच सुचविलेली युक्ति नेहरू कमिटीनें आपल्या स्वराज्यघटनेंत समाविष्ट केलीच होती. सांप्रत हिंदुस्थानांत मताधिकार हा विशिष्ट प्राप्ति व शिक्षण यांवरच अवलंबून आहे. पण त्या पायरीवरून पाय उचलून सार्वत्रिक मताधिकाराची नेहरू कमिटीनें घेतलेली उडी लांब पल्ल्याची व धाडसाची आहे यांत शंका नाहीं. ही उडी केवळ मुसलमानांची मर्जी राखण्यासाठींच घेतली नाहीं काय ? त्या उडीनें संपत्ति व शिक्षण यांस बगल देऊन सर्व वयांत आलेल्या हिंदु-मुसलमान स्त्रीपुरुषांस मतदानाच्या अधिकारभूमीवर आणून ठेवलें तर मग पंजाबांतील मुसलमानांनीं राखीव जागांची सवलत मागण्याचा हट्ट कां धरावा ? पण हिंदु-मुसलमानांच्या वागणुकीचें हल्लींचें धोरणच असें आहे कीं, हिंदूंनीं आपले न्यायाचे हक्कहि बुडवावे आणि मुसलमानांनीं आपले अन्यायाचे हक्कहि शाबीत करावे. परंतु प्रकृत स्थळीं सुदैवानें अखेर घडून आलें तें वेगळेंच. पंजाबांतील मुसलमानांनीं आपला राखीव जागांचा दुराग्रह सोडला व तोहि दहा वर्षेपर्यंतच. आणि त्याबद्दल सर्वपक्षीय परिषदेनें पंजाबांतील मुसलमानांची मनापासून पाठ थोपटली हें सांगावयास नकोच. पंजाबांतल्याइतके बंगाल्यांतील मुसलमान दुराग्रही नसल्यामुळें बंगाल्यांतील मुसलमानांनीं राखीव जागांचा हट्ट धरला नाहीं हें भाग्यच समजावयाचें !

हिंदु व मुसलमान हे हिंदुस्थानांतील प्रमुख वर्ग होत. हिंदुस्थानानें तयार केलेली कोणतीहि स्वराज्याची योजना ब्रिटिश पार्लमेंटास मान्य होण्यापूर्वी हिंदु व मुसलमान या दोन प्रमुख वर्गांचें शिक्का-मोर्तब सदर योजनेवर पडणें अत्यंत आवश्यक होय. ही अवश्यकता लो. टिळक यांस पटली होती व तत्प्रीत्यर्थ बारा वर्षांपूर्वी लखनौ येथेंच मुसलमानांनीं मागितलेल्या मताधिकाराच्या व प्रतिनिधित्वाच्या विशेष सवलती देऊन लो. टिळकांनीं व इतर पुढाऱ्यांनीं आपल्या स्वराज्यविषयक योजनेस मुसलमानांस वश करून घेतलें. त्याहून निराळ्या रीतीनें पण विशेष सवलतींचाच अवलंब करून आजच्या हिंदुपुढाऱ्यांनाहि बारा वर्षांनंतर मुसलमानांस तसेंच वश करून घ्यावें लागत आहे, ही गोष्ट ध्यानांत ठेवण्यासारखी आहे. नेहरू कमिटीनें एका बाबतींत मात्र महत्त्वाची सुधारणा घडवून आणिली. मोर्ले–मिंटो सुधारणेंत सरकारनें जें जातवार मतदारसंघाचें व जातवार निवडणुकीचें घातक व विषारी तत्त्व घुसडून दिलें होतें तें लखनौच्या कराराच्या वेळीं बाहेर काढून टाकतां आलें नाहीं. त्या तत्त्वास भारताच्या विराट शरीरांतून हुसकून लावून तें शरीर निकोप बनविण्याचें श्रेय नेहरू कमिटीनें घेतलें आहे यांत संशय नाहीं. पण त्याकरितां सार्वत्रिक मताधिकाराचें सद्यःस्थितींत न झेपण्यासारखें तत्त्व भारताच्या शरीरांत घुसवून एका नव्या प्रयोगाची सुरवात कमिटीनें करून दिली आहे. तें अमलांत आल्यास त्याचे परिणाम कोठवर जाऊन पोंचतील याचें आज अनुमान करवत नाहीं.

अशा रीतीनें परिषदेंत मान्य झालेल्या घटनेंतील उणीवा, दोष अगर भावी राष्ट्रीय व्यवहारांत धोक्याचीं किंवा अडचणीचीं होणारीं स्थळें शोधल्यास आणखीहि सांपडतील. पण सर्वस्वीं निर्दोष अशी घटना करण्याचा आजचा प्रश्न नसून सर्वमान्य अशी घटना होणें ही आजची मुख्य नड होती, या दृष्टीनेंच लजपतराय, मालवीय, बेझंट इ. वृद्ध पुढाऱ्यांनीं तपशीलांतील दुरुस्त्यांपेक्षां घटना सर्वमान्य होत आहे या गोष्टीला अधिक महत्त्व दिलें असून त्याच दृष्टीनें लखनौ येथें सर्वपक्षीय परिषदेंत मंजूर झालेल्या स्वराज्यघटनेचें महत्त्व सर्वांनीं ओळखलें पाहिजे. हिंदुस्थानच्या भावी स्वराज्याची रूपरेखा या नात्यानें नेहरू कमिटीची परिषदेंत दुरुस्त झालेली ही योजना इतिहासांत चिरस्मरणीय झाल्यावांचून राहाणार नाहीं. सदर योजनेस चिकटून राहाण्याची जबाबदारी सर्वपक्षीय परिषदेंत सामील झालेल्या हिंदु–मुसलमान, पार्शी, शीख, नेमस्त, कॉंग्रेसभक्त

व स्वातंत्र्यवादी या सर्वांवर सारखीच असल्यामुळें तिला आपण अंतर देणार नाहीं असा बंधनकारक ठराव परिषदेंतील सभासदांनीं पास केला हें सावधगिरीच्या दृष्टीनें योग्य असेंच झालें.

नेहरू कमिटीच्या योजनेस बिलाचें स्वरूप देण्याचें कार्य आतां उरलें असून तें पूर्ण करण्याची जबाबदारी त्याच कमिटीकडे सोंपविण्यांत आली आहे. पण हें पुढील कार्य विशेष अवघड नाहीं व तें सायमन कमिशन हिंदुस्थानांत असतांच पुरेंहि होईल. त्या मानानें झालें हेंच काम अवघड होतें. हिंदुस्थानास स्वराज्य देण्याचें काम केवळ सर्वसंमत अशी स्वराज्याची योजना हिंदी लोकांपाशीं तयार नाहीं म्हणूनच नडलें होतें असें लॉर्ड बर्कनहेडप्रभृतींचें म्हणणें असेल तर ही पाहा स्वराज्याची एकमुखी योजना तयार आहे, आणि हिंदुस्थानास स्वराज्य मिळण्यास हिंदु-मुसलमानांतील दुही आड येत असेल तर ही पाहा हिंदु-मुसलमानांची एक विचारानें ठरविलेली संयुक्त योजना तयार आहे असें रोखठोक उत्तर देण्याला प्रस्तुत योजना हा प्रमाणभूत आधार उत्पन्न झाला यांत शंका नाहीं. स्वराज्याची ही योजना हिंदुमुसलमानांच्या संमतीनें सिद्ध झाल्यानंतर तिचें बल व प्रभाव सायमन कमिशनपुढें द्यावयाच्या साक्षीपेक्षां व सायमन कमिशनपुढें सादर करावयाच्या लेखी पुराव्यापेक्षां सहस्रपटींनीं अधिक परिणामकारक आहे हें आशाळभूत प्रांतिक कमिट्यांच्या व जातवार शिष्टमंडळांच्या लक्षांत आपोआपच येईल. नेहरू कमिटीच्या योजनेस पं. मालवीय यांनीं मोडकीतुडकी नौका म्हणून विनयानें संबोधलें खरें पण एकीचें चिलखत चढविलेली हीच नौका अनुकूल वारा व कुशल कर्णधार लाभल्यास स्वराज्याच्या पैलतीरावर हिंदी राष्ट्रास सुरक्षितपणें नेऊन सोडण्यास समर्थ होणार आहे हें विसरतां कामां नये.

---

## ८० देवगड तालुक्याचें गाऱ्हाणें

( ता. १ माहे जानेवारी सन १९२९ )

सारावाढीचें गाऱ्हाणें इलाख्याच्या बहुतेक भागांतून ऐकूं येतेंच. पण तें कोंकण भागांतून कानांवर आलें म्हणजे त्याकडे मनुष्याचें लक्ष विशेष वेधतें. याचें कारण कोंकणामध्यें दारिद्र्याचें दुःख वरघाटी मुलखापेक्षां अधिक प्रमाणांत असल्याचें सर्वांना माहीत असतें. जुन्या मराठी क्रमिक पुस्तकांतल्या एका

खड्यांत रामभटसखारामभटांच्या संवादांत खालील शब्द आलेले आहेत. "आमच्या भिकार कोंकणांत काय माती आहे!" पण जी माती आहे तीहि खडकाला इतकी चिकटून बसली आहे कीं, तिच्यांतून पीक काढतांना शेतकऱ्याच्या डोळ्यांतून टिपेंच येतात.

आधींच कोंकण भिकार. त्यांतहि रत्नागिरी जिल्हा व त्यांतहि देवगड तालुका. अशी कंगालपणाची चढती भांजणी लागते. कोंकणापैकीं ठाणें जिल्हा कांहीं डोंगराळ असला, तरी त्यांत भातशेती फार चांगली आहे. कुलाबा जिल्हाहि भातशेतीच्या दृष्टीनें सुपीक आहे. रत्नागिरी जिल्ह्याच्या उत्तरेचे कांहीं तालुके बरे आहेत; पण जसजसें खालीं जावें तसतशी कातळी जमिनीची समृद्धि! अगदीं खालीं गोमांतकांत गेलों तर तेथें नारळीपोफळीचें तरी उत्पन्न आहे. पण मध्यंतरीं राजापूर व देवगड हे दोन तालुके घेतले तर त्यांच्या भिकारीपणाला उपमा सांपडणेंच कठीण.

देवगड तालुक्याच्या दारिद्र्याची कल्पना येण्याला कांहीं गोष्टी सांगितल्या असतां बरें होईल. सुमारें पांचशें चौरस मैलांच्या या तालुक्यांत लोकसंख्या १ लक्ष ४५ हजार आहे. ११५ गांवांत मिळून शेती करण्यासारखी जमीन सवादोन लक्ष एकर. त्यांपैकीं वरकस जमीन दोन लक्ष एकर. भातशेतीची जमीन तीस हजार एकरांहून कमी व बागायती जमीन अवघी साडेसातशें एकर. चांगली वरकस जमीन देखील तीन ते पांच वर्षें, आणि सुमार जमीन दहा ते बारा वर्षें, पडीत टाकावी लागते. सर्व तालुक्यांत दुपिकी जमीन फक्त साडेतीन हजार असून पाटस्थळ, रहाटस्थळ जमीन फक्त साडेसातशें एकर आहे.

तालुक्यांतून बाहेर जाणारा माल सुमारें तीन लक्ष असून त्यांत धान्य मुळींच नाहीं. उलट तालुक्यांत येणारा माल सुमारें पंधरा–वीस लक्षांचा असून, त्यांत तांदुळाचे गोणच बारा–तेरा लक्ष रुपयांचे असतात. नारळ देखील दहा–बारा हजार रुपयांचे बाहेरून येतात. हल्लींचे मोठ्या चैनीचे पदार्थ म्हणजे चहा व साखर हीं दोनहि मिळून सुमारें साठ हजार रुपयांचीं येतात. बाकी सर्व पदार्थ अगदीं आवश्यक व नित्य जरूरीचे असेच येतात. अर्धी—अधिक लोकसंख्या कमींत कमी सात–आठ महिने मुंबईस किंवा इतरत्र बिनशेतीचे धंदे करून पोट भरून उलट बाहेरूनच घरीं चार पैसे पाठविते, तेव्हां कोठें शेतसारा भरतां येतो. शिवाय सातशें साडेसातशें पेन्शनर लोक तालुक्यांत येऊन राहिलेले असतात व त्यांना

साठपासष्ट हजार रुपये पेन्शन बाहेरून येतें. अशा रीतीनें लोकांची जीवनयात्रा कशी तरी चालते !

वरील माहितीवरून देवगड तालुक्यांत शेतीचें खास उत्पन्न किती येत असेल याची कल्पना सहजच होईल. पण यासंबंधानें आणखीहि गोष्ट सांगण्यासारखी आहे. सुमारें पांच हजार खातेदार घेतले तर त्यांतलीं पांच रुपयांच्या आंत शेतसारा देणारीं कुळें सवाचार हजार, पंधरा रुपयांच्या आंत देणारीं सवासहाशें, पंचवीस रुपयांच्या आंत देणारीं दीडशें, पन्नास रुपयांच्या आंत देणारीं शंभर, शंभर रुपयांच्या आंत देणारीं चाळीस व दोनशें रुपयांच्या आंत देणारीं कुळें सगळ्या तालुक्यांत अवघीं चार आहेत. जमिनीचे तुकडे फार लहान असले म्हणजे शेती फायदेशीर होऊं शकत नाहीं, हें सरकारहि मान्य करतें. आणि या तालुक्यांत कांहीं शेतीचे नंबर इतके लहान म्हणजे अरुंद आहेत कीं, त्यांत नांगर घातला तर दुसऱ्या नंबरांत अतिक्रमण केल्याशिवाय बैलाला मागें वळतां येत नाहीं !

अशा या तालुक्याची सर्व्हेसेटलमेंट १८९१ सालीं झाली. रत्नागिरी जिल्ह्याची सर्व्हे सन १८२२ सालीं सुरू झाली. पण ती पुरी होण्याला सत्तर वर्षें लागलीं व अगदीं शेवटीं पाळी आली ती देवगड तालुक्याची. याचें कारण कदाचित् असें असेल कीं, यांत बहुतेक सगळीं गांवें खोतीचीं आहेत. पण त्याचा दुष्परिणाम तालुक्याला भोगावा लागला. तो असा कीं, रत्नागिरी जिल्ह्यावर एकंदर जितका शेतसारा बसविण्याचें सरकारानें मनानें ठरविलें असावें, त्यांतला इतर तालुक्यांवर यथान्याय बसून जो उरला त्याचा सगळा बोजा एका देवगड तालुक्यावर पडला. या तालुक्यांतील गांवांची मामूल जमा सर्व्हे-सेटमलमेंटच्या पूर्वीं ८१९०६ रु. होती ती या पहिल्या सेटलमेंटमध्यें एकदम १४१३२९ रु. झाली. म्हणजे सुमारें साठ हजार रुपये चढ झाली.

आपल्या भयंकर कृत्यानें केव्हां केव्हां मनुष्य मागाहून स्वतःच भितो. त्याप्रमाणें सरकारलाच या चढीचें भय वाटून त्यांनीं ती पहिल्या दोन वर्षांत २५ टक्के, पुढच्या दोन वर्षांत ५० टक्के, पुढच्या दोन वर्षांत ७५ टक्के, व त्यानंतर सर्व शंभर टक्के वसूल करावे असें ठरविलें. अशा रीतीनें सरकारनें आपल्या मनाचें समाधान केलें. पण त्यानें मूळ अन्याय कसा झांकणार ! देवगड तालुक्यांतले बहुतेक गांव खोती असल्याकारणानें सारावाढीचा बोजा खोत लोकांना असह्य झाला. कारण

असें कीं, खोतांना कुळाकडून ठराविक मक्त्याहून अधिक वसूल करण्याला अधिकारी व न्यायकोर्टें आड येत; आणि जुने मक्ते व शेतसाऱ्याची रक्कम यांतलें अंतर नव्या सेटलमेंटच्या वाढाव्यानें निघून गेलें. तें इतकें कीं, खोतांना फायदा मुळींच उरेना, व कोठें कोठें तर कुळाकडून मिळावयाचें त्यापेक्षां खोतांना सरकाराला अधिक द्यावें लागूं लागलें.

यामुळें पुष्कळ खोतांनीं खोतींचे राजीनामे दिले. खोती गांव जप्तींत पडले, व सरकारी जप्तीदारांकडून त्यांची वहिवाट होऊं लागली. याचा पुष्कळ गवगवा झाला. यामुळें १९०२ सालीं सरकारनें वाढलेला शेतसारा सुमारें तीस हजारांनीं कमी केला. परंतु हें करतांना फक्त गटवारीचे दर कमी केले, जमिनीची प्रत बदलली नाहीं. जी प्रतवारी जमिनीला लावली होती ती तशीच राहिली. यामुळें मुळांतील दुःख न जातां वरवर केलेल्या उपायाप्रमाणें तात्पुरताच गुण आला. शिवाय कमी केलेली ही सारावाढ देखील खोताचें सर्व गाऱ्हाणें दूर होण्याइतकी कमी नव्हती. म्हणजे कुळांकडून जो मक्ता खोताला मिळावयाचा त्यापेक्षां खोतानें जो सारा सरकारला भरावयाचा त्याची रक्कम अधिक राहिली.

ही गोष्ट सरकारच्या नजरेला येऊन त्यांना ती अप्रत्यक्षरीतीनें कबूलहि करावी लागली. यामुळें फिरून एकवार सरकारला चौकशी करावी लागली व तींत असें निष्पन्न झालें कीं, खाऱ्या खाजण जमिनीची प्रतवारी सर्व्हे पार्टीच्या चुकीनें भलतीच लागली. वास्तविक गोड्या पाण्याची भातजमीन व खाडीकांठची बांध घालून तयार केलेली भातजमीन या दोहोंना एकाच वर्गांत कोणी केव्हांहि बसवूं शकत नाहीं. कारण गोडी जमीन आयतीच तयार असते. खाजणें तयार करावयाला फार पैसा व श्रम लागतात. शिवाय अनावृष्टि अतिवृष्टि हीं गडांतरें दोहों जमिनींना सारखीं असतां खाजणापुरतें एक वेगळें गडांतर असें कीं, अवसे-पूर्णिमेच्या जोड–गतीनें खाजणाचे बांध फुटून खारें पाणी खाजणांत भरतें व असें झालें म्हणजे ती जमीन त्या वर्षींच काय पण पुढेंहि बराच काळ भातशेतीला नालायक होते.

अखेर १९१४ सालीं सरकारनें आपली चूक कबूल केली पण फक्त खाजण जमिनीचा सारा थोडा कमी केला. परंतु एक तर हा फायदा सर्व खाजण जमिनींनाहि मिळाला नाहीं. इतकेंच नव्हे तर खोतांची जुनी तक्रार कांहीं अंशांनीं

तरी कायमच राहिली. म्हणजे खोताला मिळणारा मक्ता व त्यानें द्यावयाचा सरकारदस्त यांचा मेळ पडला नाहींच !

१९०२ सालीं प्रत वर्ग २ ते ५ यांतील साऱ्याचे दर कमी करून आणि १९०५ सालीं खोती ॲक्टाच्या दुरुस्तीनें खोताला २५ टक्केपर्यंत खोतफायद्याची हमी देऊन सरकारनें खोतांचें दुःख कमी केलें. पण रयतेचें शिल्लकच राहिलें. कारण वरील दोनहि गोष्टींनीं प्रत वर्ग १ मध्यें चुकून घातल्या गेलेल्या जमिनींना कांहींच फायदा मिळाला नाहीं. म्हणून रयतेचें आजचें मागणें असें कीं, फिरून एकवार देवगड तालुक्यांतील शेतजमिनींची प्रतबंदी व्हावी.

यावर सरकारतर्फे कदाचित् असें म्हणण्यांत येईल कीं, लँड रे. कोड कलम १०६ प्रमाणें नव्या तरमबंदीमध्यें जमिनीच्या मोजणीप्रमाणें नवी प्रतबंदीहि करण्याची नसते. रयतेलाहि हें कलम माहीत नाहीं असें नाहीं. पण तिची तक्रार अशी कीं, मूळ प्रतबंदींत चूक झाली ही गोष्ट स्वतः सरकारनें कबूल केली आहे. आणि असली चूक ज्या एकाच मार्गानें दुरुस्त होऊं शकेल त्याच मार्गानें ती दुरुस्त केली पाहिजे. जेथें प्रतबंदीबद्दल तक्रार नाहीं, फक्त दराची तक्रार आहे, अशा ठिकाणीं प्रतबंदी पुनः करण्याचें कारण नाहीं हें खरें. पण १०६ कलम झालें तरी तें चुकीनें झालेल्या प्रतबंदीच्या दुरुस्तीच्या आड येऊं शकणार नाहीं. अन्याय दूर करण्याकरितां केलेली फेरप्रतबंदी कलम १०६ यानें बेकायदेशीर होत नाहीं. सामान्यतः ती करूं नये हें खरें, पण विशेष कारणाकरितां ती केलीच पाहिजे. देवगड तालुक्यावर सारावाढीचा जुलूम झाला आहे. ही गोष्ट लगतच्या राजापूर–संगमेश्वर या तालुक्यांचें उदाहरण घेऊन तुलनेच्या प्रत्यंतरानेंहि अनेक रीतीनें शाबीत करतां येईल. परंतु इतक्या खोल पाण्यांत शिरण्याचें कारण नाहीं. कारण केवळ देवगड तालुक्यापुरतें बोलूनहि हा जुलूम सिद्ध करतां येणार आहे.

सेटलमेंट ऑफिसर श्री. वैद्य यांनीं सारावाढीचें समर्थन करतांना, तालुक्यांत जमिनीला खंड किती येतात यावर व तालुक्याच्या सर्वसामान्य भरभराटीवर सारावाढ बसविली आहे. परंतु शेतीपासून शेतकऱ्याला खर्च वजा जातां निवळ फायदा किती राहतो याचा विचार एका शब्दानेंहि केलेला नाहीं. शेतसारा हा शेतकऱ्याच्या ऐन नफ्यांतील कांहीं हिस्सा अशी जर उपपत्ति मानली तर आधीं देवगड तालुक्यांतील शेतकऱ्याला शेतीचा नफा काय होतो हें कोठें तरी कोणीं तरी ठरविलें पाहिजे. दुसरे पक्षीं सर्वसाधारण भरभराटीच्या गप्पा मारणें हें

कोणाहि सेंटलमेंट आफिसराच्या शहाणपणाला शोभत नाहीं. कारण या भरभराटीचा व शेतसाऱ्याचा अर्थाअर्थी संबंध काय !

या मुद्द्यावर स्वतः सेटलमेंट ऑफिसर यांनींच आपल्या रिपोर्टांत खालील उद्गार काढले आहेत. " तालुक्याची भरभराट झाली आहे खरी. पण ती शेतीच्या फायद्यामुळें नव्हे, तर मजुरांचे दर वाढले व बाहेरून पेन्शनचा पैसा तालुक्यांत येतो यामुळें. " १९२० सालीं पोस्टल मनिऑर्डरींनीं ८ लक्ष रु. तालुक्यांत बाहेरून आले. आणि धान्याचे दर वाढल्यानें शेतकऱ्याला फायदा झाला म्हणावा तर तेंहि नाहीं. कारण स्वतःच्या पोटाला खाऊन शेतकऱ्याचें धान्य उरेल व तें तो विकील तेव्हांच किंमती वाढण्याचा त्याला फायदा. जें धान्य शेतकऱ्याला खावेंच लागतें, विकतां येत नाहीं; त्याची बाजारांत किंमत वाढली न वाढली त्याला दोनही सारखींच. देवगड तालुक्यांत पुरून उरून विकण्याइतकें धान्य पिकत नाहीं कारण निम्मी वस्ती आठ महिने तालुक्याबाहेर राहात असतांहि बारा लाख रुपयांचे तांदुळाचे गोण दरसाल तालुक्यांत बाहेरून येतात ! इतकें सांगिल्यावर या तालुक्यांत शेतसाऱ्याची वाढ ३३ टक्के नाहीं, २५ टक्के नाहीं पण पांच टक्के तरी कशी करतां येईल हें सरकार सांगेल काय ?

---

## ८१ थोडें देत नाहीं म्हणूनच सर्व द्या !

( केसरी, जानेवारी १९२९ )

राष्ट्रीय सभा व निरनिराळ्या इतर पक्षांच्या परिषदा यांचें कार्य नाताळांत संपलें. आतां नव्या वर्षाच्या प्रारंभीं सरकार आपलें कार्य ठरविणार; पण सरकारचें कार्य काय हें प्रायः ठरलेलेंच असतें. विधायक विचाराची गरज लोकांना. आपणाजवळ नाहीं असें कांहीं त्यांना सरकारजवळ नवें मागावयाचें असतें. म्हणून काय मागावें, कोणतें मागावें, कसें मागावें, केव्हां मागावें, व न दिलें तर काय करावें या गोष्टीचा विचार व खल त्यांना करावा लागतो. मग ते आपल्या जातींचें हित संभाळून स्वराज्य मागणारे मुसलमान असोत, किंवा साम्राज्याचा आश्रय राखून व सरकाराची थोडीफार मोहबत ठेवून स्वराज्य मागणारे नेमस्त असोत, किंवा सरकाराची मोहबत न ठेवतां पण साम्राज्य संभाळून स्वराज्य मागणाऱ्या बेझंटबाई असोत, किंवा नोकरशाहीबरोबर, जरूर तर इंद्राय तक्षकाय

स्वाहा या न्यायानें, साम्राज्याची आहुति देण्यास तयार होऊन स्वराज्य मागणारे गांधी-नेहरू असोत, किंवा नोकरशाही हें नुसतें रोगलक्षण आणि खरा रोग म्हणजे साम्राज्य असें वाटल्यामुळें, इंग्लंडाशीं संबंध तोडल्यावांचून खरें स्वराज्यच नाहीं म्हणून केवळ स्वातंत्र्याची घोषणा करणारे जवाहरलाल-सुभाष बोस असोत. यांपैकीं कोणीहि घेतले तरी त्यांना विधायक व खोल विचार करावा लागणारच.

पण आमच्या सरकाराला ही अडचण कांहींच नाहीं. जें काय हवें तें त्याच्या-जवळ आहेच. तें किंवा त्यांतला कांहीं अंशहि जो मागेल त्याला नाहीं म्हणाव-याचें कसें, व हा नकार पार पाडण्याला शक्तीचा कोणता प्रकार योजावयाचा, इतकाच विचार त्यांना करावयाचा असतो. कित्येकांना वाटतें कीं, सरकारनें सायमन कमिशन नेमलें यांत त्याची विधायक बुद्धि दिसून येते. पण आम्हाला तसें वाटत नाहीं. हिंदुस्थानच्या लोकांना जर स्वराज्य द्यावयाचें त्यांच्या मनांत खरोखर असतें, तर त्यांनीं तसें स्पष्ट व स्वच्छ म्हटलें असतें, त्याचा क्रम त्यांनींच ठरवून टाकला असता, किंवा तो क्रम ठरविण्याकरितां त्यांनीं लोकांना बरो-बरीच्या नात्यानें आपल्याशीं बसून बोलावयाला निमंत्रण केलें असतें.

पण यांपैकीं कांहींएक न करतां सरकारनें टोलवाटोलवीचाच सर्व खेळ चाल-विला आहे. प्रथम स्वराज्याचा जाहिरनामा म्हणून काढला. पण त्यांत स्वरा-ज्याचा कोणता प्रकार हें निश्चित सांगितलें नाहीं. "आशां कालवतीं कुर्यात् कालं विघ्नेन योजयेत्" या कपटनीतीचा अवलंब करून, काय देणार, केव्हां देणार व कसें देणार या सर्वांविषयीं सर्वाधिकार आपल्याच हातीं ठेवला. आणि आज सायमन कमिशन हें पुढें पाऊल कसें टाकावें याच्या चौकशीला म्हणून जरी बाह्यतः पाठविलें आहे, तरी कदाचित् 'काय देऊं' हें सांगण्यापेक्षां 'निश्चयात्मक काय देणार नाहीं' हें बिनबोलतां जाहीर करण्याचाच सरकारचा उद्देश असेल. कमिशनवर भलतेच लोक नेमले, भलतेच साक्षीदार त्यांच्यापुढें जातील असें केलें, लोकसत्तेच्या प्रगतीचा मुख्य प्रश्न बाजूला पाडून या प्रगतीला प्रतिकूल दिसणाऱ्या तेवढ्याच गोष्टी पुढें आणविल्या, आणि स्वार्थी भुतावळ उठवून तिच्या हातीं कोलत्या देऊन एकमेकांचीं अंगें भाजविलीं, हीच काय ती सरकारची विधायक कामगिरी !

पण आणखी एक विधायक कामगिरी सरकारची अजून उरलीच आहे. ती म्हटली म्हणजे दडपशाहीची ! या कामगिरीचा विचार सरकार जोरानें करीत

असल्याची वदंता आहे. गतवर्षी मद्रासच्या राष्ट्रीय सभेंत स्वातंत्र्य हें राष्ट्राचें ध्येय असल्याचा ठराव झाला होता तरी तेथें पुढारी लोकांत फूट पडलेली फारशी दिसून आली नाहीं. गेल्या बारा महिन्यांत या ध्येयापेक्षां नेहरू कमिटी व सर्वपक्षीय परिषद् यांचाच पुकारा अधिक झाल्यानें स्वातंत्र्यवादी लोकांना "आपल्या मुख्य ध्येयावर आवरण पडलें, तें लोकांच्या दृष्टीआड झालें, स्वराज्य–योजनेनें साम्राज्य व भांडवलशाही यांना अधिक महत्त्व आलें," असें वाटून स्वातंत्र्यवादी पुढाऱ्यांनीं कलकत्त्यास अधिक जोर केला, यामुळें कलकत्त्यास ती फूट अधिक दिसली. मद्रासेस स्वातंत्र्याच्या ध्येयाचा उल्लेख झाला होता तरी त्याबरोबर सर्वपक्षीय परिषद् नेमली गेली. आणि वर्गामध्यें सर्वांत मंदगति-मंदबुद्धि असा जो मुलगा असतो त्याच्याच पावलानें सगळ्या वर्गाचा अभ्यास चालतो हा पंतोजीपणांतील सिद्धान्त माहीत असल्यामुळें, सरकारला अशी आशा सहजच वाटली कीं, देशांतील त्यांतल्या त्यांत कमी धीट, कमी तेजस्वी, कमी स्वार्थत्यागी अशा लोकांच्या धिम्या विचारांच्या शृंखला परिषदेच्या पायांत पडून स्वातंत्र्याचें पाऊल जड होईल. पण कलकत्त्यास सरकारची ती आशा निष्फळ ठरली ! म्हणून आतां दडपशाहीचा विचार सरकार जारीनें करूं लागलें आहे.

पण सरकारला हें माहीत नाहीं कीं, एका दृष्टीनें गेल्या बारा महिन्यांच्या कालगतीनें ज्याप्रमाणें नेहरूंच्या वसाहती स्वराज्याला महत्त्व चढलें, त्याचप्रमाणें दुसऱ्या एका दृष्टीनें स्वातंत्र्याच्या कल्पनेलाहि महत्त्व चढलें आहे. आणि आतां स्वातंत्र्याच्या कल्पनेला जर थोडेसें विरजण पडणें शक्य असेल तर तें दडपशाहीचा हल्ला चढवून होणार नाहीं तर नेहरू कमिटीनें आंखलेल्या स्वराज्य योजनेचा अंगिकार करूनच होईल. मद्रासेस गांधींनीं राष्ट्रीय सभेंत विशेष लक्ष घातलें नाहीं. आणि मोतिलाल नेहरूंनींहि सर्वपक्षीय परिषद् नेमण्याचा ठराव मंजूर करवून घेण्यापलीकडे फारसें लक्ष घातलें नाहीं. आजहि या दोघांनीं स्वातंत्र्यापेक्षां स्वराज्ययोजनेलाच अधिक महत्त्व दिलें आहे हें खरें. म्हणजे सरकारच्या दृष्टीनें स्वातंत्र्यापेक्षां कमी मागणी करण्यांत जर कांहीं गुण असला तर तो गांधी व नेहरू या दोघांनींहि दाखविला आहे हें खरें. पण कल्पना करा कीं, या कमी दर्जाच्या मागणीलाहि सरकारनें अवमानिलें, तर मग गांधी व नेहरू यांनाहि स्वातंत्र्याच्या मागणीशिवाय गत्यंतर काय उरेल ?

कोणाला असें वाटेल कीं, "थोडें मागितलें असतांहि तें दिलें नाहीं हें कारण

लावून पूर्वीच्याहून अधिक मागणें हें शहाणपणाचें कसें होईल ! पूर्वी थोडें मागितलें आणि तें न मिळालें तर दुसऱ्यांदा मागणी करतांना पूर्वीच्याहून आणखी थोडें कमीच मागावें !" ही विचारसरणी चुकीची आहे. बाजारी व्यवहारांत कदाचित् ती लागू पडेल. पण कर्जवसुलींत ती लागू पडत नाहीं. आम्ही सरकाराजवळ स्वराज्य मागतों तें कांहीं बाजारी सौद्याच्या अर्थानें नव्हे, तर सरकाराकडे तें आमचें कर्ज असून त्यांच्याकडून वसूल करावयाचें आहे म्हणून. इंग्रज जेव्हां असें म्हणतात कीं, "आम्ही हिंदी राष्ट्राचे राखणदार आहों" तेव्हांहि अर्थ असाच निघतो कीं, आमच्या स्वराज्याची म्हणून कांहीं एक मिळकत सरकाराकडे ठेव म्हणून आहे, ती आमची आम्हांला परत मिळालीच पाहिजे.

कर्जवसुलींत काय घडतें तें पाहा. परस्पर सहकारी (को-ऑपरेटिव्ह) म्हणविणाऱ्या सोसायट्यांच्या व्यवहारांतहि बँकेच्या कर्जाचा हप्ता ऋणको सोसायटीनें चुकविला, योग्य वेळीं दिला नाहीं, तर लगेच जादा (पीनल) व्याज शिक्षेदाखल मागण्याचा हक्क धनको बँकेला येतो. सहकारी सोसायट्या सोडून साध्या सावकारी व्यवहारांत तर अर्थातच असें घडतें. ऋणको गरीब शेतकऱ्याला 'संरक्षणाचा कायदा' लागू असतांहि कुळानें वेळेवर हप्ते दिले नाहींत, तर सर्व देणें एकदम वसूल करून घेण्याचा हक्क सावकाराला येतो व मग हप्तेबंदी थांबते आणि हा विशेष कायदा जेथें लागू नाहीं तेथें तर काय बोलावयासच नको. तेथें आधीं हप्तेबंदीच मिळत नाहीं. आणि मिळाली तरी हप्ता चुकल्याबरोबर सर्व देणें एकदम वसूल करतां येतें ! "ज्याला थोडें देववत नाहीं, त्याजकडून सगळें वसूल करावें" हा न्याय उलट दिसतो. पण अखेर तोच खरोखर सुलटा आहे. देवविणें किती वाजवी व किती गैरवाजवी हें केवळ ऋणकोच्या पात्रतेवरून ठरत नाहीं तर तें त्याच्या इतर वर्तणुकीवरूनहि ठरतें. म्हणूनच प्रथम हुकूमनाम्याच्या वेळीं जरी हप्तेबंदी योग्य वाटली असली, तरी पुढें ऋणकोचा नाठाळपणा दिसतांच हप्तेबंदीची सवलत रद्द होते. आणि ऋण न फेडल्यानें स्वाभाविक जे परिणाम व्हावयाचे ते होतात.

वरील महत्त्वाचें तत्त्व इतर रीतीनें पटवितां येण्यासारखें आहे. आणि त्याकरितां आपण रोमन कथावलींतला एक दाखला घेऊं. सिबिल नांवाची एक भविष्यवादी वृद्ध स्त्री होती. तिच्या संग्रहीं नऊ ग्रंथ होते. त्यांत रोमच्या भविष्याचा सर्व वृत्तान्त लिहिलेला होता. आपल्या देशाचा राजा टार्किन याला ते

विकावे म्हणून ती हे ग्रंथ घेऊन दरबारांत गेली. परंतु मिजासखोर राजे लोकांना-ऐश्वर्यमदानें उन्मत्त झालेल्या राजे लोकांना—भविष्याची काय पर्वा ! म्हणून राजा म्हणाला "तुझे ग्रंथ कवडी किंमतीचेहि नाहींत म्हणून मी ते विकत घेत नाहीं." भविष्यवादीण बरें आहे म्हणून माघारी गेली, पण राजाला शहाणपण शिकण्याला पुनः एक संधि द्यावी म्हणून परत आली. तथापि या वेळीं तिच्याजवळ फक्त आठच पुस्तकें उरलीं होतीं.

ही दिव्य स्त्री परत आपणाकडे आली म्हणून थोडेसें कौतुक वाटून राजानें ग्रंथ विकत मागितले. उरलेल्या आठ ग्रंथांची किंमत तिनें सांगितली. ती राजाला भारी वाटून त्यानें तिला जा म्हणून सांगितलें. पण फिरून राजाला संधि देण्याकरितां सिबिल परत आली. त्या वेळीं तिच्या जवळ फक्त सातच ग्रंथ उरले. पण राजानें त्यांची किंमत विचारतां तिनें पूर्वींच्या आठ ग्रंथांपेक्षांहि ती अधिक आहे असें सांगितलें. अशा क्रमानें दरखेपेस सिबिलजवळ राजाला देण्याचा एक ग्रंथ कमी व्हावा, पण त्याबरोबरच उलट उरलेल्या ग्रंथाच्या किंमतीची तिची मागणी वाढावी असा उलटा न्याय सुरू झाला. अखेरच्या सिबिलच्या भेटींत तिच्याजवळ एकच ग्रंथ शिल्लक उरला, पण त्याची किंमत इतर आठ ग्रंथांच्या किंमतीसकट सगळी व त्याच्याहूनहि कांहीं अधिक अशी तिनें मागितली !

यापुढें नक्की काय झालें तें पुराणांत लिहिलेलें नाहीं. कोणी म्हणतात, "राजानें वेळींच उमजून, अजून तरी जो एक ग्रंथ शिल्लक उरला तो आपल्याला लाभावा म्हणून, सिबिलनें मागितलेली भारी किंमत देऊन विकत घेतला व त्यामुळें त्याचें पुष्कळ हित झालें." पण याच उरलेल्या गोष्टीचा दुसरा एक वृत्तान्त असा आहे कीं, "किंमतीची मागणी भारी म्हणून राजानें ती नाकारली, व तोहि ग्रंथ त्याच्या हातचा गेला. अशा रीतीनें भवितव्यतेचें ज्ञान होऊन तें हातीं ठेवण्याची संधि सिबिलनें पुनः पुनः देऊं केली असतां त्या विचारमूढ राजानें तिचा अव्हेर केला पण त्यामुळें तो शेवटीं नाश पावला. इंग्रज सरकारांसंबंधानेंहि या दोन वृत्तान्तांपैकीं कोणतें अखेर घडणार हें कोणीं सांगावें ? पण योग्य मागणी देण्याला जितका अन्यायानें विलंब होतो, तितक्या प्रमाणानें पुढील मागणी भारी व जड होते हा बोध तरी सरकार घेईल अशी आम्हाला आशा आहे.

गेल्या ४०–५० वर्षांचा हिंदुस्थानच्या राजकारणाचा इतिहास, व त्यानंतर राष्ट्रीय सभेच्या द्वारें घडलेला संघटित राजकारणाचा इतिहास, जो कोणी नीट

लक्षांत घेईल त्याच्या ध्यानांत वरील सिम्बिलच्या गोष्टींचें मर्म तेव्हांच येईल. आणि क्षुल्लक मागण्या जाऊन त्यांच्या जागीं उत्तरोत्तर चढत्या मागण्या कशा येत गेल्या, व अखेर जबाबदारीचें स्वराज्य किंबहुना स्वातंत्र्य येथपर्यंत मजल येऊन कशी ठेपली, हेंहि त्याला समजून येईल. अशा रीतीनें स्वातंत्र्य हें जरी निसर्गतः न्याय्य असलें तरी प्रजेनें पुनः पुनः स्वराज्याची मागणी करावी, सरकारनें तिला नाहीं म्हणावें, या मार्गानें स्वातंत्र्य हें क्रमप्राप्त कसें होऊन बसलें हें सरकारलाहि कळून येईल. म्हणून आपल्याच दोषानें क्रमप्राप्त व अपरिहार्य करून ठेवलेल्या या मागणीवर सरकारनें रागावण्यापासून किंवा तर मागणाऱ्यांवर दडपशाहीचें अस्त्र सोडण्यापासून कांहींएक निष्पन्न होणार नाहीं हें त्यांनीं ध्यानांत ठेवावें.

हिंदुस्थानांतील राष्ट्रीय राजकारणी समाज हा इतका संघटित व एकजीव झाला आहे व हळूहळू एकजिनसीहि बनत चालला आहे कीं, शरीराच्या नखाला किंवा केंसाला धक्का लागला असतां मेंदूशीं त्याची संवेदना जाऊन भिडते, त्याप्रमाणें जहालमत किंवा क्रांतिकारक अशा नांवानें उल्लेखिलेल्या पुढाऱ्यांवर सरकारनें अविचारानें हात टाकला, तर त्याची तिडीक नेमस्तांतल्या नेमस्त पुढाऱ्यांच्याहि डोक्यांत भरल्याशिवाय राहणार नाहीं. फोडून झोडण्याचे दिवस पूर्वीं एक वेळ होते ते आतां संपले. नेमस्त व मवाळ यांना मेंढ्यासारखे निरुपद्रवी व निर्बुद्ध समजून; त्यांना नुसत्या तोंडच्या गोड हाकांनीं वळवून आपल्याकडे आणण्याचें लॉर्ड मोर्ले यांचें प्रसिद्ध धोरण आतां व्यर्थ आहे. कारण नेमस्त व मवाळ हेहि कंठरवानें सरकाराला स्वराज्य द्या असेंच सांगूं लागले आहेत. आणि पूर्वीं एकदां 'स्वराज्य' हा शब्द तोंडानें काढणें हें राजद्रोहकारक मानून सरकारनें दडपशाही केली असतां, तेंच स्वराज्य हिंदुस्थानांतील खेडवळापासून तों विलायतेंत बादशहापर्यंत सर्वांच्या तोंडांत जसें अखंड बसलें, त्याचप्रमाणें 'स्वातंत्र्या'च्या शब्दाची व कल्पनेचीहि स्थिति उद्यां होईल. मेखेच्या डोक्यावर मेखसू मारला असतां एखादी मेख फुटून निकामी होऊं शकेल. परंतु सामान्यतः मेखा अशा खंबीर असतात कीं, मेखसूच्या दरएक टोल्यागणिक त्या जमिनींत शिरून अधिक दृढमूल होतात. स्वातंत्र्याच्या कल्पनेची ही मेख जर हिंदी राष्ट्राच्या मनोभूमींत अधिक खोल शिरावी व घट्ट बसावी अशी सरकारची इच्छा असेल तर त्यांनीं खुशाल दडपशाही सुरू करावी; तिचे आघात सोसण्याला सर्व राजकारणी समाज सिद्ध आहे. आणि सरकारच्या पापाचे घडेच भरले असतील तर तशी विपरीत बुद्धि त्यांना कां न होईल !

# ८२ वऱ्हाड प्रांतिक परिषद्, यवतमाळ

(केसरी, ता. १६ एप्रिल १९२९)

आपल्या परतंत्रतेचे हजारों प्रकार बनले आहेत. यांतून सुटका कशी होणार ? कोणत्याहि बाजूनें गेलों तरी याच मुद्द्याशीं येऊन गांठ पडते. म्हणून या प्रांतिक परिषदेच्या प्रसंगीं याच विषयाचा थोडासा विचार करूं. या अनेकविध परदास्यांतून आज प्रत्यक्ष सुटका नाहीं. फक्त मनानें सुटकेची कल्पना करतां येईल. आजचें हें दास्य फांशीच्या शिक्षेसारखें असतें तर प्रश्नच नव्हता. पण तें जन्मठेप काळ्यापाण्यासारखें आहे. जन्मठेपीची मुदत २० वर्षें मानितात. पण हिंदुस्थानाच्या दास्याची मुदत कोण ठरविणार ? मुदतीची शिक्षा झाली असली तर बंदिवानाला निदान दिवस तरी मोजीत बसतां येतें व मुदत भरली म्हणजे सोडा म्हणून हक्कानें भांडतां येतें. पण हिंदुस्थानाला परतंत्रतेची शिक्षा झाली तेव्हां तिची मुदत म्हणून ठरविलेलीच नव्हती ! अर्थात् ही मुदत आपणच वाढवूं तितकी वाढणारी व आंखडूं तितकी आंखडणारी आहे. पण आज केवळ कल्पनेवर निर्वाह करणें प्राप्त आहे.

हिंदुस्थानची बंधमुक्तता होण्याच्या कल्पना तीन प्रकारें करतां येतात. ( १ ) आधिदैविक ( २ ) अध्यात्मिक व ( ३ ) आधिभौतिक. या तीनहि प्रकारच्या कल्पना करणारे लोक आढळतात. पण त्यांची संख्या सारखी नसते. आधिदैविक कल्पनेंत रंगणारे लोक थोडे असतात. अगदीं नाहींत असें नाहीं. त्यांना विचारलें असतां तेहि कांहीं मुदत सांगत नाहींत. फक्त ईश्वराच्या मनांत असेल तेव्हां सुटका होईल असें सांगतात. व ईश्वरी कृपा होण्याला जें साधन करावें लागतें, तें तुम्ही करीत नाहीं, भलत्याच दिशेनें जातां असें बोलूं लागतात. राजकीय चळवळीला ईश्वराचें अधिष्ठान नाहीं, हा त्यांचा मुख्य आक्षेप. कदाचित् त्यांची कल्पना अशी असेल कीं, पुराणांतल्या कथेप्रमाणें हिंदुस्थानांत झालेल्या प्रत्येक अवताराच्या पूर्वीं, पृथ्वी गाईचें रूप घेऊन ब्रह्मदेवाला शरण गेली. तेव्हां त्यानें तिची दाद विष्णूपाशीं लावली. विष्णूनें अवतार घेण्याचें वचन दिलें. दुष्टांचें निर्दालन केलें व पृथ्वीची मुक्तता केली. हिंदुस्थानाची सुटका अशीच एकाद्या अवतारानें व्हावयाची नसेल कशावरून ?

## आधिदैविक उपाय

किंवा या आधिदैविक कल्पनेचें दुसरें एक उदाहरण घेऊं. असें समजा कीं, एक दिवस सकाळीं भूकंप होऊन सबंध इंग्लंडच्या इंग्लंड समुद्राच्या तळाशीं बुडालें. असें झालें म्हणजे हिंदुस्थान आपोआपच स्वतंत्र होईल. द्वेष किंवा निराशा किंवा तळमळ किंवा तळतळाट अगदीं टोंकाला जाऊन पोंचला, म्हणजे असले इच्छाजन्य चमत्कार सहजच कल्पनेला सुचतात. पण असल्या आधिदैविक कल्पना व्यवहार्य वाटत नाहींत व म्हणून मनाला पटत नाहीं. अशा कल्पना न पटण्याचें कारण नास्तिकपणा हें नव्हे पण आस्तिकबुद्धीच्या मनुष्यालाहि त्या पटत नाहींत. कारण ईश्वर आहे तो सगळें कांहीं करतो, घडवून आणतो, अशी भावना असली तरी त्याचें कर्तृत्व जगांत कसें घडतें, प्रत्ययाला येतें, याच्या रीति पुष्कळशा ठराविक आहेत. त्याच्या कर्तृत्वाला सृष्टिनियमांच्या परिस्थितीचें बंधन घालूनच त्याच्या कर्तव्याची कल्पना आपणाला करतां येईल. मी असें म्हणत नाहीं कीं हिंदुस्थानाला स्वातंत्र्य मिळावयाचें तर तें ईश्वराच्या इच्छेविरुद्ध किंवा त्याच्या कृपेशिवाय मिळेल. पण ही गोष्ट गृहीत धरली तरी वरील प्रकारच्या आधिदैविक कल्पना मनाला करवत नाहींत व पटत नाहींत.

राजकारणाच्या चळवळीला भगवंताचें अधिष्ठान पाहिजे हें खरें. म्हणून तोहि मार्ग अनुसरावा हेंहि कबूल. पण कोणा एकाला सगळ्याच गोष्टी करतां येत नाहींत किंवा श्रमविभागाच्या तत्त्वानुसार सगळ्याच गोष्टी एकट्यानें करणें इष्ट नसतें. म्हणून स्वातंत्र्य मिळविण्याचीं कामें ज्यानें त्यानें आपल्या इच्छेप्रमाणें व शक्तीप्रमाणें वांटून घेतलीं पाहिजेत. हिंदुस्थानांत साधुसंत, पूज्य पुरुष, योगी नाहींत असें नाहीं, पुष्कळ आहेत. त्यांपैकीं पुष्कळांना राष्ट्रीय दृष्टिहि आहे व ते आपल्या पुण्याईचा अंश राष्ट्राला मोक्ष मिळण्याकडे खर्च करण्यास तयारहि असतात. दरबारांत ज्याप्रमाणें धर्मगुरूला पहिली खुर्ची देण्यांत येते त्याप्रमाणें राष्ट्रीय दृष्टीच्या धार्मिक सत्पुरुषांना आपण अग्रस्थान देऊं व त्यांचा आशीर्वाद घेत जाऊं. हिंदुस्थान स्वतंत्र होण्याची कल्पना करावयाची तर वर सांगितलेल्या दैविक प्रकारांनीं मात्र करवत नाहीं. म्हणजे उद्यां हिंदुस्थानापुरता ईश्वरी अवतार होऊन तो इंग्रजांना घालवून देईल किंवा भूकंप होऊन इंग्लंड

म्हणजे समुद्रांतच सोडलें. या गोष्टींतलें तात्पर्य हेंच कीं, सरकार आधींच थोडीं साधनें उपलब्ध करून देतें. पण तींहि जर आपण पूर्णपणें उपयोगांत आणलीं नाहींत तर सरकाराप्रमाणें आपणहि दोषाचे अंशभागी होतों.

ही स्थिति परतवावी व दोष निघून जावा अशी इच्छा असेल तर लोकांचें लक्ष त्याकडे वळविलें पाहिजे. लष्करांत फौजेंत आपले लोक जावे असें असेल तर, फौजी लष्करी अधिकाऱ्यांना जे गुण लागतात ते आपल्या तरुण मुलांच्या अंगीं यावे हें ओघानेंच प्राप्त होतें. व त्याची पहिली पायरी म्हटली म्हणजे विद्यार्थीदशेंतच मुलें सुदृढ, साहसप्रिय, कष्ट सोसण्याला तयार व धैर्यशील अशीं झालीं पाहिजेत. वरिष्ठ लष्करी शिक्षणाला १८ व्या वर्षांपासून प्रारंभ होतो, त्यापुढें होत नाहीं. असें असल्यामुळें त्याखालच्या वयांत १२ वर्षांपासूनच मुलें लष्करी बाण्याचीं तयार झालीं पाहिजेत. अर्थात् तीं शाळा व कॉलेजें यांतूनच होणार. आणि या स्थितींत जरी प्रत्यक्ष लष्करी यांत्रिक शिक्षण नसलें तरी तें शिक्षण पुढें घेण्याला लागणारी तयारी आधीं झाली पाहिजे. ही तयारी होण्याला त्याकरितां वेगळ्या शाळा काढणें हा जसा एक मार्ग, तसा विद्यमान शाळांतून प्रास्ताविक शिक्षण देणें हा दुसराहि एक मार्ग असतो. त्या दृष्टीनें हल्लीं बॉय-स्काऊट, युनिव्हर्सिटी ट्रेनिंग कोर, टेरिटोरियल फोर्स इत्यादि रीतीनें अल्प प्रमाणांत उपक्रम सुरू आहे, व त्याच दृष्टीनें आणखीहि नवे उपक्रम झाले पाहिजेत. म्हणजे विद्यार्थ्यांना, व्यायाम, मर्दानी खेळ, साधी कवाईत हीं तर शिकविलीं पाहिजेतच, परंतु बंदुकी वापरणें, निशाणबाजी शिकविणें, असाहि उपक्रम झाला पाहिजे. म्हणजे खासगी रीतीनें रायफल क्लब काढण्यापर्यंत मजल गेली पाहिजे. हत्यारांचा कायदा अमलांत असला तरी रायफल क्लबासारख्या संस्था सरकारी परवानगीनें निघूं शकतात; व तेथपर्यंत तरी आपण मजल न्यावी असा डॉ. मुंजे यांचा उपदेश व उद्योग सुरू आहे. व मध्यप्रांतांत त्यांनीं तो यशस्वी करून दाखविला आहे. इतर प्रांतांतून त्याचें अनुकरण केव्हां होणार ?

## लेखांक २

( केसरी, ता. २७ डिसेंबर १९२९ )

हिंदुस्थानचें संरक्षण परशत्रूंपासून करावयाचें तर तें कोणीं करावें ? हिंदुस्थानच्या राष्ट्रीय सैन्यानें कीं परक्या भाडोत्री सैन्यानें ? हिंदुस्थानांत सैन्य

आहे, पण त्याला राष्ट्रीय स्वरूप मुळींच नाहीं. काळी खडी फौज आहे तिजमध्यें ज्या देशी लोकांचा समावेश झालेला आहे त्यांना राष्ट्रीय बुद्धि नाहीं ! इमानदारी म्हणजे भाकरीकरितां जी नोकरी करावयाची ती नीट करावी इतकाच फार तर तिजमध्यें आज गुण आहे. तिला राष्ट्रीय बुद्धीचा स्पर्श होऊं नये अशी खबरदारी सरकारकडून हरप्रयत्नानें घेतली जाते. या सैन्यांतील फार थोड्या लोकांचा जुन्या हिंदुस्थानाच्या उज्ज्वळ इतिहासाशीं धागा पोंचतो. ज्या कोणाचा तो पोंचत असेल तोहि आतां जवळ जवळ विस्मरणानें व नव्या जिव्हाळ्यानें तुटलेला आहे. हिंदी काळ्या फौजेंतील दुसरा घटक म्हटला म्हणजे हिंदुस्थानच्या सरहद्दीपलीकडील शिपायांचा. या शिपायांची कुळकथा पाहिली तर ती अशी दिसून येते कीं, त्यांना स्वतःचा म्हणून देश फारसा नाहीं; आहे त्याचा अभिमान किंवा प्रेम नाहीं. त्यांत संघटित राज्यव्यवस्था करून आपलें असें राज्य बनवूं अशी बुद्धि त्यांना नाहीं. त्यांची तलवार नेहमीं म्यानांतून बाहेर काढलेली ! आणि जो तिच्या चाकरीला सर्वांत अधिक मोल देईल त्याच्या चरणीं ती वाहिलेली ! अशा लोकांकडून हिंदुस्थानचें संरक्षण राष्ट्रीय बुद्धीनें कसें होणार ! या सैन्यांतील तिसरा घटक म्हटला म्हणजे हिंदुस्थानांत असलेले किंवा आयत्या वेळीं विलायतेहून आणाविले जाणारे गोरे सैनिक. यांना हिंदुस्थानाविषयीं प्रेम असण्याचें कांहीं एक कारण नाहीं. त्या प्रेमाची अपेक्षा तरी आम्हीं कशी करावी ! शिवाय त्यामध्यें हा विशेष गुण असतो कीं, सरहद्दीपलीकडील सैन्यासारखी त्यांची तलवार वाटेल त्याला पैशाकरितां वाहिलेली नसते. त्यांना स्वतःच्या देशाचा अभिमान व प्रेम आहे; व ते कोठेंहि लढावयास गेले तरी आम्ही आपल्या देशाकरितां लढत आहों ही भावना त्यांच्या मनांत निरंतर वास्तव्य करीत असते. पेशवाईच्या अखेर जे गोरे शिपाई आपल्या कांहीं पलटणींचे अधिकारी म्हणून पेशव्यांनीं नोकरीला ठेविले होते, त्यांनीं पेशव्यांचें व इंग्रजांचें युद्ध सुरू झालें तेव्हां "आमची तलवार तुम्हीं विकत घेतली असली तरी ती इतर शत्रूंवर चालविण्याकरितांच होती व आहे. पण आमच्या स्वतःच्या जातभाईविरुद्ध ती कधीं चालणार नाहीं" असें त्यांनीं सांगितल्याचें प्रसिद्धच आहे.

आजच्या हिंदी सैन्याची घटनाहि अशीच असल्यामुळें त्याला राष्ट्रीय सैन्य असें म्हणतां येत नाहीं. परक्या सरकारांचें तें कांहीं अंशीं भाडोत्री सैन्य आहे

व त्यांतील खरे सैनिक हे हुजरातीच्या पथकासारखे म्हणजे साम्राज्यासाठीं जिवाला जीव देणारे आहेत. असें सैन्य जोंपर्यंत इंग्रज सरकारच्या स्वाधीन आहे, तोंपर्यंत त्यांनीं हिंदुस्थानाला स्वातंत्र्य कां द्यावें ? पण स्वातंत्र्याची गोष्ट बाजूला ठेविली असतां, "काळ्या-गोऱ्यांचें मिळून शोभेल असें स्वराज्य आम्ही तुम्हांला देण्याला तयार आहों" अशी भाषा इंग्रजांनीं हल्ली हिंदी लोकांना उद्देशून बोलण्याला सुरुवात केली आहे, व तें पदरांत पाडून घ्यावयाचें तर त्याचें रक्षण करण्याची जबाबदारी त्याचबरोबर अंगावर घ्यावी लागते. मग ही जबाबदारी हिंदी लोक कोणत्या आधारावर पार पाडणार ? अर्थात् त्यांना स्वतःचें असें राष्ट्रीय सैन्य उभारलेंच पाहिजे. आणि राष्ट्रीय हें त्याचें विशेषण खरें ठरण्याला खालच्या शिपायापासून वरच्या अधिकाऱ्यापर्यंत प्रत्येकाच्या मनांत आपण कोण्या परक्या धन्याचे नोकर नाहीं तर आपल्या देशाचे नोकर आहों अशी भावना उत्पन्न झाली पाहिजे. ही भावना मनांत ठेवून सैन्यांत शिरून तेथें आपलें कर्तव्य करावें व तेज दाखवावें अशी बुद्धि नवीन पिढीच्या हिंदी तरुणांत उत्पन्न होऊं लागली आहे. पण बहुमानाच्या व अधिकाराच्या जागा हिंदी लोकांस अद्यापि मिळत नाहींत व पुष्कळशा मिळण्याची फारशी आशा नाहीं. यामुळें अशा वृत्तीचे लोक सैन्यांत शिरण्याला माघार घेतात. सैन्यांतील नोकरी ही आपल्या देशाची नोकरी नव्हे तर ती आपल्या देशावर राज्य करणाऱ्या परक्या लोकांची नोकरी आहे असें त्यांना वाटतें; व हें वाटणें सकारण नाहीं असें कोण म्हणेल !

तथापि वरिष्ठ सत्ता परकी लोकांच्या हातीं असतांहि, आमूलाग्र सरकारी नोकरींत होईल तितक्या हिंदी लोकांचा प्रवेश व्हावा व मानाच्या व अधिकाराच्या जागांतून गोऱ्या लोकांचें उच्चाटन हळूहळू होऊन तेथें काळ्या लोकांची स्थापना व्हावी हा प्रयत्न जसा मुलकी नोकरींत सुरू आहे तसाच तो लष्करी नोकरींतहि झाल्याशिवाय गत्यंतर नाहीं. आधीं वनवास, मग अज्ञातवास व शेवटीं राज्यप्राप्ति हा क्रम जसा भारतीय पांडव वीरांना अनुसरावा लागला त्याचप्रमाणें हिंदी राष्ट्रालाहि अनुभवावा लागणार आहे. पांडवांना द्यूतांत पराजय आल्यामुळें जसा हा द्राविडी प्राणायाम पत्करावा लागला, त्याप्रमाणें हिंदुस्थानांतील जुन्या राजेरजवाड्यांनीं आपलें राज्य अज्ञानानें, फसगतीनें किंवा दुर्बलतेनें घालविल्यामुळें त्यानंतरच्या जनतेच्या अनेक पिढ्यांना त्याच अनुक्रमांतून जाणें प्राप्त आहे. मनांत आशा इतकीच कीं, अज्ञातवासांतून जसें पांडवांना

उजळ माथ्यानें प्रगट होतां आलें तसाच आपल्याला प्रगट होण्याचा दिवस उगवणार नाहीं कशावरून !

मुलकी नोकरींत शिरून त्यांतील महत्त्वाच्या जागा हस्तगत करून नाकेबंदी करावी या विषयीं हिंदुस्थानांत आतां मतभेद राहिलेला नाहीं. नोकरींत कोणीं शिरावें कोणीं न शिरावें हा प्रश्न ज्याच्या त्याच्या आवडीचाच असणार. ज्याला आपली बुद्धि व आपलें तेज वाढल्यास त्याचा उपयोग स्वावलंबनानें देशाला अधिक करून देतां येईल असें वाटतें तो इसम अर्थातच सरकारी नोकरींत शिरत नाहीं. परंतु असा नोकरींत न शिरणारा मनुष्यहि अधिकाराच्या जागा आपल्या दुसऱ्या कोणा बांधवांना मिळाल्या तर मिळवून द्याव्या अशाविषयीं खटपट करीतच असतो. कांहीं अंशीं हा सिद्धसाधकतेचाच प्रकार आहे. वरिष्ठ नोकऱ्या हिंदी लोकांच्या हातीं यावयाला पाहिजेत. म्हणून, स्वतः आपण नोकरींत न गेलों तरी दुय्यम दर्जाचे कां होईना पण बुद्धिमान् व कर्तबगार असे आपले जातभाई या नोकऱ्यांतून शिरावे ही गोष्ट त्यांना मान्य असते. व सरकारशीं चालू असलेल्या भांडणांतील तो एक मुद्दा निरंतरचा आहे. आणि या भांडणांमुळें निरनिराळ्या खात्यांतून कोठें शेंकडा ५० तर कोठें ७० जागा हिंदी लोकांकरितां राखून ठेवण्याचा संकल्प सरकारानें सोडला आहे.

पण लष्करी नोकरीकडे या दृष्टीनें लोकांनीं आजवर फारसें पाहिलें नव्हतें. त्याचें कारण असें कीं, मुलकी नोकरींत जितक्या वरिष्ठ दर्जाच्या नोकऱ्या हिंदी लोकांना मिळूं शकतात तितक्याहि लष्करी नोकरींत मिळत नाहींत. आणि 'उष्टें खावें तर तुपासाठीं खावें' या म्हणप्रिमाणें लष्करी नोकरींत आमिष जितकें लोभनीय किंवा आकर्षक असावें तितकें असत नाहीं. यामुळें लष्करी नोकरींत नुसत्या शिपाईगिरीकडे कोणी जात नाहीं. मुलकी खातें असें एकहि आज नाहीं कीं, ज्यांत एखादा ना एखादा तरी हिंदी मनुष्य तेथील वरिष्ठ जागेपर्यंत चढलेला नाहीं. लॉर्ड सिंह यांना बहारचे गव्हर्नर सरकारानें नेमल्यामुळें आतां फक्त व्हाइसरॉय तेवढा हिंदी नेमल्याचें उदाहरण नाहीं असें म्हणतां येण्यासारखें आहे. एरवीं रेव्हिन्यूखातें, न्यायखातें, अंमलबजावणीखातें या सर्व ठिकाणीं हिंदी मनुष्य सर्वश्रेष्ठ पदाला चढल्याचीं उदाहरणें घडलेलीं आहेत. व जेथें हिंदी मनुष्याचें पाऊल एकदां पडलें तेथें त्याचा पाय रुजून राहावा आणि त्याच्या मागूनहि तेथें हिंदी मनुष्यच नेमला जावा असाहि संकेत पडत चाललेला आहे.

दुसरी एक गोष्ट अशी कीं, मुलकी नोकरी जशी पैशाची व बहुमोलाची तशी ती सुखाची असते. म्हणून तिकडे जाण्याची प्रवृत्ति निर्विवाद राहते. पण लष्करी नोकरींत अगदीं वेगळ्या प्रकारची स्थिति आहे. म्हणजे एक तर नोकरी सुखाची नसून ती कष्टाची आहे. प्रसंगविशेषीं लढाईवरहि जावें लागतें. पण सर्वांत मुख्य गोष्ट ही कीं, हें सर्व सोसण्यास कोणी तयार झाला तर त्याच्या धाडसाच्या मानानें मोठ्या मानाची किंवा अधिकाराची जागा त्यास मिळत नाहीं. मुलकी नोकरींत हिंदी मनुष्य गव्हर्नरापर्यंत चढला हें दाखवितां येतें. पण लष्करी नोकरींत तो कर्नलच्यापर्यंत चढला असें क्वचितच दाखवितां येतें. मग त्याहून वरिष्ठ जागेविषयीं तर बोलावयासच नको. तिकडून सरकारचीहि दृष्टि अशी कीं, मुलकी अधिकारांत हिंदी मनुष्य एक वेळ गव्हर्नर झाला तरी चालेल,पण सैन्यांत त्याला हुकमतीची जागा द्यावयाचीच नाहीं. याचा अर्थ असा कीं, खरें स्वावलंबी खातें म्हणजे लष्करी व मुलकी खातें हें बांडगुळासारखें म्हणजे परोपजीवी! सैन्य राज्य राखील तरच मुलकी अधिकारी राज्य चालवील. सैन्यानें कबजा घेतला, शांतता राखली तर मग मुलकी अधिकाऱ्यांनीं त्या मोकळ्या मैदानावर कागदी घोडे नाचवावे. स्वतंत्र देशांत या दोन्ही खात्यांना जो सारखा मान मिळतो तो हिंदुस्थानांत मिळत नाहीं म्हणूनच लष्करी खातें हें शिरजोर होऊन बसलें आहे व गोष्ट निकरावर आली असतां व्हाइसरॉय व गव्हर्नर-जनरल कर्झन यांनाच राजीनामा द्यावा लागतो,व सेनापति किचनेर वादांत यशस्वी होतो असा अनुभव आलेला आहे!

सरकारचें लष्करी धोरण असें असल्यामुळें या खात्याच्या नोकरींत शिरण्याची प्रवृत्ति हिंदी लोकांस न झाल्यास त्यांत आश्चर्य नाहीं. पण आपद्धर्म स्वीकारून आलीया भोगासी सादर व्हावें म्हणून या नोकरींत शिरून वरिष्ठ जागा अधिकाधिक मिळवाव्या किंवा बिननोकरीचा असा खाजगी लष्करी सरंजाम उभारून देशांतील लोकांमध्यें एक प्रकारचें लष्करी वातावरण निर्माण करावें असा प्रयत्न हिंदी पुढाऱ्यांकडून सुरू आहे. नव्या असेंब्लीमध्यें १९२१सालापासून हा प्रयत्न पद्धतशीर चालू झाला आहे. त्या सालीं सर शिवस्वामी अय्यर यांनीं कांहीं ठरावांच्या रूपानें लष्करी खात्यासंबंधानें हिंदी लोकांच्या आकांक्षांची परिस्फुटता केली, व त्या आकांक्षा सफल होण्यासारखा कार्यानुक्रम आंखतांना कांहीं सूचनाहि केल्या; सरकारनेंहि महायुद्ध नुकतेंच संपलें असल्यामुळें एक

प्रकारचें नवें धोरण स्वीकारून त्या मान्य केल्या. पण अद्यापि त्यांची बजावणी न झाल्यानें डॉ. मुंजे यांनीं सरकारी खात्यामार्फत व खाजगी संस्था स्थापून त्या सूचनांकडे हिंदी जनतेचें लक्ष वेधलें आहे.

---

## ८७ ट्रेड युनियन कॉंग्रेसचीं शकलें कां उडालीं ?

( केसरी १९२९ )

नागपुरास ट्रेड युनियन कॉंग्रेसचीं दोन शकलें पडून त्यांतील जुन्या मताच्या पुढाऱ्यांना आपला सवतासुभा स्थापन करावा लागला. जुन्या पुढाऱ्यांत दिवाण चमनलाल, रा. नारायणराव जोशी, शिवराव इत्यादि अनुभविक व कर्तृत्ववान् गृहस्थ असल्यामुळें त्यांनीं निर्माण केलेली ट्रेड युनियन फेडरेशन ही संस्था लवकरच रंगारूपास येईल अशीं सुचिन्हें दिसूं लागलीं आहेत. जुनी ट्रेड युनियन कॉंग्रेस नांवारूपास आणण्यास त्यांचेच परिश्रम व धोरण बऱ्याच अंशीं कारण झालें असल्यामुळें नव्या फेडरेशनला ठिकठिकाणचे मजूरसंघ येऊन मिळण्यास विलंब लागणार नाहीं. मद्रासेस तेथील मजूरसंघाच्या कार्यकारी कमिटीची सभा नुकतीच भरून तिनें ट्रेड युनियन कॉंग्रेसशीं संबंध तोडण्याचा ठराव सर्वानुमतें पास केला, व नवीन फेडरेशनला येऊन मिळण्याचें जाहीर केलें. त्याच प्रकारचा उपक्रम नागपुरास व इतरत्रहि होत आहे.

ट्रेड युनियनच्या नव्याजुन्या पुढाऱ्यांनीं वेगवेगळे मार्ग आंखले हें ठीकच झालें. कारण त्यांचा मतभेद तात्त्विक आहे. नवे पुढारी कम्युनिस्ट मताचे असून त्यांना भांडवलवाल्यांचा नायनाट करून टाकावयाचा आहे. जुन्या पुढाऱ्यांचें शत्रुत्व भांडवलवाल्यांशीं नाहीं. त्यांना भांडवलवाले व त्यांचे कारखाने यांस जिवंत राखून मजूरवर्गाची सर्वांगांनीं उन्नति करावयाची आहे. उभयतांत मूलतःच भेद असल्यामुळें त्यांनीं एकत्र राहाण्यानें दोघांचीहि कुचंबणा होऊन मजूरवर्गाची दिशाभूल चालू होती. आतां मजुरांपुढें दोन रस्ते मोकळे आहेत. नव्या-जुन्या पुढाऱ्यांनीं आपलीं मतें व धोरण मजुरांस समजून देऊन आपल्या बाजूस ओढण्याचा प्रयत्न खुशाल करावा. नव्या पुढाऱ्यांचा मार्ग मजूर वर्गास कसा झेपणार नाहीं याचें प्रत्यंतर नागपूर, वऱ्हाड या प्रांतांत नुकतेंच दिसून आलें. त्या प्रांतांतील मजुरांच्या पुढाऱ्यांनीं व्हिटले कमिशनपुढें साक्षी दिल्या, व

बहिष्कारवाल्यांनीं जंगजंग पछाडले तरी कमिशन वेगवेगळ्या शहरांस भेटी देत असतां तांबडीं निशाणें मिरवून त्याचा धिःक्कार केला नाहीं.

हिंदुस्थानांत शेतकरीवर्गाच्या खालोखाल मजूर वर्गाचें महत्त्व आहे. त्यांची संख्याहि शेतकऱ्यांच्या खालोखाल आहे. एवढ्या प्रचंड वर्गाची चळवळ योग्य दिशेनें चालली तरच त्यांत त्यांचें व राष्ट्राचें हित आहे. नवमतवाद्यांच्या नादास लागल्यानें त्यांचें कसें नुकसान होतें हें मुंबईच्या संपांत अनुभवास आलेंच आहे. अशा स्थितींत नवमतवाद्यांचा मार्ग चुकीचा कां व जुन्या पुढाऱ्यांचा मार्ग बरोबर कां याची नीट कल्पना मजूरवर्गास व एकंदर जनतेस येणें अवश्यक असल्यामुळें त्याचेंच दिग्दर्शन आजच्या लेखांत करण्याचें आम्हीं योजिलें आहे. तें वाचलें असतां ट्रेड युनियन कँग्रेसचीं शकलें कां उडालीं याचाहि खुलासा सहजच होईल.

## जुन्या-नव्या पुढाऱ्यांची दृष्टि

मजुरांची संघटना करण्याबाबतची दिवाण चमनलाल, जोशी वगैरे जुन्या पुढाऱ्यांची दृष्टि व नवमतवाद्यांची दृष्टि यांत फरक आहे हें जुन्या लोकांचा एशियाटिक लेबर कॉन्फरन्सवर भर कां व नवमतवाद्यांचा ऑल इंडिया ट्रेड युनियन कँग्रेस ही संस्था पॅनपॅसिफिक ट्रेड युनियन सेक्रेटरियटला जोडण्याचा हट्ट कां ह्याचा बारकाईनें अभ्यास केल्यास ध्यानांत येण्यासारखें आहे. १९२५ सालीं जिनीव्हा येथें हिंदी मजुरांचे प्रतिनिधि खासदार नारायणराव जोशी व जपानी मजुरांचे प्रतिनिधि सात्सुकी यांची भेट झाली असतां एशियाटिक लेबर कॉन्फरन्सची कल्पना निघाली. त्या बाबतींत हिंदी मजुरांचें म्हणणें असें कीं, हिंदी मजुरांच्या सुस्थितीच्या आड जपानी मजूर येतात. कारण जपानमधील गिरण्यांत काम करणाऱ्या मजुरांची स्थिति वाईट असल्यानें तेथील उत्पादनाचा खर्च हिंदुस्थानापेक्षां पुष्कळच कमी पडतो, व यामुळें हिंदी मालाबरोबर जपानी मालाची मारक चढाओढ होऊन हिंदी व जपानी मजुरांचा तोटा होतो. तेव्हां दोनहि देशांतील मजुरांनीं एकमेकांची स्थिति सुधारण्याकरतां सहकार्य करावें. १९२५ सालीं या कल्पनेचा उगम झाला असला तरी मध्यंतरीं सव्वीस व सत्तावीस सालीं या दृष्टीनें पुढें पाऊल मुळींच पडलें नाहीं. परंतु अठ्ठावीस सालीं दिवाण चमनलाल व कॅप्टन योनेक्यूबो यांचें याविषयीं पुनः बोलणें होऊन त्या कल्पनेला चालना मिळाली. त्या वेळीं

असें ठरविण्यांत आलें होतें कीं, १९२९ च्या मे महिन्यांत हिंदुस्थानांत ही परिषद भरविण्यांत यावी. दिवाण चमनलाल यांनीं गेल्या वर्षीच्या ऑल इंडिया ट्रेड युनियन काँग्रेसच्या अधिवेशनांत एशियाटिक लेबर कॉन्फरन्स बोलावण्यांत यावी असा ठराव मांडला, व त्याला कम्युनिस्ट मताच्या ब्रॅडलेसारख्या गृहस्थांनीं कसून विरोध केला. एशियाटिक लेबर कॉन्फरन्स भरविण्यांत जपानी व हिंदी मजुरांच्या पुढाऱ्यांचा हेतु मजुरांची स्थिति सुधारावी एवढाच होता. त्यामध्यें भांडवलवाल्यांशीं भांडण्याचा किंवा त्यांचा निःपात करण्याचा हेतु नव्हता.

## पॅन-पॅसिफिक ट्रेड-युनियन सेक्रेटॅरियट

आतां आपण पॅन-पॅसिफिक ट्रेड युनियन सेक्रेटॅरियटकडे दृष्टि वळवूं. झेरियाची परिषद होण्यापूर्वी पॅन-पॅसिफिक सेक्रेटॅरियटनें ऑल इंडिया ट्रेड युनियन काँग्रेसला उद्देशून काढलेलें पत्रक एका कलकत्त्याच्या वृत्तपत्रांत झेरिय परिषदेपूर्वी प्रसिद्ध झालें होतें, व त्यामध्यें त्या वर्षाच्या ऑल इंडिया ट्रेड युनियन काँग्रेसला पॅन-पॅसिफिक युनियनास मिळण्याविषयीं विनंति केली होती. त्याच पत्रकांत मॅक्डोनॉल्ड प्रभृति ब्रिटिश मजूर पुढाऱ्यांवर शिव्यांची लाखोली वाहण्यांत आली होती; व ' जर ऑल इंडिया ट्रेड युनियन काँग्रेसनें योग्य तो मार्ग दाखविला तर हिंदी मजूर दडपशाहीला न जुमानतां पुढें जातील ' अशी चिथावणी ऑल इंडिया ट्रेड युनियन काँग्रेसला देण्यांत आली होती. सासुकी व एन. एम. जोशी यांनीं एशियाटिक मजूर परिषद भरविण्याचा जो बेत केला होता त्याला इम्पिरियॅलिस्टिक असें शेलकें नांव ठेऊन ही परिषद भरविण्याचा हेतु पॅन-पॅसिफिक सेक्रेटॅरियटला मारून टाकण्याचा आहे असें प्रसिद्ध करण्यांत आलें होतें.

पॅन-पॅसिफिकला ज्या दोन प्रमुख संस्था जोडण्यांत आल्या आहेत त्यांत इंग्लंडमधील ' नॅशनल मायनॉरिटी मुव्हमेंट ' व राशियांतील ' ऑल राशियन कौन्सिल ऑफ ट्रेड युनियन्स ' आहेत. या दोनहि संस्था कम्युनिस्टांच्या आहेत. या ' पॅन-पॅसिफिक ट्रेड युनियन सेक्रेटॅरियट म्हणजे काय ' ह्या पत्रकांत या संस्थेची माहिती दिली असून त्यांत हिंदुस्थानविषयक पुढील मजकूर होताः—" बत्तीस कोटी लोकांच्या हिंदुस्थान देशाच्या किनाऱ्यावर जरी पॅसिफिक महासागराच्या लाटा आदळत नसल्या तरी ज्या देशांत तिसरी राष्ट्रीय व सामाजिक क्रांति घडून येण्याच्या मार्गात आहे त्या

देशाला पॅन पॅसिफिक ट्रेड यूनियन सेक्रेटॅरियटपासून अलिप्त ठेवण्याला फक्त भौगोलिकच सबब सांगतां येण्यासारखी आहे. हें पत्र लिहिलें जात असतांच हिंदुस्थानांतील मजूर हिंदी भांडवलवाल्यांविरुद्ध व साम्राज्यशाहीविरुद्ध उठले असून आपल्या न्याय्य हक्काच्या संपादनाकरितां ते संप करीत आहेत अशा तारा येत आहेत. आम्ही मजुरांना असें समजावून सांगूं कीं, तुमचा खरा शत्रु तुमच्या देशांतील भांडवलवाले हा होय." या पत्रकांतील पुढील वाक्यें वाचल्यावर या संस्थेच्या ध्येयाची सहजच कल्पना येण्यासारखी असल्यानें तीं जशींच्या तशीं देत आहोंत—

"आमचें भांडण वर्णाविरुद्ध नाहीं. वर्गाविरुद्ध (भांडवलवाल्या) आहे. आमचें भांडण जातीविरुद्ध नाहीं वर्गाविरुद्ध आहे. आम्हांला जात, वर्ण, राष्ट्र यांच्या आधारावर भेद पाडावयाचे नाहींत. फक्त भांडवलवाला व कामकरी या स्वरूपाचा वाद आहे. जगांतील कामकऱ्यांनीं एक व्हावें हें आमचें ब्रीदवाक्य आहे."

वर दिलेल्या त्रोटक माहितीवरून ही संस्था कम्युनिस्ट मतांची असून मजुरांच्या हातीं राज्ययंत्र देण्याकरितां तिला जागतिक क्रांति घडवून आणावयाची निदान त्या दृष्टीनें यत्न करून पाहावयाचा आहे हें स्पष्ट दिसतें. या पॅन पॅसिफिक कॉन्फरन्सला नवमतवादी पुढाऱ्यांनीं उचलून धरलें आहे. अर्थातच नव्या व जुन्या पुढाऱ्यांच्या दृष्टींत व कार्यपद्धतींत काय फरक आहे हें त्यांनीं उचलून धरलेल्या दोन बाजूंवरून सहज ध्यानांत येतें.

## पं. जवाहरलाल नेहरू

गेल्या वर्षीं झेरियाच्या परिषदेंत अगदीं थोड्या मतांनीं दिवाण चिमनलाल यांच्या पक्षाचा विजय झाला असला तरी त्यावेळींच ऑल–इंडिया ट्रेड युनियन कॉंग्रेसमध्यें नवमतवाद्यांचा हात चांगला शिरला आहे हें निरनिराळ्या ठरावांवरील मतमोजणीवरून सहज कळत होतें. या वर्षीच्या अधिवेशनांत गिरणी कामगार युनियन व जी. आय. पी. रेल्वे मेन्स युनियन या नवमतवादी लोकांच्या संस्थांचें प्राबल्य वाढून जुन्या पुढाऱ्यांचा न भूतो न भविष्यति असा पराभव झाला. पंडित जवाहरलाल नेहरू यांनीं आपल्या भाषणांत कमिट्या–कमिशनें हीं लोकांच्या उत्साहावर व चळवळीवर पाणी ओतण्याकरितांच सरकार नेमीत असतें असें सांगून व्हिटले कमिशनावरील बहिष्काराचें समर्थन केलें. परंतु

ऑल-इंडिया ट्रेड युनियन काँग्रेस कोणत्याच बाहेरच्या संस्थेला जोडूं नये व आपसांतील दुही टाळावी असा योग्य सल्ला त्यांनीं परिषदेला दिला. पं. जवाहरलाल नेहरू यांचा कल कम्युनिस्टांकडे असला तरी रशियांतील बऱ्याच गोष्टी त्यांना पसंत नाहींत ही गोष्ट त्यांचें 'सोव्हिएट रशिया' हें पुस्तक वाचल्यास तेव्हांच समजते. त्यांनीं हीच गोष्ट आपल्या भाषणांत स्पष्ट केली, ते म्हणाले, "कम्युनिझमचीं बरींच तत्त्वें मला आवडत असलीं तरी कम्युनिस्टांची कार्य-पद्धति व मार्ग मला पसंत नाहींत. अर्थातच थर्ड इंटर-नॅशनलला आपली काँग्रेस जोडूं नये. परंतु मला सेकंड इंटर-नॅशनल ही संस्थाहि आवडत नाहीं. कारण त्या संस्थेचे पुढारी आज निरनिराळ्या देशांत मंत्रिमंडळांत असून साम्राज्यशाहीचे पाठीराखे बनले आहेत. अशा स्थितींत आपण आपल्या चळवळीची सांगड तिच्याशींही घालूं नये. ज्या ज्या संस्थांशीं आपल्या चळ-वळीच्या हिताकरितां सहकार्य करावें असें वाटेल त्या संस्थांशीं आपण वेळोवेळीं सहकार्य करावें.

## वरातीमागून घोडें

जवाहरलाल नेहरू यांचा उपदेश जसा परिषदेच्या पचनीं पडावयास पाहिजे होता तसा पडला नाहीं. परिषदेमध्यें ज्वलज्जहाल ठराव गेल्या वर्षी होऊं शकले नाहींत. ते सर्व या वर्षी झाले. पॅन-पॅसिफिक ट्रेड युनियन सेक्रेटॅरियेटला ऑल इंडिया ट्रेड युनियन काँग्रेस जोडण्याचा ठराव विषयनियामक मंडळांत संमत झाला, व जाहीर अधिवेशनांतहि तो संमत झाला असता परंतु काँग्रेस कोणत्या संस्थेशीं जोडावी या प्रश्नाचा विचार आणखी एक वर्षपर्यंत तहकूब करावा ही उपसूचना जाहीर अधिवेशनांत मान्य करण्यांत आली. वरात आटोपल्यावर हें घोडें शृंगारून आणण्याचा उपयोग काय ? हटातटाचे इतर ठराव पास झाल्या-मुळें जुने पुढारी ऑल इंडिया ट्रेड युनियन काँग्रेस सोडून गेल्यावर पॅन-पॅसिफिक ट्रेड युनियन सेक्रेटॅरिएटला ऑल इंडिया ट्रेड युनियन काँग्रेस जोडण्याचा विचार एक वर्ष तहकूब ठेवण्याच्या उपसूचनेचा एकीच्या दृष्टीनें कांहींहि उपयोग होणें शक्य नव्हतें.

दिवाण चमनलाल, नारायणराव जोशी प्रभृति जुन्या पुढाऱ्यांनीं मजुरांची स्थिति सुधारणें एवढाच उद्देश डोळ्यांपुढें ठेवून सनदशीर चळवळ करण्याकरितां ट्रेड युनियन्स फेडरेशन ही नवी संस्था काढली व ह्या संस्थेच्या वाऱ्यालाहि कम्युनि-

स्टांना उभें राहूं द्यावयाचें नाहीं असें ठरविलें. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे या वर्षापर्यंत ऑल इंडिया ट्रेड युनियन कॉंग्रेस जीं कामें करीत होतीं तींच कामें ही नवी संस्था पुढें चालू ठेवणार आहे. या नव्या संस्थेच्या कार्यकारीमंडळाचे श्री. गिरी हे अध्यक्ष असून श्री. बखले हे सेक्रेटरी आहेत. फेडरेशन स्थापण्याकरितां भरलेल्या सभेंत व्हिटले कमिशनाशीं सहकार्य करण्याचा, राऊंड टेबल कॉन्फरन्सला पाठिंबा देण्याचा व त्या परिषदेमध्यें मजुरांचे भरपूर प्रतिनिधी असावे अशी मागणी करण्याचा इत्यादि ठराव संमत झाले. त्याचप्रमाणें जिनीव्हाच्या आंतरराष्ट्रीय परिषदेकरितां हिंदी मजुरांच्या प्रतिनिधींचीं नांवेंहि सुचविण्यांत आलीं.

## कॉंग्रेसची दिशा

ऑल इंडिया ट्रेड युनियन कॉंग्रेस हें नांव जरी आज शिल्लक असलें तरी त्या संस्थेची कार्यदिशा मात्र एकदम बदललेली आहे. कॉंग्रेसनें जिनीव्हाशीं संबंध तोडून टाकला, कम्युनिस्टांच्या वर्कर्स वेल्फेअर लीगसाठीं आपला इंग्लंडमधील प्रतिनिधि निवडला आणि संपूर्ण स्वातंत्र्याच्या ध्येयाला पाठिंबा देऊन नेहरू कमिटीचा रिपोर्ट व राऊंड टेबल कॉन्फरन्सची योजना यांचा धिक्कार केला. व्हिटले कमिशनवर बहिष्कार घालण्याचें ठरविण्यांत येऊन जाहीर अधिवेशनांत नसला तरी विषयनियामक कमिटींत जोशी-चमनलालांचा निषेध करण्यांत आला. प्रत्यक्ष व्यवहारांत ट्रेड युनियन कॉंग्रेसचा पॅन-पॅसिफिक युनियनशीं प्रत्यक्ष संबंध येणार नसला तरी या संस्थेशीं ट्रेड युनियन कॉंग्रेसचें प्रेमाचें नातें जोडल्यासारखेंच आहे. एका शब्दांत सांगावयाचें म्हणजे ट्रेड युनियन कॉंग्रेस कम्युनिस्ट मताच्या लोकांच्या ताब्यांत गेली आहे. मुंबईच्या कामगार युनियनचे पुढारी श्री.एस.व्ही.देशपांडे हे पुढील वर्षाच्या कार्यकारी मंडळाचे चिटणीस असून संपूर्ण स्वातंत्र्याचे पुरस्कर्ते दे. भ. सुभाषचंद्र बोस यांना अध्यक्ष निवडण्यांत आलें आहे. सुभाषबाबूंनीं अजून अध्यक्षस्थान स्वीकारलें नाहीं ही गोष्ट वेगळी. त्यांचीं जुन्या पुढाऱ्यांशीं बोलणीं चालू असून कांहीं तडजोड होण्यासारखी असली तर ती घडवून आणण्याचा त्यांचा विचार दिसतो.

ऑल इंडिया ट्रेड युनियन कॉंग्रेसच्या वरील ठरावांवरून त्या संस्थेचें ध्येय, कार्यपद्धति हीं क्रांतिकारक बनलीं आहेत हें स्पष्ट होतें. या उलट ट्रेड युनियन फेडरेशनचें धोरण सुधारणावादी आहे. सुभाषबाबूंनीं जुन्या व नव्या लोकांची

एकी करण्याचा कितीहि यत्न केला तरी तो प्रयत्न सद्यःस्थितींत तरी यशस्वी होईल असें वाटत नाहीं. आज तरी जुन्या व नव्या मजूर पुढाऱ्यांचा दृष्टिकोन अगदीं भिन्न आहे. हिंदी मजुरांच्या चळवळींत हें स्थित्यंतर घडून आलें त्यांत नवीन असें कांहींच नाहीं. इंग्लंडच्या मजुरांच्या चळवळीच्या इतिहासांत सुधारणावादी व क्रांतिवादी यांच्या झटापटींत सुधारणावाद्यांची सरशी झाली, व इंग्लंडांतील मजूरसंघटना प्रभावी ठरून गेल्या दशकांत मजूरपक्षाचें दुसरें मंत्रिमंडळ बनलेलें पाहावयास मिळत आहे. परंतु तेथेंहि आज लहान प्रमाणांत कां होईना मजुरांचा क्रान्तिवादी पक्ष अस्तित्वांत आहे.

नवें ट्रेड युनियन फेडरेशन व जुनी ट्रेड युनियन काँग्रेस यांच्यामधील खरा फरक त्यांच्या कार्यपद्धतींत आहे. दिवाण चमनलाल, नारायणराव जोशी, शिवराव वगैरे मंडळींचें जास्त लक्ष व्यवहाराकडे असल्यानें व ते आंधळ्या ध्येयवादाला बळी न पडल्यानें अर्थातच सुधारणावादी आहेत. नवमतवाद्यांचा सर्व भर भावनेवर असून ते रशियन कार्यपद्धतीवर भाळलेले आहेत. मनुष्य-स्वभावाची व येथील परिस्थितीची ते ओळख विसरले आहेत असेंच दिसतें. गेल्या दोन–तीन वर्षांत नवमतवाद्यांनीं मजूरसंघटनेला चालना दिली असली तरी त्यांचें नित्य कार्य विध्वंसक स्वरूपाचें झाल्यानें व मनुष्याच्या ध्येय-निष्ठ स्वार्थत्यागाला सीमा असते याची जाणीव त्यांना न राहिल्यानें या लोकांच्या चळवळीपासून मजुरांचें हित झालें नाहीं असें स्पष्ट दिसत आहे. आणखी कांहीं काळपर्यंत आपल्या जहाल भाषणांनीं ते मजुरांना भारतील, नाहीं असें नाहीं; परंतु संपांनीं यश मिळण्याऐवजीं गांजवणूक मात्र वाढते असें मजुरांना एकदां कळून चुकलें म्हणजे भावनेच्या पायावर उभारलेले नवमत-वाद्यांचे मनोरथ जेथल्या तेथेंच जिरतील. एवढेंच नव्हे, तर मजुरांची सर्व शक्ति विध्वंसक कार्यांत संपल्यानें मजूरसंघटनेचें पाऊल पुढें पडण्याऐवजीं त्याची पिछेहाट मात्र झालेली दिसेल.

भावनेला व्यावहारिक विचाराची जोड मिळणें अवश्यक असतें. हिंदी मजुरांच्या दुर्दैवानें नवमतवाद्यांमध्यें व्यावहारिक विचाराची वाण दिसते. मुंब-ईंत गिरणी कामगारांची संघटना करण्याचें काम त्यांनीं हातीं घेतलें. जुन्या पुढाऱ्यांपासून ते फटकून वागले. त्यांचा त्यांनीं धिक्कार केला. पुढें काम-कऱ्यांच्या राज्याचीं मोहक वर्णनें केलीं व एका पाठीमागून एक संप घडवून

आणले. परंतु त्यांचा उपयोग झाला नाहीं असें म्हणण्यास हरकत नाहीं. उलट नवमतवादी मजूर पुढारी आपापसांतच इतके भांडत राहिले कीं, यांत खरा कोण याचा विचार करतांना अज्ञ मजूर मात्र किंकर्तव्यतामूढ बनले. नव्या अगर जुन्या कोणत्याहि पुढाऱ्यांचें त्यांच्यावर वजन उरलेलें नाहीं. या सर्व आपत्तींचें मूळ नवमतवाद्यांच्या अविचारांत आहे. मुंबईतील कार्यांचा झालेला खेळखंडोबा पाहून तरी ते शाहणे होतील असें वाटलें होतें; परंतु नागपुरास ऑल इंडिया ट्रेड युनियन काँग्रेसमध्यें त्यांनीं जें धोरण स्वीकारलें त्यावरून मात्र ते शहाणे झालेले नाहींत व मजुराचें नष्टचर्य संपलेलें नाहीं असें म्हणावें लागतें. आमच्या मतें काँग्रेसचीं शकलें पडूं न देतां तडजोड करून नवमतवादी व जुने पुढारी या दोघांनीं मजूरसंघटनेचा खचलेला पाया भरभक्कम करावयास पाहिजे होता. मजुरांच्या चळवळींत आज स्थित्यंतर होऊन क्रान्तिवाद्यांचा वरचष्मा झाला असला तरी थोडक्या काळांत क्रान्तीपेक्षां सुधारणावादच फिरून डोकें वर काढील असें वाटतें.

---

## ८८ सोलापुरांतील दुतर्फी निंद्य अत्याचार !

सोलापूर येथील दंग्याच्या हकीकती निरनिराळ्या मार्गांनीं बाहेर पडत आहेत. त्या वाचल्या असतां कोणाचेंहि मन खिन्न झाल्याशिवाय राहणार नाहीं. एक तर रिकामटेकड्या मवाली लोकांनीं नसता उपद्व्याप करून शांततेनें चाललेल्या चळवळीला दूषण आणलें; व दुसरे पक्षीं पोलीस अधिकाऱ्यांनीं विशेषतः सशस्त्र गोऱ्या पोलिसांनीं, गांवांत गोळीबार करण्याच्या कामीं अगदींच ताळ सोडला. यामुळें गांवांतील निरुपद्रवी लोक आणि शांततेच्या मार्गानें चळवळ करणारे लोक हे मोठ्याच संकटांत सांपडले.

जेथें स्वयंसेवक लोकांवर पोलीस अन्याय किंवा अत्याचार करीत असेल तेथें विशेष प्रसंगीं अवांतर लोक भावना प्रदीप्त होऊन स्वयंसेवक लोकांच्या मदतीला येतील, व अशा आकस्मिक चकमकींत आपलें तेज व बळ प्रगट करतील, तर ती एक गोष्ट वेगळी. पण चांगलें काम बिघडविणें यांतच बहुधा गर्दीचें पर्यवसान होतें. म्हणून स्वयंसेवकांप्रमाणें अवांतर लोकांनाहि सार्वजनिक जागीं कसें वागावें, कसें वागूं नये, याचें शिक्षण देण्याला आतां

सुरुवात केली पाहिजे. सोलापुरास घडलेल्या प्रकारांत शिंदीचीं झाडें तोडणें हा कार्यक्रम स्वयंसेवकांनीं मुळांत ठरविला होता असें दिसत नाहीं. बरें, शिंदीचीं झाडें तोडणें हा हल्लींच्या चळवळींत एक नवा बूट म्हणून निघाला असें या अवांतर लोकांनीं ऐकलें असलें तरी, त्याजबरोबर त्यांनीं हेंहि ऐकलेंच असेल कीं, झाडें तोडणें ठरलें तरी तें जबाबदार चालक किंवा स्वयंसेवक ठरवतील त्या पद्धतीनेंच व्हावें असा चळवळीच्या मुख्य पुरस्कर्त्यांचा दंडक आहे. आणि स्वयंसेवक हातांत कुऱ्हाडी घेऊन झाडें तोडण्याला गेले असते तरी, त्यांना पोलिसांनीं प्रतिबंध केला असता, ते हातांतील कुऱ्हाडी टाकून पोलिसांच्या स्वाधीन होऊन अटकेंत गेले असते. म्हणण्याचें तात्पर्य हें कीं, या चळवळींत झाडावर मारण्याकरितां स्वयंसेवकांनीं हातांत कुऱ्हाड घेतली असती तरी, ती झाडापुरतीच राहिली असती. ती त्यांनीं पोलिसांवर कधींहि चालविली नसती अशी आम्हाला खात्री वाटते. मग पोलिसांवर हल्ला करून खून करून त्यांना जाळणें ही गोष्ट तर दूरच. शिंदीच्या बागेजवळ गोळीबार झाल्याचा राग जमावाला आला असेल. पण हजारों लोकांच्या घोळक्यांत सांपडलेल्या मूठभर पोलिसांना कदाचित् खरोखरच आत्मरक्षणाकरितां तो करावा लागला असेल. गोळीबारापूर्वी अधिकाऱ्यांनीं एकदोनदां सावधगिरीच्या सूचना दिल्या असें प्रसिद्ध झालें आहे. हेंहि खरें असेल असें आम्ही गृहीत धरून चालतों. शिवाय पोलिसांवर चोहोंकडून दगडफेंक होत होती ही गोष्ट खोटी आहे असेंहि कोणी प्रतिपादिलेलें आढळत नाहीं. कसेंहि असो. प्रभातफेरीच्या किंवा मिरवणुकीच्या गरीब स्वयंसेवकांची आणि या अवांतर मवाली टोळक्यांची अवचित गांठ पडावी व शेवटीं वांग्याचें भूत व्हावें याचेंच नांव चळवळीचें दुर्दैव.

पण दुसऱ्याहि एका प्रकाराबद्दल अशीच किंबहुना याहि पेक्षां कडक अशी टीका करणें आम्हांला प्राप्त आहे. तो प्रकार म्हणजे गुरुवारीं तिसरे प्रहरीं सोलापूर शहरच्या निरनिराळ्या भागांतून झालेला गोळीबार. तुळजापूर रस्त्यावर शिंदीच्या बागेजवळ झालेल्या गोळीबारांत अपराधी किंवा क्वचित् निरपराधीहि मनुष्य गोळीबारानें प्राणास मुकला तर त्याबद्दल अधिकाऱ्यांना आम्ही फारसा दोष देऊं शकत नाहीं. कारण अशा गर्दींत अपराधी व निरपराधी यांची एकच गलत होऊन जाते. पण शहरांत कोठेंहि जमाव जमला नसतां, पोलिसांवर दगडफेंक मुळींच होत नसतां, निर-

निराळ्या ठिकाणीं जाणूनबुजून गोळीबार करण्यांत आला. त्यांत बहुतेक साऱ्या निरपराधी माणसांनाच जखमा झाल्या, व कांहीं लोक प्राणालाहि मुकले. याची फार मोठी जबाबदारी पोलिस अधिकाऱ्यांवर येते. सोलापूरच्या कर्मयोगी पत्रांतील जो उतारा आम्ही दुसरीकडे दिला आहे त्यावरून गोळीबार झाला तो योग्य कारण नसतां केवळ दहशत बसविण्याच्या हेतूनें, अथवा माथेफिरूपणानें, हा गोळीबार झाला यांत शंकाच उरत नाहीं. एरवीं बाजारपेठेंतील मोहोल्यांत, राहत्या घरांच्या किंवा विद्यार्थीवसतिगृहांच्या दुसऱ्या तिसऱ्या मजल्यावर गोळ्या लागून निरपराधी मुलें माणसें मरावीं हें कसें ? कित्येकांचा समज असा आहे कीं, सोलापुरांतील युरोपियन, युरेपियन लोकांचीं बायकामुलें स्टेशनवर पोंचवितां यावीं किंवा सुरक्षित रहावीं म्हणून सवड मिळण्याकरितां लोकांचीं मनें दुसरी-कडे व्यग्र होण्याकरितां, किंवा दहशत, दरारा बसविण्याकरितां शहरभर फिरून गोळीबार करण्यासाठीं पोलिसांना मोकाट सोडण्यांत आलें असावें. व असें असेल तर पहिल्या प्रसंगाला अनुलक्षून पोलिस अधिकाऱ्यांविषयीं जी क्वचित् सहानुभूति वाटते ती हा दुसरा प्रकार लक्षांत आला म्हणजे सर्वस्वीं नष्ट होते.

असो. सोलापूर शहरांत झालेल्या गोळीबाराचा हा प्रकार इतका भयंकर आहे कीं, त्याला ब्रिटिश राज्यांतील अलीकडच्या कारभारांत दाखला मिळणें जवळजवळ अशक्य आहे. मोठा दंगा सुरू असतां किंवा दंग्याचा संभव असतां, भान न राहून किंवा फाजील भीति वाटूनहि, हुकूम असतां किंवा नसतांहि एखादे वेळीं पोलीस गोळीबार करील, आणि तें विशेष परिस्थितीप्रमाणें कमीअधिक क्षम्यहि ठरेल. परंतु सोलापूर शहरांत झालेल्या या गोळीबाराला जुना दाखला सांपडणें जसें कठीण, तसेंच त्याचा उलगडा करण्यासारखें समर्थनकारक कारण सांपडणेंहि कठीण आहे. आम्हाला तरी एकच कारण सुचतें तें आम्हीं वर सुचविलेंच आहे. तें असें कीं, गांवांतील लोकांना दहशत उत्पन्न व्हावी ! पण ज्यांना दहशत उत्पन्न करावयाची तो एखादा बिथरलेला जमाव असता किंवा गुप्तपणें हल्ले करणारा बदमाशांचा मोहला असता, तर गोष्ट वेगळी होती. पण या ठिकाणीं दंग्याला व धामधुमीला भिऊन घरीं बसलेल्या किंवा नित्याच्या व्यवहारांत गुंतलेल्या अशा निरपराधी स्त्री-पुरुषांवर आबाल-वृद्धांवर दिवसाढवळ्या जाणून–बुजून नेम धरून गोळ्या झाडण्यांत आल्या,

तेव्हां याला भेदरटपणामुळें उत्पन्न झालेला क्रूरपणा याशिवाय दुसरें नांव देतां येत नाहीं !

या सर्वांला सोलापूरचे डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेट व कलेक्टर हेच सर्वस्वीं जबाबदार आहेत, व सरकारहि ही गोष्ट कबूल करील. परंतु ही गोष्ट अशी नुसती कबूल करून काय उपयोग ? अर्थात् मुंबई सरकारच्या न्यायप्रियतेच्या किंबहुना साध्या माणुसकीच्याहि परीक्षेची ही वेळ आहे. लोकपक्षाकडील अपराध्यांना ते कधींहि दया दाखवीत नाहींत. किंबहुना इभ्रतीच्या नांवाखालीं खुनशीपणानें अपराध्याबरोबर निरपराध्यांनाहि ते रगडून चिरडतात. पण आतांचा हा उलट प्रसंग त्यांच्यावर आहे. या वेळीं त्यांनीं सरकार पक्षाकडील जे निरपराधी लोक असतील त्यांना उगीच कांहीं दोष लावावा किंवा शिक्षा करावी असें आमचें म्हणणें नाहीं. परंतु सोलापूर शहरांतील या भयंकर अमानुष गोळीबाराला हुकूम कोणीं दिला, कां दिला, गोळीबार झाला, तो हुकुमाला धरून झाला कीं सोडून झाला, आणि या बेछूट गोळीबाराबद्दल जबाबदार अधिकाऱ्यांना सरकार योग्य शिक्षा करण्याला तयार आहे कीं नाहीं, हाच प्रस्तुत महत्त्वाचा मुद्दा आहे.

जबाबदारी अंगीं भिडवावयाची व शिक्षा करावयाची तर ती गोष्ट चौकशीशिवाय कशी होणार ? म्हणून मुंबई-सरकारला आमची अशी सूचना आहे कीं त्यांनीं या प्रकरणाची स्वतंत्र व जाहीर चौकशी करावी, व लपवाछपवीच्या संशयाला यत्किंचितहि जागा ठेवूं नये. पण या सर्व पराधीन गोष्टी होत. म्हणून स्वाधीनच्या अशाहि एक दोन गोष्टी आम्ही लोकांना सुचवितों. पहिली ही कीं, सरकारकडून या प्रकरणीं हवीतशी समाधानकारक चौकशी होत नाहीं असें दिसून आल्यास, 'महाराष्ट्र प्रांतिक काँग्रेस कमिटीनें' आपण होऊन एक चौकशी कमिटी नेमावी. दुसरी गोष्ट ही कीं, ज्या लोकांना या गोळीबारानें जखमा झाल्या त्यांनीं स्वतः, किंवा ते मेलेले असल्यास त्यांच्या वारसांनीं सरकारावर योग्य त्या मार्गानें फौजदारी फिर्यादी गुदराव्या किंवा दिवाणी दावे लावावे. पैकीं फौजदारी फिर्यादींचें काय होईल हें सांगतां येत नाहीं. परंतु दिवाणी कोर्टांत तरी फिर्यादी खास चालतील व त्यांतील साक्षीपुरावा ही या प्रकरणांतील एक प्रकारची चौकशीच ठरेल. आणि तींत बहुतेक सगळा खरा प्रकार उघडकीस येऊन जनतेला नोकरशाहीच्या कारभाराचें स्वरूप कळेल.

———

# ८९ सोलापुरांतील अत्याचारपरंपरा

( केसरी, ता. १७ मे १९३८ )

सोलापुरांत गेल्या आठ दिवसांत जे प्रकार झाले, व त्यानंतर अजूनहि होत आहेत, त्याबद्दल खेद तर वाटतोच, पण संतापहि येतो. प्रथम शिंदी बागेजवळ व नंतर गांवांत मवाली लोकांनीं जे अत्याचार केले त्याबद्दल त्यांना जागच्या जागीं गोळीबारानें कांहीं थोडें प्रायश्चित्त मिळालें. त्यानंतर लोकनिंदेचें प्रायश्चित्त तें एकसारखें भोगीत आहेत, व नेहमीं भोगीतच राहतील. आधीं त्यांना काँग्रेस कमिटीनें ठरविल्याशिवाय शिंदीचीं झाडें तोडण्याचें कारण नव्हतें. पण त्यांतूनहि त्यांना हुल्लड करण्याची आयत्या वेळीं लहर आली, पोलिसांवर दगडफेक झाली, व उलट पोलिसांनीं गोळीबार केला. या सर्व गोष्टी जशा आकस्मिक घडल्या, त्याप्रमाणें त्या जागच्या जागींच राहावयास पाहिजे होत्या. त्यांचा सूड त्यांनीं निरपराधी पोलिसांवर काढून काय मिळविलें हें समजत नाहीं. तसेंच कोर्टांतील कागदपत्रांनीं या मवाली लोकांना चीड येण्यासारखें काय केलें होतें ? ते जाळून त्यांनीं सोलापूर जिल्ह्यांतील लोकांचें नुकसान किती केलें याला सीमाच नाहीं. म्हणून नसत्या कामांत हात घालून तें बिघडविणाऱ्या, गोळीबारापर्यंत मजल आणणाऱ्या व तेथून पळून येऊन कशास कांहीं संबंध नाहीं असले अत्याचार करणाऱ्या, या गुन्हेगारांना पकडून सरकार जेवढी शिक्षा देईल तेवढी थोडीच होईल.

पण हें सर्व बाजूस राहून हत्यारी पोलिसांनीं व त्यांना हुकूम देणाऱ्या डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेटांनीं या मवाली लोकांवरहि ताण केली. म्हणजे पोलिसांनीं शहरांतल्या निरनिराळ्या भागांत हिंडून सरकार किंवा चळवळे यापैकीं कोणाशीं कांहींहि संबंध नसणाऱ्या निरपराधी लोकांवर झाडावरचीं पाखरें मारावीं त्याप्रमाण गोळ्या झाडून पोरेंबाळेंहि हकनाक मारलीं. आणि आतां त्यानंतर 'चोराच्या उलट्या बोंबा' या न्यायानें शहरांत लष्करी कायदा सुरू केला ! तेव्हां सरकारी अधिकाऱ्यांचें हें वर्तन मवाली लोकांपेक्षांहि अधिक निंद्यच ठरत नाहीं काय ? त्यांतल्या त्यांत भेदरून गेलेल्या सोलापुरांतील कलेक्टरसाहेबांची व पोलिसांची गोष्ट एक वेळ असो; पण महाबळेश्वरासारख्या थंड हवेंत सुरक्षित पर्वतशिखरावर, सोलापुरापासून १००-१२५ कोस दूर व आपल्या खास परिवारांत असणाऱ्या गव्हर्नरसाहेबांचीहि बुद्धि चळली किंवा भ्रष्ट झाली असली

पाहिजे असेंच आम्हाला वाटतें. कारण पहिली गोष्ट, त्यांनीं व्यक्तिशः सोलापुरास पाठविलेला सहानुभूतीचा संदेश; व दुसरी गोष्ट, सोलापुरांत लष्करी कायदा पुकारण्याला त्यांनीं दिलेली संमति.

प्रथम संदेशाची गोष्ट घेऊं. या संदेशांत ते सोलापुरांतील अधिकाऱ्यांच्या व पोलिसांच्या बहादुरीची तारीफ करितात. आणि त्यांना या दंग्यांत जें दुःख सोसावें लागलें त्याबद्दल सहानुभूति दाखवितात. वरिष्ठ अधिकाऱ्यांनीं कनिष्ठ अधिकाऱ्यांशीं व नोकरांशीं अशा प्रसंगांत सहानुभूति दाखविणें ही गोष्ट क्रमप्राप्त व माणुसकीचीच होय. जे बिचारे पोलीस जवान मवाली लोकांनीं मारले त्यांच्या कुटुंबाच्या पाठीवरून अशा संकटांत गव्हर्नरसाहेबांसारख्यांनीं सहानुभूतीचा हात फिरविणें, व त्यांच्या सांत्वनार्थ दोन शब्द बोलणें हें सर्वथा योग्यच आहे. इतकेंच नव्हे तर मयतांच्या कुटुंबांना व आश्रितांना देणग्या, पेन्शनें रीतीप्रमाणें द्यावयाचीं तींहि दिलींच पाहिजेत. पोलिस खातें हें इतर कांहीं वेगळ्या कारणांनीं अप्रिय असलें तरी, त्याच्यावर जसे बिकट प्रसंग एखादे वेळीं येतात तसे इतर कोणत्याहि खात्यांतील नोकरांवर येत नाहींत. गांवांत कोठें दंगा झाला तर मारांतील पहिली काठी त्यांच्यावर पडावयाची. खुनी, डकाईत, बेफाम, बेहोष झालेले किंवा जिवावर उदार झालेले लोक हे पोलिसांचे नित्य वैरी. आणि पोलीस हे जरी एखादे वेळीं स्वतःच शांतता मोडण्याला कारणीभूत होतात, तरी लोक एरवीं जी शांतता भोगतात तिचें श्रेय व ती संभाळण्याची जबाबदारी ही पोलिसांवरच असते, म्हणून त्यांच्या पक्षपाताचा एखादा अधिक शब्द सरकार बोललें, किंवा त्यांच्या सुखसोईवर एखादा अधिक रुपाया सरकारनें खर्च केला तर लोक तो क्षम्यच मानतात.

हें सर्व सविस्तर सांगण्याचें कारण इतकेंच कीं, सोलापूरच्या पोलिसांना उद्देशून, गव्हर्नरसाहेबांनीं जो सहानुभूतीचा संदेश पाठविला तो त्या पुरता योग्यच होता, असें जरी आम्हाला फिरून म्हणावेसें वाटतें, तरी हें म्हणतांना त्याबरोबर आम्हाला दुसरीहि एक गोष्ट म्हटल्याशिवाय राहावत नाहीं. ती ही कीं, सोलापूर शहरांतील ज्या निरपराधी लोकांची कत्तल झाली, त्यांच्या कुटुंबाश्रितांसंबंधानें तशाच प्रकारचे सहानुभूतीचे शब्द गव्हर्नरसाहेबानीं या संदेशांत घालावयास पाहिजे होते. व ते घातले गेले नाहींत ही गव्हर्नरसाहेबांच्या हातून मोठी घोडचूक किंबहुना फार मोठा नैतिक गुन्हा घडला असें

आम्ही स्पष्ट म्हणतों. पोलीस जवानाप्रमाणें शहरांत मारले गेलेले लोक हीं देखील माणसांसारखीं माणसेंच होत. दोघेहि सारखेच निरपराधी असून, अनुकंपनीय अशा स्थितींत मारले गेले. मयत पोलीस हे सरकारचे नोकर असतील; पण पोलिसांच्या गोळ्या खाऊन मेलेले लोक ही सरकारची प्रजा नव्हे काय ? अर्थात् एकाची जशी आठवण गव्हर्नरसाहेबांना झाली तशीच व त्याबरोबरच या दुसऱ्यांचीहि होणें अवश्य किंबहुना साहजिकहि होतें.

कोणी कदाचित् म्हणेल कीं, सोलापूर शहरांत झालेल्या गोळीबाराची व कत्तलीची बातमी गव्हर्नरसाहेबांच्या कानावरच गेली नसेल तर त्यांनीं काय करावें, पण असल्या दुर्घ शंकेला आमचें मन थाराच देऊं शकत नाहीं. सोलापुरांतून जे सरकारी रिपोर्ट गव्हर्नरसाहेबांकडे गेले असतील त्यांत या कत्तलीची गोष्ट सर्वस्वीं छापविली जाणें अशक्य आहे. लोकवार्ता अशी आहे कीं, झालेल्या प्रकाराबद्दल कलेक्टरसाहेबांना मागाहून वाईट वाटलें; व "त्याची जबाबदारी मजवर आल्याशिवाय राहत नाहीं " असे उद्गार त्यांनीं सोलापुरांतील कांहीं पुढाऱ्यांजवळ काढले. याचा अर्थ या कत्तलीची मागाहूनची माहिती कलेक्टरसाहेबांना होती असें असून, जर त्यांनीं ती आपल्या रिपोर्टांत लिहिली नसेल तर फारच बहार म्हणावयाची ! असल्या भयंकर सत्यावर आणि उघडाउघडी घडलेल्या घोर प्रसंगावर पांघरूण घालूं पाहणाऱ्या अधिकाऱ्यानें ताबडतोब रजा घेतली पाहिजे, व आपला राजीनामा पाठविला पाहिजे, निदान गव्हर्नरसाहेबांनीं तरी त्यांच्याकडून तो ताबडतोब घेवविला पाहिजे.

पण सोलापुराहून महाबळेश्वरला खरी बातमी जाण्याचें हें एक दार मूर्खपणानें असें बंद करण्यांत आलें असें मानलें तरी, बातमी पसरण्याचीं बाकीचीं सर्व द्वारें अशींच बंद झालीं असतील काय ? सोलापूरच्या कलेक्टरसाहेबांप्रमाणें मुंबईच्या एका ' टाईम्सनें ' हि अशीच छपवाछपवी केली असली तरी सोलापुरापासून मुंबईपर्यंतचीं इतर अनेक वर्तमानपत्रें आज आठवडाभर ओरडत आहेत त्याची वाट काय ? मुंबईच्या ' क्रॉनिकल ' पत्रांत ही हकीकत आली आहे. ' कर्मयोगी ' पत्रानें तर नांव, गांव, ठावठिकाणा देऊन तपशिलाची कांहींच बाकी ठेविली नाहीं. ' केसरी' च्या मागील अंकांत तो आम्हीं उतारा सर्व जशाच्या तसा दिला आहे. मग असा जाहीर गवगवा होत असतां त्याची बातमी गव्हर्नरसाहेबांपर्यंत जात नाहीं, तर मग सरकारचे डोळे व कान

हे दोन्ही फुटले कीं, काय ? किंवा या दोन अवयवांची कामगिरी ज्यांनीं बजावा-वयाची ते मेले कीं काय ? खरोखरच अशी जाणून बुजून विपरीत कल्पना केल्याशिवाय सोलापुरांतील कत्तलीची गोष्ट गव्हर्नरसाहेबांच्या कानांवर गेली नसेल अशी दुसरी कल्पना आम्हांस करवत नाहीं.

मग एकच प्रकार उरला. तो म्हणजे, गव्हर्नरसाहेबांना ही बातमी कळली होती; पण आपल्या सहानुभूतीच्या संदेशांत तिला अनुरूप असा उल्लेख त्यांनीं जाणूनबुजून केला नाहीं. आणि हें खरें असेल तर मग त्याविषयीं काय म्हणावें हेंच आम्हांस कळत नाहीं ! गव्हर्नरसाहेब हे अधिकारानें थोर असतील. पण ते माणुसकीला पारखे झाले, किंवा इभ्रतीच्या खोट्या कल्पनेनें त्यांच्या मेंदूला घेरलें, असले सौम्यांतले सौम्य शब्द तरी उच्चारल्याशिवाय आम्हांस रहावत नाहीं. सोलापुरांत मारल्या गेलेल्या पोलिसांबद्दल आम्हांला किती हळहळ वाटते हें आम्हीं वर दर्शविलेंच आहे. पण गव्हर्नरसाहेबांचा हा उघड पक्षपात, ही अक्षम्य कर्तव्य–विन्मुखता व त्यांनीं साध्या माणुसकीलाहि दिलेली रजा, या गोष्टी लक्षांत आल्या म्हणजे शांत डोक्याच्याहि हिंदी मनुष्याचें रक्त सळसळून वर डोक्याकडे धांव घेऊं लागतें. मग स्वभावतःच डोकें तापट असणाऱ्या लोकांना काय वाटलें असेल याची कल्पनाच करावी.

गांवांतील गोळीबाराचा व निरपराधी लोकांच्या मृत्यूचा उल्लेख आपल्या संदेशांत केला तर, ती हत्यारी पोलिसांच्या किंवा कलेक्टरसाहेबांच्या चुकीची कबुली दिल्यासारखी होईल, अशा कायदेपंडितगिरीच्या सावधपणाची सूचना त्यांना मिळाल्यामुळें हा उल्लेख त्यांनीं टाळला असेल, तर ती सूचना देणाराचा व घेणाराचा दोघांचाहि आम्ही धिःकारच करितों. पण त्यांतल्या त्यांत सूचना स्वीकारणाराचा. कारण कायदेपंडित हा फक्त कायद्याचें धोरण जाणतो, व त्याची जबाबदारी तितक्यावरच संपते. पण कोट्यवधि प्रजेचे प्राण ज्यांच्या हातीं ईश्वरानें दिले, त्यांना कायदेपंडितांप्रमाणें संकुचित किंबहुना क्षुद्र मनोवृत्ति ठेवून चालणार नाहीं. आणि त्यांनीं तशी ठेवली तर तिला अधम हें विशेषण लावल्याशिवाय लोक राहणार नाहींत. सोलापुरांत जे लोक मारले गेले ते काय हिंस्रपशु होते ? कीं घातक जनावरें होतीं ? कीं सशस्त्र दंगेखोर होते ? होते तरी कोण ? पोलिसांनीं गोळ्या घालून त्यांना मारावें असा त्यांनीं सरकारचा अपराध तरी कोणता केला होता ?

गव्हर्नरसाहेबांच्या या चुकीबद्दल आणखी लिहिण्याचें कारण नाहीं. पण सोलापुरास लावलेल्या लष्करी कायद्यासंबंधानें आजच काय, आणखी कांहीं दिवसहि लिहावें बोलावें लागणार आहे. लष्करी कायदा लावला याचा अर्थ मुलकी सत्ता पुरी पडत नाहीं, म्हणून ती तहकूब करून तिच्या जागीं लष्करी सत्ता सुरू केली. पण खरोखरीच मुलकी सत्ता अपुरी पडूं लागली याचा पुरावा काय? पहिल्या दिवशीं आयत्या वेळीं अभावितपणें कलेक्टरसाहेब व पोलिस सुपरिंटेंडंट यांच्यावर दगडफेक झाली, व पोलीस जवान मारले गेले. पण तेथपासून पुढें शहरांत लोकांनीं कोठेंहि दंगा केलेला ऐकिवांत नाहीं. एका चौकींत कोणी नाहीं असें पाहून चार भुरटे लोक शिरून त्यांनीं कांहीं सामान जाळलें इतकेंच. पण ही गोष्ट देखील होण्याचें कारण साधा पोलीस बंदोबस्त जितका ठेवला जावा तितकाहि ठेवला गेला नाहीं. होते ते पोलीस कांहीं बंगले व स्टेशनची बाजू यांच्या संरक्षणास गुंतवून शहर मोकळें सोडण्यांत आलें होतें. तथापि कांहीं दंगा न होतां शहराच्या व बाहेरून आलेल्या लोकांच्या प्रयत्नानें दुकानें व गिरण्या उघडून व्यवहार कामधंदा चालू व्हावा असे प्रयत्न सुरू होते. व त्यालाच सरकाराकडून आश्वासनपर असें थोडें-अधिक पाठबळ मिळतें तर लवकरच सर्व घडी फिरून बसली असती. अँग्लो-इंडियन पत्रांतूनहि सोलापूर आतां शांत आहे अशीं वर्णनें येऊं लागलीं होतीं. असें असतां लष्करी कायदा पुकारण्याचा बूट कां निघावा हें समजत नाहीं.

लष्करी कायदाच एकदां पुकारला गेला म्हणजे मनांत भय उत्पन्न करण्यासारखे नवे कायदे करण्यांत येतात, व गांवांत लष्करी नाकेबंदी व शांतता होते. अर्थात् हें लष्करी कायद्याचें स्वतःप्रामाण्य झालें; पण लष्करी अंमल बसविला गेला तें योग्य झालें असें ज्यावरून म्हणतां येईल अशीं कृत्यें गुरुवार सकाळनंतर लोकांनीं कोणतीं केलीं किंवा प्रवृत्ति दाखविली! लष्कराचा प्रत्यक्ष पराक्रम आतांपर्यंत गांधी टोप्या हिसकावून घेणें, इमारतविर उभारलेलें बिचारें राष्ट्रीय निशाण उपटणें यापलीकडे फारसा गेला नाहीं. अशा स्थितींत दहा वर्षांपर्यंत सक्तमजुरीची शिक्षा देण्यासारखे नवे गुन्हे निर्माण करून, त्यांचा इन्साफ कोर्ट-मार्शलकडून करवावा, आणि लोकांना शहर सोडून जाण्यापर्यंत पाळी आणावी, यानें मुलकी अधिकाऱ्यांची काय अब्रू वाढली असेल किंवा पोलिसांच्या इभ्रतींत काय भर पडली असेल हें सरकारासच माहीत! आमच्या मतें तर नालायक

ठरलेल्या सोलापूरच्या कलेक्टराची तावडतोब बदली करून, त्याच्या जागीं अधिक सुजाण, समंजस, सहानुभूतिपर व आत्मविश्वासु अधिकारी नेमण्यांत आला असता तर त्यानें अवघ्या दोन दिवसांत सगळी घडी पुनः बसविली असती. लोकहि असेंच बोलतात. बाकी चालू चळवळीला दूषण आणून विलायतेंतील आधींच बावरलेल्या लोकांना आणखी बावरावयास लावण्याला या लष्करी कायद्याचें मोठेंच सहाय्य झालें असेल हें काय सांगावयास पाहिजे!

सोलापुरास लष्करी कायदा सुरू होऊन अवघे दोन तीन दिवस झाले आहेत. या कायद्याच्या अंमलबजावणीसंबंधानें कांहीं भागांत विशेष तक्रारी नाहींत; पण दुसऱ्या कांहीं भागांत नुसता कहर उसळून गेला आहे. आतांपर्यंत आलेल्या बातमीवरून असें दिसतें कीं, संध्याकाळीं सातानंतर चुकून फिरकल्याबद्दल कारखान्यांतील लोकांसहि अटक करण्यांत येते. दुकानें बंद ठेवणारांना व दुकानें उघडूं जाणारांसहि वेगवेगळ्या प्रकारानें त्रास होतो. कित्येकांचीं घरें वेगवेगळ्या कारणाकरितां बिन परवानगीनें ताब्यांत घेतलीं आहेत, किंवा फोडण्यांतहि आलीं आहेत. आतांपर्यंत अनेक लोकांना कैदेंत ठेऊन सोडण्यांत आलें व कांहींना फटकेहि मारण्यांत आले. प्रत्यक्ष खटले होऊन निकाल झालेल्यापैकीं कॉंग्रेस कमिटीचे अध्यक्ष शेठ रामकृष्ण जाजू यांस ७ वर्षें, कमिटीचे चिटणीस ए. तुळशीराव जाधव यांस १० वर्षें, व्यंकटेश गणेश देशपांडे यांस ७ वर्षें, व रु. २००० दंड, जंगम अय्या यांस २ वर्षें व रु. १००० दंड, कांहीं प्रमुख स्वयंसेवकांना कोणास २ वर्षें तर कोणास १ वर्ष, आणि सोलापूर म्युनिसिपालिटीचे अध्यक्ष शेठ माणिकचंद यांना ६ महिने व १००० रु. दंड अशा शिक्षा देण्यांत आल्या असें समजतें! अर्थात् या सर्व बातम्या आमचेकडे कर्णोपकर्णीं आल्या तशा दिल्या आहेत. त्यांत कांहीं चुकाहि असण्याचा संभव आहे. परंतु दोनतीन ठिकाणांहून बातम्या कळल्या त्या जवळ जवळ एकाच प्रकारच्या म्हणून दिल्या आहेत. कोणीं अशा बातम्या प्रसिद्ध न केल्या तरी लष्करी कायद्याच्या अमलांत काय प्रकार घडतात याचा सन १९१९ सालचा पंजाबचा अनुभव लोकांना आहेच. अविश्वसनीय बातम्या पसरूं नयेत अशी सरकारास इच्छा असणारच. तरी त्यांनीं डायरेक्टर ऑफ इन्फर्मेशनकडून सोलापुरांतील रोजच्या वृत्तांताचें एखादें टिपण अवश्य प्रसिद्ध करीत जावें. हा कायदा सोला-

पुरांत किती दिवस अमलांत राहणार याची कोणासच कल्पना होत नाहीं तथापि तो जितका लवकर संपेल तितकें सर्वांनाच इष्ट असल्यामुळें, सोलापुरांतील पुढाऱ्यांना विश्वासांत घेऊन सरकारनें लवकरच निश्चित धोरण ठरवावें.

---

## ९० सोलापुरांतील लष्करी कायद्याची मीमांसा

( केसरी, ता. २४ मे १९३० )

सोलापुरांत लष्करी कायदाच सुरू असल्यामुळें गांवच्या लोकांचीं तोंडें बंद झालीं तर त्यांत काय नवल ? कोणाला कशा स्थितींत पिटमार होते व कोणाची कशाकरितां धरपकड होते याची जी माहिती बाहेर आली आहे, तिजवरून पाहतां सोलापुरांत मुठींत जीव धरून जे लोक आजवर नुसते राहिले, बाहेर गेले नाहींत, त्यांच्या धैर्याचें कौतुकच करावें अशी तेथील स्थिति आहे. मग ते बोलणार काय ? कोणाशीं कसें बोलणार ? आणि बोलून तरी त्याचा काय उपयोग होणार ! परंतु सुदैवानें स्टेशनावर लष्करी नाकेबंदी झालेली नसल्यामुळें सोलापुराहून मनुष्याला बाहेर पडतां येतें. त्यामुळेंच जी काय माहिती हल्लीं बाहेर समजते ती समजत आहे. मुंबईचीं दैनिक वर्तमानपत्रें सोलापुराविषयीं फारशी बातमी प्रसिद्ध करीत नाहींत. याचें कारण कांहीं पत्रें सरकारपक्षपाती असून त्यांना तेथें घडणाऱ्या सर्व अत्याचारावर मुद्दाम पांघरूण घालावयाचें आहे. आणि इतर पत्रें आपले दूत किंवा बातमीदार सोलापुरास पाठविण्याला सहजच धजत नाहींत. असोशिएटेड प्रेस, फ्री प्रेस, यांच्या नेहमींच्या बातमीदारांचें काम या दहशतीनें जवळ जवळ थांबलें आहे. तार ऑफिस व टपाल ऑफिस यांवर लष्करी नियंत्रण आहे. तात्पर्य, विश्वसनीय अशी सार्वजनिक बातमीच काय, पण जे स्थानिक लोक लष्करी कायद्याच्या अमलांत सांपडले आहेत त्यांच्या आप्तेष्टांनाहि यांच्याविषयीं कांहींच बातमी कळत नाहीं. यामुळें आज दुसरीकडे दिलेल्या हकीकतींत सांगितल्याप्रमाणें गांवच्यागांवांत अधिकाऱ्यांना तारा करून ही माहिती मागवावी लागते. आणि अशा तारांचीं उत्तरें दिलीं जातात हीच मोठी कृपा असें समजण्याची वेळ आली आहे.

### खासगी द्वेषाचा सूड

आतांपर्यंत सोलापुरांत सुमारें २५ लोकांवर लष्करी कायद्याप्रमाणें खटले भरून जबर शिक्षा देण्यांत आल्या. कॉंग्रेस पक्ष, राष्ट्रीय पक्ष, किंवा राजकार-

णांत दुरून जवळून लक्ष घालणारा कोणीहि भला मनुष्य, किंवा राजकारणास मदत करणारा श्रीमान् व्यापारी, किंवा स्थानिक स्वराज्य संस्थेंत लोकपक्षातर्फे भांडणारा, किंवा हिंदु-महासभेच्या चळवळींतील कोणीहि कार्यकर्ता, यांपैकीं कोणीहि सोलापुरांत शिल्लक ठेवावयाचा नाहीं असा लष्करी अधिकाऱ्यांचा निश्चय दिसतो ! पण त्यांना ही माहिती स्वतःची असणें अर्थातच शक्य नाहीं. म्हणून सरकारी किंवा बिन-सरकारी चहाडखोर लोक ज्यावर वहीम सांगतील व अंदेशा घेतील त्यांना सहजच अटक करण्यांत येते व त्यांच्यावर खटलाहि भरण्यांत येतो. म्हणजे चालू धरपकडींत जितका राजकारणाचा तितकाच खाजगी द्वेषाचा सूड उगविण्यांत येत असला पाहिजे हें अगदीं उघड आहे. याशिवाय मोकाट सुटलेल्या लष्कराच्या अमलांत जे जे गुन्हे सामान्यतः होतात असा अनुभव आहे ते सर्व थोड्याबहुत प्रमाणानें सोलापुरांत घडले आहेत व घडत आहेत- त्यांची नांवनिशी आम्ही आज सांगत बसत नाहीं. परंतु स्वातंत्र्य, वित्त व अब्रू या तिन्ही गोष्टी सोलापुरांत आज संकटांत सांपडल्या आहेत इतकी गोष्ट मात्र खरी.

## लहर लागेल ती शिक्षा

याविरुद्ध दाद मागण्यासंबंधानें तर बोलावयासच नको ! लष्करी कायदा चालू असतां खटले चालतात ते सर्व नेहमींच्या फौजदारी कोर्टापुढें असें विधान एका वर्तमानपत्रांत करण्यांत आल्यामुळें, पुष्कळांचा गैरसमज झाला. पण खरी स्थिति तशी नाहीं. लष्करी कोर्टेच इन्साफ करतात यामुळें वकील मुक्त्यार तर कोणीं घेतला जात नाहींच; परंतु स्वतः आरोपींचें म्हणणेंहि नीट ऐकून घेतलें जात नाहीं अशी बोलवा आहे. उघडच आहे. साक्षी पुराव्याची नेहमींची भानगड सरकारला ठेवावयाची असती तर त्यांनीं लष्करी कायदाच पुकारला नसता. तो पुकारण्यानें ती भानगड कांहींच उरली नाहीं. ज्यावर दृष्टि पडेल तो गुन्हेगार. मनाला भासेल तो पुरावा. आणि लहर लागेल ती शिक्षा ! अटकेपासून शिक्षेपर्यंत सर्व ग्रंथ झटपट रंगारी पद्धतीनें फार थोड्या वेळांत उरकून लष्करी अधिकारी मोकळे ! अशा स्थितींत किती अन्याय होत असेल याची कोणीहि कल्पना करावी.

पण येथें न्यायाचा प्रश्न कल्पनेनेंहि मनांत आणणें हीच मुळांत चूक होय. कारण लष्करी कायदा लावण्यांत आला तो जेथें केवळ सूड घेण्याच्या व दरारा

उत्पन्न करण्याच्या बुद्धीनें लावला तेथें न्यायाचा प्रश्न कसला ? किंबहुना "अन्याय जितका मोठा किंवा शिक्षा जितकी जबर तितका दरारा अधिक" या सूत्राप्रमाणें सर्व कारभार करण्याचें सरकारानें ठरविलें म्हणूनच लष्करी कायदा लावण्यांत आला. पण हें करतांना पंजाबांत १९१९ सालीं सरकाराच्या हातून घडलेल्या चुकीचीच येथें पुनरावृत्ति झाली आहे.

## लष्करी कायद्याच्या मर्यादा

" बंड पुढें होईल अशीं चिन्हें उघड दिसत असलीं तरीहि, केवळ प्रतिबंधक उपाय म्हणून, लष्करी कायदा आगाऊ लावतां येत नाहीं. तसेंच बंड मोडल्यावरहि एक दिवसदेखील लष्करी कायदा अमलांत राहतां कामा नये. " बंड मोडेपर्यंत जे गुन्हे लष्करी कायद्याप्रमाणें घडतील त्यांचाच इनसाफ व निकाल लष्करी कायद्याप्रमाणें चालावा हें ठीकच आहे. पण बंडखोरीची जबरदस्ती संपली म्हणजे लष्करी कायदा लगेच बंद करण्यांत यावा, आणि उरलेल्या गुन्ह्यांचा इनसाफ नेहमींच्या न्यायकोर्टांकडून करावा, असें लष्करी कायद्याचें मुख्य तत्त्व आहे. याचें कारण असें कीं पोलिसांच्या एकवटलेल्या मदतीनें मुलकी सरकाराकडून होणारा बंदोबस्त, आणि सामान्य म्हणजे चिरप्रतिष्ठित न्यायकोर्टांकडून होणारा इनसाफ, हा नियम मानण्यांत यावा. आणि या दोहोंना कांहीं वेळ नष्ट करणारा लष्करी कायदा हा अपवाद समजण्यांत यावा. हेंच सुधारलेल्या, म्हणजे स्वतःच जुलमी रानटी म्हणवून न घेणाऱ्या, राज्यपद्धतीचें मुख्य लक्षण समजलें जातें. व यामुळेंच लष्करी कायद्याच्या वर सांगितलेल्या मर्यादा सिद्ध होतात.

लष्करी कायदा हा बंडाच्या आधीं प्रतिबंधक उपाय म्हणून कां योजूं नये ? तर त्याचें उत्तर असें कीं मुलकी अधिकारी व पोलीस यांनीं हात टेकले, बुद्धि शक्ति युक्ति या सर्वांचें दिवाळें निघालें, व आमचें आतां रक्षण करा अशी त्यांनीं शरणचिठ्ठी लिहून दिली, असा अर्थ लष्करी कायदा लावण्याचा होतो. स्वाभिमानी मुलकी अधिकारी व आत्मविश्वासू पोलीस अब्रूची काळजी करणारे असतात. म्हणून अशी शरणचिठ्ठी जिवावर बेतेपर्यंत किंवा जिवावर बेतलें तरी ते सहसा देत नाहींत. आणि त्यांनीं ती दिली नसतां त्यांचें राज्य लष्करी अधिकाऱ्यांच्या स्वाधीन करणें यासारखा त्यांचा दुसरा मोठा अपमान नाहीं. तसेंच बंड संपल्यावर, म्हणजे नेहमींचीं न्यायकोर्टें आपलें काम चालविण्याला समर्थ

होतांच, त्यांच्या इन्साफाचा अधिकार परत त्यांजकडे दिलाच पाहिजे. न दिला तर तो त्यांचाहि अपमान होय. या दुहेरी कारणामुळें लष्करी कायद्याच्या मर्यादा सहजच संकुचित होतात.

## लष्करी कायद्याचें कारण नव्हतें

वरील तत्त्वें लावून पाहिलीं असतां कोणीहि स्पष्ट असेंच म्हणेल कीं, सोलापुरांत लष्करी कायदा लावण्याचें मुळींच कारण नव्हतें. दोनतीन पोलीस मारले गेले ही गोष्ट खरी. पण पूर्वीं इतर ठिकाणच्या दंग्यांतूनहि अशा गोष्टी घडल्या आहेत. पण तेवढ्यावरून तेथें लष्करी कायदा पुकारला गेला नाहीं. ज्या दिवशीं पोलीस मारले त्याच दिवशीं न्यायकोर्टें जाळण्यांत आलीं हें खरें. पण हे प्रकार इकडे चालू असतांच तिकडे गांवांत पोलिसांनीं व लष्करी व्हॉलंटीयरांनीं बेदरकार गोळीबाराचा अत्याचार इतका केला कीं, तिसरे प्रहरपासून शहर सामसूम झालें व त्यानंतर जबरदस्ती अत्याचार झाला नाहीं. निदान न आवरण्यासारखा तर मुळींच झाला नाहीं. खुद्द गुरुवारीं जीं न्यायकोर्टें जाळण्यांत आलीं त्यासंबंधीं लोकवार्ता अशी आहे कीं, दोन तीन तास स्वस्थपणें हा प्रकार सुरू असतां, व इतर ठिकाणीं विशेष गुंता नसतां, पोलीस अधिकारी न्यायकोर्टांकडे फिरकलेहि नाहींत. कोणी असेंहि म्हणतात कीं, एका वरिष्ठ हिंदी न्यायाधिशानें हा चाललेला प्रकार पाहून, तो थांबवितां येईल अशा विश्वासानें, कलेक्टरसाहेबांकडे पोलिसांची मदत मागितली; व ती न मिळाल्यामुळें त्यानें हायकोर्ट व मुंबईसरकार यांजकडे तशा ताराहि केल्या. यांतील खरें खोटें कांहींहि असो, परंतु कोर्टांच्या इमारती व कागदपत्र जाळले जात होते त्या अवधींत पोलीस तिकडे फिरकले नाहींत ही गोष्ट निश्चित म्हणतात.

दुसरे दिवशीं एक मिरवणूक निघाली अशी बोलवा आहे. पण ती थोड्या लोकांची व त्यांच्या हातांत काठीहि नव्हती. या लोकांनीं कदाचित् १४४ कलमाचा गुन्हा केला असेल. पण त्यांना सहज अटक करतां आली असती. दुसऱ्या दिवशीं एका पोलीस चौकींतील कांहीं कागद कोणी बाहेर आणून जाळल्याचें सांगतात. परंतु त्याचेंहि कारण पोलिस लोक चौकी बिनवारशी मोकळी सोडून गेले होते म्हणून ! पोलीस हजर असतां जबरदस्तीनें ती गोष्ट घडली असा प्रकार नाहीं. या दोन प्रसंगांखेरीज दुसरें कोणतेंहि जुलूमजबरदस्तीचें किंबहुना बेकायदा असेंहि कृत्य कोणाकडून घडल्याचें ऐकिवांत नाहीं. मग ता. ८ रोजीं, एका

अत्याचाराला दुसऱ्या अत्याचारानें पुरा जाब देऊन शांतता प्रस्थापित झाल्यावर, चार दिवसांनीं ता. १२ रोजीं लष्करी कायदा पुकारण्याचें कारण काय ? व ता. ८ रोजीं किंवा त्यानंतर न घडलेल्या अशा कृत्यांबद्दल लोकांना अटक होऊन लष्करी कोर्टानें अशा भयंकर शिक्षा कां दिल्या हें सरकार सांगूं शकेल काय ?

## नाईटसाहेब घाबरले

सोलापूरचे कलेक्टर मि. नाईट हे बेसुमार घाबरून गेले म्हणून त्यांनीं लष्करी कायद्याची मागणी केली असेल. पण ही मागणी पुरविणें अनिर्वाह्य होतें अशी चौकशी तरी होम मेंबर यांनीं समक्ष करावयास पाहिजे होती कीं नाहीं! मध्यभाग कमिशनर सोलापुरांत त्यापूर्वीं गेले होते असें म्हणतात. मग त्यांचा अभिप्राय या कामीं काय पडला हें कळेल काय ? कलेक्टरसाहेबांची बुद्धि चळली म्हणून त्यांच्या वरिष्ठांचीहि तशीच चळली असेल काय ? त्यांनीं मि. नाईटसाहेबांची एकदम बदली करून तेथें दुसरा कोणी कलेक्टर पाठविला असता, किंवा लष्करी कायदा न लावतां फक्त पुरेसें लष्कर स्थानिक पोलिसांच्या मदतीला पाठविलें असतें, तर काम भागलें नसतें काय ? पुष्कळसें लष्कर आधीं पाठविलेंच होतें व वाटल्यास आणखीहि पाठवावयाचें होतें. पण लष्कर गांवाबाहेर दूर राहिलें असतें, व त्यानें गांवांतून एकदोन वेळ नुसती परेड केली असती तर काम भागलें असतें असें आम्हांला तरी वाटतें. ही साधी गोष्ट सरकारला कशी समजली नाहीं ?

हल्लीं सरकारतर्फे प्रसिद्धी—खात्याच्या अधिकाऱ्यानें सोलापूरप्रकरणीं एक जाहिर पत्रक काढलें आहे. त्यावरूनहि आमच्याच म्हणण्याचें सर्वस्वीं समर्थन होतें. या पत्रकांत खालीं दर्शविल्याप्रमाणें कबुल्या स्पष्ट किंवा गर्भित अशा दिल्या आहेतः—

## सरकारच्या कबुल्या

ता. ६ मेपासून सोलापूर प्रकरणाला सुरुवात झाली. त्यापूर्वीं इतर ठिकाणाप्रमाणें सोलापुरासहि हल्लींची चळवळ सुरूच होती. परंतु ती या विशेष चर्चेत लक्षांत घेण्याचें कारण नाहीं. ता. ६ रोजीं सोलापुरास हरताळ पडला. पण तो पूर्ण शांततेनें पार पडला. ता. ६ रोजीं गिरण्यांतील कांहीं मजुरांनीं काम बंद करून, दारूच्या दुकानाकडे मोर्चा फिरवून, तीं जाळण्यास सुरुवात केली आणि वाटेंत दगडफेक पुष्कळ झाली. त्यामुळें पोलीस जवान व अधिकारी

-यांना दुखापती झाल्या. पण हे बहुतेक लोक गांवांतील गुंडच होते! राष्ट्रीय चळवळींतील असणें शक्य नाहीं. कारण काँग्रेस कमिट्या सर्वत्र अत्यंत शांततेनें वागत आहेत. अर्थात् या दंगेखोरांना त्याच दिवशीं पकडण्यांत आलें असतें तर त्यांत कोणीहि राजकीय पुढारी किंवा अनुयायी नाहीं असेंच दिसून आलें असतें. या गुंडांना पोलिसांनीं हाकून लावलें. पण पकडल्याची माहिती सरकारी पत्रकांत नाहीं.

तारीख ७ रोजीं सकाळीं दंगा झाला तरी दोनप्रहरनंतर चोहोंकडे शांतता होती. दुसरे दिवशीं मिरवणूक निघणार नाहीं, असें आश्वासन देण्यांत आलें होतें व गांवांतील प्रतिष्ठित लोकांनीं दुसरे दिवशीं विशेष कांहीं घडणार नाहीं असा अंदाज केला होता. परंतु ता. ८ रोजीं याच गुंडांनीं शिंदीचीं झाडें तोडण्यास सुरुवात केली तेव्हां गोळीबार झाला. ती हकीकत प्रसिद्ध आहे. नंतर परत येणाऱ्या गुंडांनीं दोन पोलीस जवान मारले व कोर्टें जाळलीं परंतु त्याचा प्रतिकार पोलिसांनीं कसा केला हें या पत्रकांत सांगितलें नाहीं. नंतर गोऱ्या निमगोऱ्या लोकांचीं बायकामुलें स्टेशनावर पाठविण्याचा उपक्रम झाला. त्याबरोबर इकडे हत्यारबंद पोलीस लॉऱ्यांतून घालून शहराकडे पाठविले, यापैकीं एका लॉरीवर दंगेखोरांनीं हल्ला केला असें पत्रकांत लिहिलें आहे; परंतु कोणत्या पेठांतून किती जमाव होता, किती ठिकाणीं लॉरीवर हल्ला झाला, किंवा दगडफेक झाली म्हणून बचावाकरितां गोळीबार करावा लागला याची तपशीलवार हकीकत या पत्रकांत कांहींच दिलेली नाहीं. या गोळीबारानें रस्त्यांत हिंडणारीं, घरात बसलेलीं, व वरच्या मजल्यावरून सहज बाहेर पाहणारीं अनेक माणसें मारण्यांत किंवा जखमी करण्यांत आलीं हें आतां निर्विवाद आहे. असें असतां या सर्वांची बोळवण या सरकारी पत्रकांत अवघ्या एका ओळींत केली आहे.

## फक्त आठ मृत्यूंची नोंद

ता. ९ पासून पुढें कांहींच घडलें नाहीं. घडलें इतकेंच. सर्वत्र सामसूम व शांतता होती. जखमी लोकांची इस्पितळांत ने आण होत होती. लोक गांव सोडून बाहेर जात होते. १४४ कलम जाहीर करण्यांत आलें होतें. सर्वत्र लष्करी नाकेबंदी झाली होती. कांहीं स्वयंसेवक रस्त्याचा बंदोबस्त करीत होते. १४४ कलमाचा भंग कांहींनीं केल्याची एक गोष्ट या सरकारी जाहीर पत्रकांत

लिहिली आहे. पण इतका बंदोबस्त व लष्करी सैन्य हाताशीं असतां, हा कायदेभंग करणाऱ्यांना जागच्या जागीं पकडलें नाहीं हें आश्चर्य नव्हे काय? ता. ११–१२ रोजीं बाहेरून आणखी लष्कर आणण्यांत आलें. ता. १२ रोजीं रात्रीं ८॥ वाजतां लष्करी कायदा पुकारण्यांत आला. नंतर लष्करी कोर्टाचें काम सुरू झालें. पण किती लोकांना पकडलें, कितीना कोणत्या शिक्षा दिल्या याविषयीं पत्रकांत कांहींच माहिती नाहीं. १०३ गोळ्या व १० बकशॉटस उडविले. पण सरकारजवळ फक्त ८ मृत्यूंची नोंद आहे.

पत्रकांत एक गोष्ट विशेष म्हणून लिहिली आहे ती ही कीं गुंडांनीं केलेल्या अत्याचारासंबंधीं बाहेर ज्या भयंकर बातम्या पसरल्या त्या सर्व तितक्या खऱ्या नाहींत. कांहीं पोलीस जवान बेपत्ता झाले आहेत असें म्हटलें आहे. परंतु ते भीतीनें पळून गेले असावेत असें अनुमान सहज होतें. तात्पर्य, सरकारी रीतीनें प्रसिद्ध झालेली वरील सर्व हकीकत लक्षांत घेतली असतांहि, सोलापुरांत लष्करी कायदा लागू करण्याची किंवा तो इतके दिवस चालू ठेवण्याची गरज नव्हती असें उघड दिसून येईल. तो कायदा लागूं केला तरी त्यांत घडलेले अत्याचार करण्याची तर कांहींच जरूरी नव्हती. पण ह्या सर्व गोष्टी आतां जाहीर चौकशी होईल तेव्हांच बाहेर पडतील. ही चौकशी केव्हां होईल याविषयीं या जाहीर पत्रकांत कांहीं उल्लेख नाहीं. परंतु ती टळणें शक्यच नाहीं. सरकारनें या कामीं कितीहि अंगचोरपणा केला तरीहि लष्करी कायदा थांबल्याबरोबर, अत्याचारांच्या पापाचें माप सरकारच्या पदरांत टाकण्याला लोकांकडून जोराची सुरुवात होईल ही गोष्ट त्यांनीं पक्की समजावी.

---

## ९१ वीर–वानर वृत्तींच्या युद्धाचें प्रदर्शन

( केसरी, ता. ७ जून १९३० )

हल्लींच्या चळवळींत सरकारनें लाजलज्जा अगदीं गुंडाळून ठेवून, निःशस्त्र व अनत्याचारी अशा स्वयंसेवकांना मारहाण करण्याचा कहर केला. असली मार-पीट कोठें चुकून झाली, कोठें गर्दींत झाली, कोठें आत्मरक्षणार्थ झाली तर गोष्ट वेगळी. परंतु बहुतेक ठिकाणीं ती जाणूनबुजून झाली, पुष्कळ ठिकाणीं गर्दी नसतांना झाली, आणि या मारपीटींत सरकारी नोकरांनीं आपला बचाव करावा असा प्रसंग कोठेंहि आला नव्हता. आम्ही विधान करीत आहों तें सरकारी

शिपायांचा व स्वयंसेवकांचा संबंध जेथें आला अशाच प्रसंगाविषयीं होय. स्वयंसेवकांचा संबंध नसतां जेथें मवाली लोकांचाच संबंध आला, तेथेंच प्रायः सरकारी लोकांवर हात उचलण्यांत आला. म्हणून त्या प्रसंगीं सरकारी लोकांनीं केलेली मारपीट ही आत्मरक्षणार्थ होती असें म्हणतां येईल, पण आज तीन महिने चाललेल्या कायदेभंगाच्या चळवळींत कोठेंहि एखाद्याहि स्वसंसेवकानें हातांत काठी घेतली तर, तिचा उपयोग ती उचलून मारण्याकडे केला असें उदाहरण घडल्याचें सरकारी अधिकाऱ्यांनीं शपथेवर सांगावें ! सुखासुखी म्हणजे प्रतिकार केल्याशिवाय मार खाणें हें चांगलें कीं वाईट याविषयीं कदाचित् कोणाचा मतभेद होऊं शकेल. पण या चळवळींतील स्वयंसेवकांनीं तसा, म्हणजे उलट हात न उगारतां, मार खाल्ला याविषयीं कोणाचाहि मतभेद होणें शक्य नाहीं.

## स्वयंसेवकांची परीक्षा

स्वयंसेवकांनीं हात उचलला नाहीं याचें प्रत्यंतर हेंच कीं, कोणच्याहि प्रसंगीं स्वयंसेवकाप्रमाणें सरकारी शिपायांना किंवा अधिकाऱ्यांना इस्पितळांत पोंचवावें लागलें नाहीं, किंवा औषधोपचारहि करावा लागला नाहीं. दुतर्फी मारामारी झाली असती तर पुष्कळ शिपायांना इस्पितळ पहावें लागलें असतें. पण शिपायांच्या अंगावर कोठें ओरखडे पडले असतील तर त्यांतला एकहि स्वयंसेवकाच्या हातून निघालेला नाहीं असा निर्वाळा देतां येईल. स्वयंसेवकांनीं हात उचलला असता तर, हल्लींच्या सरकारी बेफाम मनःस्थितींत, गोळीबार करण्याला शिपायांनीं कधींहि माघार घेतली नसती. एकपट निमित्त घेऊन त्यांनीं त्याचा दसपट वचपा काढला असता. सोडलें नसतें. कारण खुनशीपणाचें समाधान हें तर झालेंच, पण सगळ्याच्या सगळ्या चळवळीला 'अत्याचारी' हें नांव ठेवून तिला बद्ध करण्याची संधि सरकारला महापर्वणीसारखीच वाटली असती. जेथें खरोखरच मवाली लोकांनीं मारामारी केली तेथें आत्मरक्षणार्थ गोळीबार झालाच, पण सोलापूरसारख्या ठिकाणीं म्हणजे जेथें कांहीं कारण नव्हतें अशाहि ठिकाणीं केवळ वड्याचें तेल वांग्यावर काढण्याकरितांहि, गोळीबार करण्यांत आला. अर्थात् सरकारी शिपायांचे हात गोळीबाराला इतके वसवसत असतांहि, स्वयंसेवकांशीं झटापटी झालेल्या शेंकडों प्रसंगांत एकदांहि गोळीबार झाला नाहीं, यावरून स्वयंसेवकांनीं अनत्याचारित्वाची परीक्षा करून दिली असेंच कोणीहि म्हणेल.

## शिपायांची बहादुरी

याशिवाय गोळीबाराचें काम लाठ्या, छड्या व मनगटें यांनींहि कित्येक वेळां होऊं शकतें, व त्याची हौस सरकारी शिपायांनीं चांगलीच फेडून घेतली. गोळी न घालतां मुक्या मारानें मनुष्याचा प्राण घेणें ही गोष्टहि कांहीं लहानसान नाहीं. लवणक्षेत्रावर एक दोन स्वयंसेवक अशा मारानें आजारी होऊन मेले ही दुःखद गोष्ट नमूद आहे. तेव्हां या शिपायांची बहादुरी काय वर्णावी ? शिपायांच्या हातांत काठ्या, लाठ्या, बागनेटी, बंदुकीचे दस्ते, चाबूक सर्व कांहीं मार देण्याचीं साधनें असतात. बेफामपणें नाचणाऱ्या किंवा धावत जाणाऱ्या घोड्यांच्या टापांचा समावेशही त्यांतच. आणि उलट बाजूला पाहावें तों मार पडला असतां शीर नमविणारे, हात उराशीं धरणारे, व फार तर जमीन पकडून बसणारे स्वयंसेवक ! असा संच जमला असतां, शिपायांनीं आपली पाशवी हौस कशी फेडून घेतली असेल याची कल्पना सहजच करितां येईल. अधिकारमदानें मस्त झालेल्या, वरिष्ठांच्या हुकुमानें उत्तेजन पावलेल्या, शाबासकीच्या आशेनें लोभावलेल्या, प्रतिपक्षाच्या अनत्याचारित्वाचें हंसें झाल्यामुळें चिरडीस आलेल्या, आणि अत्याचाराच्या जबाबदारींतून मुक्त झालेल्या शिपायांना असें मोकळें रान सांपडल्यावर, त्यांना स्वयंसेवकांवर हल्ल्यावर हल्ले चढविण्याला किती स्फुरण चढलं असेल हें काय सांगायला पाहिजे ?

पण शिपायांचे हे अत्याचार समर्थनीय कसे ठरतात हा प्रश्न शिल्लक राहतोच. नैतिक दृष्ट्या या प्रश्नाचें उत्तर देण्याला कोणाला क्षणभरहि वेळ लागणार नाहीं. संख्येनें शिपाई थोडे व स्वयंसैनिक पुष्कळ अशी स्थिति असेल. पण स्वयंसेवकांनीं संख्याबलाचा उपयोग शिपायांना गराडा घालण्याला किंवा त्यांना धरून ठेवण्याला केव्हांहि केला नाहीं. फार झालें तर त्यांनीं मिठावर चालून जाण्याकडे या संख्याबलाचा उपयोग केला असेल. पण हें संख्याबल व्यर्थ करण्याला सरकारी अधिकाऱ्यांजवळ दुसरें एक साधन होतें. तें हें कीं, त्यांनीं कोणाहि स्वयंसेवकाला हस्तस्पर्श करून “ तुला मीं अटक केली ” असें सांगतांच, खेळांत मार खाल्लेला किंवा शिवलेला किंवा गाभुळलेला गडी जसा मुकाट्यानें खेळांतून बाहेर जाऊन बसतो, त्याप्रमाणें हा स्वयंसेवक शिपायाच्या स्वाधीन होऊन स्वयंसेवकपणाचा तात्काळ त्याग करी. “ तुला अटक केली,” असें म्हटलेल्या स्वयंसेवकानें ‘ नाहीं ’ असें म्हटलें नाहीं. किंवा ‘ कसे पकडतां ते पकडा ’

असें म्हणून हुजत घातली नाहीं. प्रतिबंध केला नाहीं. शरीरबलाची परीक्षा घेतली नाहीं. कांहीं नाहीं. तर ' हिप्नाटिझम ' करणारा वशीकरण-वेत्ता आपल्या ताब्यांत आलेल्या दुर्बळ आत्म्याला जसा वाटेल तसा वागवितो, किंवा नाचवितो, किंवा बोलवितो, त्याप्रमाणें स्वयंसेवक हा अटक करणाऱ्या-अधिकाऱ्याच्या स्वाधीन होऊन राहत असे. शिरोड्यास स्वयंसेवकांना अटकेंत ठेवणें हा इतका सोपा खेळ झाला होता कीं त्याचें सर्वांनाच हसूं येई, व स्वयंसेवकांच्या अनत्याचारित्वाचें व आज्ञाधारकत्वाचें कौतुक होई.

## जोरजबरदस्तीचें कारण काय ?

तात्पर्य, विषमसंख्याबल हें अत्याचारांना समर्थनपर होऊं शकत नाहीं. या-शिवाय सरकारतर्फे असेंहि म्हणण्यांत येतें कीं, " स्वयंसेवक हे उघडाउघडी बोलूनचालून गुन्हा करण्याला प्रवृत्त झाले होते. आणि गुन्हा होत असतां त्याला प्रतिबंध करण्याकरितां अवश्य तितका जोर लावण्याचा अधिकार पीनल कोडानें कोणासहि दिलेलाच आहे ! अर्थात् जो अधिकार खासगी व्यक्तीला आहे तो स्वतः सरकारी अधिकाऱ्यांना व शिपायांना नाहीं असें कसें म्हणतां येईल ? " पण याला मुंबईचे प्रसिद्ध वकील भुलाभाई देसाई यांनीं पूर्वीं उत्तर दिलें होतें, व तेंच त्यांनीं फिरून मुंबईस ता. ३ रोजीं भरलेल्या पदवीधरांच्या सभेंत जाहीर रीतीनें दिलें. ते म्हणाले, "सरकारच्या या लाठीबहादुरीचें समर्थन कोण-त्याहि कायद्यानें किंवा युक्तिवादानें होऊं शकत नाहीं. गुन्हा करण्यास प्रवृत्त झालेला मनुष्य जर स्वतः मारामारी करील तरच त्याच्या तोडीला तोड म्हणून अवश्य तो जोर लावून, किंवा मारामारी करून, गुन्हा होण्याचा थांबविणें हें बरोबर होईल. पण गुन्हा करूं पाहाणारा जर जोरजबरदस्ती करीत नाहीं, " तुला अटक केली आहे " असें म्हटल्याबरोबर बाजूला होतो, तर त्याला अटक करणें इतकाच उपाय उरतो, जोरजबरदस्ती करण्याचा हक्क उरत नाहीं. " गुन्हा होत नाहीं, थांबला इतकें होतांच प्रतियोगी स्वरूपाची जोरजबरदस्ती करण्याचा दुसऱ्या माणसाचा हक्क संपतो. चोरी करूं पाहणारा चोर पकडला जात नाहीं तोंपर्यंतच त्याला मारतां येईल. पण तो पकडला गेल्या-वर त्याला मारणें हा गुन्हा होतो. त्यानंतर त्याला शिक्षा करावयाची तर न्याय-कोर्टच करणार.

## मारहाणीचा हक्क नाहीं

पण मिठागरावरील हल्ल्यांच्या या प्रकरणीं सरकारनें असें योग्य मनाशीं ठरविलेलें दिसतें कीं, कायदेशीर अटक न करितांच मीठ लुटण्याला प्रतिबंध करावयाचा. अर्थात् मारहाण करून स्वयंसेवकांना जखमी जायबंदी केलें म्हणजे ते करणार त्या गुन्ह्यांना प्रतिबंध झाला! पण अटक कां करीत नाहीं! या प्रश्नाला सरकारपाशीं कायदेशीर किंवा योग्य असें उत्तर नाहीं. कदाचित् हें उत्तर असेल कीं, "आमच्याजवळ या सर्व लोकांना संभाळण्याला हवे तितके पोलीस नाहींत, व ठेवण्याला तुरुंग नाहींत!" पण स्वाधीन होणाऱ्या कैद्याला संभाळण्याला जो असमर्थ, त्यानें वाटेल तर राजसंन्यास करून बाजूला व्हावें. पण मारहाण करण्याचा हक्क त्याला प्राप्त होत नाहीं. तथापि सरकारनें ही साधी गोष्टही लक्षांत न घेतां आपल्या अत्याचारित्वाची कमान अधिकाधिक वरच चढविली. प्रथम शिपाई नुसते दुरून अडवीत. नंतर ते हात धरून अडवूं लागले. मग त्यांनीं धक्काबुक्की आरंभिली. मग ते छडी उगारूं लागले. मग छडी मारूं लागले. छडीनें भागेना तेव्हां त्यांनीं लाठ्या घेतल्या. साध्या लाठ्यांनींहि भागेना तेव्हां त्यांच्या टोंकांना जड शिसाचीं बुचें किंवा लोखंडी मायण्या घालूं लागले. अशा रीतीनें सामुदायिक प्रतिबंधांतून सामुदायिक मारहाण निघाली. आणि तिनेंहि भागेना तेव्हां अंगावर घोडे घालणें सुरू झालें!

## सोलापूरची मारहाण

तरी कोणी म्हणेल कीं, संख्याबळ अधिक म्हणून शिरोडें, धारासना, वडाळा वगैरे ठिकाणीं शिपायांनीं मारहाण केली. पण हा युक्तिवाद जेथें मुळींच लागू पडत नाहीं अशा सोलापुरास जी मारहाण झाली व होत आहे तिचें समर्थन कशा रीतीनें होणार? सोलापुरांत लष्करी कायदा पुकारल्यावर, तीन पांच माणसें देखील एकत्र जमावानें राहणें अशक्य झाल्यावर, व रस्त्यांतून खरी गर्दी लष्करी किंवा पोलिस शिपायांचीच झाल्यावर, एकट्यादुकट्या माणसाला धरून जी मारहाण करण्यांत आली तिला वरील संख्याबळाच्या निमित्ताचाहि आधार उरत नाहीं. फार काय पण लष्करी कायद्याचा तरी आधार त्याला होता काय? मारहाण झालेल्या या लोकांत गांवचे नागरिक व झेंडा सत्याग्रहाकरितां गेलेले स्वयंसेवक असे दोन प्रकारचे लोक होते. पैकीं नागरिकांनीं असा कोणता गुन्हा करण्याचें योजिलें होतें कीं, तो थांबविण्याकरितां ही मारहाण

करण्यांत आली! नागरिक म्हणजे भेदरून गेलेल्या गरीब गाईच होत्या. त्यांना अटक करणें, खटला भरणें, शिक्षा करणें, व तुरुंगांत रवाना करणें, या गोष्टींना काडीइतकाहि प्रतिबंध होण्याजोगा नव्हता. झेंडा सत्याग्रहाचे लोक झाले तरी काय! ते आधीं सांगून सवरून दोघे तिघे मिळून ठरल्यावेळीं आगगाडीनें स्टेशनावर दाखल होत. बोलूनचालून सत्याग्रही! एखाद्या शिपायाच्या नुसत्या तोंडच्या शब्दानें 'अटक' म्हटली कीं जागच्याजागीं थबकून उभे राहाणारे हे लोक. त्यांना नुसता हात लावण्याचेंहि कारण नाहीं. मग मारहाण करण्याची गोष्ट तर दूरच!

## राष्ट्रीय निशाण हा गुन्हा नव्हे

अशा सालस लोकांवर अत्याचार करण्याचें खरोखरी काय कारण? होय. ते सत्याग्रही होते. आणि सोलापूरच्या लष्करी अधिकाऱ्यांनीं केलेल्या कायदेकानू-प्रमाणें एक विशिष्ट गुन्हा करण्यास ते प्रवृत्त झाले होते. पण हा गुन्हा कोणता? व तो ते कोणत्या रीतीनें करणार होते? हें लक्षांत घेणें अवश्य आहे. हा गुन्हा म्हटला म्हणजे राष्ट्रीय म्हटल्या जाणाऱ्या निशाणाचें जाहिर प्रदर्शन. हें निशाण काठीला लावून तें स्वयंसेवक हातांत घेणार. किंवा त्याचें एकादें लहानसें प्रतीक अंगांतील सदऱ्यावर लावणार! पण मुळांत हा गुन्हा गुन्हाच काय म्हणून समजला जावा? कारण हें निशाण सोलापुरांतील लष्करी कायद्यापुढें नाक खाजवण्याकरितां नवीन बनविलें नव्हतें. तें आज कित्येक वर्षें राष्ट्रीय निशाण म्हणून मानलें गेलें आहे. राष्ट्रीय सभेनें तें आपलें निशाण म्हणून ठरविलें आहे. देशांतील लोक-पक्षाच्या सर्व पुढाऱ्यांनीं त्याला राष्ट्राचें निशाण म्हणून मान्यता दिली आहे. राष्ट्रीय सभेच्या मंडपावर आज अनेक वर्षें तें उभारलें जातें. सरकारशीं संबंध असलेल्या म्युनिसिपालट्या, लोकल बोर्डें, किंवा इतर कित्येक सार्वजनिक कचेऱ्या यांच्या इमारतीवर तें मोठ्या समारंभानें पूर्वीं उभारण्यांत आलें आहे. या समारंभावरील खर्च स्थानिक स्वराज्यसंस्थांच्या हुकमानें झालेला असून, सरकारी हिशेब तपासनीसांनीं त्यावर आक्षेप घेतलेला कधीं ऐकिवांत नाहीं. या निशाणांत सरकारला अपमानास्पद किंवा चीड आणण्या-सारखें खरोखर कांहीं असतें, तर जाहीर मिरवणुकींतून सार्वजनिक रस्त्यावरून सरकारनें आजपर्यंत तें खुशाल नेऊं दिलें तसें नेऊं दिलें नसतें. अशा स्थिति असतां एकट्या सोलापुरांतच लष्करी अधिकाऱ्यांच्या डोक्यांत या निशाणानें

तिडीक का उठवावी? सर्व हिंदुस्थानभर अनेक वर्षें घडत आलेली गोष्ट व स्वतः हिंदुस्थान सरकारानें आजवर कधींहि प्रतिबंध न केलेली सोलापुरांत एखादा गोरा शिपुर्डा गुन्हा ठरवितो ही गोष्ट स्वतः सरकाराला लांछनास्पद नव्हे काय? एखादा लष्करी अधिकारी कारणपरत्वें लष्करी कायद्याच्या आधारें राजपदारूढ झाला तरी, त्यानें जुनी परंपरा व वहिवाट लक्षांत घेऊं नयेच कीं काय? हिंदुस्थान सरकारनें जें निषिद्ध ठरविलें नाहीं त्याला भयंकर गुन्ह्याचें स्वरूप देणारा हा लष्करी अधिकारी म्हणजे सवाईसुलतानच म्हणावयाचा आणि अशा गोष्टीमुळें सरकार स्वतःला हास्यास्पद करून घेतें असें कोणीं म्हटलें तर तो म्हणे पीनल कोडांतला राजद्रोह!

## बेकायदेशीर प्रकार

बरें, राष्ट्रीय निशाण फडफडविणें किंवा दाखविणें हा लष्करी कायद्यानें गुन्हा म्हटला तरी, इतर गुन्ह्यांच्या रीतीप्रमाणें त्याचीहि व्यवस्था व्हावी. म्हणजे तो करणारावर रीतसर खटला भरून जी कांहीं शिक्षा द्यावयाची ती द्यावी. पण निःशस्त्र व एकाकी जाणाऱ्या सात्त्विक स्वयंसेवकाला, गुन्हा लष्करी कायद्याचा झाला, म्हणून मारहाण किंवा छळणूक कां करावी? कायदा लष्करी झाला तरी त्यांत मारहाण, छळणूक व अपमान या गोष्टी शिक्षेदाखल किंवा अधिकाऱ्यांच्या अधिकारांतल्या म्हणून कोठेंहि सांगितलेल्या नाहींत. कडक म्हणून किंवा तरुण मुलांना योग्य म्हणून, विशिष्ट परिस्थितींत फार तर फटक्यांची शिक्षा सोलापूरच्या लष्करी कानूंत सांगितलेली आहे. पण स्वयंसेवकांना जी मारहाण झाली व त्यांचा जो छळ झाला, तो करण्याचा अधिकार नेहमींच्या फौजदारी कायद्यांत किंवा लष्करी कानूंतही सांगितलेला नसल्यामुळें, तो प्रकार घडला असल्यास सर्वस्वीं बेकायदेशीर होय. आणि अशा बेकायदेशीर प्रकाराला सामान्य नैतिक गुन्ह्याचें किंवा राजनैतिक गुन्ह्याच स्वरूप आल्याशिवाय राहात नाहीं.

## शेंदाड शिपाईगिरी

एका निःशस्त्र स्वयंसेवकाला अनेक सशस्त्र शिपायांनीं धरून त्याचा छळ करणें ही गोष्ट कोणत्याहि काळीं व कोणत्याहि देशांत शिपाईबाण्याला कालिमा आणणारीच समजली जाते. इंग्रजींत याला 'कॉवर्डली' असें विशेषण लावतात, व जगांत जीं अत्यंत अधम कृत्यें म्हणून समजलीं जातात त्यांत प्रबळ

मनुष्यानें स्वतः सुरक्षित राहून दुर्बळाचा छळ करणें हें एक समजलें जातें. आणि खरा न्याय म्हटला तर असलें हें 'कॉवर्डली' शेंदाड शिपाईगिरीचें वर्तन करणाऱ्या अधम लोकांच्या अंगावरचें अधिकारदर्शक डगल जागच्या जागीं फाडून टाकून त्याच्या पदव्या मानसन्मान काय असेल तो हिसकावून घेऊन, त्यांची छीः थू करून अपमानास्पद रीतीनें त्यांना कामावरून काढून लावलें पाहिजे. पण कायद्याच्या नांवावर जोंपर्यंत सरकार धिंगाणा घालावयाला तयार आहे, शरमत नाहीं, व लोकपक्षाच्या हातीं अधिकाऱ्यांचा इन्साफ करून त्यांना शिक्षा देण्याचा अधिकार नाहीं, तोंपर्यंत आम्हीं वरील गोष्टी बोलणें म्हणजे तें वाऱ्यावर किंवा पाण्यावर लिहिण्यासारखेंच होय !

हल्लींच्या अत्याचार कांडांत स्वतः सुरक्षित राहून गरीब लोकांचा छळ करण्यास प्रवृत्त झालेल्या लोकांनीं लष्करी किंवा मुलकी पोलिसांनीं लवणरणांगणावर किंवा सोलापुरांत काय काय गोष्टी केल्या, त्या यापूर्वी निरनिराळ्या ठिकाणीं निरनिराळ्या मुखांतून जाहीर झाल्याच आहेत. तथापि वाचकांना त्या कळाव्या म्हणून एकत्र करून देतों त्या अशा--

## अत्याचारांची कहाणी

एकाला अनेकांनीं धरून त्याच्या हातापायांची ओढाताण करणें, बुकलणें, मान पिरगळणें, डोक्यावर किंवा शरीराच्या कोणत्याहि भागावर ठोसे किंवा काठ्या मारणें, नालबंद बुटाचे पाय मोकळ्या पायावर ठेऊन रेटणें, बरगडींत काठ्या खुपसणें, तोंडावर थुंकणें, धगधगीत सिगारेट अंगाला लावून तिनें भाजणें व फोड आणणें, शरीराचे गुप्त भाग दाबणें किंवा आघात करणें. शारीरिक छळाचे हे प्रकार झाले. मानसिक छळाचे प्रकार म्हणजे स्वयंसेवकांना शिव्या देणें, त्यांना 'देशभक्त' म्हणून त्यांची टवाळी करणें, व सांगवत नाहीं पण सांगितलेंच पाहिजे तें असें कीं, म. गांधी सारख्यांना आईमाई वरून शिव्या दिलेल्या ऐकविणें, येवढेंच नव्हे तर 'तूं तशा शिव्या दे' असा स्वयंसेवकाला आग्रह करणें इ०. आम्हीं दिलेल्या या यादीचें प्रत्यंतर अनेक ठिकाणीं पाहावयास सांपडलें आहे. व सरकाराला आपल्या अब्रूची कांहीं चाड असेल तर सात्विक वीरवृत्तीच्या स्वयंसेवकांच्या संबंधांत असल्या तामस वानरचेष्टा सोलापुरास किंवा इतरत्र शिपायांनीं केल्या कीं नाहीं याची त्यांनीं जाहीर चौकशी करवावी.

## तक्रारीचें कारण

धरपकड शिक्षा दंड किंबहुना फटके येथपर्यंत कोणीं कांहीं बोललें नसतें. आणि जे चळवळीला निघाले ते अशा गोष्टींना तयार होऊनच निघाले. तेव्हां स्वाभिमानी म्हणून ते या गोष्टींची तक्रार करीतच नाहींत. अशी तक्रार स्वयंसेवकांनीं केल्याचें कोणींहि दाखवून द्यावें. पण जी तक्रार स्वयंसेवकांनीं केली, किंबहुना त्यांच्याहूनहि त्रयस्थ लोकांनींच अधिक केली, ती या गैरकायदा हाणामारीबद्दल व छळाबद्दल! सरकार हें सरकार झालें म्हणून अमानुष वर्तन करण्याचा त्यालाहि ईश्वरानें ताम्रपट दिलेला नाहीं. व अशा वर्तनाचा जाब मागण्याचा अधिकार असला तरी सत्ता आज लोकांच्या हातीं नसल्यामुळें, या क्षणाला याविषयीं ईश्वरावर हवाला ठेवून स्वस्थ बसणेंच त्यांना प्राप्त आहे. कायद्याला कायदा लावणें, न्यायाचा न्याय करणें, व सत्तेवर सत्ता गाजवणें या गोष्टी अगदीं शेवटीं ईश्वराधीनच होत. एखादे वेळीं या गोष्टी जनतेच्या स्वाधीन करून आपल्या अवतार कृत्याची चुणूक ईश्वर मधून मधून दाखवितोच. ही गोष्ट इंग्लंड, फ्रान्स, रशिया, वगैरे देशांत पूर्वी घडली आहे. म्हणून ईश्वराची इच्छा असेल तर ती हिंदुस्थानांतहि घडेल. 'राजकारणाला ईश्वरप्रार्थनेची जोड पाहिजे' असें आपल्यांतील कित्येक धर्मनिष्ठ लोक जे म्हणतात याला अशाच प्रसंगीं मान्यता द्यावी लागते.

---

# ९२ या जुलुमाची दाद कधीं लागणार!

येरवडा येथील तुरुंगाचा बदलौकिक कांहीं नवा नाहीं. तो पुष्कळ दिवस आम्ही ऐकत आलों आहों. पण हल्लींची चळवळ सुरू झाल्यापासून तो विशेष जोरानें कानावर येऊन आदळूं लागला आहे. म्हणून त्याकडे यापुढें दुर्लक्ष करणें अशक्य झालें. हा विषय हातीं घेण्याचें अगदीं ताजें कारण म्हटलें म्हणजे असें. ता. ९ ऑगस्ट रोजीं येरवड्याच्या तुरुंगांतून अहमदनगर व भिंगार येथील कांहीं कैद्यांना, शिक्षेची मुदत पुरी झाल्यामुळें, सोडून देण्यांत आलें. पण तुरुंगांतून बाहेर पडल्यावर गांधींच्या नांवानें त्यांनीं जयजयकार केला, म्हणून तुरुंगाच्या अधिकाऱ्यांनीं त्यांना पुनः पकडून तुरुंगांत ओढून नेलें व बेदम मारलें. यासंबंधानें यांतील कांहीं लोकांच्या सह्यांनिशीं लिहिलेला मजकूर आमच्याकडे आलेला आहे. इतकेंच नव्हे तर या लोकांपैकीं दोघां-

तिघांच्या जखमा आम्हीं समक्ष डोळ्यांनीं पाहिल्या, व त्यांचे फोटो काढून ब्लॉक करून ते आजच्या अंकांत बाजूला छापले आहेत. तेव्हां त्यांना हाणमार व जखमा झाल्या याविषयीं आम्हास यत्किंचितहि शंका उरलेली नाहीं, व ही गोष्ट वेळ पडल्यास पुराव्यानिशीं शाबिद् करण्यास आम्ही तयार आहों. शिक्षेची मुदत पुरी झाल्यामुळें तुरुंगांतून सुटलेल्या कैद्यांना केवळ "गांधी महाराज की जय" येवढें म्हटल्याबद्दल राजरस्त्यावरून बिनवॉरंटानें पकडण्याचा, ओढून तुरुंगांत नेण्याचा, त्यांना हाणामार करण्याचा, तीन चार तास पिंजऱ्यांत कोंडून ठेवण्याचा अधिकार तुरुंगाच्या अधिकाऱ्यांना कोणत्या कायद्यानें दिलेला आहे हें आम्हास तरी माहीत नाहीं. अर्थात् याचा खुलासा व जाब न्यायकोर्टांतच मिळणार; व या अधिकाऱ्यांवर फिर्यादी झाल्यास तो कसा काय मिळतो हें पाहतां येईलच. दरम्यान येरवड्याच्या अधिकाऱ्यांनीं केलेल्या या अनधिकारी व क्रूर वर्तनाची हकीकत खरी आहे, व कायद्यानें शिक्षा करण्यासारखा गुन्हा त्यांच्या हातून घडलेला आहे, असें घेऊन चालण्यास आम्हाला मुळींच हरकत वाटत नाहीं. म्हणून त्याला उद्देशून दोन शब्द लिहिण्याचें आम्हीं योजिलें आहे.

ता. ९ रोजीं हा जो प्रकार घडला त्यासारखेच तंतोतंत पुष्कळ प्रकार आणखी अनेक वेळां झाले असतील असें म्हणणें अर्थातच शक्य नाहीं. कारण एका हकीकतीसारखी तंतोतंत हकीकत पुन्हां पुन्हां घडतच नसते. शिक्षेची मुदत संपून कैदी बाहेर पडल्यावर गांधींच्या नांवानें जयजयकार केला म्हणून बंधमुक्त झालेल्या स्वयंसेवकांस रस्त्यावरून पकडून परत तुरुंगांत नेऊन मारल्याचें हें कदाचित् एकटें एकच उदाहरण असेल परंतु तें तरी कां घडलें ? याचें उत्तर उघडच असें आहे कीं, येरवड्याच्या तुरुंगांतील अधिकाऱ्यांना आपणाला कोणत्याच कायद्याचें बंधन नाहीं असें वाटत असावें. पण या मुद्याची अधिक चर्चा करण्यापूर्वी एकदोन इतर गोष्टी सांगून आम्ही मोकळे होतों. पहिली अशी कीं, या इलाख्यांतील सर्वच तुरुंगाधिकारी सरकारी कायदा किंवा आपली माणुसकी कोळून प्याले आहेत असें आमचें म्हणणें नाहीं. इतकेंच नव्हे तर कित्येक तुरुंगांतून सुटून आलेले कैदी उघडपणें, व तुरुंगांत अद्यापि असलेले कैदी खासगी रीतीनें पण प्रांजलपणें, आपल्यास तुरुंगाच्या अधिकाऱ्यांनीं चांगलें वागविल्याचें सांगतात. आणि ही गोष्ट आम्हीहि

दडवून न ठेवतां प्रांजलपणें उघड करून सांगतों. हेतु हा कीं, यापुढें येरवड्याच्या तुरुंगासंबंधानें आम्ही जें लिहणार आहोंत तें उगीच कांहीं तरी जेलखात्याच्या कारभाराविषयीं सरसकट वाईट लिहावें या बुद्धीनें लिहीत नाहीं; तर तारतम्य भाव ठेवून, ज्याला बरें म्हणतां येईल त्याला खुशाल बरें म्हणावें, पण ज्याला वाईट म्हटलेंच पाहिजे त्याला निर्भीडपणें वाईट म्हणावें, त्याचा दोष जगापुढें मांडावा.

कांहीं जेलचे अधिकारी कैद्यांना चांगल्या रीतीनें वागवितात असें आम्हीं म्हटलें त्याचा अर्थ सहजच मर्यादित असा घेनला पाहिजे. कारण तुरुंग हा बोलून चालून तुरुंग. तेथील शिस्तीचे नियम समंजसपणाचे असले तरी थोडे-बहुत कडकच असणार. आणि कोणी जेलचा अधिकारी कितीहि सज्जन व दयाळू असला तरी, निदान राजकीय कैद्यांपुरतें बोलावयाचें तर, त्यांना तुरुंगा-बाहेर कोठेंहि जे सुखोपचार नेहमीं सहज लाभतील, ते तुरुंगांत त्यांना लाभूं देणें कोणत्याहि जेलरच्या हातीं असत नाहीं. कैद्याला तुरुंगांत ठेवण्याचा हेतु असा असतो कीं, त्याचें स्वातंत्र्य तर नष्ट व्हावेंच, परंतु नेहमींचें सुखहि त्याला मिळूं नये. पण अधिकाऱ्यांनीं कैद्यांना चांगलें वागविणें याचा अर्थ जसा मर्यादित आहे, तसा मर्यादित अर्थ वाईट वागविणें याला नाहीं, आणि या वाईट वागवि-ण्यांत कित्येक अधिकाऱ्यांची मर्यादा इतकी सुटते कीं, ते मनुष्य आहेत, कीं राक्षस आहेत, कीं जनावरें आहेत याविषयी देखील सकारण शंका वाटूं लागते.

दुसरी एक गोष्ट सांगून टाकावयाची ती अशी कीं, गेल्या तीनचार महिन्यांत तुरुंगांतील जीवनक्रमाविषयीं जितक्या तक्रारी बाहेर लोकांच्या कानावर आल्या, तितक्या गेल्या तीनचार वर्षांतच काय, दहा वीस वर्षांतहि आल्या नाहींत. त्यापूर्वीं अशा तक्रारी एक वेळ पुष्कळच ऐकूं आल्या, कारण जुन्या स्वदेशी चळवळींत शिक्षा झालेल्या राजकीय कैद्यांना फारच कठोरपणानें वागविण्यांत येत असे. पण गेल्या १०–२० वर्षांत ती आठवण बुजली होती. ती फिरून गतवर्षापासून पुन्हां जागृत झाली. या दरम्यानच्या अवधींत कैद्यांच्या तक्रारी नव्हत्या असें नाहीं, पण राजकीय कैदी हेच अशा तक्रारींना तोंड फोडूं शकतात. एरवींचे म्हणजे नैतिक गुन्हे हातून घडलेले लोक अशा गोष्टींविषयीं मौनच स्वीकारतात. कारण त्यांचें मनच त्यांना खात असतें, व आपलें दुःख बाहेर सांगितलें तर त्याला सहानुभूति मिळेल असें त्यांना वाटत नाहीं. पण राजकीय कैद्यांची गोष्ट वेगळी आहे.

ते सर्वच जरी एक सारखे उच्च सामाजिक दर्जाचे नसले, तरी आपण तुरुंगांत गेलों त्यांत स्वार्थ नव्हता किंवा कसलाहि नैतिक गुन्हा नव्हता, केवळ देशाभिमानामुळें आपल्याला तुरुंगवास घडला, या उदात्त भावनेनें वाटणाऱ्या स्वाभिमान बुद्धीनें ते सहजच मोठे होतात. याच कारणामुळें तुरुंगांत त्यांना कसें वागविण्यांत येतें याकडे बाहेरच्या जनतेचेंहि लक्ष राहातें आणि त्यांनीं आपल्या तक्रारी बोलून दाखविल्यास त्यांचा गवगवा सहजच मोठा होतो. गेल्या वर्षी तुरुंगांतील वागणुकीसंबंधानें जी एकंदर चळवळ झाली ती राजद्रोह, राज्यक्रांति, किंवा राजकीय हेतूनें घडलेले खून करणाऱ्या धीट लोकांकडूनच झाली. आणि ती अशा लोकांकडून झाली म्हणूनच तिला आलें इतकें तरी फळ आलें. असो. येथें सांगण्याचा मुद्दा इतकाच कीं, तुरुंगांत कैद्यांना देण्यांत येणारें अन्नवस्त्र, त्यांच्या राहाण्याच्या जागा, आरोग्यविषयक सोयी, जेल गुन्ह्यांचा इन्साफ व शिक्षा, इत्यादि गोष्टींच्या मामुली व्यवस्थेसंबंधानें कित्येक तक्रारी अलीकडे कांहींशा दूर झाल्या असल्या तरी कांहीं शिल्लकच आहेत. परंतु ह्याहिविषयीं आज आम्हास लिहावयाचें नाहीं.

आम्हाला आज ज्याविषयीं विशेष रीतीनें लिहावयाचें आहे ती तक्रार तुरुंगांतील छळाविषयीं होय. ' छळ ' या सदराखालीं येणारीं सर्व कृत्यें प्रथमतः बेकायदेशीर या वर्णनाला पात्र असतात हें सरसकट सांगून टाकणेंच प्राप्त आहे. कारण सरकारी नियमांत कठोरता असली तरी छळ करावा असें कोठेंच सांगितलेलें नसतें. या नियमांत जो अधिकांत अधिक कडकपणा आढळतो तो तुरुंगांत कैद्यांनीं केलेल्या गुन्ह्यांच्या शिक्षेसंबंधीं. पण त्या शिक्षेचा हेतु सामान्यतः आडदांड, नाठाळ, अत्याचारी, भयंकर घातकी अशा कैद्यांना वठणीवर आणण्याचा, किंवा त्यांच्यापासून इतर कैद्यांचें संरक्षण करण्याचाच असतो. शिवाय तुरुंगांमध्यें प्रायः कांहीं कांहीं कैदी असेच दुर्वृत्त किंवा दुःशील येतात कीं, 'यथा यक्षः तथा बलिः ' किंवा 'चांभाराच्या देवाला खेटराची पूजा' या न्यायानें त्यांना कडक रीतीनें वागविणें हेंच श्रेयस्कर ठरतें. पण अशा कडक शिक्षा देखील नियमाप्रमाणें दिलेल्या असल्यास त्यांना छळ हें नांव कोणी देत नाहीं. पण जेथें सर्वस्वीं नियमबाह्य, किंवा नियमाप्रमाणें सकृद्दर्शनीं आचरण होत असतांहि

तारतम्य सोडून एक प्रकारच्या आकसानें, कैद्याला कठोरतेनें वागविण्यांत येतें, तेथेंहि छळ हा शब्द यथार्थतेनें लावतां येईल.

याचीं कांहीं उदाहरणें घेऊं. प्रतिष्ठित राजकीय कैद्यांना एका जागेहून दुसऱ्या जागेस हलवितांना केव्हां केव्हां हातकड्या घालण्यांत येतात. या ठिकाणीं कैदी पळून जाण्याची भीति नसतां हातकड्या केवळ आकसानें व अप्रतिष्ठा करण्यासाठींच घालण्यांत येतात. नव्हे काय ! हें कृत्य कदाचित् नियमबाह्य नसेल, परंतु तो निःसंशय छळ होय. दुसरें उदाहरण असें कीं, साध्या शिक्षेच्या कांहीं कैद्यांना येरवड्यांत अलीकडे चक्की दळण्याचें काम दिल्याचें ऐकिवांत आहे. येथें तर नियमाचें उल्लंघन उघड उघड झालें म्हणून तो छळ होय. पण सक्तमजुरीची शिक्षा झालेल्या कैद्याला नियमाप्रमाणें चक्की देण्याला हरकत नाहीं असें असलें तरी वयमान, शरीरप्रकृति यांकडे न बघतां त्याला भारी काम नेमून देणें ही गोष्ट तारतम्य सोडून व आकसानें केलेली, म्हणून तिला छळ म्हणतां येईल. अशा रीतीनें हातकड्या घालणें, चक्कीचें काम देणें वगैरे गोष्टींचा धागा कसल्या तरी नियमाशीं कसा तरी जोडतां येतो असें आपण म्हणूं. पण राजकीय कैद्यांना तुरुंगांत जी शिवीगाळ व मारहाण होते, तिला कोणत्याच नियमांचा कोठेंहि आधार मिळणार नाहीं. आणि स्वाभिमानी कैद्याला जर तुरुंगांत खरी दुःसह अशी गोष्ट होत असेल तर ही शिवीगाळ व ही मारहाण! गेल्या ३–४ महिन्यांत तुरुंगांतील वागवणुकीसंबंधानें आम्हांकडे समक्ष अनुभवाच्या किंवा ऐकीव माहितीच्या पुष्कळ तक्रारी आल्या. त्यांतील पुष्कळशा विसापूर व येरवडा या दोन तुरुंगांसंबंधाच्याच होत्या असें म्हणावयास हरकत नाहीं. पैकीं विसापूरच्या तुरुंगाचा बदलौकिक पुष्कळ दिवसांचा आहे. व सरकारी कमिटी नेमून तेथील तक्रारींची चौकशी करण्यापर्यंत पाळीहि आली होती हें वाचकांना विदित असेलच, पण अलीकडे येरवड्याच्या तुरुंगानें या छळाच्या बाबतींत विसापूरच्या तुरुंगाची बरोबरी केली असून तेथील अधिकाऱ्यांच्या वर्तनाची चौकशी एकादी कमिटी नेमून करण्याची जरूरी आहे असें आम्ही सुचवितों.

नगरच्या स्वयंसेवकांसंबंधानें जी ताजी हकीकत आम्हीं आज दिली आहे, तिजवरून ‘ शितावरून भाताची परीक्षा ’ या न्यायानें येरवडा येथील अधिकाऱ्यांच्या मनोवृत्तीची चांगलीच परीक्षा होते. सुटकेचें रीतसर लेखी सर्टिफिकेट

घेऊन तुरुंगाच्या आवाराबाहेर दूर गेलेल्या लोकांवर, ते आपले पूर्वीचे कैदी म्हणून अंगावर हात टाकण्याला, मारपीट करीत परत तुरुंगांत खेंचून नेण्याला व तेथें जखमा होईपर्यंत मारहाण करण्याला जे अधिकारी भीत नाहींत ते, तुरुंगाच्या कोंडवाड्यांत सांपडलेल्या कैद्यांना कसे छळीत असतील याची कल्पना कोणासहि सहज करतां येईल. असहाय स्थितींत निष्कारण हलक्या लोकांकडून शिव्या खाणें किंवा मार खाणें हें स्वाभिमानी मनुष्याला अत्यंत दुःसह होतें हें वर सांगितलेंच आहे. पण ती गोष्ट स्वतः छळ करणारांना किती लांच्छनास्पद आहे याचा विचार त्यांनींहि करावयाला नको काय ? साधारण तुरुंगाची कल्पना सर्वांना असतेच. चौफेर दगडी भिंती घालून बनविलेला तो एक किल्ला किंवा गढीच होय. त्यांतहि प्रचंड दरवाजामागें दरवाजे लागलेले, प्रत्येक दरवाज्यावर हत्यारबंद शिपायांचा पहारा, माणसाला माणूस भेटण्याची, बोलण्याची चोरी, कोठें कांहीं घडलें तरी छळांतून सोडविण्यालाच काय पण दुरून छळ पाहून सहानुभूतीचा सुस्कारा टाकण्याला साथीदार नाहीं. अशा स्थितींत एकट्यादुकट्या माणसाला पुष्कळांनीं धरून दंडुक्यानें सडकून काढावें, बुक्क्यांचा मार द्यावा, बुटांच्या लाथा मारून जखमा कराव्या यांत मर्दपणा किंवा पुरुषार्थ तरी काय ? उलट इंग्रजींत ज्याला अत्यंत निंदास्पद म्हणून कॉवर्डली असा शब्द लावतात तसल्या प्रकारचें हें कृत्य होय; व हा इंग्रजी शब्द घालण्यांत आमचा हेतु असा कीं, आम्हीं लावलेला हा शब्द कर्णोपकर्णीं येरवड्यांतील गोऱ्या अधिकाऱ्यांना कळला तर आमचें त्यांच्याविषयीं काय मत आहे हें नेमकें त्यांच्या लक्षांत येईल.

दुर्बळाला प्रबळ मनुष्यानें मारणें यासारखें नादानपणाचें दुसरें कृत्य नाहीं. एखादा मोठा मनुष्य लहान मुलाला किंबहुना यःकश्चित् एखाद्या कुत्र्यालाहि मारतांना रस्त्यांत आढळला तर शांत वृत्तीच्या माणसालाहि ह्या नादान, क्रूर माणसाच्या अंगावर धावून जाऊन हातांत सांपडेल त्यानें झोडपून काढावें मग काय होईल तें होईल अशा त्वेष येतो. मग तुरुंगांत दारें लावून असहाय्य स्थितींत कोणी कोणाला मारतात असें कळलें तर बाहेरच्या लोकांना किती दुःख वाटत असेल व किती त्वेष येत असेल याची कोणीहि कल्पना करावी. असल्या गोष्टींना आळा घालणें हें लोकांच्या स्वाधीन नसलें तरी सरकारच्या स्वाधीन खाचित आहे. म्हणून अशा गोष्टींचा पुकारा गवगवा झाला

असतांहि सरकार जर चौकशी न करील, तर तुरुंगांतील या अधिकाऱ्यांच्या बरोबरीनें स्वतः होममेंबर व पर्यायानें गव्हर्नरसाहेबहि दोषी व निंद्य ठरतील.

कायदेभंगाची चळवळ करणाऱ्या लोकांना नांवें ठेवण्याचा कांगावा करणारें सरकार व त्यांचे हस्तक हे स्वतः अनेक खात्यांतून पदोपदीं कशा प्रकारें व किती कायद्याचें उल्लंघन करतात हें कोणी लिहूं लागला तर त्याला जागा पुरणार नाहीं. आणि सरकारचा हा कायदेभंग प्रजेच्या कायदेभंगापेक्षां किती तरी निंद्य व असमर्थनीय ठरतो. इतर खात्यांतील कायदेभंगाविषयीं बोलण्याचा आजचा प्रसंग नाहीं म्हणून त्याविषयीं कांहीं लिहीत नाहीं. परंतु तुरुंगाच्या बाबतींत होणाऱ्या या विशिष्ट प्रकारच्या सरकारी कायदेभंगासंबंधानें, झोटिंगशाहीसंबंधानें आम्ही इतकेंच म्हणतों कीं, स्वातंत्र्य मिळविलेल्या युरोपियन राष्ट्रांच्या चळवळींत लोकपक्षाचा हात सर्वांत आधीं तुरुंगावर पडत असे, व तेथून पुढें सर्व गोष्टी होत. याचें कारण हेंच कीं, कोणत्याहि नोकरशाहीचा दुष्टपणा, क्रूरपणा, सैतानीपणा हा तुरुंगांतून जितका एकीकृत झालेला व नमुनेदार पहावयास सांपडतो तितका तो इतरत्र पहावयास सांपडत नाहीं. इटालीच्या जुन्या राजवटींतील 'नेपालिटन' तुरुंग किंवा फ्रेंच बादशाहीच्या इतिहासांतील बॅस्टीलचा तुरुंग यांना जी ऐतिहासिक प्रसिद्धि लाभली ती यामुळेंच कीं, तुरुंगांतच अत्यंत तामसी नोकरशाही व सात्विक राजकीय स्वातंत्र्यबुद्धीचे प्रवर्तक यांच्या गांठी पडल्या. आणि गारेवर लोखंडाचा आघात होऊन ठिणगी पडावी त्याप्रमाणें या दोन कठीण मनांची चकमक येथेंच झडून जें तेज प्रगट झालें त्यानें शेवटीं नोकरशाहीचा स्वाहाकार केला.

हिंदुस्थानांतहि तुरुंगांतील कैद्यांच्या छळाला अलीकडे जें राजकीय महत्त्व येऊं लागलें आहे त्याचेंहि झालें तरी कारण हेंच होय. राजकीय चळवळींतील विद्युत्शक्तीच्या पॉझिटिव्ह व निगेटिव्ह अशा दोन अंगांचा संनिकर्ष हल्लीं तुरुंगांत घडूं लागला आहे. व सरकारच्या मनाच्या अंतःस्थितीचा फोटोग्राफ जर बरोबर कोठें पाहावयाचा असेल तर तो तुरुंगांतील राजबंदींच्या वागणुकींतच निघणार आहे. म्हणून सरकारनें या वागणुकींविषयीं जितकी खबरदारी ठेवावी तितकी थोडीच होणार आहे. येरवडा येथें घडलेल्या ह्या एका प्रत्यक्ष प्रसंगाची हकीकत आम्हीं साधार दिली आहे, व सरकारला स्वतःच्या अब्रूची कांहीं चाड असेल तर याची त्यांनीं चौकशी करावी असें आमचें त्यांना सांगणें आहे.

## १३ सोलापूर-प्रकरणांत हायकोर्टानें हात टेकले !

सोलापूर येथें लष्करी कायद्याच्या नांवाखालीं अनेक लोकांना भयंकर शिक्षा झाल्या. त्यांपैकीं कांहींनीं मुंबई हायकोर्टाकडे अपिलें केलीं. त्यांचा निकाल गेल्या सोमवारीं लागला. तो असा कीं, "झालेल्या शिक्षा लष्करी कायद्याच्या ऑर्डिनन्सप्रमाणें कायदेशीर असल्यामुळें त्यांत हायकोर्टाला हात घालतां येत नाहीं." वास्तविक अपीलेट कोर्ट म्हटलें म्हणजे त्याला खालच्या कोर्टानें दिलेली शिक्षा कायम करतां येते, कमी करता येते, किंवा फिरवितां येते म्हणजे अजीबात रद्द करतां येते आणि सोलापूरच्या प्रकरणांतल्या शिक्षा इतक्या भयंकर होत्या कीं, त्या कायदेशीर ठरल्या तरी आतां त्या कमी करण्या-इतकी दयाबुद्धि किंवा सारासारविचार कोणाहि हायकोर्टाच्या मनांत आल्याशिवाय राहिला नसता. पण मुळांतील चूक अशी आहे कीं, सोलापूरच्या लोकांच्या अर्जाला अपील असें नांव स्थूल समजुतीखातर दिलें तरी तें खरें अपील नाहीं, आणि 'हायकोर्ट' हें सर्व वरिष्ठ कोर्ट अशी त्याच्या नांवामुळें समजूत होत असली तरी त्याचा अधिकार या मुकदम्यांत अगदीं मर्यादित होता. म्हणजे या लोकांना झालेल्या शिक्षा कायदेशीर आहेत कीं बेकायदेशीर आहेत. इतक्या एका संकुचित मुद्याचा निकाल हायकोर्टाला करतां येण्याजोगा होता. शिक्षा बेकायदेशीर आहेत असें हायकोर्टाच्या नजरेला आलें असतें, तर या अर्जदारांना बंधमुक्त करावें असा हुकूम त्याला करतां आला असता. पण त्या कायदेशीर आहेत असें म्हटलें कीं, हायकोर्टाचा अधिकार संपला. शिक्षा झाल्या त्या तशाच राहावयाच्या, हायकोर्टाला त्या कमी करण्याचा अधिकार नाहीं. कौल लावणाऱ्या गुरवाच्या ताब्यांतल्या देवाप्रमाणें, किंवा उलटतपासणींत प्रश्न विचारणाऱ्या वकिलाच्या ताब्यांतील साक्षीदाराप्रमाणें, हायकोर्टाला 'होय' किंवा 'नाहीं' म्हणजे शिक्षा कायदेशीर कीं बेकायदेशीर, इतकाच निर्णय देतां येतो असा कायदाच आहे. आणि त्याबाहेर हायकोर्टाला जातां आलें नाहीं.

### लाहोर हायकोर्टाचा निकाल

या अर्जाचें काम चालू असतां सरकारतर्फे ॲडव्होकेट-जनरल यांनीं अर्ज मुळापासून खणून काढून फेंकून देण्याचा प्रयत्न केला. कारण त्यांनीं भूमिकाच अशी घेतली कीं, लष्करी कायदा म्हटला म्हणजे त्याअन्वयें झालेल्या प्रकारांत बेका-यदेशीरपणा असला तरी त्यांत हायकोर्टाला हात घालतां येत नाहीं. परंतु

सुदैवानें सर-न्यायाधीश व न्या. माडगांवकर यांनीं ही तक्रार अमान्य केली. असाच एक प्रश्न अलीकडे लाहोर हायकोर्टापुढें उपस्थित झाला होता. त्यांत न्या. भिडे यांनीं जो निर्णय दिला तोच मान्य करून मुंबई हायकोर्टानेंहि असें ठरविलें कीं, "मार्शल लॉचा ऑर्डिनन्स काढणाऱ्या अधिकाऱ्याला म्हणजे गव्हर्नर-जनरलला, तो काढणें जरूर होतें असें वाटल्याचा पुरावा आहे कीं नाहीं याचा विचार व निर्णय करण्याचा अधिकार हायकोर्टाला आहे. तो गव्हर्नमेंट ऑफ इंडिया आक्टानें काढून घेतलेला नाहीं." आमच्या मतें या निर्णयाला बरेंच महत्त्व आहे. पण त्याचा उपयोग या प्रकरणीं फारसा होऊंच शकला नाहीं. लष्करी कायद्याच्या जरूरीचा असा थोडाबहुत पुरावा असणारच! त्या पुराव्याची शाबिती करणें कधींच कठीण जाणार नाहीं. कारण गव्हर्नर-जनरलसाहेब आपले सहज एके दिवशीं झोंपेंतून उठले, आणि दुःस्वप्नपरिहाराकरितां ऑर्डिनन्स लिहावयास कागद घेऊन बसले किंवा एक लिहावयाचें मनांत असतां भ्रमांत त्यांनीं दुसरेंच लिहिलें, असें कसें होणार? आणि अगदीं धादांत खोटे-पणा किंवा मूर्खपणा किंवा खुनशीपणा म्हटला तरी "लष्करी कायदा हवा. तसा ऑर्डिनन्स काढा. त्याविणें अडलें आहे. तो न काढला तर अनर्थ होतील!" अशा लेखी ओरडीनें विनंतीनें विनवणीनें चितारलेले कागद खालून वर आलेलेच असणार; व त्यांचा परामर्षपूर्वक उल्लेख सरनाम्यांत करूनच ऑर्डिनन्स लिहिला जाणार! पण नोकरशाहीच्या रहाटगाडग्यांतून खालून वर चढलेल्या या कागदी पोहऱ्यांत खरोखर पाणी किती आहे याचा तपास करणें म्हणजेच लष्करी काय-द्याच्या प्रश्नाची खरी विचिकित्सा होय.

## ऑर्डिनन्स कसा निघाला ?

सुदैवानें हायकोर्टाच्या तिघां न्यायमूर्तींपैकीं निदान दोघांनीं जी विचिकित्सा केली तींत त्यांचा कयास असा झाला कीं, 'सोलापूर येथें लष्करी कायदा पुका-रण्यासारखी भयंकर स्थिति नव्हती.' सरन्यायाधीश यांनीं असें म्हटलें आहे कीं, "ता. १२ एप्रिल रोजीं सोलापुरांत मोठी बिकट स्थिति प्राप्त झाली होती. लोकांनीं बंडाळी चालविली होती, पण त्या बंडाळीला बंड किंवा सरकारविरुद्ध युद्ध असें नांव देतां येईल कीं नाहीं हा प्रश्नच आहे. माझ्या मतें सोलापूरच्या अधिकाऱ्यांनीं पोलिसांच्या हातून काम निभत नाहीं असें पाहून फार तर लष्करी जवान किंवा तुकडी बोलवावयाची असती म्हणजे या लष्करी शिपायांना कोणी

हुकूम द्यावा, कसा द्यावा, याविषयीं कांहीं नियम ठरवितां आले असते." म्हणजे जरूर ती मुद्दत मिळून लष्करी कायदा पुकारल्याशिवायहि, मुलकी अधिकारी म्हणजे मॅजिस्ट्रेट व मामुली पोलीस व न्यायकोर्टें व फार तर लष्करी तुकडी यांच्या हातून बंडाळी मोडतां आली असती. पण सरन्यायाधीशांचें म्हणणें असें कीं, गव्हर्नर-जनरल यांचीच खात्री पटून त्यांनीं आर्डिनन्स काढल्यावर मग अवांतर गोष्टींचा विचार करण्यांत काय अर्थ !

चूक असेल, किंबहुना झाली आहेहि. परंतु ती खालच्या अधिकाऱ्यांची, गव्हर्नर-जनरल यांची नव्हे. नोकरशाहीरूपी रहाटगाडग्याच्या चक्रानें रिकामा पोहरा वर पाठविला तरी रहाटाला तो उपडा करणेंच प्राप्त, मग त्यांत पाणी असो; नसो. सोलापुरच्या कलेक्टरांनीं लष्करी कायदा मागितला. मुंबई-सरकारच्या होममेंबरांनीं त्या विनंतीला पाठिंबा दिला. गव्हर्नरसाहेबांनीं त्यावर संमतिदर्शक मखलाशी केली. गव्हर्नर-जनरल पडले दूर सिमल्याला. मुंबईहून जर कोणी भला माणूस सोलापुरास जाऊन तपास करून लष्करी कायदा नको म्हणत नाहीं, तर हिमालयाच्या शिखरावर बसलेला गव्हर्नर-जनरल नको कसा म्हणणार ! कारण प्रकरण बिनसलें कीं स्टेटसेक्रेटरीकडे तक्रार जाणार.. नसती जबाबदारी कोणीं घ्यावी ! झालें. ऑर्डिनन्स निघाला. कर्नल पेज यांनीं आपल्या इच्छेप्रमाणें पूर्वी चालत असलेल्या अत्याचारांना विधिप्रणीत आचारांचें स्वरूप दिलें. आणि जें झालें व जें होईल तें सर्व शास्त्रपूत, निदान शास्त्रपूतप्राय, असें मानलें जावें असें ऑर्डिनन्समध्येंच लिहिलें गेलें. मग अशास्त्रता कसली व अपील कसलें ! न्यायमूर्ति ब्लॅकवेल यांची मजल याहिपुढें गेली. पण त्यांच्या विचारसरणीसंबंधानें निषेधार्थी जितकें लिहावें तितकें थोडेंच होणार असल्यामुळें आम्ही तो विषयच सोडून देतों.

## पाटीलबुवांचा युक्तिवाद

पण न्यायमूर्ति माडगांवकर यांनीं या मुद्द्यावर सर न्यायाधीशापेक्षांहि अधिक स्पष्ट, निर्भीड व सडेतोड टीका केली आहे. ते म्हणतात-" लष्करी कायद्याचा ऑर्डिनन्स काढण्याचा गव्हर्नर-जनरलला मुळीं अधिकारच नाहीं हें म्हणणें मला मान्य नाहीं. तसा अधिकार आहे. तो एका पार्लमेंटाच्या कायद्यानें त्याला दिलेला आहे. व विलायतेंत महायुद्धाच्या वेळीं नोकरशाहीला कायद्यानें पर्ण स्वातंत्र्य दिलें होतें तें लक्षांत घेतां, गव्हर्नर-जनरलला हि हें स्वातंत्र्य नाहीं

असें म्हणतां येत नाहीं. पण ॲडव्होकेट--जनरल जें म्हणतात कीं, 'असा ऑर्डिनन्स नसता तरी जागेवरच्या अधिकाऱ्यांनीं जें कांहीं केलें तें प्रामाणिकपणानें केलें असें ठरल्यास त्यांच्या निकालांत न्यायकोर्टांना हात घालतां येत नाहीं' हें म्हणणें मात्र मला मान्य नाहीं. अधिकारी जागचा झाला म्हणून तो कांहीं देव नव्हे. तो चुकीला पात्र असणारच. अर्थात् त्यानें चुक केली कीं नाहीं हें पाहण्याचा वर कोणाला तरी अधिकार असलाच पाहिजे. सोलापुरास लष्करी कायदा न पुकरतां नुसती लष्कराची मदत घेतली असती तर पुरें पडलें असतें असेंच मलाहि वाटतें." शिवाय खटल्याची सुनावणी सुरू असतां त्यांनीं ॲ. जनरल यांना प्रश्न विचारून असें सुचविलेंहि होतें कीं, आज कलेक्टर जागचा अधिकारी असल्यामुळें त्यानें लष्करीअंमल गाजविला म्हणून तो क्षम्य मानणार, तर उद्यां गांवचा पोलिस पाटील तीच विचारसरणी चालवून म्हणेल कीं 'मी जागचा अधिकारी. सरकारचा रखवालदार, माझा गांव कोठें आणि सरकारचा सिमला कोठें! गांवावर धाड पडली असें मीं म्हटलें कीं ती पडलीच! गांवांत बंड झालें असें मीं म्हटलें कीं तें झालेंच! मी मला माणूस प्रामाणिकपणें वागलों. माझें चुकलें तर तें पाटलाचें चुकलें, म्हणजे तें सरकारचें चुकलें. सरकारची इभ्रत संभाळावयाला मी लष्कर बोलावीन, नाहीं तर गोळीहि वाजवीन. मला नाहीं म्हणणार कोण!" आणि पाटीलबुवांचा हा युक्तिवाद एकदां मान्य झाला म्हणजे सर्वच ग्रंथ आटोपला. या प्रकरणांत पाटील नसून, कलेक्टर हा नाटकांतला नायक आहे. तथापि लष्करी कायद्याचें महत्त्व लक्षांत घेतलें म्हणजे तो पाटीलच.

## लष्करी कायदा नको; लष्करी मदत हवी

अशा रीतीनें सर न्यायाधीश व न्या. माडगांवकर या दोघांनीं तरी तत्त्वाची अब्रू संभाळली म्हणावयाची. पण फुंकर घातल्यानें आग थोडी थांबली तरी जखम बरी होत नाहीं. त्याप्रमाणें या न्यायमूर्तींच्या तत्त्वसमर्थनानें सोलापूरच्या लोकांवर गुदरलेल्या कहराचा परिहार होऊं शकत नाहीं हें सिद्ध झालें आहे. गव्हर्नर-जनरल यांचा अधिकार एकदां कबूल केल्यावर त्यांनीं अविचार किंवा घाई केली असें कोरडें मत प्रदर्शित केल्याचा उपयोग काय? निदान उपयोग झाला तर तो हायकोर्टाकडे दाद मागणाऱ्या या सतरा लोकांना नाहीं. फक्त लोकमतालाच त्याचा उपयोग होणार आहे. कारण या याबतींत प्रथमपासूनच

लोकमत असें ठाम आहे कीं, सोलापुरांत लष्करी कायदा पुकारण्याची केव्हांहि गरज मुळींच नव्हती. येऊन जाऊन खरा दंगा, किंवा तुम्हाला वाटेल तर बंडहि म्हणा, जें झालें तें फक्त एक दिवस किंवा दोन दिवस कांहीं तास झालें व तेंहि सर्वस्वीं बिनहत्यारी लोकांनीं केलें. तें मोडण्याला हत्यारी पोलीस किंवा फार तर एखादी लष्करी तुकडी पुरी झाली असती. ता. ८ किंवा ९ एप्रिल यानंतर बंडच काय पण बंडाळीहि नाहीं, दंगाधोपाहि नाहीं. तर जीव बचावण्याकरितां लोक बाहेर जात होते व गांवांत राहिलेले भेदरून दारें लावून बसले होते. आणि जर काय चाललें असेल तर तो पोलिसांचा व लष्कराचा धिंगाणा. हल्लीं लष्कर निघून गेलें आहे. तरी पण पोलीस व त्यांचे साक्षीदार यांचा धिंगाणा सुरूच आहे. आणि जणूं काय आहे हा धिंगाणा पुरेसा न वाटून सरकारानें फिरून एक वर्षभर सोलापुरावर जादा पोलीस बसविले आहेत. आणि दंग्याधोप्यामुळें आमचें नुकसान झालें तें भरून द्या, अशा अर्जांवरून सरकारच्या किती आश्रितांच्या खिशांत किती पैसे जाणार आहेत याचा अंदाज लागत नाहीं! तात्पर्य, बंडाळचा शिमगा झाला असेल तर तो एक दिवस होऊन गेला; आणि आतां वर्षभर त्याचें अभद्र कवित्व कानावर पडत राहणार! शिमग्याच्या कवित्वांतल्या शिव्या खऱ्या तरी असत नाहींत. पण या दडपशाहीच्या कवित्वांत सगळा प्रत्यक्ष दुःखद अनुभव!

## यांत पुरुषार्थ काय?

हायकोर्टाकडे अर्ज झाले, त्यांत मागणी शिक्षा रद्द ठरविण्यासंबंधाची होती. पण ऑर्डिनन्सच्या शब्दांनीं तिला हरताळ फासला गेला हें स्वतः न्यायमूर्तींनींच कबूल केलें आहे. म्हणजे गव्हर्नर-जनरल यांनीं एकतर्फी रिपोर्टावरून लष्करी कायद्याचा ऑर्डिनन्स काढण्याची जी एक चूक केली तिच्याबरोबर दुसरीहि चूक अशी केली कीं, ऑर्डिनन्सचें नोटिफिकेशन होण्यापूर्वी, अधिकाऱ्यांनीं जें जें कांहीं केलें त्याचा सगळा गुन्हा माफ! इतकी सवलत मिळाल्यावर अधिकारी जाहिरनामा लवकर काढतातच कशाला! अर्थात् १५ तारखेला ऑर्डिनन्स निघाला तरी इन्साफाचा अधिकार तारीख १८ च्या रात्रीपर्यंत लष्करी अधिकाऱ्यांच्या हातींच राहिला. ऑर्डिनन्सचा जाहिरनामा तावडतोब लागला असता तर निदान राजवाडेप्रभृति कांहीं लोकांच्या शिक्षा तरी वांचल्या असत्या. म्हणजे निदान इतक्या भयंकर तरी झाल्या नसत्या.

बरें, कर्नल पेज यांनीं डि. मॅजिस्ट्रेट यांच्यासह मार्शल कोर्ट बनवून ज्या शिक्षा दिल्या त्यांच्या गुन्ह्यांना तरी खरोखर बंडाळीचें स्वरूप काय होतें ! बंडखोर लोकांच्या हातीं हत्यारें लागलीं आहेत, किंवा ते घरांतून छपून बसून गोळ्या घालीत आहेत, किंवा लपून छापे घालीत आहेत, किंवा एकट्यादुकट्या अधिकाऱ्यांना गांठून बिनहत्यारीच कां होईना पण मारहाण व जखमा करीत आहेत, किंवा चेदिल झालेले जमाव ठिकठिकाणीं जमत आहेत— असें कांहीं घडत असतें व त्यांत एक वेळ गोळीबार झाला असता तरी त्या घातपाताला एक प्रकारचा स्वाभाविकपणा असता. पण लष्करी कोर्टानें ज्याकरितां ७ वर्षें, १० वर्षें अशा शिक्षा व ५–१० हजार रुपये असे दंड केले; त्यांचे मूळ गुन्हे खरोखर कोणत्या स्वरूपाचे होते हें पाहिलें म्हणजे सरकारच्या मदांधतेची खरी कल्पना होते.

कोणीं थांब म्हटलें तर थांबला नाहीं, घरांत जाऊं नको म्हटलें तरी गेला, कोणीं पोलिसांविरुद्ध येऊन तक्रार केली; कोणीं गोळीबाराच्या हकीकती प्रसिद्ध केल्या; कोणीं मान वर उंच करून पाहिलें; कोणीं डोळे वटारून धिटाई केली व कोणीं कसला तरी हुकूम अमान्य केला. अशा प्रकारचे हे पुष्कळसे मानीव व लावालावीचे गुन्हे होते. सरकाराविरुद्ध बंड किंवा बंडाळी असें म्हणण्याजोगें त्यांत काय आहे ? पण सोलापूरच्या कलेक्टरांनीं मुळांत भलती चूक केली व ती वरपर्यंत उचलून धरण्यांत येत गेली, यामुळें ऑर्डिनन्स निघाला, आणि ऑर्डिनन्सनें लष्करी अधिकाऱ्यांचे शंभर गुन्हे माफ केले ! आणि गरीब बिचारे सोलापूरचे लोक, कोणी ५ वर्षें, कोणी १० वर्षें तुरुंगांत खितपत पडणार ! दंड-वसुलीकरितां कोणाच्या घरांचा लिलांव झाला, तर कोणाच्या घराच्या जप्त्या झाल्या हें सुरू राहणार ! असें पाहिलें म्हणजे मनांत काय वाटतें तें लिहितां येत नाहीं. हायकोर्टांत सरकारचा जो विजय झाला तसला विजय मिळविणें हें सत्ताधीश सरकारला सोपें आहे ! पण त्यांत फारसा पुरुषार्थ नाहीं.

## कायदेशीर ठरला, दयाशील बना

हायकोर्ट त्यांच्या घरचें नसलें तरी कायदा लिहून काढणें हें त्यांच्या घरचें आहे. पण हायकोर्टाच्या मनाला खरोखर पटत नसतां “ आम्ही काय कायद्याचे बंदिवान ! कायदा असेल तो खरा ! त्याचाच अंमल चालूं देणें आम्हाला प्राप्त आहे ” या हायकोर्टाच्या शब्दांनीं सरकारला लाज असेल तर, त्यांची कांहीं

थोडी पूजा बांधली गेली नाहीं ! पण लाज असेल त्याला शब्दाचा मार. ज्यानें बेशरमपणाच्या गेंड्याच्या कातड्यानें आंतून कायद्याचें अस्तर घालून आपलें अंग नखशिखांत मढवून घेतलें, त्याला हायकोर्टाच्या शब्दांचा झाला तरी वार काय लागणार ? तात्पर्य, हायकोर्टांत व्हावयाचें तें झालें. पण तेथें मिळालेल्या जयावर तरी संतुष्ट होऊन सरकारनें आतां लष्करी कायद्यानें शिक्षा झालेल्या लोकांना सोडून द्यावें, व अशा रीतीनें आपल्या दयालुत्वाचा टेंभा तरी पाजळून आपल्या तोंडाभोंवतीं ओवाळून घ्यावा.

---

# १४ राष्ट्रीय चळवळीवर गाढवाचा नांगर !

गेल्या एप्रिलचे सुमारास सरकाराच्या दडपशाहीला प्रारंभ झाला. तेव्हांपासून तिची कमान दिवसेंदिवस चढती असल्याचेंच दिसून येत आहे. आणि गेल्या आठवड्यांत तर दडपशाही कळसाला जाऊन भिडण्यासारखी भासते. कारण हल्लींच्या चळवळींचें मुख्य केंद्र जें मुंबई शहर त्यांतील चळवळ करणाऱ्या सर्वच्या सर्व संस्था अंगोपांगांसह बेकायदेशिर ठरवून, त्या मोडून, त्यांचे कागदपत्र, पैसाअडका, सामानसुमान व इमारतीहि सरकारानें आपल्या ताब्यांत घेतल्या आहेत. म्हणजे आतां कदाचित् असेंहि म्हणतां येईल कीं, शीव ( सायन )जवळ समुद्राची सांखळी तोडून मध्यें घुसलेल्या जमिनीच्या पट्ट्यावर जर पूर्वपश्चिम एखादी कांटेरी तार लावली, तर मुंबई बेटच्या बेट हा एक अजस्त्र तुरुंगच होईल. त्याची राखण पूर्वोत्तर भागाकडे पोलीस व पश्चिम-दक्षिण भागास लष्कर करीतच आहे. या नवलाख वस्तीच्या बेटाला तुरुंग म्हणण्याला लोकांच्या तर दृष्टीनें कांहींच हरकत नाहीं. त्यांतले कांहीं नागरिक डोंगरी, आर्थर रोड, भायखळा वगैरे ठिकाणच्या तुरुंग म्हटलेल्या विशिष्ट इमारतींत डांबून ठेवलेले असले तरी, बाकींचे नागरिक वस्तुतः कैद्यासारखेच आहेत. कारण सार्वजनिक स्वरूपाची यच्चयावत् सर्व प्रकारची चळवळ मुंबईत थांबलेली असून, बाहेरून दिसण्यांत मोकळे म्हणून वावरणारे लोक मनानें कैदेंतच आहेत. मनुष्याचें अंतःकरण तपासण्याचें यंत्र जर कोणी शोधून काढील तर, तुरुंगांत नसणारे लोकहि आज बेदिल व मनानें कायदेभंगप्रवण आहेत असेंच तें यंत्र दाखवलि यांत शंका नाहीं. येऊन

जाऊन सरकारी नोकर, युरोपियन व्यापारी, टाईम्स पत्राचें संपादक मंडळ व सरकारचे ठराविक बगलबच्चे हे काय ते मुंबई शहरच्या तुरुंगांतले कैदी नाहींत असें फार तर म्हणतां येईल. पण प्रत्यक्ष तुरुंग झाला तरी त्यांत सगळेच लोक अटकेंत असतात असें थोडेंच आहे. कारण त्यांतले कांहीं जेलर, कांहीं वार्डर आणि कांहीं पाहारेवालें असतात; व कांहीं भिस्ती, भंगी, खलाशी, कामाठी इत्यादि लोक नुसते मोकळे असतात इतकेंच नव्हे, तर ते कैद्यांवर आपापल्या परीनें हुकमतहि बजावीत असतात. तोच प्रकार आज मुंबईचा आहे.

मुंबईबाहेर गुजराथेंत तर याहून अधिकच भयंकर देखावा दृष्टीस पडतो. कांहीं उगीच अफवा व कांहीं खरा प्रकार मिळून करबंदीच्या चळवळीची दहशत वाटून, सरकारनें लोकांचीं नवीनच काय पण जुनीं देखील सर्व कार्यकेंद्रें बेकायदेशीर ठरवून, त्यांचीं कार्यक्षेत्रें व त्यांतील साधनें जप्त केलीं. याचा परिणाम असा झाला कीं, कांहीं कांहीं भागांतील शेतकरी आपापलीं घरेंदारें सोडून परमुलखांत जाऊं लागले. आणि ते गेले म्हणजे मागें त्यांच्या जमिनी, घरेंदारें, गोठे, नांगर, विहिरी यांची वाट कशा प्रकारें लागणार हें दिसतच आहे. सरकार कांहीं पिकें कापील, कांहीं सारा वसूल करील, कांहीं मिळकत विकून आपली नुकसानभरपाई करून घेईल. पण लोक देशोधडीला लागतील, ते परत आले तर आपल्यामागें आपला सत्यानाश झाला असें पाहून तळमळतील. पिढ्यानुपिढ्या हे लाके ज्या गांवीं राहिले. व आपला पैसा, श्रम, बुद्धि हीं सर्व खर्चून ज्यांनीं आजवर तेथें संसार मांडला व ममत्व जोडलें, त्या लोकांना तें गांव सोडून परागंदा व्हावें लागावें यांत सरकारला कमीपणा नाहीं काय !

अशा गोष्टी जगांत घडतात, नाहीं असें नाहीं. पण त्या युद्धाच्या धामधुमींतच घडतात. कोणी म्हणेल कीं, "हल्लीं तरी देशांत युद्धच सुरू नाहीं काय ? राष्ट्रिय सभेनें सुरू केलेल्या या चळवळींत अथपासून इतिपर्यंत सर्वत्र युद्धाच्या भाषेशिवाय दुसरी कसलीच भाषा वापरण्यांत येत नाहीं. 'कॉंग्रेस कमिट्या' हा शब्द निरुपद्रवी नीरस असा वाटल्यामुळें त्यांच्या जागीं 'युद्धमंडळें' नेमण्यांत आलीं. अध्यक्ष जाऊन त्यांच्या जागीं सर्वाधिकारी स्वरूपाचे सेनापति व डिक्टेटर आले. स्वयंसेवक हे स्वयंसैनिक बनले. सेवासंघाचीं सेवादलें झालीं. हर कामी लोकांच्या तुकड्यांना राष्ट्रीय सैन्याच्या पलटणी पथकें असें नांव देण्यांत आलें. शिस्त, कवाईत, सलाम्या, गणवेष, परवल, हुकमाचे शब्द व सवाल, परेडी, तळ, शिबिरें,

झेंडे, शिट्या, बिगुलें, बँड, मोहिमा, हल्ले, हालचाली, लष्करी गाणीं सर्व कांहीं बाबतींत राष्ट्रीय चळवळ लष्करी थाटानें नटली आहे. मग युद्धांत घडणाऱ्या इतर गोष्टीहि घडल्यास त्यांत काय वावगें ! अर्थात् लोकांच्या तोंडीला तोंड म्हणून सरकारलाहि युद्ध जिंकण्याचे आपले उपाय योजिलेच पाहिजेत. राष्ट्रीय सभेनें सरकाराला शत्रुस्थानीं लेखलें तर सरकारालाहि लोकांना शत्रू असेंच मानल्याशिवाय गत्यंतर नाहीं म्हणूनच त्यांनीं सर्वसामान्य राज्यपद्धति सोडून देऊन विशेष प्रकारची म्हणजे झटपट रंगारी स्वरूपाची पद्धति स्वीकारली आहे. यामुळें व्हाइसरॉयसाहेबांला ऑर्डिनन्सच्या मागून ऑर्डिनन्स काढावे लागतात. पण याखेरीज सरकार दुसरें तिसरें कांहीं करीत नाहीं. गरीब बिचारें सरकार ! त्याला आहे त्यावरच सर्व कांहीं भागवून घ्यावें लागत आहे. पोलीस एके पोलीस व त्यांच्या भरतीला, मदतीला जरूर तेथें लष्कर. मॅजिस्ट्रेट जुनेच, पण जुनें पीनल कोड ते सहसा उपयोगांत आणीतच नाहींत. ऑर्डिनन्सच्या ताज्या शिधोरीवरच सर्व कांहीं त्यांना भागवून घ्यावें लागतें. ते आरोपींचा एवढा तरी वेळ घेतात काय ! लगेच कबुली जबाब कीं लगेच शिक्षा. उगीच लांबलचक जजमेंट लिहितात काय ! व कारणें देत बसून आरोपींचें जें इष्ट स्थळ म्हणजे तुरुंग तेथें जाण्याला त्यांना इतका तरी वेळ ते लावतात काय ! मॅजिस्ट्रेटाप्रमाणें पोलीसहि जुनेच. पण ते पोलीस ॲक्टाचा सहसा उपयोग करीत नाहींत. राष्ट्रीय सभेनें आपल्या हस्तकांचीं नांवें तरी बदललीं. सरकारानें साधनें किंवा कार्यें यांचीं नांवें देखील बदललीं नाहींत. तेच जुने पोलीस, तेच जुने लष्करी शिपाई, त्याच जुन्या लाठ्या, त्याच जुन्या बंदुकी, तींच जुनीं पिस्तुलें, तेच जुने तुरुंग, आणि तेच जुने जेलर. येऊन जाऊन या सर्वांची संख्या काय वाढविली असेल तेवढीच. शत्रुपक्षानें युद्ध पुकारल्यानंतर इतका शांतपणा, इतकी धिमी वृत्ति व इतकें दाखलाशुद्ध वर्तन सरकारानें ठेवलें तरी फिरून त्यांना तुम्ही नांवें ठेवणारच काय !"

वरील प्रकारचा युक्तिवाद कदाचित् मायावीपणाचा व हास्यास्पद वाटेल. पण सरकार व त्यांचे हस्तक असलाहि युक्तिवाद आत्मसमर्थनार्थ करावयाला चुकणार नाहींत, व कांहीं कांहीं तो करण्याला आजहि चुकत नाहींत. पण शब्दच्छलाला देखील कांहीं सीमा असते. म्हणजे राष्ट्रीय सभेला

चीहि संख्या दिवसेंदिवस कमी होणार. मग सरदार व जहागीरदार हे नवे संस्थानिक बनूं पाहतील तर तें कसें घडेल? याविषयीं त्यांनीं थोडा सारासार विचार करावयास पाहिजे. त्यांनीं जुनें सरदारी फेटे बांधावे, पण त्यांचा शमला सरकाराप्रमाणें लोकांकडेहि केव्हां केव्हां तरी झुकूं नये काय? निष्ठा ही चांगली, पण त्या निष्ठेचा मक्ता सगळा राजालाच न देतां जनतेलाहि थोडाबहुत कां देऊं नये!

राज्यक्रांति झाल्यानंतर पहिल्या पहिल्या दिवसांत हें राजनिष्ठेचें बोलणें ठीक होतें. कारण त्यानें आत्मसंरक्षण, मान्यता, आर्थिक लाभ हीं पदरांत पडण्यासारखीं होतीं. पण खुद्द सरकारच आतां या राजनिष्ठेची पर्वा न करण्याइतकें तालेवार व बेगुमान झालें आहे. त्यांनीं लोकांच्या राजनिष्ठेंतून मिळणारें तूप तर सगळें खाल्लेंच; पण आतां उरली खरवडहि नखानें ओरबडण्याचा क्रम सुरू ठेवला आहे. या स्थितींत 'आम्ही राजनिष्ठ आहों' हे शब्द ऐकून सरकारच्या काळजाला पाझर कितीसा फुटणार! उलट हे शब्द ऐकून ते मनांत कदाचित् हंसतहि असतील.

जमीनदार वर्गानें कायदेमंडळांत एखाद दुसरी राखीव जागा मागावयाची तर ती मागणी फक्त एका दृष्टीनें सयुक्तिक करून दाखवितां येईल. ती अशीः हल्लीं जमीनदारांच्या कुळांमध्यें एक नवीन चळवळ सुरू झाली आहे. ती म्हणजे वरिष्ठ धारण करणाराचें देणें सर्वस्वीं बुडविण्याची. कुळाकडून वसुलाची मागणी करण्यांत जमीनदारांनीं जुनी दृष्टि, जुने दाखले, आतां टाकून देऊन नवी दृष्टि स्वीकारली पाहिजे व नवे दाखले पाडले पाहिजेत. या गोष्टीला कायद्याचा आधार लागणारच आणि कायदा म्हटला म्हणजे कायदेमंडळ आलेंच. अर्थात् कनिष्ठ व वरिष्ठ धारण करणारांच्या दरम्यान विरोधी हक्कांची न्यायानें तोंडमिळवणी करण्याचा कायदा व्हावयाचा तर, कायदेमंडळांत जमीनदारांचा प्रतिनिधी असणें न्याय्य ठरेल.

आज युनिव्हर्सिटीचा प्रतिनिधि म्हणजे सुशिक्षित वर्गाचा राखीव प्रतिनिधि, व्यापारी सभांचा प्रतिनिधि म्हणजे एक प्रकारच्या धनिक वर्गाचा प्रतिनिधि हे जर सरकारला खपतो तर जमीनदार हाहि असाच एक वर्ग नव्हे काय, कीं ज्याला इतरांप्रमाणें आपल्या हक्काची तरफदारी कायदेमंडळांत करण्यास योग्य संधि व वाव मिळावा! कौन्सिल ऑफ स्टेटची मतदारी उच्च प्रतीची ठेवली-त्यांत विशिष्ट हक्कांचा राखीवपणाच नाहीं काय? तथापि हें सर्व घडून आलें तरी

एखादीच राखीव जागा जमीनदारांना मिळणार. तेवढ्यानें त्यांचें तरी कार्य काय होणार ? म्हणून शेवटीं गव्हर्नरसाहेबांनीं टर्फक्लबमध्यें जमीनदारांना जो सल्ला दिला तोच मार्मिक ठरतो. तात्पर्य, सरदार व जहागीरदार लोकांनीं आतां यापुढें जनतेंत मिसळून तिच्याशीं समरस होऊन, आपल्या स्वाभाविक संपन्नतेचें चीज कसें होईल याचाच विचार करण्यास लागावें हें बरें, असें आम्हालाहि वाटतें.

---

## १०३ सत्यासत्याची 'शास्त्रीय' चर्चा

(केसरी, ता. ८ जानेवारी १९३५)

गेल्या शुक्रवारीं फर्ग्युसन कॉलेजच्या एकावन्नाव्या वाढदिवसाचा समारंभ मोठ्या थाटानें साजरा करण्यांत आला. या प्रसंगीं मुख्य भाषण करण्याचा मान नेक नामदार श्रीनिवास शास्त्री यांना देण्यांत आला होता; व त्यांनीं केलेलें भाषण त्यांच्या कीर्तीला शोभेसेंच झालें यांत शंका नाहीं. ना. शास्त्री यांचा गोड खणखणीत आवाज, त्यांचे रेखीव कातीव ठसठसीत शब्दोच्चार, इंग्रजी भाषेवरील त्यांचें प्रभुत्व, आणि तात्त्विक उच्च विचारसरणी, हे गुण केव्हांहि श्रोतृवृंदाला मोहच पाडतात. नामांकित अशा इंग्रज व्यक्त्यांनींहि त्यांची जी स्तुति केली आहे ती उगीचच नव्हे. आतां परवांचें त्याचें भाषण आद्मासा-बाहेर लांबलें; यामुळें थोडें कंटाळवाणें झालें. काळजाचे विकारानें त्यांना दम छाटावा लागत होता व शब्दामागून शब्द येत त्यांत फारच काळ जाई, यामुळें कमान ढिली पडलेल्या फोनोग्राफप्रमाणें त्याच्या नाद-मधुर भाषणाचा रसभंग होई. आणि भाषणाला विषय म्हणून जो त्यांजवर लादला गेला तोहि अवजड ठरून त्यांना त्याची कड नीटशी पोंचवितां आली नाहीं. तथापि वक्ता व प्रसंग या दोहोंचेंहि योग्य महत्त्व ओळखणाऱ्या प्रचंड श्रोतृ-वर्गानें त्यांचें दीड तास रेंगाळत झालेलें भाषण मरेठ्या शांतपणें, आस्थेनें व आदरानें ऐकून घेतलें, ही एकच गोष्ट त्यांनीं मिळविलेल्या सुप्रतिष्ठित पदाची जाणीव करून देणारी होती.

ना. शास्त्री यांच्या भाषणाचा हा प्रसंग, अर्धशतकापर्यंत महाराष्ट्रांत पुढारी-पणानें उच्च ज्ञानदानाचें काम केलेल्या एका नामांकित शिक्षण-संस्थेच्या ज्युबिलीसमारंभाचा होता. आणि त्यांच्यापुढें पुण्यांतील प्रतिष्ठित नागरिकांचा व प्रौढ विद्यार्थ्यांचा मोठा समाज उपस्थित व्हावयाचा होता या दृष्टीनें प्रि. महा-

जनी यांनीं या प्रसंगीं ‘ सार्वजनिक नीतिमत्ता ’ हा विषय ना. शास्त्री यांच्या भाषणाला सुचविला हें सहजच झालें. विद्यार्थी पढवून तयार करावयाचे ते अर्थातच पुढें नमुनेदार नागरिक तयार होतील या आशेनें आणि ही आशा सफळ व्हावयाची तर या भावी नागरिकांना सार्वजनिक नीतिमत्तेचीं तत्त्वें समजून देण्याचा प्रयत्न केव्हांहि स्तुत्यच ठरेल. परंतु ना. शास्त्री यांनीं या नीतीच्या अनेक अंगांपैकीं फक्त सत्य हेंच चर्चेला घेतलें; व त्या चर्चेंतहि ते इतके दूरवर शिरले कीं त्यांतून परत समारोपाला येतांना त्यांच्या हातीं सिद्धान्तरूपी तत्त्व असें फारच थोडें उरलें; असें पुष्कळ श्रोत्यांना वाटलें असेल. त्यांचा सर्व साधारण उपदेश ठीक होता. पण सोदाहरण तपशीलवार झालेली सत्यधर्माची चर्चा असावी तितकी चटकदार किंवा गहनहि भासली नाहीं.

ना. शास्त्री यांनीं मुख्य सिद्धान्त म्हणून मांडला तो असा—“ एकंदर सार्वजनिक जीवनाचा आत्मा म्हणजे माणसामाणसांतील परस्पर दृढ विश्वास. हा विश्वास उत्पन्न होण्याला प्रत्येकानें खरें वाटेल तेंच बोललें पाहिजे, आणि वचन दिलें तें पाळलेंच पाहिजे. या गोष्टी घडत गेल्या म्हणजे आपण कोणाशीं काय व्यवहार करावा; कसा करावा हें ज्याचें त्याला नीट समजूं शकतें व फसगत होत नाहीं. पण खरें बोलणें व वचन पाळणें या गोष्टी मनुष्याला पदोपदीं अडचणीच्या व गैरसोयीच्या ठरतात. या दोहोंपासून भ्रष्ट होण्याचा मोह त्याला अनिवार होतो. आणि आपला स्वार्थ साधूनच्या साधून शिवाय आपल्या पदरांत ही भ्रष्टता पडली नाहीं असें जगाला भासविण्याकरितां, तो विशेष प्रकारचीं कारणें लावतो, निमित्तें सांगतो व सबबी पुढें करतो. बरें, ही गोष्ट केवळ व्यवहारमग्न मनुष्य करतो एवढेंच नव्हे, तर नीतिशास्त्र चिकित्सकांनींहि सत्य धर्माचरणाला मर्यादा घातल्या व अपवाद निर्माण केले ! निःस्वार्थी तत्त्वज्ञानी लोकांनीं केवळ पावलाइतक्याच रुंदीच्या पळवाटा म्हणून निर्वाणीच्या प्रसंगाकरितां सांगून ठेवल्या. पण त्यांतून नित्य वांकडे तिकडे चालून मनुष्यानें त्या इतक्या रुळविल्या व रुंद केल्या कीं, त्यांतून राजमार्ग तयार झाले. आणि असत्याला, एखाद्या राजाप्रमाणें, चार घोड्यांच्या रथांत बसून उजळ माथ्यानें मिरवति व अशिष्टांप्रमाणें शिष्टांचेहि मुजरे घेत घेत स्वाऱ्या काढतां येऊं लागल्या आहेत. पण मनुष्यामनुष्यांत कांहींचे व्यवहार व धंदे असे असतात कीं, त्यांना असत्याचरणाचा मोह पडण्याचे बिनतोड प्रसंग इतरां-

पेक्षां कमी येतात. अशा धंद्यांपैकीं शिक्षकाचा धंदा होय. म्हणून शिक्षकांनीं तरी आपल्या शिष्यगणांना व त्यांच्यामार्फत पर्यायानें जगाला सत्य धर्माचें शिक्षण सोदाहरण घालून द्यावें." अशा रीतीनें प्रि. महाजनी यांनीं विद्यार्थ्यांना उपदेश करण्याचें जें काम सांगितलें तें ना. शास्त्री यांनीं उलट शिक्षकांवर एक नवी जबाबदारी लादून पार पाडलें ! भाषणाचे शेवटीं त्यांनीं विद्यार्थ्यांनाहि आपल्या डोळ्यांपुढें नेहमीं उच्च ध्येयें ठेवण्यास सांगितलें. तथापि एकंदरीनें सत्यधर्माचें चरित्र वर्णितांना त्यांच्या भाषणांत जो गोंधळ उडाला त्यामुळें कोणत्याहि वर्गाच्या श्रोत्यांच्या मनावर स्पष्ट असा ग्रह कांहींच उमटला नाहीं.

ना. शास्त्री यांचें भाषण असें निष्परिणामकारक ठरण्याचें कारण त्यांनीं सत्याची व्याख्या नीट केली नाहीं. तसेंच सार्वजनिक जीवनाला जे इतर गुण अवश्य असतात. व त्यांच्याशिवाय केवळ सत्याला तेज चढूं शकत नाहीं, त्यांचें महत्त्व त्याबरोबरच वर्णिलें नाहीं. तरुण पिढीला महत्कार्यार्थ ध्येयवादित्व शिकवावयाचें तर तें एकेरी सत्याचा उपदेश करून साधणारें नाहीं. मनुष्यानें केवळ आपल्या समजुतीप्रमाणें यथार्थ बोलणें हा सत्याचा अर्थ बरोबर आहे. पण आपली समजूत तीच जगाचीहि असलीच पाहिजे, नाहीं तर तें जग तें असत्यधर्मी, असें तो व्यवहारांत म्हणत सुटतो, तेव्हांच खरी अडचण उत्पन्न होते. हें आत्मसापेक्ष सत्य व जगाचा व्यवहार यांचा विरोध पदोपदीं लहानमोठ्या कार्यांत इतका येतो, व सत्याखेरीज इतर अनेक नीतितत्त्वें लावण्याची अवश्यकता तेथें इतकी उत्पन्न होते कीं,सत्याला गौण स्थान प्राप्त होतें. साधा व्यवहार घेतला तरी शिष्टाचार, सामोपचार, काव्यबुद्धि, कलाविलास इ. अनेक कारणांमुळें, स्वतःच्या समजुतीप्रमाणें च कां होईना, तंतोतंत रेखीव कांतीव शब्दांनीं प्रगट केलेलें सत्य मनुष्याला उपयोगी पडत नाहीं. त्याला, अजाणता व जाणूनबुजूनहि, अर्थवाद, अतिशयोक्ति यांचा आश्रय करावा लागतो. आणि असल्या उपचारांना असत्याचरणांत घातलें तर त्या आक्षेपांतून कोणीहि मनुष्य सुटूंच शकणार नाहीं.

प्रगट भाषणाची ही गोष्ट, पण मनोगत गुप्त ठेवणें हेंहि मनोगत प्रकट करण्याइतकेंच दुसऱ्याची फसवणूक करणारें होऊं शकतें ना ? परनिंदेच्या बाबतींत वाक्संयम करावा असेंच सर्व शास्त्रकार सांगतात. पण ज्यांच्याविषयीं प्रतिकूल भावना असतांहि हा वाक्संयम पाळावयाचा, त्यांच्याविषयींच्या मतासंबंधानें हे सत्यनिष्ठ देखील असत्याचरण करतात असेंच ना. शास्त्री यांना म्हणावें

लागेल ! विचार मनांत येणें हा सत्याचा अर्धा भाग व ते प्रकट करणें हा त्या सत्याचा दुसरा भाग, असें म्हणतां येणार नाहीं काय ? तात्पर्य, सत्यधर्माला ज्या मर्यादा पडतात, त्या सदाचार, सद्व्यवहार यांनाहि पडूं शकतात. आणि कर्तव्याकर्तव्याचा विरोध उत्पन्न झाला म्हणजे मग तर त्या किती पडतील याची कल्पना सहज करतां येते. पण या मर्यादा संभाळण्याच्या धांदलींत तोल किंचित् न संभाळला जाणाऱ्या माणसाला असत्याचारी असें कठोर विशषण आपण लावूं लागलों, तर मोठीच पंचाईत व्हावयाची !

ना. शास्त्र्यांच्या भाषणानंतर लगेच त्यांच्याच समक्ष एक गंमतीची गोष्ट घडली; तिच्यावरूनहि त्यांना आपला सत्यधर्मोपदेश किती एकांगी होता हें कळून आलें असण्याचा संभव आहे. ना. शास्त्र्यांच्या भाषणानंतर त्यांचे आभार मानण्याकरितां आमदार कामत हे उभे राहिले. त्यांनीं खालील दोन विधानें केलीं : ( १ ) " हिंदुस्थानाला ईश्वरानें जर कांहीं सर्वांत अधिक उत्तम देणगी दिली असेल तर ती ना. शास्त्री हे होत. (२) आजचें ना. शास्त्र्यांचें भाषण पुढील पन्नास वर्षेंपर्यंत लोकांच्या स्मरणांत राहील !" पण सभागृहांतून बाहेर पडतांच, " आजच्या भाषणाचा आपल्याला तर कांहीं विशेष बोध झाला नाहीं बुवा " असें अनेक लोक आपापसांत कुजबुजूं लागले असें म्हणतात ! ही गोष्ट खरी असेल तर हें भाषण पुढील पन्नास वर्षें लोकांच्या स्मरणांत कसें राहील ? आणि ना. शास्त्री हीच जर ईश्वराच्या घरची हिंदुस्थानाला देण्यासारखी सर्वांत उत्तम देणगी, तर महाराष्ट्रापुरतें बोलावयाचें तरी मेले गेले रानडे, चिपळूणकर, आगरकर, टिळक, गोखले, परांजपे, व आज जिवंत असलेले कर्वे वगैरे यांची वाट काय लावावयाची ? आणि सर्व हिंदुस्थान लक्षांत घेतलें तर राजकीय 'स्वातंत्र्या' सारख्या गत किंवा भावी ईश्वरी देणग्यांचें काय करावयाचें ? असे प्रश्न सहजच येणार ! पण स्वतः कवि नसतां, किंबहुना उचित मोजकें नेमस्त मित भाषण करणारे, तर्कशुद्ध व तर्ककठोर, ( किंवा इंग्रजी भाषेनें बोलावयाचें असतां लेव्हल–हेडेड म्हणजे डोक्याला कोठेंहि टेंगूळ न उठलेले ) असें स्वतःला मानणारे असे जे कामत, त्यांच्यासारख्यांनीं असें बेछूट बोलावें याचा अर्थ इतकाच कीं, ना. शास्त्री यांची सत्यधर्माची मर्यादा स्तुतिप्रेमामुळें कामतांनाहि संभाळतां आली नाहीं. सारांश, कठोर सत्यधर्मापेक्षां स्वार्थत्याग, सर्वसामान्य न्यायबुद्धि, सहिष्णुता,

माणुसकीचीं मूलभूत तत्त्वें इ. मोठ्या तात्त्विक गोष्टी, आणि ज्ञानार्जन, बहुश्रुतता, उद्योगप्रियता, लोकसेवा, असल्या त्या मानानें लहान पण व्यवहारोपयोगी गोष्टी ना. शास्त्री यांनीं तरुण पिढीला उपदेशिल्या असत्या तर अधिक उचित झाल्या असत्या. निर्भेळ सत्याचा शोध किंवा पाठलाग करणारे मोठमोठेहि कसे फसले किंवा फशीं पडले याचीं उदाहरणें ना. शास्त्री यांच्याच भाषणांत ओघानें आलीं होतीं तींहि ना. शास्त्री यांना ' सत्यस्य तत्त्वं निहितं गुहायां ' अशी इषारत देत होतीं; पण त्यांनीं ती इषारत मानली नाहीं !

---

## १०४ मध्यवर्ति सत्तेचा खेळखंडोबा

( केसरी, ता. ११ जानेवारी १९३५ )

ब्रिटिश मुत्सद्दी स्वराज्याचे हक्क देत असून हिंदी लोक ते तिरस्कारपूर्वक झिडकारीत आहेत असा विलक्षण देखावा आज हिंदी राजकारणाच्या वाटाघाटींत दिसतो आहे खरा. इतिहासांतहि अशा दृश्याचा दाखला सांपडणें दुर्मिळ. पण इंग्रजांनीं हिंदुस्थानास देऊं केलेली राज्यघटना तपासून पाहिली म्हणजे य विलक्षण देखाव्यांतील मर्म लक्षांत येऊन आश्चर्य नाहींसें होण्यास वेळ लागत नाहीं. राजा उदार झाला व त्यानें भोपळा हातीं दिला म्हणून त्या राजाच्या औदार्याची थट्टा उडविली जाते. इंग्रज मुत्सद्यांनीं या गोष्टींतील राजावरहि ताण केली आहे. भोपळा पोकळ असला तरी त्यांत कांहीं तरी हातीं लागतें. पण इंग्रज मुत्सद्द्यांनीं देऊं केलेली नवी राज्यघटना अशा प्रकारची आहे कीं, तीमुळें हिंदी लोकांच्या हातीं तर कांहींच लागत नाहीं; उलट ती घेण्याकरितां हात पुढे केले तर हातांत व त्याबरोबर पायांतहि पारतंत्र्याच्या कायमच्या शृंखला अडकल्याशिवाय रहात नाहींत ! म्हणूनच घ्या घ्या म्हणून पाठीस लागून देऊं करीत असलेले हक्क हिंदी लोक घेत नाहींत व उलट " आग लागो त्या तुमच्या नव्या घटनेला ! खुशाल तुम्ही ती परत घ्या. आहे ही स्थिति वाईट खरी. पण तीहि पत्करेल. नवी घटना मात्र नकोच नको " असे शिव्याशाप ते देत आहेत. मध्यवर्ति सरकाराच्या कारभाराबाबत जी योजना केली गेली आहे. ती पाहिली म्हणजे हिंदी लोकांचा हा सात्त्विक संताप किती न्याय्य आहे याची कल्पना सहज येते. मध्यवर्ति सत्ता म्हणजेच राज्यव्यवस्थेच्या झाडाचा खरा

बुंधा; इतर फक्त शाखा व उपशाखा होत. या दृष्टीनेंच मध्यवर्ति कारभारांत किती सत्ता दिली गेली आहे याची परीक्षा करणें जरूरीचें आहे.

सध्यां प्रचलित असलेल्या राज्यव्यवस्थेंत प्रांतिक सरकारच्या अधिकारक्षेत्रांतील कांहीं साधीं खातीं दिवाणांच्या हातीं व मुख्य राजसत्तेचा गाभा ज्यांत असतो अशीं खातीं सरकारी मंत्र्यांच्या हातीं अशी द्विदल योजना आहे. ही दुअजची व द्विमुखी राज्यपद्धति नाहींशी करण्याचा चंग स्वराज्यपक्षानें बांधला होता. बंगालमध्यें व मध्यप्रांतांत स्वराज्यपक्षाला या कामीं बरेंचसें यशहि आलें. प्रत्यक्ष राज्ययंत्र बंद पाडणें त्यांना शक्य झालें नाहीं; पण देशबंधु दास म्हणत असत त्याप्रमाणें या द्विदल राज्यपद्धतीची कल्पना मात्र पार समुद्रांत त्यांनीं बुडविली होती. म्हणूनच प्रांतीय कारभारांत किंवा मध्यवर्ति राज्यकारभारांत त्या पद्धतीचा पुनः कोणी पुरस्कार करील असें वाटलें नव्हतें. पण आश्चर्य हें कीं, व्यवहारांत टाकाऊ व अजागलस्तनाप्रमाणें निरुपयोगी ठरलेली ही दुतोंडी पद्धति मध्यवर्ति सरकारच्या राज्यकारभारांत नव्या योजनेप्रमाणें राजरोसपणें वावरणार ! दासबाबूंनीं जवळजवळ गाडलेल्या या द्विदल घटनेचें भूत मध्यवर्ति कारभारामध्यें नव्या प्रधानमंडळाच्या मानगुटीस बसणार !

मध्यवर्ति सरकारचा सर्व कारभार हिंदी लोकनियुक्त सभासदांनीं नेमलेल्या प्रधान मंडळावर सोंपविला जाणार नसून त्यांतील ( १ ) लष्कर ( २ ) परराष्ट्रीय संबंध ( ३ ) धर्मविषयक कारभार हीं खातीं सरकारनियुक्त अशा मंत्र्याकडे सोंपविलीं जाणार आहेत व या खात्यावर वरिष्ठ कायदेमंडळाची हुकमत बिलकूल चालणार नाहीं ! याशिवाय गव्हर्नर जनरल यांच्याकडे कांहीं खास जबाबदाऱ्या सोंपविल्या आहेतच. तसेंच गव्हर्नर–जनरलांना कांहीं खास अधिकार म्हणून दिलेले आहेत. त्यांमध्येंहि अर्थातच मंत्रिमंडळाला हात घालण्याची सत्ता नाहीं. लष्कर व परराष्ट्रीय संबंध म्हणजे स्वराज्याची प्राणभूत असलेलीं अशीं खातीं असल्यामुळें त्यांचा कारभार हिंदी लोकांच्या हातीं न ठेवणें म्हणजे स्वराज्याचें प्राणहरण करून घेण्यासारखें आहे हें सांगणें नकोच ! त्याप्रमाणेंच शिल्लक राहिलेल्या खात्यांतील अधिकारांचा प्राणहि खास जबाबदाऱ्या व खास सवलती वगैरेंच्या ओझ्याखालीं गुदमरून जाणार. खऱ्या स्वराज्याचा जीवनरस शोषून घेतलेल्या या वाळलेल्या चोथ्याला स्वराज्य कोण म्हणेल ?

हिंदुस्थान सरकाराच्या तिजोरीच्या किल्ल्याहि सरकारच्या हातीं कायम-

ऱ्याच ठेवण्याची हिकमत या नव्या योजनेंत केली गेली असल्यानें भुकेनें खंगलेल्या व दारिद्र्यानें गांजलेल्या हिंदी लोकांच्या तोंडांत चार घांस घालण्याचें अगर त्यांना चार सुखाचे दिवस दाखविण्याचें सामर्थ्य हिंदी प्रधान-मंडळांत राहणार नाहीं. अगोदर खाजिन्यापैकीं जवळजवळ ऐंशी टक्के खर्च राखीव खात्यांवरच होणार असल्यानें या नव्या बेगडी स्वराज्यांतील प्रधान-मंडळाला आपला संसार शिल्लक उरलेल्या वीस टक्क्यांतच कसाबसा भागवावा लागणार आहे. कारण स्थूलमानानें एकंदर एक अब्ज वीस कोटि रु. उत्पन्नापैकीं जवळ जवळ बहात्तर कोटि लष्करावर व इतर राखीव खात्यांवरच खर्च होणार! हा खर्च कमी करावा असें म्हणण्याचा अधिकार वरिष्ठ कायदेमंडळालाहि नाहीं. मग प्रधानांना तो कोठून असणार? ह्या खर्चांवर थोडीबहुत देखरेख करून कोणत्या ठिकाणीं अनाठायीं व व्यर्थ खर्च होतो हें दाखविण्याची सत्ता आतां-पर्यंत कायदेमंडळाला होती. नव्या योजनेंत तीहि सत्ता नाहीं. याशिवाय गव्हर्नर-जनरल स्वतःकरितां व प्रधान-मंडळाकरितां आर्थिक सल्लागार म्हणून एक अधिकारी नेमणार आहेत. हा आर्थिक सल्लागार म्हणजे प्रधान-मंडळाची एक आखाडसासूच. कारण हा सल्लागार असा आहे कीं, याचा सल्ला मानलाच पाहिजे, न मानला तर गव्हर्नर-जनरल आपल्या खास जबाबदाऱ्यांचा चाबूक उगारून तो मान्य करावयाला लावणारच. तात्पर्य, आर्थिक व्यवहारांत प्रधान-मंडळाच्या मुसक्या वरील नाना तऱ्हेनें बांधल्या गेल्या कारणानें प्रधानमंडळाची स्थिति बंदिवानाप्रमाणें होणार यांत शंका नाहीं!

तिजोरीच्या किल्ल्या अशा रीतीनें आर्थिक सल्लागाराच्यामार्फत सरकारच्या खिशांत राहत आहेत तरी आणखीहि नवेनवे कांटेरी लगाम कायदेमंडळाच्या व प्रधानमंडळाच्या तोंडांत घालण्याचा या नव्या योजनेंत उपक्रम केला आहेच. उदाहरणार्थ, नवीं नाणीं पाडणें अगर तीं बाजारांत कमीजास्ती खेळविणें हा विषयहि लोकनियुक्त प्रधानमंडळाच्या अधिकारांच्या कक्षेंत पूर्णपणें येत नाहीं. यासंबंधीं कांहींहि योजना करणें झाल्यास गव्हर्नर-जनरल यांची खास परवानगी घेतली पाहिजे. पण याहिपेक्षां चीड आणणारी गोष्ट म्हणजे जमाखर्चाचें अंदाजपत्रकहि गव्हर्नर-जनरल यांच्या सल्ल्यानेंच तयार व्हावें अशी सूचना पार्लमेंटरी बोर्डाच्या शिफारशींत केली आहे! हिंदुस्थान सरकारच्या शहाण्या म्हणविणाऱ्या कित्येक अर्थमंत्र्यांनीं बाजारांत नाणें खेळविण्याच्या बाबतींत व

इतर आर्थिक योजनांच्या बाबतींत आजपर्यंत केवढा सावळागोंधळ घातला हें जगजाहीर असतांना खुद्द हिंदी मंत्र्यांनाच हिंदुस्थानच्या आर्थिक इभ्रतीची काळजी नाहीं अगर त्यांना तो व्यवहार समजण्याइतकी बुद्धि नाहीं असें म्हणणें म्हणजे शुद्ध कावेबाजपणा होय. रिझर्व्ह बँकेसंबंधींहि असेच निर्बंध घातले आहेत. तात्पर्य, लष्कर व परराष्ट्रीय व्यवहार राखीव खातीं म्हणून व आर्थिक व्यवहार म्हणजे खजिना ही महत्त्वाची बाब म्हणून सरकारच्या स्वाधीन राहणार ! तेव्हां मध्यवर्ति सरकारांत स्वराज्याचे हक्क दिले म्हणणें म्हणजे त्या स्वराज्याची टर उडविणें होय असें वाटतें !

वरिष्ठ कायदेमंडळाला जबाबदार म्हणून जें प्रधानमंडळ गव्हर्नर–जनरल नेमणार त्यांत अल्पसंख्याकांचा विशेष हक्क म्हणून त्यांचा प्रतिनिधि असणारच. याशिवाय हिंदी संस्थानांचे प्रतिनिधि कायदेमंडळांत असल्यानें त्यांचेहि प्रतिनिधि प्रधानमंडळांत घेण्यास गव्हर्नर–जनरल भाग पाडणारच. अशा या घेडगुजरी प्रधानमंडळाच्या हातून सामुदायिक जबाबदारीचें तत्त्व पाळलें जाणें मुष्किलीचें होणार हें सांगणें नकोच. त्याचाच अर्थ हा कीं, कोणत्याहि राष्ट्रीय वृत्तीच्या कार्यकर्त्यास या प्रधानमंडळांत जाऊन काम करणें अशक्यच होईल. ज्या वरिष्ठ कायदेमंडळाला प्रधान जबाबदार राहणार त्याची यापेक्षांहि अधिकच दुःस्थिति केलेली आहे. पूर्वींचा सरकारनियुक्तांचा गट गेला तरी संस्थानिकांनीं नेमलेले अगदीं पिढीजात होयबा त्यांत पंचवीस टक्के येणारच. सर्वांवर कळस म्हणजे ब्रिटिश हिंदुस्थानांतून येणारे प्रतिनिधिहि अप्रत्यक्ष निवडणुकीच्या व त्यांतहि जातीय तत्त्वाच्या शिडीनें वर चढून येणारे असल्यानें ते कोणत्या योग्यतेचे गणंग येतील हें काय सांगावयास पाहिजे ? असल्या कायदेमंडळांतून निवडलेलें प्रधानमंडळ व त्यांचा मर्यादित क्षेत्रांत चाललेला कारभार याला स्वराज्य म्हणणें शक्य नाहीं. या सवावर ताण म्हणून बड्या नालायकांच्या स्टेट–कौन्सिललाहि कायदेमंडळाइतकेच आर्थिक व्यवहाराबाबतहि दिलेले अधिकार पाहिले म्हणजे नव्या सुधारणांची योजना हिंदी लोक लाथेनें कां झिडकारितात याची कल्पना सहज येते !

प्रांतिक कारभारांत, नामधारी कां होईना पण, स्वायत्तता आहे. पण मध्यवर्ति सरकाराच्या कारभारांतील हा नव्या योजनेंतील खेळखंडोबा व त्याचा येळकोट अपूर्व आहे यांत शंका नाहीं. कोणता स्वाभिमानी राष्ट्रीय वृत्तीचा

मनुष्य या योजनेला स्वराज्य म्हणेल ? म्हणून ही नवी योजना लाथाडून स्वतःच्या सामर्थ्याची वाढ करण्याकडे राष्ट्रानें लक्ष पुरवावें हेंच इष्ट. तथापि नव्या सुधारणा लादल्या जाणारच या दृष्टीनें नवें राज्ययंत्र काबीज करून तें निरुपयोगी कसें करतां येईल, याचा विचार राष्ट्रीय पुढाऱ्यांनीं करावयास पाहिजे. एक गोष्ट खरी कीं, मध्यवर्ति कारभाराची नव्या योजनेंत केलेली व्यवस्था पाहतां त्यांत स्वराज्याचा प्राण दिसत नाहीं.

## १०५ 'क्रांती' चा अर्थ व चिकित्सा

(केसरी, ता. १ फेब्रुवारी १९३५)

कंसाला जळीं स्थळीं काष्ठीं पाषाणीं कृष्ण दिसत होता, त्याप्रमाणें हल्लीं इंग्रज सरकारला हिंदुस्थानांत 'क्रांतीचें भूत' दिसत आहे. आधाशीपणानें फार खाल्लें आणि पोट फुगलें म्हणजे झोंपेंत दुःस्वप्नें पडतात ! ब्रिटिश साम्राज्यानें हिंदुस्थानची संपत्ति, सत्ता, व स्वातंत्र्य हीं सर्व खाऊन टाकून वरती लाज तोंडीं लावली. मग त्याला सुखाची झोंप कशी येणार ? आणि मधून-मधून जी थोडी डुकली येईल तींत भयप्रद स्वप्नें पडल्याशिवाय कशीं राहणार ? अशा स्थितींत झोंपणाराचा स्वतःचा हात त्याच्या छातीवर असला, तरी तो बाहेरच्या कोणा शत्रूनें दगड ठेवल्यासारखा वाटतो. आणि पाठीवरून स्नेहपूर्ण भावनेनें कोणीं हात फिरविला तरी, कोणी शस्त्रप्रहार करावयास आला आहे असें वाटतें ! वास्तविक म. गांधी हे आपली विधायक चळवळ खेड्यापाड्यांतून नेऊन, तेथील प्रजा स्वावलंबी कशी होईल व उपासमारीच्या जबड्यांतून कशी वांचेल याचा प्रयत्न करून पाहणार आहेत. वास्तविक पाहतां पोटभर घांस मिळाला तर सामान्य जनता शांत व संतुष्ट राहते, सरकारी कर देण्याला तिला वाढतें सामर्थ्य लाभतें, आणि असें झालें तर सरकारला क्रांतीची भीति न वाटतां उलट हायसें वाटलें पाहिजे. त्याकरितां त्यांनीं म. गांधींना ग्रामोद्धार-कार्यांत साहाय्यच केलें पाहिजे. असें असतां सरकारानें नक्की याच्या उलट मार्ग स्वीकारलेला दिसतो ! पण विनाशकाळीं सर्वच गोष्टी विपरीत व्हाव्या यांत आश्चर्य काय ?

नव्या असेंब्लीमध्यें हा प्रश्न पहिल्या बैठकींतच निघाला. गांधींच्या ग्राम-संघटनेच्या चळवळीला, कोणीहि सरकारी निमसरकारी माणसानें, साहाय्य देऊं नये असें एक गुप्त सर्क्युलर सरकारच्या पोलिटिकल खात्याकडून निघालें आहे.

त्याचा निषेध करणारी सूचना श्री. सत्यमूर्ति यांनीं ता. २१ रोजीं चर्चेला मांडली. ही चर्चा कांहीं निर्णय न लागतां तोंडच्या वाऱ्यानें उडून गेली! तथापि, सत्यमूर्ति यांना उत्तर देतांना होम मेंबर सर हेन्री क्रेक यांनीं सरकारी धोरणाचें समर्थन केलें! गुप्त सर्क्युलर निघालें ही गोष्ट त्यांना नाकबूल करतां आली नाहीं. यामुळें त्यांतील विचारसरणीचा पाठपुरावा करावा एवढीच गोष्ट त्यांना शिल्लक उरली. पण ग्रामोद्धारासारख्या गांधींच्या कार्याला विरोध करण्याला, नांवें ठेवण्याला, कांहीं तरी वाईट हेतु लावल्याशिवाय गत्यंतर नव्हतें. आणि या वाईट हेतूचा पुरावा म्हणून होम मेंबर यांनीं, लोकपक्षांतील कित्येक गृहस्थांनीं गांधींच्या चळवळीचा जो अर्थ केला, तोच आधार म्हणून घेतला! लोकांनीं अर्थ केला तो इतकाच कीं, गांधींच्या विधायक चळवळीनें खेड्यापाड्यांतील जनता स्वावलंबी झाली तर आज ती एक प्रकारें 'क्रांति' च होईल. येथें या 'क्रांती'चा अर्थ अगदीं उघड आहे. परावलंबी मनुष्य स्वावलंबी होणें हा फेरबदल क्रांति शब्द लादण्याइतका प्रचंड नाहीं काय?

पण गांधींचें नांव बद्दू करावयाचें तर, त्यांच्या अगदीं निकटवर्ती अशा एखाद्या अनुयायाचा-शिष्याचा-आधार सांपडला तर फारच बरा! म्हणून होम मेंबर यांनीं काँग्रेसचे सेक्रेटरी आचार्य कृपलानी यांच्या एका लेखांतील उतारा दिला. त्यांत इतकेंच म्हटलें होतें कीं, 'सरकाराची मदत ग्रामोद्धाराच्या कार्याला मिळेल तर आपण हिंदुस्थानांत क्रांति (रेव्होल्यूशन) घडवून आणूं असें गांधींचें म्हणणें आहे.' मग या शब्दांत सरकारानें भ्यावें असें काय आहे? गांधींना अभिप्रेत अशी जी 'क्रांति' ती जर सरकार उलथून पाडण्याच्या स्वरूपाची, भयंकर व अत्याचारमूलक असेल, तर अशा 'क्रांतीला' सरकारच्या मदतीची अपेक्षा करण्याइतके गांधी हे वेडे आहेत कीं काय? सर्व जगाशीं मैत्री करावी या मताचे ते असल्यामुळें, त्यांचा सरकारशीं मनांतून स्नेहभाव असला तरी लोकांना राजकीय स्वातंत्र्य मिळवून देणें हें त्यांचें उद्दिष्ट आहे. तीहि एक 'क्रांतिच' होय, पण अशा 'क्रांतीला' सरकारकडून मदत मिळेल किंवा मागावी असें चुकूनहि मनांत येण्याइतके गांधी बुद्धिमंद नाहींत. अर्थात् खेडेगांवांतून जी 'क्रांति' त्यांना घडवून आणावयाची आहे, ती केवळ आर्थिक स्वरूपाची आहे. प्रत्यक्ष राजकीय नाहीं. ही गोष्ट उघड असतां, मुद्दाम 'वेड पांघरून पेडगांवाला जावें' म्हणतात त्याप्रमाणें, होम मेंबर यांनीं 'क्रांति' (रेव्होल्यूशन) या शब्दाच्या

संदिग्धतेचा फायदा भरपूर घेऊन, सरकारनें केलें तेंच बरोबर असें या गुप्त सर्क्युलराचें समर्थन केलें. इंग्रजी शब्द 'रेव्होल्यूशन' हा कोणी उच्चारतांच, पहिल्या दोनतीन अक्षरांच्या उच्चारावरून, 'रिव्हाल्व्हर' ची आठवण सरकारला कदाचित् होत असेल ? पण म. गांधींच्या संबंधांत तीहि सबब सरकारला सांगतां येणार नाहीं. 'ऊर्ध्वं बाहुर्विरौम्येष नच कश्चित् शृणोति माम्' या वाक्यांत म्हटल्याप्रमाणें, कोणी ऐको वा न ऐको एखाद्या जुन्या ऋषीप्रमाणें हिंसेची निंदा व अहिंसेची स्तुति गांधीजी आज अखंड दोन तपें करीत आहेत. म्हणून गांधींना 'रेव्होल्यूशन' हवें असलें तरी, तें रुधिरप्रदिग्ध असें तरी खास नको आहे याविषयीं कोणाहि प्रामाणिक माणसाला संशय घेण्याला जागा नाहीं.

'रेव्होल्यूशन' 'या शब्दाची जी संदिग्धता वर दर्शिवली, ती हल्लींच्या काळीं सरकारला किती सोयीची व त्याबरोबरच जनतेला किती गैरसोयीची आहे हें सहज दिसून येईल. 'क्रांति' या संस्कृत शब्दाला जो राजकीय इतिहास नाहीं तो 'रेव्होल्यूशन' या इंग्रजी शब्दाला आहे. पण इंग्रजींत देखील 'रेव्होल्यूशन' याचा अर्थ हटकून अत्याचारानें किंवा रक्तपातानें होणारी क्रांति असा नाहीं. 'रेव्होल्यूशन' या शब्दांत "काय मिळवावयाचें" याची, म्हणजे उद्दिष्टाची साध्याची सूचना असते साधनांची नसते. हें उद्दिष्ट किंवा साध्य म्हणजे कोणच्याहि विद्यमान स्थितींत प्रचंड अशी उलथापालथ हें असतें. परंतु तें साध्य कोणत्या साधनांनीं मिळवावयाचें असतें, याची निश्चित सूचना त्या शब्दांत असूं शकत नाहीं. 'रेव्होल्यूशन' या इंग्रजी शब्दाचा हा अर्थ 'रिफॉर्म' या दुसऱ्या एका इंग्रजी शब्दाच्या अर्थाशीं जुळवून तोडून पाहिला असता स्पष्ट होतो. एका इंग्रज तत्त्ववेत्त्यानें या दोन शब्दांतील भेद दर्शविणारें एक वाक्य लिहिलें आहे तें असें:—

'A reform is a correction of abuses. A revolution is a transfer of power.'

रिफॉर्म म्हणजे 'सुधारणा' आणि रेव्होल्यूशन म्हणजे 'क्रांति'. लहानसहान दोष काढून टाकणें, दुरुस्त करणें, हें सुधारणेचें लक्षण. आणि ऐनजिनशी सत्तेची अदलाबदल होणें याचें नांव 'रेव्होल्यूशन'. सुधारणेचें कार्य इकडे तिकडे लहानसहान वळणें किंवा धक्के देऊन करतां येतें. पण या धक्क्यांनीं सबंध तोंड फिरत नाहीं. 'रेव्होल्यूशन' मध्यें धक्का एवढा मोठा असतो कीं त्यानें इकडचें तोंड तिकडे होतें ! पण इकडचें तोंड तिकडे होणें हे शब्द शरीरवाचक म्हणून लाक्ष-

णिक समजावे. त्यांचा अर्थ तो हिंसात्मक अत्याचार असा करावयाचा नाहीं. ‘ इकडचें तोंड तिकडे फिरणें ’ ही गोष्ट दुसऱ्या कोणी मुस्कटांत मारल्यानें घडेल तशीच तो मनुष्यच स्वतः मागचा पुढें किंवा पुढचा मार्गे वळला तरी ती होऊं शकेल ! आणि खुद्द राजकारणी विषयाचें उदाहरण द्यावयाचें तर, इंग्लंडच्या राजकीय इतिहासांतील १६८८ सालीं झालेल्या ‘ रेव्होल्यूशन ’ (राज्यक्रांति) चें देतां येईल. या रेव्होल्यूशननें ( राज्यक्रांतीनें ) इंग्लंडला लोकनियंत्रित अशी ‘ राज्यघटना ’ प्रथमच मिळाली. तथापि ती क्रांति घडून येण्याला रक्ताचा एकहि थेंब खर्ची पडला नाहीं ही गोष्ट तितकीच प्रसिद्ध आहे.

एडमंड बर्क यानें सन १७९० सालीं फ्रेंच राज्यक्रांतीविरुद्ध जो एक सुप्रसिद्ध ग्रंथ लिहिला, त्यांत इंग्लंडमधील ही क्रांति व यानंतर बरोबर शंभर वर्षांनीं फ्रान्समध्यें झालेली क्रांति यांतील भेद उत्कृष्टपणें दाखविला आहे, तो अनत्याचार व अत्याचार यांतील भेदावरच जोर देऊन. इंग्लंडांतील क्रांति राज्यघटना बनविण्याच्या विधायक स्वरूपाची, तर फ्रान्समधील राज्यक्रान्ति केवळ उत्पाताच्या स्वरूपाची व अत्याचारांनीं दूषित झालेली. यामुळें इंग्लंडच्या संबंधांत ‘ रेव्होल्यूशन ’ हा शब्द उच्चारला असतां त्याची भीति कोणास वाटत नाहीं. उलट त्या शब्दाला सर्वमान्य व प्रतिष्ठित असाच अर्थ जडलेला आहे. इंग्लंडांत पूर्वी ‘ रेव्होल्यूशन सोसायटी ’ या नांवाची संस्थाच होती. तिलाच ‘ कॉन्स्टिट्यूशनल सोसायटी ’ असाहि पर्यायवाचक शब्द लाविला जात असे. इंग्लंडांतील या अनत्याचारी ‘ रेव्होल्यूशनचा ’ सण, १६८८ च्या नंतर, दर नोव्हेंबर ४ तारखेला सर्व देशभर पाळला जात असे. जसा अमेरिका आपला स्वातंत्र्यदिन पाळते. एके ठिकाणीं तर असा उल्लेख सांपडतो कीं, फ्रेंच राज्यक्रांतीच्या आदल्याच वर्षी चवथ्या नोव्हेंबरला ( १६८८ ) हा राज्यक्रांतिदिन सर्व इंग्लंडभर सर्व राजकीय पक्षांकडून समारंभानें पाळला गेला. आणि लंडनमधील ‘ रेव्होल्यूशन सोसायटी ’ तर्फे जी जाहीर सभा भरविण्यांत आली, तिला खुद्द स्टेट सेक्रेटरी व अनेक राजकीय पुढारी हजर होते ! दुसरे एके ठिकाणीं तर या रेव्होल्यूशन शब्दाचा अर्थ “ कदाचित् जी अत्याचारी क्रांति झाली असती ती थांबविणारी क्रांति, ” म्हणजेच १६८८ ची क्रांति, ( रेव्होल्यूशन ) असा केलेला आढळतो.

तात्पर्य, ‘ रेव्होल्यूशन ’ म्हणजे कितीहि मोठा फेरबदल होवो, सत्तेचें संक्रमण होवो, किंवा वर योजलेल्या ग्राम्य शब्दांनीं बोलावयाचें तर राजकीय सत्ताधा-

रित्वांत इकडचें तोंड तिकडे फिरो, त्याला इंग्लंडांतील लोकमत दूषण देत नाहीं. दूषण देत तें फक्त अत्याचारी साधनांना. आतां ही गोष्ट खरी कीं, कोण-तीहि मोठी 'क्रांति' घडावयाची तर ती रक्ताचा एकहि थेंब न सांडतां घडून येणें फारसें शक्य नसतें. पण राज्यसत्तेसारख्या मूलभूत प्रश्नाचा कांहीं संबंध नसतां, साध्या व्यवहारांतहि जर आपण इतका रक्तपात झालेला पाहतों, तर मोठ्या राज्यक्रांतींत तो क्वचित् झाल्याशिवाय कसा राहील ? १७८९ सालीं ज्या फ्रेंच राज्यक्रांतीला सुरुवात झाली तिच्यांत पुढें मनस्वी रक्तपात झाला ही गोष्ट खरी. परंतु १७८९ च्या मे पासून ऑगस्ट सप्टेंबर पर्यंत राज्यघटनेच्या जितक्या गोष्टी फ्रेंच नॅशनल असेंब्लीनें केल्या त्यांतच सर्व विधायक फेरबदल, म्हणजे 'क्रांति' नव्या राज्यघटनेच्या रूपानें प्रस्थापित होऊन गेली. आणि जो रक्तपात व जे भयंकर अत्याचार झाले, ते पुढें पक्षोपपक्षांतील चुरस आणि परचक्रांची भीति यामुळें झाले. या चार महिन्यांत ही राज्यक्रांति संपती, तर ती इंग्लिश रेव्होल्यूशनप्रमाणें अनत्याचारी म्हणून निर्दोष राहिली असती.

पण कृमिनाशक पदार्थ हे प्रायः सुगंधी नसतात, दुर्गंधी असतात, हें आपण पाहतोंच ! आपल्या बसण्याची बैठक साफ करावयाची तर ती जागच्या जागीं नुसतें गुलाबपाणी शिंपडून करतां येणार नाहीं. चादरीवरून साफ हातच फिर-वावा लागतो. त्यांत एखादाहि कृमि मरणारच नाहीं अशी ग्वाही देतां येणार नाहीं. पण तो केवळ आगंतुक आनुषंगिक परिणाम असतो. बैठक साफ करण्याचें साध्य व त्याचें सामान्य साधन हीं दोन्हीं अत्याचाराच्या दोषापासून अलिप्तच असतात. हें सर्व जाणूनच कीं काय, म. गांधी यांनीं प्रथमपासूनच आपलें साध्य व साधन हीं अत्याचारापासून अगदीं शाबूत ठेविलीं आहेत. निदान त्यांच्या मनानें व उपदेशानें तीं शाबूत आहेत. आणि ही त्यांची गोष्ट अव्यवहार्य म्हणून त्यांना लोक नांवेंहि ठेवीत आहेत. असें असतां त्यांच्या ग्रामसुधारणेच्या चळवळीला 'रेव्होल्यूशन' हा शब्द कोणी परिणाम-वर्णनात्मक म्हणून लाविला तरी हिंदुस्थान-सरकारला त्या चळवळीला नांवें ठेवण्याचा अधिकार नाहीं, असें कायदेशीर रीतीनें, व वर दिलेल्याप्रमाणें इंग्रजी राजकीय इतिहासाचा आधार घेऊन कोणालाहि म्हणतां येईल.

जॉ. सि. कमिटीनें सुचविलेल्या पोकळ सुधारणांचेंहि वर्णन तिच्या कित्येक प्रतिपक्षीयांकडून 'रेव्होल्यूशनरी' या शब्दांनीं झालेलें आम्हीं पाहिलें आहे ! मग

खेडेगांवांत विधायक कार्यक्रम करून जनता पायावर खडी करण्याची जी चळवळ गांधींनीं आरंभिली आहे, ती यशस्वी झाली तरी किंवा न झाली तरी, तिला केवळ तिच्या आकांक्षेच्या मोठेपणामुळें 'रेव्होल्यूशनरी' हें नांव उघडपणें लावण्याला कोणी कचरण्याचें कारण नाहीं. असेंब्लींत झालेल्या चर्चेमुळें किंवा सरकारी गुप्त सर्क्युलरामुळें ही चळवळ थांबेल असें नाहीं. परंतु सरकारी वारा कसा वाहतो हें नीट पाहून पारखून आपलें धोरण ठरविणारे जे लोक शहरांतून व खेडेगांवांतून असतात, त्यांनीं या बाबतींत निःशंक राहून, गांधींच्या काय व इतर राष्ट्रिय पक्षांच्या काय, ग्रामोद्धाराच्या चळवळीला बिनदिक्कत मदत करावी असा मित्रत्वाचा सल्ला देण्याकरितां हा खुलासा केला आहे.

---

## १०६ थोडेसें सिंहावलोकन

(सह्याद्रि सन १९३५)

राष्ट्रीय सभेचें ध्येय जुन्या सौम्य किंवा नव्या तीव्र शब्दांत कसेंहि मांडलें तरी, या देशांतील राज्यकारभार आपला आपणच स्वतंत्रपणें हवा तसा करावा हेंच तें होय. या ध्येयाच्या उद्गाराला प्रथम सुराज्याच्या (किंवा संतोषदायक राजाच्या) मार्गांतील अडचणी निघून जाण्यापासून तों अखेर 'पूर्ण स्वातंत्र्या' पर्यंत मजल गेली. असा क्रम लागण्याचें कारण प्रथम प्रथम इंग्रज राजकर्त्यांच्या गुणांविषयीं विशेष आदरभाव व त्यांच्या भल्या हेतूबद्दल विश्वास वाटत होता, तो पुढें अनुभवानें हळूहळू नष्ट होत चालला. दुसरें कारण असें कीं, प्रथम प्रथम हिंदी जनतेला आपल्या सामर्थ्याची जाणीव नव्हती ती पुढें हळूहळू प्राप्त झाली. या दोन कारणांमुळें स्वातंत्र्याची कल्पना हळूहळू विकास पावत गेली. स्वातंत्र्याच्या ध्येयाच्या हल्लींच्या सूर्योदयापूर्वी संधिप्रकाश, अरुणोदय, शुक्रोदय, व अंधाऱ्या रात्रींतील केवळ तारकांचा प्रकाश असा क्रम मागें मागें गेलों असतां आढळतो. पण ही गोष्ट स्वाभाविकच आहे.

स्वातंत्र्याच्या ध्येयाच्या मार्गांतील पहिला मुक्काम राष्ट्रीय सभास्थापनेचा होय व त्या मुक्कामाला येईपर्यंत जनतेच्या बाजूनें काय तयारी कशी चालली होती हें पृष्ठ १ ते २२ यांत दिलेल्या व्यक्ति, संस्था व उद्योग यांच्या माहितीवरून लक्षांत येईलच. तथापि या कार्याची तयारी अप्रत्यक्षरीत्या दुसऱ्या बाजूनें स्वतः इंग्रज सरकारच कशी करीत होतें हेंहि थोडक्यांत पाहणें अवश्य आहे. म्हणून त्यासंबंधीं चार ओळी खालीं लिहितों.

सतराव्या शतकाच्या प्रारंभीं हिंदुस्थानांत दोन निरनिराळ्या राजकीय सत्ता उदयोन्मुख झाल्या. पैकीं एक इंग्रजांची व दुसरी मराठ्यांची. इंग्रज लोक प्रथमच या वेळीं हिंदुस्थानांत आले. पण मराठे हे पूर्वींचेच रहिवाशी होते. या पूर्वीं चारशें वर्षेपर्यंत मुसलमानांचें राज्य प्रस्थापित झालेलें असून, त्याला आतां उतरती कळा लागली होती; व त्यांच्या हातून मराठ्यांनीं आपलें गेलेलें स्वातंत्र्य परत मिळविण्याचा उपक्रम सुरू केला होता. तो पुढें यशस्वी होऊन दोनशें वर्षें टिकला. हिंदुस्थानांतील इतर भागांतील कोणा लोकांना मात्र हें पुनर्जन्माचें सुख लाभलें नव्हतें. ते मुसलमानांच्या दास्यांतून निघाले ते थेट इंग्रजांच्या दास्यांत पडले ! महाराष्ट्रांत इंग्रजांचा अंमल १९ व्या शतकाच्या प्रारंभीं बसला. या पूर्वींच्या दोन शतकांत, मराठ्यांचा उदय होऊन अस्त होईपर्यंतचा महाराष्ट्र तेवढा वगळून हिंदुस्थानांतील इतर सर्व भागांत इंग्रजांनीं आपलें बस्तान फार चांगलें बसविलें. चारहि दिशांनीं हिंदुस्थानची नाकेबंदी केली, व स्वदेशाहून मिळणारी कुमक अव्याहत व वाढती राहाण्याकरितां आपल्या आरमाराचीहि खंबिरी केली.

या दोन शतकांत इंग्रज, त्यांचा कारभार, व त्यांचे हेतु यांचें रूप अगदींच बदललें. हिंदी लोकांना इंग्रजांचें प्रथम दर्शन झालें तेव्हां इंग्रजांची ती शिपतरी टोपी, तो अवाढव्य गळपट्टा, व गोरा गोरा रंग पाहून हिंदी मनुष्य मनांत फक्त इतकेंच उद्गारला असेल कीं, कोण हें विचित्र ध्यान ! उलटपक्षीं या पहिल्या भेटीच्या वेळीं आपण या हिंदी लोकांचें राज्य जिंकून घेऊन त्यांचे धनी होऊं असें इंग्रजाला वाटलें नसेल. तसेंच हिंदी मनुष्यालाहि वाटलें नसेल कीं, आपणासमोर नमणारे, अदबीनें बोलणारे, गिऱ्हाइकांना खूष करूं पाहणारे हे सौदागर आपले राजे होतील. पण ईश्वराच्या विचित्र लीलेमुळें हा चमत्कार घडून आला. तथापि चमत्कारालादेखील कारण असतें; व तें कारण म्हणजे इंग्रजांची भौतिक सुधारणा व त्याहून विशेष म्हणजे त्यांचा धाडसी व महत्त्वाकांक्षी स्वभाव. एरवीं सहा हजार मैलांवरून, सहा सहा महिन्यांचा बिकट समुद्रप्रवास करून; मूठभर इंग्रजांनीं हिंदुस्थानच्या किनाऱ्यावर व्यापारी म्हणून अदबीनें किंवा परवाने घेऊन उतरावें, व अखेर येथील राजे व धनी होऊन बसावें हें कसें घडेल ?

हिंदी लोकांनीं आपल्या जुन्या संस्कृतीचा अभिमान खुशाल धरावा. पण त्या संस्कृतींत पुढें पुढें परदेशगमनाचा विसर पडला. प्रवाशी धैर्य लोपलें. संकु-

चित क्षेत्रांत मिळेल तें खावें व चालेल तसा दुसऱ्यावर हात उगवून घ्यावा यांतच लौकिक सुखाची व ऐश्वर्याची परमावधि त्यांना वाटूं लागली. हिंदुस्थानच्याबाहेर जग काय व कसें आहे याविषयींच्या ज्ञानाची त्यांनीं कधींच अपेक्षा केली नाहीं. एकछत्री राज्य नसल्यामुळें पुंड पाळेगार हेच राजे बनून त्यांनीं आपला राज्यकारभार आपल्या लहरीप्रमाणें हवा तसा केला. व्यापक असें कोणतेंच राजकीय धोरण राहिलें नाहीं. प्रवास, परिभ्रमण, हीं थांबल्यामुळें मनोवृत्ति स्थगित होऊन, पायांनीं आक्रमिलेली भूमि हीच प्रिय व पवित्र वाटूं लागली. कोणतेहि चांगले गुण फक्त तिच्याच संकुचित अभिमानांत खर्ची पडूं लागले. सृष्टीचें खरें ज्ञान मिळविण्याची लालसा नष्ट होऊन जुन्या शास्त्रांची प्रगति खुंटली. धर्माविषयीं कल्पना क्षुद्र व कृपण होत चालल्या. जातिभेद वाढले. सामाजिक गट अधिकाधिक लहान होत जाऊन, परस्परांतील व्यवहार हटत चालला. पराक्रमाचें क्षेत्र संकुचित राहिल्यानें शस्त्रविद्या व रणविद्या या घटल्या. चिमुकले राजेरजवाडे, इनामदार, जहागीरदार यांच्या जुलमानें रयत रंजीस येऊन तिची त्यांजविषयींची निष्ठा लोपून जाऊन, जो कोण, मग परकाहि कां होईना, भाकरी देईल त्याची चाकरी करण्याची बुद्धि होऊं लागली. स्वार्थ-कपट-छलादि भावना मनांत असतांहि, त्यांचा राजकारणांत वरच्या दर्जानें, म्हणजे कारस्थानीपणानें उपयोग कसा करावा हें लोकांना समजेनासें झालें. अशा स्थितींत इंग्रजासारखा हरहुन्नरी, धाडशी, मतलबी, स्वार्थशूर, हिकमतगार, आणि दिसण्यांत रीतिरिवाजांत चमत्कृतिजनक व मोहक परका मनुष्य, स्वर्गांतून किंवा पाताळांतून एखाद्या यक्षगंधर्वकिन्नराप्रमाणें, त्यांच्यापुढें येऊन उभा राहिला. तेव्हां त्याचा तो सर्व दिमाख पाहून, त्यांनीं गोंधळून बावरून जावें यांत काय आश्चर्य !

असा हा इंग्रज व असा हा हिंदी मनुष्य यांची, म्हणजे श्रेष्ठ–कनिष्ठांची, गांठ पडल्यावर श्रेष्ठानें कनिष्ठाला जिंकून आपला दास बनवावें हें घडणारच ! इंग्रज प्रथम या देशांत केवळ व्यापारी–उदमी म्हणून आला ही गोष्ट खरी. आणि याला उद्देशूनच कांहीं लोक विनोदानें असें म्हणतात कीं, " झोंपेंत पलंगावरचा मनुष्य खालीं पडूं शकतो. पण झोंपेंत जमिनिवर निजलेला मनुष्य अल्लाद पलंगावर चढावा त्याप्रमाणें हिंदुस्थानांत इंग्रज व्यापारी हा चक्रवर्ति राजा बनला." तागडीच्या रक्षणाकरितां त्याला तरवार हातीं धरावी लागली. आणि मग त्याच तरवारीच्या सहाय्यानें त्यानें हिंदुस्थानांतील इतर सगळींच तक्तें सिंहासनें जिंकून

त्यांचें खास आपल्याकरितांच एक स्वतंत्र व प्रशस्त सिंहासन बनविलें ! नुसत्या व्यापारवृद्धीनें इंग्रजांना राज्य मिळतेंना व हिंदी लोकांचें राज्य जातेंना. परंतु खरी गोष्ट म्हणजे इंग्रज व्यापाऱ्यानें हिंदी लोकांची कुवत ओळखली. शिवाय हिंदी लोकांच्याच तरवारी भाकरी दिली असतां आपल्या चाकरीला येतात, व स्वकीयांच्यावर उलट चालूं शकतात, हें त्याला कळून आल्यावर हिंदी लोकांचें खरें मर्मस्थानच त्याला समजलें. यामुळें खुद्द हिंदुस्थानांतच इंग्रजांना आपली लष्करभरती करतां आली. तसेंच विलायतेहून तो जीं शस्त्रास्त्रें व दारुगोळा आणी तीं इकडच्यापेक्षां अधिक पल्लेदार व परिणामकारक ! आणि कवायती कंपू बनविण्याच्या विद्येनें तर इंग्रज हे आपल्या एका शिपायाकडून शत्रूच्या दहा शिपायांहून अधिक पराक्रम करवूं शकतात; आणि ते स्वार्थी असले तरी शिस्त संभाळणारे, आपापसांतील फूट दुसऱ्याला दिसूं न देणारे, शूर असले तरी विनयी, व युद्धयमान असले तरी सामोपचारी असतात; हा सर्व अद्भुत प्रकार पाहून हिंदी लोक आश्चर्यानें गुंगले व त्या गुंगींत त्यांच्या स्वाधीन झाले.

आकाशाचा किंवा पाताळाचा थांग लागत नाहीं त्याप्रमाणें इंग्रजांच्या उगमस्थानाचा खरा थांग हिंदी लोकांना केव्हांच लागला नाहीं. आतां त्यांच्याच साहाय्यानें हा थांग लागत चालला आहे. पण आतां पाहावें तों भौतिक व मानसिक गुणांतलि दिसून येणारें त्यांच्या आमच्यांतील अंतर मनाला भीतीनें ग्रासीत आहे. तथापि आत्मविश्वासासारखें बल दुसरें नाहीं या एकट्या एक सूत्रावर, गेलेलें स्वराज्य परत मिळविण्याची आम्ही हिंदी लोक उमेद बाळगीत आहों. त्या बळावर आम्ही तें परत मिळवूं असें परराष्ट्रांचे इतिहास, आमच्या कानांत आपले अनुभव सांगून, आम्हांला धीर देऊन कार्यसिद्धील तयार करीत आहेत !

इंग्रज राज्यकर्त्यांच्या बाजूनें पाहिलें तर त्यांनींहि या कार्यास आम्हांला थोडीशी मदत परस्पर केली आहे ती हिशेबांत धरावी लागते. म्हणून ती थोडक्यांत खालीं देतों. ही मदत मुख्यतः दोनतीन प्रकारांनीं. ( १ ) त्यांची राज्यव्यवस्था व्यवस्थित ठेवण्याची आवड ( २ ) त्यांनीं आपलें साम्राज्य वाढवून त्याच्या रक्षणाकरितां स्वतःच उत्पन्न केलेली हिंदुस्थानची आवश्यकता व अनिवार्यता. आणि ( ३ ) भलेपणाचे शब्द बोलणें व बहाणे करणें यांविषयीं त्यांना असलेली खोड.

सन १६०० सालीं ईस्ट इंडिया कंपनीची स्थापना झाली. एलिझाबेथ राणीनें अकबर बादशहाला व इकडील राजांना त्या सुमारास एक पत्र लिहिलें, त्यांत खालील वाक्यें आढळतातः—जगांतल्या उत्तम वस्तूंचा व्यापार करून सर्व देशांनीं आपापला फायदा करावा व परस्पर स्नेहभाव वाढवावा असा ईश्वरी संकेत आहे. यापूर्वीपासून स्पॅनिश पोर्तुगीज व्यापारी युरोपांतील माल हिंदुस्थानांत नेऊन व्यापार करीत आहेत, पण तो चोख नसतो. लोकांना ते नाहक जाच करतात. ते हिंदुस्थानांत केवळ व्यापाराचे उद्देशानें गेले असेंहि नाहीं. तिकडच्या सर्व देशांचे मालक व बादशाह आपणच आहोंत असें ते लोक समजतात; पण तिकडचे सर्व लोक आमची केवळ प्रजा आहेत असें ते इकडील लोकांस सांगत सुटले आहेत व उघडपणें लिहितातहि. आमचे इंग्रज लोक मात्र केवळ व्यापाराच्या सौम्य उद्देशानें आपल्याकडे जात आहेत; त्यांच्याशीं होणारे करार इमानानें पाळले जातील, व त्यांच्यावर उपकार कराल त्यांची फेड आम्ही मोठ्या आनंदानें करूं!" स्पॅनिश, पोर्तुगिज हे लोक जें करीत होते म्हणून वर सांगण्यांत आलें आहे तेंच पुढें इंग्रजांनीं खरें करून दाखविलें. वचनें कितपत पाळलीं व उपकार कसे फेडले हें आतां सर्व जग जाणतेंच. मोंगल बादशहानें १६०९ सालीं इंग्रजांना पहिला व्यापारी परवाना दिला. तेथपासून बंदरानिहाय वखारी स्थापण्याची सुरुवात झाली; १६२७ सालीं म्हणजे शिवाजीच्या जन्मापूर्वी तीन वर्षें, इंग्रजांनीं मुंबई बंदरांत आपलें ठाणें बसविण्याचा प्रयत्न केला होता. पण तो अयशस्वी झाला. तत्पूर्वीच १६१८ सालीं सर टॉमस रो यानें आपल्या वार्षिक रिपोर्टांत कंपनीला लिहिलें तें असेंः— "जरूर तेवढीं फर्मानें मिळालीं आहेत; कांहीं मिळावयाचीं आहेत. बादशहाची मर्जी हाच केवळ इकडे कायदा असून सर्व दरबारी व्यवहार पैशावर चालतो. इकडील लोकांशीं गरिबीनें वागून उपयोगी नाहीं. त्यांस आमचा कंटाळा आहे. त्यांचीं बंदरें सधन होतीं तीं आम्ही भिकेस लावून त्यांचा सर्व व्यापार बुडविला आहे. आमची जरब त्यांजवर जितकी बसेल तितकें आपलें काम होत जाईल. या लोकांस तरवारीच्या धारेखालीं ठेवलें पाहिजे. जर आमच्या मागण्या अधिकाऱ्यांनीं कबूल केल्या नाहींत तर बेलाशक एतद्देशीय व्यापाऱ्यांचीं गलबतें पकडून आम्ही आपलें काम भागवावें."

एलिझाबेथ राणीच्या पत्रानंतर अवघ्या १६ वर्षांतली ही स्थिति! व तेव्हांपासून आजवर हिंदुस्थानांतल्या बहुतेक भागांत ती निरनिराळ्या रूपानें चालूच

आहे. क्वचित् कोठें बंगाल्यांत व महाराष्ट्रांत इंग्रजी व्यापाऱ्यांच्या या चढाईच्या धोरणाला प्रतिक्रिया झाली. बंगालमधील सुराज उद्दौल्याचा विरोध प्रसिद्ध आहे. इकडे शिवाजीनेंहि राजापूरची वखार लुटून इंग्रज कैदी खारेपाटणच्या गढींत ठेवले होते, आणि पुढें प्रत्यक्ष सुरतेवर स्वारी केली, व आपल्या राज्यारोहणप्रसंगीं इंग्रजी व्यापारी वकिलाकडून नजराणे घेऊन तह केला ही हकीकतहि प्रसिद्ध आहे. शिवाजीनंतर संभाजीनेंहि इंग्रज व्यापाऱ्यांशीं आरमारी युद्धें केल्याचें इतिहासज्ञांस माहीत आहे. असो. इंग्रजांचें प्रस्थ वाढत जाऊन, कंपनीचें व्यापारी स्वरूप जाऊन त्याला राज्याचें स्वरूप आलें; ते देशी राजाकडे वकील पाठवूं लागले; वकिलाती स्थापूं लागले; तह करूं लागले; मुलूख जिंकूं लागले; लष्कर ठेवूं लागले; व आपल्या हद्दींतील लोकांना प्रजा असें मानून त्यांच्याकरितां सुराज्यव्यवस्था व न्यायकोर्टें यांची स्थापना करूं लागले. १८१८ सालीं पेशव्यांना जिंकल्यावर त्यांना कोणी शत्रु हिंदुस्थानांत उरला नाहीं. त्यामुळें पूर्वी शेंदीडशें वर्षें राज्यव्यवस्थेची जी मांडणी कंपनी सरकारनें मांडण्यास सुरवात केली होती ती त्यांनीं यापुढें वाढविली व नियमबद्ध केली.

इकडील कारभाराला विलायतेंतील सरकारी अधिकारी अधिकाधिक नियंत्रण घालूं लागले. १७७४ सालीं हिंदुस्थानबाबत ' रेग्युलेटिंग ॲक्ट ' झाला; व १७९३, १८१३, १८३३, १८५३ या सालीं—म्हणजे दर वीस वर्षांनीं—कंपनी सरकारच्या कारभाराची चौकशी करण्यांत येऊन तिच्या हिंदी प्रजेचें सुखदुःख कंपनी सरकार कसें काय संभाळतें याची विचारपूस करण्यांत येई. कंपनी सरकारचे अधिकार कमी करावे, निदान आपले त्यावरचे वरिष्ठ अधिकार चालवून हिंदी प्रजेशीं विलायत सरकारचें प्रत्यक्ष नातें जोडावें, असें धोरण सुरू राहिलें. १८३३ सालच्या कायद्यानें राज्यकारभारांत धर्म जातगोत लक्षांत न घेतां केवळ लायकीप्रमाणें अधि-काराच्या जागा हिंदी लोकांनाहि इंग्रजांप्रमाणें द्याव्या अशा उदार तत्त्वाची घोषणा केली. हें उदार तत्त्व पुढें किती अमलांत आलें हें प्रसिद्धच आहे. पण व्यापार करून पैसा मिळविणें, किंवा केवळ स्वकीयांच्या स्वार्थाकरितां राज्यकारभार करणें; एवढेंच आपलें धोरण नसून, राज्यकारभारांत इंग्रजांप्रमाणें हिंदी लोकांनाहि सामील करून घ्यावें, व पगाराच्या, अधिकाराच्या, मानाच्या जागा त्यांनाहि देऊन, त्यांच्यावर विश्वास टाकावा, अशा उदार धोरणाचा अरुणोदय तोंडानें झाला. यानंतर कारकून फड सजविण्याकरितां हिंदुस्थानांतील लोकांना शिक्षण

देण्याचा उपक्रम सरकाराकडून करण्यांत आला. शिवाय सर चार्ल्स मेटकाफ याच्या कारकीर्दींत मुद्रणस्वातंत्र्याचें तत्त्व मान्य करण्यांत येऊन हिंदी लोकांना मत स्वातंत्र्याच्या बाबतींत विलायतेंतील लोकांच्या बरोबरीचें स्थान तत्त्वतः मिळालें.

इकडे अशी सुधारणा होत असतां तिकडे मात्र हळूहळू एकेक देशी राज्य घशाखालीं उतरविण्याचा प्रयत्न सुरू होता. त्यामुळें व इतरहि कांहीं कारणांनीं १८५७ सालीं शिपाई लोकांनीं व कांहीं संस्थानिकांनीं मोठें बंड केलें. एक प्रकारें तें स्वातंत्र्याचें सशस्त्र युद्धच म्हणतां येईल. आणि रणावीण राज्य जगांत कोणाला मिळतें ! असा सनातनी प्रश्न, त्रिकालाबाधित प्रश्न, सर्व जगाच्या अनुभवाचा प्रश्न हिंदुस्थानाच्या एका डोळ्यापुढें असला तरी, युद्धाशिवाय आपण स्वराज्य मिळवूं असें ध्येय आजतागायत हिंदुस्थानानें दुसऱ्या डोळ्यापुढें ठेवलें असून, तें सिद्ध करण्याची उमेद बाळगली आहे ! उघडपणें स्वराज्य व स्वातंत्र्य मागणाऱ्या राष्ट्रीय सभेनें तें शांततेच्या मार्गानें मिळवूं असा आपला दंडक जगजाहीर केला आहे. त्यामुळें १८५७ चें स्वातंत्र्याचें युद्ध हें जवळजवळ गेल्या शंभर वर्षांतलें, इंग्रजी राज्यांतील, पहिलें व शेवटचें असेंच म्हणतां येईल. पण तें खरोखरीच शेवटचें ठरतें कीं काय हें ईश्वराच्या स्मरणवहींत टिपलेलें असेल !

तें आपणांला कळण्याला मार्ग नाहीं. तूर्त एवढें खरें कीं १८५७ सालच्या या युद्धामुळें, ' तुला आपला राज्यकारभार चांगला करतां आला नाहीं. ' असा व्यापारी कंपनीवर ठपका ठेवून, पार्लमेंटनें तिचा राज्याधिकार काढून घेतला. पण मुलूख खालसा करून राणीसरकारच्या राज्याला जोडला ! आणि सरकारानें स्वतः व्यापार करण्याचें टाकून सर्व हिंदुस्थान विलायतच्या व्यापाऱ्यांना मोकळा केला. परंतु कायदेशीरपणाची शंका मधून मधून जांचतच होती. ती अशी कीं, खुद्द विलायतेवर राजा असला तरी त्याचे भागीदार पार्लमेंट आहे, आणि ते पार्लमेंट लोकांनीं निवडून दिलेलें असतें, मग हिंदुस्थानचा मुलूख विलायतच्या राज्याला जोडला तर त्यालाहि पार्लमेंटच्या निवडणुकीचा अधिकार कां देऊं नये ? ही शंका कायमची दूर व्हावी याकरितां लॉर्ड लिटन यांच्या कारकीर्दींत १८७९ सालीं दिल्लीस दरबार भरवून, तेथें इंग्लंडच्या राणीनें ' हिंदुस्थानची बादशाहीण ' हा किताब घेतल्याचें जाहीर करण्यांत आलें. पार्लमेंटनेंहि तसा कायदा करून तत्त्वता आपला

हिंदुस्थानावरील ताबा अंशभागीनें स्वतःकडे ठेवला तरी व्यवहारांत बादशाहीण व बादशाह यांनीं आपला कारभार मनमानेल तसा करावा अशी सवलत दिली. बादशाह व बादशाहीण पार्लमेंटला विचारतील व करावयास सांगतील त्यापुरतेच कायदे पार्लमेंटनें करावे; व त्यास बादशाह–बादशाहीण यांनीं संमति द्यावी; अशी व्यवस्था झाली. याचा अर्थ इंग्लंडच्या प्रातिनिधिक लोकसत्ताक राज्यांत हिंदुस्थानाला स्थान दिलें गेलें नाहीं. तशा प्रकारची मर्यादित राज्यव्यवस्था हिंदुस्थानाकरितां विलायत सरकारनें करून दिली तर होईल. एरवीं हिंदुस्थाननें विलायतच्या राज्याचें, म्हणजे राजाबादशहाचें अंकित म्हणूनच गुलामगिरींत राहिलें पाहिजे ! या गर्भित सूचनेप्रमाणें व्यवस्था अंमलात येण्यास सुरुवात होऊन, आता कोठें कायदेमंडळें हिंदुस्थानांत स्थापन झाली आहेत. पण वरिष्ठ व कनिष्ठहि सरकार अद्याप बेजबाबदार स्थितींतच आहे.

असो; कायदा कसाहि रूपण असला तरी, भलेपणाचे शब्द बोलणें व बहाणे करणें याची खोड इंग्रजांना पहिल्या दिवसापासून आजवर तशीच आहे. आणि आपल्या युद्धतंत्रानें न कां होईना, पण त्यांच्या या भलेपणाच्या शब्दमंत्रानें तरी आपण काय मिळेल तें पाहूं अशी उमेद हिंदुस्थानाने परवा-परवापर्यंत बाळगली. पण आतां युद्धतंत्रांत सामोपचाराचा म्हणून, कुस्तींतल्या पहिल्या सलामीसारखा, जो एक अध्याय आहे त्याचा पाट हिंदुस्थानानें सत्याग्रहाच्या चळवळीनें सुरू केला आहे. बोलका राघू पिंजऱ्यांत पडतो, व ज्याला मनुष्यवाणी फुटत नाहीं तो स्वतंत्रता भोगतो, तसेंच कांहींसें इंग्रजांचें झालें आहे. यामुळें आपल्या भलेपणाच्या शब्दांची त्यांना मनांतून फार अडचण वाटते. पण ‘ जित्याची खोड मेल्याशिवाय जात नाहीं ’ यामुळें, ते अखेरपर्यंत तोंडानें गोड उदार वचनें बोलत राहणार, व हातानें अधिकारदान होईल तितकें आंखडतें घेणार. उलट आम्ही हिंदी लोकहि त्यांच्याच उदार व गोड वचनांची ढाल करून पुढें सरसावणार, व आत्मबलाचें शस्त्र अनेक अंगांनीं घासूनपुसून तीक्ष्ण व तजेलदार करणार. असा हा क्रम ईश्वरानें ठरवून दिलेला दिसतो.

आजची स्पष्टोक्ति राष्ट्रीय सभेच्या स्थापनेच्या वेळीं तिच्या तोंडांतून निघणें शक्य नव्हतें. कारण कोणत्याहि गोष्टीला काळ हा लागतो. १८८५ सालीं राष्ट्रीय सभेची स्थापना झाली तेव्हां हिंदुस्थानची राष्ट्रीय बुद्धि ही कमलकलिकेप्रमाणें कर्दमांतून व पाण्यांतून नुसतें वर तोंड काढून राहिली होती. आज पन्नास वर्षांनीं त्याच कळीच्या पाकळ्या सर्वांगांनीं उमलल्या जाऊन त्या कमळाला घेरदार फुलाचें रूप आलेलें दिसतें.

———

# १०७ राजकारणांतील अरण्यपंडित का विदूषक ?

(केसरी, एप्रिल १९३६)

डॉक्टर श्रीधर व्यंकटेश केतकर हे महाराष्ट्रांतील एक प्रसिद्ध पुरुष होत यांत संशय नाहीं. 'ज्ञानकोशा' सारख्या अभूतपूर्व ग्रंथमालेची योजना करून ती यशस्वी रीतीनें मुख्यतः त्यांनींच पार पाडली आणि सरस्वतीच्या गळ्यांत खरो-खरीच त्यांनीं अत्यंत बहुमोल असा मोठा चंद्रहारच घातला असें म्हटल्यास त्यांत अतिशयोक्ति नाहीं. त्यांचे इंग्लिश निबंधहि वाचकांसमोर असून त्यांतून त्यांच्या व्यापक व सूक्ष्मग्राही बुद्धीची चमकहि दिसून येते. त्यांचें संशोधनकार्य आजतागायतदेखील सतत चालू असून प्रायः 'ज्ञानकोशा' इतकेंच प्रचंड असें महाराष्ट्रीय इतिहासाच्या संशोधनाचें व लेखनाचें कार्य त्यांनीं स्वतःच्या शिरावर घेतलें आहे. हीं बाकींचीं कामें त्यांच्या हातून न झालीं तरी सुद्धां एकट्या 'ज्ञानकोशा' चीच कामगिरी चिरंतन महत्त्वाची आहे व तिच्याबरोबर डॉक्टर केतकरांचें नांवहि सतत निगडित राहील.

## डॉ. जेकील व मि. हाइड

पण डॉक्टर केतकरांचें इतर कार्य व चरित्र पाहिलें तर मात्र डॉक्टर ही एक एकेरी व्यक्ति नसून दुहेरी व्यक्ति आहे असें म्हणावें लागतें. विख्यात आंग्ल लेखक स्टीव्हन्सन यांची 'डॉ. जेकील व मि. हाइड' ही कथा इंग्लिश जाण-णारांस परिचित आहे. प्रसंगवशात् डॉ. जेकील व मि. हाइड यांचें परस्परांत रूपांतर होऊन एकच मनुष्य जरूरीप्रमाणें एकदां डॉ. जेकील व दुसऱ्यांदा मि. हाइड होतो, त्याप्रमाणें डॉ. केतकरांचें आहे कीं काय असें वाटतें. 'विनोद' नाटकांतहि नायक शरीराच्या एका बाजूस एका पद्धतीचा पोषाख चढवितो व दुसऱ्या बाजूस दुसऱ्या पद्धतीचा पोषाक चढवितो, याचीहि डॉक्टर केतकरांचें समग्र चारित्र्य दृष्टिसमोर आणलें म्हणजे आठवण होते. कारण डॉक्टर केत-कर हे जसे मोठे पंडित आहेत तसे ते एक बडे अरण्यपंडित आहेत. ते जाडे विद्वान् आहेत तसे ते एक अचरट विदूषक आहेत. 'यद्यपि शुद्धं लोकविरुद्धं नाकरणीयं नाचरणीयम्' या सामान्य जनतेच्या दंडकाविरुद्ध त्यांचें वागणें व कांहीं प्रसंगीं लिहिणेंहि असतें. किंबहुना असें करण्यांतच ते भूषण मानतात. त्यांची विक्षिप्त विचारसरणी त्यांच्या बोलण्या-चालण्यांत व त्यांच्या कादंबऱ्यांत

चांगलीच प्रत्ययास येते. त्यांचा 'ज्ञानकोश' व त्यांच्या कादंबऱ्या यांमधील अंतर पाहिलें म्हणजे त्यांच्या संमिश्र किंवा शबल व्यक्तिमत्तेची नीट कल्पना येते.

## महाराष्ट्रांतला डॉन क्विक्झोट

आपल्या विक्षिप्तपणाचें स्तोम माजविण्याची जी त्यांची संवय आहे ती अलीकडे राजकारणांत बरीच डोकावूं लागली आहे असें दिसतें. ही त्यांची राजकारणांतील उठाठेव पाहिली म्हणजे डॉन क्विक्झोट याच्याच पराक्रमांचें चित्र डोळ्यांसमोर उभें राहतें. मध्ययुगीन शूर सरदारांच्या शौर्यांच्या गोष्टी वाचून या मूर्ख शिलेदाराच्या डोक्यांतील चक्रें फिरूं लागलीं. हत्यारें पात्यारें घेऊन तो सज्ज झाला व नंतर त्यानें जीं साहसाचीं व वीर्यशाली कृत्यें केलीं तीं जगाच्या चेष्टेचा, कुतूहलाचा व हास्याचा विषय होऊन बसलीं आहेत. डॉ. केतकर हे एक अशा प्रकारचे महाराष्ट्रीय डॉन क्विक्झोट आहेत. राजकीय पुढारी वर्तमानपत्र काढून व चालवून अग्रेसरत्वाची माळ पटकावतात काय ? आपणहि एक वृत्तपत्र सुरू करूं व लोकांचे डोळे दिपवून टाकूं, अशा धडाडीनें डॉक्टरसाहेबांनीं एक वृत्तपत्र आरंभिलें व अमुक इतक्या वाचकांस वाचण्यास लावूंच लावूं अशी आव्हानाची बिरुदावली त्यावर घातली. पण तें आव्हान त्याच पत्राच्या पोटांत जिरून गेलें व तें वर्तमानपत्र 'भूत' काळांत समाविष्ट झालें ! हा त्यांचा पराक्रम नंबर एक. मग या क्विक्झोट-साहेबांची दृष्टि संघ, सभा, परिषदा, पक्ष यांच्याकडे वळली. स्वयंनिर्णय हें तत्त्व स्वीकारून त्यांनीं सभा भरविल्या, संघ काढला, पुस्तक लिहिलें व परिषदा भरविल्या. पण डॉक्टरसाहेबांना अनुयायी कोणी मिळेना व परिषदांतून तर ठरावाला रीतसर दुजोरा देण्यासाठीं सरकारी वार्ताहरालाच उभें करावें लागलें म्हणतात ! हा त्यांचा पराक्रम नंबर दोन.

## स्वराज्याचा हुकूमनामा

पण हा विचित्र व विक्षिप्त वीर एवढ्यावर थोडाच थांबणार ? त्याच्या सुपीक व विविध विचारचमत्कारांचें नृत्यांगण बनलेल्या मेंदूंतून, एखाद्या जादुगाराप्रमाणें एकदम निमिषार्धांत हिंदुस्थानाला स्वराज्य प्राप्त करून देण्याची व दादाभाई नौरोजीपासून पंडित जवाहरलाल नेहरूंपर्यंतच्या सर्व पुढाऱ्यांच्या मालिकेस जें साधतां आलें नाहीं तें सिद्ध करून दाखविण्याची अजब क्लृप्ति निघाली. या

महाकल्पनेनें त्यांचें डोकें फुगलें; स्वाभिमानानें ऊर भरून आला; दांत ओठ चावून ते जणु कांहीं आपल्याशींच म्हणूं लागले, "काय, स्वराज्य मिळत नाहीं काय ? करतों भारतमंत्र्यावर फिर्याद आणि एकदा स्वराज्याचा हुकूमनामा कोर्टाकडून घेतों म्हणजे झालें. स्वराज्य, स्वराज्य काय बात आहे ! " महात्मा गांधींना स्वराज्यदानास एक वर्षाची मुदत तरी पाहिजे होती. डॉक्टरसाहेबांना एवढी दिरंगाई खपत नाहीं. चुटकीसरशी स्वराज्य प्राप्त करून घेण्याचा त्यांनीं विडा उचलला. पण काय ? हा हन्त हन्त नलिनी गज उज्जहार ! ! जो विडा उचलला तो डॉक्टरांनीं खाऊन टाकला व आपलेंच तोंड रंगविलें. भारतमंत्री आपल्या स्थानीं स्वस्थ राहिले व स्वराज्याचा हुकूमनामा समुद्रांत बुडाला. हा त्यांचा पराक्रम नंबर तीन.

## राष्ट्रीय सभेस नोटीस

एवढे पराक्रम गाजविले तरी राजकारणांत दिग्विजय करून अजितपत्र मिळविण्यास निघालेल्या या दिग्विजयी वीराचें समाधान कसें होणार ! त्यांनीं आतां राष्ट्रीय सभाच जमीनदोस्त करण्याचा चंग बांधला आहे. हिंदुस्थानच्या स्वराज्य-संपादनाच्या मार्गांत काँग्रेस संस्था ही एक धोंड आहे; सरकार अडचणी उत्पन्न करीत नाहीं इतक्या काँग्रेस करते; काँग्रेसमधील महात्मा गांधी हे एक कलिपुरुष आहेत; त्यांना काँग्रेसमधून बाहेर काढणें दुष्कर आहे; त्यांच्या वजनामुळें दुसऱ्या लोकांना योग्य कार्य करण्यास वाव मिळत नाहीं; अशा आशयाच्या अनेक सबबी पुढें करून डॉ. केतकर यांनीं राष्ट्रीय सभेला नोटीस दिली आहे व लखनौच्या अधिवेशनापर्यंत वाट पाहून काँग्रेस-विरुद्ध आपण कायदेशीर इलाज करणार असल्याचें फर्मावलें आहे. डॉक्टर-साहेबांच्या मतें हिंदुस्थानावरील पार्लमेंटचा ताबा आतां नष्ट झाला आहे; व हिंदुस्थानाला स्वातंत्र्य मिळालेलेंच आहे. वरील नोटीस मुंबई प्रांतिक काँग्रेस कमिटीचे अध्यक्ष मि. नरीमन यांजवर बजाविण्यांत आली आहे; कारण डॉक्ट-रांना कायदेशीर उपायांचा अवलंब मुंबईत करावयाचा आहे. सदर नोटि-शीची नक्कल लोकशाही स्वराज्य पक्षाचे प्रस्थापक श्री. न. चिं. केळकर यांसहि पाठविण्यांत आली आहे.

## गांवोगांव फिर्यादी

काँग्रेसवर फिर्याद करावयाची तर काँग्रेसच्या अध्यक्षांना रीतसर नोटीस

द्यावयास पाहिजे. तसेंच लोकशाही स्वराज्य पक्षालाहि फिर्यादींत दाखल करून घ्यावयाचें तर त्याच्या अध्यक्षांनाहि प्रतिवादी म्हणून खटल्यांत गोवलें पाहिजे. बरें, तसेंच म्हणावयाचें तर एकट्या अध्यक्षांनाच काय म्हणून निवडून काढावयाचें ? काँग्रेसच्या व लोकशाही स्वराज्य पक्षाच्या सर्व सभासदांना डॉक्टर शिरोमणींनीं प्रतिवादी करावें व सरांस ही योजलेली फिर्याद लावावीच. जे जे सभासद आहेत ते काँग्रेसचें कार्य करतात व तिला प्रोत्साहन देतात हें उघड आहे. म्हणून गांवोगांवीं काँग्रेसच्या व लो. स्व. पक्षाच्या प्रत्येक सभासदावर नोटिसा बजावून डॉक्टरबहादुरांनीं शिमग्यांत होळ्या पेटतात त्याप्रमाणें जिकडे तिकडे फिर्यादीच फिर्यादी लावून टाकाव्या.

## ढालगज प्रतिभेचे प्रताप

म. गांधींना काँग्रेसबाहेर घालवून लावतां येत नाहीं म्हणून काँग्रेसच मोडून तोडून टाकावी व काँग्रेसच्या पुढाऱ्यांवर फिर्याद करावी हें जसें डॉक्टरांच्या उंटावरच्या शहाणपणाचें एक लक्षण आहे, तसेंच पार्लमेंटचा हिंदुस्थानावरील ताबा आतां संपला आहे ही कल्पना त्यांच्या घमेंडखोरीचें व अक्कलमंदपणाचें द्योतक आहे. पार्लमेंटचा ताबा संपला कसा ? एकच गोष्ट घ्या. नव्या कायद्या-खालीं सुमारें शंभर ऑर्डर्स–इन्–कौन्सिल म्हणजे बादशाही फर्मानें निघावयाचीं आहेत तीं पार्लमेंटच्याच संमतीनें हें डॉक्टरांस कळलें तर ते डॉक्टर कसले ? पार्लमेंटचा हिंदुस्थानावरील अधिकार कायम आहे हें ज्यांनीं त्या कायद्याचा अभ्यास केला त्यांना पक्कें ठाऊक आहे. पण डॉक्टरांच्या डोक्यांत तशी लहर आली त्याला त्यांचा इलाज नाहीं. त्यांची ढालगज प्रतिभा एकदां उठली म्हणजे ती काय काय प्रताप गाजवील त्याचा नेम नाहीं. ‘ स्वभावो मूर्ध्नि वर्तते ’ म्हणतात तेंच खरें.

## डोमकावळेपणा पुरे

असो; डॉक्टरसाहेबांनीं लोकमान्य टिळकांचें धोरण अचूक व योग्य ठरविलें हें एक विशेष होय. त्याचप्रमाणें लोकशाही स्वराज्य पक्षास देखील ते काँग्रे-सच्या बरोबरीनें प्रतिवादींच्या नांवांत घालतात, हीहि गोष्ट ध्यानांत धरण्या-सारखी आहे. तें कांहीं असलें तरी राजकारणांत डॉक्टरांना खरोखर कांहीं गंभीर विधायक कार्य करावयाचें असेल तर त्याचे मार्ग फार वेगळे आहेत. असल्या शेंदाड–शिपाईगिरीनें कांहीं होणार नाहीं. उलट त्यांचीच फटफजिती

व हसें होत राहील. स्पष्टच बोलावयाचें म्हणजे त्यांनीं आपलें महाराष्ट्रीय इतिहासाच्या संशोधनाचें अंगीकृत कार्य नेटानें व एकाग्रतेनें पुढें चालू ठेवावें यांत महाराष्ट्राचें काम होईल व त्यांची काय असेल तर ती अब्रू बचावेल. राजकारणांत ते भलताच डोमकावळेपणा करूं लागले तर त्यांचा नाहक कीर्तिनाश होईल हें जाणून त्यांनीं गप्प बसावें हेंच परिणामीं श्रेयस्कर होय.

---

## १०८ बाइलवेडया राजाचा राज्यसंन्यास !

( केसरी, डिसेंबर सन १९३६ )

अधर्मं धर्ममिति या मन्यते तमसावृता ।
सर्वार्थान् विपरीतांश्च बुद्धिः सा पार्थ तामसी ॥

श्रीमद्भगवद्गीता १८·३२

गेल्या जानेवारींत इंग्लंडचा राजा गादीवर बसतो काय! आणि राज्यारोहण समारंभ होण्याच्या आधींच डिसेंबरांत राज्यत्याग करतो काय ? सगळेंच अद्भुत ! मूल जन्माला यावें पण मेलेलें बाहेर पडावें तसेंच हें झालें नव्हे काय ? किंवा पूजा करतांना शंख धुवून पुसून पाणी भरून अडणीवर ठेवायला जावें तोंच, गंध फूल वाहण्यापूर्वी, तोल जाऊन तो आपल्याच वजनानें खालीं घरंगळून पडून फुटावा तसाच हा प्रकार झाला ! ब्रिटिश साम्राज्यासत्तेला हा अपशकून झाला असेंच भाविक भोळे लोक तरी म्हणणार. अवघ्या दहा-अकरा महिन्यांत राजयोगांतून राजसंन्यास निर्माण व्हावा, याला राजकीय कारणें नसतां केवळ व्यक्तिविषयक कारणें झालीं असलीं तरी, मनावर परिणाम व्हावयाचे तेच होतात. दिसतांना इंग्लंडच्या लोकमताचा हा विजय दिसतो. परंतु वास्तविक इंग्लंडची राजपद संस्था आंतून कुजल्या किडल्याचाच तो पुरावा आहे.

गेल्या ता. ७।११ फेब्रुवारीच्या केसरींत ' इंग्लंडच्या राजपदाची चिकित्सा ' या विषयावर दोन लेख आले होते. त्यांत या राजपदावरील बंधनें दिवसानुदिवस किती घट्ट आणि जाचक होत चाललीं आहेत हें दर्शवितांना म्हटलें होतें कीं, " सगळ्या साम्राज्यांत खरा कोंडमारा जर कोणाचा होत असेल तर तो सर्वांत अधिक राजाचाच होतो. ......पाणीदार घोडयाला तोंडांतील काटे-

लगामाचें जें दुःख तेंच दुःख, इंग्लंडच्या एखाद्या स्वाभिमानी राजाला, विद्यमान राज्यघटनेनें म्हणजे राजधर्मानें होत असल्यास नवल नाहीं. " हें लिहितांना लेखकानें जो 'स्वाभिमानी' म्हणून काल्पनिक राजा घेतला तो एडवर्ड राजाच्याच रूपानें मूर्तिमंत अवतरला. पण तो एकंदरीनें नादान ठरला !

## राजा वेडसर खरा

झाल्या प्रकारावरून दोन अनुमानें निघतात. एक हें कीं, ड्यूक ऑफ 'विंडसर' ( माजी राजाला नव्या राजानें ही पदवी नुकतीच बहाल केली आहे. ) हा लोकोत्तर तत्त्वनिष्ठ ठरण्याइतका वेडसर आहे. किंवा दुसरें अनुमान हें कीं, तडफदारपणें राज्यत्याग करण्यांत कठीण वाटण्याइतकें लोभनीय किंवा स्पृहणीय असें कांहीं तत्त्व इंग्लंडच्या राजपदांत आतां राहिलेंच नाहीं ! हीं दोन अनुमानें दिसतांना परस्पर–विरोधी वाटतात तितकीं मात्र तीं नाहींत. ड्यूक ऑफ विंडसर हा थोडा वेडसर खराच. पण राजपदहि आतां तितक्याच किंमतीचें झालें आहे, आणि हीं दोनहि अनुमानें थोडथोडीं खरींच आहेत.

एडवर्ड विंडसर हा आम्हांला वेडसर कां वाटतो तें प्रथम सांगतों. तो स्वतः भावी राज्याच्या नात्याचा राजपुत्र ( प्रिन्स ऑफ वेल्स ) होता आणि तसें म्हणवून घेत होता. राजपदाला जितकी राजाची तितकीच राणीचीहि अवश्यकता प्रायः असते हें त्याला माहीत असलेंच पाहिजे. असें असतां वयाच्या बेचाळीसाव्या वर्षापर्यंत तो अविवाहित राहिला ! हें कसें ? तो प्रतिनिविष्ट ब्रह्मचारी होता असें म्हणवत नाहीं. तसेंच आपण भीष्म किंवा शुक्राचार्य नाहीं हें त्याला माहीत होतें. तसा तो असता तर, आज लग्न करच असें म्हणत कोणी त्याच्या पाठी लागलें नसतें. किंवा लागलें असतें तरी, त्यानें ती आग्रहाची सूचना झिडकारून टाकून आपलें ध्येयवादित्व जगाला पटवून देऊन धन्योद्गार मिळविले असते. पण पुष्कळांची समजूत अशी आहे कीं, एडवर्ड हा तरुणपणचे सर्व खेळ अविवाहित स्थितींत खेळत आलाच आहे. नैष्ठिक ब्रह्मचर्य–व्रत पाळल्याची कीर्ति त्याला लाभलेली नाहीं.

## वधूंना तोटा का होता ?

बरें, तो लग्न करता तर त्याला अनुरूप वधूंना काय तोटा होता ? इंग्लंडां-

तल्या यच्चयावत् कुमारिका वर्गांत, एडवर्ड राजपुत्राला अनुरूप व प्रेमाला योग्य अशी, एकहि ललना मिळाली नसती असें म्हणणें म्हणजे त्या वर्गाची बदनामी करणेंच होय. प्रेम हें आंधळें असो. पण तरुणपणचा आंधळ्या कोशिंबिरीचा खेळ सुरू असतां, अहमहमिकेनें पुढें पुढें करणाऱ्या स्त्री भिडूंच्या गर्दीत ज्याचा हात एकाहि खोळियेवर पडत नाहीं तो गडी काय म्हणावा ? स्वतःच्या राज्यांतल्या सरदारजहागीरदारांच्याच काय, पण अनेक परदेशीय रूपसुंदर राजकन्याहि त्याच्याकरितां हातांत माळ घेऊन, त्याच्या नुसत्या संमतिदर्शक कटाक्षाची वाट पाहात त्याच्या पायाशीं लोळत आल्या असतील. आणि दिवसमानाप्रमाणें आपलें उदार-मतवादित्व त्याला प्रगट करावयाचें असतें तर, मध्यम वर्गांतली एखादी तरुण लावण्यवती विदुषी कुमारिका त्याला सहचारिणी करण्याला सहज लाभली असती किंवा लहरी मदनाच्या लीलाविलासांत सांपडून, कनिष्ठ वर्गांतल्याहि एकाद्या मजूर कुमारिकेवर त्याचें प्रेम जडलें असतें, आणि तिला त्यानें राज्ञीपद दिलें असतें, तर इंग्लंडांतले सनातनी भट भिक्षुक किंवा सनदी गणंग यांचेंहि कांहींच चाललें नसतें. तसेंच 'सल्ला' सादर करण्याच्या मिषानें प्रधानमंडळाला त्याला कानपिचक्या देतां आल्या नसत्या ! उलट या दाक्षिण्योत्कर्षामुळें त्याच्यावर जनतेनें खऱ्या मनानें पुष्पवृष्टि केली असती ! आणि सोशियालिझम कम्यूनिझम् यांच्या चढाईच्या हल्ल्याच्या मार्गांत आणखी एक खंदक खणून तट बांधल्याइतकें त्यानें इंग्लंडचें राजपद सुरक्षित केलें असतें.

## कांदेखाऊचा युक्तिवाद

पण स्वाभाविक वास्तववादाला किंवा काल्पनिक अद्भुतरम्यतेला रंगविल रंजविल असें कांहंचि न करतां, एडवर्ड विंडसर यानें अशीच एक गोष्ट केली कीं, तिजमुळें त्याचा डोक्यांतला एखादा 'स्क्रू' निखळला किंवा सैल झाला आहे असें लोकांना वाटल्यास त्यांत त्यांची मुळींच चूक होणार नाहीं. त्यानें केलें तें गोष्टींतल्या विक्षिप्त कांदेखाऊसारखें विपरीतच केलें. "कां हो आज एकादशी आणि तुम्ही विडासा खाता ?" "होय तर, तोंडाची कांद्याची घाण जायला हवीना ?" "पण कांदा कां खाल्लात ?" "अहो, शिळा भात एरवी खमंग कसा लागणार" "अहो, पण भात शिळा कां ?" "काल बायकोला भूक चांगलीशी नव्हती म्हणून तिनं अर्धेच ताट संपवून उष्टा भात शिल्लक ठेवला होता तो फुकट

द्वडण्याचं जिवावर आलं; दुसरं काय ! " योगभ्रष्ट ब्रह्मचारी एडवर्ड विंडसर याची स्थिति अशीच झाली.

कारण मिसेस सिंप्सन नांवाच्या एका सधवाविभक्तधवा स्त्रीशीं लग्न करण्याच्या निश्चयामुळें एडवर्ड राजावर जो राज्यत्यागाचा प्रसंग गुदारला, त्याचा प्रकार आक्षेप घेण्यासारखाच खरोखर विपरीत आहे. हे आक्षेप उत्तरोत्तर चढत्या श्रेणींत असे बसतात.

## कांहीं पोकळ आक्षेप

१ ही बाई अडतीस वर्षांची आहे. २ ती परकीय म्हणजे अमेरिकन आहे. ३ ती उंची खानदानी घराण्यांतली नाहीं. ४ तिचा घटस्फोट झाला आहे. ५ तिचा दोनदां घटस्फोट झाला आहे. ६ ती सधवा विभक्तधवा आहे. म्हणजे तिच्या पूर्वींच्या लग्नाचे दोनहि नवरे अजून जीवंत आहेत. ७ आणि एक नवरा तर खुद्द इंग्लडांतच राहतो ! या आक्षेपांपैकीं कांहीं एरवीं उपेक्षणीय ठरले असते. आणि त्या आक्षेपांच्या जागेवर उभे राहून विरोध करण्याला प्रधानमंडळाला लोकमताचें पाठबळ मिळालें नसतें.

उदाहरणार्थ, ती अडतीस वर्षांची आहे या आक्षेपांत मुळींच स्वारस्य नाहीं. नवा कोरा नवराच जर बेचाळीस वर्षांचा तर नवी नवरी अडतीस वर्षांची असली तर तें योग्यच नव्हे काय ! निमजून दातांना निमजून कणसेंच आवडतात ! ' यथा यक्षः तथा बालिः ! ' तें फार तर फाजील मोढ विवाहाचें एक उदाहरण असें कोणी म्हणतील. पण सापेक्षतेंत तरी औचित्यभंग नाहीं !

मिसेस सिम्पसन ही परकीय आहे या आक्षेपांतहि राम नाहीं. जात वेगळी नाहीं. धर्म वेगळा नाहीं. मग देशाची हद्द ओलांडली म्हणून काय झालें ! त्यांतूनहि परकीय तरी अमेरिकनच ना ! अमेरिकन म्हटले म्हणजे ते मूळचे प्रायः इंग्रजच. त्याच वंशवृक्षाचा एक फाटा तोडून तो अमेरिकेच्या भूमींत लावला गेला, दुसरें काय ! कलमी झाड तर अधिक लज्जतदार ! अमेरिकन इंग्रजी भाषा इंग्लंडच्या इंग्रजीवर दिवसेंदिवस यशस्वी आक्रमण करीत म्हणजे आपली छाप चढवित चालली आहे. गेल्या महायुद्धांत इंग्लंडला शेवटीं अमेरिकाचाच धावा करावा लागला. आणि अमेरिका धाऊन साह्याय्याला आली म्हणून तर इंग्लडनें महायुद्ध चिंकलें. एडवर्ड विंडसरलाहि मिस अमेरिकाच लाभली ! त्यांत दुसरें काय ! तिच्यावर परकीयतेचा आक्षेप घेणाऱ्या नाकानें कांदे सोलणाऱ्या

इंग्रज कुमारिकांना हें कळायला पाहिजे कीं, ज्या हॅनोव्हर घराण्यांत एडवर्ड जन्माला आला तेंहि मूळचें परकीयच आहे ! अलीकडे त्याला विंडसर असें नांव दिल्यानें त्याचें परकेपण लोपत नाहीं.

## श्रीमंती–गरिबीचा संगम

नंतरचा आक्षेप कीं ही बाई खानदानी घराण्यांतली नाहीं. हाहि आक्षेप फोलच. कारण केव्हांहि सामान्य जनता हाच समाजाचा मुख्य आधार असतो. अविकृत असें संस्कृतिधारण तिच्याच हातून होतें. त्यांतूनहि आतां दिवस साम्यवादाचे येत चालले आहेत. अशा वेळीं एखाद्या राजानें विशेष दाक्षिण्यबुद्धि दाखवून, हीन पतित नव्हे पण एखाद्या 'सामान्य गरीब' घराण्यांतला मुलीला राज्ञीपद दिलें तर त्याचें कौतुकच होईल; राजा महानुभाव ठरेल आणि प्रजा अधिक राजनिष्ठ होईल ! श्रीमंती–गरिबीचा संगम हें अर्थशास्त्रदृष्ट्या एक पुण्यदायक तीर्थच ठरतें. त्यानेंच समाज एकजीव होतो, व त्याचा प्रवाह अखंड चालण्याला साहाय्य होतें. आज इंग्लंडच्या राज्यकारभारांत वरचढ कोण आहे ? हाऊस ऑफ कॉमन्स हें कीं हाऊस ऑफ लॉर्डस हें ? झालें तर. सिम्पसन बाई कॉमनर आहे हा आक्षेप मूळ धरूं शकत नाहीं.

या नंतरच्या आक्षेपापासून मात्र विचार करण्यासारखे प्रश्न उत्पन्न होतात. घटस्फोट झालेली स्त्री ही सामान्यतः लांछितच समजली जाते. कदाचित् हें लांछन तिला लावण्यांत, एखाद्या उदाहरणांत, नैतिक अन्यायही होत असूं शकेल. कारण घटस्फोट प्रकरणांतील खरा अपराध किंवा दोष तिच्याकडे नसून तिच्या नवऱ्याकडे असूं शकतो. परंतु टाळी ही केव्हांहि एका हातानें वाजत नाहीं असेंच जग घेऊन चालतें.

## घटस्फोटावरील आक्षेप

घटस्फोट हा विशेष परिस्थितींत एखाद्या शुद्धाचरणी पण दुर्दैवी पत्नीच्या दुःखनिवारणाला अनिर्वाह्य उपाय ठरेल. परंतु पहिलें लग्न 'मोडण्या' पेक्षां दुसरें लग्न 'जोडण्या' चें साधन असा गुप्त ध्वनि जेव्हां घटस्फोटाच्या योजनेंतून ऐकूं येतो तेव्हां तो समाजाला फारसा आवडत नाहीं. आपद्धर्म आणि सुव्यवहार या दोन्ही गोष्टी समाजाला अवश्यकच होत. त्याशिवाय चालणारच नाहीं. तथापि ध्येयवादांतहि प्रती मानल्या जाणें हें स्वाभाविक

आहे. आणि एकपतिव्रत एकपत्नीव्रत हें ध्येय म्हणून कोणत्याही देशांतील समाज हा पहिल्या प्रतीचें मानतो ही गोष्ट कांहीं खोटी नाहीं. घटस्फोट न करतांहि पतिपत्नींना पृथक्‌पणें राहतां येण्याची सोय कायद्यानें केलेली असते आणि घटस्फोट करून दुसऱ्या लग्नाचा मार्ग मोकळा करण्यापेक्षां, परित्यक्ता म्हणवून घेऊन पृथकत्वाचा अवलंब करून, आयुष्य शक्य तेथवर कंठावें हें समाज अधिक इष्ट मानतो हें निश्चित आहे. मग त्याला तुम्ही कांहीं म्हाणा मनुष्यस्वभाव बदलेल तेव्हांच हें बदलेल !

जो आक्षेप एका घटस्फोटाला लागू तो दुसऱ्यान्दा केलेल्यालाहि लागू होतो इतकेंच नव्हे, तर तो आक्षेप द्विगुणित किंवा अनेक गुणितही ठरतो ! कारण घटस्फोटाच्या पुनरुक्तीनें पतिपत्नीवरील आपत्तीपेक्षां त्यांच्या लहरी स्वैर स्वभावाचेंच अनुमान अधिक यथार्थ ठरतें. फौजदारी कायद्यांत अशी एक मौज आहे कीं, पहिल्या अपराधाला कदाचित् माफीहि मिळूं शकेल. परंतु पुनः केलेल्या अपराधाला किती तरी अधिक पटीनें शिक्षा देतां येते. एरवीं चोरीला वर्षसहा महिने शिक्षा असली तरी निर्ढावलेल्या चोराचा इन्साफ सेशन कोर्टांत होऊन त्याला दहा बारा वर्षेंहि शिक्षा ठोठावतां येते ! मिसेस सिम्पसन इनें दोन वेळां आपण होऊन घटस्फोट करून घेतला यावरून या बाईची स्वैर वृत्ति उघड होते. म्हणून वरील वाढत्या प्रमाणानें लोकमत तिला प्रतिकूल असलें तर त्यांत काय आश्चर्य ? अशा बाईबरोबर लग्न करणाऱ्या एडवर्ड विंडसरशीं सहानुभूति असणारा मनुष्य इतकेंच म्हणेल कीं, " बाबा ! या बाईच्या तिसऱ्या घटस्फोटाचा प्रयोग तुझ्यावर न होवो म्हणजे मिळविलीस ! "

## एकाच बायकोच्या नवऱ्यांचें संमेलन

अगदीं शेवटचा आक्षेप आनुषंगिक पण मार्मिक आहे. तो असा कीं, या बाईचे काडीमोडे दोघे जुने नवरे अजून हयात असून त्यांतला एक आज इंग्लंडांतच राहतो. काडीमोड केलेल्या स्त्रीचा दुसरा नवरा व पहिला नवरा एकत्र आले असतां त्यांना एकमेकांकडे पाहून कसें वाटेल याचा अनुभव काय असेल तो त्यांचा त्यांनाच माहीत ! सामान्य लोकांसंबंधानें अशी गोष्ट क्वचित् घडली तर ती कोणाच्या लक्षांतहि येणार नाहीं. पण राजपदाधिष्ठित पुरुषाला असा प्रसंग त्याच्या राणीमुळें यावा ही कल्पनाच दुःसह वाटते ! आतां हें खरें

कीं, इंग्लंडच्या प्रधानमंडळानें या शेवटच्या आक्षेपावरहि भर दिला असला तरी त्याचा खरा भर ही बाई दोन वेळां घटस्फोट केलेली आहे या आक्षेपावरच असावा हें उघड दिसतें. इंग्लंडच्या राजघराण्याच्या परंपरेंत व्यभिचारापेक्षां घटस्फोटाला अधिक दूषण मानलें जातें. राणी व्हिक्टोरिया इनें असा एक नियम केल्याचें सांगतात कीं, तिच्या विद्यमानें होणाऱ्या दरबारांत किंवा इतर समारंभांत पुनर्विवाहित स्त्रीला मज्जाव नसावा, पण घटस्फोट झालेल्या स्त्रीला निमंत्रण किंवा प्रवेश देण्यांत येऊं नये. तीच विचारसरणी अद्यापि राजघराण्यासंबंधानें इंग्लिश लोकमत मान्य करीत असावें असें दिसतें.

## उलटसुलट विपरीतच

असो. सिम्पसन बाईंवरील आक्षेपांचें विवेचन थोडक्यांत आम्हीं केलें. परंतु दुसऱ्याहि एका दृष्टीनें या प्रकरणाचा विचार करतां येतो. तो असा. एडवर्ड राजानें राज्यत्याग करण्यांत एक प्रकारची तडफ आणि मानवी भावनेची उत्कटता दाखविली यांत मुळींच शंका नाहीं. तथापि विद्यमान विशेष परिस्थितींत तरी तिचें फारसें कौतुक करतां येत नाहीं. त्याचें कारण असें कीं, हा गृहस्थ बेचाळीसाव्या वर्षांपर्यंत जर अविवाहित राहून अखंड तारुण्य व ब्रह्मचर्य संभाळण्याला खराच समर्थ होता, तर निम्में अधिक आयुष्य उलटून गेल्यावर, तेंच चित्तवृत्तीचें स्थैर्य त्यानें तसेंच पुढेंहि चालवावयाचें होतें ! किंवा उलट, वाईट कल्पना करावयाची तर, प्रत्यक्ष विवाह न करतांहि जर त्यानें गृहस्थाश्रमाचीं सुखें भोगण्याचा कांहीं पर्याय पूर्वीं केला किंवा ठेवला असेल, तर तो त्यानें तसाच पुढें चालू ठेवला असतां तरी त्याची वाच्यता कोणीं केली नसती. तो राजा होऊनहि अविवाहित राहिला असता, आणि यामुळें दरबारी मिळणारें मानसन्मान भोगण्यास चटावलेल्या दरबारी स्त्रियांची गैरसोय त्यानें केली असती, तरी लोकमत त्यावर नाराज झालें नसतें. उलट कदाचित् त्याच्या आत्मसंयमनाकरितां त्याचें कौतुकच झालें असतें. त्यानें लग्न न करण्यांत राज्याचा घातपात कांहींच नव्हता. गादीची परंपरा राखण्याची सोय त्याच्या विवाहित बंधूकडून झालेलीच होती म्हणून 'माझ्या राज्यांतील प्रजा हेंच माझें कुटुंब' असें मानून, घरीं बायकोच्या अवश्य त्या उपाधीनें खर्च होणारे रोजचे चार-दोन तास त्यानें समाजकार्याकडे खर्च केले असते, तर या काळांत त्याला लोकांनीं देव मानला असता !

बरें समजा कीं, अगदीं तरुणपणीं, इतर रीतीनें निरपवाद अशा पण केवळ कनिष्ठ वर्गांतील अशा, एकाद्या गरीब आईबापांच्या सद्गुणी कन्येवर त्याचें प्रेम जडलें असतें, आणि प्रधानमंडळाच्या फाजील ढवळाढवळीला बाणेदार विरोध करून, आपलें कांहीं चालत नाहीं असें पाहून, त्यानें राज्यत्याग केला असता, तर कवींनींच काय पण तत्त्ववेत्त्यांनींहि त्याला 'हीरो' महानुभाव, महात्मा, अशीं विशेषणें लावलीं असतीं !

## तकलुपी त्याग

पण एडवर्ड विंडसर यानें केलेल्या राज्यत्यागाची स्थिति उलट्या सुलट्या सर्वच बाजूंनीं विपरीत झाली असल्यामुळें, त्याचें चीज कोणी करूं शकणार नाहीं हें उघड आहे. एकादा कोणी असें म्हणणारा भेटेल, नाहीं असें नाहीं, कीं "ज्यानें आपल्या प्रेमाच्या उद्गाराखातर एवढ्या मोठ्या राजपदावर व ऐश्वर्यावर लाथ मारली तो आपल्या दिलाला तरी सच्चा राहिला"! पण हें सच्चेपण खरें करावयाचें तर नव्या राजानें देऊं केलेली जहागीर व पदवी ही देखील त्यानें स्वीकारूं नये. प्रेमाला एवढी योग्य अशी जर मिसेस सिम्पसन ही राजाची प्यारी आणि त्या प्यारीचेंहि जर एडवर्डवर एवढें उत्कट प्रेम, तर त्या दोघांनीं एकप्रकारें फकीरी स्वीकारून, विपत्ति हेंच वैभव मानून, आनंदानें दिवस घालवावयाचे होते. प्रतिभासंपन्न कवींना एखादें सुंदर काव्य रचण्याला तो स्फूर्तिविषय झाला असता.

पण आज दिसतें त्या रीतीनें पहातां, एडवर्ड विंडसर हा सच्च्या दिलापेक्षां कच्च्या दिलाचाच म्हणजे अधिक चंचल, अव्यवहारी, संशयात्मा दिसतो ! तराजूंत एका बाजूला घालून राज्यत्यागाची पुण्याई तंतोतंत जोखतां येण्याइतकी जर त्याच्या प्रेमाची निर्दोष स्थिति असती तर गोष्ट वेगळी. पण याला चारित्र्याची, शुद्धतेची कल्पना नाहीं तितकीच राजपदाच्या अधिकाराची किंवा जबाबदारीचीहि कल्पना नाहीं. उलट प्रधानमंडळ-संस्था व राजसंस्था या उभयतांमध्यें लढा लढविण्याचा, आणि राजपदाच्या तेजाची उरली सुरली कां होईना पण चमक दाखविण्याचा, जो एक अपूर्व प्रसंग त्याला लाभला होता, त्यांत हार खाऊन प्रधानमंडळाचें पारडें त्यानें अधिक जड मात्र करून ठेवलें, असा आक्षेप राजसंस्थापक्षपाती लोक त्याजवर सहजच घेऊं शकतात ! एडवर्ड विंडसरनें आत्मप्रसाधनाचा आणि प्रामाणिक प्रेमाचा अभिमान गाजव-

ण्याचा आव घालण्यांत कांहीं अर्थ नाहीं ! राज्यधुरा जर त्याला अवजड वाटत होती तर त्यानें ती प्रथमच मानेवर घ्यावयाची नव्हती. आणि ती त्यानें एकदां घेतल्यावर ती तशीच योग्य रीतीनें निभावून न्यावयास पाहिजे होती. मग असें करण्यांत त्याच्या प्रेमभंगानें मानेला घट्टे पडले असते किंवा जखम झाली असती तरी ती सोसणें हेंच त्याच्या ब्रीदाला शोभलें असतें.

## दोन कोडीं

( १ ) ' राणीचा नवरा–पण राजा नव्हे; ' आणि ( २ ) ' राजाची बायको–पण राणी नव्हे ! ' हीं सूत्रें शब्दार्थानें विसंगत दिसलीं तरी, राजकीय अर्थानें, सामाजिक अर्थानें, तीं सुसंगतच आहेत. पहिल्या सूत्रांत राणी हा शब्द मुख्य आणि राजा हा शब्द आनुषंगिक प्रतियोगी आहे. त्याचप्रमाणें दुसऱ्या सूत्रांतील राजा हा शब्द मुख्य असून राणी हा शब्द आनुषंगिक प्रतियोगी आहे. पहिल्या सूत्राचा अनुभव स्वतः इंग्लंडांतच पूर्वीं आलेला आहे. व्हिक्टोरिया राणीचा नवरा प्रिन्स आल्बर्ट हा इंग्लंडचा राजा नव्हता. त्याच रीतीनें चवथ्या जॉर्ज राजाची पहिली बायको ( राज्यारूढ होण्यापूर्वीची ) ही राणी नव्हती. राजा, राणी हें पद मुख्यार्थानें स्वतःच्या व्यक्तीच्या वारसा हक्कामुळेंच प्राप्त झालेलें असतें. प्रतियोगी पद या मुख्याच्या संबंधानेंच प्राप्त होतें. स्त्री असो, पुरुष असो, ती व्यक्ति सिंव्हासनाधिष्ठित होण्याचा हक्क कायद्यानेंच येतो.

राज्याचा धनी जो राजा. तो गृहस्थाश्रमी असणें हें प्रायः सोईचें असतें. राजा गृहस्थाश्रमी नसला, त्यानें अविवाहित राहाण्याचा निश्चय केला, तर त्याला कायदा आड येत नाहीं किंवा लोकमत नांवें ठेवीत नाहीं हें खरें. पण त्यानें लग्न करण्याचें मनांत आणलें तर त्याची स्त्री राणी म्हणण्याला योग्य अशी असावी अशी अपेक्षा मात्र स्वाभाविक असते. आणि ही योग्यता घटस्फोटित स्त्रीला नाहीं असें आज तरी इंग्लंडांतील लोकमत आहे. राणी ही राजाची अर्धांगी म्हणून सर्व समारंभांना बसते आणि समारंभाला येणाऱ्या सर्व स्त्रियांना तिजपुढें गुडघे टेकून वंदन करावें लागतें. आतां राज–समारंभाला येणाऱ्या सर्वच स्त्रिया सीतासावित्रीचा अवतार असतात असें कोणी समजत नाहीं. तथापि त्यांतल्या निदान ज्या कोणी खरोखरच शुद्धाचरणी असतील त्यांना सिम्पसनबाईसारखीच्यापुढें गुडघे टेकणें किती अपमानास्पद वाटेल याची कल्पना करतां येते !

## धाडसीपणाची परिसीमा

दुर्गुण झाकून ठेवून ढोंग करणें वाईट असलें तरी, दुर्गुण उजळ माथ्यानें निलाजरेपणानें मिरविणें हें त्याहून खचित अधिक वाईट होय, आणि केवळ प्रामाणिकपणाच्या नांवाखालीं त्या मिरवणुकीचें समर्थन होऊं शकत नाहीं. सिम्पसनबाईनें मिळविलेले घटस्फोट, खऱ्या असह्य दुःखांतून कशी तरी सोडवणूक करण्याच्या स्वरूपाचे नसून, ते तिच्या स्वैर विषयभोगेच्छू वृत्तीचे दर्शक होते, अशी इंग्लंडांतील जनतेची प्रामाणिक समजूत दिसते. दोन नवऱ्यांना सोडचिठ्ठी देऊन फिरून इंग्लंडची महाराणी होण्याची महत्त्वाकांक्षा धरणारी ही स्त्री खरी धाडसीच असली पाहिजे ! परवा नुकत्याच झालेल्या दुसऱ्या घटस्फोटप्रकरणीं तरी लोकांची अशी पक्की खात्री आहे कीं, एडवर्डशीं सूत जुळल्यानंतर राज्ञीपदाच्या लोभानें या बाईनें बनावट कारवाई करून तो घटस्फोट मिळविला. त्यांत एडवर्डचेंहि अंग होतें अशी समजूत आहे. आणि किळस आणण्यासारखी गोष्ट ही कीं, बाईचा नवरा या प्रकरणांत सामील असल्यानें त्यानें घटस्फोटाला साहाय्य केलें !

अशी या प्रकरणांतली विषाद उत्पन्न करणारी अंतस्थ माहिती असल्याशिवाय मुख्यप्रधान मि. बाल्डविन यांनीं राजाला दिला तो निष्ठुर सल्ला दिला नसता. आणि पार्लमेंटनें प्रधानाला पाठबळ दिलें नसतें. एडवर्ड राजानें हें प्रकरण आपल्यातर्फे नेटाला लावावें असें सुचविणारेहि कांहीं हितचिंतक त्याला भेटले. परंतु मला वाटेल तें मी करीन, तुम्हाला वाटेल तें तुम्ही करा, असें म्हणण्याचें धैर्यहि या तडफदार प्रेमवेड्याला झालें नाहीं ! तो तसें करता तर प्रेमस्वातंत्र्यासमवेत नवमतवादाचा लढाहि त्याला लढून रंगवितां आला असता.

## न लढतां पडला !

जो राज्यत्यागाला मनानें सिद्ध त्याला थोड्याशा लोकमताच्याहि बळावर प्रधानमंडळाला बडतर्फ करून, नव्या निवडणुकी करायला भाग पाडून, गोंधळ माजवून, इंग्लंडच्या अलिखित राज्यघटनेची सत्त्वपरीक्षा तरी खचित करतां आली असती. प्रधानमंडळाला जो 'डेडलॉक' करतां येतो तो काय स्वतः राजाला करितां येणार नाहीं ! पण तें चातुर्य एडवर्डच्या अंगीं नव्हतें. तात्पर्य, धड असें त्यानें कांहींच केलें नाहीं. यामुळें त्याच्या राज्यत्यागाला यावें तसें उज्ज्वल स्वरूप आलें नाहीं.

असो. इंग्लंडच्या राजपदाचें भविष्य कांहींहि असो. कम्युनिस्ट मि. मॅक्स्टन यांनीं परवा पार्लमेंटमध्यें म्हटल्याप्रमाणें, इंग्लंडच्या राजपदाचे दिवस लवकरच संपणार असतील, व तेथें रिपब्लिक प्रस्थापित होणार असेल, तर त्यांत कोणाला वाईट वाटण्याचें कारण नाहीं. पण तें राजपद शिल्लक आहे तोंपर्यंत त्याची प्रतिष्ठा योग्य रीतीनें संभाळली जावी याविषयीं मात्र कुणाचाच मतभेद होणार नाहीं.

शालजोडीला घोंगडीचें ठिगळ शोभत नाहीं, हा आग्रह औचित्याच्या कोणत्याहि कल्पनेला धरूनच आहे. कोणा तत्त्वनिष्ठानें मुळांत शालजोडीलाच विशेष किंमत न दिली तर त्यांत चूक होणार नाहीं. किंबहुना, वेलबुट्टीदार शालजोडीपेक्षांहि जाड्याभरड्या कांबळ्यानें थंडी अधिक निभावते ! पण शालजोडीला एकदां 'महावस्त्र' हें नांव देऊन भूषविलें म्हणजे मग त्या वस्त्राची प्रतिष्ठा त्याच्या थोरपणाप्रमाणेंच संभाळली पाहिजे !

---

## १०९. इंग्लंडच्या राजपदाची चिकित्सा

लेखांक १ ला

इंग्लंडच्या राजपदावरचा जुना राजा जाऊन, त्या जागीं नवा राजा आला आहे. जुन्या राजानें आपल्या वेळीं जी शपथ राजधर्माची घेतली, तीच नव्या राजानेंहि घेतली आहे. तिचें तात्पर्य इतकेंच कीं, 'आज जी राज्यघटना अस्तित्वांत आहे, ती मी मान्य करून तिजप्रमाणेंच वागेन. तिच्याशीं बेइमान होणार नाहीं.' परंतु ही राज्यघटना, विशेषतः तिच्यांतील राजधर्माचीं कलमें इतकीं अस्पष्ट व गुंतागुंतीचीं आहेत कीं, तीं उलगडून त्यांतून कांहीं नक्की सिद्धांत मांडणें हें फार कठीण काम होऊन बसतें. 'घटना' म्हटली म्हणजे एका किंवा अनेक कायद्यांनीं स्पष्ट शब्दांत तिचा उल्लेख केलेला असेल अशी कल्पना होते. पण वस्तुस्थिति तशी नाहीं. या घटनेला कायद्यांच्या शब्दांचा जितका आधार आहे त्यापेक्षां गर्भित समजुती, संकेत व परंपरेनें मान्य होत आलेले दाखले यांचाच आधार अधिक आहे. या समजुती, हे संकेत व हे दाखले सामान्यतः अमलांत येतात त्याचें श्रेय दुतर्फा—म्हणजे राजा, प्रधानमंडळ व पार्लमेंट यांच्यामध्यें—समप्रमाण वांटून द्यावें लागेल असें कोणी म्हणेल. परंतु यांतील भलेपणाचा खरा वांटा बहुतेक अंशीं राजालाच द्यावा लागतो. कारण अति-

क्रमण होत असलें तर तें हळूहळू प्रधानमंडळाकडून होत आलें आहे, व तें अति-क्रमण सोसण्याचें काम मात्र राजानें भलेपणानें केलें आहे.

## राजाचा कोंडमारा

इंग्लंडच्या राजाच्या या भलेपणाबद्दल मोबदला म्हणून प्रधानमंडळ एक गोष्ट मात्र बिनचूक व हटकून करतें. ती ही कीं, कांहींहि करावयाचें आपल्या मनानें ठरविलें तरी शेवटीं तें राजाच्या संमतीनें, किंबहुना राजाच्या आज्ञेनें निदान परवानगीनें, आपण करीत आहों असें जगाला भासवून, वरकरणीं जितका बहुमान राजाला देतां येईल तितका देऊन, आज्ञाधारकत्वाचा जितका कमीपणा तितका सर्व प्रधानमंडळ आपणाकडे घेतें. परंतु पडद्या आड ज्यांना डोकावतां येतें त्यांना हें माहीत असतें कीं, वरून देखावा कसाहि असला तरी, राजानें सांगावें व प्रधानमंडळानें ऐकावें, यापेक्षां, प्रधानमंडळानें सांगावें व राजानें ऐकावें अशीच वस्तुतः अंतर्व्यवस्था असते. इंग्रज लोकांचा मायावीपणा शब्दाशब्दांतून हुडकून काढतां येतो. कारण ते सत्तेला 'जबाबदारी' हा प्रतिशब्द योजतात! आणि 'आज्ञा करण्या' ला 'आज्ञा पालन' हा प्रतिशब्द लावतात! अशी स्थिति असल्यामुळें सगळ्या ब्रिटिश राज्यांत खरा कोंडमारा जर कोणाचा होत असेल तर तो सर्वांत अधिक राजाचाच होतो.

## राजमुखाभोंवतालचें तेजोवलय

श्रीमंतांच्या घरीं गरिबांनीं वागण्याची रीत म्हणून शारदा नाटकांत अशी सांगितली आहे कीं, "डोळे असून पाहावयाचें नाहीं, कान असून ऐकावयाचें नाहीं, व तोंड असून बोलावयाचें नाहीं." पण इंग्रजी राजधर्माच्या आम्नायांत या गोष्टी गरिबानें करण्याच्या नसून राजपदस्थ श्रीमंतानें आपल्या घरीं करण्याच्या अशा ठरतात. हा सर्व मायावीपणा झांकण्याकरितां राजाला देव म्हणण्यापर्यंत प्रधानमंडळाची तयारी असते! जुन्या कल्पनेप्रमाणें, देवाचें चित्र काढतांना त्याच्या चेहऱ्याभोंवतीं एक तेजोवलय काढण्याची रीत आहे. हें तेज देवतेच्या खास अंगचें असून, त्यांतून कोणालाहि प्रवेश करतां येत नाहीं. पण विलायती राजवटीच्या चित्रालयांत बाहेरून असें चित्र दिसत असतें तरी अंतःस्थिति अशी आहे कीं, या तेजोमंडळाचे किरण किंवा काटे बाहेर लोकांकडे नसून त्या चक्राचें तोंड आंत राजाकडेच वळलेलें आहे. यामुळें राजाला आपली मान हलवा—डोलवावयाला—अर्थात् 'नाहीं' 'होय' म्हणण्याच्या मोकळीकीला—फारच

थोडी जागा उरते. पाणीदार घोड्याला तोंडांतील काटेलगामाचें जें दुःख तेंच, इंग्लंडच्या एकाद्या स्वाभिमानी राजाला, विद्यमान राज्यघटनेचें म्हणजे राजधर्माचें होत असल्यास नवल नाहीं.

## राजदेवतेची सगुणपूजा

राजाची सगुणपूजा करण्याला प्रधानमंडळ केव्हांहि कमी करीत नाहीं. पण उत्सवमूर्तीपलीकडे राजाला खरें महत्त्व नाहीं. उत्सवमूर्ति बाहेरच्या देव्हाऱ्यांत किंवा पालखींत बसली म्हणजे ती चकचकीत दिसते. पण तो चकचकीतपणा अंगीं येण्याच्या कामीं अंतर्गृहांत पुजाऱ्याच्या राकट हातातें आपल्या अंगावर किती ओरखडे काढून घ्यावे लागतात, व आंबट चिंचेचा कोळ किती सेवावा लागतो हें त्या उत्सवमूर्तीलाच माहीत. सगुणपूजेच्या उपचारांत पुजाऱ्याच्या भाविकपणापेक्षां आपल्या वैभवाच्या व श्रीमंतीच्या अहंकाराचाच भाग अधिक असतो. देवाला जो भोग चढविला तो शेवटीं पुजाऱ्याच्या घरींच जावयाचा! देवाला पंचामृताचा अभिषेक केला तर पूजाऱ्याचेंच तीर्थ गोड होतें. उदबत्त्या लावल्यानें सुगंधाचा लाभ पुजाऱ्यालाच होतो. आणि देवाचीं बहुमोल वस्त्रें व दागिने यांचें प्रदर्शन पाहून देवाच्या श्रीमंतीपेक्षां देवस्थानाची श्रीमंती, म्हणजे पर्यायानें देवस्थानाच्या मालकाची श्रीमंती, लोक वाखाणतात.

## जगूं दिलें हाच उपकार !

इंग्लंडचें प्रधानमंडळ किंवा प्रजाजन जेव्हां राजाचा बडेजाव करतात, तेव्हां तो तितकासा राजव्यक्तीचा नसून साम्राज्याच्या ऐश्वर्याचा बेडजाव असतो. इंग्रज लोक राजकारणांत मोठे शहाणे आहेत. यामुळें प्रजास्वातंत्र्य व राजसत्ता यांचा त्यांनीं आज दोनशें वर्षें बेमालूम मेळ घालून आजवर तो बिनबोभाट सांभाळलाहि आहे. हद्दपार झालेला जर्मनीचा कैसर बादशहा वुइल्यम, व सैबिरियांत सहकुटुंब कत्तल झालेला रशियन झार निकोलस, आणि जॉर्ज बादशहा आतेमामे भावंडाइतके जवळचे नातलग होते. असें असतां ह्या दोघांची शोकजनक स्थिति काय झाली? म्हणून इंग्लंडच्या राजाला आपली सत्ता कितीहि संपुष्टांत आली असें वाटत असलें तरी, आपल्याला राजपदावर टिकूं तरी दिलें एवढ्याबद्दलच कृतज्ञ राहणें हें आपलें कर्तव्य आहे असें वाटल्यास नवल नाहीं. आणि या पुढीलहि योग असा दिसतो कीं, इंग्लंडमध्यें उद्यां राज्यक्रान्ती झाली तरी ती जर्मनी किंवा रशिया यांतील राज्यक्रान्तीसारखी होणार नाहीं. झालीच

तर इटालींतल्या सारखी होईल. म्हणजे राजपद विरहित प्रजासत्ताक राज्य ( Republic ) न होतां प्रधानमंडळाच्याऐवजीं झोटिंगशाही अवतरेल ! म्हणजे आज जे अनेक प्रधानांचें मिळून मंडळ आहे, त्याऐवजीं एकच प्रधानव्यक्ति, मुसोलिनसारखी किंवा हिटलरासारखी, प्रभावी होऊन सर्व सत्ता बळकावून बसेल. आज इटालीचें नांव दिवसांतून शंभर वेळा घेण्याचा प्रसंग येत असतां, फक्त मुसोलिनीच्याच नांवाचा उल्लेख इटालीचें प्रतीक म्हणून ऐकण्यांत येतो. पण इटालीचा राजा व्हिक्टर इमन्युएल म्हणून कोणी आहे हें किती लोकांना माहीत असतें ? परंपरेचा अभिमान धरणें व प्रगतीला मान लववणें या दोन गोष्टींचा समन्वय इंग्लंड पुढेंमागें या फॅसिस्ट पद्धतीचा अवलंब करून घालील असा जाणत्या लोकांचा कयास आहे.

असो. इंग्लंडच्या राज्यघटनान्तर्गत राजपदाची स्थिति आज काय आहे हें वर स्थूलमानानें सांगितलें. तथापि थोडें सूक्ष्मांत जाऊन या घटनाआम्नायाप्रमाणें, इंग्लंडच्या राजाला, कायदा, संकेत व दाखले हीं तीनहि एकत्र लक्षांत घेऊन, काय करतां येतें व काय करतां येत नाहीं, याची थोडीशी फोड केल्यास ती बोधप्रद होईल म्हणून करीत आहे. त्यांतहि टीप ही समजावी कीं, राजाला अमुक करतां येईल असें सांगितलें तरी तें राजा करतोच, किंवा आजच्या स्थितींत करीनच म्हणेल, हें संभवत नाहीं. त्याला काय करतां येत नाहीं याचीं विधानें मात्र सर्वार्थांनीं खरीं म्हणून घेण्यास हरकत नाहीं.

## थोडा जुना इतिहास

सतराव्या शतकापर्यंत इंग्लंडचा राजा अगदीं स्वतंत्र व अनिर्बंध असा होता. तेराव्या शतकांत जॉन राजाकडून मॅग्नाचार्टाची सनद मिळवून प्रबळ सरदार लोकांनीं आपलें तेज थोडें प्रकट केलें. पण पुढें 'वॉर्स ऑफ धी रोझेस' नांवाची सरदार कुळांतील युद्धें होऊन, सरदार कुळें कमकुवत झालीं व राजा प्रबळ झाला. स्टुअर्ट–घराण्यांतील राजा आठवा हेन्री व राणी एलिझाबेथ व पहिला जेम्स यांच्या कारकीर्दींत अप्रतिबंध राजसत्तेची परिसीमा झाली. पण पहिल्या चार्लस राजाच्या कारकीर्दींत प्रजेनें राजाशीं युद्ध सुरू केलें, चार्लस राजाचा शिरच्छेद केला, व त्यानंतर दुसऱ्या जेम्सच्या कारकीर्दींत रक्तपात झाला नाहीं तरी क्रान्ति झाली. यानंतर लोकसत्तेचा पाया जो पुढें पडला तो आजवर कधीं मागें आलाच नाहीं. तिसरा वुइल्यम राजा हा बोलूनचालून परदेशी ! इंग्लिश राष्ट्रा-

च्या गरजेमुळें वुइल्यमला मुत्सद्द्यांनीं बोलावून आणून घरजांवई केला. पण त्याला व त्याच्या वंशजांना राजपद देतांना राजसत्तेचा मोबदला सर्वस्वीं आपल्या पदरांत पाडून घेतला.

## भक्तांचा प्रसाद पुजाऱ्यानें खाल्ला

या वेळीं झालेल्या क्रांतीचें वर्णन 'दि क्राऊन वॉज मेड. दी क्राऊन वॉज लिमिटेड. अँड दि क्राऊन वॉज पेड ' अशा शब्दांनीं–गमतीचें पण यथार्थ केलें जातें. त्याचा अर्थ हाच कीं, राजपद राहूं दिलें ही प्रजेनें कृपा केली. पण त्या राजपदाचे सर्व अधिकार हिरावून घेऊन, राजा म्हणजे एक बिनअवयवाचा गोळा असें करून ठेविलें. आणि अशा गोळ्यानें अपमान सोसून राजा म्हणून राहावें याकरितां त्याला पुष्कळसा तनखा कायमचा देऊन ठेविला ! अठराव्या शतकांत प्रधानमंडळ ही संस्था उदयास आली, व राजाकडून काढून घेतलेले अधिकार प्रजेच्या हातीं प्रत्यक्ष पडण्याच्या दरम्यान, प्रधानमंडळ त्या अधिकारांचा अपहार मधल्यामध्येंच करून बसलें. जबाबदारीच्या दृष्टीनें प्रधानमंडळ राजाच्या नांवानें कुंकू लावतें, पण नांदणूक व वागणूक सगळी मतदाररूपी प्रजेशीं करतें.

## साम्राज्याचा ' रबर स्टँप '

राजाच प्रधान नेमतो, प्रधानानें राजीनामा दिला म्हणजे तो राजाच्या हातींच जातो, एवढेंच काय पण पार्लमेंट बरखास्त होऊन एकहि प्रधान जागेवर उरलेला नसतो तेव्हां सर्व राजसत्ता नवें–जुनें होण्याच्या दरम्यान एकट्या राजाच्या हातीं जाते ! कारण गादीवर राजा नाहीं असें कधीं होत नाहीं. पण आपल्या जागेवर प्रधानमंडळ नाहीं असें मात्र कांहीं वेळ होऊं शकतें. परंतु या सत्तेचा उपयोग या अवधींत राजाला स्वतःच्या इच्छेनें फारसा करतां येत नाहीं. शेषाधिकारी या नात्यानें राजाच्या हातीं सर्व सत्ता या अवधींत जाते खरी; पण तिचा उपयोग फक्त बंद पडलेल्या पार्लमेंटाचें यंत्र व तंत्र फिरून नव्या निवडणुकींनीं चालू करण्यापुरताच करावयाचा असतो. आणि नवें पार्लमेंट व नवें मंत्रिमंडळ बनलें कीं फिरून राजाला पडद्याआड जावें लागतें. नाटकांत एक प्रवेश संपला म्हणजे पडद्याआड पुढच्या सीनची तयारी करणारा कोणी कामगार असतो, पण तो जसा नाटकाच

मालक नव्हे किंवा नाटकांतील पार्टीहि नव्हे, तसाच राजा समजावा. मात्र नर्वान प्रवेशाची मांडामांड नाटकांतल्याप्रमाणें गुप्तपणें न होतां राजा ती उघडपणें घडवीत असतो. आणि जुन्या प्रधान–मंडळानें जें केलें तेंच नवें प्रधान-मंडळ फिरून करूं लागतें. म्हणजे राजाचें नांव, एखाद्या रबर–स्टँपासारखें, आपल्या स्वतःच्या हुकुमावर छापून उठवून सगळा कारभार करूं लागतें. पूर्वी आम्हीं राजाला उत्सवमूर्तीची उपमा दिली तशीच इतर कोणी त्याला रबर-स्टँपाची उपमा देतात! रबर–स्टँपावर नांव राजाचें, मुखवटा राजाचा, पण तो हुकमाच्या कागदावर उमटवतांना स्वतः राजाला मात्र विचारीत नाहींत. पुराणान्तरीं लिहिलें आहे कीं श्रीरामाचें नांव लिहिलेले दगड समुद्रावर तरले. पण स्वतः रामानें हातानें उचलून टाकलेले दगड बुडत. त्याचप्रमाणें प्रधान-मंडळानें राजाच्या नांवानें काढलेले हुकूम सर्वस्वीं प्रभावी ठरतात. परंतु व्यक्तिशः राजा मीं अमुक एक हुकूम केवळ आपल्या इच्छेनें फर्मावीन म्हणेल तर तो हुकूम चालणार नाहीं.

## राजाला व्यक्तिशः म्हणून गुन्हेगारी नाहीं !

एखाद्या इसमानें, म्हणजे उदाहरणार्थ राजाच्या हस्तकानें एखादा गुन्हा केला आणि कोर्टापुरतें असें सांगितलें कीं, "खुद्द राजानेंच मला आज्ञा केली म्हणून मीं तें कृत्य केलें हो" तरी त्यामुळें त्याचा बचाव होणार नाहीं. कोर्ट त्याला गुन्हेगार ठरवून शिक्षा देईल. कदाचित् एकच गोष्ट घडूं शकेल ती अशी कीं, स्वतः राजानें आपल्या हातांत पिस्तूल घेऊन मुख्य प्रधानाचा खून केला, तरी त्याचा इन्साफ करण्याचा अधिकार कोणत्याहि न्यायकोर्टाला नाहीं म्हणून त्याच्यावर खटला होणार नाहीं! पण खटला न झाला तरी प्रक्षुब्ध लोक-मतामुळें त्याला आपल्या राजपदाचा त्याग करावा लागेल. चतुर्थाश्रम घेतल्यानें ब्राह्मणाचा सांसारिक ( सिव्हिल ) मृत्यु झाला असें कायदा मानतो, त्याप्रमाणें राजानें राजपदाचा त्याग केल्यामुळें त्याचा राजकीय संसारांतील मृत्यु घडला असें समजून, त्याच्या वारसाला गादीवर बसवून द्वाही फिरवतां येईल.

असो. इंग्लंडाच्या राजाला कोणते अधिकार आहेत याचा तीन दृष्टींनीं विचार करावा लागतो तो पुढील लेखांत करूं.

## लेखांक २ रा

राजाला काय करतां येतें किंवा करतां येत नाहीं असें म्हटलें म्हणजे,

त्याबरोबर स्वतंत्रसत्तेनें हे शब्द मनांत ठेवूनच असेल तें म्हणण्यांत खरं स्वारस्य आहे. एरवीं सत्तेशिवाय केवळ वजनदारी, भीडमोहबत, यांच्या उपयोगानें राजाला मनांतली एखादी गोष्ट प्रधानमंडळाकडून करून घेतां येणें अगदीं अशक्यच आहे असें कसें म्हणतां येईल ? या त्रिविध शक्ती खाजगी संबंधांतहि थोड्याफार प्रभावी होऊं शकतातच कीं नाहीं ? अशा संबंधांत कोण कोणाचें किती ऐकेल हें परस्परांच्या इच्छाशक्तीच्या प्रबळते–दुर्बळतेवर अवलंबून असणार हें उघड आहे. पति व पत्नी, आईबाप व मुलें, स्नेही व स्नेही, दुकानदार व गिऱ्हाइक, वादी व प्रतिवादी, मालक व नोकर–अशांच्या दरम्यान मतभेद किंवा हक्कप्रस्थापनेचे प्रयत्न, किंवा आपणांला सौदा अथवा करार किफायतशीर करून घेण्याचे प्रयत्न, युक्तिवादानें किंवा मनधरणी करून दुसऱ्याला वश करून घेण्याचे प्रयत्न–इत्यादींना भांडणें किंवा युद्धेंच म्हणावें लागतें. या युद्धांत किंवा सामन्यांत मतभेद देवघेवीनें पुष्कळदां मिटतातहि. कारण ते पराकाष्ठेला नेऊन भिडविले तर परिणाम वाईट होतात. आपलेंच म्हणणें तडीस नेल्याच्या आग्रहापासून होणारा लाभ, आणि भांडण विकोपाला गेल्यामुळें होणारी हानि, यांच्यांतलें तारतम्य सामान्य प्रतीचा समंजसपणा अंगीं असणारे लोक प्रायः ओळखतात. आणि जेथें हें तारतम्य सुटतें तेथें त्या संबंधांत खाजगी नात्यांतहि क्रांतिच घडून येते.

## राजकारण व व्यवहार

साम दाम यांची शिकस्त झाली म्हणजे शेवटीं दंड व भेदच उरतात; व त्यालाच क्रांति म्हणतात. पतिपत्नीच्या संबंधांत भांडण विकोपाला गेलें म्हणजे काडीमोड-घटस्फोट होणें; बाप व मुलें विभक्त होऊन वेगळीं राहूं लागणें; करार किंवा सौदा बिघडल्यानें दुकानदार व गिऱ्हाइक यांनीं एकमेकांकडे पाठ फिरवून आपला मार्ग सुधारणें; मालकानें नोकराला कामावरून काढणें; किंवा नोकरानें नोकरी सोडून निघून जाणें; स्नेह्यांनीं एकमेकांचीं तोंडें न पाहण्याची शपथ घेणें किंवा अबोला धरणें;–म्हणजे ती ती एक प्रकारची क्रांतिच नव्हे काय ? अशा क्रांत्या खाजगी संसारांत किंवा अर्धवट सार्वजनिक संसारांत नित्य किती तरी घडून येत असतात. आणि कालांतरानें पण सूक्ष्मपणें या क्रांतीचा परिणाम समाजावरहि होऊन, समाजस्थिति ( म्हणजे सुधारणा किंवा कुधारणा वाटेल ती म्हणा ) घडून आल्याशिवाय राहात नाहीं. पण राजा व

प्रधानमंडळ यांच्यांतील भांडण विकोपाला जाऊन क्रांति होणें ही गोष्ट परिणामाच्या दृष्टीनें फारच मोठी, किंवा एकंदर राष्ट्राच्या हिताला विघातक, ही जाणीव उभयपक्षीं असल्यामुळें एक दुसऱ्याला हार जाऊनच या मतभेदाच्या भेगा लिंपल्या जातात.

## एक विनोदी गोष्ट

पण हा सर्व व्यवहार फार गुप्तपणें होतो; व शेवटीं निकाल फर्माविला जातो तो राजाच्या नांवानें. यामुळें बाहेर असा समज होतो कीं, जें झालें तें व्हावें अशी राजाचीच इच्छा होती किंवा मतभेद झाला तेव्हां प्रधानमंडळानेंच हार खाल्ली. म्हणूनच फर्माविल्या गेलेल्या हुकुमाला राजाची संमति मिळाली व त्याच्या नांवानें जाहिरनामा निघाला! परंतु निदान शेंकडा पंचाण्णव प्रसंगीं तरी या भांडणांत मतभेदांत राजालाच हार खावी लागत असेल, आणि प्रधानमंडळाचाच जय होत असेल, हें कोणाहि चाणाक्ष मनाला सहजच कळून येण्यासारखें आहे. एक विनोदी गोष्ट सांगतात ती अशी—"एका कुटुंबांतील नवरा मेंगा, शिळपट व बायको जहांबाज होती. एक दिवस त्यांच्यांतलें भांडण वर्दळीला येऊन बायकोनें नवऱ्याला खालीं पाडून, ती त्याच्या पाठीवर बसून त्याला गुद्दे मारीत होती! पण नवरा सूज्ञ अब्रू संभाळून घेणारा! म्हणून तोच बायकोच्या दर गुद्यागणिक मोठ्या आवेशानें ओरडून म्हणे कीं, "बोल, करशील, असें पुनः करशील! याद राखून ठेव" हें भांडण बाहेर ऐकूं गेल्यामुळें शेजारी तें सोडवावयाला गेला. पण दाराला कडी होती म्हणून तो झरोक्यांतून पाहूं लागला तों खरा प्रकार नजरेस आला! गोष्ट ग्राम्य खरी, पण राजा व प्रधानमंडळ यांचे आजचे खरे संबंध व्यक्त होण्याला ती फार उपयोगी पडण्यासारखी आहे म्हणूनच सांगितली.

## रस्सीखेचीचा सामना

पूर्वी एक वेळ अशी होती कीं, प्रधानावर राजाचा राग झाला म्हणजे राजा त्याचे नाक कान छाटी किंवा डोकेंहि मारी. हल्लीं हे प्रकार होणें अर्थातच अशक्य झालें आहे. पण गैरमर्जी झाली म्हणून प्रधानाला कामावरून दूर करणें हा राजाचा म्हणजे मालकाचा स्वयंसिद्ध अधिकार तरी त्याच्या हातचा गेला नाहींना असें कोणास वाटेल! पण तेंहि खरें नाहीं. याचें एक कारण असें

कीं, हल्लीं पूर्वीप्रमाणें राजाचा एकच प्रधान व सर्व खात्यांचा मिळून त्यालाच मुख्याधिकार अशी स्थिति राहिलेली नाहीं. राज्यकारभाराची सुधारणा व परिणति होऊन, कारभार विस्तार पावल्यानें खातेवारी होऊन, पूर्वीच्या अष्टप्रधानमंडळानेंहि भागत नाहींसें होऊन, सुमारें वीस प्रधान नेमावे लागतात. या सर्वांचें मिळून एक मंडळ किंवा गट तयार होतो. आणि राजा व हें प्रधानमंडळ यांचा बेबनाव होऊन गोष्ट निकरावर आली असतां, एकटा असहाय्य राजा एकीकडे आणि हें वीस प्रधानांचें टोळकें दुसरीकडे, असा विजोड सामना उपस्थित होतो. पण एवढ्यानेंहि भागत नाहीं. कारण प्रधानमंडळाला पार्लमेंटांतील बहुमताचा आधार असतो आणि पार्लमेंटच्या नाडीवर हात ठेवूनच प्रधानमंडळ वागत असल्यानें राजाशीं मतभेद झाला असतां एकाद्या मुद्यावर ठाण मांडून कुस्तीच्या पवित्र्यावर त्याला उभें राहतां येतें. मग हें भांडण म्हणजे ती एक रस्सीखेंचच होय. पण या सामन्यांत कोण हरेल, कोण जितेल हें सांगणें नको. मात्र या खेचींतील रस्सी ही दोरखंडाइतकी टणक नाहीं. ती एकाद्या रेशमी तंतूइतकी नाजूक असते. आणि तो धागा अखंड राहण्यावर राजपद अवलंबून असल्यामुळें " कच्चा धागा प्रेमका मत् खैंचो तुट जाय " असें प्रधानमंडळ राजाला जाणवीत असतें.

## व्यवहार कसा चालतो ?

प्रधानमंडळापैकीं एखाद्या व्यक्तीचें धोरण फारच अप्रिय किंवा चुकीचें ठरलें तरी प्रधानमंडळाची जबाबदारी सामुदायिक असल्यामुळें, सर्व प्रधानमंडळ मिळूनच त्या अप्रियतेचा भार आपल्या शिरावर प्रायः घेतात. पण एकादे वेळीं असेंहि घडू शकेल कीं एकंदर प्रधानमंडळानें राजीनामे दिले असतां होणारी खळबळ आपल्या पक्षालाच फायदेशीर नाहीं असें दिसून आल्यास ती प्रधान व्यक्ति आपल्या एकट्याचा राजीनामा पटण्याचा आग्रह धरून, स्वाभिमान व दूरदर्शीपणा हे गुण प्रगट करते; किंवा प्रधानमंडळ त्याला खाजगी सल्ला देऊन त्याचा एकट्याचा राजिनामा पटवितें. पण ही त्यांच्या त्यांच्यांतली गोष्ट झाली. तथापि जेव्हां राजा व संयुक्त प्रधानमंडळ यांच्यांत बेबनाव उत्पन्न होतो व सर्व प्रधान व्यक्ती एकाच मताच्या असतात तेव्हां राजानें हार खाणें एवढाच उपाय शिल्लक राहतो. येऊनजाऊन राजा नाराज झाला तरी

काय करणार ! तो एखादद्दुसऱ्या प्रधान व्यक्तीला जेवायखायला बोलावणार नाहीं, त्याच्याशीं खासगी रहस्य ठेवणार नाहीं, त्याचें ऐकून एखाद्या खाजगी नोकराची बहालीबडतर्फी करणार नाहीं, फार तर त्याला राजमान्यतेची पदवी देऊं नये, असा क्षुद्र आग्रह धरून तो चालवीलहि. पण मुद्द्याच्या महत्त्वाच्या गोष्टींत आपली नाराजी त्याला अधिक परिणामकारक रीतीनें प्रगट करतां येत नाहीं.

## पायां पडणें कीं चिमटे घेणें

प्रधानमंडळाच्या या जबरदस्त सत्तेला अनुलक्षून एका लेखकानें इंग्लंडच्या राज्यघटनेला ' सप्रतिबंध राज्यपद्धति ' असें न म्हणतां ' प्रधानमंडळनिष्ठ प्रजासत्ताक पद्धति ' असें नांव सुचविलें आहे. वस्तुस्थितीच्या दृष्टीनें हें नांव अगदीं यथार्थ आहे. तथापि इंग्रज लोक इतके चतुर, व्यवहारकुशल, व बहाणें रंगविण्यांत इतके निष्णात आहेत कीं बिनमहत्त्वाचे असे सर्व प्रसंग साधून किंवा नवेहि उत्पन्न करून ते बाहेर जगाला राजाचें वैभव व त्याचा दिखाऊ सत्ताधीशपणा हीं निरनिराळ्या रीतींनीं नजरेस पडावीं अशी कारवाई करितात व वर्तणूक ठेवितात. आंतून प्रधानमंडळ राजाच्या पायाला चिमटे घेण्याला हात पोंचावे म्हणून, किंवा त्याच्या पायाचीं तीक्ष्ण नखें वरचेवर काढून टाकावीं म्हणून खालीं वाकून पायाला हात लावीत असतें. पण इकडे खुळें जग मात्र असें म्हणत असतें कीं "पहा, इंग्लडचें प्रधानमंडळ किती राजनिष्ठावंत, विनयशाली व अदबशीर आहे तें ! "

## न्यायखात्यांतील सत्ता

न्यायदान हें सर्वांत राज्यकारभाराचें महत्त्वाचें अंग होय. हें सर्व काम राजाच्या नांवानें चालतें. इतकें कीं, फौजदारी फिर्यादी कामांत फिर्यादी म्हणून खुद्द राजा बादशहा ( मात्र त्याचें व्यक्तिनांव घालीत नाहींत ) हा पक्षकार म्हणून नोंदला जातो ! राजाच्या नांवानें न्यायाधीश नेमले जातात. परंतु लॉर्ड चॅसेन्लर, हौस ऑफ लॉर्डचा अध्यक्ष हें काम परस्पर निकालांत काढतो. आणि ' चॅन्सेलर यांच्या सल्ल्यावरून राजेसाहेबांचा हुकूम ' अशा अर्थाचा शेरा लिहून त्याजवर राजाचा शिक्का केला जातो. हा शिक्का राजाकडे असत नाहीं, चॅन्सेलरच्या कचेरींतच नेहमीं असतो. जुन्या चॅन्सेलरचा राजीनामा

आणि नव्याची नेमणूक अशा वेळीं त्या शिक्क्याचा चार्ज औपचारिकरीत्या दिला–घेतला जातो. न्यायकोर्टांचें काम चालविण्याचे कायदे पार्लमेंट करतें व पोटनियम वरिष्ठ कोर्टें करतात. घेऊन जाऊन शिक्षा झालेल्या कैद्याला माफी देणें हा अधिकार कायदेकानूंत नमूद नसून तो सर्वस्वीं राजाचा आहे. तथापि तोहि होम सेक्रेटरीच बजावतो. राजाला विचारीत नाहीं! न्यायकारभाराच्या कामीं राजाचा प्रत्यक्ष संबंध इतका थोडाच आहे.

## कायदा करण्याची सत्ता

कायदे करणें हें सर्व पार्लमेंट करतें. या पार्लमेंटची बैठक भरविणें किंवा बरखास्त करणें हे अधिकार सकृद्दर्शनीं राजाचे आहेत. त्यावरून कोणाला वाटेल कीं, हा फारच मोठा अधिकार झाला. परंतु अमुक दिवसांनीं नवें पार्लमेंट भरवावें हा अधिकार पार्लमेंटच्या कायद्यांनीं मर्यादित केला गेला आहे. तो असा कीं, अमुक इतक्या वर्षांनीं पार्लमेंट बरखास्त केलीच पाहिजे. शिवाय दरवर्षी पार्लमेंटची बैठक भरलीच पाहिजे. एरवीं राज्यकारभाराच्या खर्चांची एक पैहि मंजूर होणें शक्य नसतें. दरम्यानच्या बैठकीच्या तारखा मागेंपुढें करणें हें देखील प्रधानमंडळाच्या सोईप्रमाणेंच बहुधा होतें. नवें पार्लमेंट खुलें करावयाचें असतां राजाला जातीनें हजर रहावयाचें असेल तरच त्याच्या संमतीनें सोईनें तारखा ठरत असतील. पांच वर्षांच्या मुदतींत आधींच पार्लमेंट बरखास्त करण्याचा अधिकार राजाला आहे. परंतु ही गोष्टसुद्धां प्रधानमंडळाच्या संमतीशिवाय होऊं शकत नाहीं. राजाला द्यावयाचा वार्षिक तनखा दरवर्षी पार्लमेंट ठरवितें. इंग्रज लोकांच्या शहाणपणामुळें, म्हणजे प्रजास्वातंत्र्याचा त्यांचा हक्क ते अजून जहालपणें बजावूं न लागल्यामुळें, राजाच्या तैनातींत ते काट सुचवीत नाहींत. एवढीं रणें इतर प्रश्नांवर माजतात, प्रधानमंडळाची उलथापालथ होते, पक्षोपपक्षांची घालमेल होते, परंतु राजा व त्याचा परिवार यांची तैनात व तनखा यांवर पार्लमेंटांत आजवर कधींहि वाद झालेला नाहीं. केर हार्डी यांनीं एक वेळ म्हटल्याप्रमाणें, कदाचित् राजाचा मुगुट जायचा तेव्हां एकदांच मोडीला जाऊन वितळविण्यांत येईल, पण तो तसा जात नाहीं तोंपर्यंत त्याच्यावरचा हा एक हिरा काढून घ्या, तें एक सोनेरी शिखर कमी करा, असल्या सूचना न करण्याचें शहाणपण जहाल राजकारणी किंवा क्रांतिकारक इंग्रजहि दाखवितात. मात्र राजमुगुट

याचा लाक्षणिक अर्थ राजाच्या सर्व अधिकारांचा समुच्चय असा घेतला तर त्या मुगुटावर मात्र वरील प्रकारची कुरतुडणी हळूहळू चालूच असते.

कायदा न करतां केवळ संकेतानें पायंडा पाडीत व दाखले निर्माण करीत राजाच्या वरील अधिकारांपकीं एकेक अधिकार प्रधानमंडळानें कमी करीत आणला आहे. पार्लमेंटचें वरिष्ठ सभागृह म्हणजे हौस ऑफ लॉर्डस. लॉर्ड ही पदवी पावलेल्या लोकांचीच मुख्यतः सभा आहे. (मात्र लॉर्ड नसलेले कांहीं धर्माधिकारीहि तेथें बसतात.) आणि लॉर्ड करण्याचा अधिकार कोणत्याहि कायद्यांत नसलेला असा सर्वस्वीं राजाचा म्हणून मान्य करण्यांत येतो. एखाद्या व्यक्तीला हा बहुमान द्यावयाचा तर राजा ती गोष्ट आपल्या आग्रहानें करूं शकेल. परंतु एखादें बिल आवडतें म्हणून लॉर्डांच्या सभेंत पास करून घेणें, किंवा नावडतें म्हणून फेटाळून लावणें याकरितां—म्हणजे कृत्रिम बहुमत निर्माण करण्याकरितां—राजा जर मी हवे तितके नवे लॉर्ड निर्माण करीन असें म्हणेल तर ती गोष्ट मात्र होणार नाहीं. कायदे कानूसंबंधानें सकृद्दर्शनीं एक मोठा अधिकार राजाला आहे तो 'नकार' देण्याचा. कोणतेंहि बिल पास व्हावयाचें. म्हणजे अंमलांत यावयाचें तर पार्लमेंटच्या दोनहि सभांप्रमाणें राजाचीहि त्याला संमति लागते. मग ही संमति राजानें नाकारली तर! या प्रश्नाचें कायदेशिर उत्तर नाहीं. पण आडमुठेपणाचें उत्तर असें कीं, प्रधानमंडळानें पास करून घेतलेलें बिल राजा नामंजूर करील तर प्रधानमंडळ राजीनामे देईल, व त्या भीतीनें राजाला संमति देणेंच प्राप्त आहे.

## अंमलबजावणीची सत्ता

कायदे करण्याच्या अधिकाराची ही गोष्ट झाली. आतां अंमलबजावणीच्या अधिकाराविषयींचें पाहूं. अधिकारबजावणीचें मुख्य वरिष्ठ यंत्र प्रधानमंडळ. या प्रधानमंडळ संस्थेला कोणत्याहि कायद्याचें अधिष्ठान नाहीं. परंतु ती आज दोनतीनशें वर्षें अमलांत असून दिवसेंदिवस अधिक प्रबळच होत चालली आहे. एकदां कायदा पास झाला म्हणजे मग त्यांची अंमलबजावणी करणें ही गोष्ट सहजच गौण किंवा दुय्यम दर्जाची ठरते. आणि अशा 'तपशीलाच्या कामांत राजानें लक्ष घालणें हें त्याला शोभत नाहीं' अशा भलेपणाच्या शब्दांनींहि राजाच्या अधिकाराचा परिहार करतां येतो. प्रधानमंडळ

नेमणें ही गोष्ट स्वतः कोणत्याहि कायद्याच्या अंमलबजावणीनें होऊं शकत नाहीं. पण सत्तेची वाफ तयार होऊन राहिलेलें एंजीन चालूं लागण्याकरितां कोणी तरी त्यांतील लिव्हरचें दांडकें प्रथम एकदां हलवावें लागतें, तें राजा प्रधानमंडळ नेमून व आपला शिक्कामोर्तब त्याच्या स्वाधीन करून करतो. खातेवार प्रधानांची नेमणूक झाली म्हणजे त्या खात्यांतील वाटेल तें काम राजाच्या नांवानें, पण वास्तविक संयुक्त प्रधानमंडळाला अखेर नापसंत न होईल अशा धोरणानें, करण्याचा अधिकार प्रत्येक प्रधानाला आपोआप प्राप्त होतो.

## परराष्ट्रीय राजकारण

परराष्ट्रीय राजकारण ही वास्तविक सर्वांत अत्यंत महत्त्वाची बाब. पण नक्की याच बाबतींत परराष्ट्रांशीं तहाचीं खलबतें करणें व कलमें ठरविणें, किंवा युद्धाची डांबरबत्ती पेटविणें, या गोष्टी पार्लमेंटलाहि न विचारतां करण्याचा अधिकार प्रधानमंडळाला असतो. पण उलट परदेशीं जाणें, विशेषतः परराष्ट्रांतील राजे मुत्सद्दी यांच्याशीं राजकारणी सल्लामसलत करणें, या बाबतींत राजावर प्रत्यक्ष निर्बंधच आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. राजा पुढें केला असतां आपलें परराष्ट्रीय धोरण अधिक यशस्वी होईल असें प्रधानमंडळाला वाटेल तर मात्र तें राजाला तशी विनंति करील; व मग सांगकाम्या म्हणून राजा तें काम करील. मग त्यांत त्याचें बुद्धिस्वातंत्र्य किंवा आवडनिवड काय प्रगट होईल तेवढीच.

## राजाची काल्पनिक सत्ता

केवळ तात्त्विकदृष्ट्या पाहिलें तर खालीलप्रमाणें मौजेचें विधान बिनहरकत करतां येईल. "सर्व सैन्यच्या सैन्य बरखास्त करून सैनिकांना घरोघर निघून जाण्यास राजाला सांगतां येईल. कारण राजाला अमुक एका मर्यादेपलीकडे खडें सैन्य ठेवण्याचा अधिकार नाहीं; परंतु मी एकहि शिपाई उरूं देणार नाहीं असें राजानें म्हटलें तर सैन्य ठेवण्याची बळजबरी त्याजवर कोणालाहि करतां येत नाहीं. तसेंच खातेवारीनें सगळे अधिकारी राजाला काढून टाकतां येतील. मग तो मुख्य प्रधान किंवा मुख्य सेनापतिहि असो. सर्व लढाऊ जहाजें, आरमारी गलबतें, बंदरें, बराकींच्या इमारती व लष्करी सरंजाम विकून

टाकण्याचें राजानें मनांत आणलें तर त्याचें तसें करणें ‘ कायदेशीर ’ होईल. एखादी लढाई चालू असतां परस्पर इंग्लंडचा एखादा प्रांत किंवा एखादी वसाहत देऊन टाकून राजानें तह करणें ‘कायदेशीर’ होईल. राज्यांतल्या प्रत्येक मनुष्याला लॉर्ड ही पदवी राजाला देतां येईल. प्रत्येक गांवगन्ना युनिव्हर्सिटी स्थापण्याचा चार्टर राजाला देतां येईल. त्याला सगळे सिव्हिल सर्व्हंट काढून टाकतां येतील. तुरुंगांतल्या सगळ्या कैद्यांना माफी देऊन तुरुंग ओस पाडतां येतील. वाटेल तेथें बिशप किंवा पाद्री हवे त्या मताचे नेमतां येतील आणि राज्यांतील प्रत्येक कुत्र्याच्या तोंडाला मुसकें घातलेंच पाहिजे असा हुकूम त्याला काढतां येईल ! ” वरील विनोदी वर्णन बेजहॉट नामक एका विख्यात लेखकानें केलेलें आहे. पण त्याचा हेतु केवळ कल्पना करून ( आणि लो. टिळकांनीं म्हटल्याप्रमाणें एक पैशाची भांग घेतली असतां हव्या त्या कल्पना करतां येतात ! ) राजाच्या अधिकाराच्या बाबतींत कायदेशीर व बेकायदेशीर काय याच्या सूक्ष्म मर्यादा खुलासेवार सांगणें इतकाच आहे. तात्पर्य, बेकायदेशीर असेल तर तें राजा करूं सांगूं शकत नाहीं हें तर ब्रह्मदेवानेंच सांगितलें ! पण जें कायदेशीर असेल तेंहि राजा करील कीं नाहीं याचा विचार शक्य व अशक्य याच्या व्यावहारिक तारतम्यानेंच करावा लागेल.

---

## ११० रुपयाचा भाव किती पेन्स हवा !

परवां मोती चौकांतील सराफ बाजारांत लक्ष्मीपूजनाच्या पानसुपारीला गेलों. पेठेंत आमंत्रणें दोनच होतीं. मला जाण्याला थोडासा उशीर झाला म्हणून आमंत्रणाच्या पहिल्या दुकानीं गेलों तों प्लेगमुळें शेठजी लक्ष्मीपूजन आटोपून गांवाबाहेरच्या बंगल्यावर निजावयाला गेलेहि होते ! मुनीम होता. त्यानें पानसुपारी दिली. ती घेऊन उरल्या आमंत्रणाच्या दुकानीं गेलों. मोहनशेठ मोठे निष्ठावंत. ते दरसालाप्रमाणें ठाकठीक रोषनाई करून, बैठक सजवून वह्या मांडून थाट करून बसले होते. पण प्रत्यक्ष पानसुपारीची गर्दीधांदल अशी कांहीं नव्हती. पानसुपारी घ्यावयाला आलेला इसम मी एकटा आणि ती वांटणारे तिघे असा प्रकार होता ! शेटजी व त्यांचा मुलगा लाला व त्यांचा कारकून

हे ते तिघे आणि मी चौथा ! यंदा प्लेगमुळें सगळी गर्दी हटली. पण माझ्या- प्रमाणें शेठजीहि टोंचून घेऊन गांव न सोडण्याच्या निश्चयानें राहिले होते. त्यांनाहि भरपूर वेळ व मलाहि भरपूर वेळ ! म्हणून पानसुपारीनंतर जेठा मारून विडे करून खात गप्पा मारीत बसलों. शेठजींनाहि मी बैठक मारून बसलेला, पाहून फार बरें वाटलें. कारण त्यांच्या दुकानावर मी वर्षांतून आजच्या- सारख्या प्रसंगीं एखादेवेळींच जावयाचा.

**शेठजी**—या प्लेगमुळें आज आपणाशीं स्वस्थ बसून चार गोष्टी बोलायला तरी होतील.

**मी**—छेः भलतेंच. उलट पानसुपारीच्या गर्दींत तुम्हांला माझा नमस्कारहि घ्यायला होत नाहीं असें जेव्हां मी नेहमीं पाहतों, तेव्हांच मला अधिक बरें वाटतें. पण त्यापेक्षांहि तुमच्या दुकानावरून दिवसां जातों, आणि गिऱ्हाई- कांच्या गर्दींत जेव्हां मीं रस्त्यावरून मारलेली हांकहि तुम्हांला ऐकूं येत नाहीं, तेव्हां तर अधिकच बरें वाटतें.

**शे.**—तुमच्यासारख्यांचा नमस्कार न दिसणें हें लक्ष्मीच्या धुरांचें लक्षण मीं समजतों. आज तो धूर नाहीं म्हणून डोळे तरी साफ आहेत.

**मी**—अहो ! योग्य प्रसंगींचा धूर डोळ्यांत भरला तर तें भूषणच ! पुरु- षाला श्रावणीच्या होमाचा धूर आणि स्त्रियांना बोहल्यावरील होमाचा धूर हा कधीं तरी बाधला आहे काय ? तो धूर भरलेले डोळेच धन्य ! अशा डोळ्यांनीं त्यांनीं कोणाकडे पाहिलें नाहीं तर तें अव्हेरलेल्या लोकांना कौतुकच वाटतें. अपमान वाटत नाहीं. तुम्ही माझी हांक न ऐकतां, मला उलट नमस्कार न करतां मी तुमच्या दुकानावरून गेलों म्हणजेच, खरें सांगतों, मला अधिक बरें वाटतें. मी मनाशीं म्हणतों " आहे माझा शेठजी भाग्याचा. असो त्यांच्या धंद्याला अशीच बरकत ! "

**शे.**—तुमच्या आशीर्वादानें आतांपर्यंत धंदा काय चालला तो खरा ! पण पुढें दृष्टि दिली म्हणजे दोहों अंगें वाईट वाटतें.

**मी**—तें कसें !

**शे.**—लोकांच्या बाजूनें असें कीं, गेल्या दोन वर्षांत देशांत होतें नव्हतें तें सगळें सोनें धुवून परदेशीं गेलें. आतां आमच्या दुकानीं घेऊन यावयाला

राहिलें आहे काय त्यांच्याजवळ ? आणि घरच्या दृष्टीनें वाईट असें वाटतें कीं, मांझा धंदा थोडाबहुत काय असेल तो माझ्या मागें कोण चालविणार !

**मी**--कां बरं ? आहेना तुमचा लाला ! तो चालवील दुकान ! तो कांहीं तुमच्यापेक्षां कमी बुद्धिवान् आहे असें समजूं नका ! तो कॉलेजांत माझ्या वर्गांत नाहीं, तरी माझ्या कॉलेजांतला बुद्धिवान् विद्यार्थी म्हणून मला त्याचा अभिमान आहे. स्वतः बापानें मुलाची त्यांच्या तोंडावर स्तुति करूं नये असा निर्बंध आहे. पण त्याच्या कॉलेजाच्या प्रोफेसरानें विद्यार्थ्यांच्या बापाच्या देखत त्याची स्तुति करूं नये असा नियम नाहीं. बरें त्यानें दुकान चालविलें नाहीं तरी तुमचे मुनीम चालवितील. लाला दुरून देखरेख करील. मिळून एकच, कायरे लाला ?

**शे.**--मालक जिवंत आणि दुकान मुनीमाच्या स्वाधीन याचा खरा अर्थ कळत नाहीं आपल्याला प्रोफेसरसाहेब ! यजमानाची गादी मोकळी पडली कीं, दुकानहि मोकळेपणाच्या मार्गाला लागलें असेंच समजावें. सांगूं कां ? यजमानासमोर बसलेला मुनीम निर्बुद्ध असला तरी तो शंकरापुढें बसलेल्या नंदीसारखा शोभतो. पण यजमानाचा पत्ता नाहींसा होऊन दुकानांत वावरूं लागलेला बुद्धिमान् मुनिम, ही घराला लागलेली घूस किंवा उसाच्या मळ्याला लागलेला कोल्हाच म्हणाना ! आतां लालाच्या बुद्धीचें सांगतों. त्याला माझ्यापेक्षां जसें आयुष्य तशीच माझ्यापेक्षां बुद्धिहि देवानें अधिक द्यावी. आणि आधींच अधिक आहेहि. पण तिचा उपयोग माझ्या धंद्याला होण्याचें लक्षण दिसत नाहीं इतकेंच वाईट वाटतें. त्याची बुद्धि दुकान सोडून इतर कामांतच फार चालते, प्रोफेसरसाहेब !

**मी** हंसून म्हणालों--ऐक लाला आतां तुझें वर्णन खुद्द तुझ्या बापाच्या तोंडून !

**शे.**--बुद्धि चालते म्हणजे अशी. तो मोठा बाका तिरंदाज आहे. कॅरम की फॅरम-बोर्डावर टिचकीनें असा नेम मारतो अचूक, दुरून एखाद्याच सावजावर, कीं इतर लांकडी चकत्यांचीं सावजें पळून आपापल्या पिशव्यांच्या घरांत जाऊन दडून बसतात ! पण या तिरंदाजाला मोत्यांच्या भोंकांत सोन्याचें सूत घालून दे म्हटलें तर या वयांत चष्मा लागतो ! क्लबांत टेबलावरच्या गोट्या खेळण्यांत हा मोठा पटाईत आहे ! त्यांतली सगळी त्रिकोणमिती याला

पूर्वपरंपरा यांविषयीं योग्य ती हितबुद्धि जागृत असतां त्यांनीं तिला न्यायाच्या मर्यादा सहसा उल्लघूं दिल्या नाहींत.

गुर्जर देशाचे राजे या नात्यानें तेथील प्रजेच्या हितास श्रीमंत सयाजीराव हे सहजच अग्रस्थान देतात. मागासलेल्या जातींचे पुढारी या नात्यानें महाराष्ट्रांतील मागासलेल्या जातींना सक्रिय सहानुभूति दाखवितात व हिंदुस्थानांतील प्रमुख राजे या नात्यानें जात, गोत, प्रांत, देश व धर्म यांना विशिष्ट मर्यादेपलीकडे गौण समजून पात्रापात्रतेप्रमाणें कोणाहि व्यक्तीचा पदरीं संग्रह करण्यास तत्पर असतात. या दूर व्यापक व विशाल दृष्टीमुळेंच त्यांना काजी शहाबुद्दिन, सर रमेशचंद्र दत्त, बाबू अरविंद घोष, अंबालाल साकरलाल, जनार्दन सखाराम गाडगीळ, विनायक जनार्दन कीर्तने व आठल्ये इत्यादि विविध जातींतील, धर्मांतील व प्रांतांतील लोकांच्या गुणांचें व कर्तृत्वाचें चीज करतां आलें. त्यांचा हा क्रम अद्यापिहि चालू असून थोड्याच दिवसांपूर्वी त्यांनीं डॉ. रवींद्रनाथ टागोर, श्री. चिंतामणराव वैद्य, श्री. विठ्ठलराव शिंदे प्रभृतींना अगत्यपूर्वक निमंत्रण देऊन त्यांचा गुणगौरव कसा केला हें सर्वांस माहीतच आहे.

जनतेशीं त्यांची वर्तणूक जशी उदार, न्यायाची व सौजन्यपूर्ण आहे तसेंच त्यांचें ब्रिटिश सरकारशीं वागण्याचें धोरण बाणेदारपणाचें व स्वाभिमानपूर्ण आहे. आपली इभ्रत, अधिकार व दर्जा कायम राखण्याच्या बाबतींत लॉर्ड कर्झनसारख्या अनेक चढेल व्हाइसरॉयांशीं व रेसिडेंटांशीं त्यांस झगडावें लागलें आहे व त्या झगड्यांत त्यांना केव्हां केव्हां यशहि मिळालें आहे. परंतु ब्रिटिशसरकाराशीं झालेल्या तहनाम्यांतील कलमें कितीहि काटेकोरपणानें पाळण्याचा आपण प्रयत्न केला तरी अखेर पराधीनता महत्त्वाच्या राजकारणांत नडते असा कटु अनुभव आल्यामुळें महाराजांनीं आपली मर्यादा ओळखून वरिष्ठ राजकारणांतून मन काढून घेतलेलें दिसतें. गेलीं वीस पंचवीस वर्षें त्यांनीं एक प्रकारचा राजसंन्यास पत्करला आहे. तो वयोमानामुळें किंवा प्रकृतीच्या अस्वास्थ्यामुळें असला तरी त्यांत निराशेची छटा अगदींच नसेल असें म्हणवत नाहीं. तथापि त्यांनीं आपल्या पूर्ववयांत जीं अनेक लोकोपयोगी कामें केलीं त्यामुळें त्यांना आपल्या संस्थानाबाहेरहि लोकप्रियता मिळवितां आली. त्यांचा पुण्यांत व मुंबईत कित्येक संस्थांकडून गुणगौरव करण्यांत आला तें

त्यांच्या लोकप्रियतेचें फळ होय. न्यायबुद्धि, समता, गुणग्राहकता, जाति-द्वेषाचा अभाव हे त्यांच्या अंगचे ठळक गुण असून ते कित्त्याप्रमाणें डोळ्यांपुढें ठेवून त्याप्रमाणें आचरण ठेवण्याची बुद्धि इतर कित्येक संस्थानिकांनाच काय पण व्यक्तींनाहि झाली तर त्यांच्या सत्कारसमारंभाचें खरें चीज झालें असें मानतां येईल.

---

## ७ बॅ. विनायकराव सावरकर

( प्रतिभा १५ जानेवारी १९३६ )

रा. रा. संपादक 'प्रतिभा' यांस सा. न. वि. वि.

बॅ. विनायकराव सावरकर यांच्या लेखनकलेसंबंधानें माझा अभिप्राय लिहून पाठविण्याची सूचना आपणाकडून आली. सावरकरांच्या लेखन-वक्तृत्वासंबंधानें अत्यंत आदरबुद्धि असणारांपैकीं मी एक आहें. तेव्हां त्यांच्यासंबंधानें लिहिण्याची आलेली ही सुसंधि मी कसा घालवीन ? परंतु आपली मागणी मुदतबंद, माझा मुक्काम अनिश्चित, आणि हाताशीं पुऱ्याशा साधनांचा अभाव. या अडचणिमुळें हवें तसें व हवें तितकें लिहून पाठविणें शक्य नाहीं. तथापि मिळालेल्या वेळांत व मिळालेल्या साधनांचा उपयोग करून, चार शब्द आपणाकडे पाठवीत आहें. ह्यांचा आपल्या कार्याला कांहीं उपयोग होईल असें आपणांस वाटेल तरच तें छापावें.

बॅ. सावरकर यांच्या लेखनाला व वक्तृत्वाला, माझ्या आठवणीप्रमाणें, आज सुमारें अठ्ठावीस वर्षांपूर्वीं प्रारंभ झाला. प्रथम त्यांचें व्याख्यान मीं सार्वजनिक सभेच्या दिवाणखान्यांत ऐकलें. तेव्हांच हा वक्ता जन्मसिद्ध आहे अशी माझी खात्री झाली. कै. शिवरामपंत परांजपे यांच्याप्रमाणें, बॅ. सावरकर यांच्या लेखनवक्तृत्वाचा मूळ झरा अत्यंत तीक्ष्ण अशा देशाभिमानांत असूनहि, या गुरुशिष्यांच्या लेखनशैलींत व भाषणशैलींत जमीनअस्मानाचें अंतर होतें. कल्पनाशक्ति दोघांचीहि पल्लेदार. परंतु शिवरामपंतांच्या लेखनकलेंत घातक नाजूकपणा होता, त्याऐवजीं या त्यांच्या शिष्याच्या लेखणींत व वाणींत कठोर निर्भयता व गांवठी आडदांडपणा आढळून येई. शिवरामपंत कोरलेल्या नखांनीं रेशमी चिमटे घेत. सावरकर प्रतिपक्षावर हातापेक्षां आपल्या कराळ दांतांचाच उपयोग अधिक करीत. वाचक व श्रोते यांना आपण हांसविलें असें पाहून आपला प्रयत्न यशस्वी झाला असें

कै. शिवरामपंत यांना वाटे. उलट आपल्या भाषणांत किंवा लेखांत चुकून नर्म विनोद् येऊन, त्यामुळें लोक हांसले असें दिसल्यास, " तुम्ही हंसतां काय ? हंसण्याची तुम्हांला लाज वाटली पाहिजे ! आणि या तुमच्या थिल्लरपणाला मी कारणीभूत झालों असेन तर मीच अधम चांडाळ होय. " असें म्हणून सावरकरांनीं मनांतल्या मनांत स्वतःच्या तोंडांत मारून घेतली असती. शिवरामपंतांच्या कलेचा हेतु आपल्या शत्रूविषयीं द्वेष उत्पन्न करण्याचा मुख्यतः असे; तर सावरकरांचा हेतु त्याच्याविषयीं जळजळीत राग उत्पन्न करण्याचा असे. शिवरामपंत केव्हांहि संपूर्ण, समर्पक, व व्याकरणशुद्ध अशींच वाक्यें बोलत. पण ह्यांत स्पष्टोक्तीचा मात्र सर्वस्वीं अभाव असे. एक वेळ मानवी पतिव्रतेचा उरोज क्वचित उघडा पडलेला दिसेल; परंतु शिवरारामपंतांची राक्षसी विषकन्या कोणाला स्तनपान देऊन मारावयाला आली असली तरी, त्या मर्यादशीलेचा पदर विदारण केल्याशिवाय त्याचें तोंड त्या विषारी ' बोथी ' ला लागणें शक्यच नव्हतें ! उलट सावरकरांचें लिहिणें बोलणें असल्या अंगचोर पडतपोषीचें कधींहि नव्हतें. त्यांच्या कलेच्या रथाच्या निशाणावर " या आणि पहा " हीं अक्षरें नसून " येतो आणि दाखवितोच " अशीं अक्षरें असावयाचीं ! शिवरामपंतांच्या अवगुंठित छद्मी व बहाणेदार लेखनवक्तृत्वानें कितीतरी भोळ्या मनाची फसवणूक होऊन त्यांच्या वाच्यार्थाच्या भुलभुलाईंत तीं कोलमडून जाऊन हास्यास्पद ठरलीं असतील ! पण सावरकरांचें लिहिणें बोलणें भोळ्या गोळ्याच्याहि मनांत आवेशाचा संचार करून, त्याला पक्केपणा आणणोर असे. शिवरामपंतांचे हे गुण व दोष त्यांना अखेरपर्यंत साधले होते व चिकटून राहिले होते. सावरकरांचेहि गुणदोष अठ्ठावीस वर्षांपूर्वीं मीं पाहिले ते आजही तसेच प्रतीत होतात.

दुर्दैवानें या दोघांहि गुरुशिष्यांचा बराचसा लेखसंग्रह सरकारजमा झालेला असल्यामुळें भावी पिढी त्यांच्या आनंदाला सर्वस्वीं मुकणार हें पाहून कोणाला खेद झाल्याशिवाय राहील ? परंतु सुदैवानें त्यांपैकीं बॅ. सावरकर हे अद्यापि हयात असल्यामुळें, या नाहीं त्या रूपानें तरी त्यांचे लेखनगुण वाचकांच्या नजरेला मधून मधून पडत आहेत.

लेखनकलेच्या दृष्टीनें पाहतां सावरकर यांना खरोखर कलावंत म्हणणें जरा कठीणच जाईल. कारण कलेला जो एक नाजूकपणाचा हात लागतो तो यांच्यामध्यें नाहीं. अमेरिकन ग्रंथकार अपटन सिंकलेअर किंवा नॉरिस यांच्याप्रमाणें सावरकरांत आहे तो सगळाच मतप्रतिपादनाचा जोश व धसमुसळेपणा

आहे. ह्यांच्याइतका जबरदस्त 'प्रॉपोगँडिस्ट' महाराष्ट्रांत दुसरा क्वचितच पहावयाला मिळेल. ते कोणताहि विषय घेवोत-मग ती भाषेची शुद्धि किंवा धर्मातारितांची शुद्धि असो--शुद्धलेखनाची सुधारणा असो किंवा सामाजिक सुधारणा असो—ते जसे कांहीं रणसंग्रामाकरितां हातांत तलवार घेऊनच बाहेर पडतात. यांचें शस्त्रागार लहान मोठ्या तलवारींनीं समृद्ध आहे. त्या बनविणाऱ्या शिकलगाराला तरवारीला तीक्ष्ण पाणी कसें द्यावें एवढीच कला माहित होती; पण ती आकारानें सुंदर किंवा जिल्हईनें तजेलदार कशी करावी हें त्याच्या गुरूनें शिकविलें नव्हतें. मग ह्या तलवारीवर 'डमास्कस' किंवा 'टोलेडो' येथें तयार झालेल्या पात्यावरील वेलबुट्टी किंवा बारीक कलाकुसर कोठून येणार ? तलवार मात्र तीक्ष्ण व खूप पल्लेदार. "तुझी तलवार आंखुड असेल तर तूंच एक पाऊल इतरांच्या पुढें टाकून चाल कसा, म्हणजे इतरांच्या तरवारीची व तिची बरोबरी होईल" असा उपदेश, एका स्पार्टन सेनापतीनें आपल्या एका तक्रारखोर शिपायाला केल्याचें इतिहासांत आढळतें. पण सावरकराना अशा उपदेशाचें कारणच नाहीं. आधीं त्यांची तलवार इतरांहून लांब; व त्यांतूनहि ते स्वतां इतरांपेक्षां पाऊलभर पुढेंच ! कवित्वाचें जें एक अंग म्हणजे कल्पनाशक्ति ती सावरकरांमध्यें परिपूर्ण आहे. परंतु भाषासौष्ठव, रसवैचित्र्य, व व्यंग्यात्मक सूचकपणा हे गुण त्यांच्या कवितेंत नाहींत. गद्याचेंहि असेंच. बोलून लिहून स्वतःला व दुसऱ्याला घाम फोडणें हें ते हटकून करतील. पण घाम पुसण्याच्या निमित्तानें कुरवाळणें हें त्यांना साधत नाहीं. स्पष्टोक्तींत त्यांचा अगदीं हातखंडा आहे. आणि या बाबतींत ते देवालाहि भिणार नाहींत. स्पष्टोक्तीचे जे अंगभूत दोष, म्हणजे टाकून बोलणें, दडपून बोलणें, अतिशयोक्ति करणें, ग्राम्य बोलणें हे सर्व त्यांच्यामध्यें आहेत. तथापि युक्तिवादाचा ओघ, शब्दांचा ठसठशीतपणा, व निर्भयता यांच्या योगानें त्यांची स्पष्टोक्ति फारच परिणामकारक होते. त्यांना प्रतिभा आहे; पण ती प्रज्ञेपेक्षां किंवा विचारापेक्षां विकारावर अधिक अधिष्ठित असते.

सावरकरांनीं कविता, नाटकें, निबंध व ग्रंथ अशा अनेक प्रकारचें वाङ्मय लिहिलें आहे पैकीं मला त्यांचे निबंध व कविता या अधिक पसंत पडतात. त्यांच्या ग्रंथलेखनांत मतप्रतिपादनाचा विषय भरपूर विवेचिलेला असतो; पण विचारी ग्रंथकर्त्यांच्या अंगीं जो विवेक; जो कठोर सत्याची आवड,

जो समतोलपणा असावा लागतो तो असत नाहीं. त्यांचें १८५७ सालच्या बंडाचें पुस्तक मीं एक वेळ ओझरतें पाहिलें व चाळलें आहे. त्यांतील माहिती बऱ्याच इंग्रजी ग्रंथांतून घेतलेली आढळली व त्यांतील नुसती हकीकत देखील परिणामकारक ठरते. सत्तावन सालच्या बंडाची खरी हकीकत वाचावयास मिळणें फारच कठीण. कारण हिंदी लेखकांनीं त्या विषयीं कांहींच लिहिलेलें नाहीं. आधीं त्या पहिल्या काळीं मराठी गद्य लिहिण्याचा कोणालाच सराव नव्हता. शिवाय बंडाची हकीकत ' चिठ्याचिटोरीं' सुद्धां बाळगण्याची लोकांना भीति वाटे. ग्रंथ येऊन जाऊन इंग्रजांनीं लिहिलेले. सर्व बहुधा एकतर्फी, त्यांतून जें थोडें दुतर्फी लिहिलें गेलें त्यांतील दुर्मिळ माहिती मिळवून सावरकरांनीं आपला ग्रंथ लिहिला. पण तो सरकारजमा झाला. त्यांचा मॅझिनीच्या चरित्राच्या ग्रंथ अत्यंत वाचनीय व सरस वठला आहे. तोहि सरकारजमा. त्यांच्या हिंदुत्व या ग्रंथांत हिंदुत्वाचें सांगोपांग विवेचन केलें आहे. तसे नव्या दृष्टीनें विवेचन इतर कोठें सहसा वाचावयास मिळणार नाहीं. हिंदुत्वाचे खरे वीर सावरकरच होत परंतु हिंदुत्वाचा अभिमान बाळगणाऱ्या त्यांच्यासारख्या इतर लोकांचीं मनें दुखविणारे असे अनेक लेख त्यांनीं अलिकडे विनाकारण लिहिले आहेत. त्यांनीं हें ध्यानांत ठेवावें कीं हिंदुत्वावर घाला घालणाऱ्या परकीयांसंबंधानें वापरण्यास योग्य अशी भाषा, स्वकीय हिंदुधर्माभिमान्यासंबंधीं वापरल्यानें विद्वेष उत्पन्न होतो व कार्याची हानि होते. पण " मन वळविणें " हा गुण सावरकरांत नाहींच. "मान वळविणें म्हणजे मुरगाळून इकडची तिकडे करणें " हें काम मात्र त्यांची लेखणी फार चांगल्या रीतीनें करूं शकते. हिंदुत्वाचें सर्वांगीण समर्थन करणें हें काम किती अवघड आहे हें ते जाणतातच. म्हणून विनोदाचा नाजूक हात फिरवूनच पुराणमतवादी लोकांचा मनोनुनय करावा लागतो. तसें ते करतील तर एकंदरीनें हिंदुत्वासंबंधाची जी त्यांची वीर वृत्ति व हितसंरक्षणदक्षता त्याचें पुराणमतवादी देखील योग्य चीज करितील. धर्माच्या बाबतींत प्रत्येकजण कांहींना कांहीं, आपापल्या कारणाकरितां, पूज्य व पवित्र मानीतच असतो. पुराणमतवादी जर, कोंडलेलें मांजर उलटतें व अंगावर येतें त्याप्रमाणें सावरकरांवर निराशेनें हल्ला करून त्यांना विचारूं लागले कीं ' तुम्ही स्वतः हिंदुत्वाच्या व्याख्येंत ज्या गोष्टी गोवल्या आहेत त्यांचा पवित्रपणा, पुण्यप्रदता, अभिमानास्पदता, ही तरी भावनेनेंच

समर्थन होणारीं आहेत कीं नाहीं ! हिंदूंच्या भूप्रदेशाची व्याप्ति ठरवितांना जर तुम्ही ऋषिवचनें मानतां तर गाई, तीर्थे, धर्माचार वगैरे संबंधानेंहि तुम्ही तीं कां मानूं नये ! निदान " तत्तस्य किमपि द्रव्यं यो हि यस्य प्रियो जनः ' या न्यायानें ज्याला त्याला ( कदाचित् असमर्थनीय असेंहि ) कांहीं प्रिय किंवा पवित्र असतेंच. म्हणून त्यावर प्रत्यक्ष हल्ला न करितां, आपल्या स्वतःच्या विचारसरणीची श्रेष्ठता, विवेकबुद्धि व तारतम्य यांच्या द्वारें, पटवून द्यावी. ( People living in glass houses should not throw stones at others ).

असो. सावरकरांच्या नाटकांसंबंधीं माझा फारसा अनुकूल ग्रह नाहीं. त्यांचें उःशाप हें नाटक मीं वाचलें नाहीं. संन्यस्त खड्ग व उत्तर-क्रिया हीं वाचलीं. पण तीं नाटकें या दृष्टीनें मला मुळींच आवडलीं नाहींत. त्यांत नाट्यविषयाची मांडणी कुशलपणाची नाहीं. भाषणें इतकी बोजड व पल्लेदार कीं नाटकपात्रें तीं कशीं पाठ करित असतील हें त्यांचें त्यांनाच माहीत ! स्वभावरचना परिणामकारक नाहीं. विनोद तर अगदींच थिल्लर व ग्राम्य. शृंगारविषयक भाषणें उत्तान व जुन्या नाटकी थाटाचीं. तंत्राची पुनरुक्ति. पण मतप्रतिपादनाच्या दृष्टीनें वाचलीं असतां हीं दोनहि नाटकें परिणामकारक होऊं शकतील. सावरकरांचे मतप्रतिपादनाचे एकंदर तीन चार विषय दिसतात. हिंदुराज्याची प्रतिष्ठापना, स्वदेशाला स्वातंत्र्यलाभ, हिंदुधर्मांतलि जातिभेदाचा नाश, आणि धर्मभोळेपणाचें उच्चाटण. पैकीं स्वदेशाला स्वातंत्र्यलाभ हा ( छापण्याच्या व प्रयोग करण्याच्या ) नाटकांचा विषय हल्लींच्या कायद्याच्या जुलमी राज्यांत होऊं शकत नाहीं. परंतु इतर तीन विषय त्यांनीं आपल्या तीन नाटकांत भडक रंगविले आहेत. ' सन्यस्त खड्ग ' हें नाटक म. गांधींच्या अतिशयोक्त अहिंसावादावर टीकारूप आहे. त्यांतलें एक पात्र ' गप्पा ठोकीत नाहीं ' व ' हाका मारीत नाहीं ' कारण ठोकणें व मारणें हे शब्द हिंसावाचक ठरतात !

नाटकांतील दोष वाटले ते वर दाखविलेच. पण त्यांतील कांहीं संभाषणें वक्तृत्वाचे व विषयप्रतिपादनाचे उत्तम मासले म्हणून दाखवितांहि येतील. उदाहरणार्थ, उत्तर क्रिया नाटकांतील पृष्ठ २३ वरील यशवंतरावांचें भाषण, तसेंच

संन्यस्त खड्ग नाटकांतला तिसऱ्या अंकांतला चवथा प्रवेश व पृ. १३१–२ वरील धर्माचें भाषण.

सावरकरांच्या लेखनांतील कलेचें खरें स्वरूप त्यांच्या कवितांत जितकें उतरलें आहे तितकें तें दुसऱ्या कशांत उतरलें नाहीं; तेथें त्यांची भावना व कल्पनाशक्ति या दोघांनाहि हवा तसा अवसर मिळाला आहे. गोमंतक व कमला हीं त्यांचीं काव्यें हृदयंगम आहेत. त्यांचे पोवाडे वीररसपूर्ण आहेत, व ऐकतांना हृदय थरारून सोडतात. कवि गोविंदाचेच ते सहकारी. मात्र कवि गोविन्दाच्या कवितेची ओजस्विता सावरकरांनीं पुरी घेतली असली तरी, त्यांची गोडी त्यांना मुळींच घेतां आली नाहीं. त्यांचें पहिलें कवन सरकारजमा झालें. पण सुदैवानें रानफुलें नांवाचा त्यांचा कवितासंग्रह बंधमुक्त आहे. त्यांतील कविता, फुंकरानें उडून जाण्यासारख्या 'म्हातारी 'सारखी, वरवरच्या भावनेनें स्फुरित नसून हृदयांत खोल जागा घेऊन बसलेल्या ध्येयावर अधिष्ठित आहे. त्यांच्या कवितेंतच काय तो करुणरस पाहावयास सांपडतो. पण तो वीररसपोषक असाच आहे. ' जगन्नाथाचा रथोत्सव ' या त्यांच्या कवितेंत त्यांनीं आपल्या कल्पनाशक्तीच्या भव्यपणाची कमाल केली आहे.

असो. तेलाचे पेटलेले पलिते व नागव्या सुऱ्या बांधलेल्या चौकटींतील उड्यांप्रमाणें सावरकरांचें सर्व लेखन आहे. त्यांचा जन्म बंदिवासाच्या अंधेरांत जाण्याचा ईश्वरी संकेत दिसतो. पण त्यांनीं तो अंधेर देशप्रेमाच्या स्नेहानें पाजळलेल्या प्रतिभेनें शक्य तितका हटवून आपलें खरें स्वरूप लोकांना दाखविल्याशिवाय सोडलें नाहीं. असला विशिष्ट पराक्रम फार थोड्यांनीं केला. म्हणून त्याबद्दल त्यांना धन्यवाद देऊन हें संक्षिप्त व त्रुटित समीक्षण पुरें करतों.